# आधुनिक भारत

[ सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति ]

— आचार्य शं. द. जावडेकर

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला पुष्प १९ वे

# आधुनिक भारत

[ सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति ]

लेखक

आचार्य शं. द. जावडेकर




१ ऑगस्ट, १९५३ ]

[ मूल्य १२॥ रुपये

# परिचय

आचार्य जावडेकर यांचा 'आधुनिक भारत' हा ग्रंथ १९३८ च्या ऑक्टोबर-मध्यें प्रथम प्रकाशित झाला हा केवळ राजकीय इतिहासाचें निरूपण करणारा ग्रंथ नसून सांस्कृतिक प्रश्नांची मूलगामी चर्चा करणारा असल्यामुळें महाराष्ट्रांतील सर्व विचारवंतांचे लक्ष त्याचेकडे आकर्षिलें गेलें महाराष्ट्राचे थोर तत्त्वचिंतक श्री. वामन मल्हार जोशी यांनीं 'गीतारहस्यानंतरचा थोर ग्रंथ' म्हणून 'आधुनिक भारता'चा गौरव केला महात्मा गांधींच्या राजकारणाचें व तत्त्वज्ञानाचें शास्त्रीय भूमिकेवरून केलेले विवेचन अभिनव असल्यामुळें या ग्रंथाचे हिन्दी आणि गुजराती या भाषांतूनहि अनुवाद प्रकाशित झाले. त्यामुळे महाराष्ट्राबाहेरहि या ग्रंथाला प्रसिद्धि व मान्यता लाभली

पेशवाईच्या अस्तापासून लोकमान्य टिळकांच्या निधनापर्यंतच्या शतकांत हिंदुस्थानांत आणि विशेषतः महाराष्ट्रांत ज्या ज्या वैचारिक चळवळी झाल्या, त्यांचें आचार्य जावडेकर यांनीं या ग्रंथांत केलेले विश्लेषण आणि मूल्यमापन आता सर्वमान्य झालेलें आहे लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याचें नेतृत्व महात्मा गांधी यांचेकडे गेले. 'आधुनिक भारता'च्या पहिल्या आवृत्तींत साहजिकच या नेतृत्वाची विस्तृत चर्चा करण्यांत आली होती तथापि, स्वातंत्र्य-प्राप्तीचें कार्य त्या वेळीं पुरे झालेले नसल्याकारणानें ती चर्चा कांहीं ठिकाणीं भविष्याचा अंदाज घेणारी झाली होती. 'आधुनिक भारता'च्या आजच्या नव्या आवृत्तींत गांधीयुगाचें संपूर्ण समालोचन आलेलें आहे स्वातंत्र्यप्राप्तीबरोबर गांधींचे प्रत्यक्ष नेतृत्वहि संपले. यामुळे आधुनिक भारताचें पारतंत्र्यापासून स्वातंत्र्यापर्यंतचें एक संपूर्ण महाभारत आता ऐतिहासिक दृष्टया आपणासमोर उभें झालेले आहे याचें चित्रण या नव्या आवृत्तींत पूर्णांशाने वाचकांस पहावयास मिळेल. या दृष्टीनें 'आधुनिक भारत' हा ग्रंथ आतां पूर्ण झाला आहे असे म्हणावयास हरकत नाहीं स्वतंत्र भारताची समाजरचना कोणत्या पद्धतीने व्हावी, याची तात्त्विक रूपरेषा आचार्य जावडेकर यांनीं आपल्या या नव्या आवृत्तींत दिली आहे. तिची सत्यता अथवा व्यवहार्यता भविष्यकाळ ठरवील. तथापि भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाचे त्यांचें विवेचन आतां सर्वमान्य होऊ शकेल, असा मला विश्वास वाटतो

आचार्य जावडेकर यांची भूमिका इतिहासकाराची अथवा केवळ तत्त्वचिंतकाची नाहीं भारतीय स्वातंत्र्याच्या राष्ट्रीय प्रेरणेशीं ते स्वतः बाळपणापासून समरस झालेले आहेत शिवाय, त्यांची मानसिक प्रकृति सांप्रदायिक नाहीं यामुळें भारतीय स्वातंत्र्याच्या सर्वांगीण चळवळींचा ते पुरस्कार करीत आले आहेत. सामाजिक सुधारणा आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य यांचा त्यांनीं कधी परस्पर-विरोध मानिला नाहीं. उलट, या दोनहि गोष्टी परस्परानुकूल आहेत अशीच त्याची स्वतःची बाळ-

पणापासून निष्ठा आहे. तथापि, परतंत्र राष्ट्राचें संजीवन स्वातंत्र्यप्राप्तीनेंच होऊं शकतें, हा त्यांचा दृढ विश्वास होता यामुळे सामाजिक सुधारणेच्या एकेरी आग्रहाने ते राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या मुख्य लक्ष्यापासून कधींहि पराङ्मुख झाले नाहींत. गांधीयुगाच्या प्रारंभीं त्यानीं सार्वजनिक जीवनात स्वतः प्रवेश केला तोपर्यंत त्याची विद्या-साधनाच चालू होती या विद्यार्थीदशेंत त्यांच्यावर टिळक आणि आगरकर या दोघांचेहि सारखेच संस्कार झालेले होते यामुळे गाधीयुगाच्या स्वागताची त्याची पूर्वतयारी झालेली होती ते स्वतः अर्थशास्त्र व राजकारण या विपयाचे अभ्यासक असल्यामुळे त्यानीं समाजवाद व रशियन राज्यक्राति याचा अभ्यास प्रारभिलेला होताच पण त्यांच्या बुद्धीला तत्त्वज्ञानाचीहि आवड असल्यामुळे त्यानीं आपल्या महाविद्यालयीन जीवनात पौरस्त्य व पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा अभ्यास आरभिलेला होता. तत्त्वज्ञानाच्या बैठकीवरून सामाजिक जीवनाच्या सर्व व्यवहारांचे परीक्षण करण्याची पात्रता या अध्ययनप्रवृत्तीमुळे त्याना सहजच लाभली एवढ्या व्यापक शिदोरीसह त्यांनीं गाधीयुगाच्या प्रारंभी महाराष्ट्राच्या राजकीय व शैक्षणिक जीवनात प्रवेश केल्यामुळे महाराष्ट्रातील तरुण कार्यकर्त्यांमध्यें त्यांचें वैचारिक उच्च स्थान निर्माण झाले ग्रथलेखन, अध्यापन आणि वृत्तपत्रीय सपादन या तीन मार्गांनी त्यांनी आपले वैचारिक मार्गदर्शनाचे कार्य अव्याहत चालू ठेविलें १९३०, १९३२ व १९४२ च्या स्वातंत्र्याच्या सामुदायिक लढ्यामध्ये त्यानीं देहदडहि सोसला अशा रीतीनें त्यांनीं आपल्या विचारांना आचाराचे योग्य पाठबळहि दिलेले आहे असह-कारितेच्या प्रारभीं इस्लामपूर येथें त्यानीं अस्पृश्यतानिवारणाच्या कामाला धैर्यानें हात घातला व पुण्याला आल्यावर एका अस्पृश्य विद्यार्थ्याला त्यांनी जाहीरपणे आपल्या कुटुंबात एकत्र राहण्यास घेतले यामुळें आचार्य जावडेकराचा राष्ट्रवाद हा सर्वांगीण क्रातिकारक बनलेला आहे. राष्ट्रवादी तत्त्वज्ञानें वा चळवळी पुष्कळ वेळा एकांगी, हटवादी आणि सकुचित झालेल्या दिसतात अशी विकृति जावडेकरांच्या विचाराला वा आचाराला जडलेली कोणीं पाहिली नाहीं राजकीय विचाराला अति-रिक्त पक्षनिष्ठेनेंहि विकृति येऊ शकते. बहुधा राजकारणातील पक्षभेद हे एक प्रकारच्या बौद्धिक वकिलीनें डागळलेले असतात त्याचे लिखाण सत्यनिष्ठेपेक्षा पक्षनिष्ठेवर आधारलेलें असते आचार्य जावडेकर यांचें वृत्तपत्रीय सपादन देखील या दृष्टीनें आदर्श मानावें लागेल त्यानीं आपल्या आयुष्यात आपल्या बौद्धिक निष्ठेशी कधींहि प्रतारणा होऊ दिली नाहीं संकुचित पक्षनिष्ठेचा स्वीकार करून आपल्या बौद्धिक स्वतंत्रतेचा त्यांनीं कधींच बळी दिला नाही. यामुळे त्यांच्या लेखनात ओजस्वी तत्त्वनिष्ठा सर्वत्र भरून राहिलेली आढळते महाराष्ट्राच्या अलीकडच्या कित्येक वर्षांच्या लेखन-इतिहासात आचार्य जावडेकराना अलौकिक स्थान द्यावे लागेल भारतीय स्वातंत्र्यपर्वाचा रोमहर्षण इतिहास लिहिण्यासाठीं महाराष्ट्राला आचार्य जावडेकरांसारखा ध्येयनिष्ठ आणि आचारशुद्ध तत्त्वज्ञ लेखक लाभला, हे महाराष्ट्राचे विशेष सौभाग्य होय

आचार्य जावडेकर यांच्या राष्ट्रवादाला आणखी दोन बाजू आहेत. एका बाजूनें त्यानीं आपला राष्ट्रवाद आध्यात्मिक भूमीवर स्थिर केला आहे, आणि दुसऱ्या बाजूने त्या राष्ट्रवादाला त्यानीं समाजवादाची दिशा जोडून दिली आहे. त्याच्या समन्वय-बुद्धीनेच त्याना ही गोष्ट साध्य करिता आली हें उघडच आहे या ठिकाणीं समन्वय या शब्दाचा अर्थ नीट समजून घेतला पाहिजे समन्वय म्हणजे तडजोड नव्हे प्रसग-साधू राजकारणी ज्याप्रमाणे वाटेल त्या तडजोडी व्यवहारात करीत असतात, त्या-प्रमाणेंच अशा राजकारणाची वकिली करणारे सधिसाधू लेखकहि वैचारिक क्षेत्रात वाटेल त्या तडजोडी दाखविण्यास पुढे येतात तडजोडीने राजकारणे जशीं फसतात, तशींच तडजोडीचीं तत्त्वज्ञानेंहि अतीं लज्जित झाल्याशिवाय रहात नाहींत या प्रकारच्या तडजोडीला समन्वय हे नांव देता येणार नाहीं तो शुद्ध सधिसाधुपणा होय. समन्वय ही एक उच्च ज्ञानप्रक्रिया आहे या प्रक्रियेत जीवनातील विविध आणि विरोधी विभागातहि जे एकत्वदर्शक सत्य लपलेले असतें, ते शोधक बुद्धीने हुडकून काढावयाचे असते, आणि जीवनाची शक्ति विविधतेनें भांबावून जाऊं नये वा व्यर्थ विरोधाने क्षीण होऊ नये यासाठीं तिला सफलतेच्या मार्गावर पुढे जाण्यासाठीं दिग्दर्शन करावयाचे असते अशा समन्वयशोधक बुद्धीची समाजाला नेहमींच गरज असते ही बुद्धि म्हणजे केवळ तर्कबुद्धि नव्हे या बुद्धींत तार्किक विश्लेषणाची शक्ति गृहीत धरलेली असली, तरी तेंच तिचें मुख्य रूप नव्हे तार्किक विश्लेषणानें स्पष्ट दिसून आलेल्या असत्य अशाचा कठोरपणाने त्याग करण्याचे सामर्थ्य अशा समन्वय-बुद्धीला असावे लागतेंच परतु असत्य अशाच्या त्यागानतर जुन्या सत्य अंशाचा एका नव्या उच्च पातळीवर एकत्र समावेश करून नव्या व्यापक सत्याचे दर्शन घेण्याची अथवा असें अभिनव सत्य निर्माण करण्याची शक्ति हाच समन्वयबुद्धीचा प्राण होय आचार्य जावडेकराच्या बुद्धींत ही समन्वयशक्ति आहे, असे मला म्हणावयाचे आहे ही समन्वयबुद्धि दोन पातळींवर निर्माण झालेली आढळते सामाजिक जीवनात नवे आदर्श निर्माण करणाऱ्या व समाजाला त्या नव्या आदर्शा-कडे स्वत:च्या तपस्येने खेचून नेणाऱ्या ऋषींचा वर्ग ही एक पातळी, आणि अशा जीवनद्रष्टया ऋषींच्या विचाराचा बौद्धिक उलगडा करून दाखविणाऱ्या तत्त्वज्ञ आचार्यांचा वर्ग ही दुसरी पातळी आचार्य जावडेकर हे या दुसऱ्या पातळींतील एक श्रेष्ठ तत्त्वज्ञ म्हणून महाराष्ट्रात सदैव मानले जातील, असा मला दृढ भरवसा आहे

अध्यात्मवाद म्हटला म्हणजे परलोकपरायणता, ऐहिकपराङ्मुखता, व्यक्तिपरता, समाजविन्मुखता, एकातिक चिन्तनशीलता, भौतिकाविषयीं उदासीनता इत्यादि गोष्टींचीं चित्रे सामान्यत. आपल्या डोळ्यासमोर उभीं राहतात, आणि म्हणून समाजजीवनाच्या दृष्टीने अध्यात्मवाद ही एक प्रगतिविरोधी वृत्ति आहे, तो एक पलायनवाद आहे, असे पुष्कळ क्रातिकारकाचे मत झालेले आहे अध्यात्माचा जगातील इतिहास पाहिला, तर असे मत बनण्याला अध्यात्मवादी लोकानी पुष्कळ जागा करून

ठेवलेली आहे हें नाकारतां येणार नाहीं विशेषतः, राजकीय सत्ता आणि आर्थिक श्रेष्ठता उपभोगणाऱ्या वर्गांनीं आपलें आधिपत्य टिकविण्यासाठीं अध्यात्मवादी विचारांचा आणि कल्पनांचा आतापर्यंत खूप दुरुपयोग केलेला आहे हे देखील कबूल केलें पाहिजे तथापि, एवढ्यानें अध्यात्मवाद हा मुळातच समाजविरोधी आहे असे मानणे योग्य होणार नाहीं कारण अध्यात्मवादी पुरुषानीं जगामध्यें उदात्ततेचे आदर्श वेळोवेळीं निर्माण केले आहेत आणि त्या आदर्शांकडे जाण्यासाठीं समाजमनाला आवाहन केले आहे त्या आदर्शांसाठीं कित्येक अध्यात्मवादी पुरुषानीं आपले सर्वस्वाचे बलिदानहि केलेले आहे म्हणून अध्यात्मवादाची विकृति झाडून काढून शुद्ध अध्यात्माचे स्वरूप समाजापुढें वारवार माडण्याची गरज आहे सर्वस्वीं हीनदीन झालेल्या भारतीय समाजात आशेचा आणि उत्साहाचा नवा आवेश निर्माण करण्यासाठीं आधुनिक भारतात गेल्या शे-दीडशे वर्षात जे थोर पुरुप झाले, त्यानीं आपली स्फूर्ति अध्यात्मातूनच मिळविली होती असे दिसून येते. या अध्यात्माला रूढ विकृतीपासून वेगळे करण्यासाठीं त्यांनीं 'कर्मयोगी अध्यात्म' असे मुद्दाम नवीन नाव दिलें या कर्मयोगी अध्यात्माची योग्य चिकित्सा आचार्य जावडेकरानीं आपल्या ग्रथात जागोजाग केली आहे व्यक्तीनें स्वतःच्या सुखांत वा विलासांत मग्न न राहता समाजविकासाच्या कार्यात आपले व्यक्तित्व विरवून टाकले पाहिजे आणि त्यातूनच आपले व्यापक व्यक्तित्व निर्माण केले पाहिजे, हा या कर्मयोगी अध्यात्माचा मुख्य संदेश आहे हे अध्यात्म बुद्धिप्रामाण्याच्या विरोधी नाहीं फक्त बुद्धीचा विकास केवळ तर्कशक्तीनें होत नाहीं, त्यासाठीं भावशुद्धीची आवश्यकता असते, एवढेच या अध्यात्माचे म्हणणे आहे. सामाजिक समतेचा सर्वांगीण विकास हे या कर्मयोगी अध्यात्माचें एकमेव साध्य मानलेले आहे आणि या साध्यासाठीं समाजाने अधिकाधिक शुद्ध साधनाचा स्वीकार केला पाहिजे असा या अध्यात्मवादाचा विशेष कटाक्ष आहे आचार्य जावडेकरानीं आपल्या राष्ट्रवादाला कर्मयोगी अध्यात्माचा आधार दिल्यामुळें तो राष्ट्रवाद समाजवादाच्या दिशेकडे स्वाभाविकच वळला आहे भारतीय राष्ट्रवादाची प्रेरणा भारतीय जनतेच्या उद्धाराची असल्यामुळें येथील राष्ट्रवादाला विकृत स्वरूप लाभणें शक्य नाहीं, असा आचार्य जावडेकराचा मुख्य सिद्धात आहे भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासाकडे पाहिलें असता हा त्यांचा सिद्धात सामान्यतः बरोबर ठरला आहे, असे म्हणावयास हरकत नाहीं कोणताहि वाद सामान्य जनतेपासून दूर गेला, तर तो तेव्हांच विकृत होतो सामान्य जनतेच्या जीवन-प्रश्नाशी साथ राखणारा कोणताहि वैचारिक पथ अतीं शुद्ध झाल्याखेरीज रहात नाहीं. राष्ट्रवाद विकृत झाला असता त्याला फॅसिझम्चें स्वरूप येते, हे आपण नुकतेंच पाहिले आहे या फॅसिझम्लाहि अध्यात्मवादाचे मोठे आकर्षण असते, ही गोष्ट खोटी नाही पण फॅसिझम्ची ही विकृति जनताद्रोहामुळेच निर्माण होत असते, हेंहि आता उघड झालें आहे आचार्य जावडेकर याचा आध्यात्मिक राष्ट्रवाद जनतानिष्ठ राहिल्यामुळें त्याला समाजवादाचे मधुर स्वरूप लाभलें आहे.

राष्ट्रवाद आणि समाजवाद यांच्या परस्पर-संबंधांचा विचार आचार्य जावडेकर यांनीं असहकारयुगाच्या प्रारंभीच केलेला आढळतो किंबहुना, गांधींच्या सत्याग्रह-तत्त्वज्ञानाचा तात्त्विक स्वीकार करण्यापूर्वीच आचार्य जावडेकर यांनीं समाजवादाचा स्वीकार केला होता आपल्या 'राजनीतिशास्त्र-परिचय' नावाच्या पहिल्या मोठ्या ग्रथांत त्यांनीं समाजवादाविषयीं चागलें विवेचन केलेलें आढळेल त्यानंतर त्यांनीं महात्मा गांधींच्या सत्याग्रह-तत्त्वज्ञानाचा पूर्ण विचारान्तीं स्वीकार केला आणि तेव्हा-पासून सत्याग्रही समाजवादाचे आपले नवे तत्त्वज्ञान ते प्रसृत करीत आले आहेत पहिल्या महायुद्धानतर हिंदुस्थानात गाधीवाद आणि मार्क्सवाद हे दोन नवे विचार-सप्रदाय परस्परांशीं झगडत आले आहेत. या दोनहि विचाराचा समन्वय इष्ट आणि शक्य आहे, अशी आ जावडेकराची दृढ श्रद्धा आहे भारतात विकसित होत आलेल्या आध्या-त्मिक राष्ट्रवादाचे सत्याग्रही समाजवाद हे परिणत फल आहे, असें त्याचे ठाम मत आहे. स्वातत्र्याच्या प्राप्तीनतर भारतीय जनतेची सर्वांगीण विकासाची चळवळ सत्याग्रही समाजवादाच्या दिशेनेंच होत राहील, असा त्याचा विश्वास आहे सत्याग्रही समाज-वादाच्या सिद्धान्ताचे आचार्य जावडेकर यानी गेली दोन तपे जें विवेचन चालविलें आहे, त्याचा निष्कर्ष 'आधुनिक भारता'च्या या नव्या आवृत्तींत सुस्पष्टपणे पुन्हा एकदा माडण्यात आला आहे. हे सर्व विवेचन मौलिक विचाराने भरलेलें आहे, असा माझा अभिप्राय झाला आहे महात्मा गांधींच्या मृत्यूनतर गाधीवादी विचाराचें सामर्थ्य लोपते कीं काय, अशी एक भीति उत्पन्न झाली होती निष्क्रियता आणि साप्रदायि-कता यानीं बहुतेक गाधीवादी लोकाना ग्रासल्याचे दिसत होते परतु विनोबाजींच्या रूपाने भारतात सत्याग्रहाचे अथवा सर्वोदयाचे नवे तेजस्वी स्वरूप प्रकट होऊ लागले आहे, आणि समाजवादी विचार अधिकाधिक सत्याग्रहाचे तत्त्व आत्मसात् करू लागला आहे यामुळे भारतात या पुढच्या काळात आचार्य जावडेकर म्हणतात त्याप्रमाणे सत्याग्रही समाजवादाच्या प्रस्थापनेला अनुकूल परिस्थिति निर्माण होत चालली आहे, असेहि मला वाटते

महात्मा गांधींचें सत्याग्रहाचे तत्त्वज्ञान अहिंसक समाजरचनेच्या निर्मिती-साठीं पुढे आलेलें आहे त्याची दृष्टि पारलौकिक नाहीं, ऐहिकच आहे सत्याग्रह हा सन्यासमार्ग नसून तो प्रखर सामाजिक कर्मयोगच आहे त्याची बैठक सकुचित राष्ट्रवादाची नाहीं तो विश्वमानवाचे एकत्व मानणारा व त्यासाठीं सामाजिक जीवनाच्या सर्व क्षेत्रात समतेची प्रस्थापना करणारा मानवतावादी विचार आहे यामुळें मानवा-मानवांमध्यें भेद पाडणाऱ्या सर्व सस्काराचा त्याला निरास करावयाचा आहे. राजकीय पारतत्र्य, आर्थिक विषमता आणि सास्कृतिक श्रेष्ठ-कनिष्ठता याचा सामाजिक जीवनांतून सपूर्ण विलय केल्याशिवाय अहिंसक समाजाची निर्मिती होणार नाहीं अहिंसक समाजनिर्मितीच्या मार्गातील हे अडथळे दूर करण्यासाठीं सत्याग्रह-तत्त्वज्ञानाला मोठमोठ्या सामाजिक चळवळी हातीं घ्याव्या लागतील

महात्मा गाधींनीं भारतात सत्याग्रहाचा जो दीर्घ संग्राम चालविला, त्याचें

स्वरूप त्यांनीं स्वतःच ठरवून घेतलें होते ते अहिंसाधर्माचे संपूर्ण पुरस्कर्ते असले, तरी त्यांनीं भारतीय जनतेपुढे ठेविलेला अहिंसामार्ग हा जातीय ऐक्य आणि स्वराज्य-प्राप्ति या दोन क्षेत्रांपुरताच प्रारंभी मर्यादित केलेला होता. Hinduism and Non-violence या मथळयाखालीं १९२४ सालीं आपल्या ' यंग इंडिया ' पत्रांत लिहिताना त्यांनीं पुढील उद्गार काढिले आहेत :

"But I never presented to India that extreme form of Non-violence, if only because I do not regard myself fit enough to redeliver that ancient message Though my intellect has fully understood and grasped it, it has not as yet become part of my whole being My Strength lies in my asking people to do nothing that I have not tried repeatedly in my own life I am then asking my countrymen to-day to adopt non-violence as their final creed, only for the purpose of regulating the relations between the different races, and for the purpose of attaining Swaraj Hindus and Mussulmans, Christians, Sikhs and Parsis must not settle their differences by resort to violence, and the means for the attainmnet of Swaraj must be non-violent This I venture to place before India, not as a weapon of the weak, but of the strong"

गांधींचा सामाजिक अहिंसामार्ग क्रमाक्रमाने विकसित होत गेलेला आढळतो. आत्मक्लेशाने विरोधकाचें हृदयपरिवर्तन घडवून आणणे हे त्या मार्गाचे मुख्य सूत्र सदैव कायम राहिले असलें, तरी विरोधकाशीं ठेवावयाच्या संबंधांत बदल झालेला दिसून येतो पहिल्या महायुद्धाच्या वेळीं त्यांची भूमिका युद्धसहकाराची होती दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं शेवटीं ती संपूर्ण असहकाराची बनली आणि युद्धाचा कोणत्याहि प्रकारे स्वीकार करू नये, सर्व प्रकारच्या युद्धांशीं भारतानें (भारताचे प्रतिनिधित्व करणाऱ्या राष्ट्रीय सभेनें) कायमचा असहकार पुकारावा, अशी एकांतिक अहिंसेची झाली हे प्रसिद्धच आहे परंतु या त्याच्या व्यक्तिगत विकासाबरोबर त्यांचे अनुयायीदेखील साथ करू शकले नाहींत, आणि यामुळे भारतीय स्वातंत्र्याच्या अखेरच्या लढ्यात गांधीजींची शुद्ध अहिंसा जनतेला आचरिता आली नाहीं. स्वातंत्र्य-प्राप्तीसाठीं साधन म्हणून राष्ट्रीय सभेने स्वीकारलेला शांतताप्रधान मार्गहि खरोखर अहिंसाधर्म म्हणून नव्हे, तर राजकारणाचें व्यवहार्य धोरण म्हणूनच स्वीकारलेला ठरला ! तथापि, भारतीय स्वातंत्र्य-संग्रामाचें नेतृत्व अखेरपर्यंत महात्मा गांधी यांच्या हातींच राहिले व ते स्वतः शुद्ध अहिंसेचे निष्ठावंत उपासक असल्यामुळे त्यांच्या पुण्याईचा लाभ भारतीय जनतेला झाला. 'Satyagraha never fails', 'One perfect Satyagrahi is enough to vindicate truth' हे गांधींचें म्हणणे भारतीय संग्रामापुरते सार्थ ठरले.

जातीय ऐक्यासंबंधी गांधीजींच्या अहिंसामार्गाचे अनुसरण भारतीय जनतेकडून मोठ्या प्रमाणात होऊ शकले नाहीं मुसलमान जनतेचा धर्मवेडेपणा, तिच्यांतील राजकीय जागृतीचा अभाव, वैचारिक शिक्षणाचा मागासलेपणा, या दोषांचा पुरेसा निचरा न झाल्यामुळे जातीय ऐक्याची प्रस्थापना न होतां खंडित स्वराज्याची योजना

राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांना अगतिक होऊन स्वीकारावी लागली. या अपयशाची जबाबदारी मुसलमान जनतेप्रमाणें हिंदु जनतेवरहि आहेच हिंदूंची जातिसंस्था, त्यांच्यामधील अस्पृश्यतेची रूढी, सोवळेपणाच्या कल्पना आणि उचनीचभावाचा अट्टाहास या दोषामुळे भारतीय राष्ट्रीयत्व अभग होऊ शकले नाहीं ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं भारतीय राष्ट्रीयत्वाचा हा दुबळेपणा वाढविण्याला मदतच केली आणि जातीयवादी पुढाऱ्यांना हाताशीं धरून त्यांनीं भारतीय राष्ट्रवादाचें सामर्थ्य खच्ची करण्याचा कसून प्रयत्न केला या सर्व परिस्थितीमुळें गाधीजींना या क्षेत्रांत सामाजिक दृष्ट्या मोठें यश मिळू शकलें नाही तथापि, महात्मा गाधींनी हिंदु-मुसलमान-ऐक्याच्या प्रस्थापनेसाठीं आमरण परिश्रम केले आणि आपल्या अहिंसाधर्माचे आचरण करीत करीतच त्यांनीं आपला देहहि बळी दिला यामुळें गाधींच्या जीवनांत त्यांनीं स्वतःपुरता तरी आपला अहिंसामार्ग कधी सोडला नाहीं, असेंच म्हणावे लागेल. सामुदायिक यशाच्या बाबतींत कमतरता आली असली, तर तो ऐतिहासिक परिस्थितीचा परिपाक मानावा लागेल

परतत्र राष्ट्राने निःशस्त्र स्थितींत आपल्या स्वातत्र्याची प्राप्ति कशी करून घ्यावी, याचा एक व्यवहार्य आदर्श गाधीजींच्या प्रयत्नांमुळे जगापुढे आला आहे यांत शंका नाही. गाधीजींची क्रान्तिशास्त्रांतील ही महत्त्वाची भर म्हणावी लागेल तथापि सध्याच्या जागतिक परिस्थितींत सशस्त्र सैन्य न बाळगता राष्ट्रीय सरकार कसे चालविता येईल, याचा उपाय सत्याग्रह-तत्त्वज्ञानानें अद्यापि दाखविलेला नाहीं. यामुळें स्वतत्र भारतातील राष्ट्रीय सरकाराला चांचपडतच जावें लागत आहे आचार्य जावडेकर याचें असे म्हणणें आहे, कीं आजच्या स्थितींत सत्याग्रही लोकांना राष्ट्रीय सरकार हातीं घेता येणार नाहीं त्यानीं जनतेत जाऊन सत्याग्रह-तत्त्वज्ञानाचा प्रचार करावा आणि जनतेचे दैनादिन प्रश्न हातीं घेऊन ते अहिंसामार्गानें सोडविण्याची साधना करावी. भारतातील राष्ट्रीय सरकार, लोकशाही समाजवादी तत्त्वज्ञान मानणाऱ्याच्या हातीं असावे, म्हणजे त्या सरकाराची प्रगति अहिंसेच्या दिशेनें होत राहील राज्यसस्था ही दडसस्था असल्यामुळे तिला अहिंसक स्वरूप द्यावयाचे म्हणजे तिचें सपूर्ण विसर्जनच करावयाचे सत्याग्रह-तत्त्वज्ञान हे या अर्थानें अराज्यवादी आहे हा अराज्यवाद म्हणजेच गाधींचें रामराज्य होय परतु या रामराज्याच्या ध्येयाकडे जाण्यासाठीं कांहीं टप्पे साधावे लागतील परकीय राज्यसंस्थेपेक्षां स्वकीय राज्यसस्था ही अहिंसेला जवळ आहे. स्वराज्यातहि लोकशाही स्वराज्य हें अहिंसावृत्तीला अधिक पोषक आहे त्याचप्रमाणें भांडवलशाहीप्रधान लोकशाहीपेक्षां समाजवादी लोकशाही ही समाजाला अधिक अहिंसेकडे नेणारी ठरेल म्हणून आजच्या स्थितींत भारताचें व्यवहार्य राजकीय ध्येय ‘ लोकशाही समाजवाद ’ हें असले पाहिजे असे आचार्य जावडेकरानीं या ग्रथांत शेवटीं प्रतिपादिलें आहे मात्र या समाजवादी विचारानें सत्याग्रह-तत्त्वज्ञानाचें अतिम श्रेष्ठत्व मान्य केलें पाहिजे व आपला सर्व व्यवहार करीत असता अधिकाधिक अहिंसाधर्माचा आचार केला पाहिजे, असें त्यांचें

आग्रहाचे म्हणणें आहे. समाजवादाला सत्याग्रहाचें अनुयायित्व करावयास लावणे हें गांधीवादाचें यापुढील नियोजित कार्य समजले पाहिजे, असा आचार्य जावडेकरांचा निश्चित निष्कर्ष आहे हे कार्य साधावयाचें असेल, तर गांधीवादानें समाजवादाशीं विरोध सोडून दिला पाहिजे व राज्यसस्थेचा सर्व व्यवहार समाजवादी विचारकांच्या हातीं सोंपविण्यास तयार झालें पाहिजे, असें जावडेकराचे म्हणणे आहे सामान्यतः जावडेकरांचे हे निष्कर्ष निरपवाद आहेत, असे माझे मत झालें आहे राज्यसस्था चालविणाऱ्यांनीं आपण गाधीवादी आहोत हे म्हणण्याने विचारांचा गोधळ माजत आहे व ढोंगाला उत्तेजन येत आहे त्यापेक्षां सरळपणाने त्यांनीं आपण समाजवादी आहो असे म्हणण्यास प्रारभ करावा, म्हणजे तत्त्वनिष्ठा शुद्ध राहील आणि व्यवहारहि निर्मळ होईल.

आशियांतील जनतेचे प्रश्न लोकशाही समाजवादाच्या स्वीकाराशिवाय सुटणार नाहींत, ही गोष्ट आतां सर्वच विचारवताना मान्य होत चालली आहे. आशियांतील जुन्या समाजसस्था सर्वत्र कोसळत आहेत. नवी समतेवर आधारलेली मानवतावादी सस्कृति आशियांत निर्माण होण्यानेंच जगांतील युद्धसस्था विराम पावू शकेल भारत आणि पाकिस्तान या दोनहि राष्ट्रांतील जनतेचे प्रश्न लोकशाही समाजवादाच्या स्वीकारानेच सुटणार आहेत. सकुचित जातीयवादी पुढारीपणानें हिंदूचे काय किंवा मुसलमानांचे काय, कोणतेच प्रश्न कायमचे सुटणार नाहींत. म्हणून भारताने लोकशाही समाजवादाचा स्वीकार केला, तर त्याचा पाकिस्तानवरहि अनुकूल परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही पाकिस्तानांतहि जातीयवादी पुढारीपण मागें पडून लोकशाही समाजवादी पुढारीपण निर्माण होण्याची आवश्यकता आणि शक्यता आहे असें झाल्यानंतर भारत आणि पाकिस्तान याचे पुनः मैत्रीचे संबध निर्माण झाल्याशिवाय राहणार नाहीत. कारण परस्पराच्या मैत्रींतच परस्परांचे कल्याण आहे, परस्परांच्या विरोधांत परस्परांचा विनाश आहे

महात्मा गाधींनीं निर्माण केलेली सामाजिक ध्येये मानवाला नव्या युगांत नेण्याला समर्थ ठरणारीं आहेत यात शका नाहीं मात्र त्यासाठीं गाधीजींच्याप्रमाणेंच स्वतत्र विचार करणारे व जनतेच्या रोजच्या प्रश्नाशीं समरस होणारे नवे कार्यकर्ते निर्माण व्हावयास पाहिजेत विचाराचे सप्रदाय बनले म्हणजे त्याचें सामर्थ्य क्षीण होतें आणि कर्मठपणाच्या नादीं लागून समाजाची हानि करण्यालाहि ते कारणीभूत होतात, असा जगाचा इतिहास आहे सप्रदायाच्या व कर्मठपणाच्या आपत्तींतून गाधींचा विचार सुटू शकेल अशा आशा पूज्य विनोबाजींच्या अलीकडच्या तेजस्वी चळवळीने निर्माण झाल्या आहेत. जवाहरलाल, जयप्रकाश आणि विनोबाजी यांचें सहकार्य झाले, तर आचार्य जावडेकर म्हणतात त्याप्रमाणें भारतात सत्याग्रही समाजवादाची प्रतिष्ठापना झाल्याशिवाय राहणार नाहीं, असा मला भरवसा वाटतो.

**—स. ज. भागवत**

१९५३

*

# लेखकाचे चार शब्द

इ. स १८१८ मध्यें पेशवाईचा अत होऊन ब्रिटिश सत्ता भारतांत सार्वभौम बनली त्याच सुमारास बंगालमध्ये आधुनिक भारताचा जन्म झाला राजा राम-मोहन रॉय हे पहिले आधुनिक भारतीय होत आधुनिक युगाचा प्रारभ होऊन या वेळीं दोन-अडीच शतकें तरी होऊन गेलीं होतीं इसवी सनाचे सोळावे शतक हे आधुनिक युरोपच्या जन्माचें शतक समजले जातें. सोळाव्या व सतराव्या शतकात ब्रिटनने आपली जी सर्वांगीण सुधारणा व प्रगति केली, तिच्यामुळे अठराव्या शतका-च्या प्रारभीं ते राष्ट्र युरोप खडाच्या आघाडीवर जाऊन पोहोचले

अठराव्या शतकांत सर्व जगाचें नेतृत्व करण्याच्या कामीं ब्रिटन व फ्रान्स या दोघांत चुरस लागली होती याच काळांत हिंदुस्थानचे सार्वभौमत्व आपल्या हातीं घेण्याचा प्रयत्न मराठे करीत होते. मोगल बादशाही हस्तगत करून भारतात आपले सार्वभौमत्व प्रस्थापित करण्याच्या उद्योगात आपण यशस्वी झालो, असा भ्रम मराठ्यांना होतो न होतो, तोंच ब्रिटिशांनीं हिदुस्थानात मोगल व मराठे या दोघानाहि आपले अकित बनविलें आणि त्याच सुमारास फ्रेंचांचाहि पाडाव करून जगाचे नेतृत्व संपादन केले.

एकोणिसावे शतक हा ब्रिटिशांच्या जागतिक नेतृत्वाचा आणि आधुनिक भारताच्या जन्माचा काळ म्हणून जगाच्या इतिहासात लिहिला पाहिजे. या दृष्टिकोणानें जागतिक इतिहासातील हें प्रकरण लिहिलें जाण्यास अद्यापि थोडा अवधि लागणार आहे त्यापूर्वी भारतीय दृष्टिकोणांतून आधुनिक भारताच्या जन्माची कथा अनेका-कडून लिहिली गेली पाहिजे प्रस्तुत पुस्तक हा असाच एक प्रयत्न आहे या पुस्तकात राजा राममोहन रॉय यांच्यापासून म गाधी याच्यापर्यंतच्या काळात जे कर्तृत्वान् व द्रष्टे भारतीय नेते झाले, त्याच्या चरित्राची, कार्याची व विचाराची स्थूल रूपरेषा देण्यांत आली आहे तसेंच या काळात जें एक नवे राष्ट्र निर्माण होऊन जगाच्या रंगभूमीवर प्रविष्ट झाले आहे, त्याचा सास्कृतिक दृष्टिकोण कोणता आहे व तो तसा कसा बनत गेला, याचेंहि तात्त्विक विवेचन करण्यात आलें आहे.

## व्यक्तिवाद, राष्ट्रवाद आणि समाजवाद

आधुनिक भारताच्या निर्मितीच्या कार्यात ज्यानीं ज्यानी भाग घेतला, त्याच्या त्याच्या प्रयत्नांमागें जीं निरनिराळीं सामाजिक तत्त्वज्ञाने होतीं, त्याचा ऐतिहासिक दृष्टीनें विचार केल्यास अशीं तीन तत्त्वज्ञानें असल्याचे कोणाहि विचारवतास दिसून येणार आहे. या तीन तत्त्वज्ञानाना अनुक्रमें व्यक्तिवाद, राष्ट्रवाद व समाजवाद अशी नांवे देतां येतील. व्यक्तिवादी तत्त्वज्ञानांतून सर्वांगीण सुधारक पथ आणि प्रागतिक राजकीय पक्ष यांचा उदय झाला राष्ट्रवादी तत्त्वज्ञानांतून आध्यात्मिक राष्ट्रीय भावना

आणि जहाल राजकारण, तसेच निःशस्त्र व सशस्त्र क्रांतिकारक राजकीय पक्ष हे उदयास आले, आणि समाजवादी तत्त्वज्ञानातून समाजवादी क्रांतिकारक दृष्टिकोण व कम्युनिस्ट राजकीय पक्ष, तसाच लोकशाही समाजवादी पक्ष ह्यांचा जन्म झाला असा या तीन तत्त्वज्ञानाचा सक्षिप्त इतिहास असून त्यातील मतभेद वरील तात्त्विक दृष्टिकोणांतील भेदांवर उभारलेले दिसून येतील या तीनहि दृष्टिकोणाचा व त्या त्या दृष्टिकोणाने प्रेरित होऊन केलेल्या कार्यांचा इतिहास सूत्ररूपानें या पुस्तकात ग्रथित केलेला आहे

## सत्याग्रही सर्वोदय-दृष्टि

वरील तीनहि सामाजिक तत्त्वज्ञाने एकमेकापासून कितीहि भिन्न दिसलीं, तरी तीं तीनहि तत्त्वज्ञाने आधुनिक युरोपातून आधुनिक भारतात आलेलीं आहेत व त्यांच्यावर कमीअधिक प्रमाणात आधुनिक युरोपीय संस्कृतीचे अनुकरण करण्याच्या वृत्तीचे सस्कार झालेले आहेत. या तीनहि तत्त्वज्ञानापासून प्राप्त होणाऱ्या दृष्टिकोणांहून भिन्न व प्रस्तुत लेखकाच्या मताने श्रेष्ठ असा एक चौथा दृष्टिकोण आधुनिक भारतात निर्माण झालेला आहे तो दृष्टिकोण सत्याग्रह व सर्वोदयवाद या नावांनीं आज जगभर ओळखिला जातो त्याचें जनकत्व म. गांधी यांच्याकडे असून त्याची पूर्वपरपरा प्राचीन भारताच्या जन्माइतकी पुराणी आहे तथापि हा सत्याग्रही दृष्टिकोण ' पुराणमतवाद ' म्हणून जो ओळखिला जातो, त्या सनातनवृत्तीच्या मतसप्रदायाहून अगदीं भिन्न आहे सर्वोदयवाद किंवा सत्याग्रही वृत्ति याच्यामध्ये जर कोणती सनातन वृत्ति सूचित होत असेल, तर ती मानवी अतःकरणातील सनातन क्रातिवृत्तीच होय असे म्हणता येईल. या सनातन क्रातिवृत्तीवर अधिष्ठित झालेला सत्याग्रही सर्वोदयवाद हा ' व्यक्तिवाद ', ' राष्ट्रवाद ' व ' समाजवाद ' या तीनहि तत्त्वज्ञानाहून भिन्न असला, तरी त्या तिहींतीलहि सत्तत्त्वे आत्मसात् करून मानवसस्कृतीला सत्ययुगाचें मार्गदर्शन करणारा असा तो शातिमय क्रातिवाद आहे. म. गांधींच्या हयातींत या ' शांतिमय क्रातिवादा ' चे स्वरूप मुख्यतः राष्ट्रीय व राजकीय क्रातीचेच असले, तरी राष्ट्रीय स्वातत्र्याच्या काळात त्याला सर्वांगीण क्रातिवादाचें स्वरूप प्राप्त होईल व 'व्यक्तिवाद' आणि 'राष्ट्रवाद' यांच्याप्रमाणे 'समाजवादाला'हि पूर्णपणे आत्मसात् करून तो भारताचे व मानवसमाजाचे नेतृत्व करू लागेल, असा विश्वास या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तींत अखेरच्या प्रकरणात प्रकट केलेला होता. या दुसऱ्या आवृत्तींत मध्यतरीं होऊन गेलेल्या घडामोडींचा परामर्ष घेऊन तोच विश्वास प्रकट केलेला आढळेल.

## पंधरा वर्षांतील घडामोडी

या पुस्तकाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध होऊन पंधरा वर्षे झालीं त्या वेळेपासून आतापर्यंत ( १९३८ ते १९५३ ) भारताच्या व जगाच्या इतिहासांत अनेक

घडामोडी झालेल्या आहेत तथापि या सर्व घडामोडी घडून येत असता व आल्या असतां, भारताची प्रगति आंतरिक निष्ठेच्या दृष्टीनें एकाच दिशेनें होत असल्याचे दिसून येईल आधुनिक भारतात निर्माण झालेल्या सत्याग्रही सर्वोदय-दर्शनावर त्याची निष्ठा वाढत असून ही सत्याग्रही वृत्ति आजच्या स्वतंत्र भारतात समाजवादी क्रांतीच्या रूपाने साकार होत आहे या पधरा वर्षांतील काळांत भारतीय इतिहासांत ज्या महत्त्वाच्या घटना घडून आल्या, त्यांचें त्रोटक विवेचन करण्यासाठीं या आवृत्तींत दोन नवीं प्रकरणें घालण्यांत आली आहेत ‘ प्रांतिक स्वराज्य व द्विराष्ट्रवाद ’ आणि ‘ अखेरचा स्वातंत्र्य-संग्राम ’ हीं दोन प्रकरणे अनुक्रमे बारावें व तेरावें अशीं नवी घातलेलीं असून त्यांच्यापुढें ‘ सत्याग्रही क्रांतिशास्त्र ’ आणि ‘ भारतीय संस्कृतीचे अमृत तत्त्व ’ हीं दोन जुन्या आवृत्तींतील प्रकरणे अद्ययावत् बनविण्याच्या दृष्टीनें सुधारून व वाढवून घेतलेलीं आहेत अशा रीतीनें ब्रिटिश अमदानीच्या प्रारंभापासून तिच्या अतापर्यंतचा आधुनिक भारताचा सर्व इतिहास यांत समाविष्ट झाला असून भारताने आपले स्वातंत्र्य प्राप्त करून घेताना कोणतीं साधने वापरलीं व तीं वापरीत असताना कोणती दृष्टि स्वीकारली, याचे विवेचन या पुस्तकात केलेले आहे हा स्वातंत्र्याचा संग्राम चालवीत असता भारताने एक सांस्कृतिक वृत्ति व दृष्टि स्वीकारिलेली होती त्या वृत्तींतून व दृष्टींतून आजच्या स्वतंत्र भारताचा पिंड घडला गेला आहे यामुळे जगाच्या राजकारणाकडे व मानव-संस्कृतीकडे पाहण्याची एक स्वतंत्र दृष्टि त्याला लाभलेली आहे या स्वतंत्र दृष्टीमुळे जागतिक संस्कृतीच्या नेतृत्वात आपणास काहीं महत्त्वाचे कार्य करिता येईल आणि आजच्या जगाला काहीं नव्या सत्यांचा आदर्श दाखवून देता येईल, असा विश्वास येथील नेत्याना आज वाटत आहे गेल्या शें-दीडशे वर्षात भारतीय संस्कृतीचा पुनर्जन्म झालेला आहे या नवोदित भारताचा जगाला जर काहीं संदेश असेल, तर तो ‘ शांतिमय क्रांति ’ हाच होय, असा उपदेश महात्मा गांधींनीं त्याला केलेला आहे हा उपदेश आचरणात आणण्याचे कार्यच आजच्या भारतीयांना करावयाचे असून तो आचरून दाखविल्यानेंच आधुनिक भारताचे जे जे विधाते होऊन गेले, त्या सर्वांच्या ऋणांतून आपणांस मुक्त होता येणार आहे हे विचारसूत्र या सर्व पुस्तकाच्या विवेचनात वाचकास आढळून येईल. या बाबतींत, हे पुस्तक प्रथम प्रसिद्ध झाले त्या वेळेपासून आतांपर्यंत आचार्य भागवत याचे व माझे मतैक्य टिकून राहिलेले आहे म्हणून त्यानींच या दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना लिहावी, अशी मी त्यांना विनति केली. ती त्यांनीं मान्य केली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहें

आजच्या जगाला ‘ शांति ’ व ‘ क्रांति ’ या दोहोचीहि सारखीच आवश्यकता आहे प्राचीन भारतांत गौतम बुद्ध व महावीर यांनीं हे तत्त्व रुजविण्याचा प्रयत्न केला, पण भारतानें त्याच्यापासून केवळ ‘ शांती ’चाच बोध घेण्याचा संकल्प केला. हा संकल्प विफल झाला आधुनिक युरोपनें ‘ क्रांती ’ची उपासना करीत असतां

' शांति 'तत्त्वाची अवहेलना केली तोहि प्रयत्न विफल झाल्याचें आज जगाच्या प्रत्ययास येत आहे. अशा हताश मानवसमाजाला " शांतिमय क्रांती "चा नवा संदेश देण्यास आधुनिक भारत स्वतंत्र होऊन आज जगापुढे येत आहे. अशा उत्साही वातावरणांत या पुस्तकाची नवी आवृत्ति काढण्याचा योग येत आहे, याबद्दल समाधान वाटते भारतीय तरुणाना या पुस्तकाचा थोडा जरी उपयोग झाला, तरी या समाधानात भर पडणार आहे

—शं. द. जावडेकर

# अनुक्रम

१

# हिंदुस्थान कां व कसा जिंकिला गेला ?

**इसवी** सनाच्या सोळाव्या शतकापासून युरोपखडांत मानव-सस्कृतीला एक नवे वळण लागू लागले युरोपीय समाजांत व राज्यांत एक नवी क्रांति होऊं लागली समाजातील सरजामदारांचे महत्त्व कमी होऊ लागून व्यापारीवर्गाला समाजकारण आणि राजकारण यांत विशेष महत्त्व प्राप्त होऊ लागले. युरोपातील व्यापारीवर्गाच्या महत्त्वाकाक्षेला एक नवा जोम प्राप्त झाला पधराव्या शतकाच्या अखेरीस अमेरिकेचा शोध लागला व त्याच सुमारास पोर्तुगीज सरदार वास्को डी गामा याने आफ्रिकेला वळसा घालून हिंदुस्थानला येण्याचा नवा जलमार्ग शोधून काढिला यानतर थोड्याच दिवसात मानव-संस्कृतीच्या इतिहासात व्यापारी युगाचा प्रारभ झाला असे म्हणण्यास हरकत नाहीं या व्यापारी युगाच्या संस्कृतींत युरोप-खंडांतील एक छोटे राष्ट्र ग्रेट ब्रिटन याने सोळाव्या व सतराव्या शतकात पुष्कळच आघाडी मारिली, आणि सतराव्या शतकाच्या अखेरीस या बेटातील राज्यसूत्रे व्यापारी मध्यम वर्गाच्या हातीं पूर्णपणे आली पूर्वी सरजामदार आणि धर्माधिकारी या वर्गाना समाजात व राजकारणात अग्रस्थान मिळत असे, ते या वेळेपासून पूर्णपणे नष्ट झालें आणि ब्रिटिश राष्ट्र म्हणजे व्यापारी राष्ट्र आणि ब्रिटिश सस्कृति म्हणजे व्यापारी सस्कृति असे कायमचे ठरून गेले

## व्यापारी युग

मानव-सस्कृतींत हे जे नवें व्यापारी युग निर्माण झालें, त्यामुळे तिची अनेक अगांनीं मोठी प्रगति झाली मानव-सस्कृतीच्या काहीं अगात या युगात प्रतिगति किंवा पीछेहाटहि झालेली आहे, आणि आज हे युग सपून मानव-सस्कृति एका दुसऱ्या युगात प्रवेश करू लागली आहे तथापि, या नव्या युगात प्रवेश करण्यापूर्वी व्यापारी युगांत जी प्रगति झालेली आहे, ती आत्मसात् केल्याखेरीज पुढे जाण्याचा प्रयत्न केल्यास पुनः पीछेहाट झाल्याखेरीज राहणार नाहीं यासाठीं या युगाचा महिमा बरोबर समजून घेऊन, त्यांतील बऱ्यावाईट गोष्टींचा विवेक करून, मगच कोणत्याहि समाजाने अगर राष्ट्राने पुढे पाऊल टाकिलें पाहिजे आपलें राष्ट्र सघटित कसें करावें आणि दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण कसे करावें, या बाबतींत युरोपखडाला तेथील व्यापारीवर्गाने बऱ्याच नव्या गोष्टी शिकविल्या तसेच दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण केल्यानतर त्याचा जास्तींत जास्त फायदा आपल्या राष्ट्रांतील लोकांना

करून देऊन आपल्या राष्ट्राची संपत्ति, सत्ता आणि वैभव यांत जास्तींत जास्त भर कशी घालावी, याचेंहि ज्ञान या व्यापारीवर्गानेंच युरोपला प्रथम करून दिलें

या व्यापारीवर्गाला पुढे येण्याच्या मार्गात धर्माधिकारी, सरजामदार आणि राजे यांचा अडथळा होत असे त्याने प्रथम धर्माविरुद्ध बड उभारिलें, सरजामदाराचा पाडाव करण्याच्या कामी राजांना साहाय्य केले आणि अखेरीस राजाविरुद्धहि बड करून सर्व राज्यसूत्रे आपल्या हातीं घेतलीं हें धार्मिक, सामाजिक व राजकीय परिवर्तन किंवा ही क्राति प्रथम इग्लडात झाली व नतर फ्रान्स, इटली, जर्मनी वगैरे इतर युरोपीय देशांत तिचा क्रमाक्रमाने प्रवेश झाला या क्रांतीच्या कार्यात जे देश जितके मागे पडले, ते देश तितक्या प्रमाणांत जगाच्या राजकारणांतहि मागे राहिले आणि ज्या देशांना या नव्या युगाचे मुळीच महत्त्व समजले नाहीं, किंबहुना त्याचे स्वरूपहि ज्यांना आकलन करता आले नाही, ते, या युगाचा महिमा ज्यानीं बरोबर आत्मसात् केला होता, त्यांच्याशीं सबध आल्याबरोबर पराभूत झाले जगाच्या व्यवहारात मागे राहिल्याचे हे अनिवार्य फल आहे परतु मानव-सस्कृतीच्या एका अवस्थेत मागे राहिलेले लोक, तिच्या दुसऱ्या अवस्थेत जगाच्या अग्रभागींहि जाऊ शकतात मात्र आपल्या अनुभवानें व जगाच्या अनुभवानें शहाणे होऊन पुढे पाऊल टाकण्याचें आणि आपल्या बुद्धीनें नवे शोध लावून जगाच्या संस्कृतींत भर टाकण्याचे सामर्थ्य आणि पराक्रम हे गुण त्यांच्या अगीं असावे लागतात.

मागें म्हटल्याप्रमाणे युरोपांतील व्यापारीवर्गाच्या महत्त्वाकांक्षेला जेव्हां विशेष जोम प्राप्त झाला व तो अमेरिकेपासून हिंदुस्थान-चीनपर्यंत पर्यटनें करीत जगभर व्यापारी मिषाने हिंडू लागला, त्या वेळी हिदुस्थानची काय स्थिति होती ? अमेरिका, आफ्रिका किवा ऑस्ट्रेलिया या खडांतील लोकाप्रमाणें हिंदुस्थानांतील लोकांचा युरोपीय व्यापाऱ्याशीं जेव्हा सबध आला, तेव्हा हिंदी लोक रानटी अवस्थेत नव्हते हिंदुस्थानांत हिंदूचीं व मुसलमानाचीं प्रबल राज्ये व साम्राज्ये होतीं धनोत्पादन आणि युद्धकला यांत ते त्या वेळच्या युरोपीय राज्यांना हार जाणारे नव्हते अकबर किंवा औरगजेब याच्या साम्राज्यांच्या मानानें एलिझाबेथ अथवा ॲन यांचा राज्य-विस्तार आणि वैभव हीं "कोटश्च कीटायते" असे म्हणण्याइतकीं क्षुद्र होतीं एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीपासून ॲन राणीच्या कारकीर्दीपर्यंतच्या काळांत ब्रिटिश व्यापारी पश्चिमेस अमेरिकेपासून पूर्वेस हिंदुस्थान-चीनपर्यंत पसरले होते निरनिराळ्या देशात छोट्या छोट्या वसाहती किंवा व्यापाराच्या वखारी त्यांनीं स्थापन केल्या होत्या या वखारींच्या सरक्षणासाठीं ते थोडीं शस्त्रास्त्रें व सैनिक जवळ बाळगीत असत आणि ज्या समुद्रावर कोणत्याच राजाची सत्ता चालत नसे, त्या समुद्रावरहि ते आपले प्रभुत्व आणि दरारा बसवू लागले होते. याच काळांत या व्यापारी लोकांनीं आपल्या देशांतील राज्यसूत्रे सरंजामदारांच्या व राजाच्या हातून काढून आपल्या हातीं घेतलीं आणि समाजसघटना, राज्यसघटना, व्यापारीसघटना, युद्धशास्त्र,

सामाजिक शास्त्रें आणि भौतिक विद्या यांत बरेच नवे नवे शोध लाविले यामुळें आपण हिंदुस्थानांतील व आशियातील हिंदू, मुसलमान व बौद्ध लोकांपेक्षां अधिक सुसंस्कृत व पुढारलेले आहो, असा अहंकारहि त्याना या वेळीं वाटूं लागला होता.

## व्यापारी राष्ट्र म्हणजे काय?

ब्रिटिश राष्ट्र हे व्यापारी राष्ट्र आहे किंवा ब्रिटिश संस्कृति ही व्यापारी संस्कृति आहे असें जेव्हां आम्ही म्हणतो, तेव्हां त्याचा अर्थ काय असतो? ब्रिटनमधील सर्वच लोक व्यापारी आहेत किंवा इतर राष्ट्रांत मुळींच व्यापारी नाहींत, असा या वाक्याचा अर्थ असत नाहीं तर ब्रिटनमध्यें व्यापारी लोकांचें वर्चस्व आहे व तेथील संस्कृतीवर या वर्गाची छाप बसली आहे, असा या वाक्यांचा अर्थ असतो. पण एवढ्यानेंहि या वाक्याचा खरा अर्थ विशद होत नाहीं. ब्रिटनमधील व्यापाऱ्याना हे वर्चस्व कसे मिळाले याचा विचार केल्यास तेथील व्यापारीवर्गाने आपल्या राष्ट्राचीं राज्यसूत्रे आपल्या हातीं घेतलीं आणि धर्माधिकारी व सरजामदार या वर्गाचें वर्चस्व नष्ट केले असे आपणांस दिसून येतें अर्थात् हे व्यापारी लोक राजकारणी आणि लढवय्ये होते; आमच्या देशांतील व्यापारीवर्गाप्रमाणे केवळ व्यापार करून उपजीविका करणारे ते निरुपद्रवी प्राणी नव्हते. राजांनीं किंवा सरजामदारांनीं आपले रक्षण करून देशात शांतता स्थापावी, आपण केवळ व्यापार करून पोट भरावे, ही वृत्ति त्यानीं सोडून दिली होती राज्य करणे हे केवळ सरजामदाराचे कार्य आहे, हा सिद्धांतच त्यांनीं खोटा ठरविला होता सरजामदाराना देशात शातता स्थापन करतां येत नाहीं, ते आपापसांत लढून अशांतता माजवितात आणि व्यापारधद्याना अशाश्वतता उत्पन्न करतात, हे पाहून त्यांनीं राज्यकारभारच आपल्या हातीं घेतला होता इतकेच नव्हे, तर राज्यविस्तार करण्याचें कार्य पूर्वी जें सरजामदारवर्गाकडे होते, तेहि त्यांनीं आपल्या हातीं घेतले होते. सरजामदारांनीं प्रथम जाऊन मुलुखगिरी करावी आणि राज्य-विस्तार करावा व मग आपण त्यांच्यामागून जाऊन व्यापार करावा, हा क्रम उलटवून व्यापाऱ्यांनीं जाऊन आधीं व्यापारी मुलुखगिरी करावी आणि नतर आपल्या राष्ट्राचा झेडा परदेशांत उभारावा असा त्याचा शोध होता! आधीं राज्यविस्तार व मग व्यापारविस्तार याच्याऐवजीं आधीं व्यापारविस्तार व मग राज्यविस्तार ही विचारसरणी त्यानीं रूढ केली तात्पर्य, जे इग्रज लोक इकडे आले ते केवळ व्यापार करणारेच लोक नव्हते, तर ते लढवय्ये व मुलुखगिरीनें राज्यविस्तार करणारे व्यापारी होते समुद्रावरील चांचेगिरी व लूटमार याच्यापासून बचाव करण्यासाठीं त्याच्यापाशीं शस्त्रास्त्रे व युद्धसामग्री होती परकीय देशात स्थापन केलेल्या वखारींच्या त्यानी वसाहती बनविल्या होत्या आपल्या व्यापाराचे सरक्षण न करणाऱ्या राजांना व सरजामदारांना पदच्युत करून राज्यक्राति कशी करावी, याचें शास्त्र त्यांना अवगत होते आणि त्यांना कोणीं दुर्बल म्हणून चुरडण्याचा प्रयत्न केला, तर आपल्या

देशांतील राजसत्तेचे पाठबळ त्यांना मिळण्यासारखे होते. त्यांच्या देशांत ज्याच्या हातीं राजसत्ता होती, त्यांना या परदेशातील व्यापारी वसाहतींचे सरक्षण करणे, हे आपले कर्तव्य भासत होते कारण ते व्यापारीवर्गाचेच प्रतिनिधी होते ब्रिटिश लोक हे व्यापारी आहेत किंवा त्यांची संस्कृतीहि व्यापारी आहे, या वाक्यांचा अर्थ इतका खोल आहे

## तत्कालीन हिंदी संस्कृति व हिंदू व्यापारी

राज्यशास्त्राच्या दृष्टीने विचार केल्यास १७ व्या शतकात उदय पावून १८ व्या शतकाच्या मध्यापर्यंत सर्व हिंदुस्थानचें सार्वभौमत्व आपणांकडे घेण्याच्या प्रयत्नात बरीच यशस्वी झालेली मराठ्यांची सस्कृति ब्रिटिशांच्या सस्कृतीहून राष्ट्रीयत्व आणि लोकशाही या दोन्ही तत्त्वाच्या दृष्टीने मागे असलेली दिसते ज्या वेळीं मराठे लोक शिवाजीच्या नेतृत्वाखालीं हिदवी राज्याची स्थापना करीत होते, त्याच वेळीं ब्रिटिश लोक क्रॉम्वेलच्या नेतृत्वाखालीं आपल्या धर्माच्या व देशाच्या राजाला पदच्युत करून लोकशाहीची स्थापना करण्याचा प्रयत्न करीत होते पुढे ज्या वेळीं संभाजीच्या वधा-(इ स १६८९) नंतर मराठे परधर्मीय परचक्राचे निवारण करून स्वराज्याचें व स्वधर्माचें सरक्षण करण्यात गुतले व त्या कामीं अलोट स्वार्थत्याग करून त्यानीं यश सपादन केले, त्याच वेळीं ब्रिटिश लोकांनीं आपल्या देशांतील जुलुमी राजा दुसरा जेम्स् याला गादीवरून काढून क्रॉम्वेलच्या वेळेपासून अनियत्रित राजसत्ता व प्राति-निधिक लोकसत्ता याच्या दरम्यान जो लढा चालू होता, तो यशस्वी रीतीने तडीस नेऊन आपल्या देशांत लोकनियंत्रित राजसत्तेची स्थापना केली या गोष्टी लक्षांत घेतल्यास ज्या वेळी मराठे लोक केवळ परधर्मीयांचें राज्य नष्ट करून स्वधर्मीय राजाचे राज्य स्थापन करण्याच्या विचारात व प्रयत्नांत गुतले होते, त्याच वेळीं ब्रिटिश लोक राजा स्वकीय व स्वधर्मीय असला, तरी तो जुलुमी असल्यास त्याला काढून दुसऱ्या राजास गादीवर बसवावे आणि त्यानें लोकमतानुसार राज्यकारभार चालवावा, या तत्त्वाच्या प्रस्थापनेंत गुतले होते या तत्त्वाची प्रस्थापना ब्रिटनमधील व्यापारी-वर्गातील पुढाऱ्यानीं व्यापारी व शेतकरीवर्गाचे नेतृत्व स्वीकारून त्याच्या द्रव्य-बलावर व मनुष्यबलावर केली. यामुळे ते राष्ट्र राजकीय सस्कृतीच्या दृष्टीने जगांतील इतर सर्व राष्ट्राच्या पुढे गेले. मराठे लोकांनीं आपले स्वातत्र्य कायम असेपर्यंत हा धडा आत्मसात् केला नाहीं यामुळें ब्रिटिशांचे पारतत्र्य स्वीकारून इतर भारतीयांच्या-बरोबर त्यांनाहि लोकशाहीचें हे तत्त्व शिकावे लागले

'भारत-इतिहास-सशोधक-मडळ' त्रैमासिकाच्या ६ व्या वर्षाच्या पहिल्या चार महिन्यांच्या जोडअंकांत "ब्रिटिश राज्यसस्थापकाचे एतद्देशीय साहाय्यक" या मथळ्याचा एक विचारप्रवर्तक आणि सशोधनात्मक लेख श्री शेजवलकर यानीं लिहिला आहे. त्यांत त्यांनीं हिंदुस्थानांतील पेढीवाल्या व्यापाऱ्यांनीं ब्रिटिशांच्या

राज्यसस्थापनेला कसे साहाय्य केले, ते उत्कृष्ट प्रकारे दाखवून दिले आहे. त्या लेखाच्या अखेरीस त्यांनीं पुढील विधानें केलीं आहेत : ते लिहितात, "मराठ्याजवळ पैसा असा कधीं असलेला दिसत नाहीं म्हणजे राज्यात सपत्तीची पैदासच दिसत नाहीं प्रत्येक स्वारीचा व्यवहार आतबट्टयाचा असण्याचा संभव फार सबध मराठशाहींत वैश्यवृत्तीकडे अगदीं दुर्लक्ष झालें. वैश्यांच्या संपत्तीवांचून ब्राह्मणांची विद्या व क्षत्रियांचे शौर्य लंगडे, हें आम्ही स्वाभिमानाच्या भरांत विसरलों इग्रजांत चातुर्वर्ण्याचे योग्य प्रमाणात समिश्रण असल्यानेच त्यांचे राष्ट्र उदयास येऊन चिरस्थायी झालें." यातील ब्रिटिश राष्ट्रात चातुर्वर्ण्याचे समिश्रण आहे किंवा होतें, हे मत आम्हास पटत नाही चातुर्वर्ण्याच्या भाषेंत बोलावयाचे, तर ब्रिटिश वैश्यांनीं राज्यसत्ता आपल्या हातीं घेऊन वर्णसकर केला होता व ब्रिटनमधील वैश्य हे क्षत्रिय बनले होते मराठशाहीला ज्याप्रमाणे वैश्यवर्गाचें महत्त्व समजले नाहीं, त्याप्रमाणे इग्लंडांतील व युरोपातील सरजामदारानाहि वैश्यांच्या संपत्तीचे महत्त्व कधीं फारसे पटले नाहीं त्यानीं वैश्याची नेहमीं अवहेलनाच केली आणि आपल्या मराठ्यांच्याप्रमाणें युरोपियन राजाच्या व सरजामदाराच्या स्वाऱ्या याहि आंतबट्टयाच्याच होत्या आमचे सरदार जसे एकमेकांविरुद्ध भांडून देशांत हैदोस घालीत होते, त्याप्रमाणे इंग्लडातील व युरोपांतील सरदार-जहागिरदारहि देशांत अशांतता माजवून हैदोस घालीत होते, पण या हैदोसाला कटाळून ब्रिटिश वैश्यानीं राज्यक्रांति केली व सरजामदाराच्या हातची सत्ताच काढून घेतली मात्र आमच्या देशांतील व्यापाऱ्यांना हे राजकारण माहीत नव्हते. त्याना कदाचित् तो वर्णसकरहि वाटला असता जे राज्यकर्ते जास्तीत जास्त प्रदेशावर शातता स्थापन करतील, त्याच्या आश्रयाने राहणें हा त्याचा स्वभाव होता ब्रिटिश राजकारणी व्यापाऱ्यांनीं त्याच्या या स्वभावाचा भरपूर उपयोग करून घेतला येथील व्यापाऱ्याना हाताशीं धरून त्यांनीं राज्यक्राति केली, पण राजसत्ता मात्र आपल्याच हातीं ठेविली

## 'गुप्त' पेढीवाल्यांनीं काय केलें ?

'गुप्त' या नावाचे एक जैन पेढीवाल्याचे घराणे ब्रिटिशाचा राज्यविस्तार हिदुस्थानात करण्यास फार उपयोगी पडले हे घराणे धर्मनिष्ठ होते व त्याने हिदुस्थानात फार सुदर देवालये बाधलेलीं आहेत प्रत्येक लढाईच्या वेळीं व त्याच्या आधीं, हिदी राज्यांतील माहिती ब्रिटिशाना पुरवून त्याना द्रव्याचेंहि साहाय्य करावयाचे व त्याचा शांततेचा अमल सर्व हिदुस्थानभर पसरवावयाचा, असा या घराण्यातील लोकाचा इरादा होता हे व्रत त्यानीं क्लाइव्हच्या वेळेपासून तो लॉर्ड कॅनिंग याच्या वेळेपर्यंत अखडपणे केलें आणि निरनिराळ्या ब्रिटिश अधिकाऱ्यांकडून शिफारसपत्रे मिळविलीं लॉर्ड क्लाइव्हने हिंदुस्थानात ब्रिटिश साम्राज्याचा पाया घातला आणि लॉर्ड कॅनिंग हा १८५७ सालच्या बडानंतर पहिला व्हाइसरॉय झाला. या

दरम्यानच्या शभर वर्षांत या गुप्त घराण्यांतील पेढीवाल्यांनीं ब्रिटिश व्यापारी साम्राज्यवाद्यांची इमानेइतबारे नोकरी केली

सर्व हिंदुस्थान जिंकून अफगाणिस्थान-इराणकडे आपले पाय पसरविण्यांत ब्रिटिश मुत्सद्दी गुतले होते, तेव्हां सर अलेक्झांडर बर्न्स याने १८३७ सालीं या घराण्याचें पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे :

"सरूपचद गुप्त, शालिवर्मा, कच्छबाशाचे वशज, हे काबूल, कदाहार, समरकद, हिरात व इतर ठिकाणच्या अनेक आशियातील लोकांच्या हालचालीवर डोळयात तेल घालून नजर ठेवून, त्यांच्या तपासाची माहिती ब्रिटिश अधिकाऱ्यास उपयोगी पडावी म्हणून कळवितात सर्व लढाया, तह व इतर लष्करी गोष्टींची व्यवस्था त्यांच्या माहितीवरच अवलबून असल्याने सरकार त्यांचे बहुत ऋणी आहे अशा रीतीने हे ब्रिटिशाच्या बाजूचे मोठे विश्वासू व राजनिष्ठ गृहस्थ आहेत त्यांच्या बातम्या खऱ्या असत व त्यावर अवलबून राहतां यावे अशा त्या असत."

लॉर्ड एलनबरो हा १८४४ साली यांच्या पेढ्यांचे व त्यांनी ब्रिटिशाना केलेल्या साहाय्याचे वर्णन पुढीलप्रमाणे करितो : " . तुम्ही व तुमच्या पूर्वजांनीं मोगल बादशहांच्या काळापासून आजतागायत प्रशसनीय कामगिऱ्या बजावून जी सेवा केली व त्याबद्दलचीं वेळोवेळचीं जीं शिफारसपत्रे आज आपणांजवळ आहेत, त्यांवरूनच तुमचे कुटुब अत्यत विख्यात, कुलीन व लक्ष्मीचें निवासस्थान आहे, हे पूर्णपणें सिद्ध करतां येते. तुमच्या पेढ्यांचे जाळे अफाट हिंदुस्थानभर इतके पसरलेले आहे, की आपल्या एकाद्या पेढीशी तुलना करण्याजोग्या बँकाहि जगाच्या पाठीवर थोड्याच असतील...आपण माझेच नव्हे, तर ज्या सरकारचा मी प्रतिनिधि आहे, त्याचेहि सच्चे मित्र आहा, हे मी जाणतो त्या सरकारच्या कल्याणासाठीं व पौर्वात्य देशांत त्याचे राज्य होण्यासाठीं जी सेवा आपणाकडून झाली आहे, ती ते कधींहि विसरणार नाहींत तुम्हीं मराठे, जाट ( याच्याशी युद्धात ) व माझ्या कारकीर्दीतील अन्य युद्धांत इग्रज अधिकाऱ्यांस व सैन्यास त्या वेळी मुख्य असलेली अशी पैशाची मदत इतक्या सढळ हाताने केली आहे, कीं आपला सराफीचा धदा चागला चालावा याबद्दल सरकार बांधलेले आहे "

लॉर्ड क्लाइव्ह यास अर्कोटच्या बाजूस या घराण्यानेच मदत केली व बगालमधील जगत्शेट व अमीरचद ( उमीचद ) हे या गुप्त घराण्याचे आप्तेष्टच होते लॉर्ड क्लाइव्ह १७६५ साली यांना दिलेल्या शिफारसपत्रात लिहितो :

"तुम्ही व्यापारी व पेढीवाले आपसात पन्नास लाख रुपये जमवून व सगळीकडे घरे बाधून ( पेढ्या स्थापून ? ) आम्हांस पूर्वेकडील मुलुखाची बातमी पुरविण्याचे टपाल उघडण्याचे ठरविले आहे हें ऐकून मला सतोष वाटतो २ सर्व सरदार राही (?) व रयत आपले स्वतःचे पैसे खर्चून आमच्या अमलाखालीं शरण आणण्याचा आपला बेत आहे हें ऐकूनहि मला फार आनंद होतो...

"आपल्या धर्मात इंग्रजांनी कधीहि हात घालू नये, ह्या तुमच्या मागणीबद्दल मी मोकळेपणाने एवढेच इच्छितो की (व तशी माझी खात्री आहे की) ते अशी गोष्ट कधींहि करणार नाहींत शेवटी एवढेच सांगतों कीं तुम्हीं व तुमच्यांनीं, वेळो-वेळी, विशेषतः अर्काटमध्ये, जी मदत केली ती मी कधीहि विसरणार नाहीं"

ग्वाल्हेरचा किल्ला घेण्यात या घराण्यानें जी मदत केली, त्यासबधीं तो किल्ला सर करणारा ब्रिटिश सेनापति त्यांना दिलेल्या शिफारसपत्रात १७८२ साली लिहितो : "ग्वालेरीचा किल्ला अगम्य, डोंगराच्या टोकावर, सर्व बाजूनीं उच, बळकट तटबंदीचा असा असल्यामुळे जवळजवळ अभेद्य होता. आमच्या कार्यात महाराजाधिराज सवाई शिकदर सरूपचद गुप्ताचे कळकळीचे साहाय्य नसते, तर आम्हास कोणत्याहि उपायानें किल्ला सर करता येता ना किल्ल्यावर जाण्यास एक चोरवाट होती, ती अत्यंत प्रयासाने समजून घेऊन त्यानीं आम्हास कळविल्यामुळे आम्हीं विनाश्रम किल्ला ताब्यात घेतला"

खडकीच्या लढाईत १८१७ सालीं पुणे सर करण्याच्या कामीं या घराण्याने जी कामगिरी केली, तीसंबंधी जेकिन्स लिहितो : "आपले पूर्वज ब्रिटिश सरकारचे मोठे मित्र गणले आहेत. त्याचेच अनुकरण करून पुण्यास झालेल्या युद्धात आपण इंग्रजास साहाय्य केलेंत आपण एक अत्यत महत्त्वाची गुप्त बातमी इतक्या वेळेवर दिली, कीं ती न मिळती तर आम्हास जय मिळण्यास एरवी फार काळ लागता व सायास पडते."* असो

गुप्त घराण्यातील पेढीवाल्यानी हिंदुस्थान जिंकण्याला ब्रिटिश व्यापारी राज्यकर्त्यांना ही जी मदत केली, ती जशी ब्रिटिश राज्यकर्ते विसरले नाहीत, तशीच ती हिंदी लोकांनाहि विसरता येणार नाहीं

## बंगालमधील परिस्थिति

बगाल प्रांत लॉर्ड क्लाइव्हने हस्तगत केला, त्या वेळीं हिंदू व्यापाऱ्यानीं आणि राजानीं म्हणजे जमीनदारानीं ब्रिटिश साम्राज्यस्थापनेला साहाय्य केले ब्रिटिश लेखक एस् सी हिल्ल् हा "१७५६–५७ सालचा बगाल" या ग्रथाच्या प्रस्तावनेत लिहितो : "या देशातील व्यापार व उद्योगधदे हे बहुतेक पूर्णांशाने हिंदू लोकाच्याच हातीं असल्याने व्यापाराकरिता येऊन वसाहत करून राहिलेल्या युरोपियन व्यापाऱ्याशीं साहजिकच त्याचा निकट सबध आला आणि म्हणून या भौतिक हितसंबधाच्या आधारावर हिंदू व युरोपीय व्यापाऱ्यांची एक प्रकारची गुप्त गट्टी या वेळीं बनली होती." कर्नल स्कॉट नांवाच्या एका युरोपियन गृहस्थानें १७५४ च्या फेब्रुवारी महिन्यात एक पत्र लिहून बगालमधील देशस्थितीचें वर्णन केले होते.

* हे सर्व उतारे श्री. शेजवलकर याच्या 'भारत इतिहास सशोधक-मडळा'च्या सहाव्या वर्षाच्या पहिल्या चार महिन्यांच्या जोडअकातील लेखातून घेतले आहेत.

त्यांत येथील राज्ये अगदीं कमकुवत असून युरोपियन सैन्यापुढे याच्या सैन्याचा निभाव लागणार नाहीं वगैरे गोष्टी लिहिल्या आहेत त्याचप्रमाणे येथील व्यापारी व हिंदू राजे युरोपियन लोकांना राज्यक्रांति करण्यास साहाय्य करतील असेंहि त्यानें मत दिलें आहे मि चार्ल्स एफ् नोबल याने २२ सप्टेंबर १७५६ रोजी ईस्ट इंडिया कंपनीच्या सिलेक्ट कामिटीला एक पत्र लिहिले, त्यात पुढील मत प्रदर्शित केलें आहे. "कर्नल स्कॉट याने बंगालमधील परिस्थितीचे जें निरीक्षण केले आहे त्यावरून असे दिसते, कीं हिंदू राजे व प्रजाजन मुसलमानी राज्यकर्त्याविरुद्ध फार असंतुष्ट झाले आहेत आणि त्याच्या जुलमी सत्तेचे जोखड फेकून देण्याची संधि मिळावी व आपली स्थिति सुधारावी अशी त्यांची मनातून इच्छा आहे त्याचें (कर्नल स्कॉटचे) असेंहि मत आहे, की एकाद्या युरोपियन सैन्याला प्रारंभीं यश मिळालें आणि त्याने या लोकाना योग्य प्रकारें वळवून घेऊन प्रोत्साहन दिलें, तर ते त्यास साहाय्य करतील, पण आपल्याला हितावह अशी राज्यक्रांति यशस्वी करण्याच्या संभवाची खात्री होईपर्यंत ते प्रथम आपले वर्तन सावधगिरीचेंच ठेवतील."*

पी ई रॉबर्ट्स हा आपल्या 'ब्रिटिश हिंदुस्थानचा इतिहास' या पुस्तकात म्हणतो. "१७५६–५७ साली बंगालमध्ये जी राज्यक्रांति झाली, ती मुख्यतः किंवा पूर्णतः एका युरोपियन व्यापारी वसाहतीने एक हिंदी प्रांत जिंकून घेतला, अशा स्वरूपाची नव्हती तर स्वदेशी (हिंदू) व्यापारी-सावकारवर्गानी आणि ब्रिटिशानीं एक होऊन आपल्यावरील परकीय (मुसलमान) राज्य उलथून पाडिले, असे या राज्यक्रांतीचे स्वरूप होते व्यापारास लागणाऱ्या शांततेच्या दृष्टीने स्वदेशी व ब्रिटिश व्यापारी या दोघाचे हित झाले, तरी प्रत्यक्ष घडामोडींत ब्रिटिशानी अग्रेसरत्व स्वीकारिले आणि राज्यसत्ताहि त्यानीं एकट्यानीच बळकाविली"§ तोच ग्रंथकार पुढे लिहितो. "अलिवर्दीखानाच्या मृत्यूपूर्वींहि सूक्ष्म निरीक्षकाना हे स्पष्ट दिसत होते, कीं हा लढा फार काळ टाळणें शक्य नाहीं नबाब अन्यायी होता असें म्हणण्यापेक्षा तो ढिला नव्हता व कडक होता, असे म्हणणे अधिक योग्य होईल इंग्लिश लोक आपल्या व्यापारावरील अनेक असह्य बंधनांमुळे असंतुष्ट झाले होते ऑर्मे हा १७५२ सालीच क्लाइव्हला लिहितो: 'या म्हाताऱ्या कुत्र्याला चांगला डागता येईल तर बरे होईल कंपनीने या गोष्टीचा मनापासून विचार केला पाहिजे असे मी म्हणतों, ते काहीं तर्क आहे असे नव्हे जर कंपनी तसे करणार नाहीं, तर बंगालमध्ये व्यापार करणे तिला अशक्य होईल' जोपर्यंत अलिवर्दीखान जिवंत होता, तोपर्यंत हा असंतोष केवळ धुमसतच राहिला, पण त्याच्या मृत्यूनंतर जेव्हां दुराग्रही, दुर्बल व दुर्व्यसनी तरुण नबाब गादीवर येऊन तो युरोपीय व्यापाऱ्यांवर व आपल्या हिंदू नागरिकांवर जुलूम करू लागला आणि शेठ लोकांच्या सावकारी घराण्याचा उपमर्द करू लागला, तेव्हा

* Rise of the Christian Powers by Major Basu P 45

§ History of British India, P 131 - 32

या घडामोडींना अधिक गति मिळाली व त्यांतूनच पुढील उत्पात झाला इंग्लिशांना आपल्या राज्यातून हाकून लावण्याचा सिराजउद्दौल्यानें निर्धार केला आणि डच किंवा फ्रेंच याच्यापेक्षा इंग्लिशाकडेच विशेष लक्ष देण्याचें त्यानें टरविलें, हेहि त्याच्या दृष्टीनें बरोबरच होते त्याची वसाहत हीच सर्वांत मोठी व सर्वांत संपन्न होती, त्याचा व्यापार सर्वांत मोठा होता आणि हिंदू व्यापारीवर्गाशीं त्याचाच अधिक निकट सबंध जडला होता एकदा इंग्लिशाना हाकलून दिले असते, तर इतर युरोपियनाची वासलात लावण्यास त्याला फुरसत मिळाली असती ” ‡

## बंगाली हिंदूंच्या भावना

इ स. १८२३ सालीं राजा राममोहन रॉय प्रभृति बगाली पुढाऱ्यानी इंग्लडच्या राजाकडे मुद्रणस्वातंत्र्यासबधीं एक अर्ज पाठविला होता त्यात बगालमधील हिंदू प्रजाजनाच्या, विशेषत· सुशिक्षित हिंदू पुढाऱ्याच्या, ब्रिटिश राज्यासबधीं काय भावना होत्या व आपल्या प्राताच्या इतिहासासबधीं त्याना काय वाटत होते, ते पुढील शब्दांत व्यक्त करण्यात आले आहे:

“ हिंदुस्थानातील बहुतेक भाग अनेक शतकेंपर्यंत मुसलमानांच्या प्रभुत्वाखालीं होता, येथील मूळच्या रहिवाशाचे नागरिक हक्क व धार्मिक हक्क वारवार पायाखालीं तुडविले जात होते जेते लोकाच्या या नित्याच्या जुलुमाविरुद्ध दखखनमधील ‘ मराठे ’ नावाने प्रसिद्धीस आलेल्या लोकाना आणि ज्याना सध्या शीख म्हणतात त्या पश्चिम हिदुस्थानांतील लोकाना, बड करणे भाग पडले, आणि जेव्हा मुसलमानाची सत्ता दुर्बल झाली त्या वेळीं आपले स्वातंत्र्य स्थापन करण्यात त्यांना यश आले, परतु बगालमधील लोकात शारीरिक जोम नसल्याने व त्याची कष्टाने प्रयत्न करण्याकडे प्रवृत्ति नसल्याने, जरी त्याची मालमत्ता वारवार लुटली जात असे, त्याच्या धर्माचा उपमर्द होत असे आणि त्याचे रक्त वाटेल तसें साडिले जात असे, तरीहि ते मुसलमानी अमदानीच्या अखेरपर्यंत प्रस्थापित राजसत्तेशीं एकनिष्ठच राहिले शेवटी परमेश्वराने आपल्या अमर्याद दयेनें इंग्लिश राष्ट्राला या जुलमी राजकर्त्यांचे जोखड फेकून देऊन बंगाली प्रजाजनाना त्यापासून मुक्त करण्याची व त्याना आपल्या सरक्षणाखालीं आणण्याची प्रेरणा दिली.” *

या उताऱ्यावरून दुसरी एक गोष्ट आपल्या लक्षांत येते. ती म्हणजे ब्रिटिश लोकानीं बंगाली व्यापारीवर्गाला हाताशीं धरून जेव्हा बगालमध्ये आपली सत्ता प्रस्थापित केली, तेव्हा त्यात धर्मविरोधाची भावनाहि त्याच्या उपयोगी पडलेली आहे हिंदू व्यापारी व सावकार यांनीं ब्रिटिशांना साहाय्य केले, त्यात आपल्या

‡ Ibid, P 132 - 33

* Indian Speeches and Documents on British Rule, P 15 Edited by J K. Mujumdar

व्यापारास मुसलमान राज्यकर्ते साहाय्य करीत नाहींत किंवा सरजामदार वरचेवर युद्धे करून आपल्या पैशांवर धाड घालतात आणि व्यापारधंदा वाढू देत नाहींत, ही भावना होती, त्याचप्रमाणे आपले मुसलमान राज्यकर्ते परधर्मी व परकीय आहेत, अशीहि भावना त्याच्या मनात असली तर त्यात नवल नाहीं मुसलमानी अमदानींत नेहमींच अदाधुंदी, लढाया व अशातता होती हे म्हणणें बरोबर नाहीं तशी सारखीच अदाधुदी सर्व हिंदुस्थानात असती, तर एवढे शेठसावकार, त्याच्या पेढ्या आणि सर्व हिंदुस्थानभर त्याच्या पैशाचे व पतीचे पसरलेले जाळे, या गोष्टी अस्तित्वातच आल्या नसत्या पेढ्याचा, हुड्यांचा आणि पतीचा व्यवहार वाढण्यास मोठमोठ्या प्रदेशांवर शातता स्थापन करणाऱ्या राज्यसंस्थांचें अस्तित्व अवश्यच असतें अमरचद, जगत्शेट किंवा गुप्त यांच्यासारखीं सावकारी व व्यापारी घराणीं उदयास आली, त्याना राजदरबारीं मान मिळू लागला आणि राजानाहि त्याच्या द्रव्याचे साहाय्य घेणे अवश्य वाटू लागले, याचा अर्थच असा आहे की या देशांत मोठमोठीं राज्ये व साम्राज्ये होती आणि लोकांची घरेदारे व मालमत्ता सुरक्षित होती परतु मोगल साम्राज्य मोडून गेलें आणि दक्षिणेतून मराठ्यांनी, पश्चिमेकडून शीखांनीं आणि वायव्येकडून इराण, अफगाणिस्थानातील राजांनी त्याच्यावर हल्ले चढविले, अशा काळात हिंदुस्थानांत कांहीं काळ अदाधुंदी विशेष वाढली या अदाधुदीच्या आगींत इग्लिश, फ्रेच याच्यासारख्या लढाऊ, राजकारणी, कपटी आणि मुत्सद्दी व्यापाऱ्यानीं तेल ओतले. अशा काळात बगाल प्राताची स्थिति विशेषच शोचनीय होती बगाल प्रात अत्यत सधन होता, पण तो अत्यत दुर्बलहि झाला होता गगानदीच्या मुखातून आत येणाऱ्या परकीय व्यापाऱ्यांना आणि त्याच्या हल्ल्याना परतविण्यास समर्थ असे आरमार बगालच्या उपसागरात कोणाचेहि नव्हते

## मराठे आणि बंगाल प्रांत

हिंदुस्थानच्या मलबार किनाऱ्यावर या वेळी आंग्रे यांचे आरमार प्रबळ होते तें आरमार नष्ट केल्याखेरीज या परकीय व्यापाऱ्यांना मुबई इलाख्यांत दगामस्ती करण्यास फारसा अवकाश नव्हता शिवाय, अठराव्या शतकांत मराठ्यांची सत्ता मुबई इलाख्यात जोराने फोफावत चालली असून नादिरशहासारख्या इराणी लुटारूपासून दिल्लीच्या तख्ताचे सरक्षण करण्याची काळजी वाहण्याची जबाबदारी आपणांवर आहे, इतके वाटण्यापर्यंत त्याच्या साम्राज्याचे सामर्थ्य व अहकार वाढीस लागले होते बाजीरावाच्या मृत्यूनंतर राघोबाने जे अटकेवर झेंडे रोविले, त्यामुळें दिल्लीचें तख्त दक्षिणेंतील हिंदूच्या ताब्यांत जाणार कीं काय अशी भीति उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमानांना व रजपुतांनाहि वाटू लागली आणि अहमदशहा अब्दालीसारख्यांस बोलावून आणून या दख्खनी साम्राज्याला पायबद घालण्याचा आणि दिल्लीचे तख्त मुसलमानांच्या हातून जाऊ न देण्याचा प्रयत्न मुसलमान रोहिल्यांनीं

केला. इकडे हीं बडीं राजकारणें व साम्राज्याच्या उलथापालथी चालू असतां मद्रास आणि बंगाल प्रांतांच्या किनाऱ्यावर ब्रिटिश व्यापारी आपले राजकारणाचे खेळ खेळत होते मराठ्यांनीं व शीखानीं मुसलमानी साम्राज्याविरुद्ध बंडे उभारून स्वतंत्र राज्ये निर्माण केली, या बातम्या बंगाली हिंदूंच्या कानावर जात असल्याच पाहिजेत त्यामुळें तेथील हिंदूंना मुसलमानी सत्तेविरुद्ध द्वेष वाटू लागला असल्यास नवल नाहीं, पण मराठ्यांच्या स्वाऱ्या बंगालकडे होऊं लागल्यामुळे तेथील व्यापारी धनिकांवर एक नवीच आपत्ति आली असली पाहिजे. या स्वाऱ्यांचे निवारण करण्यासाठीं तेथील नबाब या सावकार लोकानाच पिळून पैसे काढीत असले पाहिजेत आणि मराठ्यानीं देश जिंकिला, तरीहि त्याचे काय होणार ? मराठ्यांची लूटमार त्याना टोळधाडीसारखीच वाटणार अशा स्थितींत बंगालमधील व्यापाऱ्यांनीं आपल्यावरील मुसलमान नबाबाविरुद्ध किंवा राज्यकर्त्याविरुद्ध बंड करण्यास ब्रिटिश व्यापाऱ्याना साहाय्य केले असले व या मध्यमवर्गाला काहीं काळ ब्रिटिशाचा शांततेचा अमल जुलुमी व परधर्मी जमीनदाराच्या जाचातून आपली मुक्तता करण्यासाठीं परमेश्वरानेच स्थापन केला आहे असे वाटले असले, तर त्यात नवल नाहीं !

## ब्रिटिश राज्याचे परिणाम

वरील भावना हिंदुस्थानातील सर्वच प्रातांत व सर्वच वर्गात होती असे मानिता येत नाहीं ज्या वेळीं राजा राममोहन रॉय प्रभृति सुशिक्षित बंगाली हिंदू, जमीनदारवर्गाच्या जुलुमातून मुक्त करण्यासाठींच परमेश्वरानें ब्रिटिशांना हिंदुस्थानांत धाडिलें असे म्हणत होते, त्याच वेळेच्या सुमारास सर जॉन माल्कम हा ब्रिटिश गव्हर्नर आपल्या राज्याचे परिणाम हिंदुस्थानातील निरनिराळ्या वर्गावर काय होत आहेत, त्याचे विवेचन करिताना म्हणतो . "आमच्या राज्याची वाढ ही व्यापारी-वर्गाला आणि काहीं अत्यंत दरिद्री व अरक्षित लोकाना अनुकूल झाली आहे, पण हिंदी लोकांतील वरिष्ठ वर्गावर व लष्करी वर्गावर तिचा अगदीं विरुद्ध परिणाम झाला आहे."§

त्याचप्रमाणे येथील उद्योगधंदे आणि हस्तव्यवसाय यांच्यावरहि ब्रिटिश राज्याचा अत्यंत प्रतिकूल परिणाम झाला व शेतकऱ्यांवरहि साऱ्याचा भार वाढला वगैरे गोष्टी आज सर्वमान्य झाल्या आहेत सरकारी नोकरवर्ग आणि युरोपियन व्यापाऱ्यांच्या आश्रयाने राहणारा व वाढणारा हिंदी व्यापारी-सावकारवर्ग याना मात्र हा शांततेचा अमल परमेश्वरी प्रसादाप्रमाणे वाटला शिवाय, ही भावनासुद्धा बंगाल किंवा गुजराथ या प्रांतांत होती तितकी ती महाराष्ट्रात नव्हती मराठ्यांच्या स्वाऱ्यांचा प्रतिकूल परिणाम बंगालवर होत असला किंवा गुजराथवरहि झाला असला,

§ Notes on the Administration of India, Part 1 P. 791 by Sir John Malcolm

तरी खुद्द महाराष्ट्रांतील लोकाना शातता स्थापन करण्यांत आणि मालमत्ता सुरक्षित राखण्यांत इंग्रजांनीं कांहीं दैवी चमत्कार केला, असे वाटण्याचें कांहींच कारण नव्हते. महाराष्ट्र जिंकल्यानंतर दहा वर्षातच सर जॉन माल्कम हा मुबईचा गव्हर्नर झाला तो लिहितो : " मुबई इलाख्यातील विस्तृत प्रदेश निरनिराळया काळीं ब्रिटिशाच्या ताब्यांत आले आहेत आणि भाषा, रूढी व स्वभाव या दृष्टीनीं यांतील निरनिराळया ठिकाणचे लोक परस्परांहून अगदी भिन्न आहेत सुरत शहर आणि गुजराथचा कांहीं भाग अनेक वर्षें आमच्या अमलाखालीं आहेत या भागांतील आमचा बहुतेक प्रदेश फारच सुपीक आहे व येथील शेतकरी शेतीबद्दल सर्व हिंदुस्थानभर प्रसिद्ध आहेत येथील एकदर रहिवासी उद्योगी व शाततांप्रिय आहेत, पण माळवा व राजपुताना यांच्या लगतचा सर्व गुजराथ प्रात आणि कच्छकडील प्रात यात भिल्ल, कोळी, रजपूत असे लुटारू दगेखोर लोक राहतात व त्यांच्या वारवार होणाऱ्या स्वाऱ्यामुळे सपाट मैदानावर राहणाऱ्या या सधन लोकावर संकटें येत असत या सधन प्रदेशांवर मोगलांच्या व मराठ्याच्याहि स्वाऱ्या वरचेवर होत अशा परिस्थितींतील या लोकाना ब्रिटिश सत्ता येथे सुस्थिर झाली, ही एक दैवाची मोठीच खैर वाटली..."
पण हाच लेखक पुढे महाराष्ट्रातील लोकाच्या भावनासबधीं म्हणतो : " या लोकाची स्थिति गुजराथेतील लोकाहून भिन्न होती त्याच्या कांहीं प्रदेशांपैकीं काहीं भागावर अलीकडे बराच काळ युद्धे चालू असल्यामुळे मोठी आपत्ति ओढवली असली, तरी या देशाचा साकल्याने विचार करता येथील लोकावर जितके सौम्य सरकार अमल करीत होते, तितकें सौम्य सरकार फारच थोड्या देशावर राज्य करीत असेल आणि अतर्गत भरभराटीला आवश्यक अशा शेतीला प्रोत्साहन देणारे सरकार तर इतरत्र कोठेच नसेल ! गुजराथेतील लोकाप्रमाणे या दाक्षिणी लोकाना ब्रिटिशाची शांतता हा परमेश्वरी प्रसाद वाटत नाही रयतेपासून राजापर्यंत या मराठे लोकाचे आपल्या घरादारांइतकेंच युद्धावरहि प्रेम आहे आपणांस केवढाहि विजय प्राप्त झाला, किंबहुना एकादे राज्यहि मिळाले, तरी त्याचें आपल्या आप्तेष्टावरील अगर जन्मभूमीवरील प्रेम कमी होत नाहीं परकीयाची लूट करून मिळविलेल्या पैशापैकीं कांहीं भाग तरी ते नियमाने आपल्या घरीं पाठवीत असत व त्यामुळे त्यांची शेती नेहमीं भरभराटीत असे तसेच त्याच्याकडून मूळ गावीं येणाऱ्या या पैशांतून विहिरी, तलाव आणि देवळें बांधलीं जात दक्षिणेतील पेशव्याच्या खास अमलाखालीं असणारी मराठ्यांची जन्मभूमि अशा परिस्थितींत भरभराटीस येणे अपरिहार्यच होते आणि आज येथे जी राज्यक्राति झाली आहे, ती केवळ जीवित व मालमत्ता यांच्या संरक्षणाखेरीज इतर सर्व बाबींत येथील बहुतेक सर्व वर्गाच्या व विशेषतः वरिष्ठ वर्गाच्या हिताला बाधकच झाली आहे " §

§ Ibid, Appendix P 139.

तात्पर्य, आपणांस मुसलमानांच्या जुलुमांतून मुक्त केलें अथवा देशांत शांतता स्थापन केली किंवा आपल्या शेतीला अगर व्यापाराला उत्तेजन दिलें, यांपैकीं कोणत्याहि कारणांसाठीं ब्रिटिशांना दुवा देण्याचें महाराष्ट्रांतील जनतेला फारसे कारण नव्हते. मोगल बादशाही मोडून गेल्यानतर महाराष्ट्रांतील मराठ्यानीं ज्या प्रातावर स्वाऱ्या केल्या व मुलुखगिरीच्या रूपाने लुटालूट केली, अशा बगालसारख्या किंवा गुजराथसारख्या प्रांतात अठराव्या शतकाच्या मध्यानतर काही काळ अनवस्था माजली असेल व तेथील नबाबाना मराठ्याचा प्रतिकार करतांना सावकार-व्यापाऱ्यांकडून पैसा उकळून काढावा लागला असेल, पण असा जुल्म किवा अशी अदाधुंदी नेहमींच चालू असती, तर शेठसावकार व पेढ्या यांचा इतका उदयहि हिंदुस्थानात होऊं शकला नसता हे उघड आहे

## नव्या युगाची नवलाई

बगालमधील हिंदू राजानीं व शेठसावकारानीं ब्रिटिश व्यापाऱ्यांचा पक्ष घेतला व आपल्यावरील मुसलमानी अमल उलथून पाडून ब्रिटिशाची सत्ता आपल्या देशात स्थापन केली खरी, पण या कार्यात त्यानीं जागृत वर्गभावनेने भाग घेतला असें म्हणता येत नाहीं ब्रिटिश व्यापाऱ्याना राज्यक्रातीचे शास्त्र अवगत होतें व त्यांनी या वर्गाला आपल्या हाताशीं धरून राज्यक्राति केली व राजसत्ता आपणच बळकावली बंगालमधील व्यापारीवर्गाने वर्गभावनेनें किवा राज्यक्रांति करण्याच्या इराद्यानें त्यात भाग घेतला असता, तर ब्रिटिशानीं सर्व सत्ता स्वत. बळकावली व त्या सत्तेच्या बळावर पुढे हिंदी व्यापारहि बळकाविला, याबद्दल त्यांना इंग्लिशांचा हेवा अगर द्वेष वाटला असता, पण या व्यापारीवर्गाला आपण राजकारण अगर राज्यक्रांति करू शकतो व आपल्या हाती सत्ता राखू शकतो याची जाणीवहि या वेळीं नव्हती सरजामी युग मागें पडून व्यापारीवर्गाचा उत्कर्ष होऊन तो वर्ग पुढे आला, म्हणजे लोकसत्ताक राज्यक्रान्ति होऊ शकते, हे ज्ञान राजा राममोहन रॉय यांच्या काळीं म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या चरणाच्या अखेरीस थोडे थोडे बगाली लोकाना होऊ लागले होते.

राजा राममोहन रॉय याच्या व इतर काहीं बगाली सद्गृहस्थाच्या मालकीचे "बगाल हेरल्ड" या नावाचे एक वृत्तपत्र होतें ते १८२९ मध्ये "बंगालची भरभराट" या मथळ्याच्या लेखात म्हणते :

"कलकत्ता व एकदर बगाल प्रात यामध्ये अलीकडे सपत्तीची वाढ झाली आहे, याबद्दल फारच थोडा संशय असू शकेल. याचे कारण काय असावे याचा विचार करावा असे आम्हास वाटणें अगदी साहजिक आहे या हितकर सुधारणेचे अतिम कारण व्यापारावरील निर्बंध कमी झाले व युरोपीय लोक अधिक प्रमाणात येथे येऊन राहू लागले हे असून जमिनीची वाढती किंमत हे या परिस्थितीचे

अधिक नजिकचे कारण आहे. .... कलकत्त्यात जी जमीन तीस वर्षांपूर्वी पधरा रुपयाना विकत घेतली असेल, तिची किंमत आज तीनशें रुपये होईल व तेवढ्या किंमतीला ती विकतांहि येईल ! ! अशीं अनेक उदाहरणे दाखविता येतील. या जमिनीच्या किंमतींतील वाढीमुळे पूर्वी माहीत नसलेला असा एक नवाच वर्ग अस्तित्वात येत आहे वरिष्ठ जमीनदारवर्ग आणि गरीब जनता यांच्या दरम्यान ह्या वर्गातील लोक पडतात हा वर्ग निर्माण होण्याच्या पूर्वी देशातील सपत्ति फार थोड्या व्यक्तींच्या हाती होती व इतर सर्व लोक या छोट्या वर्गावर अवलंबून असत सामान्य जनता शारीरिक व मानसिक दृष्टयाहि अत्यंत दरिद्री होती हिंदू लोकांच्या गुलामगिरीचे कारण त्याचा धर्म किंवा या देशातील हवामान हे असावें या मतापेक्षा त्याच्या नैतिक गुलामगिरीस वरील विषम परिस्थितीच कारण झाली असावी, हे मत अधिक सयुक्तिक दिसतें.

"या घडामोडींमुळे होणारे फायदे असख्य आहेत. या घडामोडींचे परिणाम केवळ हिंदू लोकांवरच होतील असे नाहीं, तर ब्रिटिशाच्या हिंदी साम्राज्याच्या भरभराटीवर व स्थैर्यावरहि तिचे परिणाम घडतील एका नव्या युगाचा हा उपःकाल आहे जेव्हां जेव्हा समाजात असा वर्ग निर्माण होतो, तेव्हा तेव्हा त्याच्या मागोमाग स्वातंत्र्य येत असते याचे उदाहरण हवे असेल, तर इग्लडकडेच पहा नॉर्मन लोकानीं इग्लड जिंकिले त्या वेळीं आपल्या देशातील जमीनदार काहीं दिवसापूर्वी वागत असत, त्याचप्रमाणे तेथील जमीनदारवर्गाहि वागत असे व सर्व लोक त्याचे भूदास झालेले असत पण त्याच लोकाची आठव्या हेन्रीपर्यंतची प्रगति पहा या वेळी समाजातील संपत्तीची विभागणी समान होऊ लागली याच प्रगतीचे पुढे अधिक निरीक्षण करा, म्हणजे एका खाटकाच्या मुलाने ( क्रॉम्वेलनें ) राजाचा पराभव केला व त्याला ठार मारून इग्लडच्या लोकशाही राज्याचा दरारा व कीर्ति सर्व जगभर पसरविली असें दिसून येईल. समाजात केवळ ( जमीनदार व शेतकरी असे ) दोनच वर्ग असल्यानें केवढी हानि होते, याचे उदाहरण हवे असेल तर स्पेनकडे पहा तेथे ज्याला ज्याला शक्य होईल तो तो मनुष्य बौद्धिक किंवा शारीरिक श्रम न करतां जगण्याची आकांक्षा धरतो व आपल्याला 'हिदल्गो'चा दर्जा प्राप्त झाला आहे असे मानू लागतो. दुसरे उदाहरण हवे काय? पोर्तुगालकडे पहा. तेथे जमिनी-बरोबर शेतकऱ्याचाहि क्रयविक्रय होतो अशा प्रकारचीं अनेक उदाहरणे आपल्यापुढे असताना आज बगालमध्ये एक मध्यमवर्ग निर्माण होत आहे हे एक अत्यत उत्साहवर्धक दृश्य आहे, असे म्हणणें धाष्टर्याचे होईल काय?"*

वरील उताऱ्यांतील अर्थशास्त्र अगदींच उथळ, किंबहुना भ्रमोत्पादक आहे. कलकत्त्यासारख्या राजधानीच्या व व्यापारी शहरांतील जमिनींची किंमत वाढूं लागली

* Indian Speeches and Documents on British Rule, P 36-37

व त्यामुळें कांही लोकाना पुष्कळ पैसा मिळू लागला, त्याचप्रमाणें ब्रिटिशाचा पक्का माल आणून तो आपल्या देशांत विकणारे आणि आपल्या देशांतील उद्योगधंदे ठार करून येथील कच्चा माल बाहेर पाठविणारे व्यापारी सधन झाले; अथवा निळीच्या मळेवाल्यासारखे कांहीं ब्रिटिश वसाहतवाले या देशात येऊन राहिले व शेतांत खपणाऱ्या मजुरांना अधिक रोख पैसे देऊ लागले, एवढ्यावरून आपला सर्व देश सधन होऊं लागला, किवा भरभराटीस येऊ लागला, असे मत प्रतिपादणे अगदीं चुकीचे होते पण या विवेचनात ब्रिटिशानी येथील सुशिक्षित मध्यमवर्गाला शिकविलेले एकदोन नवे सिद्धात आहेत व तेच या नव्या युगाचे निदर्शक आहेत. पूर्वीच्या युगांत आयते जमीनदार आणि कष्टाळू शेतकरी, एवढे दोनच वर्ग समाजांत प्रमुख होते. त्या वेळीं या आयत्या जमीनदारवर्गाच्या हातींच सर्व संपत्ति सांठलेली होती आणि इतर सर्व समाज दास्यात व दारिद्र्यांत रखडत होता आतां व्यापाऱ्यांचा एक नवा मध्यमवर्ग समाजात महत्त्व पावूं लागला. त्यामुळें एकदर राष्ट्राची सापत्तिक भरभराट होऊं लागली आणि या नव्या वर्गाच्या उदयातून शेवटीं इग्लंडप्रमाणें या देशातहि राजकीय स्वातन्त्र्याचा व लोकसत्तेचा विकास होईल, असे हे सिद्धान्त आहेत या मध्यम व्यापारीवर्गाचा व इंग्रजी सुशिक्षिताचा उदय, ब्रिटिशाच्या इतिहासाचे ज्ञान आणि सरजामी युगाचा अत, या घडामोडीतूनच अखेरीस आधुनिक राष्ट्रीयत्व हिदुस्थानात निर्माण झाले व प्रथमतः ते बरेचसे ब्रिटिशाच्या सहवासाने व शिकवणुकीनें निर्माण झालें असे म्हणण्यास हरकत नाहीं पण या आधुनिक राष्ट्रीयत्वाचा उदय होण्याला वरील उतारा लिहिला गेल्यापासून (इ स. १८२९ पासून) सुमारे पन्नास वर्षांचा काळ जावा लागला. ब्रिटिश अमदानींत भरभराटीस येणारा हा नवा व्यापारी व सुशिक्षित वर्ग या वेळीं म्हणजे १८२९ च्या सुमारास ब्रिटिश राज्यकर्त्यांचे गुणानुवाद गाण्यांत, आपणांस पूर्वीच्या जमीनदारवर्गाच्या जुलमी अमलांतून मुक्त केले याबद्दल ब्रिटिशांचें राज्य म्हणजे परमेश्वराचा प्रसाद आहे, हे लोकाना पटवून देण्यात आणि आपल्या उन्नतीच्या आड येणाऱ्या परदेशगमनानिषेधादि सामाजिक व धार्मिक बधनाविरुद्ध बंड करण्यातच धन्यता मानीत होता जुन्या सरजामदाराची कवची फोडून ब्रिटिश साम्राज्यवादी व्यापाऱ्यानीं येथील मध्यमवर्गाला राजकीय अनवस्थेतून मुक्त केले होतें. पण जुनीं सामाजिक व धार्मिक बंधने तोडण्याच्या कामीं ब्रिटिशाची सत्ता त्याला अद्यापि उपयोगात आणावयाची होती. हा नवा सुशिक्षित मध्यमवर्ग जोपर्यंत याच कार्यात गुंतला होता आणि आपल्या औद्योगिक अभ्युदयास ब्रिटिश सत्ता अडथळा करीत आहे, याचा त्याला अनुभव आला नव्हता, तोपर्यंत तो आपल्या देशात ब्रिटिशांची सत्ता स्थिर व्हावी, याबद्दल इमानेइतबारें व राजनिष्ठेने ब्रिटिश राज्याची सेवा करीत होता. आपलीं राज्ये, राजसत्ता, व वैभव यांचा अस्त झाला याची स्मृति होऊन इग्रजांना शिव्याशाप देणाऱ्या असंतुष्ट सरंजामदारवर्गाला तो बंडखोर समजत असे व

त्यांना दडपून टाकण्याच्या कामीं ब्रिटिशांना साहाय्य करीत असे. ब्रिटिश लोकहि या नव्या वर्गाच्या साहाय्याने व सहानुभूतीनें आपली सत्ता या देशांत सुस्थिर करीत होते. तात्पर्य, ब्रिटिशांनीं हिंदुस्थान जिकितांना आणि तो जिंकिल्यानंतर आपली सत्ता सुस्थिर करतांना या देशात एक सामाजिक क्रांति घडवून आणिली होती व एका वर्गाला जिंकताना दुसऱ्या वर्गाला हाताशी धरून वर आणल्याचा आभास तरी उत्पन्न केला होता अर्थात् ब्रिटिशानी हिदुस्थान जिंकून केवळ एक राज्यक्रांतीच केली नाहीं, तर सर्वांगीण समाजक्राति करण्याचें बीजारोपण केलें.

## तत्कालीन राजकीय क्रांतीचें स्वरूप

सर जॉन सीले यांनीं आपल्या "इंग्लंडचा विस्तार" या ग्रथांत ब्रिटिशांनीं हिंदुस्थान जिकला ही राजकीय घडामोड, परकीय देश जिंकून घेण्याच्या परराष्ट्रीय राजकारणाच्या सदरांत पडत नसून हिंदी समाजातील एका वर्गाने दुसऱ्या वर्गाचा पाडाव करावा व एका वर्गाच्या हातची सत्ता दुसऱ्या वर्गाच्या हातीं द्यावी, अशा स्वरूपाची, अंतर्गत क्रांतीच्या स्वरूपाची होती असे जे म्हटले आहे, त्यांतील रहस्य आतां वाचकांच्या लक्षात बरोबर येऊं शकेल ते म्हणतात :

"एका राज्याने दुसरें राज्य जिकावे, तसा हा प्रकार नाहीं. ज्यांत निदान प्रत्यक्षतः तरी दोन राज्याचा परस्परांशीं संघर्ष व्हावा, तशा प्रकारची ही घडामोड नव्हे. परराष्ट्रीय खात्याशीं या घडामोडीचा संबध येत नाहीं हिंदी समाजांतील ही एक अतर्गत क्राति आहे, आणि एकाद्या समाजांत कांहीं अदाधुदी माजली असता त्यातीलच एका वर्गानें एकदम राजसत्ता हिसकावून घ्यावी व शांतता स्थापन करावी, तशा प्रकाराशी या घडामोडीची तुलना करतां येईल आपण क्षणभर अशी कल्पना करू, कीं ज्या व्यापाऱ्यानीं राजसत्ता हस्तगत केली, ते परकीय नव्हते असे मानलें तरीहि या घडामोडीचें स्वरूप पालटत नाहीं आपण अशी कल्पना करू, कीं राजकीय अंदाधुदीमुळे आपल्या व्यापारास येणाऱ्या धोक्याला कटाळून मुबईतील पारशी व्यापाऱ्यांनींच वर्गणी जमवून आपल्या रक्षणासाठीं किल्ले बांधले असते व सैन्य उभारले असतें व सुदैवानें त्यांना शूर सेनापती मिळाले असतें, तर त्यांनाहि प्लासी व बक्सार यांसारख्या लढाया जिकता आल्या असत्या, त्यांनाहि मोंगल बादशहाकडून एकाद्या प्रांताची दिवाणी मिळवितां आली असती आणि आपल्या सत्तेचा असा पाया घालतां आला असता, की त्यावर सर्व हिंदुस्थानच्या साम्राज्याची इमारत उभारतां आली असती."*

येथें असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो, कीं येथील व्यापारीवर्ग आणि सावकारवर्ग जर सरंजामदारवर्गाच्या जुलुमाला, युद्धांना आणि त्यांतून निर्माण होणाऱ्या अशांततेला कटाळलेला होता, तर त्यानेंच ही राज्यक्रांति कां केली नाहीं?

* The Expansion of England by J R Seely, P. 210-11

याचें उत्तर हिंदुस्थानांतील तत्कालीन समाजातील कोणासहि लोकसत्ताक क्रांति करून आधुनिक पद्धतीचे राष्ट्र निर्माण करण्याचे विचार सुचलेले नव्हते, असेच द्यावें लागतें या कल्पना युरोपांत त्या वेळीं सर्वत्र फैलावू लागल्या होत्या. त्यांतहि ब्रिटिश राष्ट्रांत त्या बऱ्याच अंशांनीं प्रस्थापितहि झालेल्या होत्या हिंदुस्थानांत हिंदुपद-पातशाही कीं मोगलपातशाही या ध्येयांचा झगडा चालू होता. निरनिराळ्या धर्मांच्या लोकांचे एकराष्ट्र होऊं शकते, सरजामपद्धतीवांचून मोठ्या राज्यांचा कारभार हांकतां येतो आणि समाजांतील सामान्य नागरिकांना राज्यक्रांति करून आपल्या हातीं राजसत्ता घेतां येते, याची कोणासहि कल्पना नव्हती. ब्राह्मणांनीं विद्यार्जन आणि याज्ञिकी करावी, क्षत्रियांनीं राज्ये करावींत, वैश्यानीं व्यापार करावा आणि शूद्रांनीं सेवा करावी, ही प्राचीन हिंदु-संस्कृतीची कल्पना जरी शुद्ध स्वरूपांत कोठेच उरली नव्हती, तथापि केवळ सरजामदार व राजे यांनींच राजकारण करावें, ब्राह्मणाची अगर वैश्याची वृत्ति करणारांचें राजकारण हे क्षेत्र नव्हे, अशाच कल्पना त्या वेळीं रूढ होत्या. कांहीं ब्राह्मण राजे व सरजामदार होत होते, तसे कांहीं वैश्यहि राजे किंवा सरजामदार होत असतील; पण वैश्यवृत्ति करणारांनीं राजकारण करावे आणि आपल्या प्रतिनिधींमार्फत राज्यकारभार चालवावा असा त्याचा अर्थ नव्हता. अर्थात् वैश्यांना स्वतःच्या राजाचा अमल नकोसा झाला, तर ते दुसऱ्या राजाचा आश्रय करून राहत व ब्राह्मणहि जो राजा होईल, त्याचा आश्रय करून राहण्यांत कमीपणा मानीत नसत. ब्रिटिशांच्या सैन्यात अनेक ब्राह्मण लोक नोकरीस राहिलेले होते.

पण ब्रिटिशांना सैनिक दृष्टीने ज्यांनीं मदत केली, त्यांत क्षात्रधर्मांचे अनुयायी म्हणून गाजलेल्या रजपुताचाहि बराच मोठा भरणा होता सर जॉन माल्कम ब्रिटिश सैन्यांतील रजपुतासबंधीं लिहितो:

“ बंगालमधील देशी सैन्यात मुसलमानांच्या तीनचतुर्थांशाइतके हिंदू आहेत. त्यांच्यापैकीं बहुतेक रजपूत आहेत क्षत्रिय किंवा लढाऊ जातींमधील ही जात फार प्रसिद्ध आहे. साडेपांच फुटापेक्षा कमी उंचीच्या कोणाहि मनुष्यास सैन्यांत घेतलें जात नाहीं, हे लक्षांत घेतल्यास त्याच्या उंचीसंबंधीं कल्पना येईल........ रजपूत हा जन्मजात लढवय्या आहे. त्याची आई त्याला युद्धाखेरीज दुसऱ्या कोणत्याच कथा सांगत नाहीं आणि मनुष्याच्या भावी आयुष्यांतील प्रत्येक भावनेवर व कृतीवर बालपणीं त्याच्या मनावर जे संस्कार होतात त्यांचीच छाप बसत असते. या वर्गांतील लोक सामान्यतः शेती करतात, पण शेत नांगरीत असतांनाहि त्यांची ढाल व तलवार त्यांच्या नांगरठीजवळ ठेवण्यांत येते व नांगराबरोबर तो चालूं लागला म्हणजे त्याच्याबरोबर ती नेण्यांत येते........ हिंदु व मुसलमान या दोन्ही धर्मांचे सैनिक खुनशी आहेत असे म्हणतां येणार नाहीं; तथापि त्यांचा स्वाभिमान फार जागृत असतो आणि त्यांचा कोणीं अपमान केला असें त्यांना

वाटले, तर ते दोघेहि पराकोटीचे अत्याचार करतील. या लोकांविषयीं एक गोष्ट मोठी लक्षांत घेण्यासारखी आहे, कीं ते शारीरिक दृष्ट्या अत्यंत थकून गेलेले असले व त्यांच्या हातून कोणताहि यत्न होणे अशक्य झालें असले, तरीहि ते मरणाला कधीं भीत नाहींत व वाटेल त्या स्वरूपांत मृत्यु आला तरी ते त्याला धैर्यानें कवटाळतात आणि निर्विकार मनाने आपले बलिदान करतात "* हाच लेखक या पत्रकात दुसरीकडे म्हणतो, "इतर पुराव्यांवरून असे दिसतें, कीं इंग्लिशांनीं जे पहिले शिपाई नेमिले, ते मुसलमान व हिंदु दोनहि धर्मांचे असून हिंदूंपैकीं उच्च वर्णांचे लोक होते यात बहुतेक रजपूत होते आणि मीं उल्लेखिलेल्या गोष्टीवरून त्यांचे दोन गुण व्यक्त होतात ते म्हणजे आपल्या हितास वास्तविक किंवा काल्पनिक धक्का लावणारांसबंधी तिटकारा आणि आपल्या सेनानीसंबधीं एकनिष्ठा." बंगाल व मद्रास या इलाख्यांतील सैन्यात उच्च वर्णीय हिंदू बरेच होते, पण मुंबई इलाख्यातील सैन्यांत उच्च वर्णीय हिंदू फारसे नव्हते, असेहि सर जॉन माल्कम यानें लिहिले आहे. यावरून मुबई इलाख्यातील उच्च वर्णीयांना परकीय व परधर्मीय राज्यकर्त्यांच्या सैन्यात नोकरी धरण्यापेक्षा स्वकीय राज्यकर्त्यांच्या सैन्यांत नोकरी धरून पुढेमागे दैव काढणें, म्हणजे जहागिरी मिळविणे, हे अधिक आकर्षक वाटत असावे आणि त्याच्यातील स्वाभिमानाच्या व स्वामिनिष्ठेच्या सद्गुणाला स्वराज्यसेवेचे स्वरूप प्राप्त झाले असावे असे दिसते तथापि, त्या वेळच्या एकदर हिदुस्थानातील हिंदु समाजाकडे पाहिले असता याच्यांत स्वाभिमान, स्वामिनिष्ठा, धर्मनिष्ठा, शौर्य, धैर्य वगैरे गुणसपत्ति भरपूर असूनहि राष्ट्राभिमान मुळींच नव्हता असे जें अनेक लेखकानीं म्हटले आहे, ते खरे दिसते

## स्वधर्मनिष्ठा व स्वराज्यनिष्ठा

येथें धर्माभिमान किंवा धर्मनिष्ठा याचे थोडे विवेचन केले पाहिजे स्वधर्मनिष्ठा आणि स्वराज्यनिष्ठा याचा संयोग या वेळीं मुळीच दिसून येत नाहीं धर्माभिमानाने प्रेरित होऊन शिवाजीमहाराजानीं स्वराज्यसस्थापना केली असे आपण मानितों आणि एके काळीं स्वधर्मभावनेनें आधुनिक काळांतील राष्ट्रनिष्ठेचे कार्य केलेलें असेलहि, पण अठराव्या शतकातील हिदूत स्वराज्यनिष्ठा आणि स्वधर्मनिष्ठा याचा कांहीं संबंध आहे याची मुळीच जाणीव दिसत नाहीं मागे गुप्त नांवाच्या पेढीवाल्यांनीं ब्रिटिश राज्यसस्थापनेस साहाय्य केले व त्यांच्याकडून अनेक शिफारसपत्रें मिळविली हे सागितले या शिफारसपत्रात ब्रिटिशानीं प्रत्येक वेळी आम्ही तुमच्या धर्मात हात घालणार नाहीं आणि तुमचीं देवळे रक्षण करू असे आश्वासन दिलेलें आहे असे आश्वासन देणारे राजे परधर्मी असले अगर परकीय असले, तरी त्यांस

* Notes on the Government of India by Sir John Malcolm Appendix E. P 247-48

साहाय्य करून स्वधर्मी व स्वदेशी राजांना त्यांचे गुलाम करणे, यांत आपण धर्माचा घात करीत आहो, असें त्यांना वाटत असेल असे दिसत नाही व्यापार व सावकारी या दृष्टीनें बऱ्याच मोठ्या प्रदेशावर शांततेचें राज्य असावे आणि धर्ममंदिरांचा विध्वंस होऊं नये, असें वैश्यवर्गाला वाटलें, तरी त्यासाठीं स्वराज्य स्थापणे अवश्य आहे, याची जाणीव या वर्गात नव्हती राजकारण करणे हा आपला धर्म त्यांना वाटत नव्हता, म्हणून परकीयांना घरात घेण्याचें राजकारण त्याच्या हातून सहज घडत होते. धर्माचे संरक्षण करण्याचा भार ज्यांच्यावर लादला होता, त्या ब्राह्मण-वर्गाचीहि स्थिति हीच होती कांहीं ब्राह्मण लोक राजे झाले, पण परकीय व परधर्मीय राजकीय आक्रमणाविरुद्ध सर्वांचा उठाव करणे हे आपले कर्तव्य आहे, याची जाणीव महाराष्ट्रांतील कांहीं ब्राह्मणामध्येच फार तर दिसून आली असती समर्थ रामदास व शिवाजीमहाराज यांचा महाराष्ट्रधर्म तो हाच, असे आपण मानितो, पण या राष्ट्र-धर्माची भावना ब्राह्मणात व क्षत्रियांत व्यापकत्वाने पसरली होती असें मुळींच दिसत नाहीं.

आपल्या देशांतल्याप्रमाणेच युरोपांतहि मध्ययुगात आनुवंशिक नसली तरी एक प्रकारची चातुर्वर्ण्यव्यवस्था होती, पण तेथील धर्मसंस्था आपल्यापेक्षां अधिक संघटित असून तेथील धर्माधिकाऱ्यानीं, मुसलमानांच्या स्वाऱ्या खिस्ती पवित्र स्थळांवर झाल्या तेव्हां सर्व युरोपांतील राजांना मुसलमानांविरुद्ध धर्मयुद्ध पुकारण्यास प्रोत्साहन दिलें आणि प्रत्यक्ष रणागणावर जाऊन लढणारे नवे धर्मसप्रदायहि निर्माण केले आमच्याइकडे असे प्रकार झाल्याचे दिसत नाहीं. स्वधर्मरक्षणासाठीं स्वराज्याची आवश्यकता असते ही जाणीव, मुसलमान आले तेव्हांहि, धर्माधिकारी ब्राह्मणवर्गात व्यापकत्वाने दिसत नाही. राजकारण हे क्षत्रियांचे कार्य, त्याच्याशीं आपला कांहीं संबंध नाहीं या भावनेचे तर हे फल नसेल ना? कारण कांहीं असलें, तरी ब्राह्मण व वैश्य वृत्तींच्या व वर्णाच्या लोकांत राजकारणाची, स्वराज्यरक्षणाची अथवा स्वराज्यसंस्थापनेची जाणीव असल्याचे दिसत नाहीं आमचा स्वधर्माभिमान स्वराज्याभिमानापासून प्रायः अलिप्तच होता, निदान मुसलमानांच्या शेंकडो वर्षांच्या अमलानंतर तरी अशी स्थिति झाली होती हे खरे आहे. यांत समर्थ रामदास किंवा शिवाजीमहाराज हे अपवाद आहेत व म्हणूनच कै राजवाडे त्यांच्या महाराष्ट्रधर्मास इतके महत्त्व देतात; पण हा महाराष्ट्रधर्महि उत्तर पेशवाईत उरला नव्हता आणि इतर प्रांतांतील हिंदू लोकांत तर त्याचा मागमूसहि नव्हता..ता. २८ जानेवारी, १८४९ च्या आपल्या लेखांत कै. रा. ब. गोपाळ हरी देशमुख ऊर्फ 'लोकहितवादी' हे "हिंदुस्थानच्या पराधीनतेचीं कारणें" सांगताना लिहितात:

"ब्राह्मण लोक हे आपले घरीं आले म्हणजे सोवळे करतात व यवनाचा विटाळ झाला म्हणून म्हणतात. तथापि, त्यांस राज्य करावयास त्यांनीं हरकत केली नाहीं व कितीएक लोक मुसलमानांवर इतके फिदा झाले, कीं राज्य करणे व शूरत्व

करणे हे काम मुसलमानांचे होय, इतरांस यावयाचे नाहीं, असें म्हणूं लागले ; परंतु या मूर्खांस असे समजत नाहीं, कीं आठशें वर्षांपूर्वी हिंदू राजे जाहलेले पांडव, राम, परशुराम हे मुसलमान होते कीं काय ?.. परतु ही गोष्ट विसरले आणि सोवळें घरांत आणले. देश सोवळा राखावयाचा विसरले आणि जो तो आपला स्वार्थ पाहूं लागला अशा अवस्थेत असतां मुसलमानांनीं राज्य घेतले. ते राज्य मुसलमानांचे मूर्खपणाने बुडावयाची संधि आली तो इंग्रजांचा प्रवेश जाहाला. त्यांनीं तर हेच लोक चाकरीस ठेवून याच लोकांच्या तोडांत मारल्या " हे वर्णन सामान्यतः खरें आहे असेंच इतिहासकारांस म्हणावे लागेल. अर्थात् मराठ्यांच्या साम्राज्यस्थापनेचा प्रयत्न हा या वर्णनास थोडा अपवाद आहे असे वाटेल ; पण या साम्राज्यांतील निरनिराळ्या सरदारांनीं ब्रिटिशांना मिळून स्वामिद्रोह आणि स्वराज्यद्रोह केला हे उघडपणे दिसून येते दक्षिणेतील ब्राह्मण सरदारांविषयीं लोकहितवादी दुसऱ्या एका लेखांत म्हणतात, " दाक्षिणेतील सरदारलोक याविषयीं कोणास कांहीं मजकूर ठाऊक नसेल म्हणून मी त्यांचे अवस्थेचे व समजुतीचे थोडे वर्णन करितो पेशवाईत हे सर्व बाजीरावांस कंटाळून इंग्रजांकडे मिळाले. यांस अशी आशा होती, कीं पेशव्यांच्या पदरीं राहून आम्हांस खावयास मिळतें, परतु चाकरी करावी लागते तेव्हां आतां इंग्रजांचे पक्षास मिळाले म्हणजे खावयास फुकट मिळेल व आमची जहागीर वगैरे सरंजाम सर्व आम्हांकडे चालतील आणि घरीं बसून राहू. मग पेशव्यांची ताबेदारी कशास पाहिजे ? हा विचार करून त्यानीं इग्रजाचे बंदोबस्त कबूल केले व पुढे आतां ते कायद्याप्रमाणें जप्त होऊं लागले, तेव्हा त्यास असे वाटलें, कीं अरेरे, हे काय ? आम्हीं केले काय, आणि झाले काय ? " ('शतपत्रे' पत्र न ४९, ता २५ फेब्रुआरी, १८४९ ) इतिहासाच्या फारशा तपशिलात न शिरताहि आपणांस सामान्यतः वरील सिद्धात स्थूलमानानें मान्य करावा लागेल.

दक्षिणेतील सरदारांनीं इंग्रजांना फितूर होऊन पेशव्यांना दगा दिला व म्हणून त्यांचे सरंजाम, जहागिरी व इनामे आपण सुरक्षित राखिलीं पाहिजेत असे पेशवाई जिंकल्यानंतरचा मुबईचा दुसरा गव्हर्नर सर जॉन माल्कम १८३० सालीं लिहितो. यांत या सरदारांनीं गेलीं तीस वर्षे आपल्या स्वामीशीं द्रोह करून ब्रिटिश राज्याशीं एकनिष्ठा दाखविली आहे, या त्यांच्या कामगिरीचा त्यानें गौरवाने उल्लेख केला आहे

" या प्रश्नाचा विचार करून माझें असे मत झाले आहे, कीं मी म्हणतो त्या प्रकारच्या सहानुभूतीस महाराष्ट्रांतील जहागिरदारवर्गापेक्षां अधिक पात्र असा दुसरा कोणताहि वर्ग नाहीं गेल्या तीस वर्षातील त्यांच्याकडे पाहण्याची ब्रिटिश सरकारची दृष्टि, आपलें प्रभुत्व त्यांच्याकडून मान्य करविण्याचा प्रकार, गव्हर्नरांनीं व इतर अधिकाऱ्यांनीं व्यक्तिशः त्यांच्याशीं केलेले वर्तन, त्यांच्यापैकीं बऱ्याच जणांना दत्तक घेण्याची दिलेली परवानगी, या सर्वांचा परिणाम होऊन आम्हीं त्यांजकडे जीं इनामें ठेविलीं आहेत तीं खालसा करण्यांत येणार नाहींत असा त्यांचा ग्रह झाला होता. ते

या प्रश्नाकडे केवळ कायदेशीर हक्कांच्याच दृष्टीने पहात नसत; तर त्यांच्याशीं वागण्याच्या ज्या वहिवाटी पडल्या होत्या त्या दृष्टीने ते त्याचा विचार करीत आणि त्यांना अशी अपेक्षा वाटत होती, कीं आपल्या स्वामीला सोडून ब्रिटिशांना येऊन आपण मिळालो या गोष्टीला जेव्हां महत्त्व होते, तेव्हां ज्याप्रमाणे ब्रिटिशांनीं आपल्या जहागिरी कायम ठेविल्या आणि ब्रिटिश विजयी झाल्यानतर शांततेच्या व सुव्यवस्थेच्या प्रथम स्थापनेच्या वेळीं ज्याप्रमाणें ब्रिटिश सरकारनें प्रसन्न होऊन उदार धोरणाने आपली कीर्ति वाढविली, त्याचप्रमाणे पुढेंहि तशाच कारणांसाठीं आपले, आपल्या आप्तेष्टाचे व आपणाबरोबरच ब्रिटिशांना शरण आलेल्या आपल्या आश्रितांचेंहि चिरकाल हित होईल "*

या उताऱ्यांत इ स १८३० सालीं दक्षिणेंतील सरदारांच्या तीस वर्षांच्या ब्रिटिश राजनिष्ठेचे पोवाडे सर जॉन माल्कम हा गात असून त्यांनीं आपल्या स्वामीशी म्हणजे पेशव्याशीं द्रोह करून ब्रिटिशाना साहाय्य केलें, म्हणून त्यांच्या जहागिरी व इनामे जप्त करू नयेत अशी विनवणी विलायतसरकारकडे करीत आहे तात्पर्य, स्वामिनिष्ठा हा आमचा गुणहि या वेळीं बहुतेक लोपला असून आमचे उच्चवर्णीय व उच्चकुलीन सरदार हे स्वामिद्रोही बनले होते असे म्हणावे लागते आमची धर्मनिष्ठा जशी हीन आणि संकुचित बनली होती व परकीय व परधर्मीय राज्यकर्त्याकडून आमच्या सोवळ्याओवळ्यांत हात घालणार नाहीं आणि आमचीं मदिरे पाडणार नाहीं, एवढे अभिवचन घेऊन त्यांस साहाय्य करण्यास आम्ही तयार होतो, त्याचप्रमाणें आमची स्वामिनिष्ठा इतकी सकुचित बनली होती, कीं आपल्यावरचा जो अत्यंत निकट लष्करी अधिकारी त्याने आपणांस प्रेमाचे दोन शब्द योजिले कीं आम्ही त्याची

---

* Reasoning upon this question I will affirm that no class of men had more right to expect the consideration that I have proposed should be granted to them, than the principal Mharatta Jagheerdars The mode in which they have for thirty years been viewed by the British Government, the manner in which their submission to our authority was received, and the great attention with which they have always been treated by the Governor in person and the highest functionaries of Government , combined with the leave already granted to adopt-had, I am sure, conveyed an impression that the estates we left in their possession, however designated, would not be resumed They judged this question with no reference to legal rights, but to the usages to which they had been habituated, and they expected the same motives which had induced the British Government to confirm in their states, during a struggle in which their succession from their prince was of importance and gave it reputation at a period of victory when peace and order were advanced by acts of grace and generosity, would continue to operate to the benefits of their families, friends and dependents, who submitted at the same time to our authority.

—*Minute, November 1830.*

जिवावर उदार होऊन सेवा करण्यास तयार होत असूं! हा स्वामी आपल्या गांवचा, धर्माचा किंवा राज्याचाच असला पाहिजे, अशी भावना समजांतील केवळ कनिष्ठच नव्हे, तर वरिष्ठ म्हणविणाऱ्या वर्गांतहि जागृत नव्हती म्हणजे राष्ट्रत्वाच्या दृष्टीनें सर्वच वर्ग शूद्र अथवा दास बनले होते आपल्या धर्माच्या व संस्कृतीच्या रक्षणास स्वराज्य हवें याची जाणीवहि त्याच्यात उरलेली नव्हती. सारांश, धर्मनिष्ठा व स्वामिनिष्ठा या गुणांतूनहि स्वराज्यसंस्थापन किंवा स्वराज्यसंरक्षण होईल अशी आमची त्या वेळीं स्थिति उरलेली नव्हती. आमच्या अंगीं केवळ वैयक्तिक सद्गुण होते; पण राष्ट्रनिर्मितीस व स्वराज्यनिर्मितीस लागणाऱ्या सद्गुणांचा पूर्ण लोप झाला होता.

## राष्ट्रीयत्व व लोकशाही-भावना यांचा अभाव

धर्म-जाति-निरपेक्ष आधुनिक लोकसत्ताक राष्ट्रीयत्व त्या वेळीं आमच्या देशांत नव्हतेंच, पण धर्मनिष्ठा आणि स्वामिनिष्ठा या सद्गुणांच्या जोरावर जी एक स्वराज्यनिष्ठा मराठे लोकांत शिवाजीमहाराजांच्या व संभाजीमहाराजांच्या काळीं व नतर राजारामाचे वेळीं दिसते, तीहि उत्तर पेशवाईत उरली नव्हती याचा दोष पेशव्यांकडे किती व इतर सरदारांकडे किती या चर्चेंत पडण्याचें कारण नाहीं. बाजीराव वाईट निघाला, तर त्याला काढून सर्वांनीं एकमुखी प्रयत्न करण्याचा मार्ग सर्व सरदारांनीं अवलंबावयास हवा होता. तोहि न अवलबितां ब्रिटिशाकडून आपल्या जहागिरी व सरंजाम स्थिर व चिरंतन करून घेण्यास तयार होणें, याला राज्यद्रोह, धर्मद्रोह आणि स्वामिद्रोह याखेरीज दुसरें कोणतेहि नाव देता येणार नाहीं! अर्थात् हिंदुसमाजाला ही स्थिति आल्याचें पाप त्यांच्यातील कर्ते असे जे-ब्राह्मण-क्षत्रिय अथवा ब्राह्मण व सरदारवर्ग याच्या माथीं बसल्याखेरीज राहणे शक्य नाहीं. मात्र अशा परिस्थितींत कोणाहि एका व्यक्तीला दोषी धरता येणार नाहीं, हे उघड आहे

युरोपांतील व्यापारी पेशाचे साम्राज्यवर्धक लोक जर सतराव्या व अठराव्या शतकांत हिंदुस्थानांत आलेच नसते, तर मोडलेली मोंगल बादशाही नामशेष करून देहींत मराठेशाही किंवा हिंदुपदपादशाही स्थापन होऊ शकली असती, अशी आपणांस कल्पना करतां येईल, पण असल्या कल्पना करण्यांत कांहींच अर्थ नाहीं युरोपांत जी नवी व्यापारी संस्कृति निर्माण झाली, तिच्याशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य हिंदी संस्कृतींत अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत उरले नव्हते आणि आधुनिक, मध्ययुगीन किंवा प्राचीन, कोणत्याच स्वरूपाचे स्वराज्यरक्षण अथवा स्वराज्यसंस्थापन करण्यास ती असमर्थ बनली होती, हे मान्य करणे भाग आहे मुसलमानी साम्राज्य व त्यांतून निर्माण झालेलीं राज्ये मराठ्यानीं खिळखिळीं आणि निर्जीव केलीं होतीं. आतां आपण हिंदुस्थानांत सार्वभौम सत्ता बनणार अशी आशा मराठ्यांना वाटूं लागली होती; इतक्यांत इंग्रजांनीं त्यांची सत्ता खिळखिळी केली आणि आधुनिक

राष्ट्रीयत्वाचे धडे आमच्यापासून घेतल्याखेरीज तुम्ही या जगांत स्वतंत्रतेनें नांदू शकत नाहीं, अशी भारतीय हिंदूंची व मुसलमानांची खात्री करून दिली इ स. १८१८ मध्यें पेशवाईचा अस्त झाल्यापासून प्राचीन व मध्ययुगीन भारताचा अंत झाला आणि आधुनिक भारताचा इतिहास अथवा भारताचा आधुनिक इतिहास सुरू झाला. या आधुनिक भारताच्या निर्मितींत कोणीं काय काय पराक्रम केले आणि त्याचे विधाते कोण, हाच या पुस्तकाचा विषय आहे

अनेक धर्मांच्या व जातींच्या लोकात राष्ट्रीयत्व कसे निर्माण करावें आणि संरजामशाही मोडून लोकशाही कशी स्थापन करावी, हे दोन धडे भारतीयांना युरोपापासून त्या वेळीं शिकावयाचे होते. आज भारतीयांनीं राष्ट्रीयत्वाचा व लोकशाहीचा असे दोन धडे आत्मसात् केले आहेत मात्र आज युरोपमध्ये भांडवलशाहीमुळें राष्ट्रीयत्वाचा नाश होऊन अंतर्गत वर्गयुद्ध माजत आहे व लोकशाहीला धनिकशाहीचें स्वरूप प्राप्त झालें आहे. आधुनिक भारत भांडवलशाही, तज्जन्य अपरिहार्य वर्गयुद्ध आणि अखेरीस लोकशाहीचा त्याग व राष्ट्रीयत्वाचा विपर्यास हा मार्ग स्वीकारणार, कीं दुसरा एकादा मार्ग अवलंबून राष्ट्रीयत्व आणि लोकशाही यांचा विकास युरोपहून भिन्न दिशेनें करून युरोपला शांततेचा, समतेचा, सुखाचा व स्वातंत्र्याचा अभिनव मार्ग दाखवून देणार, हा त्याच्या तरुण पिढीपुढील महत्त्वाचा प्रश्न आहे या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी भारतीय तरुणानीं आधुनिक भारताचा गेल्या सव्वाशे वर्षांचा इतिहास अवश्य अभ्यासिला पाहिजे या कालात ज्या थोर राष्ट्रभक्त विभूती झाल्या, त्यांच्या अतःकरणातील सत्यनिष्ठेची व स्वातंत्र्याची आत्मप्रेरणा त्यांनीं आपल्या अंतःकरणांत जागृत केली पाहिजे आणि त्या प्रेरणेने तेजस्वी बनलेल्या बुद्धीनें जगांतील घडामोडींकडे पाहून स्वातंत्र्याची आत्मप्रेरणा आणि बुद्धिबल यांच्या साहाय्याने आपला भावी इतिहास निर्माण केला पाहिजे.

## २

# ब्रिटिश राज्य कसें स्थिरावलें ?

"आमच्या लोकाच्या रीती अगदी बदलल्याशिवाय या देशाचें हित होणार नाही व या लोकास स्वता राज्य चालविण्याचे सामर्थ्य असल्याखेरीज इग्रज लोक या देशातून गेले तरी उपयोग होणार नाही. पुन गर्दी होईल व बेबदी, अदाधुदी, भालेराई, होळकरी गर्दी व पेंढारी अशा गोष्टी पुनरपि होतील आणि कोणाचा जीव व घरदारहि निर्भय राहणार नाहीं. जो जबरदस्त त्याचे हाती जाईल व जो निर्बल असेल तो उपाशी मरेल. त्याचें सर्व हरण होईल. यास्तव सुज्ञांनी इग्रज जाण्याची इच्छा कदापि करू नये."

—लोकहितवादी, ता. २० जानेवारी १८५०, शतपत्रे, पत्र नं. ८९.

"If the argument be, that the spread of knowledge may eventually be fatal to our rule in India, I maintain that whatever may be the consequence, it is our duty to communicate the benefits of knowledge If India could only be preserved as a part of the British Empire, by keeping its inhabitants in a state of ignorance, our domination may be a curse to the country and ought to cease But I see more ground for just apprehension in ignorance itself I look to the increase of knowledge with a hope that *it may strengthen our Empire.*" *

हिंदुस्थान देश जिंकल्यानंतर येथे जी राज्यपद्धति स्थापन करावयाची ती कशा प्रकारची असावी, तिचे धोरण आणि अंतिम ध्येय कोणते असावे आणि येथील लोकांशीं आपण कसे वागावें अगर त्याना कसे वागवावे, यासंबंधीं ब्रिटिश राज्यकर्त्यांत ज्या चर्चा झाल्या आहेत, त्या वाचल्या असता ब्रिटिश राज्य या देशांत कसें स्थिरावलें याचें उत्तर मिळूं शकते. तसेच येथील राज्यपद्धतीचा विकास कसा होत गेला, तिला आजचे स्वरूप कसे प्राप्त झाले व तिचे भवितव्य कोणतें या विषयावरहि बराच प्रकाश या चर्चा वाचल्याने पडूं शकतो इ स १८१८ मध्ये पेशवाई नष्ट झाल्यानंतर सर्व हिंदुस्थानचें सार्वभौमत्व आपणाकडे आलें, अशी इंग्रजांची खात्री झाली आणि त्यांनी आपले हे सार्वभौमत्व सुस्थिर पायावर कसे घालावें व ते अधिकांत अधिक काळ कसे टिकवावे याचा विचार सुरू केला असा विचार करून त्यांनीं जे धोरण आंखिले, त्यात त्यांनीं बरेच यश मिळविले व त्यांत वारंवार ज्या सुधारणा केल्या त्या लक्षांत घेता त्यांचे सार्वभौमत्व अधिकांत अधिक काळ टिकविण्यास दुसरे कोणतेंहि धोरण इतके उपयुक्त ठरले नसते, हे बहुतेक विचारी मनुष्यांस मान्य करावें लागेल, असे आम्हांस वाटतें आपल्या या दूरदर्शी धोरणामुळे हिंदी जनतेच्या भवितव्यावर कोणकोणते परिणाम घडतील याचाहि विचार त्यांनीं प्रथमपासून केलेला असून त्याच्यातील दूरदर्शी मुत्सद्द्यांचे या बाबतींतील अदाज गेल्या शे-सव्वाशे वर्षांच्या इतिहासावरून बऱ्याच अंशीं बरोबर ठरले आहेत, असेहि मान्य करावे लागेल

मागील प्रकरणांत दाखवून दिले, कीं ब्रिटिशांनी हिंदुस्थान जिंकला त्याचे स्वरूप परराज्यावर स्वारी करण्याच्या पद्धतीचे नसून एक अंतर्गत क्रांति करण्याच्या प्रकाराचेच बहुतांशीं निदान प्रथम तरी ते होते हिंदुस्थानांतील कोणत्याहि अव्वल दर्जाच्या राज्याला स्वारी करून त्यांनीं आपल्या स्वामित्वाखालीं उघडपणे आणलें नाहीं कोणत्याहि राज्यांत दोन तट पडले असता त्यांतील कमजोर पक्षाला पाठिंबा देऊन सत्ताधारी बनवावे, मांडलिकांना सार्वभौमाविरुद्ध उठवावे, सरदारांना राजाविरुद्ध फितवावें

* Lord Metcalf, "Life of Lord Metcalf" Vol II, pp. 262-64.

आणि क्वचित् नामधारी राजाला हाताशीं धरून प्रजेंत तट पाडावे, अशा भेदनीतीनेंच त्यांनीं बहुतेक राज्यांचा पाडाव केला असून, बंगाल जिकतांना तर, मुसलमान विरुद्ध हिंदू आणि सरजामदार विरुद्ध व्यापारी मध्यमवर्ग, अशा स्वरूपाच्या धर्मद्वेषाचा व वर्गद्वेषाचाहि त्यांनीं उपयोग केलेला दिसतो. हिंदुस्थानचें सार्वभौमत्व हस्तगत झाल्यानतर तर त्यांनीं हिंदुस्थानांत एक सर्वांगीण क्रांति घडवून आणण्याचे धोरण जाणूनबुजून स्वीकारले. या सर्वांगीण क्रांतीचे अंतिम परिणाम आपल्या साम्राज्य-सत्तेला मारक होतील, असे मानणारा त्यांच्यांत एक वर्ग होता; पण हे अंतिम परिणाम जरी कधीं काळीं मारक बनले, तरी याच धोरणाचे संनिकट परिणाम आपल्या साम्राज्याचा पाया सुदृढ करण्यास उपयुक्त ठरणार आहेत, असे ब्रिटिशांतील दुसऱ्या पक्षाचे मत होतें आपले हें धोरण फार जहालपणाने न अवलबितां थोड्या धिमे-पणानें अवलंबिल्यास हिंदी राष्ट्रांत सर्वांगीण क्रांति घडून येण्यास जीं शेदोनशे वर्षें लागतील, तितका काल तरी आपल्या राज्यास अतर्गत भीतीचा धोका उरणार नाहीं, इतकेंच नाहीं, तर आपल्या या धोरणांतून निर्माण होणारा सर्वांगीण सुधारणावादी पुढारीवर्ग आपल्या साम्राज्यावर येणाऱ्या परचक्राचे निवारण करण्याच्या कामींहि चांगलाच उपयोगी पडेल, असे या मुत्सद्द्यांचें मत होते व ते बहुतांशीं खरे ठरले. ब्रिटिशांनीं हिंदुस्थानचे सार्वभौमत्व काबीज केल्यानंतर जो एक सर्वांगीण सुधारक-वर्ग निर्माण केला, तो ब्रिटिश साम्राज्याशीं एकनिष्ठ बनला व प्रथम प्रथम तर तो सर्वस्वीं अराष्ट्रीय बनून केवळ परकीयाचा हस्तकच बनला मात्र अशा प्रकारे ब्रिटिशाच्या प्रेरणेने हिंदुस्थानात जन्मास आलेल्या सर्वांगीण सुधारणावादाने राजनिष्ठेची मर्यादा ओलांडू नये, याबद्दल ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं शक्य ती खबरदारी घेतली होती. शिवाजी-महाराजांच्या स्वराज्यासंबधींचे प्रेम हिदु जनतेत फैलावण्यास ज्याप्रमाणे रामदासी संप्रदायाचा उपयोग एके काळीं झाला, त्याचप्रमाणे ब्रिटिशांच्या साम्राज्यासंबधींचे प्रेम अशिक्षित हिंदी जनतेत फैलावण्यास नवा सुशिक्षित वर्ग आपल्या उपयोगी पडेल अशी ब्रिटिश मुत्सद्द्यांची कल्पना होती. त्याप्रमाणे हिंदी राष्ट्राच्या बुद्धिमत्तेला राजकारणपराङ्मुख, किंबहुना अराष्ट्रीय बनविण्याला हिंदुस्थानांतील परराज्यप्रेरित सुधारणावाद कांहीं काळ कारण झाला यांत शका नाहीं यामुळेच पुढे जेव्हां हिंदुस्थानांत खरे राष्ट्रीयत्व निर्माण झालें, तेव्हा तें सर्वांगीण सुधारेणला विरोधी अशा स्वरूपांतच जन्मास आलें. तथापि, सामाजिक व धार्मिक सुधारणांना विरोध हे त्याचें खरें अंतरंग नसून दूरदर्शी व खोल राजकीय दृष्टि आणि प्रखर राष्ट्राभिमान, हेच त्याचें खरे अतरंग होतें. हिंदी राष्ट्रवाद अशा प्रकारे प्रथम प्रथम सामाजिक व धार्मिक सुधारणाच्या प्रतिकारभावनेच्या रूपाने आविर्भूत झाल्यासारखा भासला, तरी पुढे आपल्या राष्ट्राभिमानाच्या प्रज्वलनासाठीं त्यालाहि सामाजिक व धार्मिक सुधारणांचा उपयोग करणे भाग पडलें आणि यामुळेंच हिंदी राष्ट्रवाद पुढे हळूहळू सर्वांगीण क्रांतिवादाचें स्वरूप धारण करू लागला.

## ब्रिटिश मुत्सद्दी व सर्वांगीण सुधारक

राजा राममोहन रॉय यांच्यापासून न्या रानडे यांच्यापर्यंत जे सर्वांगीण सुधारणावादी झाले, त्यांच्या भाषणांतील व लेखनांतील कांहीं भावना आज आपणांस जरी राष्ट्रीयत्वाशीं विसंगत वाटल्या, तरी एकंदरीनें विचार करतां आधुनिक भारताचा जन्म त्यांच्या प्रयत्नांतून आणि प्रचारातूनच झाला आहे आणि आज हिंदी राष्ट्रवादाला जे सर्वांगीण क्रांतिवादी स्वरूप प्राप्त होत आहे, त्याचींहि बीजे त्यांनीं हिंदुस्थानांत जे एक नवे विचारयुग प्रवर्तित केले, त्यांतच शोधून पाहिल्यास आपणास सापडू शकतात. भारतीय संस्कृतीच्या इतिहासांत या सुधारणावादी विचारयुगाला विशेष महत्त्व असून हा सुधारणावाद काहीं काळ ब्रिटिश साम्राज्याला सुस्थिर बनविण्यास कारण झालेला असला, तरी हे सामाजिक व धार्मिक सुधारक देशद्रोही होते असे मानणे हा कृतघ्नपणाच होईल त्याच्या अतःकरणातील प्रेरक शक्ति शुद्ध देशभक्ति आणि देशोद्धार हीच होती आणि त्यांनीं देशांत एक नवी ज्योत प्रज्वलित केली, याबद्दल आज दुमत होणे शक्य नाहीं या विचारज्योतीच्या प्रकाशामुळे हिंदी लोकांचे डोळे कांही काळ दिपून गेले असले, तरी तो दोष तिच्या प्रकाशाचा नसून भारतीय संस्कृतीवर कांहीं काळ जो अंधार पसरला होता त्याचा होता हिंदी लोकांना पाश्चात्य विद्येचे शिक्षण देऊन त्यांना हळूहळू राज्यकारभारांत स्थान द्यावे असें धोरण ज्या ब्रिटिश मुत्सद्द्यानीं दूरदर्शी स्वार्थबुद्धीने आंखिलें, त्यांना ही विचारज्योति प्रथम प्रज्वलित करण्याचें बरेंचसें श्रेय आहे तथापि, आपल्या साम्राज्याला बळकटी आणण्यासाठीं ही ज्योत पेटविणारे ब्रिटिश मुत्सद्दी आणि आपल्या देशात माजलेल्या अज्ञानाचा अंधार नष्ट करण्यासाठीं पाश्चात्य विद्येची ज्योत सर्वत्र फैलावू इच्छिणारे सर्वांगीण सुधारणावादी हिंदी देशभक्त, या दोघांना एकाच वर्गांत ढकलतां येणार नाहीं तसेच ज्या ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं दूरदर्शी स्वार्थानें का होईना, पण हिंदी लोकाना ज्ञान देऊन त्याचा हळूहळू राज्यकारभारांत प्रवेश करून देण्याचे धोरण आंखले, त्यांच्याहि या दूरदर्शी किंवा शहाण्या स्वार्थाबद्दल हिंदी देशभक्तांनीं कृतज्ञता बाळगण्यास हरकत नाहीं. या कृतज्ञतेचे कांहीं इष्टानिष्ट परिणाम हिंदी राष्ट्रीयत्वाच्या विकासावर झालेले दिसतात. त्याचे विवेचन या पुस्तकांत पुढे ठिकठिकाणीं करावयाचे आहे त्यापूर्वी ब्रिटिशांनीं सार्वभौमत्व हस्तगत करतांच आपल्या साम्राज्यास बळकटी आणण्यासाठीं कोणतें दूरदर्शी धोरण आंखून घेतलें, त्याचा अधिक तपशीलवार विचार करणे आवश्यक आहे

## एल्फिन्स्टनची दूरदृष्टि

इ स. १८१८ मध्ये पेशवाई नामशेष करून हिंदुस्थानवर ब्रिटिशांचे सार्वभौमत्व स्थापन करण्याचें कार्य मौट स्टुअर्ट एल्फिन्स्टन याने केलें व तोच मुंबई इलाख्याचा पेशवाईनतरचा पहिला गव्हर्नर बनला. इ स. १८१९ पासून १८२७

पर्यंत तो मुंबईचा गव्हर्नर होता. याच काळांत (१८२० ते १८२७) सर टॉमस मन्रो हा मद्रासचा गव्हर्नर होता. या दोघांनीं ब्रिटिश राजनीतीला एक उदार धोरण लावून दिलें किंवा दाखवून दिलें आणि तें जाहीर करून त्यांनीं कांहीं एतद्देशीय लोकांचीं अतःकरणे आकर्षित करून घेतलीं हिंदुस्थानचें सार्वभौमत्व आपल्याकडे आले त्या वेळीं हे सार्वभौमत्व आपण किती काळ टिकवूं शकू, ते अधिकांत अधिक काळ कोणत्या धोरणानें टिकू शकेल आणि आपल्या साम्राज्याची अखेर काय होईल, यासंबंधीचे विचार त्याच्या डोक्यात घोळत असणे अगदी स्वाभाविक आहे. १८१९ च्या मे महिन्यांत एल्फिन्स्टन सर जॉन माल्कम यास लिहितो :

"आज ना उद्यां हा सर्व देश आपला बनवावा हेच बहुधा इष्ट आहे .. आपणांस जर एतद्देशीय सैन्य काबूंत ठेवितां आलें आणि रशियन लोकांना दूर ठेविता आलें, तर एतद्देशीय लोक आमच्या शिक्षणानें शहाणे होईपर्यंत आणि दोघांच्या हिताच्या दृष्टीनें आमचा सबंध तोडणे इष्ट होईपर्यंत आमच्या साम्राज्याला इतर कोणताहि धोका मला दिसत नाहीं"*

यानंतर पुढील महिन्यात तो मॅकेंटॉश यास लिहितो, "आमचें हिंदी साम्राज्य फार काळ टिकणार नाहीं हे मत म्हणजे केवळ एक पूर्वग्रह नसून ते सयुक्तिक आहे, या साम्राज्याचा अंत कशा प्रकारे होईल हे आकलन करणे मात्र अवघड आहे, पण रशियनांकडून किंवा इतर परचक्रांकडून होणाऱ्या हल्ल्यांतून हे वांचलें, तर त्याच्या विनाशाचीं बीजे देशी सैन्यांत आढळतील, असें मला वाटते हे देशी सैन्य मोठे नाजुक व भयकर यंत्र आहे व त्याच्या व्यवस्थेंत थोडीशी चूक झाली, तरीहि तें सहज आमच्या विरुद्ध उलटेल आमच्या प्रभुत्वाचा अत्यंत इष्ट अंत म्हटला म्हणजे येथील लोकांची आमच्या अमदानींत इतकी सुधारणा व्हावी, कीं कोणत्याहि परकीय सत्तेला येथें राज्य करणे अशक्य व्हावे, पण हा काल किती लांबचा असेल याची गणती करतां येत नाहीं. तथापि, आमचा संबध तुटण्याचा काळ केव्हां तरी येणे अपरिहार्यच आहे आणि येथील लोक रानटी राहून त्यांनीं अत्याचार करून आमचा सबंध तोडून टाकावा, यापेक्षां तो थोडा आधीं तोडावा लागला, तरी त्यांची सुधारणा होऊनच तो तुटावा, हेच आमच्या दृष्टीने अधिक हितावह आहे जर पहिला प्रकार होईल (म्हणजे लोक रानटी राहून अत्याचाराने आमचा संबंध तोडतील), तर आमचे सर्व वसाहतवाले व आमचा व्यापार याचा नाश होईल व आम्हीं या देशांत स्थापिलेल्या सस्थाहि नष्ट होतील."‡

या दोन उताऱ्यांवरून या वेळच्या दूरदर्शी ब्रिटिश मुत्सद्द्याच्या विचारांची कल्पना आपणांस येऊ शकते त्यांना आपल्या साम्राज्यास तात्कालिक अशीं फक्त दोनच संकटें दिसत होतीं. तीं म्हणजे (१) रशियासारख्या परकीय युरोपीय सत्तेचें

* Mount Stuart Elphinstone by J. S Cotton. P 185

‡ Ibid, P 185-86

भय, आणि (२) हिंदी सैन्याच्या बडाचें सकट हींच होत. येथील राजेरजवाड्यांचें त्यांना मुळींच भय वाटत नव्हते, असा याचा स्पष्ट अर्थ होत असून परकीय संकटांतहि आशियांतील एकाहि राष्ट्राचा उल्लेख ब्रिटिश मुत्सद्दी करीत नाहींत. ते केवळ रशियाचाच उल्लेख करतात हे ध्यानांत घेण्यासारखें आहे नेपोलियनच्या पराभवानंतर त्यांना फ्रेंचांचें संकट उरले नव्हते आणि आशियांतील राज्ये त्यांच्या मनांत भीति उत्पन्न करू शकत नव्हतीं, हें यावरून सिद्ध होते. हिंदी लोकांच्याच साहाय्याने जिंकलेला हिंदुस्थान त्याच्याच साहाय्यानें आपण आपल्या ताब्यांत ठेवू शकू, येथील राजेरजवाड्याना भिण्याचे आपणास कारण नाहीं, पण जर का आपल्या हिंदी सैन्यानें बंड केले अगर ते फितूर झाले, तर मात्र आपला निभाव लागणार नाहीं, एवढीच भीति त्याना वाटत होती येथील सर्व राजेरजवाड्यांना एका निशाणाखालीं गोळा करून आपल्या परकीय साम्राज्याचा कोणी पाडाव करील व हिंदुस्थानात स्वतःचें प्रभुत्व स्थापन करील, अशी भीति या वेळीं ब्रिटिश मुत्सद्द्यांना वाटत नव्हती हिंदी राजे, संस्थानिक किंवा त्यांचे विद्वान्-अविद्वान् मुत्सद्दी हिंदुस्थानांत राष्ट्रीयत्व निर्माण करूं शकत नाहींत, कारण ते जगाच्या संस्कृतींत मागसलेले, अर्धरानटी, आपापसांत भांडणारे, शिस्तीचें व कवायतीचे महत्त्व न ओळखणारे, परकीय प्रभुत्वाची चीड न बाळगणारे, धर्मवेडात गुरफटलेले, आधुनिक राष्ट्रनिर्मितीस पारखे, लोकसत्तेचें ज्ञान नसलेले आणि जगांतील घडामोडी न जाणणारे असे आहेत व त्यांच्यापाशीं आपल्या तोडीचीं शस्त्रास्त्रेंहि नाहींत, हे ब्रिटिश मुत्सद्दी जाणून होते. नेपोलियनचा पाडाव झाला नसता, तर हिंदी लोकांना सुधारण्याचे कार्य फ्रेंचांवर येऊन पडलें असतें, पण ते आतां आपणावर येऊन पडलें आहे असे त्याना वाटे. आम्हीं यांना सुधारले, राज्यकारभाराचे धडे दिले आणि आपल्या संस्कृतीतील लोकसत्ताक राष्ट्रनिर्मितीच्या कल्पना येथें रुजल्या, तर पुनः हेच लोक एक होऊन आपणाशीं भांडतील व मग मात्र त्याच्यापुढें आपला निभाव लागणार नाहीं, हे ते जाणत होते, पण ही गोष्ट घडण्यास शेदोनशे वर्षें लागतील व तोपर्यंत यांच्यावर आपण सत्ता गाजवू शकू असा त्यांना आत्मविश्वास होता तेव्हां हे फार दूरचें तिसरे संकट सोडून दिल्यास वर उल्लेखिल्याप्रमाणे तात्कालिक अशीं दोनच संकटे उरतात. एक रशियासारख्या युरोपियन परचक्राचे व दुसरें म्हणजे हिंदी सैन्याच्या बंडाचें. त्याच्या निवारणासाठीं त्यांनीं कोणते उपाय योजिले, त्यांचा आतां विचार करू.

## राष्ट्रभावनेचा अभाव व हिंदी लष्कर

जोपर्यंत हिंदुस्थानांतील सामान्य जनतेंत राष्ट्रभावना निर्माण झाली नाहीं, तोंपर्यंत केवळ सैन्याच्या बंडानें हिंदुस्थान स्वतंत्र होऊन सुखाने व शांतीने नांदू लागणें अशक्य आहे, हें त्यांना माहीत होतें केवळ सैन्याच्या बंडांतून स्वतंत्र

राष्ट्राची निर्मिति होऊं शकत नाहीं, तथापि देशांत अंदाधुंदी व पेंढारशाही माजूं शकते. युरोपीय राष्ट्रें इकडे आलींच नसतीं, तर अशा अंदाधुंदींतूनहि आपण एकादें सरंजामी पद्धतीचें विस्कळित साम्राज्य येथे स्थापन करूं शकलों असतों, असे येथील हिंदू व मुसलमान राज्यकर्त्यांना वाटत असेल; पण इंग्रजाच्या कवायती सैन्यापुढे, भेदनीतीपुढे आणि शांततेचा अमल मोठ्या क्षेत्रावर स्थापन करून सामान्य जनतेचीं अंतःकरणें वेधून घेण्याच्या कलेपुढे आपला निभाव लागत नाहीं, अशी हाय येथील मूर्ख व नालायक राजेरजवाड्यांनीं घेतली होती आपली शक्ति खरोखर फार थोडी आहे, पण ती या मूर्ख लोकांना मोठी वाटते कारण राष्ट्रनिर्मितीचे व परकीयांविरुद्ध एकजुटीनें लढण्याचें महत्त्व ते जाणत नाहीत आपापसांतील भांडणासाठीं व केवळ पोटासाठीं परकीयांना घरात घेऊन त्याची चाकरी करण्याची यांना लाज वाटत नाहीं, तेव्हा यांची भीति बाळगण्याचे आपणांस कारण नाहीं, असे ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं मनाशीं ठरविलें असावें. हिंदी लोकांना आत्मप्रत्यय वाटत नाहीं, त्यांच्यांत राष्ट्राभिमान नाहीं व ते एकजूट करूं शकत नाहींत, हेच आपल्या साम्राज्याचें सामर्थ्य आहे असे फ्रेड्रिक जॉन शोअर हा इंग्रज लेखक इ स १८३५ मधील आपल्या "इंडियन आर्मी" या लेखांत लिहितो

"'आमचें हिंदी साम्राज्य हे लोकमताच्या आधारावर उभारलेलें आहे' या म्हणण्याचा अर्थ मला अगदीं अलीकडे समजला आहे. या मताचा अर्थ असा मानण्यांत येतो, कीं लोकांचा आमच्या न्यायबुद्धीवर व आमच्या शब्दावर विश्वास असल्याने ते हिंदी राजांपेक्षां आमचा अंमल अधिक पसत करतात; पण ज्या मुत्सद्द्यानें हे सूत्र प्रथम निर्मिलें, त्याचा अर्थ एवढाच होता कीं 'हिंदी लोकाना आपल्या सामर्थ्याची जाणीव नसल्यानें आम्हांस विरोध करणे फोल आहे असें त्यांचें मत झालें आहे, पण ते जर एकजूट होतील, तर आम्हांस ते सहज नामशेष करूं शकतील' असा मला सशय वाटतो ते काहीं असले तरी आमचे साम्राज्य हे तलवारीवरच आधारलेलें असून लोकांच्या इच्छेवर व प्रेमावर आधारलेलें नाहीं जर आमचें सैन्य परत बोलाविले किंवा त्याची संख्या कमी केली, तर या गोष्टीचें प्रत्यतर येऊन आम्हांस त्याचीं फळेंहि भोगावीं लागतील."*

हिंदी सैन्याच्या राजनिष्ठेसबधी हा लेखक म्हणतो, "सारांश असा कीं, आपल्या गांवापलीकडे देशाचें प्रेम म्हणजे काय याचें ज्ञान हिंदी लोकांना नाहीं एकाद्या अधिकाऱ्याविषयीं किवा स्वामीविषयीं त्याला प्रेम किंवा निष्ठा वाटेल, पण एकंदर राज्यसंस्थेसबधीं तो अगदींच बेफिकीर असतो. जो पगार देईल त्याच्यासाठीं तो लढेल आणि त्याला जर असें दिसून आलें, कीं आपण ज्या सरकारची नोकरी करीत आहों त्याचा पाडाव होत आहे, तर वैयक्तिक स्वामिनिष्ठेच्या अभावीं तो त्या

* Notes on Indian Affairs, Vol II, P 419 by F J Shore.

सरकारची नोकरी सोडून देईल व चांगल्या पगाराच्या किंवा लुटीच्या आशेनें तो शत्रुपक्षालाहि जाऊन मिळेल "§

अशा संस्कृतींत असणाऱ्या सैनिकांना खूष ठेवण्याचीं दोन साधने त्यांनीं शोधून काढिलीं होतीं. तीं म्हणजे त्यांना भरपूर व नियमित वेळीं पगार देणें आणि त्यांच्या जातिधर्माला किंवा वेडगळ भासणाऱ्या धर्मसमजुतींनाहि धक्का बसेल असें कोणतेहि कृत्य न करणे. हीं दोन तत्रे सांभाळली म्हणजे आपणांस या देशांत वाटेल तितके सैनिक मिळतात आणि त्यांना कवायत शिकवून त्याच्या हातीं सुधारलेलीं शस्त्रें दिलीं, कीं त्यांच्यापुढे देशी राज्याचा निभाव लागत नाहीं, असा त्यांना अनुभव आला होता.

## मुद्रणस्वातंत्र्याचा प्रश्न

पण भरपूर पगार आणि धर्मसमजुतींत हात न घालणें, या मार्गांनीं सैनिकांना खूष ठेविले, तरी त्यांच्यात राजकीय स्वातन्त्र्याच्या विचारांचा प्रवेश होऊं नये याबद्दल दक्षता बाळगिली पाहिजे, याचीहि जाणीव मन्रो, एल्फिन्स्टन वगैरे पहिल्या उदार गणल्या गेलेल्या ब्रिटिश मुत्सद्द्यांना होती यासाठींच हिंदी लोकांना मुद्रण-स्वातन्त्र्य देऊं नये, निदान त्यांच्या मुद्रणस्वातन्त्र्यावर पुष्कळच बधनें घालावींत, असे त्यांचें मत होतें. मन्रो, एल्फिन्स्टन, माल्कम हे गव्हर्नर आणि त्यांचे धोरण पूर्ण करणारा गव्हर्नर जनरल लॉर्ड वुइल्यम बेंटिक या सर्वांनीं हिंदी लोकाना शिक्षण द्यावे, त्यांचा हळूहळू राज्यकारभारांत अधिकाधिक प्रवेश करून द्यावा आणि कालान्तराने ते स्वतत्र होण्यास लायक बनतील तेव्हा आपला व्यापार व आपण स्थापिलेल्या सस्था सुरक्षित राहतील अशी दक्षता घेऊन त्याना स्वतंत्रहि होऊं द्यावे, असे विचार व्यक्त केलेले आहेत. तथापि, राजकीय स्वातन्त्र्याची कल्पना लोकांत फैलावून ती हिंदी सैन्यांत ताबडतोब पसरेल या भीतीने हिंदुस्थानास मुद्रणस्वातन्त्र्य देऊ नये, असें ते आग्रहपूर्वक प्रतिपादींत. या बाबतीत मद्रासचा गव्हर्नर सर टॉमस मन्रो इ स १८२२ मध्ये लिहितो:

" या देशांतील मुद्रणस्वातंत्र्याचा विचार करीत असतां येथील लोकाना नागरिकस्वातंत्र्य उपभोगू देण्याची शर्त पाळून आम्ही या देशांत नांदूं शकत नाहीं, याची जाणीव मला झाल्याखेरीज रहात नाहीं म्हणून लोकांत शांतता रहावी आणि आमचे राज्य कायम टिकावे या दृष्टीने हल्लींचीं सर्व बधनें कायम राखावींत, हेंच मला अवश्य वाटते येथील सगळेच लोक आमचे देशबांधव असते, तर मला आत्यंतिक मुद्रणस्वातंत्र्य पसत पडलें असतें ; पण ज्या अर्थीं ते तसे नाहींत, त्या अर्थी त्याना मुद्रणस्वातन्त्र्य देणे ही सर्वांत भयंकर गोष्ट होय. त्यामुळें उपयुक्त ज्ञानाचा फैलाव होण्याऐवजी किंवा राज्यकारभाराची सुधारणा होण्याऐवजीं लोकांत

§ Ibid, P. 521-22

औद्धत्य, बंडाळी आणि अराजकता माजण्याचाच संभव आहे... **मुद्रणस्वातंत्र्य आणि परकीयांचें प्रभुत्व या गोष्टी परस्परांशीं अगदीं विसंगत आहेत आणि त्यांचा संयोग फार काळ टिकणें शक्य नाहीं. कारण, स्वतंत्र वृत्तपत्रांचे पहिलें कर्तव्य कोणतें आहे? आपल्या देशाची परकीयांच्या जोखडांतून मुक्तता करणें आणि हें मोठें साध्य प्राप्त करून घेण्यासाठीं इतर सर्व क्षुद्र विचारांचा त्याग करणें, हेंच ते कर्तव्य होय**, आणि आम्हीं जर युरोपियन व हिंदी लोक या दोघांनाहि खरे मुद्रणस्वातंत्र्य दिले, तर त्याचा अपरिहार्य परिणाम हाच होईल

"मुद्रणस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते म्हणतात, कीं आमच्या राज्यकारभाराची सुधारणा व्हावी आणि येथील लोकांची स्थिति व मने सुधारावीत याबद्दल आमचा प्रयत्न आहे; पण हे इष्ट हेतू ते जी साधने सुचवीत आहेत, त्या साधनांनीं मुळींच साध्य होणार नाहीत. या देशातील आमच्या राज्यकारभाराचा विचार करीत असतां दोन अत्यंत महत्त्वाच्या मुद्द्याकडे आपण नेहमीं लक्ष ठेविले पाहिजे आमचे प्रभुत्व शक्य तितके अधिकांत अधिक काळपर्यंत टिकले पाहिजे हा पहिला मुद्दा, आणि दुसरा मुद्दा म्हणजे ज्या वेळी आम्हांला हे प्रभुत्व सोडून द्यावें लागेल, त्या वेळीं येथील लोकांची इतकी सुधारणा झालेली असावी, कीं त्याच्या अंगीं स्वातंत्र्यमंडित, निदान सुनियंत्रित असे तरी सरकार स्थापन करण्याची पात्रता आलेली असावी. हे हेतू जर कधीं साध्य होणार असतील, तर ते नियंत्रित मुद्रणस्वातंत्र्यानेच होऊ शकतील मुद्रणाचे पूर्ण स्वातंत्र्य दिल्यास हे हेतू सिद्ध होणें अगदींच अशक्य होईल. कारण, सुधारणा करण्याची घिसाडघाई करण्याचा प्रयत्न केल्यास सावकाशीने व सावधपणाने घडणाऱ्या सुधारणांचे सर्व फायदे नष्ट होतील.

"जीं बंधने सुचविण्यात आलीं आहेत, त्यामुळें एतद्देशीय लोकांत ज्ञानप्रसार होण्यास अडथळा होणार नाहीं, तर उलट, अशा ज्ञानप्रसाराची त्यामुळें शाश्वतीच उत्पन्न होईल कारण तो स्वाभाविक मार्गांनीं होत राहील व लष्करी बंडाळी व अराजक या भयांपासून हे कार्य सुरक्षित राहील ज्ञानप्रसाराचा हा स्वाभाविक मार्ग म्हणजे युरोपियनांच्या निकट सहवासांत येणाऱ्या लोकात वृत्तपत्रे किंवा पत्रके यांचा प्रसार करणे हा नसून सामान्य जनतेत शिक्षणाचा सावकाशीने प्रसार करणे आणि समाजांतील सर्व वर्गांत धार्मिक व नैतिक ज्ञानाचा प्रसार करणे हाच होय. **आपण स्वतंत्र व्हावे आणि आपला राज्यकारभार आपण करावा, ही आकांक्षा सैन्यापर्यंत पोहोचण्याआधी तिचा उद्भव सामान्य जनतेत होऊन ती सर्वत्र फैलावलेली असली पाहिजे आणि अनेक पिढ्यांनी घडून येणाऱ्या सुधारणा थोड्या काळांत घडवून आणण्याच्या नादी लागून आम्हीं जर या कार्यांत अडथळे आणिले नाहीत, तर ही स्वातंत्र्याची आकांक्षा हिंदुस्थानांत सर्वत्र व्यापकत्वानें निश्चितपणे फैलावेल, यांत मुळींच**

**शंका नाहीं.** सौम्य आणि न्याय्य अशी राज्यव्यवस्था स्थापिली, लोकांच्या धर्म-भावनांवर हल्ला न करतां उपयुक्त अशीं पुस्तकें त्यांच्यांत पसरविलीं, त्यांनीं स्थापन केलेल्या अनेक शिक्षणसंस्थांचें संरक्षण करून ज्या ज्या संस्थांमध्यें उत्कृष्ट शिक्षणाची सोय असेल त्या त्या संस्थांना पैसा दिला अगर त्यांचा सन्मान केला, ज्या संस्थांना द्रव्याची गरज असेल त्यांच्यासाठीं सरकारी खजिन्यांतील रकमेची तरतूद केली आणि सर्वांत अधिक म्हणजे, एतद्देशीय लोकांतील विद्वानांना अधिकाराच्या व सन्मानाच्या जागा देऊन आपण विद्या संपादन करावी अशी आकांक्षा त्यांच्या अंतःकरणांत निर्माण केली, तर त्यांना राज्यकारभारांत अधिक भाग घेण्याची संधि देऊन आम्ही हळूहळू त्यांचें धर्मवेड नष्ट करूं आणि आमच्या देशांत जीं उदात्त मतें व तत्त्वें प्रसार पावलीं आहेत, त्यांचाहि प्रसार या लोकांत करूं शकूं.

"याच्याविरुद्ध दिशा जर आपण अवलंबिली आणि मूठभर युरोपियन वृत्तपत्रांच्या संपादकांच्या हिताकडे दृष्टि देऊन जर आम्हीं युरोपियनांच्या चारित्र्याबद्दल व सत्तेबद्दल हिंदी लोकांत असणाऱ्या आदराला स्वैर मुद्रणाचे सुरुंग लाविले, तर देशी सैनिकांत असंतोषाचीं बीजें आम्ही पसरवूं आणि बंडाच्या संकटापासून आम्हांस कधींच निर्धास्त राहतां येणार नाहीं. असलें संकट ओढवण्यास आजच्यापेक्षां त्यांच्या बुद्धीची अधिक वाढ झाली पाहिजे किंवा त्यांना राष्ट्राच्या अगर मानवाच्या हक्कांचें अधिक ज्ञान झालें पाहिजे असें मुळींच नाहीं. आपल्या अधिकाऱ्यांसंबंधीं व युरोपियनांच्या चारित्र्यासंबंधीं त्यांना आज जो आदर वाटत आहे, तो नाहींसा झाला म्हणजे पुरे आहे. जेव्हां असें होईल, तेव्हां ते आमच्याविरुद्ध बंड उभारतील; पण या बंडाचा हेतु आपल्या लोकांस स्वातंत्र्य मिळावें हा नसेल, तर स्वतःच्या हातीं सत्ता यावी व आपणांस लूट मिळावी हाच असेल. सर्व जगांत कधींहि कोणीं केला नाहीं असा एक प्रयोग आम्ही करीत आहों—तो म्हणजे जित राष्ट्रांतील लोकांच्या सैन्याच्या आधारावर आपलें प्रभुत्व गाजविणें हा होय; व त्याच वेळीं मुद्रणस्वातंत्र्य उपभोगून त्यांनीं आम्हांला हांकलून द्यावें व आपला देश स्वतंत्र करावा, हा धडा आम्ही त्यांना शिकवीत आहों. ही भीति केवळ एतद्देशीय वृत्तपत्रकारांच्याच पुरती आहे आणि या विचारांची खळबळ जेव्हां आमच्या एतद्देशीय सैन्यांत माजेल, तेव्हांच त्याचे भयानक परिणाम आम्हांस दिसूं लागतील. एकीकडे पुष्कळ लोक हिंदू वृत्तपत्रांच्या प्रयत्नांची वाहवा करूं लागतील आणि आतां एतद्देशीय लोकांत पुष्कळच ज्ञानप्रसार होईल अशा आशा बांधूं लागतील; पण त्याच वेळीं दुसरीकडे याच स्वतंत्र वृत्तपत्रांत उगम पावणारी एक भयंकर क्रांति आमची सत्ता अकालीं उलथून पाडण्याची तयारी करूं लागेल आणि तसें झाल्यास या सर्व आशा ढांसळून पडून आम्हीं प्रथम ज्या स्थितींत हिंदुस्थान पाहिला, त्याहूनहि सुधारणेच्या दृष्टीनें तो अधिक निराशामय स्थितींत जाऊन पडेल."*

* Memoir of Sir Thomas Munro, dated 12th April, 1822.

तात्पर्य, हिंदी लोकांत पाश्चात्य विद्येचा प्रसार व्हावा, त्यांना आधुनिक राष्ट्रीकरणाचें आपल्या देशांतील ज्ञान व्हावे, त्यांचा राजकारणांत हळूहळू प्रवेश व्हावा आणि असे होता होतां अखेरीस त्यानीं राजकीय स्वातंत्र्य मिळवावें; पण त्यांच्यांत स्वातंत्र्याची भावना अकाली फैलावू नये, सामान्य जनतेंत ही भावना फैलावण्यापूर्वी तिचा स्पर्श हिंदी सैनिकास होऊ नये आणि आपला दरारा कमी होऊन आपले मर्मस्थान हिंदी लोकाच्या हातीं जाऊं नये, अशी विचारसरणी ब्रिटिश सत्ता सार्वभौम बनली त्या वेळच्या सर टॉमस मन्रो, माउट स्टुअर्ट एल्फिन्स्टन, सर जॉन माल्कम वगैरे मुत्सद्द्यांची दिसून येते. येथील सामान्य जनता राष्ट्रनिर्मितीच्या ज्ञानापासून अलिप्त आहे, येथील राज्यकर्ते सस्थानिक परकीयाविरुद्ध एकजुटीने लढून स्वातंत्र्यस्थापनेस नालायक आहेत आणि येथील विद्वानाना जगाचे, भौतिक शास्त्राचें आणि सामाजिक विद्यांचे गाढ अज्ञान आहे, असे त्याना दिसत होते तेव्हा या सर्वांना सुधारून शेंदोनशें वर्षांनीं कधीं काळीं आपणास हा देश सोडून जावा लागला तर लागो, पण आताच आमचे देशी सैन्य फितूर होऊन बड उभारलें गेले, तर त्यांत या देशातील लोकांचें तरी काय हित आहे, असाहि विचार हे मुत्सद्दी आपल्या मनाशीं करीत असतील त्याचबरोबर एकदा या लोकात व्यापक प्रमाणात राष्ट्रबुद्धि निर्माण झाली, तर आपला यांच्यापुढे निभाव लागणार नाहीं हेहि ते ओळखून होते १८२६ सालीं बराकपूर येथील बड मोडल्यानतर, एल्फिन्स्टन सर चार्ल्स मेटकाफ यास लिहितो :

"मला असे वाटत असे, कीं आमचें साम्राज्य कांचेचेच आहे, पण पूर्वी व अलीकडे त्यानें जे आघात यशस्वीपणे सहन केले आहेत, ते पाहता ते लोखंडाचे असावे असा भास होण्याचा सभव आहे, पण माझा असा विश्वास आहे, कीं ते पोलादाचे आहे तथापि, ते जर गाफील लोकाच्या हातीं पडले, तर मोडून पडण्याचाहि संभव आहे"*

वर उल्लेखिलेल्या भीतीमुळे हिंदी लोकाना मुद्रणस्वातंत्र्य देऊ नये, असे एल्फिस्टन, मन्रोप्रभृति उदार गणलेल्या पहिल्या ब्रिटिश मुत्सद्द्यांसहि वाटत होते, पण १८३५ मध्ये लॉर्ड विल्यम बेटिक गेल्यानतर १८३६ पर्यंत सर चार्ल्स मेटकाफ हा गव्हर्नर जनरल झाला व त्याने हिंदुस्थानास मुद्रणस्वातंत्र्य दिले या कृत्याबद्दल त्याला नोकरीवरून दूर करण्यात आले, तरीहि त्याने हिंदी लोकाना मुद्रणस्वातंत्र्य देण्यातच हिंदी लोकाचें व आपल्या साम्राज्याचेंहि खरें हित आहे, हे आपलें मत बदललें नाहीं तेव्हां त्याचा युक्तिवाद या बाबतींत काय होता, तो पाहणें अवश्य आहे तो म्हणतो :

"ज्ञानाच्या प्रसारामुळें परिणामीं आमच्या हिंदी राज्याचा अत होईल असे म्हणणे असेल, तर त्यावर माझें असे उत्तर आहे, कीं परिणाम काहीं झाला तरी

* Mount Stuart Elphinstone by J. S Cotton, P 186

ज्ञानाचे फायदे त्यांना उपभोगूं देणें हें आमचें कर्तव्यच आहे. हिंदी लोकांना अज्ञानात ठेवल्यानेंच तो देश आमच्या साम्राज्यांत राहूं शकत असेल, तर आमचें प्रभुत्व हा या देशाला दिलेला शापच ठरेल व त्याचा अंत होणेंच अवश्य होईल.

"पण लोकांना अज्ञानांत ठेवण्यांतच अधिक धोका आहे, असें मानण्यासच सयुक्तिक आधार आहे असें मला दिसतें. ज्ञानाच्या प्रसारामुळें आमच्या साम्राज्याची बळकटी अधिकच वाढेल या दृष्टीनें मी त्याचा विचार करतों. त्यामुळें राज्यकर्ते व प्रजाजन यांच्यांत सहानुभूति निर्माण होऊन परस्परांत ऐक्य नांदूं लागेल आणि आज जें त्यांच्यांत अंतर आहे तें हळूहळू कमी होऊन परिणामीं पार नाहींसें होईल."†

ज्ञानप्रसारामुळें ब्रिटिश साम्राज्याची बळकटी वाढेल किंवा कमी होईल या प्रश्नाचें उत्तर ज्या ज्ञानाचा प्रसार व्हावयाचा तें ज्ञान कशा प्रकारचें असणार, यावर अवलंबून आहे. ब्रिटिशांच्या अव्वल अमदानींत येथील सुशिक्षित लोकांत ज्या ज्ञानाचा प्रसार झाला, त्यामुळें येथील ब्रिटिश साम्राज्याला कांहीं काळ तरी बळकटी आली यांत शंका नाहीं. या प्रकरणाच्या शिरोभागीं "लोकहितवादी" चा जो एक उतारा दिला आहे, त्यांत हा परिणाम स्पष्टपणें दिसून येतो. त्यांत ते स्पष्ट सांगतात, कीं "सुज्ञांनीं इंग्रज जाण्याची इच्छा कदापि करूं नये." याचें कारण ते देतात, कीं "आमच्या लोकांच्या रीती अगदीं बदलल्याशिवाय या देशाचें हित होणार नाहीं व या लोकांस स्वतां राज्य चालविण्याचें सामर्थ्य असल्याखेरीज इंग्रज लोक या देशांतून गेले तरी उपयोग होणार नाहीं. पुनः गर्दी होईल व बेबंदी, अंदाधुंदी, भालेराई, होळकरी गर्दी व पेंढारी अशा गोष्टी पुनरपि होतील आणि कोणाचा जीव व घरदारहि निर्भय राहणार नाहीं."

लोकहितवादींचें हें लिखाण १८५० मधील म्हणजे मेटकाफ यानें मुद्रणस्वातंत्र्य दिल्यानंतर दहा-पंधरा वर्षांनंतरचें आहे. त्यावरून १८२२ सालीं सर टॉमस मन्रो यास मुद्रणस्वातंत्र्य दिल्यास जे भयंकर परिणाम होतील अशी भीति वाटत होती, ती खरी झाल्याचें दिसत नाहीं. मन्रोला वाटे, कीं हिंदी लोकांना मुद्रणस्वातंत्र्य दिलें, कीं ते राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करून घेणें हेंच आपलें पहिलें कर्तव्य आहे हें ओळखून आपल्या मुद्रणाचा उपयोग इतर सुधारणा करण्याच्या कामीं न करतां ब्रिटिश साम्राज्य उलथून पाडण्याच्या उद्देशानें स्वातंत्र्याची भावना हिंदी सैनिकांपर्यंत नेऊन पोहोंचवितील व वाटेल त्या हालअपेष्टा सोसून सैन्याला फितूर करून देशांत अंदाधुंदी माजवितील; पण इंग्रजी विद्येनें ज्यांचे डोळे उघडले, त्यांना असें वाटलें नाहीं; उलट, आपल्या देशाचा आंतरबाह्य सर्वच रंग पालटेपर्यंत ब्रिटिशांचें राज्यच येथें असावें व इंग्लिशांचें राज्य नष्ट होण्याची कोणाहि 'सुज्ञानें' इच्छा करूं नये, असा प्रचार ते करूं लागले. त्यांनीं आपल्या देशाच्या सर्वांगीण सुधारणेला हात

† The Development of an Indian Policy: by Anderson and Subedar. P. 143.

घातला आणि राष्ट्रीय स्वातंत्र्याचा विचार कांही काळ तरी दूर ठेविला यामुळे मुद्रणस्वातंत्र्यामुळेच आपल्या साम्राज्यास बळकटी येईल, हे मेटकाफ याचें मत अखेरीस खरे ठरले !

## मुद्रणस्वातंत्र्य व राष्ट्रीय भावना

इ. स १८२३ सालीं बगालमधील राजा राममोहन रॉयप्रभृति सुशिक्षित हिंदी पुढाऱ्यांनीं मुद्रणस्वातंत्र्यासबधीं एक खलिता ब्रिटिश राजाकडे पाठविला होता त्यात ते लिहितात : " महाराजांस हे विदितच आहे, कीं मुद्रणस्वातंत्र्याने आजपर्यंत जगांतील कोणत्याहि भागात राज्यक्रांति घडवून आणिलेली नाहीं कारण स्थानिक अधिकाऱ्याविरुद्ध असणारीं आपलीं गाऱ्हाणी वरिष्ठ सरकारला सुलभतेने कळविणे लोकाना शक्य असलें व ती दूर करून घेतां आलीं म्हणजे असंतोषामुळे निर्माण होणारीं राज्यक्रातीचीं कारणेच नाहींशी होतात याच्या उलट, जेथे मुद्रणस्वातंत्र्य मुळींच असत नाहीं व म्हणून गाऱ्हाणी कळविलीं जात नाहींत व दूर होत नाहींत, तेथे मात्र असंख्य राज्यक्रात्या जगांतील सर्व विभागात झाल्या आहेत आणि सरकारने शस्त्रबलानें क्रातीचे प्रयत्न थाबवून धरले, तरी लोक बड करण्यास नेहमींच सज्ज राहतातच "* आधुनिक लोकसत्ताक राज्यशास्त्रातील हा तात्त्विक सिद्धान्त मन्रोप्रभृतींना माहीत नव्हता असे नाहीं. पण आपले साम्राज्य हे परकीय असून लोकांना खरे मुद्रणस्वातंत्र्य मिळाल्यास ते प्रथम या राज्याचा नाश करण्यास उद्युक्त होतील व मग आपल्या अतर्गत सुधारणाचा विचार करतील, अशी त्याना भीति वाटत होती, पण इंग्लिश विद्येच्या प्रसाराने जेव्हा येथील सुशिक्षित लोकांना आपण आपल्या देशाचे राज्य करण्यास सर्वस्वीं नालायक आहो हे ज्ञान (?) झाले, तेव्हा त्यांना मुद्रणस्वातंत्र्य देण्यात कोणताच धोका नाहीं, उलट त्यामुळे साम्राज्य अधिकच बळकट होईल, हे मेटकाफ याचेच मत आधिक खरे ठरलें ! ब्रिटिश विद्येच्या प्रसाराने पहिलें जें कार्य केले, त्याचा केवळ राष्ट्रीयत्वाच्या राजकीय दृष्टीने विचार केल्यास, ते राष्ट्रीयत्वास कांहीं काळ तरी मारक झाले, हे सर्वांसच मान्य करावे लागेल.

इंग्लिश विद्येच्या संस्काराने व ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या प्रोत्साहनाने जो सर्वांगीण सुधारकवर्ग एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात आपल्या देशात निर्माण झाला, त्याने धार्मिक व सामाजिक बाबतींत अनेक महत्त्वाचीं कार्यें केलीं असलीं, तरी आम्ही आमच्या देशाचा राज्यकारभार करण्यास नालायक आहो ही भावना लोकातून दूर न करतां त्यानें ती आधिकच फैलाविली त्यामुळे स्वतंत्र वृत्तपत्रकाराचे पहिलें कर्तव्य म्हणजे आपल्या मातृभूमीचें राजकीय दास्य नष्ट करणें, या मन्रोच्या सिद्धांतास

---

* Indian Speeches and Documents on British Rule P 21 by J. K. Mujumdar.

हरताळ फासला गेला. आमच्या समाजांत आमूलाग्र धार्मिक व सामाजिक क्रांति झाल्याखेरीज आम्ही राज्य करण्यासच अपात्र आहो व म्हणून तोपर्यंत इग्रजाचेच दास्य आम्हीं केले पाहिजे, या शिकवणुकीला कंटाळूनच एकोणिसाव्या शतकाच्या चवथ्या चरणांत राष्ट्रीयत्वाची निर्मिती करू इच्छिणाऱ्या विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं "आमच्या देशास कांहीं एक झाले नाहीं त्याची नाडी अद्याप साफ चालत असून शरीरप्रकृतीस म्हणण्यासारखा कांहीं एक विकार नाही"‡ असे ठांसून सागून लोकात राष्ट्रीयत्वाचा स्वाभिमान जागृत करण्यास सुरुवात केली यांतूनच पुढे 'आधी राजकीय कीं आधीं सामाजिक सुधारणा' हा वाद निघाला आणि राष्ट्रीय पक्षाला सामाजिक सुधारणाच नको असा प्रवाद उत्पन्न झाला. त्याला योग्य कारणेहि होतीं तसेच सामाजिक सुधारणेला विरोध करण्यात महाराष्ट्रातील राष्ट्रीय पक्षाने अतिरेक केला, हेहि आतां निःपक्षपाती दृष्टीने मान्य करावे लागेल तथापि, आयुष्याच्या अखेरीस लोकमान्यानी राष्ट्रीय पक्षाचे सामाजिक सुधारणेसबधींचे धोरण म्हणून जे एके ठिकाणीं लिहिले आहे, ते अद्यापीहि मननीय असेच वाटते "स्वाभिमान, हुरूप, स्वराज्यनिष्ठा हाच राष्ट्राचा खरा जीव होय आणि हा जिवतपणा जेथे वसत आहे त्या ठिकाणीं सुईच्या मागे जसा दोरा, तद्वत् सामाजिक सुधारणाहि मागोमाग येत असतात अशी इतिहास साक्ष देत आहे म्हणून राष्ट्रीय पक्ष राजकीय चळवळीस जितकें महत्त्व देतो, तितके सामाजिक चळवळींस देत नाहीं राष्ट्राची सामाजिक प्रगति होऊं नये असे त्याचे म्हणणे नाहीं, पण ती राजकीय प्रगतीच्या व स्वाभिमानाच्या अनुषगानेच झाली पाहिजे राजकीय परवशता फार तर मुळमुळीत विरोधाने स्वीकारून जिवत सुधारणा होणेच शक्य नाहीं, असे राष्ट्रीय पक्षाचे तत्त्व आहे"*

असो कोणीं काय केले असतें तर काय झाले असते, हा प्रश्न सोडून दिल्यास इग्लिश विद्येनें सुशिक्षित झालेले लोक हे एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात ब्रिटिश साम्राज्याचे प्रामाणिक प्रचारक बनले आणि राजकीय स्वातत्र्याचा प्रश्न अतिभविष्यकालावर सोपवून सामाजिक व धार्मिक सुधारणाचे ककण हातांत बाधून राष्ट्रनिर्मितीच्या कार्यास लागले, पण यात आश्चर्य मानण्यासारखे असें काहीच नाहीं हिंदी राष्ट्राची सस्कृति जगाच्या सस्कृतीहून निदान दोनतीन शतके मागें पडली होती आणि हे अंतर तोडून टाकण्याची सधि आता आपणास लाभली, अशी कल्पना त्या वेळच्या सुशिक्षित मध्यमवर्गास सुचली सोळाव्या शतकापासून युरोपांत ज्या नव्या नव्या राजकीय, सामाजिक व धार्मिक कल्पना निघाल्या, त्या सर्व कल्पना येथें इग्लिशांचे राज्य झाल्याबरोबर या देशांत आल्या या कल्पना आत्मसात् केल्याखेरीज आपणास स्वतंत्र राष्ट्र म्हणून जगात नादणें शक्य नाहीं, अशी या सुशिक्षित लोकांची

‡ आमच्या देशाची स्थिति अक ८३ वा. पृ २९१ (मूळ निबधमाला).

* लो टिळकाचे केसरीतील लेख. भाग ३ रा. पृ ४३६.

प्रामाणिक समजूत झाली व म्हणूनच ते या उद्योगास लागले. ब्रिटिश राज्यकर्ते परकीय असून त्यांच्या राज्यामुळे होणाऱ्या आर्थिक हानीची कल्पना या लोकांना त्या वेळीं बरोबर नव्हती. आपल्या देशांतील सरदार, जहागिरदार आणि विद्वान् गणले जाणारे शास्त्रीपडित हे राष्ट्राचे नेतृत्व करण्यास नालायक आहेत, हे त्यांना स्पष्ट दिसत होते, पण स्वतः राजकारणात उडी घेऊन राष्ट्रीय स्वातंत्र्याचा मार्ग जनतेला दाखवून देण्यास लागणारा आत्मविश्वास अद्यापि या वर्गात निर्माण व्हाव-याचा होता व तो झाल्याखेरीज त्याच्या हातून राजकारण करण्यास लागणारा त्यागहि घडणे शक्य नव्हते तसेच इंग्लिश विद्या सपादन केली अथवा थोडाफार व्यापार करण्यास सुरुवात केली, तर ब्रिटिश सरकारची नोकरी आणि ब्रिटिश व्यापाऱ्यांची दलाली करून आपणास सपन्नता प्राप्त होते असा अनुभव या वर्गातील लोकांना येत होता आपल्या देशातील सरजामदारवर्गाचे युग सपले, आतां व्यापारी मध्यमवर्गाचे युग सुरू झाले, यातूनच आपल्या देशात ज्ञानवृद्धि व धनवृद्धि होऊन इंग्लडप्रमाणे इकडे सर्व सुधारणा होतील, अशी आशा या वर्गाच्या मनात उद्भूत झाली होती व त्याला हाताशीं धरूनच आपल्या साम्राज्याला खरी बळकटी येईल अशी आशा ब्रिटिश मुत्सद्द्याना वाटू लागली होती पेशवाई बुडाली त्या वेळीं बंगाल इलाख्यांत असा वर्ग निर्माण झाला होता व याच वर्गाचा राज्यकारभारात हळूहळू प्रवेश करवून द्यावा, हे धोरण मन्रो-एल्फिन्स्टन यांनी या वेळीं स्वीकारले किंवा पुरस्कारिले, आणि ते उघड्या डोळ्यानी पुरस्कारिलें आज आपण या लोकांना खालच्या खालच्या अधिकाराच्या जागा दिल्या, तरी पुढे ते सर्वच राज्यकारभार आपल्या हातीं घेण्याचा प्रयत्न करतील हे त्याना पूर्णपणे माहीत होते, पण आपले साम्राज्य स्थिर करण्यास याहून दुसरा कोणताहि अधिक परिणामकारक उपाय नाहीं, हेंहि त्याना माहीत होते व म्हणून या धोरणास विरोध करणाऱ्या आपल्या देश-बाधवांच्या आक्षेपांना ते फारसें महत्त्व देत नसत इ स १८२४ मध्ये कोर्ट ऑफ डिरेक्टराकडे पाठविलेल्या आपल्या शिक्षणविषयक पत्रकात एल्फिन्स्टन म्हणतो :

"असा आक्षेप घेण्यात येईल, कीं आम्हीं जर एतद्देशीय लोकांना शिक्षण देऊन आमच्या बरोबरीच्या दर्जावर आणिले आणि राज्यकारभारात त्याना वाटा देत गेलो, तर आम्ही त्यांना जे स्थान देऊ त्यावरच ते संतुष्ट राहणार नाहींत, किंबहुना, सर्वच राज्यकारभारावर आपला हक्क शाबीत केल्याखेरीज ते स्वस्थ बसणार नाहींत अशी भीति बाळगण्यास बरींच कारणे आहेत हे नाकारतां येणार नाहीं; पण दुसरे कोणतेहि धोरण आखून आपणांस अधिक शाश्वती लाभेल असे मला वाटत नाहीं. आम्ही जर एतद्देशीयांना दडपून खालीं ठेवण्याचाच प्रयत्न केला, तर त्यांच्या प्रतिकारानेच आमचें राज्य उलथून पडेल आणि अशी आपत्ति ही वर उल्लेखिलेल्या आपत्तीपेक्षां अधिक भयकर आणि अधिक अकीर्तिकर अशी होईल या झटापटींत आम्हांस यश आले, तरी आमचें साम्राज्य लोकाशी एकजीव झालेले

नसल्यानें तें परकीय स्वारीने किंवा आमच्याच वंशजांच्या बंडाने उलथून पडण्याचा संभव आहे आमच्या कीर्तीच्या दृष्टीनें व हिताच्या दृष्टीने विचार केला, तसेंच मानवजातीच्या कल्याणाच्या दृष्टीने विचार केला, तरी ज्या लोकांच्या हितासाठीं या सत्तेचा ठेवा आमच्या हातीं आला आहे, त्यांच्याच हाती तो परत द्यावा, हेच ती सत्ता परकीयांनीं हिसकावून घेण्यापेक्षां किंवा आमच्यांतील मूठभर वसाहतवाल्यांनीं जन्मसिद्ध हक्क म्हणून आपल्या हातीं घेण्यापेक्षां अधिक चांगलें आहे."*

मुद्रणस्वातंत्र्य आणि अधिकाराच्या जागा यांच्याप्रमाणें पाश्चात्य शिक्षणाचा प्रवेश करीत असतांनाहि अशा प्रकारची चर्चा ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं केलेली आहे ब्रिटिश विद्येचा प्रसार करण्याने भावी कालांत आपले राज्य नष्ट होणार असले, तरी त्यामुळेंच आज आपल्या साम्राज्यास बळकटी येईल आणि पुढे जेव्हां आपले साम्राज्य नष्ट होईल, तेव्हां निदान आपला व्यापार तरी कायम राहील व आपल्या देशांतून या देशात येऊन राहिलेले वसाहतवाले सुरक्षित राहतील, हे जाणून व सर्व परिणाम लक्षांत घेऊन त्यांनीं आपले वरील धोरण आंखिले सरंजामी युगातून नुकतेच बाहेर पडत असलेले हिंदी राष्ट्र लोकसत्ताक राष्ट्र बनण्यास आणि आपल्या उपदेशाने निर्माण झालेला सर्वांगीण सुधारकवर्ग राजकीय चळवळी करूं लागण्यास शेदीडशें वर्षें जावीं लागतील अशी ब्रिटिश मुत्सद्द्याची त्या वेळची कल्पना होती इतक्या काळानतर कदाचित् आपण स्वीकारलेल्या धोरणामुळे आपल्या साम्राज्यावर अंतर्गत सकट आले, तरी त्याचा विचार व्यवहार्य राजकारणाच्या दृष्टीनें करण्याची त्यांना गरज नव्हती· तात्कालिक परिणामाच्या दृष्टीने एतद्देशीय लोकाना सुशिक्षित करावें, त्याना अधिकाराच्या जागा देऊन त्यांचें साहाय्य राज्यकारभारात अधिकाधिक घेत जावे आणि त्यांना मुद्रणस्वातंत्र्य देऊन त्या स्वातंत्र्याचा उपयोग सामाजिक व धार्मिक सुधारणांकडे करावयास प्रोत्साहन द्यावें, हेच धोरण इतर कोणत्याहि धोरणापेक्षां अधिक हितप्रद आहे असे एल्फिन्स्टन, मन्रो व माल्कम यांच्या काळात ब्रिटिश मुत्सद्द्यानीं पुरस्कारिलें आणि बेंटिंक व मेटकाफ या गव्हर्नर जनरलांच्या कारकीर्दीत या धोरणाची मुहूर्तमेढ उघडपणें रोवण्यांत आली तत्कालीन सुशिक्षित हिंदी लोकाना हे धोरण आकर्षक वाटले व त्यामुळे ते ब्रिटिश साम्राज्याचे चहाते व पुरस्कर्ते बनले. जे संस्थानिक, जहागिरदार व सरदार ब्रिटिशांचे प्रभुत्व मान्य करून पारतंत्र्यांत राहण्यांत सुख मानीत होते, त्यांनाहि प्रेमाने व आदराने वागवावें असे एल्फिन्स्टन व माल्कम याचे धोरण होते त्यामुळें हा वर्गहि आपले पूर्वीचे स्वातंत्र्य गेल्यामुळे असतुष्ट असला, तरी त्या स्वातंत्र्याबद्दल बड करण्यास उद्युक्त होण्याचा संभव नव्हता. तात्पर्य, हिंदी सैनिकानीं बंड केलें तर आपली सत्ता डळमळणार अशी भीति ब्रिटिशांना असली, तरी सामान्य जनतेनें अगर संस्थानिकानीं अशा बंडखोर सैनिकाचें नेतृत्व करू नये, उलट, तसे बंड झाल्यास तें दडपून टाकण्यासच सामान्य जनतेने

* Mount Stuart Elphinstone by J. S. Cotton, P. 189.

व संस्थानिकांनीं आपणांस साहाय्य करावें, असे धोरण त्यांच्याशीं वागण्यांत ब्रिटिशांनीं स्वीकारिलें होतें. या धोरणात त्या वेळच्या हिंदी जनतेच्या भावनांचा विचार करून त्यांनीं लोकांच्या धर्मभावनास धक्का लावावयाचा नाहीं, या तत्त्वाला फार महत्त्व दिलेले होतें या सर्व धोरणांचा उपयोग त्यांना १८५७ सालच्या लष्करी बंडाच्या वेळीं झाला

## उदार धोरणाचें यश

ईस्ट इंडिया कंपनीकडून राजसत्ता काढून घ्यावी असा विचार ब्रिटिश मुत्सद्द्यांनी १८५७ च्या बंडानंतर चालविला होता, तेव्हां तसे न करण्यासबंधीं एक विनतिअर्ज कंपनीने ब्रिटिश राजाकडे केला होता. हिंदी लोकांच्या धर्मभावनास धक्का न लावण्याच्या आणि राजसत्तेमार्फत धर्मांतरास प्रोत्साहन न देण्याच्या आपल्या धोरणास व त्यांच्या इष्ट परिणामांस उद्देशून कंपनी आपल्या अर्जात म्हणते :

"आमचें या बाबतीतील धोरण यशस्वी झाले आहे, याचा पुरावा पुढील गोष्टीवरून मिळाला आहे आपल्या धर्मास धोका येईल या निराधार भीतीमुळें जें लष्करी बंड झाले असे म्हणतात, त्या बंडाच्या वेळीं हिंदी संस्थानिक आणि हिंदी जनता हे ब्रिटिश सरकारशी राजनिष्ठ राहिले. जर हिंदी संस्थानिकांनीं हे बंड मोडण्यास साहाय्य करण्याऐवजीं त्याचे नेतृत्व स्वीकारिलें असते किंवा सामान्य जनता या बंडात सामील झाली असती, तर या नुकत्याच घडून आलेल्या घडामोडींचा परिणाम निराळाच झाला असता, हे आपल्या अर्जदारांनीं सांगण्याची गरज नाहीं. तसेंच धर्मांतराच्या चळवळीशीं ब्रिटिश सरकार तादात्म्य पावत आहे अशी शंका घेण्यास जर खरोखर आधार असता, तर या दोन्ही गोष्टी घडून येण्याचा किती संभव होता तेहि सांगण्याची आवश्यकता नाहीं."[१]

या बंडाच्या वेळीं कलकत्त्यातील "संवादभास्कर" या नावाच्या सुप्रसिद्ध वृत्तपत्रात लोकांनीं सरकारला मदत करावी, यासंबधीं लिहिलेल्या लेखात पुढील विचार प्रकट झाले आहेत :

"आम्हीं ज्या आपत्तीचा उल्लेख केला आहे ती कोणत्याहि परराष्ट्रीय युद्धांतून उद्भवलेली नाहीं, तर सरकारने पोसलेल्या व रक्षिलेल्या लष्करातीलच सैनिकांच्या बंडापासून उद्भवली आहे हे सैनिक आपल्या स्वामीविरुद्ध गुप्तपणें लढत असून त्यांची सत्ता खणून काढीत आहेत. अनेक ठिकाणीं त्यांनी शस्त्रे उचललेलीं आहेत. अशा आपत्कालीं सरकारने काय करावे ? प्रजाजनांचें रक्षण करावे, कीं जेथें संकट आलें आहे तिकडे आपले सैन्य पाठवावें ? जे सैनिक राज्याचे रक्षण करीत असत, तेच त्याविरुद्ध शस्त्र घेऊन उठले आहेत, म्हणून आपल्या सुरक्षिततेला धोका उत्पन्न झाल्यामुळें सरकार आपल्या मित्रमंडळीकडे मदतीची व पाठिंब्याची याचना करीत

[१] Pitition of the East India Company, 1857

आहे तरी सर्व राजनिष्ठ प्रजाजनांनीं या हांकेस उत्साहाने व कळकळीनें 'ओ' दिली पाहिजे या शहरांत व त्याच्या आसपास राहणाऱ्या व्यापाऱ्यानीं आणि मळेवाल्यांनीं सरकारने विनति करण्यापूर्वीच शस्त्रास्त्रे जमवून व इतर तयारी करून तशी आपत्ति उद्भवलीच तर सरकारच्या बाजूने लढण्याची व आपली सर्व शक्ति वेचून त्याचे रक्षण करण्याची सज्जता केली आहे अशा प्रकारे त्यांनीं आपली राजनिष्ठा व्यक्त केली आहे अशा आणिबाणीच्या प्रसगीं एतद्देशीय धनिकांनीं सुद्धा सरकारच्या सेवेत पुढाकार घ्यावयास नको काय ? . या शहरातील सधन व श्रीमत लोकांनीं या राजधानीच्या सरक्षणाची व सुरक्षिततेची जबाबदारी आपणावर घेतली, तर त्या कामीं गव्हर्नर जनरलला जो काळजीचा भार वाहावा लागत आहे तो हलका होईल जर शहरांत शिरणाऱ्या प्रत्येक रस्त्याच्या तोंडावर नागरिकानीं आपले शिपाई उभे केले, तर बडखोर शिपाई कोणत्या मार्गानी आंत येतील ? कोणत्याहि बाजूने त्यानीं प्रवेश करण्याचा प्रयत्न केला, तरी त्यांना विरोध करून त्याचे तुकडे तुकडे करता येतील

"जर स्वतः लोकच एकी करून सरकारच्या बाजूने शस्त्रे घेऊन उठतील, तर असंतुष्ट व बडखोर शिपाई काय करू शकतील ? जरी शस्त्राची उणीव भासली, तरी लाठ्या व दगड यांची वाण खात्रीने पडणार नाहीं लाठ्या घेऊनसुद्धां बडखोर शिपायाची डोकीं फोडून त्यांना लोक चुरडू शकतील हे येणारें सकट जर फार गभीर स्वरूपाचें वाटले नसते, तर महाराजे शिंदेबहादूर, पतियाळाचे महाराज आणि जेहूदचे राजे यानी आपली सैन्ये पाठवून सरकारच्या रक्षणासाठीं अग्रभागी उभीं केली नसतीं. अशा आणिबाणीच्या वेळी धनिक ब्रिटिश प्रजाजन काय करीत आहेत ? सर्वांच्या हिताला प्रत्येकानें आपला हातभार लावावा ज्या वेळीं रामचद्रानीं समुद्रावर सेतु बांधिला, तेव्हा खारीनींसुद्धा त्याना मदत केली. ब्रिटिश सरकारच्या अमलात आम्हास जवळजवळ पूर्ण स्वातत्र्य उपभोगावयास मिळत आहे मुसलमानांच्या अमदानींत लोकाना इतकी सुरक्षितता होती काय ? ब्रिटिश लोकांनीं आम्हाला ज्ञान दिले आहे आणि सुखाने व सुरक्षितपणे जगणे शक्य केले आहे रात्रीं सुद्धा जेव्हा आम्ही झोपेत गढलेले असतो, तेव्हाहि चौकीदार व पहारेकरी आमच्या जीविताची व वित्ताची काळजी घेत असतात रामराज्याखालीं आमचे पूर्वज कशा स्थितींत होते, त्याचें आमच्यापाशी दृश्य प्रमाण काहींच नाहीं, पण आजपर्यंत सर्व लोक त्याचे वर्णन करीत आले आहेत रामराज्यापेक्षा ब्रिटिश राज्यात काहीं उणे असले, तरी त्यापेक्षा हे कमी प्रतीचे आहे असे निर्विवाद म्हणता येणार नाही या देशांतील ब्रिटिश अमदानीचे वर्णन करावयाचे झाल्यास दुसरे एक महाभारतच लिहावे लागेल पण हे कार्य अगावर न घेतां आपल्या सरकारवर सकट ओढवले असता लोकांनीं त्यास मदतीची शिकस्त करावी, एवढे स्मरण देऊन आम्ही स्वस्थ बसतो"*

---

* Indian speeches and Documents on British Rule by J. K Mujumdar, P 61.

पेशवाई बुडाल्यापासून १८५७ सालच्या बंडापर्यंतच्या काळांतील एकदर चाळीस वर्षांत हिंदी लोकांची कशी स्थिति होती, त्याचें वर्णन कै राजवाडे पुढीलप्रमाणे करितात :

"ह्या कालांत तंजावर, सातारा, इंदूर, धार, ग्वालेर, बडोदे, पुणे, कोल्हापूर, नागपूर, बुंदेलखंड वगैरे स्थळीं असणाऱ्या संस्थानांत मोठमोठ्या क्रांत्या झाल्या, कित्येक संस्थानें सपशेल बुडून गेलीं, कित्येकांचें स्वातंत्र्य संपुष्टात आलें आणि कित्येक जमीनदाराच्या स्थितीला येऊन पोचलीं महाराष्ट्रांतील लोकस्थितींतहि मोठें परिवर्तन झालें, लढवय्ये लोक घरीं बसले, प्रजा निःशस्त्र झाली, पांढरपेशा लोकांचा धंदा गेला, व्यापारीवर्गाचा व्यापार बुडत चालला; शिल्प्याचा रोजगार बसत चालला, सोनें पश्चिमेकडे धाव घेऊं लागलें, शेतीवर सर्व लोकांचा उदरनिर्वाह होण्याचा दुर्धर प्रसंग आला, भटाभिक्षुकांची मिळकत बंद झाली, शास्त्रीपंडित निराश्रित झाले, सारांश, सर्व दर्ज्यांच्या लोकांत चलबिचल झाली, परंतु समाजांत होत चाललेल्या या अफाट क्रांतीची परीक्षा करून ती थोपविण्याचें कोणीच लक्षांत आणिलें नाहीं तत्कालीन समाजाचें चरित्र, समाजाच्या धडपडीचा कार्यकारणसंबंध अथवा समाजाचें शास्त्र व समाजाचें तत्त्वज्ञान ह्यांपैकीं एकाचाहि पत्ता ह्या चाळीस वर्षांत नव्हता विचारी व तत्त्वजिज्ञासु जे एकदेशी साधुसंत व विरक्त, ते संन्यासाच्या अभ्यासांत गर्क झाले होते आणि प्रपंचाची धडपड करणारे राजे, संस्थानिक, व्यापारी, उदमी, मुत्सद्दी व कारकून तत्कालीन धडपडीचा अर्थ न कळल्यामुळें कोठें तरी व कसें तरी मोहानें अंध होत्साते प्रपंचाचें, समाजाचें व राष्ट्राचें गाडें हाकीत होते. 'विवेकभ्रष्टानां भवति विनिपातः शतमुखः।' आपण करतों आहों काय व चाललों आहों कोठें, ह्याचा ज्यांना नीट उलगडा करण्याची आवश्यकता भासली नाहीं, त्या मोहान्ध लोकांना राष्ट्र कोठलें, प्रपंच कसचा व इतिहास काय करावयाचा ?

"अशी स्थिति शके १७७९ (इ. स १८५७) पर्यंत होती. तिचा अंत १७७९ व १७८० तील ज्वालामुखीसदृश धडपडीनें झाला ही धडपड संन्यस्त, तत्त्वज्ञानी व अविचारी हिंदु-मुसलमान पुढारी यांनीं बंगाल्यांतील शिपायांच्या साहाय्यानें केली काल्पनिक तत्त्वज्ञानाचा व सुयंत्रित शास्त्राचा हा झगडा होता पहिल्याचे पुरस्कर्ते हिंदु-मुसलमान पुढारी होते व दुसऱ्याचे पाश्चात्य लोक होते त्यांत सुयंत्र शास्त्राचा विजय झाला ही धडपड चालली असतां हिंदुस्थानांतील, पंजाबांतील व कर्नाटकांतील राजेरजवाडे, महाजन व सामान्य लोक साशंक वृत्तीनें कांहीं काल तटस्थ राहून शेवटीं विजयी पक्षाला मिळाले ! हलक्या, कुलहीन व उपटसुंभ अशा लहानमोठ्या शिक्षित व अल्पशिक्षित परराज्यसेवकांचा जो नवीन वर्ग बनला, किंवा खरें म्हटलें असतां बनविला होता, तो विजयी होणाऱ्या व झालेल्या सुयंत्र पक्षाकडेच प्रथमपासून होता त्याच्या शिक्षणांत स्वराष्ट्र, स्वसमाज वगैरे शब्दच नव्हते. बंगाल, राजपुताना व महाराष्ट्र ह्या तीन प्रांतांतील कित्येक

बडे नोकर लोक असे सांगतात, कीं शके १७७९ तील ह्या प्रचंड धडपडीचा अर्थच कळण्याची आपली ताकद नव्हती, मग स्वपक्ष किंवा परपक्ष घेण्याची किंवा टाकण्याची बाब दूरच राहिली! जुन्याच्या अभिमानाने व स्मरणाने येणारा सहजत्वेषहि ह्या कुलहीन, राष्ट्रहीन व समाजहीन लोकांच्या ठायीं नव्हता."‡

१८५७ सालच्या बंडासारख्या प्रसंगीं ब्रिटिश सत्तेच्या मर्मावर आघात झाला असतांहि त्याचा फायदा घेऊन स्वतंत्र राष्ट्रनिर्मिती करण्याचे सामर्थ्य व ज्ञान हिंदुस्थानांतील कोणापाशींहि नव्हते असे सिद्ध झाल्यानंतर हिंदुस्थानांतील राष्ट्रीयत्वाच्या अभावाचा आणखी दुसरा पुरावा आणि ब्रिटिश मुत्सद्द्याच्या धोरणाच्या यशस्वितेची दुसरी साक्ष देण्याची गरज नाहीं या आपत्तीतून ब्रिटिश राज्य कसे पार पडलें त्याची मीमांसा सर जॉन सीली यांनीं पुढीलप्रमाणे केली आहे :

"हिंदुस्थानातील एका जातीविरुद्ध दुसरी जात लढवूनच बहुतांशीं हे बंड मोडण्यांत आले हे तुमच्या ध्यानात येईल जोपर्यंत ही गोष्ट करणे शक्य आहे आणि जोपर्यंत आपणांवर कोणतेहि सरकार असले तरी त्याच्यावर टीका करण्याची आणि त्याच्याविरुद्ध बंड करण्याची संवय तेथील लोकांना लागलेली नाहीं, तोपर्यंत इंग्लंडांतून हिंदुस्थानावर राज्य करणे शक्य आहे व त्यांत अलौकिक असे कांहीं नाहीं, पण मीं म्हटल्याप्रमाणे जर ही स्थिति बदलली, जर कांहीं उपायानी या लोकात समरसता उत्पन्न होऊन त्याचे एक राष्ट्र बनले, जर आमचा हिंदुस्थानशीं असणारा संबंध हा ऑस्ट्रियाचा इटलीशीं संबध होता तशा प्रकारचा अल्पांशानेंहि बनला, तर तेथें आमच्या प्रभुत्वाला धोका उत्पन्न होईल एवढेच म्हणून मी थांबत नाहीं, तर यापुढे तेथें आपले प्रभुत्व टिकेल अशी आशाहि आपण त्या क्षणीं सोडून दिली पाहिजे"*

## ब्रिटिश साम्राज्याचीं मर्मस्थानें

वरील उताऱ्यांत सीली यांनीं आपल्या साम्राज्यसत्तेचीं दोन मर्मस्थाने सांगितली आहेत; एक, हिंदी लोकांतील एका जातीविरुद्ध दुसऱ्या जातीने लढण्याचे सोडून दिले पाहिजे आणि दुसरे, हिंदुस्थानांतील सामान्य जनतेला आपल्या सरकारविरुद्ध टीका करण्याची व बंड करण्याची सवय लागली पाहिजे येथील लोकात एकराष्ट्रीयत्व निर्माण झालें म्हणजे हीं दोन्ही मर्मस्थाने त्याना समजून त्यांवर ते आघात करतील. हे एकराष्ट्रीयत्व निर्माण झाले नाही तोपर्यंत केवळ लष्करी बंडानें आपले साम्राज्य नष्ट होऊं शकत नाहीं, हे ब्रिटिश मुत्सद्द्यानीं १८५७-५८ सालीं सिद्ध केले आतां हे एकराष्ट्रीयत्व निर्माण करण्याचे प्रयत्न हिंदी पुढाऱ्यांनी कसकसे केले त्याचा विचार केला पाहिजे अशा प्रकारचा पहिला प्रयत्न राजा राममोहन रॉय यांनीं हिंदुस्थानांत सर्वांगीण सुधारणावादाची जी एक विचार-

‡ ऐतिहासिक प्रस्तावना खंड ६ वा, पृ ३५३–५४.

* The Expansion of England by Seeley, p 233.

प्रणाली निर्माण केली, तिच्यांतून उगम पावला व पुढें त्याच उगमातून निघालेल्या विचारप्रणालीला नेमस्त प्रागतिक राजकारणाचें स्वरूप न्या मू रानडे या महाराष्ट्रीय पुढाऱ्यानें एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस दिलें. राजा राममोहन रॉय आणि त्यांच्या निधनानतर (इ स १८३३) थोड्याच दिवसांत पुढे आलेले आपल्या महाराष्ट्रांतील 'लोकहितवादी' प्रभृति सर्वांगीण सुधारणेचे पुरस्कर्ते यांच्या कार्याची व विचारांची माहिती आता आपणास करून घेतली पाहिजे

## ३

## सर्वांगीण सुधारणेची आधुनिक ज्ञानज्योति

"जी गोष्ट व्यक्तीची तीच देशाची खरी उन्नति व्हावयाची असेल, तर प्रथम उन्नत धर्माचा प्रसार झाला पाहिजे. राजकीय हक्क प्राप्त करून घेण्यास राष्ट्रीय सभा भरवा अथवा प्रातिक सभा भरवा, किंवा सामाजिक सुधारणा घडवून आणण्यास सामाजिक परिषद् भरवा, परतु जोपर्यंत धर्मजागृति झाली नाही, तोपर्यंत देशास ह्या खटपटीत खरे यश यावयाचें नाही प्रथम आत्म्याचीच उन्नति झाली पाहिजे"

—डॉ. रा. गो भाडारकर याचे धर्मपर लेख व व्याख्याने, पृ. ३४२-४३

"या युगाच्या आरभीं पाश्चात्य शिक्षणाने, नास्तिक व पाखडवादाची अशी भयकर लाट या देशात उसळली होती, की तिने कित्येकाच्या मताप्रमाणे लवकरच सर्व देश आक्रमून हिंदुधर्म आमूलाग्र उखडून काढला असता, परतु ईश्वराच्या अचित्य नियतीमुळे त्या वेळी राजा राममोहन हा एक अलौकिक पुरुष निर्माण झाला व त्याने एकेश्वरी पथ नामक एक नवीन लाट उत्पन्न केली, त्यामुळें पुढे येणारी आपत्ति टळली"

— श्री. सदाशिव कृष्ण फडके नवयुगधर्म, पृ. ३०.

**महाराष्ट्रांत** मराठी साम्राज्य रसातळास जाऊन आंग्लाईची स्थापना करणारी राज्यक्राति घडून येत होती आणि मराठ्यांच्या सत्तेचा किल्ला जमीनदोस्त करून पुण्यांतील शनिवारवाड्यावर ब्रिटिशाचा झेंडा फडकविणारा माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन शनिवारवाड्यांत बसून साम्राज्यवैभवाने गजबजलेला तो भव्य प्रासाद मोकळा पाहून भयाण वाटत आहे अशा प्रकारचे भाव अनुभवीत होता त्याच सुमारास बंगालमध्ये राजा राममोहन रॉय यांच्या नेतृत्वाखालीं पाश्चात्य ज्ञानानें नवी दृष्टि प्राप्त झालेले बंगाली हिंदू आपल्या धर्मविचारात व आचारात क्राति करून आधुनिक भारताची निर्मिती करण्याच्या प्रयत्नांत गुंतले होते त्यांना हिंदी समाजांत एक सर्वांगीण क्रांति घडवून आणावयाची होती आणि ती क्रांति घडवून आणण्यास आपल्या धर्मविचारांत व धर्माचारांत प्रथम क्रांति झाली पाहिजे, अशी त्यांची दृढ श्रद्धा होती.

पहिली धर्मसुधारणा, दुसरी समाजसुधारणा व तिसरी राजकीय सुधारणा अशी प्रतवारी त्यांनीं आपल्या अंतःकरणाशीं निश्चित केली होती. याचा अर्थ धर्मसुधारणेचें अंतिम शिखर गांठल्यानंतर समाजसुधारणेला प्रारंभ करावयाचा आणि तिचे शिखर गाठल्यानंतर राजकारणाची पहिली पायरी चढू लागावयाची, असा होत नाहीं. सर्वांगीण सुधारणेला विरोध करणारे आक्षेपक त्याच्या भाषणांचा व कृतींचा असा अर्थ करितात, पण तो खरा नाहीं धर्म हे समाजाचे हृदय आहे आणि त्याच्या सर्व व्यवहारात जर सुधारणा, परिवर्तन किंवा क्रांति व्हावयाची, तर प्रथमतः त्याच्या या हृदयात परिवर्तन झाले पाहिजे, किंवा डॉ भांडारकर याच्या शब्दात बोलावयाचे तर "प्रथम आत्म्याचीच उन्नति झाली पाहिजे" असे राजा राममोहन रॉयप्रभृति सर्वांगीण सुधारकांचे मत होते त्याच्या राजकीय धोरणासबंधीं कोणाचे कितीहि मतभेद असले अथवा त्यांनीं पुरस्कारिलेल्या विशिष्ट धार्मिक किंवा सामाजिक सुधारणांना कोणाचा कितीहि तीव्र विरोध असला, तरी जर कोणत्याहि समाजात सर्वांगीण सुधारणा, परिवर्तन किंवा क्रांति व्हावयाची असेल, तर प्रथमतः त्याच्या आत्म्याची उन्नति झाली पाहिजे, त्याच्या हृदयात पालट झाला पाहिजे किंवा त्याच्या धर्मविचारात, धर्मभावनांत व धर्माचारात फरक झाला पाहिजे, याबद्दल फारसा कोणाचा मतभेद होऊ शकणार नाहीं विशेषत. ज्या समाजाच्या सर्व व्यवहारावर धर्माचे नियंत्रण चालू आहे, अशा समाजाच्या सर्वांगीण सुधारणेस हा न्याय अधिकच लागू पडतो

## धर्माचें समाजांतील स्थान

प्राचीनकाळीं व मध्ययुगात युरोपीय व भारतीय अशा दोन्हीहि समाजाच्या सर्वच व्यवहारावर धर्माची सत्ता चालू होती धर्माची ही सर्वव्यापी सत्ता नष्ट करून राजकीय, आर्थिक आणि सामाजिक व्यवहाराची स्वतंत्र पृथक् शास्त्रे निर्माण करणे आणि धर्माकडे केवळ अंतरंग-सुधारणेचें किंवा आत्मिक उन्नतीचे कार्य ठेवणे हे एक आधुनिक युरोपीय संस्कृतीचे लक्षण आहे आधुनिक युरोपीय सुधारणेत सामाजिक, आर्थिक व राजकीय व्यवहाराची धर्माशीं फारकत केलेली आहे, इतकेच नव्हे, तर नीतिशास्त्राचाहि धर्माशीं व अध्यात्माशीं काहीं संबंध नाहीं, असे प्रतिपादण्यात येत आहे हीच विचारसरणी आज आपल्या देशांतहि रूढ होऊ पहात आहे, परंतु राजा राममोहन रॉय याच्या वेळीं हिंदुसमाजाची तशी स्थिति नव्हती त्या वेळचा हिंदुसमाज हा मध्ययुगीन युरोपीय समाजासारखा होता धर्मशास्त्राहून पृथक् आणि स्वतंत्र अशीं राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, समाजशास्त्र वगैरे शास्त्रे असूं शकतात, याची त्याला स्पष्ट कल्पना नव्हती. त्याच्या सर्व व्यवहारांवर धर्माची सत्ता अप्रतिहत नसली, तरी तत्त्वत. चालत होती. निदान ती तशी चालावी हेच साहजिक व इष्ट आहे, अशी हिंदी समाजाची कल्पना व श्रद्धा होती. या अवस्थेतील समाजाच्या सर्वांगीण सुधारणेला हात घालणारानीं प्रथमतः त्याच्या धर्मसुधारणेला हात घालावा, हें अगदीं

साहजिक होते. राजकीय पारतन्त्र्यात सांपडलेल्या राष्ट्राने आपल्या सर्वांगीण सुधारणेला हात घालावा, कीं प्रथम राष्ट्रीय स्वातन्त्र्य स्थापून नतर हे महत्कार्य अंगीकारावे यासंबंधीं मतभेद होऊं शकेल पण एकदां सर्वांगीण सुधारणा झाल्याखेरीज आपण अथवा आपले राष्ट्र स्वतन्त्रतेने नांदू शकत नाहीं असे गृहीत धरिलें, म्हणजे मध्ययुगीन अवस्थेतील धर्माधिष्ठित समाजाची सर्वांगीण सुधारणा करू इच्छिणारांना त्याच्या धार्मिक आचार-विचार-भावनाच्या सुधारणेला आद्यस्थान द्यावे, असे वाटणे साहजिक आहे राजा राममोहन रॉय यानीं बगालमध्ये स्थापन केलेल्या ब्राह्मसमाजाचीच महाराष्ट्रीय शाखा जो प्रार्थनासमाज, त्याचे एक अध्वर्यु डॉ भांडारकर याच्या शिरोभागीं दिलेल्या अवरतणातील दृष्टिकोण हाच आहे.

## राममोहन रॉय यांचें महत्कार्य

पण ज्यांना ब्राह्मसमाजाची धार्मिक व सामाजिक सुधारणा बहुतांशीं मान्य नाहीं आणि राजा राममोहन रॉय यांच्या विभूतिमत्त्वासबधींहि ज्यांना अवास्तव आदर असण्याचा संभव नाहीं, असे "नवयुगधर्म" चे लेखक श्री फडके याच्या-सारखे लोकहि राजा राममोहन यानीं स्थापन केलेल्या एकेश्वरी ब्राह्मसमाजाकडे कोणत्या दृष्टीने पाहतात व त्यांच्या कार्याचें कोणते महत्त्व मानतात, ते वाचकाच्या लक्षांत येण्यासाठीच या प्रकरणाच्या शिरोभागीं श्री फडके याचें अवतरण दिले आहे राजा राममोहन याचीं कोणतींच धार्मिक मते मान्य नसलीं, तरी त्यानीं जी धर्मसुधा-रणेची प्रचड लाट एकोणिसाव्या शतकाच्या प्रारभीं उठविली तिच्यामुळे, पाश्चात्य विद्येच्या सस्काराने, खिस्तधर्मी राज्यकर्त्याविषयीं वाटणाऱ्या कौतुकामुळे किंवा आदरामुळे, त्याच्या धर्माची दीक्षा घेतल्याने प्राप्त होणाऱ्या भौतिक अभ्युदयाच्या लोभामुळे, प्रबलापुढे लोटांगण घालण्याच्या हीन मनोवृत्तीमुळे, खिस्ती धर्म-प्रचारकानीं दाखवून दिलेल्या आपल्या धर्मातील खऱ्याखोट्या दोषामुळे आणि आधुनिकत्वाचा उजाळा बरीच वर्षे दिला न गेल्यानें हिंदुधर्माला प्राप्त झालेल्या हीन व अवनत स्वरूपामुळे, हिंदू लोकातील शिक्षित लोकाचा कल खिस्तीधर्माचा अगीकार करण्याकडे होत होता, तो थोपविला गेला, आणि हिंदी राष्ट्राची सर्वांगीण सुधारणा करण्यासाठीं त्याला खिस्ती धर्माची दीक्षा देण्याची आवश्यकता नाहीं, किंबहुना तसे करणे हा त्याच्या सर्वांगीण सुधारणेचा खरा मार्ग नव्हे, अशी शिक्षित लोकाची खात्री झाली

ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानांत राज्य स्थापन केले तेव्हा हिंदू लोकाच्या धर्मात हात घालू नये असे धोरण केवळ राजकीय धोरण म्हणून स्वीकारिले असलें, तरी कोणतेहि राष्ट्र किंवा समाज खिस्तीधर्माचा अनुयायी होत नाहीं, तोपर्यंत त्याला ऐहिक अभ्युदय आणि पारलौकिक सद्गति मिळणे शक्य नाहीं असा त्यांचा त्या वेळीं दृढ विश्वास होता. हा विश्वास जसा खिस्ती पाद्री वर्गात होता, तसा तो

येथें आलेल्या ब्रिटिश अधिकारी व व्यापारी लोकातहि होता फरक इतकाच, कीं मुत्सद्दी वर्गातील लोक आपल्या या विश्वासाकरिता हिंदी जनतेत आपल्या धर्माचा प्रचार करून आपल्या राज्यास व व्यापारास धोका आणू इच्छीत नव्हते. यामुळे येथील ईस्ट इडिया कपनीचे अधिकारी पाद्री लोकांच्या धर्मप्रचाराच्या उत्साहाला आंवरून धरण्याचा प्रयत्न करीत असत तसेंच ब्रिटिश मुत्सद्यापैकीं ज्याना हिदी सस्कृतीविषयीं आदर किंवा ज्ञान नव्हते, त्याना ज्याप्रमाणे हिदी लोकानीं खिस्ती व्हावें असे वाटत होते, त्याचप्रमाणे ज्या ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं अगर पंडितांनीं भारतीय संस्कृतीचे अध्ययनपूर्वक ज्ञान करून घेतले होते व ज्याना हिंदी सस्कृतीबद्दल आदर असून हिदी लोकाची सुधारणा व्हावी व अखेरीस त्यांनीं स्वतत्र व्हावे असे वाटत होते, त्यांनाहि हिंदू लोक आज ना उद्या खिस्तीधर्माची दीक्षा घेतील असे वाटत असे मात्र या प्रकारें हिंदी सस्कृतीबद्दल आदर बाळगणारे आणि एक प्रकारे तिचा दरारा वाटणारे हे मुत्सद्दी धर्मप्रचाराच्या बाबतीत पाद्री लोक ज्या साधनांचा अवलब करीत होते, त्या साधनांचा परिणामाच्या दृष्टीने निषेध करीत आणि सरकारमार्फत होणाऱ्या लोकशिक्षणाच्या प्रयत्नात धर्मप्रचाराचा प्रत्यक्ष सबध आणूं नये असे निक्षून सांगत.

## हिंदू जनता ख्रिस्ती होईल ?

फ्रेड्रिक जॉन शोअर या ब्रिटिश अधिकाऱ्याने इ. स. १८३७ सालीं लिहिलेलें " Notes on Indian Affairs " हे पुस्तक ब्रिटिश राज्याचे कृष्ण अंतरग आणि तत्कालीन हिंदी संस्कृतीची चांगली बाजू लक्षांत घेऊन लिहिलेले आहे. ब्रिटिश राज्यपद्धतीचे घोर आर्थिक परिणाम, लोकांवर होणारा अन्याय, त्यांच्यावर लादलेले जबरदस्त कर आणि लोकाना विश्वासांत न घेता, किंबहुना त्यांना तुच्छ लेखून चालविलेल्या राज्यपद्धतीमुळे तत्कालीन जनतेसहि तिच्याबद्दल वाटणारा असतोष व तिटकारा, याचे समर्पक वर्णन सदर पुस्तकांत आलेले आहे. अशा सहानुभूतिपूर्ण लेखकासहि हिदू जनता हळूहळू खिस्ती होईल असा विश्वास वाटत होता. मात्र ही गोष्ट कशी घडून येईल त्यासंबधीं त्याचे विचार पुढीलप्रमाणे होते:

" मानवी प्रयत्नापैकी पुढील साधने मुख्यतः परिणामकारक होण्याचा संभव आहे : ( १ ) आम्ही ज्या धर्माचा प्रचार करतों त्यावर आमची खरी श्रद्धा आहे व आम्ही त्याप्रमाणे वागतो हे लोकाना आपल्या उदाहरणानें दाखवून दिलें पाहिजे, (२) नव्या पिढींत शिक्षणप्रसार केला पाहिजे, (३) धर्मांतरितांचा ज्यात समावेश करता येईल असा एक वर्ग निर्माण करून ते समाजबहिष्कृत होणार नाहींत, याबद्दल दक्षता घेतली पाहिजे जर अशा साधनाचा योग्य उपयोग करण्यांत आला, तर थोड्याच वर्षात बरेच यश प्राप्त होण्याचा संभव आहे अलीकडे धर्म व जाति यांसबधींचे लोकाचे पूर्वग्रह अथवा वेडगळ धर्मसमजुती बऱ्याच शिथिल झाल्या

आहेत; त्यांच्यांत जिज्ञासावृत्ति जागृत होत आहे आणि इंग्लिश लोकांपासून पुष्कळ दूर दूर राहणारे असे लोक, शेतकरीसुद्धां अलीकडे कांहीं वर्षे धर्माधिकारी व पाद्री लोकांकडे येऊन 'आम्हांला खरोखर कांहीं धर्म आहे काय, व असला तर त्यात काय आहे' अशा प्रकारचे प्रश्न विचारूं लागले आहेत त्याच्यात शिक्षणाचा आणि नव्या विचारांचा अधिक व्यापकपणे प्रसार झाल्यानतर त्यांना आपल्या मूर्तिपूजेच्या पद्धतींतील असमजसपणा दिसू लागेल आजहि या धर्मापासून आपल्या मनोदेवतेस शाति व समाधान लाभत नाहीं असे त्याना वाटू लागले आहे हिंदूपैकीं एकादा राजा किंवा वजनदार श्रेष्ठ पुरुष कॉन्स्टटाइनप्रमाणें (धर्मांतर करण्यास) पुढे आला, तर त्याचे अनुकरण करून जनता सामुदायिक धर्मांतरास तयार होईल असे होईपर्यंत मात्र धर्माधिकारी व पाद्री लोकानी जे येतील त्याना बाप्तिस्मा देऊन धर्मांतर करण्याची विशेष उत्कटता दाखवू नये."

याच पुस्तकात या लेखकाने एकदा काशींत हिंदु-मुसलमानाचा दगा होऊन हिंदूच्या देवळात गाईचें रक्त व मुसलमानाच्या मशिदीत डुकराचें मास टाकण्याचे अत्याचार झाले, त्या वेळीं ब्रिटिशाच्या सैन्यातील ब्राह्मण जातीच्या दोन शिपायात पुढील सवाद झाल्याचे नमूद केले आहे. "अरेरे!" त्यांच्यापैकी एक शिपाई दुसऱ्यास म्हणतो, "जी गोष्ट पाहण्याचे आपल्या कधीं स्वप्नातहि आले नसेल, तीच गोष्ट आज आपणास दिसत आहे. या शिवाच्या हातातील शूल जमीनदोस्त झाला आहे, थोड्याच काळांत आम्ही सर्व एकाच जातीचे होऊं, असे झालें, तर आपला धर्म कोणता होईल बरे?" "मला वाटते, तो ख्रिस्ती धर्म असेल," दुसऱ्याने उत्तर केले. "मलाहि तसेच वाटतें," पहिल्याने पुष्टि दिली "कारण, आताच ज्या गोष्टी घडल्या त्यानंतर तरी आम्ही मुसलमान खास होणार नाहीं" या संवादाचा आधार देऊन लवकरच सर्व हिंदू ख्रिस्ती होतील अशी कल्पना या देशातील लोकात फैलावत आहे असे हा लेखक म्हणतो§ तात्पर्य, ब्रिटिश राज्यकर्त्यांनी या देशात सर्वांगीण सुधारणेची आकाक्षा जागृत केली हे खरे असले, तरी त्याबरोबर हेहि खरे आहे, कीं या सर्वांगीण सुधारणेचा परिणाम आपल्या साम्राज्यास काहीं काळ तरी बळकटी आणण्यांत होईल आणि ज्या वेळीं हिंदुस्थान स्वतत्र होईल, त्या वेळीं आपला व्यापार कायम राहील, त्याचप्रमाणे या सर्वांगीण सुधारणेचा परिणाम धार्मिक दृष्ट्या सर्व हिंदूना ख्रिस्ती बनविण्यांत होईल अशीहि त्याची कल्पना होती मात्र येथील मुसलमान लोक ख्रिस्ती होतील असे त्यांना वाटत नव्हते वर उल्लेखिलेल्या ग्रंथांत फ्रेड्रिक जॉन शोअर मुसलमानाच्या ख्रिस्तीधर्मासबधींच्या वृत्तीबद्दल लिहितो:

* Notes on Indian Affairs Vol II, p 466-67 by Hon Fredrick John Shore

§ "I believe there is a very general feeling among the people that some great crisis is at hand in their religious polity, and that the common belief is, that Hinduism will be supplanted by Christianity." Ibid, p 467

"या लोकांतील मुसलमानविभागासबंधीं विचार केल्यास, हे लोक कांहीं बाबतींत हिंदूंपेक्षां कमी दुराग्रही व असहिष्णु असले आणि त्यांच्या कल्पना अधिक उदार असल्या, तरी त्यांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याचें काम इतराना ती दीक्षा देण्यापेक्षां अधिक कठिण जाईल.. या बाबतींत मुसलमानांच्या भावना मोठ्या विलक्षण आहेत. मूर्तिपूजक म्हणून ते हिंदूंना तुच्छ लेखतात, पण ते ख्रिस्त्यांचाहि तितकाच तिटकारा करतात. कां, तर आमची येशू ख्रिस्तावर श्रद्धा आहे म्हणून नव्हे (कारण तो एक ईश्वराने प्रेरणा दिलेला मनुष्य होता असे त्यांनाहि वाटतें), तर त्यांचा धर्मपुरुष जो महंमद त्याची आम्ही भक्ति करीत नाहीं म्हणून"§

तात्पर्य, हिंदुस्थानातील हिंदू लोक ख्रिस्ती होतील अशी आशा ब्रिटिशाना वाटत असली, तरी मुसलमानासंबधीं त्याना तशी आशा वाटत नव्हती. याचें कारण असे असावे, कीं जातिभेद व मूर्तिपूजा हे आचार फक्त हिंदूतच होते व ते मुसलमानात नव्हते, यामुळे मुसलमानांना ख्रिस्तीधर्म स्वीकारण्याचे कारण नाहीं अशी ही कल्पना दिसते त्याचप्रमाणे हेहि एक लक्षांत घेण्यासारखे आहे, कीं आपली सर्वांगीण सुधारणा व्हावी म्हणून ब्रिटिशाच्या सहवासाने हिंदू लोकानीं आपल्या धर्मसुधारणेस हात घातला तसा मुसलमान किंवा पारशी धर्मीयानीं घातला नाहीं "धर्माविषयीं साधारण जागृति" या आपल्या व्याख्यानात डॉ भाडारकर म्हणतात. "(प्रार्थना-) समाजाचीं धर्मतत्त्वें अशीं आहेत, की तीं कोणत्याहि धर्माच्या मनुष्यास मान्य व्हावीं, परंतु पूर्वीपासून आपल्या हिंदू लोकाची धर्मासबधीं विशेष आस्था दिसत आहे आमच्याच प्रचलित धर्मात घाण झाली आहे असे नाहीं पारशाच्या, मुसलमानांच्या धर्मानाहि अवनत स्वरूप प्राप्त झालें आहे. पण त्यांना आपापल्या धर्माची सुधारणा करावी अशी कोठें आस्था नाहीं. हिंदूनीच ही धर्मसुधारणेची चळवळ प्रथम सुरू केली आणि सध्यां ती हिंदूपुरतीच आहे" म्हणजे ही धर्मसुधारणेची चळवळ हिंदू मुसलमान, ख्रिस्ती, पारशी अशा धर्माच्या अनुयायानीं करावी असे तिचे स्वरूप आहे, व म्हणून आपल्या ब्राह्मसमाजातून सार्वत्रिक धर्माची एक प्रचड चळवळ निर्माण होईल अशी आशा तिच्या आद्य प्रणेत्यास वाटत असली, तरी परिणामत. व वस्तुतः ब्राह्मसमाज किंवा प्रार्थनासमाज म्हणजे केवळ सुधारलेला हिंदुधर्म असेच त्याचें स्वरूप अखेरीस बनलें

## ख्रिस्ती मिशनऱ्यांना विरोध

आतां आपण राजा राममोहन रॉय यांच्या वेळच्या परिस्थितीचा त्याच्या दृष्टीनें अधिक विचार करू. या वेळीं बगालमध्ये ख्रिस्ती धर्मप्रचारकांनीं उघडपणे हिंदुधर्मावर हल्ला चढवून त्याच्यावर छिद्रान्वेषण बुद्धीनें टीकेचा जोराचा मारा

§ Ibid, p 468.

* डॉ. भांडारकर यांचे धर्मपर लेख व व्याख्यानें: पृ. १९-२०.

चालविला होता. त्यास उद्देशून ते म्हणत, "धर्मासंबधीं तटस्थता राखू हें जे ब्रिटिश सरकारचे जाहीर धोरण, त्याच्याशीं जेत्यांच्या धर्माचा उघड प्रचार करूं देणे आणि जित लोकांच्या धर्माची उघड निंदा करण्यास परवानगी देणें, हे विरुद्ध आहे दुसरें असे, कीं हिंदु व मुसलमान धर्माचीं बिंगें चव्हाट्यावर मांडण्याच्या उद्देशानेंच व्याख्यानें देणे किंवा पत्रके वाटणे हे चुकीचे आहे तिसरे असे, कीं ऐहिक अभ्युदयाचा लोभ दाखवून धर्मांतर करविणे हें अश्लाघ्य आहे. सरकारचे बंगाली प्रजाजन हे दुर्बल आणि दरिद्री आहेत इंग्रजाचे नांव ऐकिले, कीं ते भयभीत होतात अशा लोकांवर राजसत्तेच्या साहाय्यानें सक्ती करणें हें तर भयंकर निंद्य आहे" हिंदी प्रजेचा धर्म आणि संस्कृति याची हेटाळणी पाद्री लोक करीत त्यास उद्देशून ते पुढे म्हणतात, "जेते लोक जित लोकाचे आचार आणि त्यांचे धर्मविचार याची अवहेलना व उपहास करितात हे इतिहासात नमूद आहे उदाहरणार्थ, वायव्येकडील हिंदुस्थानात चेंगिझखानाने काय केलें, पूर्व हिंदुस्थानांत मघानीं काय केले, रोमन लोकाची ज्यू लोकासबधीं कोणती वृत्ति होती, तें पहा एवढेच नाहीं, ख्रिस्ती धर्माचा प्रचार अप्रत्यक्षपणें तरवारीच्या (किंवा येथें बंदुकीच्या) जोरावर केल्याचीं उदाहरणे पॅसिफिक बेटात आढळतात तेथे मिशनरी लोकाना पाठिंबा देण्यासाठीं सैनिक पाठविले होते"*. अशा प्रकारे हिंदुधर्मावरील ख्रिस्ती मिशनऱ्याच्या हल्ल्याचा प्रतिकार करणे, हे राजा राममोहन याच्या विविध अंगीकृत कार्यांपैकीं एक महत्त्वाचे कार्य होते यात शंका नाहीं पण ब्राह्मसमाज स्थापन करण्यात ख्रिस्तीधर्माचा प्रतिकार करणे, ही त्यांची मूळची प्रेरणाबुद्धि नव्हती हिंदुधर्माची सुधारणा करावी, एकेश्वरी धर्मतत्त्वाचा प्रचार सर्वत्र करून सर्व धर्मांचे अंतरंग एकच आहे हे दाखवून द्यावे आणि जगातील धर्मभेदाचा अंधार नष्ट करणाऱ्या सार्वत्रिक विश्वधर्माच्या सूर्याचा प्रकाश सर्वत्र पसरवावा, अशी त्याची थोर महत्त्वाकांक्षा होती

"ज्याप्रमाणे विशिष्ट शरीरातील जीवात्मे त्या शरीरास चैतन्य देऊन त्याचें नियमन करितात, त्याचप्रमाणे अखिल विश्वरूप समष्टिशरीराला चैतन्य देऊन त्याचे नियंत्रण करणाऱ्या एका सत्तत्त्वाची आम्ही आराधना करतो ही आमची श्रद्धा आमच्या धर्मातील आधुनिकांनीं जरी सोडून दिली आहे, तरी ती पवित्र वेदान्तातील प्राचीन धर्मास अनुसरून आहे आम्ही सर्व प्रकारच्या मूर्तिपूजेचा त्याग करतो, मग ही मूर्तिपूजा कोणत्याहि कोटिबाजपणाच्या बुरख्याखालीं लपलेली असो ती एकाद्या कृत्रिम किंवा नैसर्गिक पदार्थाच्या पूजेच्या रूपाने चालू असो किंवा एकाद्या काल्पनिक वस्तूच्या आराधनेच्या रूपानें नांदत असो परमेश्वराला वंदन करण्याचे आमचें एकच साधन म्हटलें म्हणजे भूतदया किंवा परस्परांशीं परोपकारबुद्धीनें वागणें हेंच होय. एकाद्या मंदिरात अगर व्यासपीठावर (पुलपिटवर)

* Raja Ram Mohan by Nalin C. Ganguli p. 69-70

हात, पाय, डोके, जिह्वा किंवा इतर जड इंद्रियांचे विशिष्ट व्यापार करणे किंवा एकाद्या विलक्षण सिद्धान्तावर श्रद्धा ठेवणें हा ईशवदनाचा मार्ग आहे, असे आम्हांस वाटत नाहीं "§

जे ख्रिस्ती मिशनरी हिंदू वेदान्तावर टीका करीत आणि आपल्या धर्मातील नीतितत्त्वाबरोबर त्रयीवाद ( Trinity ) व परंपरागत विशिष्ट सिद्धान्त यावर श्रद्धा बसून लोक ख्रिस्तीधर्माची दीक्षा घेतील तेव्हांच त्यांचा उद्धार होईल असे प्रतिपादीत, त्यांना उत्तर देताना राजा राममोहन यानीं वरील उद्गार काढिले आहेत राजा राममोहन याचा वेदान्ताचा अभ्यास गाढ होता त्याचप्रमाणे त्यानीं मुसलमान आणि ख्रिस्तीधर्माच्या तत्त्वाचाहि अभ्यास केला होता त्याची धर्मजिज्ञासा फार प्रखर होती आणि त्याची बुद्धि निःपक्षपाती, निरहंकार आणि सर्वसंग्राहक होती रूढ हिंदुधर्मातील मूर्तिपूजा ही हिंदूना बौद्धिक दृष्ट्या गुलाम बनवीत आहे, परमात्म्याच्या शुद्ध स्वरूपाचा विसर पाडीत आहे, भूतदयेच्या आणि परोपकाराच्या सद्धर्मापासून त्याना दूर ठेवीत आहे आणि अनेक निष्ठुर, विषम आणि वेडगळ रूढींचे आणि आचाराचे दास बनवीत आहे, हे पाहून त्याचे अंतःकरण रूढ हिंदुधर्माविरुद्ध बंड करून उठले होतें पण याच हिंदुसमाजाचा उद्धार करण्याची 'तरफ' त्यांना उपनिषदातील वेदान्तात सांपडली होती हिंदुसमाजाची सर्वांगीण सुधारणा करण्यास त्याला ख्रिस्तीधर्माचीच दीक्षा आज किंवा उद्या दिली पाहिजे असे ब्रिटिश मुत्सद्यांना मनातून वाटत होते आणि ख्रिस्तीधर्मप्रचारक तसा उघड उपदेश करीत होते. या धर्मप्रचारकांचा उत्साह आणि त्याचा स्वधर्मासंबधींचा अहंकार आपल्या राजकारणाच्या आड येऊ नये, याबद्दल ब्रिटिश मुत्सद्दी दक्षता घेत असले, तरी ख्रिस्तीधर्म हाच खरा धर्म आहे व त्याचा स्वीकार करण्यातच हिंदू लोकाचे खरे कल्याण आहे असे त्याना वाटत होते इतकेच नव्हे, तर आपल्या धर्मप्रचारात उत्साहाचा अतिरेक झाला नाही, तर हिंदूच्या ख्रिस्तीकरणानें आपल्या राजकीय व व्यापारी साम्राज्यास स्थैर्य येईल अशीहि आशा त्यांना वाटत होती

## वेदान्त आणि धर्मसुधारणा

राजा राममोहन रॉय यानीं इ. स १८१५ सालीं वेदान्तसूत्रावरील शांकरभाष्याचें बंगाली भाषातर प्रसिद्ध केले १८१६ व १८१७ सालीं ईश, केन, मुंडक, कठ आणि माण्डूक्य या उपनिषदांचें बंगालींत भाषांतर करण्यांत आलें व त्यापैकीं शेवटचे सोडून इतरांचीं इंग्रजींतहि भाषान्तरे त्यानीं केलीं या सर्वांना राममोहन यांनीं प्रस्तावना लिहून तीं लोकांना स्वतःच्या खर्चानें मोफत वाटण्यास सुरवात केली. याच वेळीं त्यानीं ब्रह्मसूत्रभाष्याच्या आधारे 'वेदान्तसार' नावाचे एक छोटें पुस्तकहि प्रसिद्ध केलें होतें या सर्व धर्मप्रचाराचा हेतु वेदान्तातील परमा-

§ Ibid, p 77

त्म्याच्या स्वरूपासंबधींच्या शुद्ध आणि उच्च कल्पनांचा लोकांत प्रसार व्हावा आणि मूर्तिपूजा व तज्जनित मूढ धर्मकल्पना व आचार यांचा निरास व्हावा हाच होता. त्यांनीं मूर्तिपूजेविरुद्ध आणि हिंदुधर्मांतील हीन आचारविचारांविरुद्ध ही जी मोहीम सुरू केली, तीमुळें ते लवकरच खिस्तीधर्म स्वीकारतील व त्यांच्या पाठोपाठ पुष्कळ हिंदू लोक आपल्या कळपात येतील, अशी आशा काहीं मिशनरी लोकाना वाटूं लागली ते खिस्तीधर्माची उघड स्तुति करीत, येशू खिस्ताला पूज्य मानीत आणि मनुष्याच्या बुद्धीला पटेल अशा प्रकारे नीतितत्त्वाचें जितकें समर्पक विवेचन खिस्ती-धर्मात केलेले आहे, तितकें कोणत्याहि इतर धर्मात आपणांस वाचावयास सांपडलें नाहीं असे म्हणत यावरून ते लवकरच खिस्ती होतील असे त्या धर्माच्या प्रचारकाना वाटले एकदां तर (इ स १८२१) कलकत्त्यातील बिशप मिड्ल्टन यानीं राजा राममोहन यास खिस्तीधर्म स्वीकारण्याचा उघड उपदेश केला आणि खिस्तीधर्माची दीक्षा घेतल्याने ऐहिक अभ्युदयाचा मार्ग कसा सुलभ होईल, तेंहि परोपरीने समजून सागण्याचा प्रयत्न केला पण त्यानीं ही सूचना मान्य तर केली नाहींच, उलट ऐहिक अभ्युदयाचे आमिष दाखवून खिस्तीधर्माचा प्रचार करूं इच्छिणाऱ्या त्या बिशपसाहेबांचा त्यांना सताप आला, व तो त्यांनीं आवेशयुक्त वाणीनें व्यक्तहि केला. खिस्ताच्या जीवनाचा व उपदेशाचा संदेश दैवी आहे असे ते मानीत त्या थोर विभूतीचा गौरव करीत आणि त्याच्या चारित्र्यामुळे मनुष्यांच्या नैतिक उन्नतीला जितकें साहाय्य झालें आहे किंवा होण्यासारखे आहे तितकें इतर कशामुळेहि होणार नाहीं, असे त्याना वाटत असे पण खिस्ताचा देह हा दैवी होता आणि तो परमेश्वराचा प्रत्यक्ष पुत्र होता, हें खिस्तीधर्मनिष्ठांचें मत त्यांना मान्य नव्हते, याबद्दल त्याच्यावर मिशनऱ्यांचा रोष होता तरी आपल्या या मताचा प्रचार ते खुद्द मिशनरी लोकांतहि करीत इ स १८२१ याच सालीं ते रे विल्यम् येट्स आणि रे. विल्यम् या दोन मिशनऱ्याच्या सहकार्याने बायबलचें बगाली भाषान्तर करीत होते हे करीत असता त्यांनीं आपले वरील मत या दोन मिशनऱ्यांना बुद्धिवादाने पटवून दिलें व त्यानींहि तशी प्रांजलपणें कबुली दिली ही गोष्ट त्या वेळीं खिस्तीसमाजाच्या धर्मप्रचाराच्या दृष्टीने अपूर्व होती खिस्तीधर्माचा प्रचार करण्याचे कंकण बाधून मूर्तिपूजेसारख्या धर्मवेडांत बुडून गेलेल्या हिंदू लोकांचा उद्धार करण्यासाठीं जे उपदेशक हिदुस्थानांत आले होते आणि आधुनिक बुद्धिवादाच्या कसोटीला उतरणारा असा खिस्तीधर्मासारखा दुसरा कोणताहि धर्म नाहीं असा ज्यांना अहकार झाला होता, त्यापैकीं दोन प्रसिद्ध व्यक्तींना एका हिदुधर्मसुधारकानें बुद्धिवादांत कुंठित करून मतान्तर करण्यास भाग पाडिलें, हे पाहून आधुनिक बुद्धिवादाच्या अग्नीने हिंदूंच्या धर्माचाराची राखरांगोळी करू इच्छिणाऱ्या पाद्री लोकांना चेव आला आणि त्यांनीं राजा राममोहन रॉय यांच्यावर उघड टीकास्त्र उचललें. यानतर त्यांना सनातनी हिंदूंप्रमाणें सनातनी खिस्ती मिशनऱ्यांविरुद्ध

लढावे लागलें खिस्ती मिशनऱ्यांनीं आपल्या देशांत यावे, खिस्ताच्या दिव्य उपदेशाचा प्रचार करावा, सघटित समाजसेवेचे आधुनिक मार्ग लोकांना दाखवून द्यावेत, पण औपचारिक धर्मान्तरानेच पुण्य लागते अशा आग्रहाला बळी पडून हिंदुधर्मावर एकांगी हल्ले चढवू नयेत, त्याची निर्भर्त्सना करूं नये आणि राजाश्रयामुळें प्राप्त होणाऱ्या दर्जाचा दुरुपयोग करून लोकांना इंग्रजाविषयीं वाटणाऱ्या दराऱ्याच्या दटावणीनें अथवा राजाश्रित धर्माचा अवलंब केल्यामुळे प्राप्त होणाऱ्या ऐहिक अभ्युदयाच्या आमिषानें दीनदुबळ्या हिंदूचे धर्मांतर करूं नये व उद्धाराच्या मिषानें त्यांचा अधःपात करू नये, असे त्याचे मत होते हिंदूंचा उद्धार वेदान्ताच्या आधाराने करावा, मुसलमानांचा कुराणाच्या आधारें करावा, खिस्त्याचा बायबलच्या आधारे करावा आणि असे करतां करता प्रत्येक धर्मांतील शुद्ध एकेश्वरी विचारांच्या लोकांनी परमेश्वराची उपासना करण्यास अगर तत्त्वज्ञानाची देवाण-घेवाण करण्यास एकत्र जमावे, यांतच सर्व जगाच्या उद्धाराचीं बीजे त्यांना दिसत होतीं तलवारीच्या, लोभाच्या, मोहाच्या किंवा भीतीच्या साहाय्याने धर्मांतराची मोहीम सुरू करणे आणि दुसऱ्यांच्या धर्मांची हेटाळणी करून धर्मकलह माजविणें, यांत जगाचें कोणतेहि हित नाहीं अशी त्यांची खात्री होती खिस्तीधर्माने नीतिप्रचाराच्या कामीं आघाडी मारली आहे, मुसलमानांचें देवताकांड ( Theology ) शुद्धतम आहे आणि हिंदूंच्या वेदान्तांतील तत्त्वज्ञान अत्यंत प्रगल्भ आहे, अशी त्यांची श्रद्धा होती व ती त्याच्या तिन्ही धर्मांच्या तुलनात्मक खोल अध्ययनानें दृढ झालेली होती. ब्राह्मसमाज हा कोणत्याहि ग्रंथांना ईश्वरनिर्मित मानीत नाहीं तो एक शुद्ध आणि बुद्धिगम्य असा एकेश्वरी पथ आहे हिंदूचे वेदग्रंथ परमेश्वरकृत आहेत असे न मानतांहि मूर्तिपूजेच्या उच्छेदासाठीं तो पथ त्यांचा आधार घेतो, त्याचप्रमाणे बायबल हा ग्रंथ ईश्वरनिर्मित न मानताहि त्या ग्रंथांतील तत्त्वांच्या आधारे खिस्ती लोकातील मूढ समजुती सुधारण्याचा प्रयत्न तो करू इच्छितो अशा प्रकारे सर्व धर्मांची सुधारणा करून त्याना एकेश्वरी स्वरूप देणे आणि सर्व प्रकारची व सर्व स्वरूपांतील मूर्तिपूजा नष्ट करणे हे त्यांचें ध्येय असले, तरी प्रत्येक धर्माची सुधारणा त्या त्या परंपरेत वाढलेल्या लोकांनींच करावी, असे राजा राममोहन यांचें मत असल्याने ते स्वतःला केवळ एकेश्वरी असे म्हणवीत नसून 'हिंदु एकेश्वरी' ( Hindu Unitarian ) असे म्हणवीत असत

राममोहन रॉय यांच्या धर्मसुधारणेचे धोरण दोन प्रकारचें होते. एक त्यांना हिंदु समाजांत वावरत असलेल्या बाह्य विधिविधानांच्या कर्मठपणाचे मूळच उपटून काढावयाचे होते व म्हणून त्यानीं मूर्तिपूजेवर हल्ला चढविला होता गौतमबुद्धाच्या पूर्वी यज्ञयागांचा कर्मठपणा माजला होता, तसाच त्यांच्यानतरच्या काळांत मूर्तिपूजेचा कर्मठपणा माजला. अनंत विधिविधाने, व्रतेउद्यापनें, आणि क्रियासंभार यात गुरफटून गेलें असतां अंतःकरणाची शुद्धि आणि परमात्म्याची प्राप्ति हे जे धर्माचे मूळ

उद्देश, ते एकाच बाजूस राहून धर्माला सकाम कर्माच्या बाजाराचे स्वरूप प्राप्त होते. भौतिक फलासाठीं भौतिक प्रयत्न करण्याचे सोडून मनुष्य दैववादी, आळशी व अंध बनतो आणि चमत्कार व अद्‌भुतता यांच्या पाठीमागें लागून सृष्टीच्या नियमाचे ज्ञान करून घेण्यापासून पराङ्मुख होतो. प्रत्येक धर्मसुधारकाला या सकाम व्रतोद्यापनादि धर्माच्या बाह्यांगातील क्रियासंभारावर टीका करून धर्माचें अतरंग लोकापुढें मांडावे लागत असतें भागवतधर्मी सतांनींहि मध्ययुगात हे कार्य केलेले असून वेदान्ताच्या आधारावर शुद्ध परमार्थज्ञानाचा प्रसार त्यानीं लोकांत केला. पण या मध्ययुगीन धर्मसुधारणेंत मूर्तिपूजा नष्ट करण्याचा आग्रह नव्हता आणि निवृत्तिमार्गातून प्रवृत्तिमार्गाकडे लोकाना नेण्याचाहि आग्रह नव्हता

## मायावादाचें विवेचन

राजा राममोहन रॉय यांनीं शांकरवेदान्ताच्या आधारें मूर्तिपूजादि हिदूंच्या कर्मठपणावर व तज्जन्य अंध विश्वासावर हल्ला चढविला असला, तरी शकराचार्यांच्या जगन्मिथ्यावादाचा व निवृत्तिमार्गाचा त्यानीं अवलब केला नाहीं. ते मायावाद मानीत असत व मायावादाचें समर्थनहि करीत असत, पण "माया" म्हणजे एक अव्यक्त परमात्म्याची शक्ति या अर्थानेच ते मायावादाचें समर्थन करीत. माया ही परमात्म्याची शक्ति कल्पिल्याने निर्गुण ब्रह्मवादाला थोडा गौणपणा येतो, म्हणून शांकरवेदान्ताचे साप्रदायिक अनुयायी तिला शक्ति म्हणत नाहींत, आणि या शक्तीच्या साहाय्यानें परमात्म्याने जगत् निर्माण केले असेहि मानीत नाहींत कारण त्यांच्या मते जग आणि माया हीं दोन्हीहि असत् किंवा मिथ्याच आहेत यांतूनच निवृत्तिमार्गाचा उगम होतो. राममोहन हे निवृत्तिमार्गाचे अनुयायी नव्हते व जगन्मिथ्यावाद त्यांना मान्य नव्हता 'जगन्मिथ्या' या किवा यासारख्या उपनिषदांतील वाक्याचा अर्थ जगाला परमात्म्याव्यतिरिक्त स्वतंत्र अस्तित्व नाहीं, एवढाच त्यांनीं केला आहे साराश, मूर्तिपूजादि रूढ धर्मांतील कर्मठपणावर हल्ला चढविणारे पहिले आधुनिक धर्मसुधारक म्हणून जशी त्याची ख्याति आहे, त्याचप्रमाणे वेदान्ताला प्रवृत्तिपर स्वरूप देऊन निवृत्तिपर समाजाला कर्मप्रवण बनविण्याचाहि प्रयत्न आधुनिक काळात त्यानीच प्रथम केला, याबद्दलहि त्यांची प्रसिद्धि आहे.

## भौतिक दृष्टिकोण व बुद्धिवाद

प्रवृत्तिपर वेदान्तज्ञानाबरोबरच हिंदू लोकात आधुनिक काळांत युरोपांत वाढवलेल्या भौतिक विद्येचेहि ज्ञान फैलावले पाहिजे असे त्याचें मत होतें. सस्कृतविद्येचे व वेदान्त, न्याय, मीमांसा वगैरे शास्त्रांचे अध्ययन त्यानीं केलें होते. पण आधुनिक भारताला केवळ या विद्यांचें ज्ञान झाल्याने त्याचा उद्धार होणें शक्य

नाहीं, तर लॉर्ड बेकन याच्या काळापासूनच्या ज्या भौतिक दृष्टिकोणाचा अवलंब आधुनिक युरोपने केला व ज्या भौतिक विद्याची उपासना युरोपीय लोक करीत आहेत, त्याच दृष्टिकोणाचा अवलब करून आधुनिक भारताने आधुनिक, भौतिक व सामाजिक विद्याचे अध्ययन केले पाहिजे, असे त्याचे मत होते याचसाठीं सरकार हिंदी लोकाच्या शिक्षणावर जे द्रव्य खर्चणार ते सस्कृत विद्येच्या प्रसारार्थ खर्च न करता पाश्चात्य विद्येच्या प्रसारार्थ खर्च करावे, याबद्दल त्यांनीं खटपट केली इ स. १८२३ साली लॉर्ड ॲम्हर्स्ट हे गव्हर्नर जनरल असता विलायत सरकारनें हिंदी लोकांच्या विद्याप्रसारार्थ मंजूर केलेली रक्कम कोणत्या विद्येच्या प्रसारासाठीं खर्च करावी, याचा विचार सरकार करीत होते त्या वेळीं राजा राममोहन यांनीं पाश्चात्य विद्येच्या प्रसारासाठींच ही रक्कम खर्च केली जावी, अशी विनंति करणारा अर्ज सरकारकडे पाठविला त्यातील पुढील विचार वाचल्यास पाश्चात्य विद्येच्या प्रसाराचे महत्त्व त्याना किती वाटत होते, ते लक्षात येते.

" कलकत्त्यात जी एक नवी सस्कृत पाठशाळा काढिली आहे, तीवरून हिंदी लोकाना शिक्षण देऊन त्याची सुधारणा करण्याचा सरकारचा हेतु स्पष्ट होतो सरकारच्या देणगीबद्दल लोकांनीं सदैव कृतज्ञ राहिले पाहिजे ही सस्था काढण्याची सूचना जेव्हां पुढे आली तेव्हा आम्हांस असे समजले होते, कीं हिंदी लोकांच्या शिक्षणाकडे दरसाल काही रक्कम खर्च करण्यात यावी, असा हुकूम विलायत-सरकारने केला आहे आम्हास अशी आशा वाटत होती, की या रकमेतून हिंदी लोकाना गणित, भौतिकविद्या, रसायनशास्त्र, शारीरशास्त्र व इतर ज्या शास्त्राना पूर्णत्वास नेल्यामुळे युरोपीय राष्ट्रें जगांतील लोकाच्या पुढे गेलीं आहेत, ती शास्त्रे शिकविण्यासाठीं बुद्धिमान् व विद्वान् युरोपियनांची नेमणूक करण्यांत येईल.

" तरुण पिढीला देऊ केलेल्या ज्ञानाचा अरुणोदय आतां होणार अशा मधुर आशास्वप्नात आम्ही होतो, तेव्हा आमची अंतःकरणे आनदाच्या व कृतज्ञतेच्या संमिश्र भावनांनीं भरून गेलीं होतीं आधुनिक युरोपातील शास्त्रे व कला याचे बीजारोपण आशियात करण्याची कीर्तिप्रद महत्त्वाकाक्षा पाश्चात्यांतील अत्यत उदार व सुधारलेल्या राष्ट्राच्या अतःकरणांत प्रचोदित केल्याबद्दल आम्ही परमेश्वराचे आभार मानू लागलो होतो

" पण हिंदू पडितांच्या नेतृत्वाखालीं जे ज्ञान हिंदुस्थानात आधीच प्रचलित आहे, त्याचाच प्रसार करण्यासाठीं सरकार एक सस्कृत पाठशाला स्थापन करीत आहे, असे आम्हास आढळून आले. लॉर्ड बेकनच्या काळापूर्वी ज्या प्रकारच्या सस्था युरोपांत होत्या, त्याच प्रकारची ही शिक्षणसस्था असून तिच्यामुळे व्याकरणांतील रूपभेद किंवा तत्त्वज्ञानांतील सूक्ष्म मतभेद अशासारख्या ज्ञानाचा भार तरुणाच्या बुद्धीवर लादण्याहून अधिक काहीं निष्पत्ति होण्याची अपेक्षा करता येणार नाहीं या ज्ञानाचा उपयोग स्वतः ज्याचा त्याला किंवा समाजाला कांहींच नाहीं. या ठिकाणीं

जें ज्ञान दोन हजार वर्षांपूर्वी हिंदुस्थानला झाले होते, ते आणि त्यांत त्यानतर होऊन गेलेल्या तार्किकांनी जी सूक्ष्म भेदाच्या निरर्थक चर्चेची पोकळ भर घातली आहे ती, एवढेंच विद्यार्थ्यांच्या पदरात पडेल अशा प्रकारचे ज्ञान हिंदुस्थानातील सर्व भागात आज शिकविलें जात आहे

" ज्या अर्थी हिंदी लोकांच्या शिक्षणासाठीं राखून ठेविलेली रक्कम त्याच्या सुधारणेच्या कामीं उपयोगांत यावी अशी हिंदुस्थान-सरकारची इच्छा आहे, त्या अर्थी मी असे सागण्याची परवानगी घेतो, कीं आज सुरू केलेली योजनाच पुढे चालू ठेविली तर मूळचा उद्देश पूर्णपणे विफल होईल कारण सस्कृत भाषेच्या व्याकरणातील सूक्ष्म भेदांचे अध्ययन करण्यांत तरुणाची बारा बारा वर्ष गमावण्यापासून कोणत्याहि प्रकारची सुधारणा होणे शक्य नाहीं

" त्याचप्रमाणे आत्मा परमेश्वरात कसा विलय पावतो, किंवा परब्रह्माच्या स्वरूपाशीं त्याचा संबध कशा प्रकारचा आहे, असल्या वेदातातील विषयाच्या चर्चेपासूनहि कांहीं सुधारणा होणार नाहीं तसेच सर्व दृश्य वस्तुजात हे मिथ्या आहे, माता-पिता इत्यादींना वास्तविक अस्तित्वच नाहीं, म्हणून ते प्रेम करण्यास पात्र नाहींत आणि म्हणून त्याच्यापासून आम्ही जितक्या लवकर पळून जाऊं आणि ससारांतून मुक्त होऊ तितकें उत्तम, अशासारख्या वेदान्तांतील सिद्धान्ताच्या शिक्षणापासूनहि तरुणांना समाजाचे उत्कृष्ट घटक कसें बनावे, याचे शिक्षण मिळणें शक्य नाहीं

" तसेच जगात एकदर पदार्थ किती आहेत, आत्म्याचा शरीराशी व शरीराचा आत्म्याशीं कशा प्रकारचा सबध आहे अगर आत्म्याचा श्रवणेंद्रियाशीं कसला सबध आहे, हे न्यायसूत्रातील ज्ञान सपादन करणाऱ्यानेहि आपल्या मताची उन्नति केली आहे, असें म्हणता यावयाचे नाही.

" अशा प्रकारच्या काल्पनिक ज्ञानाची उपयुक्तता कितपत आहे, याची कल्पना मेहेरबानास यावी म्हणून आपण लॉर्ड बेकनच्या काळापूर्वी युरोपात वाङ्मयाची व शास्त्राची जी अवस्था होती, तिच्याशीं त्या वेळेपासून आजपर्यंत झालेल्या ज्ञानाच्या प्रगतीची तुलना करावी, अशी मी विनति करतो.

" सत्य ज्ञानापासून ब्रिटिश राष्ट्राला दूर ठेवावे, असाच जर हेतु असता तर मध्ययुगीन पडितांची शिक्षणपद्धति काढून तिच्या जागीं बेकनच्या तत्त्वज्ञानाची स्थापना करण्यांत आली नसती (कारण) ती पद्धति अज्ञान चिरतन करण्याच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त होती त्याचप्रमाणे या देशाला अधारातच ठेवावे, असा ब्रिटिश पार्लमेंटचा उद्देश असेल, तर तसें करण्यास संस्कृत शिक्षणपद्धति अत्यत उपयुक्त आहे पण ज्या अर्थी हिंदी लोकाची सुधारणा व्हावी असा सरकारचा हेतु आहे, त्या अर्थी अधिक उदार व सुधारलेल्या शिक्षणपद्धतीचाच अवलब त्याने केला पाहिजे. यांत गणित, भौतिक विद्या, रसायनशास्त्र, शारीरशास्त्र व इतर उपयुक्त शास्त्रे यांचा समावेश असावा हे शिक्षण देण्यासाठीं युरोपांत शिक्षण घेतलेल्या विद्वान् व

बुद्धिमान् लोकांची नेमणूक या रकमेतून करावी आणि या कार्यासाठीं एक कॉलेज काढून तेथे आवश्यक ते ग्रथ, उपकरणे व इतर ज्ञानसाधनें ठेवावींत "

लॉर्ड बेकनच्या पूर्वीचें ज्ञान आणि त्यानंतरचे ज्ञान यातील फरक काय, असा जर प्रश्न केला तर त्याचें उत्तर असे द्यावे लागेल, कीं या वेळेपासून मनुष्याला आपण आपल्या ज्ञानाने सृष्टीवर प्रभुत्व चालवू शकतो असा विश्वास वाटू लागला आणि ज्ञानप्राप्तीच्या साधनांच्या दृष्टीने ग्रंथप्रामाण्यापेक्षां अनुभवप्रामाण्याला व बुद्धिप्रामाण्याला अधिक महत्त्व प्राप्त होऊ लागले वस्तुतः ग्रंथांची उत्पत्तिहि मनुष्याचे अनुभव आणि तर्क यांतूनच झाली आहे, परतु ग्रंथकारांबद्दल वाटणाऱ्या पूज्य भावातून विभूतिपूजा जन्मते आणि विभूतिपूजेचे पर्यवसान विशिष्ट ग्रंथांना परमेश्वरनिर्मित मानण्याच्या प्रवृत्तींत होते असे झाले म्हणजे ग्रंथप्रामाण्याचा अतिरेक होऊन मनुष्याची बुद्धि स्वतःच्या अनुभवानें न चालतां अथवा स्वतत्र तर्काचा उपयोग न करतां प्राचीन ग्रंथाची व त्यांतील शब्दाची दासी बनते अशा प्रकारे पुढील पिढ्यांनीं मागील पिढ्यांचे दास्य पत्करिले म्हणजे त्याच्या ज्ञानाची प्रगति खुंटते आणि मनुष्य आपल्या बुद्धीचा उपयोग फक्त शब्दाचे अर्थ करण्यातच करूं लागतो हळूहळू सृष्टीचे ज्ञान अनुभवातून व तर्कातून होते, याचे त्याला स्मरणच उरत नाहीं. आपल्या शास्त्रीपडितांची अशीच अवस्था पेशवाईचा अत होऊन ब्रिटिश राज्याची स्थापना होण्याच्या वेळीं झाली होती

या अनुभवशून्य ग्रथप्रामाण्याचे युग संपवून विवेकयुग सुरू करण्याचा मान इग्लडात लॉर्ड बेकन यास दिला जातो आपल्या इकडे ग्रथप्रामाण्याच्या युगाविरुद्ध बंड करण्याचा मान आधुनिक काळांत राजा राममोहन याना द्यावा लागेल त्यांनीं धर्मसुधारणा करीत असता वेदान्तग्रंथाचा आधार घेतला असला, तरी ते वेदाना किंवा कोणत्याच ग्रथाना ईश्वरनिर्मित म्हणून प्रमादरहित मानीत नाहींत हे लक्षात घेतले पाहिजे. ब्राह्मसमाज किंवा प्रार्थनासमाज हे ग्रथप्रामाण्यवादी नाहींत, तर ते अनुभव-प्रामाण्यवादी आहेत, ही गोष्ट अलीकडील बुद्धिवादी म्हणविणारे लोक पुष्कळ वेळा विसरतात. डॉ भाडारकर प्रार्थनासमाज अगर ब्राह्मसमाज व आर्यसमाज यातील भेद विशद करताना म्हणतात, "आतां आर्यसमाज वेद हे ईश्वरप्रणीत असे मानतो; तसे प्रार्थना अगर ब्राह्मसमाज मानीत नाहीं प्रार्थनासमाजाचा हाच सत्यपक्ष आहे. प्रार्थनासमाजाचा धर्म खुद्द देवाने उपदिष्ट व ईश्वरप्रणीत असाच आहे. मात्र तो अमुक काळीं, अमुक स्थळीं, अमुक व्यक्तीस उपदिष्ट असा नाहीं सर्वांच्या अंतः-करणांत हे धर्माचें बीज आहे आणि हें बीज ईश्वराकडून प्राप्त झालेले आहे काहींच्या ठिकाणीं ते प्रफुल्लित विकसित झालेले आढळते आणि अशाच्या उपदेशाने आणि ग्रंथाच्या योगे इतरास धर्मासंबंधानें ज्ञान होत असते अशा प्रकारें देवच आपल्या-विषयींचे ज्ञान विकसित करीत आहे आणि हा क्रम आरभापासून तो आतापर्यंत सतत चालला आहे एकाच काळीं आणि एकाच व्यक्तीस सर्व धर्म देवानें सांगितला

असे होणे नाहीं कारण धर्म हा नेहमीं विकास पावत आहे. परतु पूर्वी म्हटल्या-प्रमाणें परमेश्वर कांहीं व्यक्तींस विशेष प्रमाणाने धर्मज्ञान प्रकाशित करतो. ह्यावरून असे दिसून येईल, कीं परमेश्वर धर्मतत्त्वांचा प्रसार मनुष्यांकडूनच करीत आहे आणि मनुष्य हा परिमित शक्तीचा आहे त्याच्या दुर्बलतेमुळे अनेक वेळां सत्य एका बाजूसच राहून असत्याकडे त्याचा कल होतो ह्याप्रमाणे सर्व धर्मात सत्य आहे व असत्यहि आहे म्हणून असत्यास दूर सारून सत्यास स्वीकारण्याची तर आपली नेहमी सिद्धता असलीच पाहिजे. आपल्याच एका धर्मात सर्व तत्त्वे शुद्ध आणि सत्य आहेत आणि तीं सर्व एका काळींच प्राप्त झालीं आहेत असे नाहीं. प्रार्थना व ब्राह्म-समाजांस जीं तत्त्वें मान्य आहेत तीं सर्व वेदांत नाहींत. त्यांत बीज आहे तें पुढें उपनिषदे व गीतेंत उत्तम रीतीनें विकसित झालेले आहे"* तात्पर्य, ब्राह्म व प्रार्थनासमाज हे एकेश्वरी सप्रदाय धर्माचा उगम धर्मानुभवांतच आहे असे मानतात; तो विशिष्ट ग्रथात आहे असे मानीत नाहीत यामुळे इतर शास्त्रांप्रमाणे धर्मशास्त्रातहि ते ग्रथप्रामाण्य किंवा शब्दप्रामाण्य मानीत नाहींत. तर या विषयांतहि अनुभव व तर्क याचाच ते अवलब करितात, आणि धर्मानुभव व तर्क यांच्या साहाय्याने होणारें धर्मज्ञान एकसारखे विकास पावत आहे, असे समजतात. त्याचप्रमाणे सर्व धर्मात जसे सत्य आहे तसे असत्यहि आहे, म्हणून कोणत्याहि धर्मातील लोकांनीं आपलाच धर्म श्रेष्ठ मानू नये व सर्व धर्मांशीं समबुद्धि ठेवून सार्वत्रिक किंवा विश्वधर्माचा विकास करावा या मताचा ते अवलब करितात हिंदूंच्या वेदान्त तत्त्वज्ञानातूनच त्याना ही व्यापक व सहिष्णु वृत्ति लाभली असून ख्रिस्तीधर्मप्रचारक व मुसलमान-धर्मानुयायी यांना ती अद्यापिहि पटत नाहीं राजा राममोहन याना याचमुळे ख्रिस्ती प्रचारकाचा विरोध सहन करावा लागला हे मागें दिलेच आहे येथे एवढेच सागा-वयाचे, कीं धर्मसुधारणेंतहि ग्रथप्रामाण्य सोडून अनुभवप्रामाण्यावर आपले अधिष्ठान ठेविल्यामुळे राजा राममोहन यांना इतर शास्त्रांच्याहि प्रगतीस शब्दप्रामाण्यवादी शास्त्रीपडिताचा विरोध येतो, असे वाटणे साहजिक होते. हे बौद्धिक दास्य युरोपात बेकननतर नष्ट झाले व म्हणून तेथील लोकांनीं भौतिक विद्येत आघाडी मारली. तशीच आपल्या लोकांनीं आघाडी मारावी, या उद्देशाने त्यानीं या देशात पाश्चात्य विद्येचा प्रसार व्हावा याबद्दल अनेक खटपटी केल्या त्यांच्या सर्वांगीण सुधारणेचे हे दुसरे अग होते.

## शिक्षणविषयक धोरण

इ स. १८१७ सालीं डेव्हिड हेअर नांवाचे एक घड्याळजी व राजा राममोहन यांच्या प्रयत्नांनी कलकत्त्यांत हिंदु कॉलेज नांवाची पाश्चात्य शिक्षणसस्था निघाली. पुढे १८२४ सालीं संस्कृत कॉलेज व हिंदु कॉलेज या दोन सस्थांचे एकीकरण झाले.

* डॉ. रा. गो भाडारकर ह्याची धर्मपर व्याख्याने. पृ ३२९

संस्कृत विद्येबरोबरच पाश्चात्य विद्येचे ज्ञान देण्यांत यावे या तत्त्वाला अशा रीतीनें मान्यता मिळाली पण राजा राममोहन यांचा संबंध या संस्थेशीं ठेवण्यास सनातनी लोकांचा विरोध असल्याने राममोहन यांनी संस्थेच्या सभासदत्वाचा राजीनामा दिला पुढे १८२६ साली कलकत्त्यास आपल्या स्वतःच्या जागेत "वेदान्त कॉलेज" या नावाची दुसरी संस्था त्यानीं काढिली त्यांत हिंदु एकेश्वरीवादाच्या प्रचारासाठीं संस्कृत वेदान्ताचे अध्यापन होत असे त्याचबरोबर ख्रिस्ती एकेश्वरी पथाचें ज्ञान, पाश्चात्य भौतिक विद्या व इतर ज्ञान देण्याचाहि त्यांचा उद्देश होता मात्र हे सर्व ज्ञान बंगाली किंवा संस्कृत भाषेतूनच दिले जावे असा त्याचा कटाक्ष होता हिंदूचे वेदान्तज्ञान हे पाश्चात्य तत्त्वज्ञानापेक्षा श्रेष्ठ आहे व पाश्चात्याची भौतिक दृष्टि हिंदू-च्याहून श्रेष्ठ आहे, हे जाणून या दोहोंचा समन्वय व्हावा आणि हे सर्व ज्ञान बंगाली भाषेतून देण्यात यावे, असे त्याचें शिक्षणविषयक धोरण दिसते लॉर्ड मेकॉले यानीं लॉर्ड बेंटिक यांच्या कारकीर्दीत इ स १८३५ सालीं या देशातील शिक्षणाला जे धोरण लावून दिले, त्याहून हे धोरण अधिक व्यापक व अधिक राष्ट्रीय आहे असे राममोहन याचे चरित्रकार गांगुली हे म्हणतात.* पाश्चात्य भौतिक विद्या व पौरस्त्य आत्मिक ज्ञान या दोहोंचा समन्वय त्यांस अभिप्रेत होता परंतु मेकॉलेच्या धोरणात केवळ पाश्चात्य विद्येवरच सर्व भर दिला गेला

## सतीविरुद्ध चळवळ

धर्म व शिक्षणविषयक चळवळीबरोबरच १८१७-१८ च्या सुमारास राममोहन हे सतीच्या चालीविरुद्ध झगडण्यात गुंतले होते १८१७-१८ सालीं बंगालमधील सतींची संख्या बरीच वाढली या वेळी सरकारने या प्रकारास आळा घालण्यासाठी काहीं नियमांचीं बंधने अमलात आणण्यास सुरवात केली, त्याविरुद्ध होणारी ही प्रतिक्रिया होती सनातनी हिंदूंनी हीं बंधनें नष्ट करण्यासाठी सरकारकडे एक अर्ज पाठविला होता या वेळीं राजा राममोहन यानीं या अर्जाविरुद्ध सुधारक पक्षाचा अर्ज तयार केला आणि सतीच्या अमानुष चालीविरुद्ध मोहीम सुरू केली सुधारक लोकांनीं पाठविलेल्या या अर्जात पुढील अर्थाचे उद्गार आहेत :

"सती जाणाऱ्या स्त्रियांच्या निकट वारसांना त्यांच्या मृत्यूपासून लाभ होणार असल्यामुळे त्यानी आपल्या पतीच्या चितेवर जाळून घ्यावे याबद्दल त्यांचे मन वळविल्याचीं अनेक उदाहरणें अर्जदारास प्रत्यक्ष किंवा विश्वासू साक्षीदारांच्या सांगण्यावरून माहीत आहेत आपल्या मृत पतीबरोबर सती जाण्याचा निश्चय दुःखाच्या पहिल्या आवेगांत अविवेकानें केलेल्या इतर अनेक स्त्रिया आयत्या वेळीं भीतीने तो निश्चय बदलतात, पण अशांना दोऱ्यांनीं बांधून चितेवरच अग्नीनें जाळून त्यांची राख होईपर्यंत सक्तीने हिरव्या बांबूंनीं ढोसून डाबून ठेवण्यांत येतें.

* Raja Ram Mohan by Nalin C Ganguli, p 102

इतर कांहीं स्त्रिया पेटलेल्या चितेवरून पळून जातात, पण त्यांचे भाऊबंद पुनः त्यांना उचलून आणून जाळून मारितात कोणत्याहि शास्त्राच्या दृष्टीनें किंवा जगांतील कोणत्याहि लोकांच्या सारासारविचारानें पाहिलें तरी हे सर्व खूनच आहेत, असे आपल्या अर्जदारांचे नम्र मत आहे"*

मनुष्याची कर्तव्यबुद्धि अंध झाली अथवा त्यानं स्वतंत्र विचार, अनुभव आणि तर्क याना फाटा देऊन केवळ ग्रंथप्रामाण्यावर भिस्त ठेविली आणि ऐहिक परिणामाकडे दुर्लक्ष करून केवळ काल्पनिक पारलौकिक हिताच्या ग्रंथोक्त कल्पनांनी त्याचें मन भारून गेलें, म्हणजे त्याच्या हातून केवढे अनर्थ घडतात आणि धर्माच्या नावाने अघोर पापे करण्यासहि तो कसा प्रवृत्त होतो, ह्याचे सती हे एक उत्कृष्ट उदाहरण आहे जे लोक सती कायद्याने बंद करू नका म्हणत होते, ते सर्व खुनी होते असे म्हणणें अन्यायाचे होईल. ज्या स्त्रिया आपल्या पतीवरील अलोट प्रेमामुळे परंपरागत संस्काराना वश होऊन जिवंतपणी पतीच्या चितेवर जाळून घेण्याचा निश्चय करीत त्या सर्व भिऱ्या होत्या, अविवेकी होत्या, किंवा सक्तीनेच तसे करण्यास प्रवृत्त होत होत्या असेंहि म्हणता यावयाचें नाहीं पण त्याची, त्याच्या उपदेशकाची व त्याची स्तुतिस्तोत्रे गाणाराची कर्तव्यबुद्धि अंध झाली होती यात शंका नाहीं "अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता। सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी॥" गीतेत वर्णिलेल्या या लक्षणानुसार त्याची कर्तव्यबुद्धि तामस होती असे म्हणणें प्राप्त आहे पत्नीचे पतीवर आत्यंतिक प्रेम असल्यास तिने त्याच्याबरोबर सती जावे असें मानणारे लोक, आपल्या प्रिय पत्नीबरोबर पतीने जाळून घ्यावे असें प्रतिपादणार नाहींत पत्नीला पतिव्यतिरिक्त कर्तव्य नाहीं—निदान निरपत्य स्त्रीला तरी दुसरे कर्तव्य नाहीं—असे गृहीत धरून पतिनिधनानंतर पत्नीनें सती जाणे हे तिच्या उन्नत प्रेमाचे लक्षण समजण्यात येत असते पुरुषाला कुटुंबाबाहेर अनेक कर्तव्ये आहेत, पण पत्नीला हीं दुसरीं कर्तव्ये नाहींत, तिला स्वतंत्र पुरुषार्थहि नाहींत, असे गृहीत धरिले म्हणजे निरपत्य विधवेला या जगात कर्तव्यासाठीं जगण्याचे कारणच उरत नाहीं स्वतःच्या जीवनाशेने व सुखाशेने जगणे हे तर ध्येय कधींच होत नाहीं, म्हणून तिनें आपल्या प्रिय पतीबरोबर जाळून घेणे हेच तिचे श्रेष्ठ कर्तव्य ठरते, अशा प्रकारची ही विचारसरणी आहे व तिचा अवलंब करून अद्यापिहि काहीं लोक सती जाणें हेंच ध्येयदृष्टीने आदर्श पत्नीचे श्रेष्ठ कर्तव्य मानितात पण या विचारसरणींतहि स्त्रीला स्वतंत्र व्यक्तित्व नाही असें गृहीत धरिलेले आहे स्त्रीस्वातंत्र्याच्या श्रेष्ठ ध्येयाच्या दृष्टीनें "सती" हा कोणत्याहि स्वरूपांत अधर्मच ठरतो मृत पतीवर अलोट प्रेम असणारी स्त्री विरक्त होईल, फार तर पुनर्विवाह करून पुनः संसार थाटणार नाहीं, पण तिला अनेक सामाजिक कर्तव्ये उरतात तीं कर्तव्ये करीत पतीवरील व कुटुंबांतील इतरावरील प्रेमाचा विकास करून ती विश्वकुटुंबाची सेवा करण्यांत आनंद

* Raja Ram Mohan by Nalin C Ganguli, P 32-33

मानील हाच खरा सतीधर्म असून शरीर जाळून घेणें हा खरा धर्म नव्हे ऐहिक उन्नति व ऐहिक कर्तव्यानंद या दृष्टीने हा विचार झाला निधनोत्तर प्राप्त होणाऱ्या स्वर्गसुखाच्या कल्पनांच्या अधारांत एकदां शिरले, म्हणजे स्वतंत्र युक्तिवादाला स्थानच उरत नाहीं ग्रंथप्रामाण्य व शब्दप्रामाण्य यांचा मिणमिणणारा दिवा हातीं घेऊन ऐहिक कर्तव्यांचा शोध करू लागले आणि ग्रंथोक्त पारलौकिक फलांवरून सदसद्विवेक करूं लागलें म्हणजे सर्वच आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ होतो आणि "अधेनैव नीयमाना यथान्धाः" या न्यायाने सर्व समाजच धर्माच्या नांवाने अधर्माचरणाच्या खोल दरींत जाऊन गडप होतो.

सती हे स्त्रीदास्याच्या अनेक प्रतीकांपैकीं एक प्रतीक होतें धार्मिक स्वातंत्र्य आणि बौद्धिक स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यासाठीं ब्राह्मसमाज व पाश्चात्य शिक्षण याचा पुरस्कार करणाऱ्या राममोहनानीं स्त्रीस्वातंत्र्याच्या व्यापक प्रश्नाला प्रथम चालना दिली आणि स्त्रियाना वडिलार्जित मालमत्तेत वारसाहक्क मिळावा याबद्दलहि खटपट केली स्त्रियाना आर्थिक स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज त्याचे सामाजिक दास्य नष्ट होणार नाहीं, या तत्त्वाचा त्यांनीं पुरस्कार केला असून प्राचीन स्मृतिग्रंथात मुलींना निदान मुलांच्या चतुर्थांशाइतका हिस्सा तरी मिळावा, असे प्रतिपादिले असल्याचें त्यांनीं जनतेपुढे मांडिले तसेच आईबापानीं कन्याविक्रय करू नये आणि बहुत्पनीकत्वाची रूढि बंद व्हावी याबद्दलहि त्यांनी लोकात जागृति केली. पण यांपैकीं त्यांच्या कोणत्याच प्रयत्नांना यश आले नाहीं सतीची चाल मात्र कायद्याने बंद झाल्याचे पाहण्याचे भाग्य त्यांना लाभलें इ स १८२९ सालीं लॉर्ड बेटिंक यांनीं सती कायद्यानें बंद केली आपण जो कायदा करीत आहो त्याचे अंतिम परिणाम लोकावर काय होतील, याचें विवेचन करतांना ते विलायतेस पाठविलेल्या आपल्या एका मतपत्रिकेत लिहितात:

"माझ्या अंतःकरणातील पहिला व मूलभूत हेतु हिंदूचे कल्याण व्हावे हाच आहे त्यांची श्रद्धा कशीहि असली, तरी त्यांच्यांत अधिक शुद्ध नीतिमत्ता स्थापन व्हावी आणि परमेश्वरी इच्छेसंबधीचे त्याचे विचार अधिक न्याय्य व्हावेत, याच्याइतके त्यांच्या भावी सुधारणेच्या दृष्टीनें दुसऱ्या कशासहि महत्त्व नाही, असे मला वाटतें. हे ज्ञान त्यांना होण्याच्या दृष्टीने पहिली पायरी म्हणजे खून आणि रक्तपात यांच्यापासून त्यांचे धार्मिक आचारविचार अलिप्त होतील अशी व्यवस्था करणे हीच होय अशा पाशवी उन्मादापासून ते मुक्त होतील तेव्हांच ते सर्वमान्य सत्य तत्त्वाचें अधिक शांतपणे आकलन करू शकतील तसे होईल तेव्हां त्यांच्या लक्षांत येईल, कीं परमेश्वरी कायद्यांत विसंगति असूंच शकत नाहीं, कोणाहि अनपराध्याचे रक्त सांडूं नये या परमेश्वरी आज्ञेस अपवाद असूं शकत नाहीं आपल्या अत्याचारी रूढीपैकीं अग्रगण्य रूढीचा हा प्रमाद त्यांच्या लक्षांत आल्यानंतर आपल्या उन्नतीच्या आड येणाऱ्या इतर रूढींचाहि ते त्याग करतील, व अशा प्रकारें त्यांच्या आचार-

विचारांवरील दास्यांची बंधने व बेड्या त्यांनी तोडिल्या, म्हणजे येईल त्या परक्या सत्तेचे गुलाम होऊन राहण्याची त्यांची सध्यांची वृत्ति ते सोडून देतील व मानव-कुलांतील आपले न्याय्य स्थान ते पटकावतील, अशीहि आशा आपण करू शकत नाहीं काय ?"*

लॉर्ड बेंटिंक याची ही विचारसरणी प्रामाणिक असून सतीची चाल बद करण्यात व आपले राज्य थोड्या प्रमाणात तरी लोकात अप्रिय करून घेण्यांत त्याचा हिंदू लोकाचे हित करण्याखेरीज दुसरा कोणताहि हेतु असेल, असे आम्हांस वाटत नाहीं.

## जातिभेदाचें निर्मूलन

आधुनिक राष्ट्रनिर्मितीच्या आड येणाऱ्या ज्या सामाजिक सस्था या देशांत रूढ आहेत त्यात जातिसस्था ही एक प्रमुख आहे, असे या सुधारक पक्षाला वाटत होते व म्हणून या संस्थेकडेहि त्यानीं आपला मोर्चा वळविला. या बाबतींत राजा राममोहन यांनीं विशेष जोराची चळवळ केली नाहीं व स्वतःहि जातिबंधनांचा सर्वस्वीं त्याग केला नाहीं तथापि, जातिसस्था राष्ट्रभावनेला विघातक आहे, व केवळ राजकीय दृष्टीनें विचार करणारासहि ती सुधारावी लागेल, असे आपले मत त्यांनीं नमूद करून ठेविले आहे जातिभेदामुळे राष्ट्रभावनेची हानि कशी झालेली आहे, यासबधी त्यानी आपले विचार एका पत्रात पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहेत:

"युरोपांतील आणि अमेरिकेतील सामान्य खिस्ती लोकापेक्षां हिदू लोक दुर्गुणाच्या बाबतीत अधिक अवनत नाहीत, हे आपले मत मला मान्य आहे, पण आज हिंदू लोक ज्या धर्मपद्धतीचें आचरण करीत आहेत, ती त्याच्या राजकीय हितवर्धनाच्या दृष्टीने इष्ट नाहीं अनेक जाती-उपजाती निर्माण करणाऱ्या जातिभेदाने त्याची राष्ट्रभावना नष्ट केली आहे आणि असख्य धार्मिक विधिविधाने व सोवळयाओवळयाचे नियम याच्या योगाने कोणतेहि मोठे साहस करण्याची कुवत त्यांच्यांत उरलेली नाहीं. निदान राजकीय हित आणि सामाजिक सुख यांसाठीं तरी त्यांच्या धर्मात कांहीं बदल होणे अवश्य आहे, असे मला वाटते "§

आपल्या सुधारणांना आपल्या राष्ट्रांतील प्राचीन सुधारकांचा आधार घेण्याच्या त्यांच्या नेहमींच्या वृत्तीस अनुसरून त्यांनीं बुद्धधर्मानुयायी पडित मृत्युंजयाचार्य यांच्या 'वज्रसूचि' नांवाच्या संस्कृत ग्रथाचें भाषातरहि इ स १८२७ सालीं प्रसिद्ध करून जातिभेद नष्ट करण्याच्या अर्वाचीन मतास असलेला प्राचीन आधार लोकांपुढे मांडिला अशा प्रकारें जातिभेद मोडण्याच्या चळवळीची त्यांनीं पूर्वतयारी करून ठेवली असे म्हटल्यास फारसे वावगे होणार नाहीं 'सामाजिक सुधारणा' या शब्दानीं ज्या कल्पना सुचाविल्या जातात त्यांत स्त्री-शूद्राना म्हणजे समाजांतील दुर्बलांना व

---

* Development of Indian Policy by Anderson and Subedar, P 92.

§ Raja Ram Mohan Roy by N. C Ganguli, P. 133-34.

दलितांना समानता प्राप्त करून देणे या कल्पनेला प्राधान्य आहे. हे समतेचें तत्त्व श्रीकृष्ण, गौतमबुद्ध आणि मध्ययुगीन साधुसंत या सर्वांच्या ग्रंथांत व प्रयत्नांत कमीअधिक प्रमाणात आढळते व त्याचा आधार राजा राममोहन रॉयप्रभृति सर्व अर्वाचीन धार्मिक व सामाजिक सुधारकांनीं घेतलेला आहे तथापि, हे तत्त्व यांनीं ज्या व्यवहारांना लागू केले, त्या व्यवहाराना श्रीकृष्ण, गौतमबुद्ध या प्राचीन कालांत होऊन गेलेल्या अवतारी पुरुषांनीं किंवा मध्ययुगीन साधुसंतांनी लागू केलेलें नव्हतें तसें नसले, तरी त्याच समतेच्या तत्त्वाची व्याप्ति वाढवून ते अधिकाधिक व्यवहाराना लागू करणे हाच त्याचे कार्य पुढे चालविण्याचा मार्ग होय, असे या सुधारकाचे मत असून त्यांना विरोध करणारे सनातनी पूर्वींच्या अवतारी पुरुषांनीं किंवा साधुसंतांनीं ज्या व्यवहारांना तें तत्त्व लागू केलें नाहीं तेथे तें लागू करण्यात त्याचा आधार घेतां घेणार नाहीं, असे प्रतिपादन करतात समाज-शास्त्राच्या दृष्टीने विचार करावयाचा तर प्राचीन व मध्ययुगीन धर्मसुधारकांप्रमाणें अर्वाचीन सुधारकांना समत्वबुद्धीच्या अध्यात्मवृत्तीतून आपल्या सुधारणांस आधार घेतां आला, तरी ही समता कोणत्या परिस्थितीत किती प्रमाणांत अमलात येणे वा आणणे शक्य व इष्ट आहे, याचा विचार समाजाच्या भौतिक ज्ञानाच्या व साधनांच्या दृष्टीने केला पाहिजे, असे म्हणणें भाग आहे आर्थिक समता हा सामाजिक समतेचा आधार असून ही आर्थिक समता समाजाच्या धनोत्पादनकलेंतील व पद्धतींतील प्रगतीवर आणि आध्यात्मिक उन्नतीवर अवलंबून असते या दृष्टीने विचार केल्या-खेरीज वर्णभेद व जातिभेद इष्ट वा अनिष्ट याचा खरा निर्णय होत नाहीं. असा विचार एकोणिसाव्या शतकात जें व्यक्तिवादी सामाजिक तत्त्वज्ञान इंग्लिशांनीं हिंदुस्थानात आणिलें त्यांतच नसल्यामुळे, आडांत नसल्यावर पोहऱ्यात कोठून येणार, या न्यायानें एकोणिसाव्या शतकातील सुधारकवर्गातहि ही दृष्टि असणे शक्य नव्हते. त्याच्या विचारसरणींत भूतदया व समता ही आध्यात्मिक वृत्ति, व्यक्तिवादी अर्थोन्नति व राष्ट्रभावना ( Individualist Nationalism ) यांनाच प्राधान्य होते

## अर्थशास्त्रीय विचार

आपल्या समाजाच्या आर्थिक घटनेत एक प्रचंड घडामोड होत आहे पूर्वी समाजांत एक जमीनदार, जहागिरदार वरिष्ठ वर्ग आणि दुसरा त्याच्या कुळाचा व कष्टाळू शेतकऱ्याचा निर्धन व दुर्बल वर्ग असे दोनच वर्ग प्रमुख असून व्यापारी, कारागीर वर्गाजवळ फारशी संपत्ति नव्हती. ही परिस्थिति पालटून इंग्रज व्यापारी भांडवलवाल्यांच्या साहाय्याने एक मध्यम व्यापारी व सुशिक्षित अधिकारी-वर्ग आपल्या समाजात पुढे येत आहे व त्याची संपत्ति वाढत आहे, याची जाणीव राजा राममोहन रॉय यांना होती या आर्थिक घडामोडीचें महत्त्वहि त्याच्या लक्षांत आलें असून या वर्गातूनच अखेरीस राजकीय लोकसत्तेचा लढा उभारणारा वर्ग

तयार होईल आणि इग्लंडांत ज्याप्रमाणे लोकनियंत्रित राजसत्ता स्थापन झाली, त्याचप्रमाणे येथेंहि होईल अशी आशा त्याना वाटत होती पण या वर्गाच्या वाढीस व उन्नतीसहि ब्रिटिश साम्राज्य अडथळा करीत आहे, याची जाणीव त्यांना असल्याचें दिसत नाहीं. तसेंच या व्यापारी मध्यमवर्गातून कारखानदारी निर्माण होण्यासाठीं आपणांस सरक्षक जकाती किंवा स्वदेशी यासारख्या चळवळी कराव्या लागतील व त्या कामीं ब्रिटिश राज्यकर्ते, ब्रिटिश व्यापारी व ब्रिटिश भाडवलवाले याचा हिंदी व्यापारी मध्यमवर्गातून निर्माण होणाऱ्या भांडवलवाल्यांशीं विरोध उत्पन्न होईल, याचीहि जाणीव त्यांना नव्हती ते आर्थिक दृष्टया खुल्या व्यापाराचे भोक्ते होते ब्रिटिश मालाची, भांडवलाची व भांडवलवाल्यांची या देशांत मोठ्या प्रमाणावर आयात होण्यांत या देशाचे अनहित नसून उलट हितच आहे असें त्यांचे मत होते मात्र ब्रिटिश लोक हिंदुस्थानातून जाणाऱ्या मालावर जबर जकाती बसवितात त्या त्यानीं उठवाव्यात, असे ते प्रतिपादीत असत. तात्पर्य, हिंदुस्थान व इंग्लंड या देशात अप्रतिबंध व्यापार सुरू व्हावा आणि मालाची, भांडवलाची आणि भांडवलवाल्यांची आयात-निर्यात खुलेपणाने व्हावी, यांतच हिंदुस्थानचे हित आहे असे त्यास वाटे

या सुमारास ब्रिटिश मळेवाले व भांडवलवाले यांना हिंदुस्थानांत येऊन कायमचे राहू द्यावे किंवा न द्यावें, याबद्दल इंग्लडांत मोठी जोराची चर्चा सुरू होती, आणि ईस्ट इडिया कपनी व तिचे अधिकारी ब्रिटिशानीं हिदुस्थानांत येऊन राहू नये अशा मताचे होते हिंदुस्थानातील जमीनदारवर्गालाहि या गोऱ्या लोकांची आयात इष्ट वाटत नव्हती, पण राममोहन रॉयप्रभृति सुशिक्षित सुधारणावादी पुढारी त्यास अनुकूल होते राजा राममोहन रॉय यांच्या मालकीच्या "सवाद कौमुदी" नांवाच्या वृत्तपत्रांत २६ फेब्रुवारी, १८२८ रोजी प्रसिद्ध झालेल्या लेखात पुढील विचार प्रकट झाले आहेत :

"निळीच्या लागवडीमुळे किती पडजमीन लागवडीत आली आहे आणि निळीच्या मळेवाल्यांपासून मिळणारा पैसा सर्व देशभर पसरल्यामुळे खालचे वर्ग किती सुखाने काळ कंठीत आहेत, याची कल्पना ज्यांची जमीनदारी खेड्यांत आहे व जे स्वतः तिची व्यवस्था बघतात त्या सर्वांस उत्तम प्रकारे आली आहे. पूर्वी ज्या शेतकऱ्याना कोणताहि मोबदला न देतां किंवा थोडेसे भात देऊन जमीनदार राबवून घेत होते, त्यांना आतां निळीच्या मळेवाल्याच्या सरक्षणाखालीं थोडे स्वातत्र्य व सुख लाभूं लागले आहे या मळेवाल्यांकडून प्रत्येकाला त्याच्या मजुरीबद्दल अजमासे दरमहा चार रुपये मिळतात आणि ज्या मध्यमवर्गीय लोकांना आपले व आपल्या कुटुंबाचें पोषण कसे करावे हे कळत नव्हतें, त्यांना हे मळेवाले अधिक वेतन देऊन 'सरकार' वगैरे नांवाने नोकरीवर ठेवीत आहेत, व ते मोठमोठे सावकार आणि जमीनदार यांच्या लहरीच्या जुलमांतून मुक्त होत आहेत या परिस्थितीवरून असा साधार

निष्कर्ष काढतां येतो, कीं जर युरोपियन लोकांना अनिर्बंधपणे येथे येऊन राहूं दिले आणि मळे करण्यासाठीं अगर व्यापार वगैरे करण्यासाठीं पुष्कळसे युरोपियन येऊन ते सर्व देशभर पसरले, तर कनिष्ठवर्गाची व मध्यमवर्गाची स्थिति अधिक सुधारेल या गोष्टीचीच चीड स्वार्थी जमीनदारांना येत आहे; कारण आपल्या प्रदेशातील मध्यम व कनिष्ठवर्गाच्या डोक्यावर नाचावे हीच या वर्गाची मनापासून इच्छा आहे"

राममोहनप्रभृति बंगाली पुढाऱ्यांच्या मालकीच्याच "बंगाल हेरल्ड" या इंग्लिश पत्रांत युरोपियनांच्या आयातीमुळे हिंदी मध्यमवर्गाची व कनिष्ठवर्गाची स्थिति कशी सुधारत आहे, याविषयीं पुढील विवेचन केलेले आढळते :

"या नव्या घडामोडीमुळे होणाऱ्या अनेक लाभांपैकींच लोकांत पैसा अधिक खेळत रहात आहे हा एक आहे, हे पुराव्यानें सिद्ध करतां येते पहिलें असे, कीं कलकत्त्यांत कवड्याचे व्यवहार जवळजवळ बंद पडले आहेत आणि थोड्याच दिवसांत त्या बंगालमध्येहि दिसणार नाहींत दहा वर्षांपूर्वी कलकत्त्यांत मजुराला दरमहा दोन रुपये मिळत असत, आता चार किंवा पांच रुपये मिळाल्याखेरीज त्याचें समाधान होत नाहीं पेल्या, कपाटे तयार करणाऱ्याला पूर्वी दरमहा आठ रुपये मिळत असत, आता त्याला तेवढ्याच काळांत सोळा किंवा वीस रुपये मिळतात खेड्यांतहि मजुरीचे दर वाढले आहेत पूर्वी एक रुपयांत शेतात काम करण्यास बारा मजूर दिवसभर मिळत असत, आता तेवढ्या पैशात फक्त सहाच मजूर मिळतात पूर्वी एक बिघा भातजमिनीची लागण एक रुपयास होत असे; आता जमीनदार आपल्या कुळाकडून बिघ्याला तीनचार रुपये मागतो. पूर्वी तादूळ आठ आण्याला मण विकत असत, पण आता ते दोन रुपये मण या दरानें विकले जातात, आणि आता जमीनदारींतील सर्व जमीन लागवडींत येते, पण पूर्वी फक्त अर्धीच येत असे याचें कारण निळीची लागवड हेच होय"*

वरील दोनहि उतारे लक्षपूर्वक वाचिल्यास ब्रिटिश भांडवलवाल्यांच्या आयातीचा आर्थिक परिणाम काय होत होता, त्याची बरीच कल्पना येऊं शकते. मध्यमवर्गातील कांहीं लोकाना भारी पगाराच्या नोकऱ्या मिळत होत्या शेतावर राबणाऱ्या शेतकऱ्यांची व मजुरांची मजुरी पैशांत वाढूं लागली होती शहरात राहणाऱ्या सुतारासारख्या कारागिरांची मजुरी वाढत होती पण त्याचबरोबर धान्याचे भावहि वाढत होते मजुरी दुप्पट झाली होती, तर धान्याचे भाव चौपट झाले होते! जमीनदाराना मिळणारा खंडहि या धान्याच्या भावाच्या प्रमाणांत म्हणजे तिप्पट किंवा चौपट झाला होता, पण मजुरी मात्र–खेड्यांतील व शहरातीलहि–फक्त दुप्पटच झाली होती! ज्याप्रमाणे जमीनदारांना मिळणारा खंड वाढत होता, त्याचप्रमाणे शहरातील जमिनीची किंमतहि वाढत होती. तीस वर्षांपूर्वी कलकत्त्यांत ज्या जमिनीची किंमत पधरा रुपये होती, ती आज तीनशें रुपयांस विकली जात आहे, असे

* Indian Speeches and Documents on British Rule, P 37-38.

याच लेखांत म्हटले आहे. अर्थात् शहरांतील घरभाडेहि या मुदतींत तिप्पट-चौपट तरी वाढलें असल्यास नवल नाही अशा परिस्थितींत कनिष्ठवर्गाची स्थिति सुधारत आहे असे कोणताहि अर्थशास्त्रज्ञ आज म्हणणार नाहीं मध्यमवर्गातील कांहीं लोकांची स्थिति यामुळें सुधारत होती एवढाच याचा अर्थ होतो; कारण त्याना मिळणारा पगार पूर्वीच्या तिपटी-चौपटीहूनहि अधिक असण्याचा संभव आहे या मध्यमवर्गातीलहि एका अत्यंत थोड्या अंशाची स्थिति सुधारत होती व त्याच अनुभवाच्या आधारावर सर्व देश सुखी होत आहे, असा भ्रामक निष्कर्ष वरील उताऱ्यात काढण्यात आला आहे.

या वेळीं ब्रिटिश मालाचे गठ्ठेच्या गठ्ठे या देशांत येऊन पडलेले असून मागणीच्या मानाने पुरवठा अधिक झाल्याने त्यांचे भाव उतरत होते यामुळे ते आणणाऱ्या व्यापाऱ्यांचे व तो पाठविणाऱ्या विलायती कारखानदारांचें थोडे नुकसान होत होते. यास उद्देशून याच लेखात पुढील विचार प्रदर्शित करण्यांत आले आहेत:

"लिव्हरपूल, ग्लासगो वगैरे ठिकाणांशीं व्यापार करण्याच्या ज्या वाढत्या सवलती आम्हास मिळाल्या आहेत, त्यांविरुद्ध ज्यानी ओरड सुरू केली आहे, ते आपल्या पक्षाच्या समर्थनार्थ असे दाखवितात, की हिंदी बाजारपेठा ब्रिटिश मालानें तुडुंब भरून गेलेल्या असून, ज्यांनीं तो माल इकडे पाठविला त्याचे मोठें नुकसान होत आहे आजच्यासारख्या संक्रमणकालात अशा गोष्टी नेहमींच घडत असतात, पण अखेर त्याचे परिणाम अत्यंत हितावह असेच होतात. माल स्वस्त झाला म्हणजे तो घ्यावा असे गिऱ्हाइकास वाटू लागते आणि पूर्वी माहीत नव्हत्या अशा नव्या अभिरुची निर्माण होतात एकदा मालाला योग्य मोल येऊं लागलें म्हणजे या अभिरुची तृप्त होऊ लागतात यानंतर पुनः नव्या मालाच्या आयातीस उत्तेजन मिळतें अशा प्रकारे उत्पादक आणि ग्राहक या दोघांचेहि सुख वाढते तथापि हे उघड आहे, कीं अशा परिस्थितींत व्यापाराची देवाण-घेवाण ही उभयपक्षीं सुरू असावी लागते आणि आपल्या मालाला हिंदुस्थानची मोठी बाजारपेठ लाभावी अशी जर इंग्लंडची अपेक्षा असेल, तर आशियांतील मालावर स्वतंत्र देशाला कालिमा आणण्यासारख्या ज्या प्रतिबंधक जकाती त्याने बसविल्या आहेत, त्या त्याने उठविल्या पाहिजेत एकटी ईस्ट इंडिया कंपनीच आपल्या भागीदारांस डिव्हिडंड देण्यासाठीं व आपल्या विलायतेतील खर्चासाठीं चाळीस लक्ष पौंडाचें सोनें-चांदी घेऊन जाते असे म्हणतात" या सोन्याचांदीऐवजीं येथील माल इंग्लंडात खपावा आणि इंग्लंडचा माल येथे खपावा अशी ही अप्रतिबंध खुल्या व्यापाराची उपपत्ति आहे. ब्रिटिश राज्यकर्ते या तात्त्विक उपपत्तीच्या पाठीमागे लागून हिंदी कापडावरील जकाती उठविण्यास तयार नव्हते आमचे व्यक्तिवादी पुढारी मात्र इंग्लंडचा माल आपल्या देशांत येतो, इंग्लिश भांडवल येते व त्याबरोबर इंग्लिश मळेवाले, व्यापारी व पेढीवाले येतात, या सर्वाबद्दल समाधान व्यक्त करीत होते! बंगालमधील तत्कालीन (१८२८) पुढाऱ्यांचीं हीं अर्थशास्त्रीय मतें वाचिलीं असता, यानंतर वीस वर्षांच्या आंतच

स्वदेशी-बहिष्काराचा पुकारा करणाऱ्या 'लोकहितवादीं'च्या राष्ट्राभिमानाचें आणि दूरदर्शी आर्थिक विचारसरणीचें कौतुक वाटू लागते. १८२० ते १८३० या काळांत राममोहन रॉयप्रभृति बंगाली पुढारी हिंदुस्थान देश सधन होऊ लागला असें प्रतिपादीत होते, पण त्यानंतर पधरा-वीस वर्षांच्या अवधींतच महाराष्ट्रात सर्वांगीण सुधारणेची मुहूर्तमेढ रोवणारे 'लोकहितवादी' विलायती मालाच्या बहिष्काराचा आणि स्वदेशीव्रताचा पुकारा करितात, हे महाराष्ट्राला खरोखरच अभिमानास्पद व भूषणावह आहे असे म्हटल्यावाचून राहवत नाहीं हिंदुस्थान सधन होत आहे हे १८३० च्या सुमाराचे बगाली पुढाऱ्याचे मत, आणि हिंदुस्थान निर्धन व बेकार होत आहे अशी लोकहितवादींनीं प्रतिपादिलेली विचारसरणी, यातील अतर बऱ्याच दृष्टींनीं बोधप्रद आहे असें आम्हास वाटतें पण 'लोकहितवादी' आणि महाराष्ट्रातील सर्वांगीण सुधारणावाद याचा विचार करण्यापूर्वी राजा राममोहन याच्या राजकीय विचारांचा वाचकाना थोडा परिचय करून देणे अवश्य आहे

## राजकीय विचार

राजा राममोहन यांना ब्रिटिश राज्य ज्या विशेष कारणामुळे परमेश्वरी प्रसादाप्रमाणे वाटत होते, त्यांचा विचार केला असता, त्यांच्या राजकीय विचाराचीहि आपणांस कल्पना येऊ शकते युरोप खडांत सतराव्या व अठराव्या शतकात भौतिक व सामाजिक शास्त्रात जी प्रगति झाली होती ती आपल्या इकडे झाली नाहीं, आणि त्या प्रगतींत ब्रिटिश राष्ट्र आघाडीवर आहे हे पाहून त्याना ब्रिटिश राजकर्त्यांच्या आगमनाबद्दल आनद वाटत होता तसेंच ब्रिटिश लोक मानवसुधारणेंत पुढे गेले असून ते आपल्या साम्राज्यांत सांपडलेल्या लोकांसहि हळूहळू सुधारून आपल्या पदवीस नेऊन पोहोंचवितील अशी त्यांना आशा वाटत होती व्यापार, उद्योगधदे आणि इतर आर्थिक हितसबध यांत हिंदी व ब्रिटिश लोकाचा हितविरोध आहे या गोष्टीकडे त्यांचें लक्ष गेलेले दिसत नाहीं ब्रिटिश माल आपल्या देशांत खपावा व आपला माल ब्रिटनमध्ये खपावा, ब्रिटिश भांडवल आपल्या देशांत यावे आणि ब्रिटिश व्यापारी, मळेवाले, कारखानदार, धर्मोपदेशक व विद्वान् लोक आपल्या देशांत अप्रतिबधपणे येऊन रहावेत, यांतच आपल्या मागासलेल्या लोकांचा खरा उद्धार आहे असे त्यांना वाटे पूर्वीच्या मुसलमान जमीनदारवर्गाच्या राज्यांत हिंदू लोकांना जितके मोठमोठे हुद्दे व अधिकार मिळत होते, तितके मात्र आपल्या देशांतील लोकाना ब्रिटिश राज्यात मिळत नाहीत यामुळें त्याना वाईट वाटे. तथापि त्या अमदानीपेक्षा ब्रिटिश अमलाखालीं आपणास नागरिक-स्वातंत्र्य आणि धर्मस्वातत्र्य लाभते आणि आपले जीवित व वित्त यांना अधिक शाश्वती लाभून ब्रिटिशांच्या साहचर्यामुळें आपल्या देशात अनेक विद्या व कला यांचा उदय होत आहे, याचे महत्त्व त्यांना विशेष वाटे नागरिक-स्वातत्र्य आणि धर्मस्वातंत्र्य मिळून

आपल्या देशांत सर्वांगीण सुधारणेचा ज्ञानरवि उदय पावत आहे, यामुळें आपले जें हित होत आहे, त्याची सर पूर्वीच्या अमदानींत प्राप्त होणाऱ्या मोठमोठ्या हुद्द्यांना किंवा जहागिऱ्यानादि नाहीं असे त्यांचें मत होतें पण लॉर्ड हेस्टिंग्ज् याच्या कारकीर्दीत जेव्हां या नागरिक-स्वातंत्र्यावरच गदा येऊन वर्तमानपत्राचे स्वातंत्र्य हिरावून घेण्याचा उपक्रम सुरू झाला, तेव्हां मात्र ब्रिटिश राज्यावरील त्याच्या श्रद्धेला धक्का बसला, आणि ईस्ट इंडिया कंपनीच्या सरकाराविरुद्ध त्यानी ब्रिटिश राजापर्यंत दाद मागण्याचा प्रयत्न केला हिंदुस्थान सरकारच्या जुलमी कृत्याविरुद्ध सनदशीर मार्गानें प्रतिकाराचा प्रयत्न केल्याचे हे पहिलेच उदाहरण आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं याच्यापूर्वी इकडील काहीं राजेरजवाड्यानीं अगर नबाबसुलतानांनीं ब्रिटिश पार्लमेंटकडे किंवा राजाकडे दाद मागितली असेल, पण ती सामान्य जनतेच्या नागरिक-हक्कासाठी नव्हे हे लक्षात ठेविले पाहिजे नागरिकहक्काच्या संरक्षणासाठीं हिंदी लोकानी केलेल्या सनदशीर चळवळीच्या इतिहासाचा उगम इ स. १८२२-२३ साली राममोहन रॉय यानीं पाठविलेल्या या अर्जातच आहे. या दृष्टीने त्यांतील पुढील उतारे वाचनीय आहेत:

"हें सर्वश्रुत आहे, कीं जुलूम आणि छळ केला असता जी आपली अपकीर्ति होते ती चव्हाट्यावर मांडणाऱ्या मतप्रचाराची दडपशाही करावी, अशी इच्छा सर्व अनियंत्रित सरकाराना असते आणि नेहमी त्याचें असे म्हणणे असते, कीं कोणत्याहि कायदेशीर सत्तेला लोकातील ज्ञानप्रसारामुळे धोकाच उत्पन्न होतो, कारण शहाणे झाल्यानंतर आपली एकी करून अल्पसंख्याकाचा अमल सहज झुगारून देतां येईल व आपणांस सर्वच प्रकारच्या अमलांतून कायमचे मुक्त होता येईल, असे बहुसंख्याकांना वाटत असतें पण असे म्हणणारे हे विसरतात, कीं जे देश अगदीं कमी सुधारलेले आहेत त्यांतच क्रांत्या व अराजकता यांचा सर्वात अधिक सुळसुळाट असतो. याच्या उलट, जे देश अतिशय सुधारलेले आहेत, त्यांत प्रजेचे हक्क अबाधित राखणाऱ्या सरकाराविरुद्ध फारच क्वचित् बंड होते आणि जेव्हा सुसंस्कृत लोक प्रतिकार करतात, तेव्हांहि ते राज्यसंस्थेविरुद्ध न करतां त्या राजसत्तेच्या दुरुपयोगाचाच तेवढा प्रतिकार ते करीत असतात, असा इतिहासाचा धडा आहे या युक्तिवादाचा अत्यंत संस्मरणीय पुरावा अमेरिकेशीं झालेल्या युद्धाच्या वेळी कानडानें जें वर्तन केलें त्यावरून दिसून येतो ब्रिटिश सरकार आपल्या सवलती व आपले अधिकार यांचे योग्य प्रकारें संरक्षण करते, आपल्या तक्रारी ऐकून घेतें आणि आपलीं गाऱ्हाणीं दूर करतें, हे पाहून या वसाहतींतील सुधारलेले लोक, अमेरिकेने त्यांना फितूर करण्याचा प्रयत्न केला असताहि, त्यास बळी पडले नाहींत. वस्तुतः असे विधान बिनधोकपणे करतां येईल, कीं लोक ज्या मानाने अधिक सुसंस्कृत असतील, त्या मानानें प्रजेच्या हक्कांचें व सवलतींचें रक्षण करणाऱ्या दयाशील व न्यायी सरकाराविरुद्ध ते बंड करण्याचा संभवहि कमीच असतो.

"नागरिकत्वाचे व धर्मस्वातंत्र्याचे जे हक्क ब्रिटिश सरकाराखालीं नेहमीं सुरक्षित राहतील अशी आपल्या राजनिष्ठ प्रजाजनांना आशा होती, त्या हक्कांवरच या कायद्यामुळें अत्याचाराची गदा येत आहे आणि त्यामुळे आपल्या प्रजेला अधिक दुःख होत आहे राजेसाहेबांस हे विदितच आहे, कीं पूर्वीच्या मुसलमान राजाच्या अमदानींत एतद्देशीयांना मुसलमानाच्या बरोबरीनें सर्व राजकीय सवलती मिळत असत; सर्वांत मोठे अधिकार त्यांना मिळत असत, सेनापति होतां येत असे, प्रांतांचे सुभेदार होतां येत असे आणि राजांचे सल्लागारहि होतां येत असे या कामीं देशकृत किंवा धर्मकृत भेदाभेद करून त्याना हीन लेखण्यात येत नसे. त्यांना सरकारसारा द्यावा न लागणाऱ्या जमिनी इनाम मिळत असत व मोठमोठीं कामें करून मिळणाऱ्या जाड्या पगाराखेरीज विश्वास व दर्जा दाखविणारीं मोठमोठीं वतनेहि मिळत असत तसेच हुषार व विद्वान् एतद्देशीयाना मानाच्या व पैशाच्या बऱ्याच जागा मिळत असत जरी ब्रिटिश राज्याखाली एतद्देशीय लोकांचा हा राजकीय दर्जा अगदीं नाहींसा झाला आहे, तरी जे नागरिक व धार्मिक स्वातन्त्र्याचे हक्क पूर्वी अनेक वेळां तुडविले जात असत, ते हक्क उपभोगण्याची शाश्वती आपणांस लाभली यांतच आपल्या हिंदी प्रजेला समाधान वाटत असे आणि राजकीय सत्ता व दर्जा नष्ट झाला तरीहि आपल्या पूर्वजापेक्षां नागरिक व धार्मिक स्वातन्त्र्याचे हक्क आपणांस उपभोगता येतात, यामुळें आपण त्यांच्यापेक्षा अधिक सुखी आहो असे त्याना वाटे. पण हे उरलेले हक्कहि जर जबरदस्तीने हिरावून घेऊं दिले किंवा एकदोन व्यक्तींच्या लहरीवर त्यापैकीं महत्त्वाचे हक्क सोपविले, तर ब्रिटिश राज्यांत आपणांस सुख व शांति लाभेल अशी जी आशा त्यानीं बाधली होती, तिचा आधारच नष्ट होईल."‡

हिंदी लोकांना ब्रिटिश अमदानींत राजकीय दास्य प्राप्त होऊन मुसलमान अमदानींत हिंदूना जें राजकीय महत्त्व होते व त्याच्या राजकीय आकांक्षांना जो अवसर होता तेवढाहि उरला नाहीं, याची स्पष्ट जाणीव या उताऱ्यांत व्यक्त झालेली आहे. तथापि आपणास विचारस्वातन्त्र्य, प्रचारस्वातन्त्र्य आणि धर्मस्वातन्त्र्य प्राप्त झालें आहे, यातच आपल्या भावी उत्कर्षाचे बीज आहे असे मानून हिंदी लोक समाधान मानून घेत असत. पण मुद्रणस्वातंत्र्यावर गदा घालून आपले नागरिक-स्वातन्त्र्यहि नष्ट केलें जात आहे, हे पाहून राजा राममोहन यांना संताप आला होता. मात्र या संतापाचा व या अर्जाचा काहींच उपयोग झाला नाहीं मुद्रणस्वातन्त्र्य हिरावून घेऊन वर्तमानपत्रकर्त्यांना परवाना घेणें आवश्यक आहे असा कायदा झाला व वृत्तपत्रांवर सेन्सॉरशिप सुरू झाली या कायद्याचा निषेध कृतीने व्यक्त करण्यास त्या वेळी राममोहन यांना जो एकच मार्ग उपलब्ध होता तो त्यानीं अवलंबिला. हा मार्ग म्हणजे त्यानीं आपलें वृत्तपत्रच बंद केलें

‡ Indian Speeches and Documents on British Rule by J K. Mujumdar, P. 25-26

## इंग्लंडांतील कामगिरी

या वेळेपासून राममोहन रॉय याचे सरकारी अधिकाऱ्याशीं फारसे सलोख्याचे सबध उरले नाहींत पुढे १८३१ सालीं ते विलायतेस गेले तेव्हा मोंगल बादशहाने ईस्ट इडिया कपनीकडून आपणांस मिळणारे पेन्शन अधिक मिळावे याबद्दल खटपट करण्याची कामगिरी त्याच्यावर सोपविली व आपले प्रतिनिधि म्हणून 'राजा' हा किताब त्यांस अर्पण केला. या वेळींहि कंपनीच्या अधिकाऱ्यांना त्याची ही कामगिरी आवडली नाहीं तथापि, इग्लडात त्याचा मोठा गौरव झाला आणि ब्रिटिश मंत्रिमडळानेंहि त्याचे प्रतिनिधित्व मान्य केलें तेव्हा अखेरीस कपनीच्या डायरेक्टरांनींहि खाजगी म्हणून त्याना एक मेजवानी देऊन त्यांचा सत्कार केला इग्लडात जाऊन तेथील अधिकारीवर्गाकडून आणि मोटमोठ्या विद्वान् व तत्त्वज्ञ लोकाकडून गौरव करून घेण्याचा पहिला मान हिंदी पुढाऱ्यात राममोहन यानाच मिळाला या वेळीं ईस्ट इडिया कंपनीला नवी सनद देण्याचा विचार करण्यासाठीं पार्लमेटची सिलेक्ट कमिटी नेमिली होती तिच्यापुढे साक्ष देऊन हिंदी राज्यकाभारासबधींचे आपले विचार त्यांनीं माडावेत अशी त्याना विनति करण्यात आली होती, पण त्यांनीं तसे करण्याचे नाकारिले. तथापि, कपनीच्या बोर्ड ऑफ कंट्रोलकडे आपल्या मतपत्रिका पाठवून हिंदुस्थानांतील राज्यकारभाराच्या सुधारणासबधीं त्यांनीं आपलीं मते स्पष्टपणे कळविलीं. या मतपत्रिकांत त्यांनीं पुढील राजकीय सुधारणाचा पुरस्कार केला आहे : (१) सुशिक्षित हिंदी लोकाना वरिष्ठ अधिकाराच्या जागा अधिक द्याव्या व अशिक्षित जनतेला लष्करी शिक्षण देऊन लष्करी स्वयसेवकपथके तयार करावीत (२) अमलबजावणीखाते व न्यायखाते याचे पृथक्करण करून न्यायखात्यात हिंदी लोकांचा अधिक भरणा करावा (३) 'सदर दिवाणी' कोर्टाला "हेबस कॉर्प्सस रिट्" देण्याचा अधिकार देऊन नागरिक-स्वातंत्र्य सुरक्षित करावें. (४) न्यायखात्यात पचायतपद्धति व ज्यूरीची पद्धति याचा प्रवेश करावा. (५) जमीनदारानी रयतेवरील खड कमी करावा. (६) सरकारने जमीनदाराकडून कमी सारा घ्यावा व यामुळे कमी होणारी जमाबदी भरून काढण्यासाठीं चैनीच्या मालावर कर बसवावेत. (७) इग्लडांतून कांहीं नमुनेदार जमीनदार आणून त्याच्यामार्फत येथील लोकांना शेतीसुधारणेचे शिक्षण द्यावें. (८) रयतेला जामिनीवर कायमचा हक्क मिळेल अशी व्यवस्था करावी. (९) हिंदुस्थान सरकारचा विलायतेंत होणारा खर्च कमी करावा आणि (१०) हिदुस्थान सरकारला कांहीं बाबतींत विलायत सरकारच्या नियत्रणांतून मुक्त करावे. असे केल्यानें हिंदी लोकाना स्वराज्याचे हक्क प्राप्त झाले नाहींत, तरी येथील कारभाराकडे त्याचे अधिक लक्ष लागून त्यांना त्याबद्दल आपुलकी वाटू लागेल. हिंदुस्थान सरकारनें प्रत्यक्ष प्रातिनिधिक सस्था स्थापन कराव्या असे त्यांनीं म्हटले नसलें, तरी आपले धोरण ठरवितांना व कायदे करताना लोकमताला मान

द्यावा व हे लोकमत बनविणाऱ्या वृत्तपत्रांना पूर्ण मुद्रणस्वातंत्र्य असावें, अशीहि त्यांची इच्छा होती. या बाबतींतहि राममोहन यांच्या निधनानंतर सुमारे पधरा वर्षांत महाराष्ट्रांत पुढे आलेले लेखक 'लोकहितवादी' हे इ स १८४८ त हिंदुस्थानांत पार्लमेंट स्थापन झाले पाहिजे असे स्पष्टपणें लिहितात, हे विशेष लक्षांत घेण्याजोगे आहे. तात्पर्य, स्वदेशीप्रमाणें स्वराज्याच्या कल्पनेचाहि स्पष्ट उच्चार व प्रचार करण्याचा पहिला मान या महाराष्ट्रीय सर्वांगीण सुधारणावादी पुढाऱ्यालाच द्यावा लागतो.

## भारताचें भवितव्य

प्रातिनिधिक लोकसत्तेचे तत्त्व हिंदुस्थानास लागू करावे अशी स्पष्ट मागणी करणें जरी राजा राममोहन रॉय यांना त्या वेळच्या परिस्थितींत व्यवहार्य वाटत नसले, तरी ते लोकसत्तेचे चहाते व भोक्ते होते यांत शका नाहीं जगात कोठेहि लोकसत्तेचा विजय झाल्याचें ऐकून त्यांना आनद होत असे ते विलायतेस गेले तेव्हां फ्रेंच लोकांच्या लोकशाही झेड्याला वदन करण्यांत त्याना धन्यता वाटली आणि तसे करण्यास जात असताना बोटीवरून उतरताना ते पाय अडखळून पडले असे म्हणतात इंग्लडांत ते गेले तेव्हा १८३२ च्या पार्लमेंटच्या सुधारणा-कायद्याची चळवळ चालू होती. हा कायदा पास झाला नाहीं, तर आपण ब्रिटिश साम्राज्याचा त्याग करून अमेरिकेंत जाऊन राहू, असे त्यानीं एकदा बोलून दाखविले होते आपले लोक अद्यापि लोकसत्तेचा उपभोग घेण्याला लायक झाले नाहींत असे त्याना वाटत असले, तरी सुमारे एक शतकात आपले लोक ब्रिटिशांच्या सहवासाने सुधारतील व मग आपल्यावरील अन्यायाचा प्रतिकार करण्यास ते समर्थ होतील, अशी त्याची अपेक्षा होती अशा वेळीं आयर्लंडपेक्षां हिंदुस्थानच्या प्रतिकाराचे निवारण करणे ब्रिटिशाना कठिण जाईल, कारण आयर्लंड अगदी जवळ असल्यामुळे तेथें वाटेल तेव्हां आपले आरमार ब्रिटिश पाठवू शकतात व तो देश लहान असल्यामुळे त्याला ते चुरडूंहि शकतात. पण हिंदुस्थानसारखा मोठा, सधन आणि दूरचा देश जर शत्रु बनेल, तर इंग्लडला त्याचे पारिपत्य करतां येणार नाहीं असे त्यानीं एका पत्रात सुचविले आहे पण त्यांची इच्छा मात्र तशी नव्हती इंग्लडने हिंदुस्थानला आपला समान दर्जाचा मित्र बनवावा, म्हणजे कानडाप्रमाणे तोहि साम्राज्याविरुद्ध बड करणार नाहीं असे ते म्हणत. तथापि, दैवयोगाने इंग्लड व हिंदुस्थान हे दोन देश परस्परापासून विभक्त झाले, तरी त्यांचे संबंध मित्रत्वाचे रहावेत आणि त्या दोन देशात व्यापारी, वैचारिक व सांस्कृतिक विनिमय सतत चालावा अशी त्यांची अंतिम मनीषा होती त्यांच्या मताप्रमाणें अशी स्थिति प्राप्त होईल तेव्हां हिंदुस्थाननें खिस्तीधर्मांतील सर्व उदात्त तत्त्वे आत्मसात् केलेलीं असतील, इंग्लिश भाषा सर्वांना अवगत झालेली असेल, आणि भौतिक शास्त्रें, यत्रकला व राज्यशास्त्र इत्यादि विषयांचें सर्व पाश्चात्य

ज्ञानभांडार आत्मसात् करून हिंदुस्थान आपल्या सभोवतालच्या आशियातील इतर देशांना सुसंस्कृत करण्याचे कार्य इंग्लंडच्या सहकार्याने करीत असेल.*

४

# महाराष्ट्रांतील आद्य सुधारक

" जो उद्योग आम्ही योजिला आहे, त्याचा प्रारंभ करतेवेळेस नियतकालिक लेखापासून जे स्वार्थ होतात त्याविषयीच्या काही गोष्टी या स्थळी लिहिणे हे अयोग्य नव्हे ज्या देशातून आपले साप्रतचे शककर्ते एथे आले, त्या देशात ते एथे आल्याचे पूर्वी फार दिवसापासून या आश्चर्यकारक छापयत्राची कृत्ये चालू होती, त्यापासून मनुष्याचे मनातील अज्ञानरूप अधकार जाऊन त्यावर ज्ञानरूप प्रकाश पडला या सज्ञानदशेस येण्याचे साधनामध्ये इतर सर्व देशापेक्षा युरोप देश वरचढ आहे नियतकालिक लेखापासून जे स्वार्थ होतात, ते आम्हास साप्रतचे राजाचे द्वारें माहीत झाले ज्या ज्या देशामध्ये अशा लेखाचा प्रचार झाला आहे, तेथे तेथे लोकाचे आतरव्यवहारामध्ये तसेच बाह्य व्यवहारामध्यें शाश्वत हित झालें आहे यापासून बहुत वेळ विद्याची वृद्धि झाली आहे. लोकामध्ये नीति रूपास आली आहे केव्हा केव्हा प्रजानी राजाचे आज्ञेत वर्तावे आणि राजानीहि त्यावर जुलूम करू नये अशा गोष्टी यापासून घडल्या आहेत अलीकडे कितेक देशात धर्मरीति आणि राज्यरीति यात जे चागले आणि उपयोगी फेरफार झाले आहेत, त्यासहि थोडेबहुत हे लेख उपयोगी पडले आहेत "

**शिरोभागी** दिलेला उतारा इ स. १८३२ साली मुंबई येथे आचार्य बाळशास्त्री जांभेकर यांनी जे इंग्रजी-मराठी पहिले साप्ताहिक वर्तमानपत्र सुरू केले, त्याच्या पहिल्या अंकातील लेखांतून घेतलेला आहे. पाश्चात्य विद्या आत्मसात् करून तिच्यातून प्राप्त झालेले ज्ञान महाराष्ट्रांतील वाचकवर्गात फैलावण्याचे कार्य करण्याच्या उद्देशानें साप्ताहिक वृत्तपत्र काढण्याचा हा पहिलाच उपक्रम होता तो करीत असतांना त्याच्या डोळयापुढे बगाल प्रातात राजा राममोहन रॉयप्रभृति सुधारकानीं ज्या प्रकारची लोकजागृति केली तिचा आदर्श असला, तरी तिकडील धर्मसुधारकाचे केवळ अंध अनुकरण करण्याची वृत्ति बाळशास्त्री यांची नव्हती तरीहि बगाल प्रांतांतील लोक पाश्चात्य विद्येच्या प्रसारामुळे आपल्या प्राताच्या पुढे गेले आहेत हे जाणून आपणहि आपली सुधारणा करावी व त्याच्या बरोबरीस यावे असा विचार त्यांच्या या उपक्रमामागे होता. वरील लेखांतच यासंबंधी ते पुढे लिहितात :

* या विषयासबधी त्याचे विचार पुढील दोन उताऱ्यात व्यक्त झाले आहेत

" Supposing that some hundred years hence the native character becomes elevated, from constant intercourse with Europeans and the acquirements of

"बंगाल प्रांत इंग्रेजांचे हातीं येऊन साठसत्तर वर्षें झालीं, परंतु इतक्यांतच त्या देशाचे स्थितींत जें अंतर पडलें ते पाहिलें असतां विस्मय होतो. जो देश सुमारें शंभर वर्षांपूर्वी बलात्कार, जुलूम, आणि कुनीति यांचें केवळ घर होता, तो आता निर्भयपण आणि स्वतंत्रता भोगतो, आणि तेथील लोकांस युरोप खडांतील विद्या आणि कलाचें विशेष ज्ञान होत आहे, हे पाहून चांगला राजा आश्रित वागणाऱ्या प्रजाचें कल्याण करायास इच्छितो, तर त्याचे हातून काय काय घडेल, यास योग्य दृष्टांत सापडतो.

"हा हिंदुस्थानाचा प्रदेश इंग्रेजी अमलाखाली येऊन जरी थोडकींच वर्षे झालीं आहेत, तरी जो अज्ञानांधकार फार दिवसपर्यंत या देशास व्यापून होता तो जाण्यास प्रारंभ झाला आहे, आणि बंगाल देशचे लोक सांप्रत आमचेपेक्षां जा गुणांमध्ये विशेष आहेत त्यामध्ये आम्ही त्याचेसारिखे होऊं असा दिवस लवकरच येईल, असी आम्ही आशा करीत आहो"

इ. स. १८३२ चा काळ म्हणजे इंग्लंडांत पार्लमेंटची सुधारणा होऊन प्रागतिक राजकारणाचा उदय होण्याचा काळ होय या वेळीं बंगालचे पुढारी राजा राममोहन रॉय हे इंग्लडात गेलेले होते व त्यांची कीर्ति ब्रिटन व भारत या दोनहि देशांत पसरू लागली होती मुंबईत 'दर्पण' पत्र सुरू करून आचार्य बाळशास्त्री जांभेकर यानीं अशाच प्रकारचें एक नवें युग पश्चिम भारतांत व महाराष्ट्रात सुरू करण्याचा महनीय प्रयत्न केला असें म्हणता येईल बाळशास्त्री जांभेकर याचा जन्म

---

general and political knowledge, as well as of modern arts and sciences, is it possible that they will not have the spirit, as well as the inclination, to resist effectively, unjust and oppressive measures serving to degrade them in the scale of society? It should not be lost sight of that the position of India is very different from that of Irland, to any quarter of which an English fleet may suddenly convey a body of troops that may force its way in the requisite direction, and succeed in suppressing every effort of a refractory spirit Were India to share one-fourth of the knowledge and energy of that country, she should prove, from her remote situation, her riches and her vast population, either useful and profitable as a willing province, an ally of the British Empire, or troublesome and annoying as a determined enemy"

—Raja Rammohan by N C Ganguly, P 106-107

"If, however, events occur to effect a separation between the two countries, still the existence of a large body of respectable settlers (consisting of Europeans and their descendents) speaking the English Language in common with bulk of the people as well as possessed of superior knowledge, scientific, mechanical and political, would bring that vast Empire in the East to a leval with other large Christian countries in Europe . enlightening the surrounding nations of India."

—Ibid, P 210

इ स. १८१२ सालीं रत्नागिरी जिल्ह्यांत झाला त्याचे घराणे शास्त्र्यांचे होते. त्यांची बुद्धि जात्याच अतिशय तेजस्वी व सशोधक होती मुबई इलाख्यांतील विद्याखात्याच्या अगदीं प्रारंभकालीं बॉबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या इंग्रजी शाळेंत १८२६ चे सुमारास त्यांचा प्रवेश झाला, व १८३० सालीच आपला शिक्षणक्रम सपवून अवघ्या सतराव्या वर्षी त्या सोसायटीचे डेप्युटी सेक्रेटरी म्हणून मि रॉबर्ट कॉटन् मनी यांच्या हाताखालीं ते काम करू लागले; आणि पुढे दोनच वर्षांनीं नेटिव्ह सेक्रेटरी म्हणून त्यांची नेमणूक झाली या वेळेपासून ते १८४६ सालीं अकालीं निधन होईपर्यंत बाळशास्त्री जांभेकर शिक्षणखात्याच्या उच्च सरकारी नोकरींत होते आरभीं दोन वर्षे अक्कलकोटच्या युवराजाचे शिक्षक म्हणूनहि त्यांनीं काम केलें मुबईस गव्हर्नर एल्फिन्स्टन् याच्या नावे उच्च शिक्षण देणारे कॉलेज स्थापन करण्याचे ठरतांच सन १८३४ मध्ये त्या कॉलेजात असिस्टट प्रोफेसर म्हणून त्याची नेमणूक झाली हा मान मिळविणारे ते आद्य हिंदी विद्वान् होत गणित, ज्योतिष व भौतिक शास्त्रें हे विषय ते मुख्यत्वे शिकवीत असून कुशल अध्यापक म्हणून ते प्रसिद्ध होते. मराठी व सस्कृत ह्याव्यतिरिक्त लॅटिन, ग्रीक, इग्लिश व फ्रेंच ह्या युरोपीय भाषा आणि फार्सी, आरबी, हिंदी, बंगाली, गुजराती व कानडी ह्या भाषा त्यांस अवगत होत्या व्याकरण, धर्मशास्त्र व इतिहास या विषयातहि ते प्रवीण होते बाळशास्त्री असिस्टट प्रोफेसर म्हणून नेमिले गेले असले, तरी गणित-विज्ञानाचे मुख्य प्रोफेसर ऑर्लीबार हे रजेवर असताना दोन वर्षे (१८४२-४४) त्यानी मुख्य प्रोफेसराचेहि काम केले होते या कॉलेजातील उच्च अध्यापनकार्याबरोबरच त्याना शेवटचीं चारपांच वर्षे मुबई इलाख्याच्या दक्षिण भागांतील प्राथमिक शाळाच्या तपासणीचे कामहि करावे लागे शिवाय सन १८४५ मध्ये मुबईस त्याच्याच नेतृत्वाने पहिली अध्यापकशाळाहि स्थापण्यांत आली होती अर्थात् अलीकडील परिभाषेंत त्यांचें यथार्थ वर्णन करावयाचे तर आद्य कॉलेज-प्रोफेसर, एज्युकेशनल् इन्स्पेक्टर व ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपल असे ते केले पाहिजे याचबरोबर शालोपयोगी पुस्तके सिद्ध करण्याचे कामहि त्यांजकडे असून त्यानीं स्वतः अनेक विषयावर उपयुक्त पुस्तके रचिलीं आहेत.

प्रत्यक्ष शिक्षणव्यवसायातील हीं कामे करून त्यांनीं प्राचीन शिलालेखावर सशोधनात्मक लेखहि लिहिलेले आहेत रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुबई शाखेचें नियतकालिक १८४१ सालीं सुरू झाले, त्या वेळेपासून त्यात त्याचे हे शोधनिबध प्रसिद्ध झाले आहेत अशा प्रकारे अनेक विद्याचा व्यासग चालू ठेवून मुबई इलाख्यांतील सरकारी शिक्षणखात्याचें कार्य नांवारूपास आणण्यास त्यानी बहुमोल साहाय्य केलेलें आहे. या शिक्षणविषयक व सशोधनात्मक कार्याबरोबरच त्यांनीं 'दर्पण' हें साप्ताहिक पत्र साडेआठ वर्षे चालविण्यांत प्रमुख भाग घेतला; आणि ते बंद होण्याच्या सुमारास 'दिग्दर्शन' नांवाचें पहिलें मराठी मासिक १८४० सालीं सुरू

केलें याशिवाय त्या वेळीं मुंबईत ज्या ज्या सामाजिक, धार्मिक व शिक्षणविषयक चळवळी होत असत, त्यांतहि ते प्रमुखपणाने भाग घेत असत हे त्याचे गुण पाहून सरकारानें त्याची 'जस्टिस ऑफ दि पीस' म्हणून १८४० सालीं नेमणूक केली. या नात्याने त्यांना हायकोर्टात ग्रँड ज्यूरीमध्यें काम करावे लागत असे आणि या कामांतहि त्यानीं चागलाच लौकिक मिळविला होता.

राममोहन रॉय याच्याप्रमाणे एकादा नवा धर्मपंथ स्थापन करून धर्मसुधारणा करण्याचे धोरण जरी बाळशास्त्र्यांना पसंत पडण्यासारखें नव्हते, तरी सामाजिक व धार्मिक सुधारणांच्या बाबतींत त्यांची वृत्ति प्रागतिक होती बालविधवांना पुनर्विवाह करण्याची मुभा असावी, स्त्रियांना शिक्षण मिळावे, आणि हिंदुधर्मातून परधर्मात गेलेल्यांना शुद्ध करून पुनः स्वधर्मात घेण्यांत यावे, अशा प्रकारचीं त्यांचीं मते होतीं त्या वेळीं ख्रिस्तीधर्माचे प्रचारक स्वतःच्या शाळा चालवून त्यात येणाऱ्या विद्यार्थ्यांना आपल्या धर्माची दीक्षा देण्याचे नाना प्रकारें अयोग्य प्रयत्न करीत असत. राज्यकर्ते ख्रिस्तीधर्माचे असल्यामुळे त्यांच्या या अयोग्य प्रयत्नांचाहि प्रतिकार करणें अथवा त्यांना आळा घालणें सामान्य लोकांस जवळजवळ अशक्य होते. अशा परिस्थितींत ख्रिस्ती मिशनऱ्याच्या ताब्यात गेलेल्या श्रीपाद शेषाद्रि परळीकर या नांवाच्या एका अल्पवयी ब्राह्मण मुलास मिशनऱ्यांच्या तावडींतून सोडवून घेऊन त्याच्या बापाच्या हातीं त्याला देण्याचे महत्प्रयासाचें कार्य सुप्रीम कोर्टाचा हुकूम मिळवून बाळशास्त्री यानीं घडवून आणिलें पण त्या मुलाला प्रत्यक्ष ख्रिस्तीधर्माची दीक्षा देण्यात आलेली नसली, तरी ब्राह्मणसमाज त्याला परत आपल्यात घेण्यास तयार नव्हता तथापि, या कामीं अनेक प्रकारचे प्रवाद व छळ सोसून बाळशास्त्री यांनीं श्रीपाद शेषाद्रीस शुद्ध करून घेण्यांत यश मिळविले. अशा प्रकारें हिंदुसमाजास धक्का देऊन जागृत व पुरोगामी बनविण्याच्या कार्यात आचार्य बाळशास्त्री जाभेकर यानीं महाराष्ट्रात अग्रेसरत्व संपादन केलें. आणि लोकांत व राजदरबारीं मानमान्यता मिळवून महाराष्ट्राच्या बुद्धीला आधुनिक वळण लावण्याचा पहिला मान मिळविला. ही थोर पदवी त्यानीं आपल्या केवळ विद्वत्तेच्या व चारित्र्याच्या भांडवलावर वयाच्या अवघ्या तेहतीस वर्षाच्या आत प्राप्त करून घेतली, हे विशेष होय

तथापि, श्रीपाद शेषाद्रीच्या पतितपरावर्तनाच्या या प्रकरणात बाळशास्त्री यांचा ब्राह्मणवर्गाकडून जो छळ झाला तो लक्षात घेतल्यास, त्या वेळीं हिंदुधर्माचे रक्षक समजले गेलेले ब्राह्मण हे किती दुराराध्य होते हे जसे समजून येते, तसेंच अशा समाजाची सुधारणा करूं इच्छिणाऱ्याचा किती छळ होत असेल हेहि स्पष्टपणे निदर्शनास येतें अशा कठोर धर्मबंधनानीं व जातिनिर्बंधांनीं जखडलेल्या समाजात सुधारकाचा जो छळ होत होता तो लक्षांत घेतां, अशा परिस्थितींत धार्मिक व सामाजिक बंधनांविरुद्ध बंड करण्यासाठीं एकादी गुप्त मंडळी स्थापण्याचा विचार जर कोणास सुचला, तर त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

## सुधारकांचें गुप्त मंडळ

श्री. दादोबा पांडुरंग प्रभृतींनीं मुंबईस एक 'परमहंस मंडळी' या नावाची 'गुप्त' संस्था जातिभेद मोडण्याच्या उद्देशानें काढिली होती. या संस्थेची माहिती रे. बाबा पदमजी यांनीं आपल्या आत्मचरित्रांत पुढीलप्रमाणें दिली आहे :

"या मंडळीचीं मुख्य मतें अशीं होतीं, कीं जातिभेद मानूं नये. विधवांच्या पुनर्विवाहासंबंधीं संमति असावी व मूर्तिपूजा करूं नये. बाकीचे धर्मसंबंधीं विचार कसेहि असोत, त्याविषयीं कांहीं निर्णय केला नव्हता. आणि मंडळीची संख्या मोठी वाढेपर्यंत हीं मतें गुप्त ठेवावीं, म्हणजे मंडळीची परिस्फुटता करूं नये, परंतु मंडळी वाढविण्याकरितां प्रयत्न करावे, ही एक मंडळींत येण्याची अट होती. हिच्या सभा गुप्त रीतीनें भरत. मंडळींत प्रवेश करणारास तिचे नियम वाचून दाखविल्यावर व त्यानें त्यास संमति दर्शविल्यावर तो ओंजळींत पाणी घेऊन खालीं सोडी. नंतर एक दुधाचा पेला आणून प्रथम अध्यक्षानें व नंतर दुसऱ्या कित्येकांनीं तोंडास लाविल्यावर त्याला प्यायास देत आणि रोटीचा (पावाचा) तुकडा खायास देत ... सभेच्या आरंभीं व शेवटीं मराठींत प्रार्थना वाचीत, त्या रा. ब. दादोबा पांडुरंग यांनीं रचिलेल्या होत्या. सभेचे अध्यक्ष त्या वेळचे कष्टमखात्याचे रा. ब. रामचंद्र बाळकृष्णजी (राम बाळकृष्ण) होते. रा. ब. दादोबा पांडुरंग व रा. रा. भाऊ महाजन हे जरी मंडळीच्या मताचे व मंडळीचे पुरस्कर्ते होते, तरी कधीं सभेस येत नसत. आलेच तर दुसऱ्या खोलींत बसत व सभा विसर्जन झाल्यावर अध्यक्षाची व कांहीं निवडक मंडळींची भेट घेत. रा. ब. दादोबाचे बंधु रा. रा. डाक्तर आत्माराम पांडुरंग हे या मंडळीचे सभासद होते, पण यांची वर्तणूक अशा प्रकारची नव्हती. ते सभेस येत, इतकेंच नाहीं तर आपल्या घरीं सभा भरवीत."[१]

राजकारणासाठीं गुप्त मंडळ्या स्थापन झाल्याचे आपण पुष्कळ वेळां ऐकतों, पण जातिभेदासारखी सामाजिक संस्था मोडण्यासाठीं अशी गुप्त मंडळी स्थापन झाल्याचें फारसें कोठें ऐकूं येत नाहीं. पण ज्याप्रमाणें राजकीय मतस्वातंत्र्य नसलेल्या राज्यांत राजकीय जुलुमामुळें राजकीय गुप्त मंडळ्या स्थापन होणें साहजिक, त्याच-प्रमाणें सामाजिक बाबतींत मतस्वातंत्र्य किंवा आचारस्वातंत्र्य उपभोगणाराच्या समाजाकडून छळ होण्याच्या काळात सामाजिक सुधारकांपैकीं कांहींना आपली संख्या विशिष्ट संख्येच्या वर जाईपर्यंत अशी संस्था स्थापून गुप्त रीतीनें काम करण्याची बुद्धि झाली, तर त्यात आश्चर्य मानण्याचें कारण नाहीं. या सभेच्या सभासदांत ख्रिस्ती व मुसलमान लोकहि होते आणि तिच्या शाखा मुंबईच्या बाहेरहि कांहीं ठिकाणीं होत्या. राजकीय कार्यकर्त्यांच्या गुप्त मंडळ्यांतहि अनेक वेळां नैतिक अनाचारी लोक शिरल्याचें दिसून येतें. त्याचप्रमाणें या संस्थेच्या बाबतींतहि झाल्याचे प्रवाद ऐकूं

---

[१] श्री. न. र. फाटककृत रानडे-चरित्र, पृ. १२६–२७

येतात. तें कांहीं असले, तरी सभेचे मूळ हेतु त्यामुळें अशुद्ध ठरत नाहींत. दादोबा पांडुरग यानीं या सस्थेच्या मार्गदर्शनासाठीं 'पारमहसिक ब्राह्मधर्म' या नांवाचा एक **कविताबद्ध ग्रंथ** लिहिला आहे त्यावरून त्या संस्थेचे धर्मसुधारणेचे विचार समजूं शकतात त्यातील कांहीं कविता खालीं दिल्या आहेत :

**"दयाभक्तिशील। मनाचे मवाळ। करिती हळहळ। देशाचीया॥**
**घ्यावें हाती त्यांणी। संकल्पाचे जल। मार्ग हा प्रांजल। चालवाया॥**
**ब्राह्ममंडळींत। की एका समोर। बोलावा विचार। आपला हा॥**
**प्रविष्ट पुस्तकी। स्वनाम लिहून। द्यावे आलिंगन। ब्राह्मास पै॥**
**तिथेच करावें। प्रीतींचें भोजन। विधि हा संपूर्ण। होय तेव्हां॥**
**वृद्धिंगत होई। स्नेहीं एकमकीं। ऐशा वागणुकी। चालवाव्या॥**
**उघडे सांगावे। अहो ब्राह्म आम्ही। असा जरी तुम्ही। पुजूं तुम्हां॥**

* * *

**"करा किंवा टाका। बाह्य धर्म सोंग। ठेवा अंतरंग। शुद्ध तरी॥**
**बोला अल्प किंवा। नका कांही बोलूं। सत्कर्मी द्या चालूं। हात पाय॥**
**कर्मेंचि देताती। फले सर्व लोकी। सांगे बुद्ध नाकी। देव सारे॥**
**म्हणोनिया दावा। सदाचरणांत। ज्ञानाचा तो अंत। दादो म्हणे॥"***

या सभेचे काम इ. स १८६० पर्यत म्हणजे सुमारे पधरा वर्षेपर्यंत चालू असावे, पण त्या वेळीं सभासदापैकींच कोणीं सस्थेची जाहीर वाच्यता केली व सभासदांचीं नावे प्रसिद्ध केलीं तेव्हा सर्वच सभासद अग झाडून दूर झाले व सामाजिक बहिष्काराच्या भीतीनें घरोघरीं स्वस्थ बसले! नीतिधैर्याच्या अभावीं सामाजिक सुधारणा तरी कशी होणार? तथापि, या सस्थेच्या राखेतूनच पुढे १८६७ सालीं मुंबईस प्रार्थनासमाजाची स्थापना झाली असे श्री फाटक लिहितात प्रार्थनासमाजास न्या रानडे व डॉ. भांडारकर यांच्यासारखे विद्वान् व सच्छील लोक मिळाल्यामुळे त्याचा काहीं काल बराच बोलबाला झाला. तरीहि बंगालमधील ब्राह्मसमाजाप्रमाणें या समाजाला महाराष्ट्रीय जीवनात महत्त्वाचे स्थान फारसे कधींच प्राप्त झालें नाहीं. याचे कारण असें दिसते, कीं महाराष्ट्रात इ स १८८० मध्ये चिपळूणकर, आगरकर व टिळक या तीन थोर विभूती निघून त्यानीं महाराष्ट्रांत राष्ट्रवाद व बुद्धिवाद यांची स्थापना केली.

महाराष्ट्रात १८८० च्या सुमारास टिळक-आगरकर यांनीं आजन्म देशसेवेची दीक्षा घेतलेल्या लोकांचा एक संप्रदाय निर्माण करण्याची जी अपूर्व प्रथा पाडिली, तिच्या प्रभेमुळें प्रार्थनासमाजी सुधारक मडळींचें तेज निस्तेज झालें आणि महाराष्ट्रातील तरुणाचीं अतःकरणे निराळयाच लोकांनीं आपणाकडे आकर्षून घेतली.

या घडामोडींचा विचार करण्यापूर्वी आपणांस महाराष्ट्रांतील आद्य सुधारकांच्या

* पाध्ये व टिकेकर कृत 'आजकालचा महाराष्ट्र', पु. २४९–५०

कार्याचा विचार करावयाचा आहे या कार्याचा मोठ्या प्रमाणावर प्रचार करण्याचें श्रेय सरदार गोपाळराव हरी देशमुख ऊर्फ 'लोकहितवादी' यांनाच द्यावे लागतें. बाळशास्त्री जांभेकर यांच्या साहाय्यानें भाऊ महाजन यांनीं इ स १८४१ मध्यें मुबईत सुरू केलेल्या 'प्रभाकर' नांवाच्या पत्रांत त्यांचे लेख प्रथमतः येऊं लागले व त्यामुळें त्यांच्या मताचा प्रसार मोठ्या प्रमाणावर होऊ लागला

लोकहितवादीनी आपल्या लिखाणास इ. स १८४८ मध्ये म्हणजे आपल्या वयाच्या पचविसाव्या वर्षी प्रारभ केला. त्यांचा जन्म इ स १८२३ मध्ये म्हणजे पेशवाई बुडाल्यानतर पांच वर्षांनीं पुण्यातच झाला होता. ते वीस-पचवीस वर्षांचे झाले तेव्हा पुण्यातील ब्राह्मण लोक पेशवाई बुडाल्यामुळें अवनत स्थितीला जाऊ लागले असल्यामुळे इग्रजाचे राज्य चागले कीं वाईट यासबधीं घरोघर चर्चा चालू होती यात काहीं आश्चर्य नाहीं लोकहितवादीचे वडील हरिपत देशमुख हे पेशवाई तारण्यासाठीं अखेरपर्यंत लढून धारातीर्थी देह टाकणाऱ्या बापू गोखल्यांचे फडणीस होते, आणि एल्फिन्स्टन् साहेबांनीं बोलाविले असता ते त्याचे भेटीस गेले नाहींत, म्हणून त्यांची जहागीर जप्त करण्यांत आली होती. पण अखेरीस पेशव्यांच्याच मध्यस्थीने त्याना ती त्यांच्या निधनापर्यंत उपभोगावयास पुनः मिळाली. पुढे त्यांच्या मृत्यूनतर ती जप्त झाली व गोपाळराव देशमुखाना प्रथम उमेदवारी, नंतर मुन्सफी, कांहीं दिवस आसिस्टंट जज्ज् व अखेरीस स्मॉल कॉज कोर्टाचे न्यायाधीश, अशी राजसेवा करावी लागली. ते इ स १८७८ त सेवानिवृत्त झाले व १८९२ मध्ये आपल्या वयाच्या एकोणसत्तराव्या वर्षी निवर्तले अर्थात् इग्रजी अमदानींतील पहिल्या सुशिक्षित पिढीबरोबर सार्वजनिक कार्यास प्रारभ करून रानडे, भांडारकर, तेलगांची दुसरी पिढी व चिपळूणकर, टिळक, आगरकर यांची तिसरी पिढी देशसेवा करीत असलेली पाहण्याचें भाग्य त्याना लाभले त्यानी जेव्हां १८४८ मध्यें सार्वजनिक विषयावर लिहिण्यास सुरुवात केली, त्या वेळीं ते टिळक-आगरकर यांच्याप्रमाणेच वयाने तरुण होते आणि त्याच्या वेळच्या सुशिक्षित लोकांच्या मानानें अधिक विद्वान्, अधिक तडफदार आणि अधिक दूरदर्शी असे होते, यात शका नाही ब्रिटिश राज्याविरुद्ध बंड करून स्वराज्य प्राप्त होऊ शकेल किंवा आपल्या देशांतील सरदार लोक एक होऊन इग्रजाना हाकलून देऊ शकतील ही गोष्ट त्यांना, सर्व गुरे एक होऊन गुराख्याचा अमल झुगारून देतील किंवा हत्ती बलाढ्य झाला म्हणून अंकुशधारी माहुतास भारी होईल, या गोष्टीइतकीच असंभवनीय वाटत होती, हे त्याच्या लिखाणावरून दिसून येतें. त्यांच्या वेळचे ब्राह्मण लोक इग्रजी राज्याला शिव्या देत असत. त्यामुळें आपणांस अवनत दशा येत चालली असे म्हणत असत व पेशवाईची आठवण काढून रडत असत. पण या इग्लिश राज्याचा प्रतिकार कसा करावा, याची कांहींच कल्पना त्यांना नव्हती एल्फिन्स्टनने पुणे काबीज केल्यानतर पुण्यांतील ब्राह्मणांनीं एक लहानसें बडहि केले होते व ते एल्फिन्स्टनने तात्काळ मोडूनहि

टाकिले होते. पण या वेळेपासून या ब्राह्मणांनीं इंग्रजांपुढे जी हाय खाल्ली ती दोन पिढ्या तरी कायम टिकली, असे म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां अशा भेकड, अज्ञानी आणि वैयक्तिक स्वार्थांत रत झालेल्या ब्राह्मणाकडून इंग्रजाचे पारिपत्य होणे अशक्यच होते. अर्थात् अशा ब्राह्मणांच्या शिव्याशापानीं किंवा पेशवाईच्या शोकयुक्त स्मरणाने इंग्रजाचे कांहीच नुकसान होणारे नव्हते. याच्या या सुस्काऱ्यामुळे एक मात्र फायदा त्या वेळीं पुण्यांत वावरणाऱ्या व्यक्तीला होण्यासारखा होता. तो म्हणजे इंग्रजी अमलांत आम्ही दरिद्री व सत्ताहीन बनत चाललो आहो याची जाणीव त्याला सदैव राही पुण्यातील ब्राह्मणाला बंगालमधील हिंदूप्रमाणे इंग्लिश राज्य हे मुसलमानांच्या जुलुमांतून सोडविण्यास परमेश्वराने येथें धाडिले आहे, असे वाटण्याचें कारण नव्हते आणि आपली या राज्याखालीं मोठी भरभराट होत आहे असेहि विचार केल्यास त्यास वाटण्याचे कारण नव्हतें इंग्रजी विद्येचा प्रसार होऊ लागल्यानंतर कोंकणातून खांद्यावर पडशी टाकून देशावर येणाऱ्या व इंग्रजी शिकून मामलत मिळाली म्हणजे स्वर्ग प्राप्त झाला असे मानणाऱ्या भटजींना काहीं काळ तसा भास झाला तरी पुण्यातील सरदारकुलात जन्म पावून बापाची जहागीर गमावल्यामुळे सरकारी नोकरी करावी लागलेल्या गोपाळरावांना इंग्रजी राज्यामुळे आमचा देश निर्धन होत चालला आहे व ही निर्धनता घालविण्यास राजकीय सुधारणा झाली पाहिजे, याची जाणीव होण्यास फार काळ लागण्याचें कारण नव्हतें व तो तसा लागलाहि नाहीं

आपल्या वयाच्या पचविसाव्या वर्षी ( १८४८ ) लोकहितवादींनीं मुंबईस भाऊ महाजन याच्या सपादकत्वाखालीं निघणाऱ्या "प्रभाकर" साप्ताहिकांत लेख लिहिण्यास सुरुवात केली त्यांत ता १३ ऑगस्ट १८४८ रोजीं "राज्यसुधारणा" या मथळ्याचा एक लेख त्यानीं लिहिला आहे. त्यातील पुढील उतारा फारच वाचनीय आहे:

"लोक मूर्खपणात राहून भिकारी होत चालले व अज्ञानरोगानें ग्रस्त होऊन मरावयास टेकले त्यास औषध कशाचीं? स्वदेशीय राजधानींतील लोकास आम्ही काहीं म्हणत नाहीं कारण त्याची निद्रा कुंभकर्णासारखी आहे जरी आम्ही त्याच्या कानाशीं नौबती वाजविल्या तरी ते जागृत होणार नाहींत. घोरत असतील व जेव्हां त्यांस कोणी येऊन लाथ मारील तेव्हा ते जागे होतील. असो. परंतु गतश्री जे लोक झाले आहेत त्यांस सांप्रत काळचे राज्यामुळें अडचणी किती आहेत याची माहिती असेल पुण्यासारखीं बुडतीं शहरे व तुच्छ मानलेली जात ब्राह्मणासारखी, त्यांतील लोकांस माहिती असेल, कीं आपला देश निर्धन होत चालला आहे याचा विचार करणें सर्वांस उचित आहे **आणि मुलखाचे दरिद्र काढावयाचा उपाय करणे, तर आधीं राज्य सुधारले पाहिजे. उत्तम रीतीने राज्य चालावें अशी कांहीं तरी युक्ति निघाली पाहिजे** मी जाणतो, कीं लोक मूर्ख आहेत. याजमुळे त्यांस याचा विचार करण्यास शक्ति नाहीं. तत्रापि कांहीं उपाय मला सुचला आहे,

तो मी लिहून प्रकट करितो. हल्लीं हिंदुस्थानांत बहुतेक राज्य कंपनी सरकाराकडे आहे व लोकांस राज्यात कांहीं अखत्यार नाहीं इग्रजांचे स्वदेशीय राज्यांत पाहिलें तर तसें नाहीं. **तेथील लोकांस राज्यांत हात घालण्याचा व कायदे करण्याचा अधिकार आहे. विलायतेंतील राजा जड्जाचे नाझराप्रमाणें आहे. जेव्हां लोकांची सभा म्हणजे पार्लमेंट हे कायदे फरमावितात, तेव्हां राजा त्याबरहुकूम वहिवाट करितो दर वर्षास राजाचे खर्चास पैसा पाहिजे तो लोकांस मागील सालचा हिशेब देऊन पुढें पैसा वसूल करण्याची परवानगी घेतल्यावर त्यांचे हुकुमाप्रमाणें कर व धारे बसून वसूल होतो. येणेंकरून जसें लोकांस पाहिजे तसें राज्य चालतें. एक राजा स्वइच्छेनें राज्य करितो त्यापेक्षां ही युक्ति बरी आहे व याप्रमाणे हिंदुस्थानांत राज्य चालेल तर फार चांगलें होईल** जे सुज्ञ लोक असतील त्यांस मोठे जागेवर व अधिकारावर नेमतां येतील असें राज्य येथें असावें."

यानंतर सन १८३४ सालीं ईस्ट इंडिया कंपनीला नवी सनद दिली, तेव्हांच कांहीं इंग्रज लोकांनीं हिंदुस्थानात प्रातिनिधिक राज्यपद्धति सुरू करावी असे सुचविलें होते, पण त्या वेळीं हिंदी लोक नालायक आहेत असे म्हणून ब्रिटिश पार्लमेंटने ही सूचना मान्य न करतां वीस वर्षांची सनद दिली; ती आतां संपत आली, तेव्हा आतांपासून इंग्लंडांत जाऊन याबद्दल चळवळ करावी अशी सूचना त्यांनीं पुढील शब्दांत केली आहे:

## हिंदुस्थानांत पार्लमेंट स्थापावें

"याजमुळे विलायतेंतील बादशहाने कंपनी सरकारची सनद कबूल करून वीस वर्षेपर्यंत कमाविशी कायम केली तीं वीस वर्षे सन १८५४ त भरतात. तेव्हां अजून सहा वर्षांचा अवकाश आहे. इतक्यांत कितीएक लोक शहाणे होतील व हल्लींहि कितीएक शहाणे सांपडतील. **याजकरितां आजपासून सर्व गरिबांनी व श्रीमंतांनीं एकत्र होऊन विलायतेंतील राणीसाहेबांस तपशीलवार एक अर्ज करावा, कीं हल्ली राज्यपद्धति आहे तीपासून आमचा फायदा नाहीं व आमचे राज्यसंबंधीं हक्क चालत नाहीत. व हिंदू लोक जसे तसेच इंग्रज लोक मनुष्ये आहेत. याजकरितां इनसाफ बरोबर होण्याकरितां सर्व इंग्रज व नेटीव लोक यांमध्ये सांप्रत मोठा भेद आहे तो मोडून एकसारखें होण्याकरितां हिंदुस्थानचे देशांत पार्लमेंट ठेवावें, व ही मोठी सभा मुंबईस भरावी. आणि तेथें दर शहरांतून व दरएक जिल्ह्यांतून दोन दोन असामी घेऊन त्या सर्वांस कौंसिलांत बसवून गव्हर्नरानें त्यांत मुख्य असावें व जे लोक एकंदर जिल्ह्यांतून आणावयाचे ते सर्व जातींतील सारखे असावे......या लोकांत भट, गृहस्थ, शास्त्री,**

**परभू, कुळंबी, मुसलमान, इंग्रज इत्यादि जे शहाणे दिसतील ते नेमावे व त्यांनी राज्य चालवावें. म्हणजे लोकांचा फार फायदा होईल. याप्रमाणे अर्जी करून विलायतेस दहा-पांच असामी प्रयत्न करण्याकरितां नेमून त्यांजबरोबर ती पाठवावी म्हणजे आमचे लोकांचा कांही उदयकाळ होईल. नाही तर हे असेच कितीएक वर्षे राहतील.** यास्तव लोकांचे हित पाहणारे आहेत त्यानीं हा बेत केला पाहिजे—**म्हणजे दरिद्र वगैरे बोभाट लोक सांगतात हे त्वरित दूर होतील. आणि इंग्रज लोक इकडील लोकांस मूर्ख असे समजतात तेही मत मोडेल आणि राज्याची उत्तम प्रकारची सुधारणा होऊन एके राजाचे अमलांत सुख काय व लोकसत्तात्मक राज्यांत सुख काय, हे सहज दृष्टोत्पत्तीस येईल"**

याच्यापुढे ब्रिटिश हिंदुस्थानात लोकसत्तेची स्थापना झाल्यानें संस्थानांवर काय परिणाम होईल त्यासंबधी ते पुढे म्हणतात, "असे सरकार झाल्यानें मग शिंद्याचे किंवा हैदराबादचे राज्य चागले कीं काय हे त्वरित ध्यानात येऊन चांगले राज्य चालविण्याचे रीतीची माहितगारी सर्व लोकास होऊन बहुधा हे उदाहरण पाहून सर्व दुसरीं राज्येहि याचप्रमाणे होतील व येणेंकरून एका राजाचे ताब्यात राहून त्याचा जुलूम सोसावयाची खोड हिंदू लोकांस लागली आहे, ती ते विसरून जातील राज्य करण्यास गरीब व मातबर, नीच जातीचे व उच जातीचे लोक समान मानावे हे सर्वांस कळूं लागेल **अशा सभेत जातीविषयी निवड नको हे वर सांगितलेच आहे जे फार विद्वान् व चांगले चालीचे लोक आहेत तेच नेमले पाहिजेत.** परतु ब्राह्मणास गर्विष्ठपणा फार आहे. याजकरिता ती जात फार थोडी असली पाहिजे"*.

लोकहितवादींची बुद्धिमत्ता, प्रतिभा आणि देशसुधारणेच्या उपायासंबंधींचे अचूक निदान हे गुण या उताऱ्यात चागलेच दिसून येतात हिंदुस्थान देश दरिद्री होत आहे व त्याची राजकीय अवनति होत आहे याची जाणीव संस्थानात राहणाऱ्याना कोणी तरी लाथ मारीपर्यंत होणार नाहीं, तथापि पुण्यातील ब्राह्मणाना तरी ती झाली पाहिजे, ही अवनति व दारिद्र्य जाण्यास प्रथम राज्यसुधारणा होऊन हिंदुस्थानात लोकसत्ता स्थापिली पाहिजे, यासाठीं इग्लंडांत जाऊन प्रयत्न केला पाहिजे; इग्रज लोक हिंदूप्रमाणे माणसेंच आहेत, त्याच्यातील व आपल्यातील भेद नष्ट होऊन ब्रिटिश हिंदुस्थानात पार्लमेंट स्थापन केले पाहिजे, याचा परिणाम संस्थानावरहि होईल, व तेथेंहि प्रातिनिधिक लोकसत्ता स्थापन होईल, मात्र अशा लोकसभांत जातवार निवड नसावी, सर्व जातींत जे विद्वान् व चारित्र्यवान् असतील त्याचीच निवड व्हावी, वगैरे विचार १८४८ मध्ये लोकांपुढें माडणाराची बुद्धि सामान्य म्हणता येणार नाहीं पण राजकीय हक्काच्या प्राप्तीस केवळ धाडसी

* शतपत्र नंबर २९. 'प्रभाकर', ता १२ ऑगस्ट १८४८.

बुद्धिमत्ता किंवा प्रतिभासपन्न कविकल्पना पुरेशी होत नाहीं त्यासाठीं असामान्य स्वार्थत्याग, दीर्घकालीन उद्योगाची चिकाटी, संघटित लोकमताची शक्ति, ती शक्ति जागृत करण्यास अवश्य असणारी मुत्सद्देगिरी आणि दुर्बल, भेकड व स्वार्थी बनलेल्या लोकसमाजांत स्वार्थत्याग, धैर्य, आत्मविश्वास आणि प्रभावी सामर्थ्य निर्माण करण्यास लागणारें धाडस, दृढनिश्चय व स्वार्थत्याग या गुणानीं मंडित असे चारित्र्य पुढाऱ्यापाशीं असावें लागतें. असे पुढारी निर्माण झाले नाहींत, तोपर्यंत वरच्यासारखे विचार कितीहि महत्त्वाचे व अचूक वाटले, तरी ते मांजराच्या गळयात घंटा बांधावी म्हणून उदरांनीं केलेल्या ठरावाप्रमाणेच निष्फळ राहणार, व ते तसेच राहिलेहि अशा प्रकारचे पुढारी महाराष्ट्रांत प्रथमतः १८८० च्या सुमारास चिपळूणकर, आगरकर व टिळक या रूपानीं पुढे आले त्यापैकीं पहिले दोन अल्पायुषी ठरले, तरी तिसऱ्यानें आपल्या राष्ट्राच्या उद्धारास लागणारें शक्तीचे राजकारण चाळीस वर्षांच्या सतत उद्योगाने निर्माण केले व हिंदुस्थानांत खऱ्या राष्ट्रवादाचा झेंडा उभारिला. लोकहितवादींनीं ज्या सर्वांगीण सुधारणेचे तत्त्व स्वीकारून सनदशीर राजकारण प्रथम लिहून ठेविलें, त्यातून निर्माण होणाऱ्या प्रागतिक राजकारणालाहि अखिल भारतीय सघटित स्वरूप देण्यासाठीं टिळक-आगरकरांच्या स्वार्थत्यागी चारित्र्यापासून स्फूर्ति घेणारे ना गोखले पुढें यावे लागले अर्थात् असे म्हणण्यांत लोकहितवादींच्या लिखाणाची किंमत कमी करण्याचा आमचा हेतु नाहीं ज्या वेळीं हे विचार लिहि-णारेहि कोणी नव्हते, त्या वेळीं त्यानीं ते निधड्या छातीने लिहिले, याबद्दल महा-राष्ट्राला अभिमानच वाटेल पण असे प्रतिभासपन्न लेख लिहिणें व विशिष्ट धोरणाने व्यावहारिक राजकारणाची शक्ति निर्माण करणे, यातील भेद वाचकाच्या लक्षात यावा यासाठींच हा विस्तार केला आहे

## युरोपपासून बोध

इ स १८४८ साल हे युरोपीय देशांत अत्यत क्रांतिकारक असे गेलें फ्रान्स-मध्यें लुई फिलिप याच्याविरुद्ध क्रांति झाली व इंग्लडांतहि चार्टिस्ट नांवाची क्रांति-सदृश चळवळ झाली. यासबंधीं लोकहितवादींनीं पुढीलप्रमाणें लिहिले आहे :

“ सांप्रत युरोप खडांतील बातमीपत्रे आलीं, त्यात मुख्य वर्तमान असें आलें, कीं फरासिसाचे मुलखांत राज्यसुधारणा झाली त्यास फ्रेंच रिव्होल्यूशन असे इंग्रजींत म्हणतात, व त्याचा अर्थ राज्यसुधारणा असा होतो लोकांमध्ये दंगा, बड इत्यादि शब्देंकरून तें प्रकरण समजतात ही चूक आहे. कारण, कीं ते कांहीं बड नव्हे; हिंदुस्थानचे लोकांस स्वैरराज्याचे ताब्यात राहण्याची संवय आहे, व दुसरे रीतीचे राज्य ठाऊक नाहीं यास्तव राज्यसुधारणा याचा अर्थ त्यांस समजत नाहीं याज-करितां त्याजविषयीं मी थोडासा मजकूर लिहितो. ज्या देशांत लोक शहाणे व ज्ञानी व सहोदरबंधूंप्रमाणे एकमेकांचे हित पाहणारे असे आहेत, त्या देशांत मात्र अशी

राज्यसुधारणा होते. सांप्रत टोपकर लोक शहाणे आहेत व त्यांच्यामध्ये कितीएक हितावह व चांगल्या गोष्टी आहेत. त्या आपले लोकांस अद्याप माहीत नाहींत **आपल्या देशाचे हित करावें हा मुख्य धर्म असे युरोपांत समजतात आणि जर कांही अपाय अगर वाईट वर्तणूक राजाकडून अगर त्याचे प्रधानाकडून होईल तर त्यास लोक बरतर्फ करितात. ही गोष्ट आपले इकडील लोकांस फार अशक्य व चमत्कारिक वाटेल. कारण की इकडील लोकांस राजा म्हणजे विष्णूचा अवतार व प्रधान म्हणजे ब्रह्मदेव वाटतो** त्यांनीं अन्याय केला तर म्हणतात कीं " राजा हरति सर्वस्व तत्र का परिदेवना। " असे आहे तेव्हां या लोकांस सुधारणा माहीत नाहीं, परतु ज्यास ज्ञान सपादन करण्याची इच्छा असेल त्यानें इंग्लंड देशाचा इतिहास काढून पहावा ... परतु राज्यसुधारणा अद्यापि हिदुस्थानचे इतिहासांत आढळलेली नाहीं **कोणी कदाचित् शिवाजीराजाचे प्रकरणास सुधारणा म्हणतील व मलाहि वाटते, की तें राज्यसुधारणाच होय.** कारण जरी केवळ राज्यसुधारणेच्या हेतूनें शिवाजीने मोगलांशीं युद्ध करण्यास आरंभ केला नाही, **तरी त्याचें स्वाभाविक कृत्य त्या स्थितीवर गेलें** व मराठ्यांचे व सर्व हिदू लोकांचे राज्यसबधीं महात्म सरासरी पांचशें वर्षेपर्यंत मुसलमानांनीं बळकाविलें होतें, तें पुनरपि हिंदू लोकांचे हिंदू लोकांकडे शिवाजीचे कृत्यामुळें आले तस्मात् ती " रिवोल्यूशन " म्हणावी त्यानंतर मग शिवाजीचे पाठीमागे तसा सद्बुद्धिमान् पुरुष न झाल्यामुळे तें कार्य तसेच राहिलें व मुलुखहि इंग्रजांचे हातीं गेला आतां फराशिसांचे मुलुखांत असे झालें, कीं राजा रयतेस पीडा करूं लागला व विनाकरण खर्च करून रयतेकडून नानाप्रकारचे कर वगैरे बसवून पैका घेऊं लागला तेव्हां पारिस म्हणून फ्रेंचांची राजधानी आहे व तेथे मोठमोठाले विद्वान् लोक राहतात त्यांनीं सपूर्ण रयतेस त्रास झाला आहे असें जाणून तेथें एक युद्धविद्या शिकण्याची शाळा आहे, तेथील विद्यार्थी वगैरे लोक मिळवून राजवाड्यावर गेले व तेथे फौजफाटा होता त्यास सांगितलें, कीं आम्हीं राज्याची सुधारणा करावी व आपल्यास स्वइच्छ राजापासून सुख होत नाहीं, यास्तव लोकसत्ताक राज्य करावें यासाठी झटतो आमचा हेतु इतकाच, कीं सर्व लोकांस सुख व्हावे व ज्याचे त्याचे हक्क कायम राहावे. आम्ही लुटणारे नव्हत व आम्हांस कांहीं नको हे ऐकून ती फौज त्यास वश झाली आणि त्यांचेबरोबर गेली मग ते सर्व लुईस फिलिप राजास हस्तगत करणार तो तो स्त्रीसहित धाकानें पळून गेला. मग मागे शहरचे लोकांनीं वाडा घेऊन सभा भरविली व असें ठरविलें, कीं आजपासून रयतेचें राज्य रयतेनें करावे व त्याप्रमाणें नऊशें असामी सभेत बसण्यास मुकरर केले. आणि राजाचे असबाबास कांहीं हात ठेविला नाहीं. राजाचे खोलींत जे मोहोर ठेवलेले लखोटे सांपडले, तेहि जाचे नांवावर होते त्याजकडे पाठवून दिले. असे मर्यादेने ते लोक चालले "

यानंतर पहिल्या फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं इंग्लिशांनीं फ्रेंचांना विरोध केला तसा आता ते करणार नाहींत याची मीमांसा ते पुढीलप्रमाणें करितात :

" फ्रेंचाचे देशात ज्या वेळेस राजास काढून टाकिले तेव्हां फौजेमध्ये बोनापार्ट म्हणून एक नामांकित सरदार होता त्यानें जय पुष्कळ मिळविले व त्यास राज्याचा लोभ उत्पन्न होऊन त्यानें राज्य बळकाविलें. तेव्हां इंग्रजांनीं वेल्स्ली साहेब म्हणजे ड्यूक ऑफ वेलिंग्टन यास पाठवून त्यास कैद करून टाकिले आणि पूर्वीचे राजाचा वंशज बसविला; परतु हल्लीं फ्रेंचांचे राज्यांत हात घालूं नये असा निश्चय इंग्रजांनीं केला आहे कारण सपूर्ण लोकांचा एकोपा ठरला, कीं राजा नसावा आणि प्रजा एकत्र होऊन राज्य चालवितात व इंग्रजांशीं स्पर्धाहि करीत नाहींत. त्यापेक्षां आपणांस बोलण्यास कांहींच जरूर नाहीं "

यापुढे या वेळच्या इंग्लंडच्या अंतर्गत राजकारणासंबधीं ते पुढीलप्रमाणे लिहितात : " इंग्रजांचे कांहीं जिल्ह्यांत दंगे झाले आहेत, परंतु ते मोठे नाहींत. कितीएक मोडले त्याचेंहि कारण हेच, कीं राजाकडून कांहीं जुलूम जास्ती होऊन लोक त्रासले. असे पाहून पुनः त्यांचें सांत्वन करितात व वाईट कायदे व कर बंद करितात, म्हणजे बंदोबस्त होतो. असें त्यांनीं अद्याप शहाणपणाने राज्य चालविले आहे. **पुढें पहावें.**"*

## राष्ट्रधर्म आणि राज्यक्रान्ति

मराठी वाचकापुढे युरोपांतील राजकारणासबधीं व लोकसत्ताक राज्यक्रांती-संबधीं आलेले हे जवळजवळ पहिलेच विवेचन होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं यांत मुख्यतः तत्त्वाच्या अशा दोनतीन गोष्टी होत्या (१) युरोपांतील लोक 'आपल्या देशाचें हित करावें हा मुख्य धर्म मानितात' (२) लोकांवर जुलूम झाला असतां देशांतील सुज्ञ लोक राज्यक्रांति करून रयतेचें राज्य स्थापन करतात. ही बडाळी नव्हे स्वैर राज्यापेक्षा लोकसत्ताक राज्य चांगले. (३) शिवाजी हा एक प्रकारें राज्यक्रांतिकारकच होता पण पुढे तसा कोणी सद्बुद्धीचा पुरुष न झाल्याने आपले राज्य इंग्रजांनीं घेतले. आणखी एक गोष्ट या लेखावरून दिसते, ती म्हणजे, १८४८ सालीं इंग्लंडांतहि कांहीं दंगे झाले, पण लोकांचें समाधान करून ते मोडण्यांत आले अशा प्रकारे इंग्लिश लोक शहाणपणानें राज्य करीत आले, पण पुढे काय होते तें पहावे ! हे दंगे म्हणजे इंग्लंडांतील कामगार-वर्गात सुरू झालेली 'चार्टिस्ट' चळवळ होय या चळवळीचे योग्य ज्ञान या वेळच्या हिंदी सुशिक्षितांना झालेलें नव्हतें हे उघड आहे. जर युरोपांतील किंवा विलायतेतील लोक आपल्या देशांतील सर्वांस सहोदर बंधूंप्रमाणे वागवितात, तर मग हे दंगे कां होतात? याचा उलगडा होण्यास औद्योगिक क्रांति, भांडवलशाही व वर्गभेद या विषयांचें ज्ञान व्हावयास हवें.

* 'प्रभाकर', पत्र नं. १४, ता. २८ मे १८४८.

पण त्या वेळीं ब्रिटिश लोकांनाहि जर ते ज्ञान बरोबर झालें नव्हते, तर त्यांना गुरु मानणाऱ्या आमच्या सुशिक्षिताना कोठून होणार? शिवाय, त्या वेळीं हिंदुस्थानात एकहि गिरणी नव्हती अशा वेळीं हे ज्ञान होणेहि अशक्यच होते झाले तर तें युरोपांत जाऊन येणारांस व त्या दृष्टीनें निरीक्षण करणारांसच होणार पण सरजाम-शाहींतून निघून लोकशाहीचें व राष्ट्रीयत्वाचे प्रथमच आकलन करणाऱ्या आणि श्रद्धायुगांतून बुद्धियुगांत नुकताच प्रवेश करणाऱ्या बुद्धीला इंग्लडातील भांडवल-शाहीचें व तज्जन्य कामगार-चळवळीचें आकलन होणे असभवनीयच होते

## संन्याशाचा समाजवाद

असे असतांहि लोकहितवादीच्या काळींच झालेले विष्णुबुवा ब्रह्मचारी यानीं एक प्रकारच्या समाजसत्तावादाची तरफदारी आपल्या ' सुखदायक राज्यप्रकरणीं ' या निबधात केलेली आढळते, ही आश्चर्याची गोष्ट आहे विष्णुबुवा ब्रह्मचारी याचा जन्म १८२५ त झाला व ते १८७१ त मृत्यु पावले त्याची वैदिक धर्मावर दृढ श्रद्धा असून ख्रिस्तीधर्माच्या प्रचारकांच्या हल्लयांचा प्रतिकार करून तोडीस तोड या प्रकारचें वक्तृत्व गाजवावयाचे आणि आपल्या लोकात स्वधर्माचा अभिमान जागृत करावयाचा हे याचे कार्य व धोरण होते. त्यांनीं धर्मपरच काहीं ग्रंथ लिहिले आहेत, पण धर्म याचा त्यांचा अर्थ व्यापक असून समाजाचा ऐहिक अभ्युदय त्याच्या धर्मात अतर्भूत होत असे आपल्या समाजांत बऱ्याच सुधारणा झाल्या पाहिजेत असें त्याना वाटले, तरी त्या सुधारणा करण्यासाठीं पाश्चात्य संस्कृतीचा आश्रय करावा अशी त्यांची वृत्ति नव्हती आपल्या प्राचीन संस्कृतींतूनच आपणास भावी अभ्युदयाचा मार्ग उपलब्ध होईल, असें त्यांना वाटत होतें. अशा अध्यात्मप्रवण ब्रह्मचाऱ्याने समाज-सत्तेचे विचार मराठी भाषेंत प्रथम व्यक्त केलेले आहेत ते असे :

" सर्व प्रजेकडून सर्व जमिनींची लागवड करवावी, ती अशी, की ज्या ठिकाणीं जी वनस्पति चांगली पिकेल त्या ठिकाणी तिची लागवड करावी आणि अनेक प्रकारचीं फळें, कंद, भाज्या, अन्न ( वगैरे ).. उत्पन्न करून गांवोगांव कोठारें भरून ठेवावीं व त्यांतून सर्व गांवकऱ्यांनीं पोटास लागेल तितकें अन्न न्यावे व जनावरांस चारा न्यावा याप्रमाणें सीतकाळ, उष्णकाळ व पर्जन्यकाळ या बाराहि महिन्यांत एक-सारखे सर्व जमिनींतून उत्पन्न करावे व तें सर्वांचे उत्पन्न एकच व एकाचेच ताब्यांत राहून त्यांतून खावयास विपुल न्यावे व राजानें लोकरीचे, तागाचे, रेशमाचे व कापसाचे याप्रमाणें अनेक तऱ्हेचे कपडे तयार करावे. गांवोगांव खजिन्यांत ठेवावे त्यांतून ज्याला जो कपडा पाहिजे तो त्यानें न्यावा व सोन्यारुप्याचे मोती, हिरे यांनीं जडलेले अलंकार तयार करून गांवोगांव ठेवावे व ते सर्व स्त्रिया-पुरुषांनीं वापरावे आणि मोडले म्हणजे पुनः राजाच्या खजिन्यांत आणून टाकावे आणि नवे घेऊन जावे तशींच शस्त्रें, यंत्रे तयार करून गांवोगांवीं ठेवावीं व सर्व प्रकारचे खेळ गांवोगांवीं

ठेवावे. आगगाड्या व तारायंत्रें गावोगांवीं असावीं व सर्व प्रकारच्या कारखान-दारांनीं व शेतकऱ्यांनीं व राजानें एकसारखें आहिंसक खाणे खावे व तें सर्वांनीं एका कोठारांतून नेऊन खावे व सर्वांचीं लग्नें, लग्नें करण्याच्या खात्याच्या मार्फतीने राजाने करावीं व आवडत नसली तर ज्याला जी स्त्री नको त्याला दुसरी करून द्यावी व तिला दुसरा पति करून द्यावा, म्हणजे स्वयंवर असावें व सर्वांचीं पाच वर्षांचीं पोरें झालीं म्हणजे मुलगे व मुली राजाच्या ताब्यात द्यावे नंतर त्यानें त्याना सर्व विद्या शिकवून ज्याला ज्या कामांत जास्ती उद्योग करण्याची सवय असेल, त्याला त्या कामाकडे लावून द्यावा व स्त्रिया-पुरुष वृद्ध झालीं म्हणजे त्यांच्याकडून कामधदा न करवितां त्यानीं स्वस्थ बसून खावे व त्या त्या खात्याचे पार्लमेंट सभेचे सभासद असावे आणि जगत् भासणाराचे उपकार आठवीत बसावे "*

विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्याचे हे कम्यूनिझमच्या धर्तीवरचे विचार वाचले म्हणजे ज्याने कार्ल् मार्क्स् वाचला नाहीं त्याला हा कम्यूनिझम कसा सुचला, असा अचबा अलीकडील काहीं सुशिक्षिताना वाटतो पण ही गोष्ट इतकी अचंबा वाटण्यासारखी नाहीं अशी आमची समजूत आहे ज्या मनुष्यानें आपल्या स्वार्थाची होळी केली आहे, वर्गस्वार्थाचाहि पगडा ज्या सन्यस्त मनावर बसलेला नाहीं, प्राचीन ऋषींच्या प्रतिभेला आकलन झालेले विश्वकुटुबाचें ध्येय ज्याने शक्य तो आचरणांत आणण्याचे प्रयत्न चालविले आहेत, अशा मनुष्याने आगगाड्या, तारायंत्रे, किंवा इतर धनोत्पादक यंत्रे पाहिलीं किंवा ऐकिलीं, या यंत्रकृत मालाच्या चढाओढींत आपल्या देशातील लोकाचे हस्तव्यवसाय ठार होऊन ते बेकार बनत आहेत व देशात सर्वत्र दारिद्र्य व दैन्य वाढत आहे याची त्याला जाणीव झाली, म्हणजे ही सर्व यंत्रकला व भौतिक विद्या लोकाचे देश लुबाडण्यासाठीं उपयोगांत न आणिता आणि तिच्या साहाय्याने मूठभर लोकानी नवकोट नारायण बनून कोट्यवधि जनतेला आपले दास न बनविता ही यंत्रकला व ही भौतिक विद्या याचा उपयोग प्रजेचे मुलाप्रमाणे प्रतिपालन करणाऱ्या राजसत्तेने करावा आणि प्राचीन ऋषींनीं प्रतिभाबलाने पाहिलेल्या विश्वकुटुबाची स्थापना करण्यासाठीं तो करावा, अशी कल्पना सुचण्यास कार्ल् मार्क्स्-च्या ग्रंथाचेच अध्ययन करण्याचे कारण नाहीं आगगाडी किंवा तारायंत्र किंवा यांत्रिक कारखाना पाहिल्याबरोबर वैश्यप्रकृतीच्या स्वार्थी बुद्धीला यांच्या साहाय्याने आपणास नवकोट नारायण बनतां येईल, हजारो लोकाना दास म्हणून आपणापुढें वाकविता येईल, सुकाळांतील धान्य दुष्काळात विकून इमले बांधता येतील, असे वाटू लागेल, पण सन्यस्त वृत्तीच्या आणि लोककल्याणांतच आनंद मानणाऱ्या सात्त्विक शुद्ध मनाला तीच यंत्रकला व भौतिक विद्या पाहून या साधनानीं विपुल धान्यांचीं कोठारे भरतां येतील, श्रीमंतानींच आजपर्यंत उपभोगिलेले दागदागिने व उंची रेशमी वस्त्रे देशातील सर्व लोकांना पुरविता येतील, विद्यार्जन करण्याची वाटेल

* आजकालचा महाराष्ट्र, पृ. ११२-११३.

तितकी संधि सर्वांना देतां येईल आणि इंग्रज लोक आपल्या अधिकाऱ्यांना जसें वृद्धावस्थेंत पेन्शन देतात तसेंच वृद्धवेतनहि देशांतील सर्व वृद्ध स्त्री-पुरुषांना देतां येईल, अशी कल्पना सुचली तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. एकाच बाह्य परिस्थिती-कडे पाहून सात्त्विक व राजस, अथवा परार्थी व स्वार्थी मनांवर भिन्न भिन्न परिणाम घडत असतात. इंद्रियांमार्फत मनावर व बुद्धीवर घडणारे संस्कार तेच; पण ज्याची बुद्धि स्वार्थानें मलिन झाली आहे, त्याला त्यांतून स्वार्थाचा मार्ग दिसतो व ज्याची बुद्धि परार्थी झाली आहे, त्याला त्याच परिस्थितींतून परार्थाचा मार्ग कसा शोधून काढावा याचें ज्ञान होते असो. हा विषय येथेंच सोडून आपण पुनः लोकहितवादींच्या राजकीय, आर्थिक व सामाजिक विचारांकडे वळूं.

## ब्रिटिश राज्य कसें जाईल ?

लोकहितवादींना राजकीय दृष्ट्या हिंदुस्थानांत लोकसत्तेची स्थापना व्हावी व राष्ट्रधर्माचा उदय व्हावा असे वाटत होते, हे मागें दिलेंच आहे पण त्यांचे अंतिम राजकीय विचार राष्ट्रीय स्वातंत्र्यापर्यंत जाऊन पोहोचले होते, हे आतां दाखवून द्यावयाचें आहे ता. १ एप्रिल १८४९ रोजीं "इंग्लिश राज्यापासून फळ" या नांवाचा एक लेख त्यांनीं लिहिला आहे, त्यावरून त्या वेळच्या सामान्य ब्राह्मण लोकांचीं इंग्लिश राज्याविषयीं काय बोलणीं चालत व लोकहितवादींसारख्या इंग्लिश विद्या संपादन केलेल्या मनुष्याला इंग्लिश राज्याचा अंत केव्हां व कसा होईल असें वाटत असे, याची चांगली कल्पना येते

"सांप्रत हिंदू लोक एकत्र बसले म्हणजे सहज गोष्टी निघतात, कीं हिंदुस्थानची पुढें गत कशी होईल ? लोक अगदीं भिकारी होत चालले. व्यापार, धंदा, रोजगार हीं कामें नाहींशीं झालीं. ...याप्रमाणें ब्राह्मणाचा हाहाःकार ईश्वराचे कानावर कधीं जाईल ?......त्यात मग कोणी बहुत शहाणा जुने काळचा असला म्हणजे तो म्हणतो, अहो बाबा, मागे यादव कसे मेले ? रावणाने प्रळय थोडा केला होता काय ? सर्व देव बंदीस घातले होते नंतर रामानें वानराकडून लंका घेतली कीं नाहीं ? पाण्यावर दगड तरले कीं नाहीं ? तसेच इंग्रज कधीं तरी बुडतील धर्मसंस्थापना होईल. ब्राह्मण लोक सुखी होतील, व इतर लोकहि आपले वर्णाश्रम व धर्मेंकरून वागूं लागतील. अशा प्रकारचीं संभाषणे चार ब्राह्मण एकत्र बसले म्हणजे होतात.

"याविषयीं आम्हांस काय वाटते तें लोकांस कळवावें म्हणून आम्ही आपले मत लिहितों. मुख्य आमचे बोलण्याचा येथून आरंभ आहे, कीं **ज्या गोष्टी ईश्वर घडवून आणतो त्या वाइटाकरितां नसतात**. तेव्हां हिंदुस्थानचे लोक फार मूर्ख व धर्मकर्म सोडून अनाचारास प्रवर्तले. ते असे, कीं सती जाण्याची चाल, मुलें मारावयाची चाल, तीन वर्णांची नीच स्थिति, ब्राह्मणांचें महात्म, विद्या क्षणिक, अतिशय गर्व, संपूर्ण देशचे लोक आम्हांपुढें तुच्छ व आम्ही श्रेष्ठ; तेव्हां हा भाव

हिंदू लोकांचा मोडण्यास व त्यांस ताळ्यावर आणण्यास परदेशांतील सुधारलेले लोक यांची व त्यांची गांठ घालून देण्यापेक्षां उत्तम उपाय दुसरा कांहीं आहे असें वाटत नाहीं. यास्तव ईश्वराने या देशांत इंग्रजांची प्रेरणा केली आहे .. यापासून उत्तम फळ पुढें होईल. या देशचे लोकांनीं वर्णसकर होईल व धर्म बुडेल हें कांहीं भय बाळगूं नये वर्णसंकर होत नाहीं व धर्म बुडत नाहीं परंतु मूर्खपणा मात्र बुडेल आणि धर्मामध्यें अधर्म मिसळ झाला आहे त्यास लोक धर्म म्हणतात, तें मात्र ज्ञानचक्षू आल्यावर जाईल. व वर्ण जे आहेत ते स्वाभाविक सृष्टींत आहेत म्हणजे कोणतेहि देशांत वर्ण नाहींत असे नाहीं वर्ण म्हणजे इतकेंच, कीं चार प्रकारचे व्यापार. जसे ब्राह्मण हे धर्म रक्षण करणारे व विद्या वाढविणारे, क्षत्रिय शिपाईगिरी करणारे, वैश्य व्यापार करणारे, आणि शूद्र शेत करणारे हे धर्म सर्वत्र आहेत परतु लोकाच्या अडाणी समजुती म्हणजे ब्राह्मण विद्वान् असला तरी सिंधु नदी उतरून पलीकडे गेला किवा त्यानें कांदा खाल्ला म्हणजे त्याचें ब्राह्मण्य जाते .. .. या मूर्ख समजुती जातील आणि **हल्लीं जो वर्णसंकर आहे, म्हणजे वास्तविक ब्राह्मण नसतां ब्राह्मण म्हणवितात व शूद्र असतां ब्राह्मण म्हणवितात व ब्राह्मण असतां ब्राह्मण म्हणत नाहीत, हा वर्णसंकर मात्र जाईल आणि व्यवस्थित होतील. या लोकांच्या पायांतील शृंखला सुटतील. हे चोहो देशांत जाऊन व्यापार करूं लागतील, विद्वान् होतील व आपले देशांत कापड वगैरे तयार करावयास शिकतील, तेव्हां सुखी होतील.**

"लोक शहाणे झाले म्हणजे हळूच इग्रजांजवळ म्हणतील, कीं आम्हास तुमच्या देशांत आहे तसें पार्लमेंट द्या म्हणजे बहुतकरून मोठालीं कामें गवरनरीचीं सुद्धां त्यांचे हातीं येतील आणि मग अर्थातच इग्रज फक्त व्यापार मात्र करून राहतील म्हणजे जसे हिंदुस्थानात प्रथम इग्रज आले त्या स्थितीवर येतील आणि **आपले लोक पार्लमेंट व स्वराज्य भोगतील.** राज्यकारभारांत व व्यापारांत त्यांस महत्त्व प्राप्त होईल .... असे हे लोक प्रबल झाले म्हणजे इग्रजास कांहीं दिवसपर्यंत आभारी मानतील. कारण की त्याचे योगानें हे ज्ञानी झाले. **परंतु ज्या काळीं इंग्रज गडबड करूं लागतील किंवा कांहीं नवीन कानू करावयाचा आग्रह करतील, त्या काळीं अमेरिकेंत झालें तसें होऊन हे लोक आपल्यास स्वतंत्र करून घेतील आणि इंग्रजांस सांगतील, कीं तुम्हीं आपले देशास जावें. यास दोनशें वर्षें तरी पाहिजेत. परंतु असे होईल यांत संशय नाहीं. अशी मागले इतिहासावरून कल्पना होते. आणि हें तथ्य आहे अशी खातरजमा आहे.**"

लोकहितवादींचे हे स्वातंत्र्यवादी विचार तत्कालीन बगाली सुधारकांच्या विचारांशीं तुलना करून पाहिल्यास अधिक प्रगत दिसतात हिंदुस्थान पार्लमेंट व स्वराज्य उपभोगूं लागला, तरी तो अखेरीस अमेरिकेप्रमाणें स्वतंत्र होईल असा निष्कर्ष

ते "मागले इतिहासावरून" काढतात. याचे कारण ब्रिटिश राज्यात आपणांस दारिद्य येत आहे व ते परकीय आहे याची बोचणी त्याच्या मनास एकसारखी लागली होती हेच होय ते याच सालीं लिहिलेल्या दुसऱ्या एका लेखांत म्हणतात :

"हल्लींचे राज्यात एक कमी आहे, कीं लोकास रोजगार व श्रीमंती नाहीं, परतु शहाणपण नाहीं म्हणून या गोष्टी नाहींत शहाणपण असेल व लोकाचे हातीं राज्य असेल, स्वदेशीय अमलदार असतील आणि त्याजकडून जशी इग्रजांकडून इकडे नि.पक्षपाती वर्तणूक होते अशी होईल, तर इग्रजांचे राज्याहून शंभरपट सुख होईल. आणि मग रामराज्यहि मागे सरेल यात सशय नाहीं .. इंग्रज करतात पण त्यांस परकीपणा आहे व स्वदेशी लोक रोजगार नाहीं याजमुळे एकदर भिकारी झाले परतु हे जर उत्तम झाले, जातिअभिमान सोडून सर्व लोकाचे हितास झटणारे असे झाले, सर्वास विद्या करविण्याचा यत्न करू लागले, ब्राह्मण श्रेष्ठ इत्यादि मूर्ख समजुती सोडून राज्य करू लागले, महार, रामोशी, कैकाडी, कोमटी देखील यानीं सुधारले आणि मोठे कामाच्या लायक झाले, तर ईश्वर कृपा करणार नाहीं असे नाहीं"*

## स्वदेशी व बहिष्कार

आतां त्यानीं स्वदेशी धद्याच्या उद्धारार्थ कशी चळवळ करावी म्हटले आहे, ते पाहू :

"तात्पर्य, विलायतेतील पार्लमेंट यास हा देश कसा वाटतो, कीं जसा आपले घरी गडी आहे, त्याने एकादा व्यापार केला व त्यात त्याने अन्याय केला तरी आपण ते मनास आणीत नाहीं तद्वत् पार्लमेंट म्हणतें, कीं आमचे देशातील सावकार लोक यानीं परदेशात मुलूख घेतला, तेथील न्यायमनसुबी आम्हीं पाहण्यास काय गरज?. सवतीचे मुलाची काळजी कोण करतो? तेव्हां आमचे लोकानीं एकत्र होऊन पार्लमेंट मागावे आणि मुबई, कलकत्ता येथे ते नेमून तेथे काहीं इग्रज व आपले सर्व जातींचे शहाणे शहाणे लोक त्यांत ठेवावे आणि त्याचे हुकुमानें कारभार करावा, म्हणजे विलायतेचे बादशाहजादीसहि नाहीं म्हणवणार नाहीं कारण कीं विलायतेत पार्लमेंट असावे व येथे नसावें अशी आम्हीं काहीं चोरी केली नाहीं. हा एक मोठा उपाय साध्य व्हावयाजोगा आहे व दुसरा तूर्त दरिद्र मोडण्यास असा आहे, कीं ब्राह्मण लोकांनीं आपल्या मूर्खपणाच्या समजुती सोडाव्या आणि केवळ कारकून आणि भट हे दोनच रोजगार आम्ही करू, असे म्हणू नये या देशांत आणखी पुष्कळ रोजगार आहेत व तेहि आतां दिवसेदिवस इग्रज घेत चालले आहेत. सावकारी, शेतकी वगैरे इग्रज करू लागले हेच रोजगार आपले लोकांनीं करावे. कोणते म्हणाल तर कांच, कापड, सुरी, कात्री, लांकडी सामान, घड्याळें, चाबूक, यंत्रें इत्यादि पुष्कळ इकडे इग्रज खपवितात. हीं सर्व आपले लोकांनीं करावयास शिकावे व येथें जो माल खपणार

* 'प्रभाकर', पत्र न ७८, ता. १४ ऑक्टोबर १८४९.

नाहीं, तो दुसऱ्या देशास घेऊन जावा आणि तेथें विकावा पुष्कळ देश आहेत त्याचा शोध करावा व **इंग्रजांचे देशाचे सामान बंद करावे, किंबहुना आपले सामान त्यांस द्यावे, परंतु त्यांचें आपण घेऊं नये. जो इकडे उत्पन्न होईल तितका माल घ्यावा. विलायती कापड घेऊं नये. यास्तव आपल्यास जाडी मोठी कापडे नेसावयास लागलीं, तर काय चिंता आहे? परंतु आपले देशाचे रक्षण करावे. असे झाले म्हणजे बहुत रोजगार राहतील** यास्तव त्यांनी स्वस्थपणाने दुसरे रोजगार करावे म्हणजे इग्रज लोकाचा, शिरस्तेदाराच्या शिव्या, भटांचा अपमान हे कांहीं सोसावयास नको जो तो इग्रजी शिकतो परतु इतक्याची गरज नाहीं. याजमुळे दीनवाणीं फिरतात ''*

या लेखात स्वदेशी, बहिष्कार व स्वराज्य या सर्व चळवळींचा उपदेश केलेला आहे हा लेख इ स १८४९ म्हणजे १८५७ सालच्या पूर्वी आठ वर्ष लिहिलेला आहे या आठ-नऊ वर्षांत लोकहितवादींनीं सुचविल्याप्रमाणे इग्लडात व हिंदुस्थानात स्वदेशीची, बहिष्काराची व स्वराज्याची म्हणजे हिदुस्थानात पार्लमेंट स्थापन करण्याची प्रचड चळवळ झाली असती, तर १८५८ सालीं ईस्ट इडिया कंपनीचें राज्य व्हिक्टोरिया राणीकडे व ब्रिटिश मत्रिमडळाकडे न जातां तें हिंदी पार्लमेंटाकडेहि आलें असते व आजपर्यंत "अमेरिकेंत झालें तसे होऊन" हिंदुस्थान स्वतत्रहि झाला असता! पण त्या वेळीं अशी चळवळ करणे हे उदरानीं माजराच्या गळ्यात घटा बांधण्याइतकेच "**अव्यवहार्य**" होते. त्या वेळीं आलेले दारिद्र्य व दास्य घालविण्याचे प्रयत्न करण्यापेक्षा ते वाढविणें हेच त्या पिढीला व्यवहार्य वाटत होते! त्या पिढीच्या या व्यवहारदक्षतेचीं फळे आजपर्यंतच्या पिढ्या भोगीत आहेत व आमच्या व्यवहारदक्षतेची फळे आमचे वंशज भोगणार आहेत पण महाराष्ट्राच्या सुदैवानें १८८० सालीं महाराष्ट्रांत दोनतीन व्यवहारशून्य विभूती जन्मास आल्या, व त्यांनीं देशोद्धाराची चळवळ करण्यासाठीं दारिद्र्याची दीक्षा घेण्याचा व आजन्म देशसेवेचा नवा मार्ग लोकाना दाखवून दिला. त्यामुळे ज्या गोष्टी लोकहितवादींना दोनशें वर्षांनीं घडतील असे वाटत होते, त्या त्या वेळपासून शंभर वर्षे होण्याच्या आतच घडून आल्या आहेत

पण आजच्या दृष्टिकोणाने लोकहितवादींच्या लेखांचा विचार न करता त्या काळच्या इतर लोकाच्या विचारांशीं तुलना करून पाहिल्यास, त्याचे विचार फारच पुढे गेलेले दिसतात. बंगालमधील तत्कालीन पुढारी ब्रिटिश माल येथें येतो याबद्दल खेद न करता आनद मानीत होते आणि ब्रिटिश व्यापारी व मळेवाले येथे येऊन राहतील तर बरे होईल असे मानीत होते; तर त्याच वेळीं हा माल व हे मळेवाले ही आपणांवर एक आपत्ति आहे असे म्हणून लोकहितवादींचे अत:करण तळमळत होतें

"इंग्रज इकडे राज्य करतात ते आतांच आम्हांस गुलामाप्रमाणे मानतात .

* 'प्रभाकर' पत्र न. ६०, ता. १३ मे १८४९.

कांहीं दिवसांनीं इंग्रज येऊन येथे घरेदारें करून राहूं लागतील म्हणजे बहुतकरून आमचे रोजगार गेलेच आहेत व जे राहिले आहेत ते समूळ जातील. कारण कीं ते लोक शाहाणे आहेत. मग आम्हांस दरएक इंग्रजाचे घरीं गुलामगिरीचीं कामे करावीं लागतील आणि सर्व मोठेपणा व धनीपणा इंग्रजांकडे जाईल. असें होतां होतां उत्तर अमेरिकेंत इंग्रज लोक राहिले आणि चार-पाचशें वर्षांत तेथील लोक सर्व मरून नाहींसे झाले व सर्व इंग्रजांचीच वस्ती होईल तसा हा देश केवळ इंग्रजांचे वस्तीचा होईल कीं काय, अशा प्रकारचे प्रश्न माझे अतःकरणात येतात व यांची विवंचना करता करतां ईश्वरइच्छा काय आहे ती समजत नाहीं म्हणून या देशांत राहिलेले जे सुधारलेले लोक आहेत, त्यांस मात्र मी पुसतो, कीं तुम्हांसहि जर सर्व गोष्टी भयंकर दिसतात तर तुम्ही स्वस्थ कसे बसलेत?"*

## तत्कालीन सामाजिक परिस्थिति

पुण्यात, सरदार कुळांत व ब्राह्मण जातींत जन्मलेल्या या तत्कालीन विद्वानास आपल्या सभोंवार मात्र सर्वत्र गाढ अंधार पसरलेला दिसत होता अशा वेळीं त्यास हा अज्ञानाधकार नष्ट झाल्याखेरीज आपल्या देशास सुदशा येणार नाहीं, असे वाटले तर ते साहजिकच होतें त्या वेळचे ब्राह्मण व सरदार हे अत्यत अवनत अवस्थेस पोहोंचले होते. त्या वेळच्या सरदारांसबंधीं ते म्हणतात: "त्यांस जर कोणीं वेडे म्हटलें तर त्यांस राग येतो आहे. ते उत्तर करतात, कीं आम्ही पेशवाईत लाखों रुपये मिळविले व फौजा बाळगिल्या त्या आम्हीं मूर्ख म्हणून बाळगिल्या नाहींत...ते पूर्वीं लगड्या गाईत वांसरू प्रधान म्हणून शाहाणे होते परतु आतां नाहींत. त्यांजमध्यें पराक्रम, विद्या व शौर्य नाहीं. लिहिण्यावाचण्याची भ्रांति, प्रवास ठाऊक नाहीं, परदेश ठाऊक नाहीं व लढाईची कला ठाऊक नाहीं. पण त्यांनीं गर्व कशास करावा? हल्लीं पुण्यांत जे गृहस्थ आहेत त्यांचे अवस्थेचा विचार व त्यांचें शहाणपण पाहिलें म्हणजे सर्व हिंदू लोकांचा वृत्तान्त कळतो जसा कोणी मेला म्हणजे वृषोत्सर्ग सोडतात तशी मराठ्यांची राजधानी गेली आणि बाजीरावाचे नांवचे इंग्रजांनीं पोळ सोडिले, म्हणजे इंग्रजानीं कोणास जहागिरी व कोणास पेन्शनें दिलीं आहेत, तीं ते खातात आणि पोळासारखे फिरतात याचप्रमाणें सर्व हिंदू लोकांचीं ज्या ज्या ठिकाणीं संस्थानें आहेत व जेथे ब्राह्मणास खाण्याची सोई आहे तेथें असेच आहे पहा! लोक किती धुंदींत आहेत!"‡ "परतु इतके सरदार आहेत त्यांपैकीं एकजणास आणून पाहिलें, कीं हा गृहस्थ कोणत्या उपयोगी पडेल? तर मला वाटते, कीं या पृथ्वीवर कोणतेंहि काम त्याचे लायक सापडावयाचें नाहीं..... लिहितां येत नाहीं, बोलतां येत नाहीं, वेड्यासारखे दिसतात. त्यांस दिवाणजींनीं आपले पोटाकरिता सजवून दरबारांत आणावें. महाराजांस उठा म्हणून सांगितलें पाहिजे. . त्यांस

* 'प्रभाकर' पत्र न. ६८, ता. २२ जुलै १८४९. ‡ 'प्रभाकर' पत्र नं. ३०.

उजाडल्या-मावळल्याची खबर नाहीं व योग्यता कांहीं नाहीं व्यापाराच्या कामांत उपयोग नाहीं विद्वान् नाहींत. चाकरी करण्यास बळकट नाहींत. जिवंत मात्र असतात, परंतु असे हे लोक जे जिवंत राहतात त्यांचें जिणे फार वाईट व लज्जेचें आहे. मला वाटतें, कीं यांनीं आतां सरंजामाची व पेन्शनाची आशा सोडावी. आपले सुधारणुकीकडे लागावें "*

पुराणिक, कथेकरी वगैरे लोकांनीं स्वदेशीचा व बहिष्काराचा उपदेश करावा व पुराणांतील निष्कारण भाकडकथा सांगूं नयेत असें ते लिहितात :

"याजकरितां सर्वांहीं असा कट करावा, कीं जे आपले देशांत पिकेल तेच नेसूं, तेंच वापरूं. कसेंहि असो आणि तितक्यांत चांगल्या विद्या व जिन्नस उत्कृष्ट करावयाच्या विद्या शिकूं मग हजारो खंडी कापूस इकडून विलायतेस कशास जाईल? कापूस विकणाऱ्यांनीं असा बेत करावा, कीं इंग्रजास इकडे तयार केलेलीं कापडें द्यावीं परंतु कापूस देऊं नये. येणेकरून हे लोक सुखी होतील. सध्या आपलेच लोक आपल्या लोकांस मारीत आहेत जर हरदास व कथेकरी यानीं अशीं मते घेतलीं आणि लोकांस जर भरविलीं तर बहुत लोक एकत्र होतील कारण कीं ही उघडी गोष्ट आहे ... चांगल्या गोष्टी छापखान्यांतून निघाव्या असेंच नाहीं हरदासानींहि काढाव्या व त्यांस लोक एकत्र करण्याची फार शक्ति आहे . अशा प्रकारच्या कथा सांगितल्या तर फार फायदा होईल हे गोसावी कथा करतात हें व्यर्थ लोकास आणखी मूर्ख करतात कारण कीं अमानुष गोष्टी त्यांस सांगतात. काळयवन आला आणि कृष्णाने त्यांस मुचकुंदाचे हातून जाळिला रामास संकट पडले तेव्हां मारुतीनें एक पाय लंकेंत आणि दुसरा अयोध्येत ठेविला....या गोष्टी सांगून कांहीं तरी उपयोग आहे काय? आतां लोक भिकारी आहेत याजवर सोन्याची वृष्टि होत नाहीं व मागील गोष्टी झाल्या तशा आता होत नाहींत "‡ "परतु त्यांस काहीं माणसासारख्या कथा सागाव्या, कीं अमुक राज्य हें कशानें गेलें? दिल्लीचें राज्य, बाजीरावाचें राज्य हें कां गेले? काय व्यंग त्यात होते हें काढावें तसेंच विलायतेंत राज्य कसें आहे? परंतु आमचे लोक मूर्ख आहेत. त्यांस सांगितल्यावर ते म्हणतील, कीं राज्य कशानें गेलें, तर सद्दी फिरली म्हणजे राज्य जातें. हे काळाचे महात्म इंग्रजांची सद्दी फिरेल तेव्हां त्यांचेंहि राज्य जाईल परतु हे कांहीं उत्तर नाहीं लोक अगदीं मूर्ख झाले आहेत त्यांचीं चित्तें मागील अमानुष गोष्टींवर फार आहेत. यांजमुळे त्यांस असे वाटते, कीं अवतारी पुरुष होईल तेव्हां आमचें कल्याण करील. हें मनुष्याचे कृत्य नव्हे अशा मूर्खपणाच्या समजुती आहेत. परतु जरी ईश्वर सर्व गोष्टी घडवितो तरी मनुष्यांनीं मूर्खासारखा नशिबावर भरंवसा ठेवून आळशीपणांत राहूं नये. जो उद्योग करतो त्यास ईश्वर साहाय्य होतो, म्हणून लोकांनीं उद्योग करावा हेच उत्तम सद्दी या शब्दाचा अर्थ पाहिला तर कांहीं नाहीं. लोकांचा मूर्खपणा आहे."

* 'प्रभाकर' पत्र न ४९ ‡ 'प्रभाकर' पत्र न , ता २२ एप्रिल १८४९.

या वेळच्या सामान्य लोकांमध्यें, विद्वान् म्हणविणाऱ्या ब्राह्मणांमध्ये व शूर म्हणविणाऱ्या सरदारामध्ये प्रारब्धवाद माजला होता आणि ईश्वरावर जो भरंवसा होता त्याचाहि परिणाम असा झाला होता, कीं भावी अवतारी पुरुषाच्या आगमनाकडे डोळे लावून व मागील वैभव आठवून आळसात, चैनींत व अनीतींत दिवस काढावे अशी वृत्ति सर्वत्र बोकाळली होती हा प्रारब्धवाद व अवतारवाद नष्ट करून लोकांना प्रयत्नवादी बनवावे, हा लोकहितवादींच्या सर्व लिखाणाचा रोख होता. प्रारब्ध किंवा दैव हा केवळ मूर्खपणा आहे आणि ईश्वर झाला तरी प्रयत्नशील व ज्ञानवान् मनुष्यासच साहाय्य करतो, असे लोकहितवादींचे म्हणणे होते. इंग्रज लोक प्रयत्नशील व ज्ञानी झाले म्हणून परमेश्वराने त्याना येथील राज्य दिले आणि आमचे लोक प्रारब्धवादी झाले व केवळ अवतारवादी बनून आपले ज्ञान वाढवीनात व यत्न करीनात म्हणून त्याचे राज्य गेले, ही ऐतिहासिक घडामोडींकडे पाहण्याची नवी दृष्टि त्यांनी आपल्या लोकांना दिली. ही दृष्टि तत्कालीन प्रारब्धवाद व अवतारवाद यांपेक्षां श्रेष्ठ होती यात शका नाहीं पण यात एक भ्रामक समजूत होती, ती म्हणजे हिंदी लोक शहाणे व देशभक्त झाले म्हणजे इंग्रज आपोआप येथून जातील किंवा त्याच्यापुढे लोकांनीं जाऊन पार्लमेंट मागितलें कीं ते सहज देतील ही होय तसेच प्रत्येक गोष्टींत इंग्रज शहाणे व आमचे लोक मूर्ख असाच जप सारखा करीत बसल्याने लोकातील स्वाभिमानहि नष्ट होऊन ते पराक्रमी होणेहि शक्य नसते यासाठीं इंग्रजाची स्वार्थी नीति लोकापुढे माडून आणि लोकांतील स्वाभिमान जागृत करून त्याना पराक्रमी बनविण्याचे प्रयत्न केले पाहिजेत, असे चिपळूणकरानी ठरविले व तें लो टिळकानीं अमलात आणिले तथापि, त्यामुळें लोकहितवादींनीं तत्कालीन निष्क्रिय प्रारब्धवादावर व अवतारवादावर केलेली टीका निरर्थक किंवा चुकीची ठरत नाहीं महाराष्ट्रातील तत्कालीन समाज दैववादी कसा बनला याचें विवेचन लोकहितवादी पुढीलप्रमाणे करितात .

" जे लोक शाहाणे आहेत ते उद्योगवादी असतात, कारण उद्योगानें सिद्धि होते हे ते जाणतात , व मूर्ख आहेत ते प्रारब्धवादी असतात, कारण उद्योगानें सिद्धि होते हे ते जाणत नाहींत आणि हे वास्तविक पाहिले तर खरेंच आहे कारण लोक मूर्ख असले म्हणजे तेथें शाहाण्यानें अशी उमेद धरू नये, कीं माझी अब्रू वाढेल व वेड्याने असे म्हणू नये, की मी नेहमीं वेड्याचे योग्यतेनें राहीन.. . बाजीराव पुण्यांत होता तेव्हा अशी व्यवस्था होती, की जे आज भाकऱ्या भाजीत होते ते उद्या पालखींत बसले आणि आज पालखींत होते ते उद्यां भिकेस लागले.. गहूं आणि जोंधळे सारखे विकूं लागले म्हणजे लोक नशीब म्हणूं लागतात व यापासून आळस उत्पन्न होतो व उमेद खचते व कोणी योग्यता मिळविण्याची काळजी ठेवीत नाहीं त्यास असें वाटतें, कीं मी व्यर्थ इतकी विद्या केली, शाहाणपण शिकलो. येथें सक्ट घोडे बारा टक्के आहेत. .याप्रमाणे हा सर्व अनर्थ लोकाचे अज्ञानामुळें किंवा राजाचे

मूर्खपणामुळें होतो याचा निश्चय होत नाही. तत्रापि आमचा अभिप्राय असा आहे, कीं याचें कारण लोकांचें अज्ञानच आहे जर लोक शाहाणे असतील तर प्रायशः राज्य वाईट होणार नाहीं, हा नेम आहे."* यात देशातील समाजपद्धति व राज्यपद्धति चांगली नसली व गुणांना मोल नसले म्हणजे लोक प्रारब्धवादी होतात असे म्हटले आहे "राजा कालस्य कारणम्" या तत्त्वाचा हा निष्कर्ष आहे, पण त्याच्याहि पुढे जाऊन अखेरीस लोक मूर्ख म्हणून वाईट राजा किंवा राज्यपद्धति टिकते, असा अंतिम निर्णय देऊन लोकाचे ज्ञान व प्रयत्न यावर सर्व अवलंबून ठेविले आहे

## धार्मिक तत्त्वज्ञान

धार्मिक तत्त्वज्ञानाला प्रवृत्तिपर बनवून कर्मयोगी करण्यासाठींच अर्जुनास गीता सांगितली, असे त्यांनीं लिहिलें आहे. ते लिहितात . "वैराग्य हे मूर्खपण आहे आणि ईश्वराने जे दिलें व ज्याकरिता मनुष्यदेह केला त्यास टाकून जनावराप्रमाणें रानात फिरणें आहे, कारण जे कर्म आपणास सांगितलें आहे, तें न केले तर जन्माचे सार्थक होत नाहीं जन्माचें सार्थक म्हणजे ज्याकरिता जन्म घेतला, त्याचे सर्व अर्थ म्हणजे हेतू परिपूर्ण करणे. आता प्रथम हेतु हाच, कीं ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें या सर्वांचे यथास्थित व्यापार करणे व शास्त्रयुक्त चालणे व आश्रमाप्रमाणें व वर्णाप्रमाणें वागणूक करणे" "देवानें सर्वदा माझें भजन करा म्हणून मनुष्यावर ओझें घातले नाहीं तो **इतकेच भजन मागतो, कीं जे आपले आणि आपले कुटुंबाचे व इतर जनांचे काम आहे ते सर्व चांगले रीतीनें करून नंतर जी वेळ सांपडेल ती क्षणभर असो अगर घटकाभर असो, स्नानसंध्येत किंवा प्रार्थनेत आणि नामस्मरणांत घालवा. म्हणजे त्यांतच अनंत वर्षें तपश्चर्या केल्याचे फल आहे** यास्तव **उत्तम हेच, कीं मनुष्यानें आपले कर्म करावे. श्रीकृष्णानें गीतेच्या ठायीं हाच अभिप्राय अर्जुनास सांगितला आहे. अर्जुन विषाद पावून वैराग्य घेत होता. तेव्हां कृष्णाने त्याची समजूत केली, कीं अरे षंढा, तूं भितऱ्यासारखा वैराग्य काय घेतोस? जे आपले कर्तव्य आहे तें कधींहि टाकूं नको. त्याचें आचरण कर. आणि सुखदुःख मात्र मानूं नको. वैराग्य हे मूर्खपण आहे. आशा व दुःख जे लाभालाभापासून होते ते मात्र सोडावे. परंतु संसारी जे कर्म लोकांत प्रकट होऊन चालत आले आहे ते टाकूं नये.**"§

मूर्तिपूजेचा निषेधहि ते गीतेच्या आधारेच पुढीलप्रमाणें करितात: "ईश्वर काहीं मनुष्यास दृष्ट नाहीं. त्याचे अस्तित्व सृष्टीकडे पाहिल्याने मात्र समजते याप्रमाणे सर्व लोकहि कबूल करतात. तेव्हां देवाचे भजन करणे योग्य व तो

---

* 'प्रभाकर' पत्र न २४, ता ३० जुलै १८४८.

§ 'प्रभाकर' पत्र न २६, ता ११ ऑगस्ट १८४८.

सर्वांहून वरिष्ठ आहे. परतु त्याचें भजन करावें कसें हे कळले पाहिजे. ईश्वरास जर आम्हीं फुले अर्पण केलीं तर पद्म बरे, त्यानें पृथ्वी निर्माण केली, तेव्हां त्यास कांहीं कमी आहे काय ? तसेच त्यास नैवेद्य दाखवावा तर तो उपाशी आहे काय ? त्याला कोणतािह उपचार करावयास मनुष्य योग्य नाहींत, कारण तो परिपूर्ण आहे याज-विषयीं पूर्वींचे ऋषींचे मत असेंच आहे परतु लोक सामान्यतः मूर्ख आहेत त्यांस वास्तविक ईश्वर कळत नाहीं. याजकरितां ते त्यास बळेंच स्वरूप देऊन सगुण करून ठेवतात. त्याचें वर्णन असे करतात, कीं त्याचे हातांत शंख, चक्र, गदा, पद्म आहे. म्हणजे त्याचा अर्थ इतकाच, की तो लोकांस शासन करणारा आहे चक्रें-करून त्याचा अनादिपणा व अनतपणा प्रकट होतो ईश्वराचीं स्वरूपे अनेक प्रकारचीं वर्णन करितात मूर्ख लोकांस ईश्वर कळण्याकरितां हीं वर्णनें केलीं, परतु सार इतकेंच, कीं ईश्वर एकच आहे त्यास ब्राह्मणहि नाकबूल नाहींत. परंतु या एक ईश्वराचें मनुष्यानें मनन करावें याचा विचार केला असतां परमात्मा जो भगवान् त्यास मनुष्यांनीं मूर्खपणानें भजावे हेहि अयोग्य आहे व देवास लहान मानून मूर्ति काढितात. याची निंदा गीतेत दोन ठिकाणीं केली आहे ते श्लोकः

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः।
परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ ७-२४§

या प्रकारेंकरून ईश्वरास मूर्त मानणें हे मूर्खत्व आहे. ईश्वर अमूर्त हे त्याच्या कृत्यावरून समजते.. ईश्वराचे दर्शन होत नाहीं, तेव्हां त्याचें ध्यान मनेंकरून करावे जें कांहीं कृत्य आणि उपचार करावयाचे ते पात्रापात्र पाहून मनुष्याचे ठायीं करावे हे उत्तम आणि दयाधर्मास पात्र मनुष्य आहे, ईश्वर नाहीं ईश्वर-वर्णनास मात्र योग्य जें कांहीं अर्पण करावयाचें ते मनुष्यास केलें पाहिजे. देवास नको . ईश्वराचें व्यक्त स्वरूप ही सृष्टि आहे तेव्हां या व्यक्त स्वरूपाचे ठायीं काय ते अर्पण करावे. दगड हा कांही ईश्वराचें प्रत्यक्ष स्वरूप नाहीं. दगडापेक्षां जिवंत पदार्थ बरा; त्यास क्षुधा आहे व तृष्णा आहे एकादा गरीब अधकारांत बसला आहे, दरिद्रानें पीडित आहे, ज्यास पैसा मिळत नाहीं, त्यास पैशाचे तेल आणून देऊन उजेडांत बसविलें तर बरे, किंवा तें सोडून त्यास अधारांतच ठेवून देवळांतील मूर्तीजवळ पैशाचा कापूर नेऊन जाळावा हे बरे ? कोणत्यानें ईश्वर तृप्त होईल ? ”*

तात्पर्य, ईशपूजा करण्याचा प्रशस्त मार्ग म्हणजे ध्यान किंवा मनन हा असून आपणांस द्रव्यरूपाने ज्या गोष्टी द्यावयाच्या असतील, त्या मनुष्यमात्रास द्याव्या आणि मनुष्यसेवा हेंच ईशपूजेचें प्रशस्त बाह्य स्वरूप मानावें आपापलीं सामाजिक व कौटुंबिक कर्मे करणे हेंच एक ईश्वराचें भजन असून हें करण्यास लागणारी चित्तशुद्धि

§ वर दोन श्लोक देतो म्हणून येथे एकच श्लोक दिला आहे. दुसरा श्लोक ‘ नाहं प्रकाश सर्वस्य योगमायासमावृत । मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ ’ हा त्याच्याच पुढचा श्लोक असावा. * ‘ प्रभाकर ’ पत्र न ३७, ता १ डिसेंबर १८४८.

व अतःसमाधान लाभावींत म्हणून मनुष्यानें कांही काळ ध्यान व मनन करावें, असा त्यांचा कर्मयोग असून निवृत्तीपेक्षां प्रवृत्ति श्रेष्ठ, असे त्यांनीं वारंवार उपदेशिले आहे.

" वेदात्यापेक्षां धादांती बरा अशी एक म्हण लोकांत प्रसिद्ध आहे, परंतु तींतील रहस्य बहुतेकांस पसत नसेल.. वेदांती म्हणणे असे आहे, कीं हे जग सर्व मिथ्या असून मायेने याचा भास झाला आहे, परतु तें खरे नाहीं याचा व्यापक व चालक परमात्मा मात्र खरा आहे असे मानून दुनियेचा त्याग करावा व सर्व उद्योग सोडावा असे मतवादी जे आहेत ते वेदाती होत.. आतां धादांती कोण म्हणून विचाराल, तर धादाती म्हणजे जे दिसते ते सर्व खरे आहे असे समजून चालणारे व वरतीं लिहिलेले लोकांखेरीज जे राहिले ते सर्व धादांतीच होत आतां धादांती जे आहेत ते या जगाशीं नेहमी लढत असतात ते रोग्यास औषधे देतात, अज्ञानास शिकवितात, दुःखिताचे दुःखनिवारणाविषयीं होईल तितका यत्न करितात, परोपकारास झटतात व व्यवहारांत वागतात याजमुळे लोकास त्यांचा उपयोग फार पडतो तेव्हां लोकांनीं आपल्या वाणींत त्यास बरे म्हटले...( **धादांती ) लोभी असला तर द्रव्यार्थ खटपट करितो आणि साधु असला तर लोकांचे हिताकरितां खटपट करितो**, ग्रथ लिहितो, कविता करितो, लोकास बुद्धिवाद सागतो साराश, धादाती, लोभी व साधु कसाहि रिकामा राहत नाहीं तेव्हां तो लोकास फार पसत वाटतो यास दृष्टांतादाखल पूर्वीच्या कथाहि आहेत भगवतानीं अर्जुनास उपदेश करून धादाती केलें रामदासस्वामींनीं राज्य करण्यात मोठी खटपट केली तुकाराम वगैरे जगाच्या हिताकरिता फार झटले आणि त्यास सामर्थ्य होतें त्याप्रमाणें त्यांनीं आपले बुद्धीचा उपयोग केला याप्रमाणे ते न करते तर त्यांचे नांव आज कोणींच न घेते व त्यांस लोक विसरलेहि असते. .लोकांचीं घरे जळू लागलीं तरी हे वेदाती सर्व मिथ्या म्हणणारे मग घर जळाले काय व राहिलें काय ; मुळींच मनास आणावयाचे नाहीत याप्रमाणे या देशांत हा मार्ग निघाल्यापासून बहुत तोटे झाले व बहुत लोक आळशी झाले " या उताऱ्यांत एक प्रकारे कर्मयोग व कर्मसन्यास याचे विवेचन असून कर्मयोग श्रेष्ठ ठरविला आहे. धादाती यांचे दोन वर्ग; एक लोभी व दुसरा साधु असे कल्पिले आहेत व ते दोन्हीहि वेदान्त्यापेक्षां श्रेष्ठ म्हटले आहेत. वेदांत्याला आळशी ठरविले आहे त्याचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे : " मूळचा वेदांती असोन त्यास काही स्वास्थ्य किंवा पेन्शन मिळालें असले, तर मग त्यासारखा कोणीच आळशी नाहीं स्वास्थ्य नसलें तर त्यास वेदान्त झाकून ठेवून लोकापुढे धावावे लागते व त्यास त्याचा उपाय नाहीं. क्षुधा, तृषा, उष्ण, शीत हीं त्यास धादांताकडे ओढतात. परंतु त्यास स्वास्थ्य मिळालें म्हणजे तर तो पुरा वेदांत प्रकट करितो म्हणजे ससार टाकून गोसावी होऊन जातो, असे तर नाहींच, परतु लोकांचे उपयोगी न पडण्याची पराकाष्ठा करतो " हे झाले ढोंगी वेदांत्याचें वर्णन पण जो वस्तुतः संन्यासी होऊन परोपकाराचीं कर्में करीत नाहीं,

तोहि लोभीच होय. "मनुष्यास अनेक प्रकारच्या गरजा व अडचणी आहेत. त्या सर्वांविषयीं जर तो डोळेझांक करितो आणि कोणाचे उपयोगी पडत नाहीं, तर तो स्वहिताचा मोठा लोभीच म्हटला पाहिजे कारण सर्वांचा अनादर करून व सर्वांची काळजी सोडून केवळ आपले जिवाची मात्र तो तजवीज करितो. तेव्हां तो सामान्य लोभी नव्हे. मोठा लोभी समजला पाहिजे.. आम्हांस वाटते, कीं अज्ञानी, आळशी यांस आपला स्वभाव झाकून नेण्यास आणि फुकट प्रतिष्ठा भोगण्यास वेदांतमार्ग फार उपयोगी पडतो"*

असो. अखेरीस लोकहितवादीच्या धर्मसुधारणेची व्याप्ति केवढी मोठी होती ते त्यांच्याच शब्दांत कलमवार देऊन त्यांचा निरोप घेऊ. ता १७ जून १८४९ रोजीं 'प्रभाकर' पत्रांत "धर्मसुधारणा" या मथळ्याच्या लेखांत ते लिहितात:

"मुख्य धर्मसुधारण्याची कलमें अशीं आहेत:—

(१) प्रथम, सर्वांनीं ईश्वराचे भजन अंतःकरणापासून करीत जावे

(२) व दुसरे, जसा आपला जीव तसा दुसऱ्याचा मानीत जावे.

(३) तिसरे, मुंज, लग्न, प्रेतक्रिया हे तीन संस्कार ठेवून बाकीचे सर्व रद्द करावे. चवथे जे कर्म करणे ते स्वभाषेत अर्थ समजे असें करावे. भजन, पूजन, संस्कार, सर्व जाचे त्याचे भाषेत करावे.

(४) चौथें, प्रत्येकास आपले विचाराप्रमाणे आचार करण्याची व बोलण्या-लिहिण्याची मोकळीक असावी.

(५) पांचवे, स्त्रीपुरुषाचे अधिकार धर्मसबंधीं कामांत व संसारांत एकसारखे असावे यांत पुनर्विवाह व मोठेपणीं लग्न आलें

(६) सहावें, आचारापेक्षां नीति प्रमुख असावी...आतां कितीएक बायका लबाड असतात, परंतु पिंपळाच्या प्रदक्षिणा अतरीत नाहींत, तसे असूं नये.

(७) सातवें, अर्थाशिवाय काहींएक म्हणूं नये.

(८) आठवें, मनुष्यमात्रास तुच्छ मानू नये जातिअभिमान नसावा सर्वांशीं सारखे दयापूर्वक वर्तावें. सर्वांचें कल्याण करावें

(९) नववें, स्वदेशाची प्रीति व त्याचें कल्याण विशेषेंकरून मनांत वागवावें

(१०) दहावें, जास पाहिजे तो त्याणें रोजगार करावा

(११) अकरावें, गुणेकरून व योग्यतेकरून जातिभेद मानावा. कुळेकरून मानूं नये

(१२) बारावें, सरकाराहून प्रजेचे अधिकार अधिक असावे. म्हणजे जे जे रयतेच्या हिताचे कायदे आहेत ते सरकाराशीं भांडून घेत जावे.

(१३) तेरावें, राजानें जे नेम केले असतील व जे ईश्वरी बुद्धिसूचित नेम असतील ते मानावे.

---

* लेखसंग्रह, पृ ८२८, वृत्तवैभव.

(१४) चवदावे, विद्यावृद्धीकरितां सर्वांनीं मेहनत करावी. दुःखितास सुख, रोग्यास औषध, मूर्खास ज्ञान व दरिद्यास द्रव्य शक्त्यनुसार देण्यास अतर करूं नये.

(१५) पधरावें, शेवटचे कलम असे आहे, कीं सत्यानें सर्वांनीं चालावें सत्याचे विरुद्ध वर्तणूक करूं नये."

या पंधरा कलमांत स्वदेशभक्ति, लोकसत्ता, विद्यावृद्धि वगैरे सर्व गोष्टींचा अंतर्भाव झालेला आहे. तेराव्या कलमांत राजाचे नेम व ईश्वरी बुद्धिसूचित नेम ते पाळावे असे म्हटलें आहे यांत विरोध आल्यास कोणचा मानावा व कोणचा मोडावा याचा निर्णय नाही. तो निर्णय बुद्धिसूचित ईश्वरी नेमाचे बाजूने दिला म्हणजे 'सत्याग्रह' जन्मास येतो. या वेळीं राजाचे नेमाविरुद्ध सत्याग्रह करण्याचें कोणी बोलत नव्हते शास्त्रें व रूढी याच्याविरुद्धच ही सत्याग्रहाची वृत्ति दिसून येते 'मन हेच ईश्वरी शास्त्र' या मथळयाचा एक लेख त्यानीं तारीख २५ मार्च १८४९ रोजीं 'प्रभाकरां'त लिहिला आहे. त्यांत ते म्हणतात :

"तेव्हां मन हाच मनुष्याचे वर्तणुकीचा ईश्वरी नेम आहे जशी भारतीं गदापर्वात कथा आहे कीं दुर्योधनानें पांडवाचीं बालकें मारिलीं, परतु हे ऐकून ऐकणारे म्हणतात, कीं अरेरे ! तो काय दुष्ट होता ! चाडाल होता ! याप्रमाणे मनाची ध्वनि निघते. वास्तविक पाहिले तर त्या गोष्टीस, ऐकणारास काहीं सबध नसतो. परंतु वाइटाचा निषेध व चागल्याचा अंगीकार हे मनाचे धर्म आहेत व ही ईश्वराचीच प्रेरणा आहे. बरे, असे आहे तर मनुष्य याविरुद्ध कां चालतात ? . . परतु वाईट गोष्टीस चांगले जे म्हणतात त्याचे मन साक्षी असते ते मनापासून म्हणत नाहींत, दुसरे कांहीं कारणानें म्हणतात. कोणी शास्त्राचे ओढीवर जातात. कोणी रूढीवर जातात आणि त्यास ही गोष्ट वाईट असे मनांत येते तरी मनाची ध्वनि दाबून दुष्टबुद्धिप्रेरित भाषण करितात, हें मोठे आश्चर्य आहे मला वाटते, कीं जे साधू झाले त्यानीं मन शुद्ध करण्याकरितां पुष्कळ ग्रथ लिहिले व पुष्कळ शिकविलें आणि नेमहि पुष्कळ केले, परतु ती गोष्ट साधली नाहीं लोकाचे मन वांकडेतिकडे जाते जर लोकांनीं वास्तविक सत्य स्मरून मनात विचार केला, तर त्यास कितीएक गोष्टी ज्या लोकांमध्ये चांगल्या म्हणून चालतात त्या वाईट, असे समजेल परतु हिंदू लोक अद्यापि आपल्या ठिकाणीं विचार करू लागले नाहींत व मन हेंच मोठे शास्त्र आहे व लिहिलेलीं शास्त्रे सर्व याचे खालीं आहेत असे त्यास वाटत नाहीं." या उताऱ्यां-तील "मनाची ध्वनि", "मन शुद्ध करणें", "लोकाचे मन वाकडेतिकडे जाते", "सत्य स्मरून मनात विचार केला तर" वगैरे शब्दांत सत्याग्रही वृत्ति स्पष्ट दिसून येते. या वृत्तीने प्रथम शास्त्रे व रूढी यांच्या पलीकडील शास्त्र हिंदी लोकाना दिसले, त्यानतर रूढ कायद्यांच्या पलीकडील ईश्वरी कायदे दिसूं लागले आणि आज रूढ आर्थिक घटनेपलीकडील न्याय्य आर्थिक घटना दिसूं लागली आहे हिंदी मन शास्त्रांचे, रूढींचें, कायद्यांचे व आर्थिक रूढ व्यवहारांचें गुलाम बनले आहे त्याच्या मनावर

तमःपटल चढले आहे ते दूर करण्यास व सत्यरूप परमेश्वराचे दर्शन घेण्यास त्याने शिकले पाहिजे, म्हणजेच त्याला सर्वांगीण मोक्षपदाची प्राप्ति होईल सर्वांगीण सुधारणेची ध्वजा रोवणारांनीं यांपैकीं शास्त्राचे व रूढीचे तमःपटल फाडिले, पण कायद्याचे पटल तसेच ठेविले ते कार्य पुढच्या लोकांनीं केलें.

## आर्थिक समतेचा उपदेश

संकुचित अर्थाचे धर्मशास्त्र व सामाजिक रूढी यांच्या पलीकडे पाहण्याची दृष्टि जशी लोकहितवादींना होती, त्याचप्रमाणें श्रीमत-गरीब या सामाजिक विषमतेच्या अन्यायाचे मूळहि त्यांनीं अस्पष्ट का होईना पण पाहिले होते, असे त्यांच्या लेखांवरून दिसते ता ११ फेब्रुवारी १८४९ च्या 'प्रभाकरां'त "दया" या विषयावर लिहितांना ते म्हणतात :

"वास्तविक पाहिले असता जे श्रीमंत आहेत, त्यानीं गरिबांस पाहिले म्हणजे त्यास लज्जा यावी आणि अंतःकरण विरघळावे कारण भिकारी आणि श्रीमत यांचे शरीरामध्ये किंवा बुद्धीमध्ये काहीं फरक नसतो. इतकेच, की काळेकरून एकाने दुसऱ्याचे हरण करून फार माल जमविला असतो व दुसऱ्याचा तो हरण जाहला म्हणून तो भिकारी असतो ईश्वराने पृथ्वीवर पदार्थ निर्माण केले, हे सर्वांस सारखे पोचावे हा त्याचा हेतु होय परतु मनुष्यांमध्ये जितके शाहाणपण तितकाच मूर्खपणा आणि अज्ञान आहे याजमुळे पन्नास लोकास लुटून एक श्रीमंत होतो पन्नास कुळबी गावांतील नागर धरून मेहनत करतात आणि एक जहागिरदार किंवा इनामदार त्यास कोडा ठेवून त्याचे दाणे घेतो आणि आपण रेशीमकाठी धोतर नेसतो व कामकाज काहीएक करीत नाहीं हे महात्म एकाचे आणि दुसरे गरीब बिचारे इनामदारापेक्षा शाहाणे असले, तरी आपले मेहनतीचा हिसा त्यास देतात हे आश्चर्य आहे ......एक राजाचे क्षयरोगी पोर असते, परतु त्याचे सर्व लोक आर्जव करतात आणि त्यास सर्व दौलत देतात व आपण उपाशी मरतात बरे, त्याणे स्वतां कांही तरी काम केले आहे काय? नाहीं तत्रापि लोक आंधळ्यासारखे त्यास बलिष्ठ मानतात आणि त्यास किनखापाच्या, मखमालीच्या कापडावर बसवितात व त्याच्याहून हजारपट शाहाणे असतात ते भीक मागतात. चिंध्यादेखील त्यांस मिळत नाहींत आणि राजाचे घरी कोणी एक पैसा चोरला तर त्यास फांशीं देतात व त्यास सर्व वाहवा म्हणतात आणि न्याय चागला झाला म्हणतात याणे चोरी कां करावी, अशीं आश्चर्ये लोकांमध्ये आहेत याजवरून जितके श्रीमत व जितके थोर पदवीस आलेले आहेत त्यांस असें वाटतें, कीं आम्ही नालायक असून हे आम्हांस प्राप्त जहाले आहे. याजवर आमचे हक्क परंतु ही समजूत मूर्खपणाची आहे.. परंतु वास्तविक पाहिले तर त्यांस लाज वाटावी हेच योग्य कारण कीं ते जे सुख भोगतात तें लोकाचे मूर्खपणामुळे भोगतात. तेव्हा त्या मूर्खावर काहीं तरी दया करणें योग्य आहे" अर्थात् लोकांतील मूर्खपणा

गेला म्हणजे श्रीमंतांची श्रीमती जाईल असा याचा निष्कर्ष निघतो ! पण हा लोकांचा मूर्खपणा केव्हां जाणार व कसा जाणार ? तो जाण्यास राजकीय व आर्थिक क्रांति व्हावी लागेल ती करण्याचे ज्ञान मूर्ख लोकांस येईपर्यंत त्यांना श्रीमंतांच्या दयेवरच जगलें पाहिजे हे उघड आहे. म्हणून सर्व धर्मांत दानाला महत्त्व दिले आहे, पण त्यामुळें आर्थिक क्रांतीचें प्रयोजन उरत नाहीं, असे नाहीं.

## सत्यशोधक समाजाची स्थापना

लोकहितवादींचे समकालीन असे महाराष्ट्रीय दुसरे महत्त्वाचे सुधारक म्हणजे ज्योतिराव फुले हे होत महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर चळवळीचे ते आद्य पुरस्कर्ते असून सामाजिक चळवळीला सामाजिक वर्गविग्रहाचे स्वरूप प्राप्त होण्यास त्याच्या सत्यशोधक समाजाची विचारसरणी कारण झाली, असे म्हणण्यास हरकत नाहीं. ब्राह्मणजातीच्या वर्चस्वाविरुद्ध अशा प्रकारची आक्रमणशील चळवळ होणे, हिंदु समाजांतील ब्राह्मणेतर जातींत स्वाभिमान उत्पन्न करण्याच्या दृष्टीने अपरिहार्य होते असे दिसते. तसेंच ब्राह्मण लोकांतील दुराराध्य व दुराग्रही लोकांना सामाजिक समतेचे तत्त्व विचारांत घेण्यास भाग पाडण्याचें कार्यहि या चळवळीने केले आहे " जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट। तरी तो तिहीं लोकीं श्रेष्ठ॥ " हे तत्त्व उराशीं बाळगून वागणारे ब्राह्मण, या चळवळीच्या आंचेनें बरेच जागे झाले आणि खेड्यापाड्यातून वरील सूत्राची प्रतिक्रिया " जरी ब्राह्मण असला श्रेष्ठ। तरी तो मानावा अतिभ्रष्ट॥ " अशा स्वरूपात काहीं काळ दुमदुमूं लागली यामुळेंहि एक प्रकारची जागृति समाजातील खालच्या थरापर्यंत पोहोचली तरी या चळवळीच्या पुढील प्रचारकात ब्रिटिश राजनीतीचें आकलन करण्याची पात्रता नसल्यानें ही चळवळ काहीं काळ नोकरशाहीच्या हातचे खेळणे बनली आणि तिल। मॉटेग्यू-सुधारणानतर अराष्ट्रीय राजकारणाचे विघातक स्वरूप आलें तथापि, ज्योतिराव फुले यांची महाराष्ट्रांतील आद्य सुधारकांत प्रमुखत्वाने गणना करणे अवश्य आहे.

ज्योतिराव याचा जन्म इ स १८२८ त झाला व इ स. १८९० सालीं त्यांचें देहावसान झालें. त्यानीं १८७३ मध्ये पुण्यास सत्यशोधक समाजाची स्थापना केली १८४२ मध्ये त्यांनीं पुण्यांत पहिली मुलींची शाळा सुरू केली १८६३ मध्ये त्यानीं बालहत्याप्रतिबधक गृह काढिले व १८६४ सालीं पुण्यांत सारस्वत जातींतील पहिला पुनर्विवाह घडवून आणिला महाराष्ट्रांतील अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीचा पहिला मान त्यांनाच द्यावा लागेल तसेच शिक्षणप्रसारांत प्राथमिक शिक्षणास व खेड्यांतील जनतेच्या शिक्षणास ते विशेष महत्त्व देत असत शेतकरी सुखी तर देश सुखी, याची जाणीवहि त्यांना झाली असून प्रत्येक दीन-दुबळ्याबद्दल त्यांचें अतःकरण तुटत असे. त्यांनीं लोकसेवेत आपलें आयुष्य घालविले व एका महाराष्ट्रव्यापी चळवळीची सुरुवात केली समाजसुधारणेची खेड्यात पोहोचलेली पहिली

चळवळ हीच होय. हे श्रेय कोणत्याहि ब्राह्मण सुधारकाला मिळत नाहीं. ज्योतिराव फुले यांना ब्रिटिशांचें राजकारण व ख्रिस्ती मिशनऱ्यांचा कावा समजला नाहीं असें म्हणणें भाग असले, तरी राजा राममोहन रॉयपासून सर्वच सुधारकांवर थोड्याबहुत अंशानें लागू होणाऱ्या या आरोपाला यांच्याच बाबतींत विशेष महत्त्व देण्याचें कारण नाहीं.

## प्रार्थनासमाज व त्याचीं तत्त्वें

इ स १८६७ सालीं मुंबईस प्रार्थनासमाजाची स्थापना झाली त्यांत लोकहितवादींचा भाग असला, तरी फार महत्त्वाचा नव्हता त्यांत न्या रानडे, डॉ. भांडारकर, श्री वामन आबाजी मोडक वगैरे दुसऱ्या पिढींतील मडळीच प्रमुख असून दादोबा पांडुरग यांचे बंधु डॉ आत्माराम पांडुरग यानीं प्रथम पुढाकार घेतला होता. डॉ भाडारकर व न्या रानडे हेच प्रार्थनासमाजाचे थोर आचार्य गणण्यास हरकत नाहीं त्यांपैकीं न्या रानडे हेच खरे सर्वांगीण सुधारक होत. त्यांच्या कार्याचा व धोरणाचा विचार पुढील दोन-तीन प्रकरणांत निरनिराळ्या स्वरूपांत करावयाचा आहे त्यामुळे येथें त्याचा विशेष विस्तार करण्याचे कारण नाहीं. येथें फक्त प्रार्थनासमाजाच्या वैशिष्ट्यासबधीं दोन शब्द लिहून हे प्रकरण संपवावयाचे आहे

प्रार्थनासमाजाची कल्पना बंगालमधील ब्राह्मसमाजाच्या कल्पनेवरून सुचली असली व ब्राह्मपुढारी बाबू केशवचद्र सेन याच्या मुबईस झालेल्या भेटीचा (१८६४) तिच्याशीं निकट सबध असला, तरी ब्राह्मसमाजाच्या हिंदुधर्मांतून फुटून निघण्याच्या धोरणास प्रार्थनासमाज प्रथमपासूनच विरुद्ध होता व केशवचंद्र सेन यानीं ब्राह्म-समाजाला जें स्वरूप दिले ते शुद्ध ख्रिस्ती वळणावर गेलें, ही गोष्ट न्या. रानडे व डॉ भाडारकर यांना कधींच आवडली नाहीं मूर्तिपूजा व अवतारकल्पना यांच्या-विरुद्ध त्यांचा रोख असला, तरी आपला पथ हा हिंदुधर्मांतीलच एक सुधारकपंथ आहे ही वृत्ति त्यांनीं सदैव जागृत ठेविली व वारवार उपदेशिली. डॉ भांडारकर व न्या. रानडे हे हिंदुधर्माचे फार मोठे अभिमानी असून "ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।" हे तत्त्व आपल्या धर्मांत आहे, याबद्दल त्याना विशेष अभिमान वाटे. डॉ भांडारकर एके ठिकाणीं म्हणतात, "आपल्या लोकांत परमेश्वर आपल्या निकट वास करितो, तो हृदयस्थ आहे, या अत्युत्तम विचाराचा विशेष प्रसार आहे." असें असले तरी त्याना जीवात्मा व परमात्मा यांचें अद्वैत व "अहं ब्रह्मास्मि" हें तत्त्व मान्य नाहीं तसेंच ते अव्यक्त परमात्म्याची उपासना करीत असले व मूर्तिपूजेच्या विरुद्ध असले, तरी ते परमेश्वराला सगुण मानतात. शंकरा-चार्यांचें निर्गुण परब्रह्म त्याना मान्य नाहीं, त्याचप्रमाणें शंकराचार्यांचा मायावादहि ते मानीत नाहींत. ते भक्तिमार्गी, सगुणोपासक व द्वैतवादी आहेत; पण मूर्तिपूजा

व अवतारकल्पना यांस त्यांचा विरोध आहे. त्यांना प्रार्थना अवश्य वाटते, पण प्रार्थनेनें भौतिक फलाची प्राप्ति होणें शक्य नाहीं असे त्यांचें मत आहे. प्रार्थना ही फक्त आत्मिक उन्नतीसाठींच केली पाहिजे, असा त्यांचा कटाक्ष आहे.

प्रार्थनेसंबधीं डॉ. भांडारकर म्हणतात, "बाह्य विषयासबंधानें इष्टप्राप्ति आणि अनिष्ट परिहार बाह्य उपायानींच केला पाहिजे रोग झाला असतां मनुष्य वैद्याकडे जातो, प्रार्थना करूनच थंड बसतो असे नाहीं आणि जसजसे मनुष्याचें ज्ञान वाढते तसतशी त्याची अधिकाधिक समजूत होते कीं बाह्य वस्तू अबाधित नियमांनीं बद्ध आहेत, ते नियम प्रार्थनेनें टळावयाचे नाहींत; जें व्हायचे तें त्या नियमांस अनुसरूनच होते ग्रीष्मऋतूमध्यें सूर्यकिरणांपासून ताप होतो. तो टळून त्या समयीं हेमतऋतूतील थड हवा आपणास प्राप्त व्हावयाची नाहीं. पर्जन्य पडणे न पडणे हे अशाच अबाधित नियमावर अवलंबून आहे, त्यात आमच्या प्रार्थनांनीं कांहीं फेरबदल व्हायचा नाहीं असे आहे म्हणून जेव्हा धर्माविषयीं शुद्ध ज्ञान होते किंवा धर्माचें उन्नत स्वरूप मनुष्याच्या अंतःकरणात प्रकट होते, तेव्हा मनुष्य असल्या बाह्य गोष्टींविषयीं देवाची प्रार्थना करीत नाहीं तुकाराम, नामदेव यांच्या-सारखे साधू असल्या बाह्य वस्तूस तुच्छ मानीत आणि त्या केवळ बाह्य उपायानीं ते साध्य करीत.. तस्मात् अहंकाराची निवृत्ति करून विनम्र भाव दे, विषयांपासून सोडीव, अतःकरण शुद्ध ठेवण्याविषयीं मजला निश्चय दे, दुष्ट विचार प्रवृत्त होणार नाहीत असे कर या प्रकारच्या आध्यात्मिक विषयासबंधाच्या प्रार्थना करणे हे साधूंच्या उदाहरणावरून आणि आपल्या मतिसामर्थ्यानें योग्य आहे अशी आपली समजूत होते आता कोणी म्हणेल, की याविषयीं तरी प्रार्थना केली असतां आमचें हृदय उन्नत होईल असे कशावरून म्हणावे ? बाह्य गोष्टी जशा अबाधित नियमांवर अवलंबून आहेत आणि प्रार्थनेने बदलावयाच्या नाहींत, त्याचप्रमाणें अंतःकरणाची शुद्धि आणि उन्नति ह्याहि अबाधित नियमांवर अवलंबून आहेत आणि प्रार्थनेच्या योगे त्यांमध्ये फेरबदल व्हावयाचा नाहीं मत्सरादिक दोष उपस्थित झाले असतां त्यांचा मनाच्या निश्चयाने निग्रह करावा, विषयामध्यें अनुचित प्रकारें मन लुब्ध झालें म्हणजे ते ओढून घ्यावें. अशा प्रकारे आपणच आपल्या प्रयत्नानें आपली उन्नति करावी प्रार्थना कशास पाहिजे ? तिच्याने काहीं व्हावयाचें नाहीं. परतु असा विचार केला पाहिजे, कीं ह्या प्रकारचा सतत यत्न करण्याकरिता जें निश्चय-सामर्थ्य पाहिजे ते आम्हां मनुष्यामध्ये नाहीं.. ... आणि तुकाराम-नामदेव इत्यादि संताचाहि तसाच अनुभव आहे. परतु अनन्यभावें देवास शरण जाऊन प्रार्थना केली असता हें निश्चयसामर्थ्य आपणांस प्राप्त होतें आणि अंतःकरण शुद्ध व उन्नत करण्याचा मार्ग सुलभ होतो, असाहि सर्वांचा अनुभव आहे "§

अशा प्रकारें भौतिक व्यवहारांतून अशास्त्रीय चमत्कारांचें उच्चाटन प्रार्थना-

§ डॉ भाडारकर याचे धर्मपर लेख व व्याख्यानें, पृ. १६६–६७.

समाजाने केले आहे. प्रार्थनेच्या या आध्यात्मिक उपयुक्ततेसंबधींहि सर्वांचेच एकमत होईल असे नाहीं. आगरकरांच्यासारख्या बुद्धिवाद्याला हे एक मानवी मनाचें दौर्बल्य वाटेल आणि टिळकांच्यासारख्या तर्ककर्कश अद्वैत वेदांत्याला द्वैतावस्थेत तिची उपयुक्तता पटली, तरी पारमार्थिक दृष्ट्या ती एक मायाच भासेल पण आगरकर-टिळकांच्या विवेकवादाच्या व वेदान्तवादाच्या पूर्वीचा हा काळ आहे महाराष्ट्रीय सुशिक्षितांचें मन या वेळीं भाक्तियुगांतच होते आणि प्रार्थनासमाजाचा विवेकवादा-इतकाच अद्वैत वेदान्तालाहि विरोध होता

अवतारकल्पनेसबधीं डॉ भांडारकर म्हणतात: "हे जे ऋषी अथवा उपदेशक ते धर्माची ग्लानि झाली असतां आणि अधर्माची वृद्धि झालेली पाहून मनुष्याची सुधारणा व्हावी म्हणून मनुष्यानेच उत्पन्न केले आणि त्यांच्या अतःकरणांत विशेष रूपानें देव वागतो, म्हणून तदशी ते देवाचे अवतारच होत असें मानणें योग्य आहे. .. म्हणून भगवद्गीतेतील वर लिहिलेल्या वचनामधील "तदात्मानं सृजाम्यहम्" ह्या अंशाचा असा अर्थ केला पाहिजे, कीं असे पुरुष उत्पन्न करून त्यांच्या बुद्धीमध्ये मी संचार करितो. हे सर्व पुरुष परम आदरणीय आणि पूज्य असे जरी आहेत, तथापि ते सर्वांशीं देव नव्हत. देवाचे जे गुण अजत्व, अनाद्यनतत्व, सर्वव्यापित्व, सर्वज्ञत्व, केवळ शुचित्व ते त्यांच्यामध्ये नव्हते परतु ते सर्व आम्हांस वद्य आहेत "*

आता मूर्तिपूजेवरील समाजाचे आक्षेप डॉक्टरसाहेबांच्याच शब्दात सांगून महाराष्ट्रांतील आद्य सुधारकाचा हा अध्याय आपण समाप्त करू. कारण त्यानीं प्रतिपादिलेल्या विशिष्ट सामाजिक सुधारणाचा उल्लेख लोकहितवादींच्या पधरा कलमी धर्मसुधारणेत आलाच आहे

"पूर्वील निबधात या प्रकारचीं वाक्ये दिलीं आहेत:—'मी सर्वांचा प्रभु व मजपासून सर्व प्रवृत्त होतें असे मनात आणून शहाणे जे आहेत ते मजला भजतात ईश्वर सर्वांच्या हृदयाच्या ठायीं वास करून सर्वांस भोवडवितो, त्याला तू शरण जा, त्याचेपासून तुजला अत्यत शाति प्राप्त होईल.' अशा प्रकारच्या वाक्यामध्ये ज्या देवाचे भजन करावयाचे किंवा ज्यास शरण जावयाचें तो अशा प्रकारचा असावा असें म्हटले आहे. एकाद्या प्रतिमेस अगर देवतेस भज किंवा शरण जा असें म्हटले नाहीं. सारांश, मनुष्याची उन्नत वृत्ति व्हावी हे जर इष्ट आहे, तर अशा प्रकारच्या देवाचे लोकास ध्यान-भजन करा हे सांगणे इष्ट आहे. प्रतिमाच डोळयांपुढे ठेवून भजनपूजन करणे यापासून पुष्कळ अनिष्ट परिणाम होतात. प्रतिमा पुरुषाची किंवा स्त्रीची असली म्हणजे खऱ्या देवाच्या महिम्याचें आणि उन्नतीचे विस्मरण होऊन मनुष्यांच्या धर्मांचे त्या देवाचे उपासक त्याजवर आरोपण करितात. मग पुरुष असला तर त्यास बायको कल्पितात व स्त्री असल्यास तिला नवरा कल्पितात, आणि मग त्याजला आम्हां मनुष्यासारखी शय्या सज्ज करितात, आणि उपासक तमाखु

* कित्ता, पृ. १६३–६४.

खाणारे असल्यास पान-सुपारी व तमाखूची पिकदाणीचीहि देवाच्या गृहीं तयारी करून ठेवितात! याप्रमाणें देवाची केवळ विडंबना होते... यास्तव असे आनिष्ट प्रकार घडून येऊं नयेत म्हणून मूर्तिपूजेस धर्मप्रकरणांमध्यें ठाव देता कामा नये. आतां तुकोबा, नामदेव याच्यासारखे भाग्यशाली प्रतिमेपासून प्रारंभ करून परमात्म्याप्रत जातात व आनदांत निमग्न राहतात. पण असे पुरुष थोडे. बहुतकरून प्रतिमापूजेच्या योगें लोक प्रपंचकर्दमांत रुतून पडतात. आतां सामान्य लोकांस मूर्तीची आवश्यकता आहे असें म्हटले, तर तेंहि सप्रमाण दिसत नाहीं. मुसलमान व ख्रिस्ती लोकांत प्रतिमांची पूजा लागत नाहीं. आणि आमच्या राष्ट्रामध्ये वैदिक काळीं इंद्र, वरुण, पूषा, सविता इत्यादि ज्या अनेक देवता, त्यांच्या प्रतिमा बनविलेल्या कोठें आढळत नाहींत, परतु त्या देवांस उद्देशून केलेलीं सूक्ते आणि प्रार्थना पुष्कळ आहेत तेव्हा हा आक्षेप निराधार आहे."*

## नव्या युगाचा उदय

आतां आपण आधुनिक महाराष्ट्राच्या विचारप्रवाहात प्रवास करीत करीत इ. स. १८७० पर्यंत येऊन ठेपलों. येथून पुढे महाराष्ट्राच्या इतिहासाला एक नवें वळण लागले व त्याचे परिणाम सर्व भरतखंडावर झाले. १८७१ सालीं सार्वजनिक सभा स्थापन झाली १८७४ सालीं निबंधमाला सुरू झाली. १८८०-८१ सालीं न्यू इंग्लिश स्कूल, केसरी व मराठा याचा अवतार झाला. १८८५ सालीं राष्ट्रसभा स्थापन झाली. १८८८ सालीं 'सुधारक' पत्राचा जन्म झाला. १८९५ सालीं लो टिळकांनीं सार्वजनिक सभा हस्तगत केली, आगरकर मृत्यु पावले आणि पुण्यातील वादाला उद्धारक विरुद्ध सुधारक असे स्वरूप बदलून जाऊन जहाल-मवाळ राजकारणातील वादाचें स्वरूप प्राप्त होऊ लागलें. तेव्हां १८७० पासून १८९५ पर्यंतचा महाराष्ट्रीय विचारदोहनाचा इतिहास अत्यंत बोधप्रद आणि महत्त्वाचा आहे १८९५ सालीं महाराष्ट्रांत जे दोन राजकीय पक्ष निर्माण झाले, त्यांनीं सर्व भरतखडांत प्रचड आंदोलन निर्माण केलें आणि १९२० पर्यंतच्या त्याच्या इतिहासावर आपली छाप बसविली. पण १८७० ते १८९५ पर्यंतच्या महाराष्ट्रांतील इतिहासाच्या सास्कृतिक विचारांस सुरुवात करण्यापूर्वी आपणास दोन स्वतंत्र प्रकरणात हिंदी राजकारणाचा व अर्थकारणाचा पाया व राष्ट्रसभेचें प्राथमिक कार्य यांच्याशी परिचय करून घ्यावयाचा आहे. इ स १८८५ मध्ये राष्ट्रसभा स्थापन होण्यापूर्वीच दादाभाई व रानडे ह्यांनीं हिंदी राजकारणाचा व अर्थकारणाचा पाया घातलेला होता, असे म्हणण्यास हरकत नाहीं तसेच या दोन विभूतींच्या विचारांचा सूक्ष्म अभ्यास केल्यास त्यांत हिंदी राष्ट्रांत पुढे निर्माण झालेल्या जहाल-मवाळ राजकारणाचीं बीजेंहि दिसूं शकतात. तेव्हां आता त्या विषयाकडे वळणेच सोयीचें व इष्ट आहे.

---

* किता, पृष्ठ १५९-१६१.

५

# हिंदी राजकारण व अर्थकारण यांचा पाया

"I entreat most earnestly that the first element—viz the material condition of India may be most carefully sifted, and the necessary remedies be applied If this question be not boldly and fairly grappled with, it will be, in my humble opinion, the principle rock on which the British Rule will wreck It is impossible for any nation to go on being impoverished without its ultimate destruction or the removal of the cause" —*Dada Bhai, in 1871.*

"Be united, persevere, and achieve self-government so that the millions that are perishing by poverty, famine and plague, and the scores of millions that are starving on scanty subsistance may be saved and India may once more occupy her proud position of yore among the greatest and civilized nations of the world"

"Self-government is the only and chief remedy. In self-government lies our hope, strength and greatness" —*Dada Bhai, in 1906.*

**अर्वाचीन** हिंदी राजकारणाचा पाया एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास घातला गेला असे म्हणण्यास हरकत नाहीं. इ स. १८३३ सालीं ईस्ट इंडिया कंपनीला नवी सनद देण्यासाठीं जो कायदा ब्रिटिश पार्लमेंटने केला, त्यांत "कोणत्याहि हिंदी प्रजाजनाला केवळ धर्म, देश, वंश, किंवा वर्ण यापैकीं कोणत्याहि कारणांवरून कंपनीच्या कोणत्याहि नोकरीसाठी, अधिकारासाठीं किंवा जागेसाठीं नालायक मानण्यांत येऊ नये" अशा आशयाचे एक कलम घालण्यात आले. या कलमाचा अर्थ विशद करतांना कंपनीच्या डायरेक्टर-बोर्डानें (चालक-मंडळाने) "या कलमाचा अर्थ आम्हांस असा वाटतो, कीं ब्रिटिश राज्यकर्त्यांची वेगळी जात असणार नाहीं"§ असे वार्तिक केले होते या कलमाची चर्चा व त्याचे समर्थन करतांना लॉर्ड मेकॉले यानें पुढीलप्रमाणे उद्गार काढले होते: "आमच्या हिंदी

§ हें कलम पुढीलप्रमाणें आहे.

"And be it enacted that no native of the said territories nor any natural born subject of His Majesty resident therein, shall only by reason of his religion, place of birth, descent, colour, or any of them, be disabled from holdinq any place, office or employment under said company"

यावर चालक-मंडळाचे भाष्य असे आहे.

"The Court conceieve this section to mean that there shall be no governing caste in British India, that whatever other tests of qualifications may be adopted, distinction of race or religion shall not be of the number, that no subject of the King, whether of Indian or British or mixed descent, shall be excluded from the posts usually conferred on uncovenanted servants in India or from the covenanted service itself, provided he be otherwise eligible."

साम्राज्याचें भवितव्य गाढ अंधकारांत दडलेलें आहे ज्या राज्याशीं इतिहास-कालांतील दुसऱ्या कोणत्याहि राज्याची तुलना करतां येणार नाहीं व ज्याचें स्वरूप वर्णन करण्यास राजकीय संस्थांचा एक निराळाच वर्ग करावा लागतो, अशा या राज्याच्या भवितव्यासंबधीं तर्क करणे कठिण आहे त्याच्या वृद्धीचे व विनाशाचे नियम अद्यापि आम्हांस समजलेले नाहींत आमच्या राज्यपद्धतीखालीं हिंदुस्थानांतील सार्वजनिक मनाचा विकास होऊन ते या पद्धतीच्या पलीकडे जाईल, सुराज्याची स्थापना केल्यामुळे आमच्या हिंदी प्रजाजनांना अधिक चांगल्या राज्यपद्धतीच्या आकांक्षेचें शिक्षण मिळू शकेल आणि युरोपीय ज्ञानाचा लाभ झाल्यामुळे पुढे केव्हां तरी ते युरोपीय संस्थांचीहि मागणी करूं लागतील असा दिवस उजाडेल किंवा नाहीं, हे मला माहीत नाहीं पण हा दिवस उजाडू नये किंवा तो दिवस उशिरा उजाडावा असा प्रयत्न मी कधीहि करणार नाहीं तो दिवस ज्या वेळीं उजाडेल, ती वेळ इंग्लंडच्या इतिहासातील अत्यंत अभिमानाची ठरेल" याच भाषणांत थोडे आधी ते म्हणतातः "पूर्वेकडील या प्रचंड लोकसंख्येत युरोपीय संस्कृतीचा प्रसार झाल्यास आमचे जे हित होणार आहे, त्याची गणती करणेहि फार कठिण आहे या प्रकरणाचा आपण अत्यंत स्वार्थी दृष्टीने विचार केला, तरीहि हिंदी जनता आमची गुलाम राहून तिची राज्यव्यवस्था वाईट असावी, यापेक्षां तिची राज्यपद्धति चांगली राहून ती स्वतंत्र व्हावी यांतच आमचे अधिक हित आहे हिंदी लोक इंग्लिश कलेक्टर व मॅजिस्ट्रेट यांना सलाम करीत आहेत, पण ब्रिटिश माल वापरण्याचे त्यांना ज्ञान नाहीं किंवा तो घेण्यास त्यांच्यापाशीं द्रव्य नाहीं, अशी स्थिति होण्यापेक्षां ते आपल्याच राजांच्या हाताखालीं नांदत आहेत, पण आमचे कापड व आमच्या चाकू-कात्र्या वापरीत आहेत, हीच स्थिति आमच्या दृष्टीने अधिक इष्ट आहे. रानटी लोकांवर राज्य करण्यापेक्षा सुधारलेल्या लोकांशीं व्यापार करण्यात आमचा अनंतपट अधिक फायदा आहे." तात्पर्य, स्वार्थ, कीर्ति आणि राजकारण या सर्व दृष्टींनीं हिंदी लोकांना हळूहळू सुधारणे, त्यांना वरिष्ठ अधिकार देणे आणि त्यांच्या सुस्थितींत आपला स्वार्थ पाहणे हेच इष्ट होय, असे त्या वेळच्या ब्रिटिश मुत्सद्द्यांचे मत होते.

## व्यापारी संस्कृतीचा वेदान्त

व्यापारी संस्कृतीचें हे एक उच्चतम स्वरूप आहे, त्यांत दूरदर्शी स्वार्थ याचाच अर्थ 'परार्थ' असा करण्यात येत असतो या संस्कृतीचे हीन स्वरूप म्हणजे परार्थाचें ढोंग करून दुसऱ्याला लुबाडावयाचे ब्रिटिश हे राज्यकर्ते असले तरी ते मुख्यतः व्यापारी आहेत, आणि साम्राज्याच्या लोभापेक्षां व्यापाराचा लोभ त्यांच्या रोमरोमांत अधिक भिनलेला आहे. त्यांची मुलुखगिरी व्यापारी, त्यांची दरवडेखोरी व्यापारी, त्यांची नीतिमत्ता व्यापारी आणि त्यांचा धर्महि व्यापारीच! लक्ष्मी ही त्यांची आराध्य देवता आणि स्वार्थाला पोषक होणारा परार्थ हाच त्याचा परमार्थ व तोच त्यांचा

मोक्ष ! ! लॉर्ड मेकॉले याने हे भाषण केले त्या वेळीं ( १८३३ ) अमेरिका स्वतंत्र होऊन सुमारे पन्नास वर्षें झालीं होतीं आणि तो देश स्वतंत्र झाला, तरी त्याच्याशीं व्यापार करून मिळणारा इंग्लडचा नफा कमी न होतां उलट वाढलाच होता. हे दृश्य पाहून आपल्या साम्राज्याखालचे सर्वच देश सुसंस्कृत, संपन्न होऊन जर स्वतंत्र झाले तर त्यांत आपला आर्थिक तोटा मुळींच नाहीं, अशी वृत्ति ब्रिटिश लिबरल पक्षांत वाढत होती नेपोलियनच्या पराभवानंतर ( १८१५ ) आपल्या साम्राज्यांतील प्रदेश दुसऱ्या युरोपीय साम्राज्याच्या अमलाखालीं जातील अशी भीति व्यापारी वर्गाला उरली नव्हती तसेंच औद्योगिक क्रांतीमुळे आपणास जीं धनोत्पादनाचीं प्रचंड साधनें उपलब्ध झाली आहेत, त्यांमुळे आपल्याशीं खुल्या व्यापारांत कोणीहि टक्कर देऊं शकत नाहीं असा अनुभव त्याना येत होता अर्थात् या वेळीं व्यापाराच्या लोभांतून उद्भवलेला त्यांचा साम्राज्यलोभ किंचित् कमी झाला होता जगाच्या सुधारणेत आपला फायदा आहे, कारण रानटी लोक आपला माल विकत घेऊ शकत नाहीत, हा वेदान्त त्या वेळीं लिबरल पक्षांतील मुत्सद्दी सर्व जगाला शिकवीत होते

या वेळीं हिंदुस्थानांत जे गोरे अधिकारी, व्यापारी व धर्मप्रसारक आले होते, ते या वेदान्ताचा प्रसार येथील लोकांत करून तुम्हीं सुधारावे, सधन व्हावे व स्वतंत्र व्हावे यांतच आमचें हित आहे व तेच आमचे ध्येय आहे असे सांगून येथील सुशिक्षित लोकांच्या अतःकरणांत ब्रिटिश राज्यासंबंधीं राजनिष्ठा उत्पन्न करीत होते आणि जगाच्या सस्कृतींत दोन-अडीच शतके मागे पडलेले आमचे लोक त्यांचा हा वेदान्त ऐकून त्याना देव मानूं लागले होते जुन्या पद्धतीनें शिकलेले लोक सत्य-युगात पृथ्वीवर देव नादत होते, व आतां ते स्वर्गात जाऊन राहिले म्हणून रडत होते, तर नव्या पद्धतीने शिकलेले लोक आपणांस स्वतंत्र, सुखी व सपन्न करण्यासाठीं परमेश्वराने धाडलेले देवदूत म्हणजेच इग्रज लोक होत, असे प्रतिपादीत होते भारतीयांची बुद्धि एका गुलामगिरींतून बाहेर पडून दुसऱ्या गुलामगिरींत प्रवेश करीत होती व त्यालाच स्वातंत्र्य हे नाव ती देत होती. अशा अवस्थेंतील भारतीय मनाला ब्रिटिश मुत्सद्देगिरीचे कृष्ण अतरग अथवा ब्रिटिश साम्राज्याची काळी बाजू लक्षांत येणें फारच कठिण होतें हें कठिण कार्य ज्या एका महात्म्यानें केले, त्यालाच " आधुनिक भारताचे पितामह " ही बहुमानाची पदवी आपण देत असतों या प्रकरणात राष्ट्रपितामह दादाभाई नौरोजी आणि न्या. रानडे या दोन अर्थशास्त्र-विशारद मुत्सद्द्यांनीं हिंदी राजकारणाचा व अर्थकारणाचा पाया कसा व केव्हां घातला, याचाच विचार करावयाचा आहे.

इ. स १८३२ मध्ये इंग्लंडात पार्लमेंटची सुधारणा होऊन नवीन उदयास आलेल्या व्यापारी कारखानदारांचा वरचष्मा पार्लमेंटवर अधिक बसला या वेळीं इंग्लडात या वर्गाच्या हिताशीं सवादी असे एक नवे सामाजिक तत्त्वज्ञान बनलें. या तत्त्वज्ञानाची सर्व भदार व्यक्तिस्वातंत्र्यावर होती. व्यक्तिस्वार्थ आणि राष्ट्रहित,

राष्ट्रस्वार्थ आणि जगत्कल्याण यांत खरोखर द्वैतच नाहीं, असे प्रतिपादन करणारें हें तत्त्वज्ञान होते. या तत्त्वज्ञानापासून दोन निष्कर्ष काढतां येणें शक्य असते. एक असा निष्कर्ष काढतां येईल, कीं परार्थ करणाऱ्याचा स्वार्थ आपोआप साधतो, किंवा दुसरा असाहि एक निष्कर्ष काढतां येईल, कीं स्वार्थ साधण्याचा प्रयत्न केला असतां परार्थ आपोआप घडतो सूक्ष्म दृष्टीने विचार केल्यास हे दोन्हीहि सिद्धांत भ्रामक आहेत परार्थ साधण्याचा प्रयत्न करण्यांत आपला स्वार्थ साधतो असे जेव्हां म्हणतात, त्या वेळीं स्वार्थ याचा अर्थ फारच व्यापक आणि आध्यात्मिक दृष्ट्या करावा लागतो. "कोणी वदा कोणी निंदा। आमुचा स्वहिताचा धंदा॥" या वाक्यांतील 'स्वहित' व 'धंदा' आणि ब्रिटिश व्यापारी जो 'धंदा' करून जे 'स्वहित' साधतात त्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. असे असले तरी स्वार्थबुद्धीनें परार्थ करावा असा सिद्धांत स्वीकारून तदनुसार थोडेफार आचरण करणाऱ्यांपासून जगाचें प्रायः तितकेसे नुकसान होणार नाहीं 'धोरण म्हणून प्रामाणिकपणानें' वागणारांपासून लोकांचे प्रायः नुकसान होत नाहीं तथापि ज्या वेळीं 'धोरण' व 'प्रामाणिकपणा' यात अतर पडते, त्या वेळीं असे लोक प्रामाणिकपणा झुगारून देऊन 'धोरण' सांभाळतात असा यात धोका असतो पण दुसरा अर्थ म्हणजे स्वार्थ साधण्यांतच परार्थ आहे हा सिद्धान्त पुढे ठेवून वर्तन करणारांपासून जगाचे फारच भयंकर नुकसान होत असते. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास ब्रिटिशांतील सामाजिक तत्त्ववेत्ते आपला वेदान्त पहिल्या अर्थाने प्रतिपादीत असले, तरी त्यांतील मुत्सद्यांचें आचरण दुसऱ्या अर्थानेच होत होते आमच्या इकडच्या सुशिक्षित लोकांना ब्रिटिश तत्त्ववेत्त्यांनीं भुरळ पाडिली होती आणि आमच्या जनतेची लूट ब्रिटिश मुत्सद्यांनीं व व्यापाऱ्यांनीं चालविली होती. ही 'लूट' लोकसेवेच्या आणि लोकहिताच्या वेषानें नटलेली होती. व्यापारी किंवा आर्थिक साम्राज्यशाहीचें असेच मायावी मोहक स्वरूप असतें.

## दादाभाईंची दिव्य दृष्टि

या मायेच्या पलीकडे दृष्टि पोहोचवून, तिचे रक्तशोषक राक्षसी स्वरूप शोधून काढून ते लोकांना व राज्यकर्त्यांना एकसारखे समजावून सांगणें, नित्याच्या अनेक व्यवहारांत व्यग्र झालेल्या जनतेचें चित्त पुनः पुनः त्याच सत्याकडे खेचून आणणे, जन्मभर याच एका सिद्धांताचें व त्याच्या भीषण परिणामाचें चिंतन आणि ध्यान करणें, हाच खऱ्या ज्ञानाच्या प्राप्तीचा अथवा नव्या मंत्राच्या दर्शनाचा मार्ग या वेळीं होता. राष्ट्रपितामह दादाभाई यांनीं आपल्या सर्व जीवनांत हेंच एक कार्य केले, आणि आपल्या आयुष्याच्या अखेरीस हिंदी जनतेला व राष्ट्रसभेला स्वराज्याचा मंत्र देऊन ते राष्ट्रसेवेंतून वयाच्या ऐंशीव्या वर्षी कार्यनिवृत्त झाले. पारतंत्र्याच्या मोहांधकारांत चांचपडणाऱ्या आणि त्यांतच आनंद मानणाऱ्या आपल्या अज्ञानी देशबांधवांच्या

अंतःकरणांतील ज्ञानप्रदीप त्यांनीं प्रज्वलित केला आणि या ब्रिटिशांच्या मायावी साम्राज्यांत आपले कोट्यवधि देशबांधव दारिद्यानें व उपासमारीने मरत आहेत व या मोहांधकाराच्या काळरात्रींत आम्ही असेच घोरत पडलो, तर अखेर आम्हां सर्वांचाच त्यात विनाश होणार आहे, याचे ज्ञान भारतीयांना त्यांनींच प्रथम करून दिले. इतकेंच नाहीं, तर आपणांवर येणारी ही भावी आपत्ति टाळण्यास कोणत्या दिशेनें प्रयत्न केले पाहिजेत, याचेहि त्यांनीं लोकांना शिक्षण दिले. त्या मार्गानें जाणाऱ्यांचे नेतृत्व केले आणि आयुष्याच्या अखेरीस पुढील पिढीला स्वकर्तव्याचे दिग्दर्शन करून मातृभूमीच्या ऋणांतून ते मुक्त झाले यामुळेच त्यांना 'राष्ट्रपितामह' ही थोर आणि असाधारण पदवी प्राप्त झालेली आहे

दादाभाई नौरोजी यांचा जन्म मुबईस इ स १८२५ सालीं पारशी लोकांतील एका आचार्य-कुलांत झाला त्यांचे वडील ते चार वर्षांचे असतानाच वारले त्यांच्या मातोश्रींनीं आपल्या एकुलत्या एका मुलाला उच्च पदवीपर्यंतचे शिक्षण दिलें. त्या वेळीं उच्च शिक्षणापर्यंतचे सर्व शिक्षण मोफत होते त्यामुळेंच आपले शिक्षण होऊ शकलें आणि म्हणूनच उच्च प्रतीच्या शिक्षणापर्यंतचे सर्व शिक्षण समाजातील सर्व मुलांना मोफत असावे या मताचे आपण झालो, असे दादाभाईंनीं आपल्या आत्मचारित्रपर एका लेखांत म्हटले आहे तसेच आपले शिक्षण ज्या अर्थी लोकांच्या म्हणजे देशाच्या पैशांतून झालें आहे, त्याअर्थी आपण शक्य तितकी देशसेवा करून हे ऋण फेडिले पाहिजे असा विचार माझ्या मनात दृढ झाला, असे ते त्याच लेखांत लिहितात आपणांस ही देशसेवेची स्फूर्ति क्लार्क्सन् यांचे "गुलमांचा व्यापार" हे पुस्तक व परोपकारी हॉवर्ड यांचे चारित्र वाचून झाली असे ते म्हणतात. इ. स १८४५ मध्ये म्हणजे वयाच्या विसाव्या वर्षी त्याचा शिक्षणक्रम पुरा झाला त्यानंतर सुमारे दहा वर्षे ते मुंबईत होते १८५० मध्यें ते एल्फिस्टन् कॉलेजात गणिताचे व भौतिक विद्येचे लेक्चरर झाले व १८५४ मध्ये प्रोफेसर झाले पुढे १८५५ मध्यें ते कामा कंपनीचे नोकर म्हणून विलायतेस गेले व तेथेंच ते जवळजवळ पधरा वर्षे राहिले. १८६९ मध्यें ते परत हिंदुस्थानात आले त्यानतर १८७४ मध्यें ते कांहीं दिवस बडोद्यास मल्हारराव गायकवाड यांचे दिवाण होते, पण तेथील रेसिडटेशीं मतभेद होऊन त्यानीं त्या जागेचा राजीनामा दिला व मुबईस येऊन राहिले. यानतर त्याचे सर्व आयुष्य केवळ देशकार्यातच गेले असे म्हणण्यास हरकत नाहीं.

त्यांच्या देशकार्याचा प्रारभ कॉलेजातून बाहेर पडल्यापासूनच झालेला होता. इ स १८४८ च्या सुमारास एल्फिन्स्टन् कॉलेजातील ज्या विद्यार्थ्यांनीं 'ज्ञान-प्रसारक सभा' नांवाची सस्था काढून तिच्या मार्फत अज्ञानी देशबांधवांत ज्ञान-प्रसार आणि सामाजिक जागृति करण्याचा नवा उपक्रम केला, त्यांत दादाभाई हे एक प्रमुख असून तिच्या गुजराथी शाखेमार्फत चालणाऱ्या वर्गांत मोफत ज्ञानदान करण्याचेंहि कार्य ते करीत असत या संस्थेचे पहिले अध्यक्ष दादोबा पांडुरग हे

होते. पुढे डॉ. भाऊ दाजी लाड, रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलीक वगैरे सद्गृहस्थांनीं या संस्थेला चांगलेच नावारूपास आणिले. या संस्थेत सामाजिक व धार्मिक विषयांच्या चर्चेलाच विशेष प्राधान्य असे न्या रानडे यांनाहि देशसेवेची स्फूर्ति या संस्थेच्या कार्यातूनच मिळाली, असे त्यांचे चरित्रकार लिहितात मुबईत पहिली मुलींची शाळा निघाली, तिच्या स्थापनेच्या कार्यातहि दादाभाईंचें अंग होते. १८५१ मध्यें त्यांनीं "रास्त गोफ्तार" म्हणजे "सत्यवादी" या नांवाचें गुजराथी साप्ताहिक काढिले यानतर थोडेच दिवसांत त्यांनीं मुंबईस "बॉबे असोसिएशन" या नावाची पहिली राजकीय संस्था काढिली. ही संस्था काढण्यात नाना शकरशेट यांनीं प्रमुख भाग घेतला होता. नाना हे या वेळीं जवळजवळ पन्नाशींतील गृहस्थ असून त्याचे सरकारदरबारीं मोठेंच वजन होते. पुढें १८६१ मध्यें कायदेमंडळात बिनअधिकारी लोक घेण्याचें ठरले, तेव्हा त्याचीच मुबईच्या गव्हर्नरांनीं नेमणूक केली ते इ स १८६५ त निधन पावले, तोपर्यंत ते कायदेमडळाचे सभासद होते. लोकांच्या वतीनें सरकारशीं बोलणारे व मध्यस्थी करणारे मुबईतील पहिले राजकीय पुढारी असें त्यांस म्हणण्यास हरकत नाहीं पण त्याना ब्रिटिश साम्राज्याच्या कृष्ण अतरंगाचे यथार्थ ज्ञान झालें होते, किंवा जनतेच्या दारिद्र्याचे भीषण परिणाम त्यांच्या लक्षात बरोबर आले होते, असे म्हणता येत नाहीं म्हणून हिंदी राजकारणाचा पाया घालण्याचा मान त्यांना मिळू शकत नाहीं तो मान बॉबे असोसिएशनच्या संस्थापनेतील त्यांचे पचविशींतील तरुण सहकारी दादाभाई यानाच द्यावा लागतो

## निरनिराळ्या प्रांतांतील लोकसभा

हे दोन पुढारी मुबईस बॉबे असोसिएशनची स्थापना (१८५२) करीत होते, त्या सुमारास (१८५१) बंगालमध्ये श्री प्रसन्नकुमार टागोर, डॉ राजेंद्रलाल मित्र, हरिश्चद्र मुकर्जी वगैरे लोक ब्रिटिश इडिया असोसिएशन नावाची अशीच एक राजकीय संस्था स्थापन करीत होते. अशीच एक संस्था मद्रासमध्यें 'मद्रास नेटिव असोसिएशन' या नांवानें उदयास आली होती. ईस्ट इडिया कपनीला १८३४ सालीं पार्लमेंटने १८५४ पर्यंतची नवी सनद पुनः दिली होती. तिची मुदत आता संपत आल्यामुळें नव्या सनदेचा विचार इंग्लंडांत चालू होता. या वेळीं ब्रिटिश पार्लमेंटपुढे हिदी जनतेचे मत माडून हिंदी जनतेचा येथील राज्यकारभारांत प्रवेश करवून घेण्याचा प्रयत्न करणे हे या संस्थांपुढील प्रमुख कार्य होते या वेळीं मुंबई-प्रमाणें पुण्यांतहि एक सरदारांची व सामान्य लोकांची मिळून "डेक्कन असोसिएशन" नांवाची संस्था जन्मास आली होती; पण ती लवकरच मृत्युपंथास लागली

" हिंदी लोकांना आतांपर्यंत आपल्या देशाच्या राज्यकारभारात जेवढा भाग देण्यांत आला आहे, त्याहून अधिक भाग घेण्याचा हक्क त्यांना मिळावा असा काळ आतां आला आहे. तसेंच स्थानिक (प्रातिक) सरकारच्या मंडळात कायदे करतांना

व सामान्य धोरण ठरवितांना बुद्धिमान् व प्रतिष्ठित हिंदी लोकांचा समावेश होईल आणि लॉर्ड एलेनबरो, एल्फिन्स्टन् इत्यादि अधिकाऱ्यांनीं सुचविल्याप्रमाणे त्यांना देशाच्या हिताच्या प्रश्नांची चर्चा चालू असता भाग घेतां येईल, अशी व्यवस्था करणें अवश्य आहे" अशा आशयाचा ठराव बॉबे असोसिएशनने करून विलायतेस पाठविला. अशाच अर्थाचे ठराव कलकत्ता व मद्रास येथील संस्थांनींहि करून या वेळीं विलायतेस पाठविले होते. या ठरावांत कायदेमडळांत हिंदी लोकांचे प्रतिनिधी असावेत आणि वरिष्ठ अधिकारीवर्गात हिंदी लोकाना आधिक प्रवेश मिळावा अशा दोन मागण्या अंतर्भूत झाल्या होत्या. इग्लडांत जाऊन ब्रिटिश प्रजाजनांप्रमाणें हिंदी प्रजेलाहि पार्लमेंट मागून घ्यावे, असें लोकहितवादींनीं १८४८ मध्यें लिहिलें होतें हे मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. त्या प्रकारच्या विचारांचें हें प्रत्यक्ष मूर्त फल इतके क्षुद्र होते. कारण राजकारण हा संघटित शक्तीचा खेळ असून व्यवहार्य राजकारणांतील पूर्ति मागणी तिच्या मागच्या संघटनेच्या व शक्तीच्या प्रमाणावर अवलबून असते, आणि ही संघशक्ति धाडस, दृढनिश्चय, स्वार्थत्याग, जगाचें व आपल्या देशाचें ज्ञान, लोकांतील संघटनेची परपरा वाढविण्याचें कौशल्य इत्यादि राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या गुणांवर अवलंबून असते. या वेळीं हिंदुस्थानात यापैकीं सर्वच गोष्टींचा अभाव असल्यामुळे लोकसत्ताक राजकारण अगदीं बाल्यावस्थेत, किंबहुना गर्भावस्थेतच होते. त्या मानानें ही मागणी योग्यच होती व तीहि त्या वेळीं पदरात पडली नाहीं हेहि योग्यच होतें. कारण जे हिंदुस्थान ब्रिटिशांनीं शंभर वर्षांच्या प्रयत्नांनीं जिंकिले होते, तें येथील प्रजेला एकदम पार्लमेंट देऊन स्वतःस लोकानीं हांकलून द्यावें यासाठीं जिंकिलेलें नव्हतें अशा प्रकारे १८५१-५२ सालच्या सुमारास मुबई, कलकत्ता व मद्रास अशा मोठ्या इलाख्यांच्या राजधानींत लोकसत्ताक राजकारणाचा जन्म झाला.

१८५३ मध्यें ईस्ट इंडिया कपनीला नवी सनद देण्याचा जो कायदा झाला, त्यानेंच हिदुस्थानांत कायदेमंडळाची स्थापना प्रथम् केली पण या कायदेमडळात जनतेचे प्रातिनिधी किंवा बिनसरकारी असे कोणीच लोक नव्हते. गव्हर्नर जनरलच्या कायदेमंडळांत एकूण बारा सभासद असावेत असें ठरलें त्यांपैकीं स्वतः गव्हर्नर जनरल व सरसेनापति हे दोन, चार कार्यकारी मंडळाचे सभासद, दोन इंग्लिश हायकोर्ट जज्ज आणि मुबई, मद्रास, बगाल व आग्रा अशा चार प्रांतांच्या सरकारांनीं नेमलेले चार सरकारी अधिकारी, असें बारा सभासदांचें मध्यवर्ती कायदेमंडळ १८५३ च्या कायद्यानें म्हणजे १८५४ पासून अस्तित्वात आले पण या प्रश्नांची चौकशी करण्यासाठीं कमिटी नेमतांना लॉर्ड डर्बी यांनीं पार्लमेंटांत जें भाषण केलें त्यांत पुढील वाक्य होतें: "He reminded the house that this is your bounden duty in the interests of humanity, of benevolence, and of morality and religion, that as far and as

fast as you can do it safely, wisely end prudently, the inhabitants of India should be gradually entrusted with more and more of the superintendence of their own internal affairs."* या वाक्यांत हिंदी लोकाना आपल्या अंतर्गत राज्यकारभारावर देखरेख करण्याचा अधिकार शक्य तितक्या लवकर व शक्य तितक्या आधिक प्रमाणात देणे हे मनुष्यत्व, उपकारबुद्धि, नीतिमत्ता व धर्म या सर्वच दृष्टींनीं आपलें अवश्य कर्तव्य असल्याचें सागितलें आहे पण ते स्वार्थदृष्टीनें अवश्य आहे असे म्हटलेले नाहीं ब्रिटिश राजनीतीची कृति स्वार्थावर अधिष्ठित झालेली असून मनुष्यत्व, उपकारबुद्धि, नीतिमत्ता व धर्म हे शब्द केवळ पार्लमेंटांत आपल्या पक्षाने आणिलेल्या ठरावाचे किंवा कच्च्या कायद्याचें समर्थन करण्यासाठीं वापरण्यांत येतात, असा पहिला अनुभव या वेळीं हिंदी पुढाऱ्यांना आला. पण तेवढ्यानें त्याचा ब्रिटिश मुत्सद्यांवरचा विश्वास उडाला नाहीं.

## राजकीय मागणी व चळवळीची गरज

या वेळीं ब्रिटिश मुत्सद्यांच्या पार्लमेंटांतील भाषणानाच नव्हे, तर त्यांनीं दिलेल्या कायदेशीर आश्वासनानाहि काहीं फल येऊ शकत नाहीं, असा अनुभव दुसऱ्या एका बाबतींत येत होता १८३३ सालच्या कायद्याने हिंदुस्थानात राज्यकर्त्यांची वेगळी जात निर्माण होऊ नये आणि हिंदी लोकाचा प्रवेश जात, धर्म किंवा देश यांचा विचार न करतां केवळ पात्रतेकडे पाहून वरिष्ठ अधिकारीवर्गात व्हावा, असे आश्वासन देण्यात आले होतें, पण १८५३ पर्यंतच्या वीस वर्षांत या कायद्याचा लाभ एकाहि हिंदी मनुष्याला मिळाला नव्हता गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी मंडळाचे एक सभासद मि० कॅमेरॉन यानीं ही गोष्ट स्पष्ट शब्दांत मान्य केलेली आहे § तरीहि एवढ्याने हिंदी पुढाऱ्याचा ब्रिटिश मुत्सद्द्यांवरील विश्वास उडाला नाहीं दादाभाईनी इ. स. १८५२-५३ पासून १९०६ पर्यंत म्हणजे सुमारे पंचावन्न वर्षे हिंदी राजकारण केले व आपल्या पुढील पिढीचा विश्वास ब्रिटिश मुत्सद्याच्या शब्दांवर उरला नाहीं हे पाहिले, तरीहि ब्रिटिश राष्ट्राच्या न्यायप्रियतेवरील आपला विश्वास उडालेला नाहीं, असे त्यानीं १९०६ सालीं बोलून दाखविलें मात्र त्यांनीं या वेळीं असे उद्गार काढिले, कीं "मीं माझ्या प्रयत्नास प्रारभ केल्यापासून माझी इतके वेळां निराशा झाली आहे, कीं त्यामुळे दुसऱ्या एकाद्याचें

* Landmarks in Indian Constitutional and national Development, p 97, by Gurumukh Nihal Singh

§ Not a single native that I am aware of has been placed in any better position in consequence of that clause in the statute, than he would have been, if no such clause had been enacted "

—*India in the Victorian Age by R. C. Dutt, p. 187.*

काळीज फुटून गेले असतें आणि मला अशीहि भीति वाटते, कीं त्याने बंडहि केलें असतें.. 'चिकाटी' या एका उत्कृष्ट शब्दाचे दडपण माझ्या मनावर असल्याने व तो गुण मी माझ्या जीवनाचा धर्म बनविला असल्यामुळेच मी हताश झालों नाहीं "*
तात्पर्य, १८५३ पासून १९०६ पर्यंतच्या हिंदी राजकारणाचा पाया ब्रिटिश न्याय-देवतेवरील विश्वास हा होता आणि ब्रिटिश साम्राज्यांत राहून ब्रिटिश प्रजाजनांच्या बरोबरीचे नागरिकाचे हक्क अथवा साम्राज्यांतर्गत स्वराज्य प्राप्त करून घेणें हे त्याचे अंतिम साध्य होते हेच ध्येय दादाभाईनीं १९०६ सालीं अगदी उघड शब्दांत राष्ट्रसभेपुढे मांडिले व त्यासाठी प्रयत्न करणे हेच एक तिचे कार्य असून लक्षावधि हिंदी जनतेचे उपासमारीने, बेकारीने आणि दारिद्र्यानें होणारे अपमृत्यू थांबविण्यास आणि आपल्या राष्ट्रास प्राचीन वैभव पुनः प्राप्त होण्यास हाच एक उपाय आहे असे मोठ्या कळकळीने उपदेशिले पण हें कार्य घडवून आणण्यासाठीं प्रचंड चळवळ अखंड चालविली पाहिजे व ती या देशात व इंग्लडांत दोन्ही ठिकाणीं चालविली पाहिजे असे त्यांचे म्हणणे असून ही चळवळ करणारे अनेक लोक हिंदुस्थानात निर्माण व्हावे व त्यांनीं ही चळवळ हिंदुस्थानच्या कोनाकोपऱ्यांपर्यंत नेऊन भिडवावी म्हणजे ब्रिटिश लोक स्वराज्याचे हक्क आपणांस देतील, असा त्यांचा विश्वास होता. म्हणून "चळवळ करा, चळवळ करा, अखंड चळवळ करा" हाच त्यांचा अखेरचा संदेश आहे.

"Agitate, agitate over the whole length and breadth of India in every nook and corner—peacefully of course—if we really mean to get justice from John Bull. Satisfy him that we are in earnest. The Bengalees, I am glad, have learnt the lesson and have led the march. All India must learn the lesson of sacrifice of money and of earnest personal work. Agitate, agitate means inform. Inform the Indian people what their rights are and how they should obtain them, and inform the British people of the rights of the Indian people and why they should grant them. If we do not speak, they say we are satisfied. If we speak, we become agitators ! The Indian people are properly asked to act constitutionally,

---

* "Since my early efforts I must say, that I have felt so many disappointments, as would be sufficient to break any heart and lead one to dispair and even, I am afraid to rebel . I have not despaired under the influence of the good English word which has been the rule of my life. That word is perseverance "

— *Dada Bhai, Congress Presidential Address, 1906.*

while the Government remains unconstitutional and despotic."*

आपल्या देशांतील लोकांनी सर्व देशभर एकसारखी चळवळ करावी आणि नागरिकत्वाचे हक्क प्राप्त करून घेण्याचा आपला दृढनिश्चय द्रव्य व कष्ट वेचून व्यक्त करावा ही त्याची प्रथमपासूनची इच्छा होती. ते ज्या वेळीं इंग्लडांत प्रथमच गेले त्या वेळीं त्या देशांत येणाऱ्या धान्यावरील जकाती उठविण्याची प्रचंड चळवळ जॉन ब्राइट व कॉब्डेन हे करीत होते ही चळवळ यशस्वी झाली. याचा परिणाम त्यांच्या मनावर असा झाला होता, की ब्रिटिश पार्लमेंटला जर कोणतीहि गोष्ट पटवून द्यावयाची असेल, तर त्यासाठीं पुढाऱ्यांनीं जनतेंत अखड व प्रचंड चळवळ केली पाहिजे, पण आपले लोक ती करीत नाहीत व म्हणूनच आपणांस तसे यश येत नाहीं, अशी त्यांची आपल्या अपयशाची मीमासा होती.

प्रारभीं १८५०-५१ सालीं केवळ वरिष्ठ अधिकारांवर व प्रातिनिधिक कायदे-मडळांत हिदी लोकाची आधिक प्रमाणात नेमणूक व्हावी याबद्दल खटपट करणारे दादाभाई, १९०५ सालापासून केवळ स्वराज्य हाच एक हिंदी जनतेच्या जीवनाचा व उद्धाराचा मार्ग आहे, असे बोलूं लागले आणि या एका स्वराज्याच्या हक्कासाठीं हिदुस्थानांत व इग्लडांत अखड चळवळ करणाऱ्या संस्थेचे स्वरूप राष्ट्रसभेला प्राप्त व्हावे, अशी त्यांची अखेरची मनीषा बनली "एक व्हा, चिकाटी धरा आणि स्वराज्य संपादन करा, म्हणजे आज जे लक्षावधि देशबाधव दारिद्र्यानें, दुष्काळानें व प्लेगानें मरत आहेत, ते वाचतील आणि जे कोट्यवधि लोक अर्धपोटीं रहात आहेत त्यांना अन्न मिळेल व जगांतील सर्वांत मोठ्या व सुधारलेल्या राष्ट्रांच्या मालिकेंत पूर्वीप्रमाणें अभिमानाचे स्थान हिदुस्थानला प्राप्त होईल" हाच दादाभाईंचा आपल्या पुढील पिढीला महत्त्वाचा सदेश आहे

## मार्क्स् आणि दादाभाई

हिंदी स्वराज्य हा केवळ वरिष्ठ वर्गाच्या स्वाभिमानाचा किंवा संस्कृतिरक्षणाचा अथवा वैभवाचा प्रश्न नसून तो सामान्य जनतेतील कोट्यवधि जीवांच्या पोटाचा, प्राणधारणेचा आणि क्लेशरहित व रोगरहित जीवनाचा प्रश्न आहे, याची जाणीव हिंदी लोकांच्या मनावर जर प्रथम कोणीं ठसविली असेल तर ती दादाभाईंनींच होय आर्थिक साम्राज्यशाही म्हणजे काय आणि एका राष्ट्राने दुसरे राष्ट्र जिंकिले असतां जिंकिलेल्या राष्ट्राचें किती प्रकारे रक्तशोषण होते, याची बरोबर कल्पना दादाभाई नौरोजी यांचे लेख व भाषणे वाचिलीं असतां येऊं शकते. कार्ल् मार्क्स्नें भांडवलशाहीची मीमांसा किंवा पृथक्करण केले आणि तिच्या रचनेतच तिच्या विनाशाचें बीज कसें आहे तें शोधून काढिले त्याचप्रमाणें या भांडवलशाहींतून निर्माण होणारी आर्थिक साम्राज्य-

*Ibid

शाही किती भयानक आहे व तिच्या रक्तशोषणातच तिच्या विनाशाचीं बीजे कशी आहेत, हे दादाभाईनीं जगापुढे मांडिले कार्ल् मार्क्स्‌चा जन्म स्वतंत्र भांडवलशाही राष्ट्रांत झाला होता व म्हणून त्याने एकाच राष्ट्रांतील एक वर्ग सामान्य जनतेचे रक्तशोषण कसे करितो, या प्रश्नाचा शास्त्रीय अभ्यास केला. दादाभाईचा जन्म साम्राज्यशाहीच्या कचाटींत सांपडलेल्या परतंत्र राष्ट्रांत झाला होता व म्हणून त्यांनीं एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राचें रक्तशोषण कसे करिते, याचें शास्त्रीय सशोधन केलें व याच रक्तशोषणांत साम्राज्यशाहीच्या विनाशाचीं बीजें कशीं आहेत, ते आपल्या लोकांना व ब्रिटिश राज्यकर्त्यांना दाखवून दिलें मार्क्स्‌ने एका वर्गाचे दुसऱ्या वर्गाने चालविलेलें रक्तशोषण थाबण्यास समाजवाद हा एकच उपाय आहे असें दाखवून दिलें; दादाभाईनीं एका राष्ट्राकडून होणारे दुसऱ्या राष्ट्राचें रक्तशोषण थाबण्यास स्वराज्य हा एकच व प्रमुख उपाय आहे हे दाखवून दिले मार्क्स्‌चा जन्म ज्या देशात झाला तो देश औद्योगिक प्रगतीच्या दृष्टीने व राजकीय स्वातंत्र्याच्या दृष्टीने पुढारलेला होता व दादाभाई जेथे जन्मास आले तो देश दोन्ही दृष्टींनीं मागासलेला होता या दृष्टीने दादाभाईनीं जे प्रश्न हातीं घेतले, त्यांहून पुढील अवस्थेत उद्भवणारे प्रश्न मार्क्स्‌ला विचारात घेतां आले, हा त्याच्या परिस्थितीचा परिणाम आहे मानव-संस्कृतींत मागासलेल्या देशात जन्मास येणारा मनुष्य कितीहि मोठा असला तरी त्याला, संस्कृतीच्या आघाडीवर असणाऱ्या समाजांचे प्रश्न सोडविण्याकडे आपल्या बुद्धिमत्तेचा व्यय न करतां मागसलेल्या समाजांना पुढे कसे जातां येईल, याच एका प्रश्नाकडे आपले बुद्धिसर्वस्व व शक्तिसर्वस्व वेचावे लागतें. पण यामुळे त्याची योग्यता कमी ठरत नाहीं पारतंत्र्यामुळे राष्ट्रावर ज्या अनेक आपत्ती ओढवतात त्यां-पैकींच ही एक आपात्ति होय, असे मानावे लागते

## हिंदी राष्ट्रांतील द्रव्यशोषण

आतां आपण दादाभाईनीं आपल्या राष्ट्राचे जे रक्तशोषण होत होते, त्याचे स्वरूप कसे काय वर्णिले आहे त्याचा थोडा विचार करूं इ स १८५१ पासून १८७१ पर्यंतच्या म्हणजे सुमारे वीस वर्षांच्या काळात दादाभाईनीं हिंदुस्थानच्या द्रव्याचें शोषण कोणकोणत्या प्रकारे चालू आहे आणि त्यामुळे हिंदी जनता किती दरिद्री झालेली आहे, याचा बरोबर अदाज केला आणि हे द्रव्यशोषण थांबल्याखेरीज हिंदी जनतेचा कोणत्याहि प्रकारचा उद्धार होणार नाहीं असा ठाम सिद्धान्त बसविला इ स. १८७१ सालीं विलायतेंत "ईस्ट इंडिया फिनॅन्स कमिटी" या नांवाची एक कमिटी हिंदुस्थानच्या आय-व्ययाचा विचार करण्यासाठीं बसली होती. तिच्यापुढे त्यांनीं आपले या विषयावरील निश्चित विचार मांडलेले आहेत. हिंदी जनतेचे दर माणशीं वार्षिक उत्पन्न अवघें वीस रुपये आहे व हें उत्पन्न सरकार तुरुगांतील कैद्यांसाठीं दर माणशीं जो खर्च करतें त्याहूनहि कमी आहे, असे त्यांनीं सप्रमाण

सिद्ध केलें. जनतेचें हें दारिद्य असेंच वाढत गेले तर ब्रिटिश साम्राज्याची नौका याच खडकावर आदळून फुटणार, असेंहि त्यांनीं ब्रिटिश सरकारला व हिंदी लोकांना बजाविले हिंदी सपत्तीला ही जी मोठी गळती लागलेली आहे, तिचें मूळ स्वरूप दोन प्रकारचे आहे : एक राजकीय आणि दुसरें व्यापारी किंवा औद्योगिक. यासबधीं ते आपला निष्कर्ष थोडक्यात पुढीलप्रमाणें माडतातः

"हिंदुस्थानच्या संपत्तीला ही जी गळती लागलेली आहे, तिचे स्वरूप द्विविध आहे : पहिला प्रकार म्हणजे युरोपियन अधिकारी येथे जो पैसा सांठवून विलायतेस पाठवितात तो, विलायतेत व येथे निरनिराळया गरजांसाठी जो खर्च करितात तो, इग्लंडांत नेमलेल्या लोकांना जे पगार व पेन्शने मिळतात तीं आणि हिंदुस्थान-सरकार विलायतेत जो खर्च करते तो याच गळतीचा दुसरा प्रकार म्हणजे बिन-अधिकारी युरोपियन लोक येथे जो पैसा कमावून विलायतेस पाठवितात तो. या गळतीमुळे हिंदुस्थानात भांडवल साठू शकत नसल्यामुळे जे ब्रिटिश लोक येथून धुऊन नेलेला पैसा पुन. भांडवलरूपाने परत आणितात, त्यांना येथील व्यापाराचा व उद्योगधंद्यांचा जणु काय मक्ताच मिळतो आणि म्हणून या मार्गाने ते हिंदुस्थानच्या द्रव्याचे अधिकच हरण करितात. या सर्वांचा उगम सरकारी द्रव्यापहरणांतच आहे."*

या द्रव्यापहरणाच्या स्वरूपासंबधीं व त्याच्या भयंकर परिणामांसंबंधीं त्या वेळच्या ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं दादाभाईंच्या विचारसरणीत अनेक दोष दाखविण्याचा प्रयत्न केला होता व आमच्यातीलहि थड प्रकृतीच्या कांहीं मुत्सद्यानीं दादाभाई या बाबतींत अतिशयोक्तीनें बोलतात, ते लोकात निराशावाद पसरवितात, त्यांची भाषा वाजवीपेक्षां अधिक जहाल असते, असे आक्षेप घेतले होते.

हिंदुस्थानच्या बहुविध द्रव्यहरणाच्या सिद्धांतावर पहिला आक्षेप असा घेण्यांत येत असे, कीं ब्रिटिश अधिकाऱ्यांना जो पगार देण्यांत येतो तो सर्वच पैसा बुडीत गेला असे तुम्ही कसे म्हणतां ? ब्रिटिश अधिकारी येथे जी नोकरी करतात तिचे योग्य वेतन म्हणून कांहीं आहेच की नाहीं ? त्यामुळें तुम्हांस जी शांतता लाभते तिला कांहीं किंमत आहे किंवा नाहीं ? या प्रश्नांचीं उत्तरे जर होकारार्थी असतील, तर या अधिकाऱ्याचा जो वाजवी पगार असेल त्याला द्रव्यहरण म्हणता येणार नाहीं. याहून अधिक जो पगार आहे व त्यापैकीं जो भाग ते विलायतेला पाठवितात त्यालाच फार तर द्रव्यहरण म्हणतां येईल दादाभाईंना हा युक्तिवाद पसत नव्हता युरोपियन अधिकाऱ्यांना जो जो पगार मिळतो त्यापैकीं पैन् पै द्रव्य हा आमचा अपहार आहे; कारण हा पैसा वस्तुतः हिंदी मनुष्यालाच मिळावयास हवा होता व तो आज ब्रिटिश मनुष्याला मिळत आहे. अर्थात् हे सर्वच द्रव्यहरण समजले पाहिजे; मग तो पैसा येथे खर्च होवो किवा विलायतेत खर्च होवो. पहिल्या राष्ट्र-सभेतील आपल्या भाषणांत त्यांनीं या नेमस्त आक्षेपकांना पुढीलप्रमाणे उत्तर दिलें

* Poverty and Un-British Rule in India, P 38 by Dada Bhai.

आहे. ते म्हणतात, "एक वक्ते म्हणाले, कीं हिंदी लोकांना नेमण्यामुळे खर्च कमी येईल. मला असें वाटतें, कीं हा मुद्दा लोकांना बरोबर आकलन झालेला नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे, कीं हिंदी लोकांना नेमणे हे कमी खर्चाचे आहे, इतकेच नाहीं, तर तसें झाल्यास त्याला जो पगार आज मिळतो तो सर्वच्या सर्व आपल्या पदरांत पडेल जेव्हां एकाद्या युरोपियनाची नेमणूक करण्यांत येते, तेव्हां ज्या हिंदी लोकांची नेमणूक तेथें स्वभावत. व्हावयास हवी, त्यांची जागा तो पटकावतो त्यांच्याऐवजीं हिंदी लोकांना नेमावें हे नैसर्गिकच आहे. म्हणून असा हिंदी मनुष्य जो जो पैसा उपभोगतो तो राष्ट्राच्या दृष्टीनें फायदाच आहे व जो पैसा तो सांठवितो तोहि राष्ट्रांतच सांठविला जातो व त्याचा उपयोग राष्ट्रातील सर्व लोकांना होतो परकीय मनुष्याला दिलेली प्रत्येक पै हा राष्ट्रीय दृष्ट्या तोटा आहे आणि हिंदी मनुष्याला मिळणारी प्रत्येक पै ही राष्ट्रीय दृष्ट्या बचत आहे वस्तुतः मीं वारवार तुमच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केल्याप्रमाणें देशाच्या दारिद्र्याच्या किंवा भरभराटीच्या बुडाशीं हाच एक प्रश्न आहे. एकदां हा परदेशांत जाणारा द्रव्याचा ओघ थांबला, जनतेचें हें रक्तशोषण थाबले, म्हणजे हिंदुस्थान आपली नैसर्गिक संपत्ति, आपले श्रम आणि आपले भांडवल, यांच्या साहाय्याने इंग्लंडाप्रमाणे श्रीमत होईल. यांतच इंग्लडचे व मनुष्यजातीचेहि खरे हित आहे व तसे होऊं देण्यांतच इंग्लिश राष्ट्राला व त्याच्या कीर्तीला मोठेपणा प्राप्त होणार आहे"†

हिंदुस्थानात आज भाडवल साठत नाहीं याचें मूळ कारण हा परदेशात जाणारा द्रव्याचा ओघच होय असे दादाभाई म्हणत असत. यामुळे या देशांत जे युरोपियन भाडवलवाले व व्यापारी येतात तेहि आपल्या देशाची अधिक लूटच करतात असे त्यांना वाटे. आमच्या देशांतून आधीं सर्व पैसा लुबाडून विलायतेंत नेण्यांत येतो व त्यातीलच कांहीं भाग पुनः भांडवलरूपाने येथें येतो व लोकाची अधिक लूट करून अनेक पटींनीं परत विलायतेत जातो असे हे रक्तशोषणाचे कालचक्र एकसारखें चालू असते यामुळें ब्रिटिश भांडवलवाले येथे येऊन व्यापार करतात व कारखाने काढतात ही आपल्या देशावर एक आपत्तीच आहे, असें दादाभाई म्हणत

"माझ्या म्हणण्याचा अर्थ ब्रिटिश भांडवलवाल्यांनीं हिंदुस्थानांत जाऊन व्यापार करू नये किंवा आपले भांडवल तेथे गुतवूं नये असा आहे काय, असे विचारण्यांत येईल. माझा तसा मुळींच अर्थ नाहीं. त्यांनीं तसें करण्यास माझी मुळींच हरकत नाहीं.... पण तसे करतांना त्यांनीं आपले स्वतःचे भांडवल आणावें आणि मग त्यावर त्यांनीं हवा तितका नफा मिळवावा; त्याबद्दल हिंदुस्थान त्यांना दुवा देईल पण माझ्या म्हणण्याचा अर्थ असा आहे, कीं त्यांनीं प्रथम हिंदुस्थानला लुटू नये, त्याला कष्टी व असहाय बनवूं नये आणि त्याच्या लुबाडून नेलेल्या त्या

† Speeches and Writings of Dada Bhai, P 119-20.

भांडवलापैकींच कांहीं भाग परत आणून ते आपलें स्वतःचें भाडवल असें म्हणूं नये. हे भांडवल परत आणून हिंदुस्थानांतील निसर्गदत्त संपत्ति आणि श्रमशक्ति यांचा उपयोग त्याला लुबाडण्यास करून सर्व नफा उकळून न्यावा आणि हिंदी लोकाना केवळ मोळक्ये व पाणक्ये बनवून दक्षिण अमेरिकेतील राज्यातील गुलामांपेक्षांहि अधिक हीन स्थितींत लोटावे, असे त्यांनीं करू नये "*

इ स १८८० सालीं फॅमिन कमिशनच्या रिपोर्टांतील आपल्या मतपत्रिकेत ते म्हणतातः

" आतां हिंदुस्थानावर एक नवीच आपत्ति येण्याचा धोका वाटत आहे. आतांपर्यंत हिंदुस्थानांतील भूमीच्या पृष्ठभागावर जे धन होते, ते इग्लडने धुऊन नेले आहे आता हिदुस्थानातील भूमिगत धनहि तिकडे नेण्यात येईल आणि हिदुस्थान असहाय होऊन जमीनदोस्त होईल इग्लंडनें त्याचे भाडवल नेलें आहे. आतां हिदुस्थानांत जी खनिज सपत्ति आहे व जी काढण्यास मोठे भाडवल व बहुमोल यत्रसामग्री लागेल, ती खनिज सपत्ति नेण्यासाठीं हेच भांडवल परत आणण्यांत येईल अगदीं हीन दर्जाचे शारीरिक व बौद्धिक कष्टाचें काम करणारांस मिळणारे वेतन वगळून इतर सर्व सपत्ति युरोपियन लोक येथें खातील किंवा निरनिराळ्या रूपांनीं तिकडे हरण करून नेतील. हे हरण प्रथम नोकर म्हणून व नतर नफा किंवा डिव्हिडड म्हणून होईल आणि बिचाऱ्या भरतभूमीला आपल्या मुलाना खालच्या दर्जाचीं कामे करण्याची तरी सधि मिळाली, याबद्दल आपल्या ग्रहाचे आभार मानावे लागतील ! आणि हिंदुस्थानात मोठी संपत्ति सांपडली व हिंदुस्थानावर मोठीच खैर झाली अशा तुताऱ्या वाजविण्यांत येतील. आज रेल्वे, परराष्ट्रीय व्यापार यांच्या वाढीबद्दलच्या तुताऱ्या वाजवून आमच्या कानठळ्या बसविण्यात येत आहेतच. ..."

" ब्रिटिश भांडवल आज इतर देशांत जातें व ते हिंदुस्थानांतहि येते, पण यात एक मोठा भेद आहे इतर सर्व देशांना ब्रिटिश भांडवलवाले आपला पैसा व्याजाने देतात व तेथेच हा सबध सपतो त्या देशातील लोक या भांडवलाचा सर्व प्रकारें उपयोग करून घेतात आणि भाडवल देणाऱ्याना फक्त व्याज देतात आणि कित्येक वेळां तेहि न मिळाल्यामुळें आपले केवढे नुकसान होतें हेहि ते जाणतात. पण हिंदुस्थानांतील प्रकार याहून अगदीं भिन्न आहे ब्रिटिश भाडवलवाले केवळ व्याजाने कर्ज देऊनच थांबत नाहींत, तर आपले भाडवल घेऊन ते स्वतः या देशावर स्वारीच करतात या भांडवलाच्या साहाय्याने जें धन निपजेल ते त्यांचेच देशबांधव बहुतांशीं या देशांत खातात आणि उरलेले धन नफ्याच्या किंवा डिव्हिडंडच्या रूपाने घेऊन जातात.

---

*Statement to the Currency Committee
Dada Bhai's speeches and writings, Appendix B, p. 132

" म्हणून युरोपियन लोकांना नेमण्याची सध्यांची हानिकारक पद्धति बदलून हिंदुस्थानला ताकद येऊन तो खुल्या मैदानात स्वावलबनाने टिकाव धरण्यास समर्थ होईपर्यंत जे धदे हिंदुस्थानला आपल्या भांडवलाने काढतां येणार नाहींत, ते सर्व सरकारनेंच काढावेत व ते काम हिंदी लोकांमार्फतच करवून त्यांना त्याचे शिक्षण द्यावे असें झालें म्हणजे हिंदुस्थानच्या सर्व अंगांत पुनः रक्त खेळूं लागेल हिंदुस्थानला ब्रिटिश भांडवलाची अत्यत जरुरी आहे. पण त्याला ब्रिटिशांचे केवळ भांडवलच हवें आहे ब्रिटिशांनीं आपल्या भांडवलासहित या देशावर स्वारी करावी आणि भांडवलाबरोबर त्याच्या साहाय्याने निपजणारे धनहि त्यांनीच खाऊन टाकावे, हें त्याला नको आहे "*

## जीवित-वित्ताची भ्रामक शाश्वती

दादाभाईना अशा प्रकारे सर्वत्र हिंदी राष्ट्राच्या सपत्तीची लूट होत आहे हे एकच दृश्य दिसत होते ते म्हणत, कीं जोपर्यंत या द्रव्याच्या पाझराचे परिणाम कोणास बरोबर समजले नव्हते, तोपर्यंत तें एक दुर्दैव म्हणता येईल, पण ते परिणाम समजल्यानंतर हे द्रव्यहरण चालू ठेवणें म्हणजे ती हिंदुस्थानच्या धनाची बुद्धिपूर्वक केलेली एक लूटच होय असे म्हणणे भाग आहे " The thoughtless past drain we may consider as our misfortune, but a similar future will, in plain English be deliberate plunder and destruction."§ या लुटीमुळे ब्रिटिश राज्याखालीं हिंदुस्थानचे जीवित आणि वित्त हीं सुरक्षित आहेत हें म्हणणेंहि खरें ठरत नाहीं फॅमिन-कमिशनवरील आपल्या मतपत्रिकेत ते म्हणतातः " हिंदुस्थानांत जीवित व वित्त याची शाश्वती आहे ही केवळ कादबरी आहे. पण वस्तुस्थिति पाहतां तसे काहीच दिसत नाहीं एका अर्थाने किंवा एका प्रकारे हिंदी जीवित व वित्त हीं सुरक्षित आहेत, म्हणजे लोकाचा एकमेकांवर होणारा अत्याचार किंवा हिंदी अनियत्रित राजांचा अत्याचार यांपासून लोक सुरक्षित आहेत इतक्या प्रमाणांत जीविताची व वित्ताची शाश्वती आहे व त्याबद्दलची कृतज्ञता हिंदुस्थान कधींच नाकारीत नाहीं पण खुद्द इंग्लड करीत असलेल्या अपहारापासून हिंदुस्थानांत वित्ताची आणि म्हणूनच जीविताचीहि मुळींच सुरक्षितता नाहीं हिंदुस्थानचे वित्त सुरक्षित नाहीं. जर कांहीं सुरक्षित असेल व खरे सुरक्षित असेल, तर इंग्लंड मात्र सुरक्षित व बिनधोक आहे आणि यामुळे सध्यांच्या हुंडणावळीच्या दराप्रमाणें ते दरसाल तीन ते चार कोटी पौंड या प्रमाणांत हिंदुस्थानचे वित्त येथे खात आहे किंवा आपल्या देशांत लुटून नेत आहे..... म्हणून मी असे म्हणण्याचें धाडस करतो,

* Note on Indian Famine Commission
Dada Bhai's speeches and writings, Appendix F, P. 206-208

§ Ibid Appendix E, P. 198.

की हिंदुस्थानांत जीवित व वित्त यांची शाश्वती नाहीं आणि शिवाय ज्ञान किंवा शहाणपण हींहि सुरक्षित नाहींत हिंदुस्थानांतील लक्षावधि जनतेचें जीवन म्हणजे अर्धपोटीं जगणें, उपासमारीने मरणे, अथवा दुष्काळाने किंवा रोगाच्या सांथीने मरणे असेच आहे "‡

पूर्वीच्या परचक्रांच्या धाडीशीं तुलना करून या लुटीचें भयकर प्रमाण व परिणाम सांगतांना ते म्हणतातः "जो द्रव्यापहार या शतकाच्या प्रारभीं दरसाल तीस लक्ष पौंड होता, तो आज दरसाल तीन कोटि पौंड झाला आहे महमद गझनीनें १८ स्वाऱ्या करून अठरा वेळा हिंदुस्थान लुटला असे इतिहासज्ञ म्हणतात पण त्यानें या सर्व स्वाऱ्यांत लुटून नेलेली एकूण सपत्तीहि तुम्ही (इग्रज) एका वर्षात लुटून नेतां तितकी होऊं शकली नाहीं शिवाय त्यानें हिंदुस्थानाला जी जखम केली ती निदान अठराव्या घावानंतर तरी बंद झाली. पण तुम्ही जे घाव घालता व त्यामुळे जो रक्तपात होत आहे त्याना अंतच नाहीं ज्याप्रमाणे ऋतुपरपरा नियमितपणें चालूच असते, त्याचप्रमाणें आम्ही जगलो किंवा मेलो, तरी आम्हीं निपजलेल्या धनापैकीं तीन कोटी पौंडांचे धन दरसाल देशातून बाहेर धाडिलेच पाहिजे.

"तुमचे हे वैभवशाली साम्राज्य हिंदी लोकांच्या पैशावर व रक्तावर उभारिलेलें आहे. या युद्धाच्या अवाढव्य खर्चामुळे आणि तुम्ही दरसाल हिंदुस्थानच्या द्रव्याचे जें हरण करतां त्यामुळे, हिंदुस्थान पूर्णपणे थकून गेला आहे व त्याचा रक्तस्राव होत आहे आज या रक्तस्रावामुळे हिंदुस्थान मृत्युपथास लागला असला, तर त्यात नवल नाहीं "*

## ब्रिटिश साम्राज्याची उत्पत्ति व विनाश

या ब्रिटिश साम्राज्याचा उगम कसा झाला त्यासबधीं ते म्हणतात : "अठराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास त्या वेळच्या हिंदी सुभेदारांच्या हाताखालीं इग्लिश लोक वसूल गोळा करण्याचे काम करीत असत. अशा प्रकारे हिंदुस्थान व इग्लड यांचा सबध आल्यापासून जी राज्यपद्धति स्थापण्यात आली, तिचा पाया लोभ व अन्याय हाच होता. जे तिकडे गेले ते सर्व केवळ आपले दैव काढण्याच्या उद्देशानेच गेले व त्यांना जोपर्यंत हे करतां येत होते, तोपर्यंत लोकांची काय दशा होत आहे इकडे त्यानीं लक्ष दिलें नाहीं "§ अशा प्रकारे ब्रिटिश राज्याची उत्पत्ति व स्थिति लोभांत, द्रव्यहरणांत व जनतेच्या रक्तशोषणांत आहे हे पाहून त्याचा विनाशहि त्यांतच आहे, असे भाविष्य त्यांनीं वर्तविले होते.

" He who runs may see that if the material and moral destruction of India continues, a great convulsion must in-

‡ Dada Bhai's speeches and writings, Appendix F, P 203–204

* Dada Bhai's speeches and writings, P 236–38. § Ibid, P. 234–35.

evitably arise, by which either India will be more and more crushed under the iron heel of despotism and destruction, or may succeed in shattering and destroying hand and power."

— Dada Bhai's speeches and writings, Appendix D, P. 185.

ब्रिटिश राज्याच्या उत्पत्तीचें, स्थितीचे व विनाशाचें अशा प्रकारें शास्त्रीय विवेचन त्यांनीं इ स. १८७१ सालींच केले असल्यानें त्यानंतर त्यांनीं या एका प्रश्नाहून दुसऱ्या कोणत्याहि प्रश्नाकडे आपले लक्ष विचलित होऊं दिलें नाहीं. या त्यांच्या समाधितुल्य एकाग्र तपश्चर्येमुळेंच त्यांना स्वराज्यमंत्राचें प्रथम दर्शन झाले. हिंदी जनतेच्या जीविताचे व वित्ताचे अपहरण थांबविण्यासाठीं स्वराज्य हा एकच उपाय आहे व त्यासाठीं एकीनें व चिकाटीने प्रयत्न करा, असे सांगून त्यांनीं आपलें सार्वजानिक जीवन संपविले या आर्थिक रक्तशोषणाच्या व राजकीय स्वराज्याच्या मानाने त्यांना सामाजिक व औद्योगिक चळवळी गौण वाटत असत १९०६ सालच्या आपल्या अध्यक्षीय भाषणांत ते यासंबधीं म्हणतात :

"Lastly the question of social reforms and industrial progress the progress in each will have its influence on the others. But as Mr. Morely truly and with deep insight says: 'Political principles are after' all the root of our national greatness, strength and hope.' And his other important utterance which I repeat with this one sums up the whole position of the Indian problem. He says: 'The meddling wrongly with economic things, that going to the very life, to the very heart, to the very core of our national existence.' This meddling wrongly with economic things is the whole evil from which India suffers—and the only remedy for it is— 'Political principles are after all the root of our national greatness, strength and hope.' And the political principles are summed up in self-government. Self-government is the only and chief remedy."§

अशा प्रकारे हिंदुस्थानपुढील सर्वांत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे जनतेच्या दारिद्र्याचा व उपासमारीचा असून त्यावर एकच उपाय म्हणजे स्वराज्य होय, या विचाराचा पुरस्कार दादाभाई नौरोजी यांनींच प्रथम केला. तसेंच ब्रिटिश साम्राज्याची उत्पत्ति, स्थिति आणि विनाश हीं सर्व हिंदी जनतेच्या रक्तशोषणात व तिच्या भयंकर दारिद्र्यांत आहेत, याचीहि शास्त्रीय मांडणी त्यांनींच प्रथम केली

§ Dada Bhai's Presidential Address, 1906.

## जहाल राजकारणाचा उगम

या सर्व विचारसरणीचा स्वाभाविक परिणाम राष्ट्रांतील सर्व कार्यकर्त्यांनीं आपले शक्तिसर्वस्व राजकारणामार्गेंच उभे करावे या विचारात होणे स्वाभाविक होतें तसेंच हिंदुस्थानच्या राज्यपद्धतींत सुधारणा झाली नाही, तर लवकरच जनतेच्या दारिद्र्यांतून एक मोठा दगा उद्भवेल आणि एक तर ब्रिटिश साम्राज्याचा तरी अंत होईल किंवा हिंदुस्थान देश तरी नामशेष होईल, या विचारांना चालना देऊन त्यानींच हिंदुस्थानांतील जहाल राजकारणाचा पाया घातला इ स १८८० नंतर पुण्यांत चिपळूणकर, आगरकर आणि टिळक यानीं जो जहाल राजकीय विचाराचा नवा राष्ट्रीय पक्ष निर्माण केला, त्याला आधारभूत अशीं राजकारणाचीं व अर्थकारणाचीं तत्त्वे किंवा सिद्धात दादाभाईनीं इ स १८७१ च्या सुमारास ईस्ट इंडिया फिनॅन्स कमिटीपुढे आपले जे सिद्धात मांडिले किंवा १८८० च्या फॅमिन कमिशनच्या रिपोर्टांत त्यांची जी मतपत्रिका प्रसिद्ध झाली, तीत आढळतात फरक इतकाच, कीं दादाभाईचा ब्रिटिश न्यायदेवतेवर जितका विश्वास होता, तितकाहि या पुढील पिढीचा उरला नाहीं ब्रिटिशांवरचा विश्वास उडणे आणि आपल्या लोकांच्या कर्तृत्वावर विश्वास बसणे, हे घडल्याबरोबर दादाभाईच्या सिद्धाताच्या आधारावर जहाल राष्ट्रीय राजकारणाची इमारत उठण्यास फार कालावधीची गरज नव्हती. ही गोष्ट १८८० पासून १८९५ पर्यंतच्या काळात महाराष्ट्रात झाली ती महाराष्ट्रांतच का झाली व तिचे स्वरूप कसे होते, हे समजण्यासाठीं आपणांस आता सनदशीर राजकारणाचा पाया घालणारे न्या. रानडे याच्या विचाराचा आणि कार्याचा विचार करावयाचा आहे.

## रानडे-दादाभाई यांचा मतभेद

न्या. रानडे यांचा जन्म नाशिक जिल्ह्यांतील निफाड या गांवीं इ. स. १८४२ या सालीं झाला म्हणजे ते दादाभाईच्यापेक्षा वयानें सतरा वर्षांनीं लहान होते. टिळक-आगरकरांचा जन्म १८५६ सालीं झाला म्हणजे न्या रानडे हे त्यांच्यापेक्षां चौदा वर्षांनीं मोठे होते चिपळूणकर यांचा जन्म इ स. १८५० मध्ये झाला. म्हणजे त्यांच्यापेक्षां रानडे हे आठ वर्षांनीं मोठे होते महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांत १८७० पासून १८८० पर्यंतचा काळ हा न्या रानड्यांच्या अप्रतिहत वर्चस्वाचा असून १८८० ते १८९५ पर्यंतचा काळ हा महाराष्ट्रीय विचारमथनाचा काळ म्हणतां येईल. या विचारमथनानंतर महाराष्ट्रात रानडेपक्ष आणि टिळकपक्ष असे दोन स्वतंत्र पक्ष निर्माण झाले आणि आगरकरांची सरस्वती या त्रिवेणी संगमांत कोठे तरी गुप्त झाली या विचारमंथनांत आतांच आपणांस शिरावयाचें नाहीं. सध्यां केवळ न्या. रानडे यांच्या अर्थकारणाचा व राजकारणाचा विचार

करून त्यांच्या विचारांत पुढील नेमस्त प्रागतिक राजकारणाची बीजें कशीं आहेत, ते पहावयाचें आहे.

दादाभाई आणि रानडे यांच्या विचारसरणींत एक फार महत्त्वाचा भेद आहे, पण तो अद्यापि कोणींहि स्पष्टपणें पुढें मांडिलेला नाहीं हा भेद म्हणजे दादाभाईंच्या प्रत्येक भाषणांत व लेखनांत हिंदुस्थानची आर्थिक लूट आणि तिचीं राजकीय कारणे यांवरच सर्व भर देऊन त्यांनीं सामाजिक व औद्योगिक सुधारणेच्या प्रश्नाना गौणत्व दिलेलें स्पष्ट दिसते, हाच होय तसेच हिंदुस्थानच्या भीषण दारिद्र्यांतून उद्भवणाऱ्या भावी क्रांतीची पूर्वसूचना देऊन राज्यकर्त्यांना व जनतेला जागृत करण्याचा त्यांचा सतत रोखहि न्यायमूर्तींच्या एकदर वृत्तीशीं थोडा विसदृशच होता न्यायमूर्तीसारख्या विचारांच्या लोकांना दादाभाई हे जहाल वाटत असत "When the National Congress was first started and Mr. Dadabhai's views, which now go for moderates, were given to the public, he was styled an extremist, so that you will see that the term extremist is an expression of progress" असे उद्गार १९०७ सालीं लो टिळकांनीं कलकत्त्यास दिलेल्या आपल्या Tenets of the New Party या व्याख्यानांत काढिलेले आहेत दादाभाईंच्या विचाराचा सरळ निष्कर्ष आमचे दारिद्र्य नष्ट होण्यास आधीं स्वराज्य मिळाले पाहिजे असा निघतो. यामुळे ब्रिटिश राज्यपद्धतींत बदल झाला नाहीं, तोंपर्यंत औद्योगिक सुधारणाहि होणे शक्य नाहीं, असे ठरून एक प्रकारचा नैराश्यवाद पसरतो असे न्यायमूर्तींना वाटे तसेच दादाभाईंचा रक्तशोषणाचा व द्रव्यहरणाचा सिद्धान्तहि न्यायमूर्तींना सर्वस्वीं मान्य होता, असे दिसत नाहीं इ स १८९० सालीं पुण्यास झालेल्या औद्योगिक परिषदेंतील भाषणांत न्या रानडे म्हणतात :

"जोंपर्यंत आपणांस दरसाल जवळजवळ वीस कोटी रुपयाच्या जादा निर्यातीच्या रूपाने जबर खडणी इंग्लडला द्यावी लागत आहे, तोंपर्यंत आमचा उद्धार होणार नाहीं व आम्ही स्वावलबनानें काहींच करू शकणार नाहीं, असे मानणारे काहीं लोक आहेत. तथापि, ही विचारसरणी न्यायाची किंवा पौरुषाची आहे असे म्हणता येत नाहीं या खंडणीच्या भारापैकीं कांहीं भाग आमच्या देशांत गुतविलेल्या किंवा कर्जाऊ दिलेल्या पैशाचा असतो आणि याबद्दल तक्रार करण्याऐवजी इतक्या थोड्या व्याजानें आमची गरज भागविणारे सावकार आम्हांस मिळाले, याबद्दल आम्ही त्यांचे आभारच मानिले पाहिजेत यापैकीं (खंडणीपैकीं) दुसरा भाग, जो माल आम्ही आमच्या देशांत करू शकत नाहीं त्याला पडणाऱ्या किमतीचा असतो. उरलेला भाग राज्यकारभार, सरंक्षण, आणि पेन्शने यांसाठीं द्यावा लागतो असे म्हणतात, आणि हा पैसा इतका खर्च व्हावयास नको अशी तक्रार करण्यास जरी योग्य कारण असलें, तरी या ब्रिटिश राज्यामुळेंच आम्हांस अफूच्या मक्तेदारीबद्दल चीनकडून

खंडणी मिळत असते हे विसरतां कामा नये म्हणून या खडणीच्या निष्फळ चर्चेत आपल्या शक्तीचा आपण अपव्यय करू नये, असे मला वाटते हा प्रश्न आपल्या राजकीय पुढाऱ्यांकडे सोपविणेच बरे होईल."*

या भाषणांत न्यायमूर्तींनीं हा राजकीय खडणीचा प्रश्न राजकारणांतील असल्यानें त्याची चर्चा या औद्योगिक-परिषदेत करू नये अथवा तो सुटेपर्यंत आपली मुळींच औद्योगिक उन्नति होणार नाहीं म्हणून निराश होऊन स्वस्थ बसू नये, एवढेंच म्हटले असते तर त्यांत फारसे वावगें झाले नसतें पण इग्लंडला द्याव्या लागणाऱ्या या खडणीच्या प्रत्येक बाबीचा मोबदला म्हणून आम्हास जो लाभ होतो, त्यामुळे ती खडणी एक प्रकारे समर्थनीय ठरते किंवा ब्रिटिश भांडवलवाले आमच्या औद्योगिक उन्नतीस लागणारे भांडवल हलक्या व्याजानें आम्हास देतात त्याबद्दल आपण त्यांचे आभारच मानिले पाहिजेत, येथपर्यंत जेव्हा प्रतिपादनाचा ओघ गेला, तेव्हां या वेळीं पुण्यात निर्माण होत असणाऱ्या जहाल राजकीय विचारांच्या काहीं लोकांनीं 'अहो, हे भाडवल आमच्या देशाची लूट केल्यामुळेंच त्यांना मिळालेले आहे व ही राजकीय लूट चालू आहे म्हणूनच आमच्या देशांत उद्योगधद्यांस लागणारे भाडवल सांठत नाही' हा दादाभाईचा युक्तिवाद पुढे माडिला असला, तर त्यांत नवल नाहीं १८९० मध्ये घडलेल्या या प्रकरणा-संबंधीं न्या. रानडे यांच्या चरित्रांत श्री न. र फाटक लिहितातः "परदेशी भांडवल हिंदुस्थानात आले म्हणून नुकसान होत नाहीं, अशी माधवरावांची बालबाल खात्री झाली असल्याने त्यांनीं परदेशी भाडवलवाल्याना आपल्या विचारांतून वगळले नव्हते पुण्यास १८९० नतर उदयास आलेल्या नव्या देशभक्तांना माधवरावांनीं परदेशी भांडवलाविषयीं दाखविलेली अनुकूलता आवडली नाहीं व त्यांनीं अनु-कूलता व्यक्त करू नये, असा टिळक, नामजोशी वगैरे नव्या देशभक्ताचा आग्रह पडल्यामुळे माधवरावांनीं तेवढा भाग गाळण्याचे कबूल केले. सदर देशभक्ताच्या आग्रहांत तथ्य होते म्हणून माधवरावांनीं ही कबुली दिली नव्हती. परिषदेच्या कार्याची नौका दुहीच्या खडकावर आदळून दुसऱ्याच वर्षी फुटण्याचा रंग दिसत होता, तो प्रसग टाळण्याकरिता त्यांनीं माघार घेतली परतु माघार घेतांना 'त्यांनीं परदेशी भांडवलाबद्दल चकार शब्दसुद्धा काढू नये' अशी उलट अट नव्या मडळींना घातली उभय पक्ष या अटीनें बांधले गेले होते, पण व्यासपीठावर आरोहण करतां-क्षणीं नव्या देशभक्तांचा देशाभिमान भडकला व त्यांनीं जन्मभाषेच्या आश्रयाने परदेशी भांडवलवाल्यांवर आवेशपूर्वक तोडाचा पट्टा चालविला. एका पक्षाने अट मोडल्यामुळें माधवरावांना मूग गिळून बसण्याची आवश्यकता नाहींशी झाली. त्यांनीं परदेशी भाडवलामुळें झालेल्या फायद्याचें विवेचन आरंभिले, त्यासरशीं या देशभक्तांनीं व त्यांच्या गोतावळयाने 'प्रतिज्ञा मोडली, बोलात बोल नाहीं,'

* Esssay on Indian Economics, P. 180-81, by Mahadev Govind Ranade.

अशा अर्थाची ओरड सुरू केली. औद्योगिक परिषदेत पुष्कळसे युरोपियन आले होते आणि सर्व जातींचा व वर्गाचा समावेश या कार्यात व्हावा, या बुद्धीनें माधवरावांनींच त्यांना पाचारण केलें होतें. ...मराठींत हीं भाषणे झालीं, यामुळे निभावले; नाहीं तर माधवरावानीं आपली तोंडावर भरसभेत परभारे विटंबना करण्यासाठींच बोलाविले असा परिषदेस आलेल्या युरोपियनांचा निष्कारण गैरसमज झाला असता. अट व शिष्टाचार या दोन्ही बंधनांचा चुराडा उडाल्यावर माधवराव बोलावयास उभे राहिले, परंतु अडथळा केला जात आहे असे पाहून माधवरावांच्या चित्तांत क्रोधाचा संचार झाला या प्रसंगीं त्यांनीं अतिशय कडक भाषेंत सदर देशभक्तांची कानउघाडणी केली, असें त्या वेळच्या वृत्तपत्रांवरून दिसते.. परंतु प्रतिपक्षांतल्या कित्येक व्यक्तींचा राग प्रसंगापुरताच नव्हता परिषदेंत उद्भवलेल्या रागानें त्यांच्या अंतःकरणांत दीर्घ द्वेष व खुनशीपणा या दोषांना जन्मास घातलें व त्याचा परिणाम केसरीच्या एका लेखांत दिसून आला या लेखांत ‘परदेशी भांडवलाचे गोडवे गाणारे माधवराव देशद्रोही आहेत’ असा स्पष्ट ध्वनि आहे”*

या वादाच्या बुडाशीं एक महत्त्वाचा तात्त्विक मतभेद होता आणि नव्या देशभक्तांना राष्ट्रपितामह दादाभाई नौरोजी यांच्या अनेक उद्गारांचा व लिखाणाचा भरपूर आधार होता, हे लक्षांत घेण्यासारखे आहे या प्रसंगाची छाननी करतांना उभय पक्षांनीं शिष्टाचाराच्या व कार्याच्या दृष्टीने एकमेकांवर कोणत्या अटी घातल्या होत्या व त्यांचे उल्लंघन कोणीं कितपत केले या मुद्द्याला आज फारसे महत्त्व नाहीं. पण या विषयावर दोन पक्षांत मूलतः तात्त्विक तीव्र विरोध होता आणि या विरोधांतूनच पुढें जहाल-मवाळ राजकीय पंथभेद निर्माण झाला, या गोष्टीस आमच्या मतें अधिक महत्त्व आहे. एका पक्षाचे म्हणणे, आज जर आपली औद्योगिक उन्नति व्हावयास हवी आहे व जर तिला लागणारे भांडवल आपणांपाशीं नाहीं, तर ते इंग्लिश लोकांनीं दिल्यास आपणांस हवेंच आहे इतर देश जर इंग्लिश भांडवल घेऊन गबर होतात तर आपण तसेंच कां करू नये? दुसरा पक्ष म्हणे, कीं आमच्या येथील भांडवल इंग्लिश लोकांनी लुटून नेलें व एकसारखे नेत आहेत, त्यामुळे येथें भांडवल सांठत नाहीं. अशा स्थितींत इंग्लिश भांडवल येथें येतें, इतकेंच नाहीं, तर इंग्लिश भांडवलवालेच येथे येतात व आम्ही निर्धन पाहून आम्हांस औद्योगिक गुलाम बनवितात; त्यांचे आभार कसले मानितां? शिवाय येथे जें इंग्लिश भांडवल येतें, तें तरी इंग्लिशांनीं आमची लूट करूनच मिळविलें ना? आमच्या राजकीय दास्याच्या परिणामांतून येणारे हे औद्योगिक दास्य म्हणजे दुसरी आपत्तीच होय ही एक ब्रिटिश भांडवलवाल्यांची आमच्या असहाय देशावर होणारी औद्योगिक स्वारी आहे न्यायमूर्तींच्या मतें हा युक्तिवाद म्हणजे औद्योगिक उन्नतीसंबंधींचा एक निराशावादच आहे. याचा अर्थ, आम्ही स्वराज्य मिळवीपर्यंत आमची औद्योगिक उन्नति होणार

* श्री न. र फाटककृत न्या मू. रानडे यांचें चरित्र, पृ. ४६८–६९.

नाहीं असा होतो. हा अर्थ वरील विचारसरणींतून निघतो हे खरें आहे पण याला निराशावाद म्हणणें योग्य नाहीं आपल्या औद्योगिक अवनतीस राजकीय दास्य हें कारण आहे व ते नष्ट झाल्याखेरीज आपली औद्योगिक उन्नति होणार नाहीं, या मताला नैराश्यवाद किंवा निष्क्रियतावाद कां म्हणावे? याच्या उलट, न्यायमूर्तींचा आशावाद हा भ्रामक आशावाद असून राजकारणाकडे दुर्लक्ष करून येतील त्या गोऱ्या भांडवलवाल्यांचे आपण आभार मानीत गेलो, तर आम्ही त्याचे औद्योगिक गुलाम बनूं व त्याचे राजकीय परिणामहि भयकर होतील, अशी साधार भीति दादाभाईच्या लिखाणावरून पुण्यातील तरुण देशभक्तांना वाटत होती व्यापार व उद्योगधंदे यांच्या उन्नतीचे प्रयत्न आपणांस थोडे उघडपणें करता येतात व राजकारणासाठीं तितक्या उघडपणे झगडता येत नाहीं हे खरे असले, तरी इंग्लिश लोकच आमच्या औद्योगिक उन्नतीच्या आड येत होते हे विसरून चालणार नाहीं. अर्थात् राजकीय उन्नतीपेक्षां औद्योगिक उन्नति वरकरणी सोपी दिसली, तरी वस्तुतः ती तशी नाहीं, आणि राजकीय कारणांकडे दुर्लक्ष करून व स्वकीय-परकीय भांडवलवाल्यांतील भेद विसरून औद्योगिक उन्नतीचा पुरस्कार करणे हे युक्त नाहीं, असे या नव्या देशभक्तांचें मत होते. टिळक-नामजोशी याच्याप्रमाणें आगरकर हेहि या बाबतींत दादाभाईच्या मताचेच असून आपली औद्योगिक उन्नति होणें हे एका अर्थी स्वराज्य मिळविण्यापेक्षांहि कठिण आहे, असे त्यानीं स्पष्टपणे लिहिले आहे

"इंग्लिश लोकांनीं आमचा व्यापारधदा आटपल्यामुळें निरुद्योगापासून होणारे हाल आम्हास सोसावे लागत आहेत यावर कोणी असा प्रश्न करतील, कीं इंग्लिश लोकास तुम्हीं आपले धदे नाहींसे करू का दिलेत? याचे उत्तर एवढेंच, कीं ज्या कारणांमुळें आम्हीं आमचे राज्य त्याना घेऊ दिलें, त्याच कारणांमुळे आम्हीं आपले धदेहि आटपू दिले! आणि राज्य परत मिळविण्यासाठीं ज्या प्रकारच्या खटपटींचा उपक्रम आम्हीं केला आहे, त्याच प्रकारच्या खटपटी व्यापारधदा फिरून आपल्या हातीं येण्यासाठीं चालविल्या आहेत. एक दुसऱ्याशीं सलग्न आहे; तेव्हां साध्य होणार असतील तर दोन्ही एकाच क्रमाने साध्य होत जातील भेद इतकाच, कीं व्यापारधंद्यांच्या सबधाने आम्हास आमच्या सरकाराशीं विशेष राजरोसपणे भांडतां येते. तथापि हे भांडण घालीत असता, ही गोष्ट ध्यानात ठेवली पाहिजे, की आधिभौतिक दृष्टया इंग्रज लोकास हिंदुस्थानच्या राज्यापेक्षां हिंदुस्थानाशीं व हिंदुस्थान हातीं असल्यामुळें सर्व आशिया खडाशीं करतां येत असलेल्या व्यापारापासून अधिक फायदा होत आहे तेव्हां जर आम्ही आपल्या व्यापाराचें पुनरुज्जीवन मनापासून करूं लागलो, तर त्यांना उघडपणें जरी त्याला प्रत्यवाय करतां येणार नाहीं, तरी आमचा सगळा व्यापार आमच्या हातीं फिरून पडूं देण्यापेक्षा आमचे राज्य ते आम्हांस अधिक आनदाने देतील!"*

---

*आगरकर निबधसग्रह, भाग २, पृ. ४२९.

तात्पर्य, ब्रिटिश लोकांचे हितसंबंध व आपले हितसंबंध भिन्न व विरोधी आहेत इकडे दुर्लक्ष करून जसें राजकारण करतां येत नाहीं, तसेंच आपले अर्थकारणहि हा विरोध किंवा हें द्वैत लक्षांत घेतल्याखेरीज बरोबर चालणार नाहीं; याची जाणीव टिळक-आगरकर यांच्या पिढीला झालेली असून त्यांना न्यायमूर्तींचे राजकारण व अर्थकारण हीं दोन्हीहि नेमस्त किंवा मिथ्या आशावादी वाटू लागलीं होती.

याच लेखांत आगरकर पुढे लिहितात: "आमच्या व्यापारास व शेतकीस अर्थशास्त्राचे उलघन न करतां कोणत्या रीतीने मदत करतां येईल याची चिकित्सा मि जस्टिज तेलग, रा ब रानडे, दादाभाई नौरोजी वगैरे अनेक अनुभविक, शास्त्रज्ञ व विचारी गृहस्थानी केली आहे पण तिचा उपयोग काय? निजलेल्यास जागें करणे शक्य आहे, पण जाग्यास जागें कोण करूं शकेल! इंग्लिशी लोकाच्या मनोधर्मात एकाएकीं प्रचड क्रांति झाल्याशिवाय त्यांच्या अंतःकरणात जपान किंवा युनायटेड स्टेट्स येथील सरकाराप्रमाणे आमच्या व्यापारवृद्धीविषयीं कळकळ उत्पन्न होईल, अशी आशा करणे व्यर्थ आहे"‡

सारांश, इग्लिश लोकांच्या व हिंदी लोकाच्या भौतिक हितविरोधाला अग्रस्थान देऊन विचार करणारा एक नवा सप्रदाय १८८० पासून महाराष्ट्रांत निर्माण झाला होता व या तरुण लोकाना न्या. रानडेप्रभृति जुन्या पिढीचें अर्थकारण व राजकारण मिथ्या आशावादी किंवा मनुष्यसमाजाच्या मनोधर्माकडे दुर्लक्ष करून रचिलेलें आहे, असे वाटत होते ब्रिटिशाच्या न्यायबुद्धीवरचा त्याचा विश्वास उडाला होता, पण स्वावलंबनावरचा विश्वास वाढत होता. यामुळें या विचारसरणीस निराशावाद म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं आणि या तात्त्विक मतभेदातून निर्माण होणाऱ्या कलहांना दीर्घ द्वेष किंवा व्यक्तिमत्सर मानण्याचेंहि कारण नाहीं दादाभाईंनीं ब्रिटिश साम्राज्यशाहीनें व भांडवलशाहीने चालविलेल्या हिंदी जनतेच्या द्रव्यहरणाचा किंवा रक्तशोषणाचा जो सिद्धात जगापुढें माडला होता, त्याचा स्वाभाविक परिणाम म्हणजेच हा नवा तरुण देशभक्ताचा संप्रदाय होय न्यायमूर्तींना दादाभाईंची विचारसरणीच एककल्ली किंवा अतिरेकी वाटत असल्यानें त्याना हा नवा संप्रदाय उच्छृंखल वाटला तर त्यांत नवल नाहीं.

## न्या. रानडे व त्यांचें कार्य

पण या नव्या संप्रदायाचा विचार करण्यापूर्वी आपणास न्यायमूर्तींच्या अर्थकारणाचा व राजकारणाचा अधिक विचार करावयाचा आहे. दादाभाईंच्या विचाराहून न्यायमूर्तींची विचारसरणी थोडी भिन्न कशी होती, ते येथपर्यंत दाखविलें यावरूनच दादाभाई हे प्रामुख्यानें राजकारणी कां झाले व न्यायमूर्ति अखेरपर्यंत सर्वांगीण सुधारकच कां राहिले, याचा उलगडा होतो त्यांची राजसेवा हेहि या भेदाचें कदाचित्

‡ कित्ता, पृ. ४३२

कारण असूं शकेल; तथापि, त्यांच्या विचारांची बैठकच दादाभाईच्या बैठकीहून भिन्न होती हे कोणासहि स्पष्ट दिसून येईल. न्यायमूर्तींचा सार्वजनिक कार्यांत पहिला प्रवेश मुंबईस ते फेलो असताना १८६२ सालीं " इंदुप्रकाश " पत्रांतील लेखांच्या रूपानें म्हणजे दादाभाईंनीं ' बॉंबे असोसिएशन ' स्थापन केल्यानंतर दहा वर्षांनीं झाला या वेळीं १८५७ सालचे बड होऊन जाऊन सर्वत्र स्थिरस्थावर झाले होते. १८५८ सालचा राणीचा जाहीरनामा, विद्यापीठाची स्थापना, ईस्ट इंडिया कंपनीकडून ब्रिटिश मंत्रिमडळाकडे हिंदी राज्यसूत्रांचें संक्रमण आणि १८६१ च्या कायदेमडळाच्या सुधारणा-कायद्याने कांहीं बिनसरकारी सभासदांची कायदेमंडळांत नेमणूक, यांमुळे सुशिक्षित पिढीच्या अंतःकरणांत राजनिष्ठेचे पुनरुज्जीवन होत होते. १८५२-५३ सालीं म्हणजे दादाभाईंनीं सार्वजनिक जीवनांत प्रवेश केला तेव्हां, सुशिक्षित पिढीला थोडी निराशा वाटत होती. १८३३ सालीं दिलेले समतेचें अभिवचन ईस्ट इंडिया कंपनीने अमलांत आणिले नव्हते आणि डलहौसीची कारकीर्द चालू होती. १८५३ सालीं लोकांचे प्रतिनिधी कायदेमंडळांत घ्यावेत, अशी मागणी सुशिक्षितांनीं केली होती, पण तिलाहि वाटाण्याच्या अक्षताच लागल्या होत्या. १८५७ च्या बडानतर पुनः हिंदी लोकांना चुचकारण्याचें धोरण सुरू झालें. अर्थात् या वेळीं नव्या विद्यापीठांतून उत्तीर्ण होणाऱ्या सुशिक्षितांना नवी आशा वाटू लागली होती. या परिस्थितीचाहि परिणाम न्यायमूर्तींच्या विचारांवर होणे शक्य होते कारण कांहीं असलें, तरी दादाभाईच्या विचारसरणीहून न्यायमूर्तींची विचारसरणी भिन्न होती व तींत नेमस्त राजकारणाचीं बीजे होतीं, यांत शका नाहीं.

पण दुसऱ्या एका दृष्टीनें न्यायमूर्तींच्या कार्याला विशेष महत्त्व आहे व त्यांतच त्यांची चतुरस्र मुत्सद्देगिरी विशेष दिसून येते. इ स. १८७१ च्या नोव्हेंबर महिन्यांत ते पुण्यास येऊन राहिल्यापासून १८८० पर्यंतच्या काळांत त्यांनीं सरकारी नोकरींत राहून सार्वजनिक सभेच्या कार्याला राजकीय चळवळींचें स्वरूप दिले. त्यामुळे महाराष्ट्रांत एक नवें चैतन्य निर्माण झालें व सनदशीर राजकारणाचा पाया घातला गेला यांत शंका नाहीं. याच त्यांच्या कार्यास उद्देशून " लोकाच्या अगचे तेज अगदींच नाहींसें झालेलें होते असे नाहीं; पण वर लिहिलेल्या कारणांमुळे महाराष्ट्र देश म्हणजे त्या वेळीं एक थंड गोळा होऊन पडला होता या थंड्या गोळयास कोणत्या तऱ्हेनें ऊब दिली असतां तो पुनः सजीव होईल व हातपाय हालवू लागेल, याचा रात्रदिवस एकसारखा विचार करून अनेक दिशांनीं, अनेक उपायांनीं, अनेक रीतींनीं त्यास पुनः सजीव करण्याचें दुर्धर काम अंगावर घेऊन त्याकरितां जिवापाड जर कोणीं मेहनत केली असेल, तर ती प्रथमतः माधवरावजींनींच केली असे म्हटले पाहिजे; व आमच्या मते हेच त्यांच्या थोरवीचें किंवा असामान्य मोठेपणाचें मुख्य चिन्ह होय " असे उद्गार लो टिळकांनीं काढिले आहेत. इ. स. १८७१ पासून न्यायमूर्तींनीं पुण्यांत सार्वजनिक चळवळींचें व

राजकारणाचें जें चैतन्य निर्माण केलें, त्यामुळें दहा-पधरा वर्षांच्या अवधीत पुणें ही मुंबई इलाख्याची ' बौद्धिक व राजकीय ' राजधानी बनली, असे सर्व हिंदुस्थानभर मानण्यांत येऊं लागलें § इ. स. १८८५ मध्ये राष्ट्रसभेची स्थापना करण्याचे ठरले, तेव्हां तिचे पहिलें अधिवेशन पुण्यासच भरण्याचे ठरलें होतें. इतकेच नव्हे, तर कदाचित् पुढे दरसाल हे अधिवेशन येथेच भरवावे अशीहि कल्पना कांहींच्या मनांत होती या सुमारास पुण्यास जे हे महत्त्व आले, त्याचे श्रेय जर कोणा एका व्यक्तीस द्यावयाचें असेल, तर ते न्या. रानडे यांनाच द्यावे लागेल. यानंतर १८९५ च्या सुमारास पुण्यांतच राजकारणांतील जहाल राष्ट्रीय पक्ष निर्माण झाला आणि पुण्याला अखिल भारतीय राजकारणांत प्राप्त झालेले हे महत्त्व १९२० सालीं लो टिळकाचे निधन होईपर्यंत तसेच टिकून राहिलें. हिंदी राजकारणांतील प्रागतिक पक्ष न्या रानडे यांनाच " आधुनिक भारताचे जनक " अशी संज्ञा देतो आणि राष्ट्रीय पक्ष आपल्या सप्रदायाचे जनकत्व लो टिळकांना देतो, हे सर्वश्रुत आहे यावरून १८७१ सालीं न्यायमूर्तींनीं पुण्यांत जे सार्वजनिक जीवन निर्माण केले, त्याला किती मधुर फळें आलीं याची थोडीशी कल्पना येऊ शकेल १८७१ सालीं त्यांनीं पुण्यांतील सार्वजनिक जीवनाचे जे नेतृत्व आपल्या हातीं घेतले, तें १८९३ सालीं ते हायकोर्टाचे न्यायाधीश होऊन मुबईस जाईपर्यंत त्यांच्याच हातीं राहिले यानतर मात्र एक-दोन वर्षांत पुण्याचे नेतृत्व लोकमान्याकडे जाऊ लागल्याचीं स्पष्ट चिन्हे दिसू लागलीं. हा सुमारे पंचवीस वर्षांचा काळ एकदर हिंदुस्थानच्या इतिहासांत फार महत्त्वाचा असून याच काळांत राष्ट्रसभेच्या इतिहासांतील पहिलें दशक पडते या पहिल्या दशकाच्या अखेरीस राष्ट्रसभेच्या राजकारणांतहि थोड्या मतभेदाचा अस्पष्ट ध्वनि निघूं लागला होता पण तो तशाच अस्पष्ट अवस्थेत हवेत विरून गेला त्याची माहिती पुढे येईलच

न्यायमूर्ति रानडे यांच्या पुण्यांतील सुमारे पचवीस वर्षांच्या नेतृत्वाचे पुनः दोन खंड पडतात पहिला खड १८७१ पासून १८८० पर्यंतचा आणि दुसरा खंड १८८० पासून १८९३ पर्यंतच्या कालाचा. पहिल्या खडांत न्यायमूर्तींचे कार्यकर्ते उजवे हात म्हणजे कै गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका हे होत सार्वजनिक काकांचा जन्म इ. स. १८२८ मध्यें साताऱ्यास झाला व १८४८ मध्यें ते पुण्यास नाझर-कचेरींत नोकर म्हणून आले थोड्याच दिवसांत त्यांच्यावर कांहीं कुभांड येऊन त्यांना नोकरी सोडावी लागली. यानंतर त्यांनीं १८६५ मध्यें वकिलीची परीक्षा दिली व ते पुण्यासच वकिली करू लागले इ स. १८७० सालीं त्यांनी पुण्यास ' सार्वजनिक सभे 'ची स्थापना केली. सभेचा पहिला उद्देश केवळ

---

§ "But believe me, in those days, Poona considered itself the real intellectual and political capital of the Bombay Presidency."

— *Life of G. K. Gokhale. by the Rt. Hon Shastri*

पर्वती संस्थानची व्यवस्था नीट लागावी एवढाच संकुचित असला, तरी लवकरच एक-दोन वर्षांत तिला राष्ट्रीय राजकारणी संस्थेचें स्वरूप प्राप्त झालें व हे स्वरूप देण्याचें कार्य न्यायमूर्ति रानडे यांनींच केलें. इ. स. १८७१ च्या अखेरीस न्यायमूर्ति पुण्यास अधिकारी म्हणून आले, त्या वेळेपासून त्यांनीं सार्वजनिक काकांना हाताशीं धरून हिंदुस्थानांतील सनदशीर राजकारणाचा आणि हिंदी औद्योगिक उन्नतीच्या चळवळीचा पाया घातला सार्वजनिक काका हे या वेळीं चाळिशीच्यावर होते व माधवराव रानडे हे तिशींत होते; तथापि बुद्धिमत्तेचें कार्य माधवरावांनीं करावें आणि कर्तृत्वाचें कार्य काकांनीं करावें, असा श्रमविभाग लवकरच अस्तित्वांत आला व तो इ. स. १८८० मध्यें काकांचें निधन होईपर्यंत अखंड चालू राहिला.

महाराष्ट्रांतील आद्य सर्वांगीण सुधारक 'लोकहितवादी' यांनीं इ. स. १८४८ सालींच स्वदेशी-चळवळीचा उपदेश आपल्या लेखांतून केला होता हे मागें सांगितलेंच आहे. पण हा उपदेश केवळ द्वितीय पुरुषी उपदेश होता. तो आचरण्यास पुढे होऊन त्याचा प्रचार व संघटना करण्याचें कार्य १८७२ पासून पुण्यास सुरू झालें. हे कार्य सुरू करण्याचे श्रेय सार्वजनिक काका आणि न्या रानडे याना देण्यांत येतें. न्यायमूर्तींनीं १८७२ व १८७३ या दोन वर्षीं स्वदेशी उद्योगधंद्यांच्या ऱ्हासावर आणि त्यांच्या उन्नतीच्या उपायासंबंधीं दोन विद्वत्ताप्रचुर व्याख्यानें दिलीं. या व्याख्यानांत त्यांनीं दादाभाई नौरोजी यांनीं आपल्या देशाच्या संपत्तीला लागलेल्या द्रव्यशोषणाच्या पाझराचा जो सिद्धांत माडला होता, तो लोकास सुलभ भाषेत समजावून सागितला आणि समाईक भांडवलाच्या मंडळया स्थापून यांत्रिक कारखाने काढल्याखेरीज औद्योगिक उन्नति होणार नाहीं, हे तत्त्व लोकांच्या मनावर ठसविलें. सार्वजनिक काका हे स्वतः काढलेल्या सुताची खादी नेहमीं वापरीत असत; आणि त्यांनीं ठिकठिकाणीं स्वदेशी मालाचीं दुकाने काढून स्वदेशी व्यापाराला उत्तेजन देण्याचाहि प्रचार सुरू केला अर्थात् त्या वेळीं या कल्पनेची बरीच हेटाळणी झाली. तरीहि काकांनीं आपले स्वदेशीचें व्रत आमरण चालू ठेविलें. न्यायमूर्तींनीं आपल्या देशांत पाश्चात्य पद्धतीची औद्योगिक क्रांति व्हावी या उद्देशाने थोड्याच दिवसांत संरक्षक जकातींचे तत्त्व पुरस्कारून सरकारला अर्थशास्त्राच्या आधारें आपले मत पटवून देण्याचा उद्योग आरंभिला. पण मागे आगरकरांच्या एका उताऱ्यांत म्हटल्याप्रमाणें जाग्यास जागें करणे शक्य नसल्यामुळें न्यायमूर्तींनीं ज्या हिंदी अर्थशास्त्राचा पाया घातला किंवा बीज रोविलें, त्याला सरक्षक जकातींचें फल थोड्याफार अंशानें येण्यास एक जर्मन महायुद्ध होऊन जावें लागले! या महायुद्धानंतर जेव्हा आपल्या मालाला इतर पुढारलेले देश हिंदी बाजारपेठांतूनहि हुसकून देत आहेत असे ब्रिटिशांना दिसून आले, तेव्हां त्यांनीं साम्राज्यांतील मालाला सवलती ठेवून साम्राज्याबाहेरील मालावर जकाती बसविण्यास हिंदुस्थानला थोडी सवलत दिली. यांतहि हिंदी कारखान्यांच्या संरक्षणापेक्षां सरकारच्या तिजोरींतील तूट भरून

यावी हेंच धोरण प्रमुख असल्याने त्याचाहि व्हावा तितका फायदा हिंदुस्थानला मिळला नाहीं. (अशा परिस्थितींत न्यायमूर्तींच्या विद्वत्ताप्रचुर व्याख्यानांतून ज्या हिंदी अर्थशास्त्राचा पाया घातला गेला, त्यापेक्षां सार्वजनिक काकांच्या स्वार्थत्यागी उत्साहांतून जी स्वदेशी-चळवळ उदयास आली, तिनेच स्वदेशी धंद्यांना खरें उत्तेजन दिलें आणि खरे देशप्रेम जागृत व संघटित केले, असे म्हणणें भाग आहे )

## राष्ट्रीय अर्थशास्त्राचा पुरस्कार

न्यायमूर्तींनीं जो हिंदी अर्थशास्त्राचा पाया घातला तो फ्रेड्रिक लिस्ट, कॅरेप्रभृति जर्मन व अमेरिकन अर्थशास्त्रज्ञांच्या विचारांच्या आधारे घातला. अॅडाम स्मिथ, रिकॉर्डोप्रभृतिं इंग्लिश अर्थशास्त्रज्ञांनीं व्यक्तिवादी खुल्या मैदानाचे अर्थशास्त्र युरोपांत रूढ केले होते. यांत व्यक्तीचे हित तेंच राष्ट्राचें हित आणि राष्ट्राचे हित तेंच जगाचे हित, असे स्थूल मानाने प्रतिपादण्यांत येत असे. वैयक्तिक स्पर्धा, वैयक्तिक स्वार्थ आणि आंतरराष्ट्रीय खुला व्यापार यांतून ज्या व्यक्ती, जीं राष्ट्रे व जे वर्ग पुढे येतील तेच स्वतःचें व जगाचे भौतिक हित करूं शकतील आणि या नैसर्गिक निवडीला विरोध करून विशिष्ट व्यक्तींना, वर्गांना व राष्ट्रांना कायद्यांच्या कृत्रिम बंधनांचीं कुंपणे रचून सरक्षण देणे म्हणजे नालायकांना साहाय्य करणें आहे व त्यामुळें जगांतील धनोत्पादन नालायक व्यक्तींच्या हातीं जाऊन जगाचें एकंदरींत अनहितच होणार, असा उपदेश हे अर्थशास्त्रज्ञ करीत असत या खुल्या मैदानाच्या आणि अनियत्रित व्यक्तिस्पर्धेच्या तत्त्वज्ञानाचा सर्वत्र प्रचार झाल्यास जगांतील मागासलेलीं राष्ट्रें, दुर्बल व्यक्ती आणि निर्धन वर्ग यांचा नाश होऊन त्यांना पुढारलेलीं राष्ट्रे, प्रबल व्यक्ती आणि सधन वर्ग याच्या राजकीय व आर्थिक दास्यांत निरतर रखडावे लागणार हे उघड आहे पण हे उघड सत्य नेपोलियनला उलथा पाडल्यामुळे " निर्वीरमुर्वीतलम् " केल्याचा अहकार झालेल्या ब्रिटिश भांडवलशाहीला एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यत पटलें नाहीं. स्वार्थाशीं अविरोधी, किंबहुना, स्वार्थाला पोषक असे तत्त्वज्ञान बनवून त्याचा अभिमानपूर्वक प्रचार करण्यांत आधुनिक काळांत ब्रिटिश भांडवलशाहीनें अपूर्व यश मिळविलें आहे पण एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून जर्मनी व अमेरिका या औद्योगिक प्रगतींत मागासलेल्या राष्ट्रात राष्ट्रीय अथवा राष्ट्रवादी अर्थशास्त्राचा उदय झाला व त्यानें सरक्षक जकातींचें तत्त्व जोरानें पुरस्कारिलें या अर्थशास्त्राचें रहस्य न्या रानडे यांनीं थोडक्यांत पुढीलप्रमाणे फार मार्मिकपणें माडिलें आहे :

"The advanced theory concedes freedom where the parties are equally matched in intelligence and resources; when this is not the case, all talk of equality and freedom adds insult to the injury. It is in this spirit that the dis-

tribution of produce among the needy many and the powerful few has to be arranged, i. e., in a spirit of equity and fairplay, and the orthodox views of finality in such matters must be reconsidered in all the relations of life."‡

" बुद्धिमत्ता आणि साधनें या बाबतींत जे पक्ष समान असतील तेथें स्वातंत्र्य देण्यास हरकत नाहीं; पण जेथें अशी स्थिति नाहीं, तेथें समानता व स्वातंत्र्य यांची भाषा योजणे म्हणजे दुःखावर डागण्या देण्यासारखेंच होय संपत्तीची निपज झाल्यावर मूठभर प्रबळ लोक आणि बहुसंख्य गरजवंत यांच्यामध्यें तिची विभागणी करतांनाहि याच तत्त्वांचा म्हणजे न्यायाचा व समबुद्धीचा अवलंब केला पाहिजे आणि समाजजीवनातील सर्व व्यवहारासंबंधींचे जुन्या अर्थशास्त्राचे सिद्धांत निर्दोष न समजता त्यांचा फेरविचार करणे भाग आहे " असे न्यायमूर्तींनीं आपल्या " Indian Political Economy " या विषयावरील व्याख्यानात काढिलेले विचार फार दूरदर्शी व व्यापक असून त्यात संपत्तीच्या विभागणींतहि न्याय व समता यांची स्थापना केवळ खुल्या मैदानाच्या तत्त्वानुसार होऊं शकत नाहीं, हे दाखवून दिलें आहे. भांडवलवाले व कामगार यांच्यांतील लढ्यांत या तत्त्वाच्या अनुरोधाने सरकारनें निर्धन कामकरीवर्गाचा पक्ष घेऊन त्यास साहाय्य करणें अवश्य आहे, हे तत्त्वहि यात अंतर्भूत झाले आहे न्यायमूर्तींनीं हिंदी अर्थशास्त्राचा जो पाया घातला तो जरी अशा प्रकारें फार दूरदृष्टीने घातला असला, तरी आतां त्याच्यापुढें जाण्याचा प्रसंग आलेला आहे न्यायमूर्तींनीं हिंदुस्थान देश मागसलेला आहे म्हणून त्याचे अर्थशास्त्र भिन्न असावें असें प्रतिपादिले असले, तरी त्यांचा आदर्श व्यक्तिवादी स्पर्धाप्रधान आर्थिक घटना हाच होता, असे त्यांच्या एकंदर विचारसरणीवरून दिसतें पण आज या स्पर्धाप्रधान व्यक्तिवादी अर्थशास्त्राचा पायाच ढांसळून नव्या तत्त्वावर राष्ट्रीय अर्थशास्त्राचा पाया घालण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. आज अर्थशास्त्रीय जगांत नियोजित आर्थिक घटना, समाजवाद आणि स्वयंपूर्ण प्रदेश असे अनेक नवे विचार संचार करीत असून त्या सर्वांचे आलोडन करून नव्या राष्ट्रीय अर्थशास्त्राचा पाया घालणें अवश्य झाले आहे असो. या विषयाचें पुढे पुनः विवेचन करावयाचें आहे येथें एवढेच सांगावयास हरकत नाहीं, कीं न्यायमूर्तींनीं ज्या अर्थशास्त्राचा पाया घातला त्यांचा आधार पहिले जर्मन महायुद्ध होऊन जाईपर्यंत हिंदी राजकीय व औद्योगिक प्रश्नांचा विचार करणारांना पुरला यानंतर गांधीवादाचा व समाजवादाचा उदय झाला असून औद्योगिक क्रांतींतून निर्माण होणारे समान व न्याय्य विभागणीचे प्रश्न आज राष्ट्रापुढे येत आहेत. या प्रश्नांचा निर्णय करण्यास न्यायमूर्तींचें हिंदी अर्थशास्त्र अपुरे पडत आहे.

हिंदुस्थान देशावर ब्रिटिश लोकांचें केवळ राजकीय प्रभुत्व नसून औद्योगिक

‡ Essays on Indian Economics. by M. G. Ranade, P. 31.

प्रभुत्व स्थापन झालें आहे, आणि हें एकदम डोळयांत न भरणारे औद्योगिक प्रभुत्व परिणामांच्या दृष्टीनें देशाला फारच अधिक हानिकारक असते. त्याच्या योगानें राष्ट्रीय जीवनाच्या सर्व शक्तीच नष्ट होतात आणि तो देश विकलांग होतो,* असा सिद्धांत न्यायमूर्तींनीं प्रथमतः लोकांपुढें मांडिला व तो आजहि खराच आहे. तथापि एका देशाला दुसऱ्या देशावर हे जे औद्योगिक प्रभुत्व लाभतें, त्याचा उगम पहिल्याच्या राजकीय प्रभुत्वांतच असतो, हे राष्ट्रपितामह दादाभाई यांनीं दाखवून दिलेले सत्य केव्हांच दृष्टीआड होऊ देतां कामा नये. आजच्या व्यापारी व औद्योगिक युगांत राजकीय साम्राज्यशाहीचा परिणाम औद्योगिक प्रभुत्वांत होत असतो व म्हणून ही साम्राज्यशाही पूर्वींच्या सरंजामी साम्राज्यशाहीपेक्षां परिणामांच्या दृष्टीनें अधिक भयावह असते, एवढाच याचा अर्थ आहे. यामुळें जो देश पूर्वींच्या अनेक सरजामी साम्राज्यांतून बचावून राहिला, तोच या औद्योगिक साम्राज्याच्या पन्नास-पाऊणशें वर्षांच्या अमदानींत मृत्युपथास लागला ! जो देश शेती व उद्योगधंदे या दोहो-बद्दल प्रसिद्ध होता, तोच देश केवळ कृषिमय बनला आणि ज्या देशांतील पक्का माल युरोपांत खपत असे, त्याच्यावर आपल्या देशांतील कच्च्या मालाचा पक्का माल बनविण्यासाठीं परदेशावर अवलंबून राहण्याचा प्रसग ओढवला! हा ब्रिटिश राज-नीतीचा आणि राजकीय लुटीचा अपरिहार्य परिणाम असल्यानें अशा देशांत साह-जिकच राजकारणाला प्राधान्य प्राप्त होऊं लागले. दादाभाई नौरोजी १८८० मध्येच लिहितात : "Politics now engross their attention more and more." म्हणजे लोकांचे लक्ष आतां राजकारणाकडे अधिकाधिक लागूं लागलें आहे.

## न्यायमूर्तींचें राजकीय तत्त्वज्ञान

आतां आपण राजकारणांतील न्यायमूर्तींच्या धोरणाचा विचार करूं हिंदु-स्थानांतील प्रागतिक सनदशीर राजकारणाचा पाया घालण्याचे श्रेय न्यायमूर्तींनाच असल्यामुळे त्याला विशेष महत्त्व आहे ऐतिहासिक घडामोडींकडे परमेश्वरी हेतूंच्या चष्म्यांतून पाहण्याची त्यांची स्वाभाविक मनोवृत्ति असून प्रत्येक वाईट गोष्टींतूनहि कांहीं तरी चांगले निर्माण होत असतें, अशी त्यांची दृढ श्रद्धा होती मुसलमानी अमदानींतहि हिंदू लोकांचा सर्वस्वीं ऱ्हास झाला हें मत त्यांना मान्य नसून अठराव्या शतकांत मराठे व शीख लोकांनीं मोगलांचा पाडाव करून आपलीं राज्यें

* "The political domination of one country by another attracts far more attention than the more formidable, though unfelt domination which the capital enterprise and skill of one country exercise over the trade, and manufactures of another This latter domination has an invidious influence which paralyzes the springs of all the varied activities which together make up the life of a nation, and this influence was so paramount at one time in British India that there were grave reasons to fear the worst consequences of this inevitable change." — *Essays on Indian Economics by M. G. Ranade, P 93.*

निर्माण केली, हाहि मुसलमानी अमलाचा हिंदू संस्कृतीवर चांगला परिणाम झाल्या-चाच पुरावा आहे असें ते म्हणत अकबराच्या काळांत हिंदू व मुसलमान यांच्या ऐक्यावरच हिंदुस्थानांत कोणतीहि राजसत्ता चिरस्थायी होऊं शकेल या सत्याचा शोध लागला व जेव्हां त्याचा विसर मोगलांना पडला, तेव्हाच त्यांचे साम्राज्य रसातळास पोहोंचलें असा त्यांनीं आपल्या इतिहासापासून दुसरा सिद्धान्त काढिला आहे. देशांत सर्वत्र कायद्याचें राज्य स्थापन करून शांतता प्रस्थापित कशी करावी, या गोष्टीचे शिक्षण देण्यासाठींच परमेश्वराने ब्रिटिशांना या देशात धाडिलें आहे असा त्यांचा विश्वास होता, व देशातील प्रस्थापित कायद्याच्या राज्याला ज्या योगे धक्का बसेल असे कोणतेहि कृत्य आपण करू नये, यावर त्यांचा विशेष कटाक्ष होता देशांत कायदा प्रस्थापित करणे हा राज्यकर्त्यांचा धर्म, आणि तो कायदा निमूटपणें पाळणें हा प्रजाजनांचा धर्म, हे त्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाचे प्रमुख सूत्र आहे. त्याचबरोबर प्रजाजनांना राज्यकर्त्यांच्या बरोबरीचा दर्जा प्राप्त करून देणें हेहि प्रजेच्या पुढाऱ्यांचे कर्तव्य आहे असें ते मानितात थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं हिंदी लोकांना समानतेने वागवावे आणि हिंदी लोकांनीं ब्रिटिश साम्राज्याशीं एकनिष्ठ रहावें, असे त्यांचें राजकीय तत्त्वज्ञान होते मनुष्या-मनुष्यांतील सर्व व्यवहारांत न्याय प्रस्थापित व्हावा आणि वंशभेद किंवा श्रद्धाभेद (धर्मभेद) लक्षांत न घेतां सर्वांना समान दर्जा प्राप्त व्हावा, या तत्त्वासच ते प्रागतिक तत्त्व (Spirit of liberalism) असे मानितात. ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं हे तत्त्व १८३३ सालीं ईस्ट इंडिया कंपनीला सनद देतांना केलेल्या कायद्यात मान्य केलेलें असून १८५८ सालच्या राणीच्या जाहीरनाम्यांत "ज्या कर्तव्यांच्या बंधनांनीं आम्ही आमच्या इतर प्रजाजनांशीं बांधले गेलो आहोत, त्याच बंधनांनीं आम्ही हिंदी प्रजेशींहि निगडित झालों आहों" असे स्पष्ट अभिवचन देण्यांत आलें होते,* व हे वचन आम्ही परमेश्वराला स्मरून अंतः-करणपूर्वक पुरें करू असेहि जाहीर करण्यात आले होते. न्यायमूर्ति रानडेप्रभृति हिंदी मुत्सद्यांनीं हा राणीचा जाहीरनामा म्हणजे हिंदी प्रजेचा "मॅग्नाचार्टा" असे मानि-लेले आहे. या सनदेनुसार आपणांस ब्रिटिश जनांप्रमाणे प्रातिनिधिक राज्यपद्धतीहि प्राप्त झाली पाहिजे आणि हिंदुस्थानला ब्रिटिश-छत्राखालीं मांडलिकी स्वराज्य मिळाले पाहिजे, हे न्यायमूर्तींचे अंतिम राजकीय ध्येय होते १८८३ सालीं लॉर्ड रिपन यांच्या कारकीर्दींत 'इल्बर्ट बिल' म्हणून प्रसिद्ध असलेला कायद्याचा मसुदा चर्चिला जात होता. फौजदारी खटल्यांतील गौर-गौरेतर हा भेदभाव नष्ट करण्याचे तत्त्व या मसुद्यांत ग्रथित झाले होतें. या तत्त्वाची चर्चा करतांना माधवरावजींनीं हिंदुस्थानच्या अंतिम ध्येयाचा पुढील शब्दांत उल्लेख केला आहे:

---

*"We hold ourselves bound to the natives of our Indian territories by the same obligations of duty which bind us to our other subjects, and these obligations by the blessing of Almighty God we shall faithfully and conscientiously fulfil." — *The Queen's Proclamation in 1858.*

" There can be no question that a nation of 250 millions can never be permanently held down by sheer force, and sooner or later by God's providence, and under the encouragement of British example and discipline, the people of this country must rise to the status of self-governed community, and learn to control their own affairs in subordinate alliance with England."§

न्यायमूर्तींनीं हिंदुस्थानच्या अंतिम राजकीय भवितव्याचें हे जें दिग्दर्शन केले आहे, तें तत्कालीन सर्वच लोकांना पुरेसे वाटत होते असे मात्र समजण्याचें कारण नाहीं. पुण्यांतच १८८० पासून चिपळूणकर, आगरकर आणि टिळक यांचा तरुण राष्ट्रीय पक्ष अस्तित्वात येत होता. त्यापैकीं एकासहि हे मांडलिकी स्वराज्याचे अंतिम ध्येय उत्साहवर्धक वाटत नव्हतें. तत्कालीन कार्याच्या दृष्टीने त्याना हे पुरेसे वाटले, तरी अंतिम दृष्ट्या त्यांपैकीं कोणासहि तें मान्य नव्हते इ स १८८२ सालीं लिहिलेल्या चिपळूणकरांच्या मृत्युलेखांत आगरकर लिहितात : " एकाद्या वेळेस त्याचा कल्पना-विहग पूर्ण पंख पसरून भराऱ्या मारू लागला, म्हणजे त्याला हिंदुस्थान देश स्वतंत्र होऊन प्रजासत्ताक राज्याखालीं सुखाने नादत आहे असे दिसे."

या तरुण पक्षाची कल्पनाकाशात उड्डाण करण्याची स्वैरवृत्ति न्यायमूर्तींच्या नेमस्त राजकारणात बसण्यासारखी नव्हती व ती तशी कधीं बसलीहि नाहीं. न्यायमूर्ति प्रागतिक होते, तसेच ते नेमस्तहि होते प्रागतिकत्व म्हणजे वंशभेद किंवा धर्मभेद न मानता मनुष्या-मनुष्यांत समानता व न्याय प्रस्थापित करणे असा अर्थ ते करीत असून 'नेमस्त' या शब्दानें फार दूरच्या ध्येयाकडे लक्ष न देतां पावलापुरतें पाहून काम करीत राहणें आणि हे काम करीत असतां तडजोडीची व उभयपक्षीं देवाण-घेवाणीची समजस वृत्ति धारण करणे असा त्यांचा अर्थ आहे.* लोकहितवादींनीं आपल्या एका लेखात अमेरिकेंत झालें तसें हिंदुस्थानात होऊन हिंदी लोक ब्रिटिशांना आपल्या देशातून जा म्हणून सांगतील असे स्पष्ट म्हटलें आहे,

§ न्या रानडे-चरित्र, पृ ३६२.

* पुण्यात सार्वजनिक सभेतून निघून प्रागतिक पक्षाने डेक्कन सभा काढिली त्या वेळी 'प्रागतिक व नेमस्त' या शब्दाच्या व्याख्या न्यायमूर्तींनी पुढील शब्दात दिल्या आहेत —

The spirit of liberalism implies a freedom from race and creed prejudices and a steady devotion to all that seeks to do justice between man and man, giving to the rulers the loyalty that is due to the law they are bound to administer, but at the same time to the ruled the equality which is their right under the law. Moderation implies the condition of never vainly aspiring after the impossible or after too remote ideals, but striving each day to take the next step in the order of natural growth, by doing the work that lies nearest to the hand in a spirit of compromise and fairness

हे मागे सांगितलेच आहे. पण न्यायमूर्तींच्या नेमस्त मुत्सद्देगिरीच्या दृष्टीला या गोष्टी बोलणे किंवा लिहिणे पटत नव्हतें अर्थात् लोकहितवादी केवळ विचारप्रवर्तक लेखक होते व न्या रानडे सघटित राजकारणांतील कार्यकर्ते व व्यावहारिक मुत्सद्दी होते हा भेद ध्यानांत घेतला पाहिजे, हे आम्हांस मान्य आहे तथापि कोणत्याहि राष्ट्रांतील उत्साही तरुण अंतःकरणास मांडलिकी स्वराज्य हे अतिम राजकीय ध्येय मान्य होणें शक्य नाहीं, हेहि मुत्सद्द्यांनीं ध्यानांत ठेवणे अवश्य आहे

इग्लडांतील लिबरल पक्षाच्या अनुरोधानेच न्यायमूर्तींनीं आपले राजकीय धोरण आंखिले होते, असे म्हणण्यास हरकत नाहीं आपल्या देशात इग्लंडप्रमाणे लिबरल आणि कॉन्झर्वेटिव असे पक्ष निर्माण होण्यास बराच काळ लागेल असे त्याना वाटत असलें, तरी येथील गोरा अधिकारीवर्ग, त्याला पाठिंबा देणारा या देशातील बिन-सरकारी ॲंग्लो-इडियन समाज आणि त्याच्या पाठीमागे इग्लडात राहून नेहमीं स्वार्थाने व कधीं कधीं अज्ञानाने हिंदी प्रगतीला विरोध करणारा मोठ्या धनिकाचा वर्ग, हाच हिंदी राजकारणांतील कॉन्झर्वेटिव पक्ष असून अल्पसख्य सुशिक्षित हिंदी वर्ग, त्याचीं वृत्तपत्रे व त्याच्या सस्था आणि नेणतेपणाने त्याना पाठिबा देणारी हिंदी जनता यांच्या संघटनेतूनच हिंदुस्थानात खरा प्रागतिक म्हणजे लिबरल पक्ष निर्माण होईल, असे न्यायमूर्तींचे निदान होते* पण अद्यापि हा लिबरल पक्ष आपल्या देशांत खऱ्या अर्थाने अस्तित्वांत आलेला नाहीं असे ते म्हणत असत. या परिस्थितीस अनुसरून त्याचे धोरण त्यानीं प्रागतिक पण नेमस्त आखिले होते हे त्या काळास अनुरूप असे मानतां येईल, पण ही प्राथमिक अवस्था सपल्यानंतरहि ज्यानीं तो नेमस्तपणा त्याच स्वरूपांत कायम ठेवण्याचा प्रयत्न केला, त्यांच्या त्या कृत्याचे तितकेहि समर्थन होऊं शकत नाहीं

इग्लंडातील लिबरल पक्षाच्या अनुरोधाने न्यायमूर्तींचे धोरण आंखण्यांत आले होते असे म्हटले, पण त्याचा याहून अधिक खुलासा करणे भाग आहे इंग्लंडांतील लिबरल पक्षांतहि नेमस्त व जहाल (Moderate and Radical) असे दोन उप-पक्ष होते. नेमस्त लिबरलांत बर्क किंवा ग्लॅडस्टन यांचा अतर्भाव होत असून जहाल ऊर्फ रॅडिकल लिबरलात मोर्ले, ब्राइट, ब्रॅडला किंवा मिल्ल यांचा अतर्भाव होई. सामान्यतः या दोन्ही उपपक्षांना क्रांतीचा मार्ग हा त्याज्य वाटला, तरी दुसऱ्या म्हणजे रॅडिकल लिबरल पक्षाला विशिष्ट परिस्थितीत क्रांति अपरिहार्य आहे, आणि शांततेनें होणाऱ्या प्रगतीच्या अभावीं राष्ट्रजीवनाचा प्रवाह तुंबून कुजून जाण्यापेक्षां त्याने विरोधी बांध फोडून क्रांति करून पुढे जाणे हेच इष्ट आहे, असे वाटत असे. ही वृत्ति न्यायमूर्तींना मुळींच मान्य नसून आपल्या देशांत क्रांतिकारक विचारांना मुळींच अवसर मिळूं नये अशी त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति होती. सामाजिक, धार्मिक किंवा राजकीय यांपैकीं कोणत्याच क्षेत्रांत त्यांना क्रांतीचा विचार सहन होत

* न. र. फाटककृत न्या. रानडे-चरित्र, पृ. ३६१.

नसे. ब्रिटिशांनीं हिंदुस्थानला 'कायद्याचे राज्य' ही मोठीच देणगी दिली असून तिला ज्याच्या योगाने धक्का लागेल अशी कोणतीहि गोष्ट करणे हे देशविघातक आहे, अशी त्यांची खात्री होती. फ्रेंच राज्यक्रांतीचे भयंकर दुष्परिणाम वर्णन करणारे बर्कचे पुस्तक हें प्रागतिक पक्षाच्या राजनीतीचे निदर्शक व्हावे, अशी त्यांची मनीषा असावी. त्यांचे पट्टशिष्य ना गोखले आणि गोखल्यांचे शिष्य ने ना शास्त्री याच्या भाषणात कायद्याच्या राज्याला धक्का लागण्याची भीति वारवार प्रकट झालेली असून यामुळेंच न्यायप्रस्थापनेसाठीं किंवा सत्यनिष्ठेसाठीं कायदेभग करण्याचें तत्त्व पुरस्कारणारे म. गाधी भारतसेवकसमाजात प्रविष्ट होऊ शकले नाहींत, हे सर्वश्रुत आहे

या बाबतींत दादाभाई किंवा ह्यूम यांचीहि वृत्ति न्यायमूर्तींच्या वृत्तीहून थोडी भिन्न होती त्यांनाहि राज्यक्रांति मनापासून नको होती परंतु ब्रिटिश राजनीतीमुळे हिदुस्थानांत जे भयंकर दारिद्य पसरत आहे त्यामुळे येथे राज्यक्रांति होईल, ही भीति त्याच्या मनावर खोल ठसलेली असल्यानें त्याचा प्रचार राज्यकर्त्यांना जहाल, किंबहुना, राजद्रोही वाटत असे आणि या मुद्द्यांवर वारवार भर देऊन लोकांत जागृति करण्याचे त्याचें धोरण नेमस्त प्रागतिक वृत्तीला थोडें वाह्यात्पणाचेंच वाटत असे. अशा प्रकारे दादाभाई किंवा ह्यूम याच्या प्रचारांत रॅडिकल लिबरल वृत्तीचें बीज पुढील पिढींतील तरुणांना दिसत असे आणि त्याच्या प्रचारावर या वृत्तीची पूर्ण छाया पडलेली दिसते. यांतूनच पुढे जहाल राजकारणाचा उदय प्रथम महाराष्ट्रात व नतर सर्व हिंदुस्थानांत झाला हा उदय होऊं लागल्याचीं चिन्हे दिसू लागताच न्यायमूर्तींनीं आपल्या नेमस्त प्रागतिक पक्षाचीं तत्त्वें आखून घेऊन त्याला सार्वजनिक सभेहून भिन्न असे डेक्कन सभेचे स्वतत्र अधिष्ठान निर्माण केलें टिळक-आगरकरांच्या उज्ज्वल स्वार्थत्यागाने स्फूर्ति मिळालेल्या एक सच्छिष्य न्यायमूर्तींना लाभला आणि त्याने आजन्म राष्ट्रसेवेचें व्रत अगीकारून सर्व हिंदुस्थानात आपल्या गुरूचे राजकारण फैलाविले. कांहीं काळ राष्ट्रसभेचीं सर्व सूत्रें या पक्षाच्या हातीं गेलीं. पण अखेरीस लोकमान्यांच्या जहाल राष्ट्रीय पक्षाचें वर्चस्व त्या सभेंत होतांच या पक्षानें राष्ट्रसभा सोडून प्रागतिक परिषद् नावाची संस्था काढिली व आपली परपरा कशी तरी चालू ठेविली.

## न्यायमूर्तींचें राजकीय कार्य

न्यायमूर्तींनीं १८७१-७२ सालीं सुरू केलेल्या राजकारणामुळे एक-दोन वर्षांत पुण्याच्या राजकीय वातावरणांत एक प्रकारची उष्णता आणि नवचैतन्य निर्माण केलें, यांत शका नाहीं. मुबई आणि कलकत्ता अशा ठिकाणीं ज्या राजकीय चळवळी त्या वेळीं चालू असत, तशा पुण्यांत चालविण्याचें धोरण त्यांनीं सार्वजनिक सभेला लावून दिलें आणि लवकरच पुण्याच्या या सभेने इतर प्रातिक शहरांनाहि एक प्रकारें मार्गे टाकिलें. इ. स. १८७२ सालीं हेन्री फॉसेट यांना पार्लमेंटांत

निवडून दिल्याबद्दल ब्रायटनच्या मतदारांचे अभिनंदन करण्याची कल्पना कलकत्ता व मुंबई येथें निघाली तिला सार्वजनिक सभेने पाठिंबा दिला. १८७३ सालीं महाराष्ट्रांतील निरनिराळया जिल्ह्यांतील शेतकऱ्यांच्या आर्थिक स्थितीची पाहणी करण्याचें कार्य सभेनें अंगावर घेतलें. १८७४ साली ब्रिटिश पार्लमेंटांत हिंदी जनतेचे प्रतिनिधी असावेत अशी मागणी करणारा एक अर्ज पार्लमेंटाच्या सभासदाकडे सभेने पाठविला. १८७५ सालीं बडोद्याचे मल्हारराव गायकवाड यांच्यावर तेथील रेसिडेंटास विषप्रयोग केल्याचा आरोप करण्यांत आला, तेव्हां त्यास कायदेशीर व आर्थिक साहाय्य करण्याची चळवळ सभेने केली १८७६-७७ सालीं महाराष्ट्रांत दुष्काळ पडला तेव्हा दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांना साहाय्य करण्याचें आणि शेतकऱ्याचीं गाऱ्हाणीं सरकारपुढे ठेवून त्याची दाद लावण्याचें काम सभेने केलें दादाभाई नौरोजी यांनीं शेतकऱ्यांच्या निःसीम दारिद्र्याकडे लोकांचे व सरकारचे लक्ष प्रथम वेधिलें तसेच शेतकऱ्याच्यातर्फे सरकारकडे दाद मागण्याची पहिली चळवळ पुण्याच्या सार्वजनिक सभेने सर्व हिंदुस्थानांत प्रथम केली, असे म्हणण्यास हरकत नाहीं.

## ब्रिटिश साम्राज्यवादाची वाढ

१८७६ सालापासून हिंदुस्थानांत लॉर्ड लिटन यांची कारकीर्द सुरू झाली. इंग्लडांत ग्लॅडस्टन यांची कारकीर्द संपून डिझ्रायली या साम्राज्यवादी मुत्सद्याचे धोरण अमलांत येऊं लागले, आणि रशियाच्या मध्यआशियातील साम्राज्यवृद्धीला तोंड देण्यासाठीं म्हणून अफगाणिस्तानावर स्वारी करण्यांत आली या वेळीं हिंदी जनता व राजेरजवाडे हे ब्रिटिश साम्राज्याच्या पाठीशीं राजनिष्ठेनें उभे आहेत असे प्रदर्शन जगापुढें करण्यासाठीं १८७७ च्या जानेवारींत दिल्लीला एक मोठा दरबार भरवून हिंदुस्थानच्या गुलामगिरीचें अथवा राजनिष्ठेचें प्रदर्शन ब्रिटिश मुत्सद्यांना करावयाचे होते; व या दरबारांत इंग्लडच्या राणीला " हिंदुस्थानची सम्राज्ञी " अशी पदवी अर्पण करावयाची होती. हिंदुस्थानचे दरिद्री शेतकरी दुष्काळांत अन्नान्न करून मरत असताना हिंदुस्थानचे द्रव्यबल व मनुष्यबल याचें भव्य वैभव ब्रिटिश साम्राज्याच्या सम्राज्ञीच्या पायाशीं लोळत आहे, अशी जगाची खात्री त्याना या दरबाराच्या भपक्यानें करून द्यावयाची होती ब्रिटिश हिंदुस्थान तेवढाच ब्रिटिशांनीं जिंकला असून संस्थानी हिंदुस्थान अद्यापि स्वतंत्र आहे अशी कल्पना जगातील इतर देशांत जिवंत होती. आणि १८५७ सालच्या बंडानतर काढिलेल्या जाहीरनाम्यांत संस्थानिकांचे तद्दांतील हक्क अबाधित आहेत व ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजाजनांना ब्रिटिश नागरिकांचे हक्क प्राप्त झाले आहेत, अशी कल्पना हिंदी लोकांत पसरूं लागली होती ही कल्पना भ्रामक असून इंग्लडची राणी ही केवळ ब्रिटिश हिंदुस्थानचीच नव्हे, तर अखिल हिंदुस्थानची सम्राज्ञी आहे आणि ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रजाजन हे स्वतत्र नागरिक नसून जित प्रजाजन ऊर्फ ब्रिटिश राणीचे गुलाम आहेत, असें

"भारतीय सम्राज्ञी" या पदवीने जगाला उद्घोषित करण्यांत यावयाचे होतें. बिस्मार्क या जर्मन मुत्सद्यानें प्रशियाच्या राजांना जर्मनीचे सम्राट् बनवून जर्मन सस्थानिकांचा दर्जा कमी केला, त्याप्रमाणेच डिझ्रायलीच्या या समारभाने व पदवीदानाने हिंदी सस्थानिक ब्रिटिश राणीचे अंकित असल्याचें जाहीर होणार होतें

या वेळीं व्हिक्टोरिया ही ब्रिटिश नागरिकाची राणी, पण हिंदी प्रजेची 'सम्राज्ञी' असा भेदभाव निर्माण करून हिंदी प्रजेला स्वातन्त्र्याचे हक्क मिळणार नाहींत असें आम्ही जाहीर करीत आहों, असा ग्लॅडस्टन यानी आक्षेप घेतला. या व इतर आक्षेपांना उत्तर देतांना डिझ्रायली यानीं असे सांगितले, कीं केवळ नवी पदवी घेतल्यानें संस्थानिकांच्या दर्जात बदल होत नाहीं! अशा प्रकारे १८५७ च्या बडानंतर वीस वर्षाच्या आत राणीच्या जाहीरनाम्यातील अभिवचनाना हरताळ फासण्याचा समारभ दिल्लीला भपकेदार दरबार भरवून करण्यात आला आणि जर्मन साम्राज्य-वादाच्या जन्माच्या वेळींच ब्रिटिश साम्राज्याचें वैभव जगाच्या प्रदर्शनात मांडण्यांत आले! इग्लंडातील लिबरल पक्षाचे लोक नेपोलियनच्या पराभवानतर साम्राज्यासंबधीं उदासीन बनले होते. जगांतील व्यापारी साम्राज्य टिकविण्यास राजकीय साम्राज्याची आवश्यकता आहे याची त्यांना विस्मृति झाली होती आणि आपल्या साम्राज्यांत आलेले एक एक देश सुधारून हळूहळू स्वतंत्र बनतील, पण ते स्वतंत्र बनले तरी त्यामुळे आपल्या व्यापारी साम्राज्यास धक्का लागणार नाहीं, असा वेदान्त ते बोलत होते हा वेदान्त एका बाजूस ठेवून आपले व्यापारी साम्राज्य टिकवावयाचें असेल, तर आपले राजकीय साम्राज्यहि टिकविले पाहिजे व वाढविलें पाहिजे, असा उघड पुरस्कार करणारा साम्राज्यवाद इग्लंडात सरसावूं लागल्याचेंच हा दरबार हे प्रदर्शन होते.

अशा वेळीं पुण्यातील सार्वजनिक सभेने एक महत्त्वाचे कार्य केले ते म्हणजे या दिल्ली-दरबारास आपल्या तर्फें एक प्रतिनिधि पाठवून भारतीय सम्राज्ञीला एक मानपत्र समर्पण केलें आणि या मानपत्रांत हिंदी जनतेचे हक्क आणि हिंदी राष्ट्राच्या अंतःकरणांतील राजकीय आकाक्षा राजनिष्ठ पण स्पष्ट भाषेंत राज्यकर्त्यांना तिने सादर केल्या या वेळीं जमलेल्या सर्व प्रातांतील लोकप्रतिनिधींपुढे व राजेरजवाड्या-पुढे तिच्या प्रतिनिधीने अखिल भारतीय ऐक्याची, हिंदी पार्लमेंटची कल्पना मांडिली आणि निरनिराळ्या प्रांतांतून आलेल्या राजकीय कार्यकर्त्यांना राष्ट्रीय सभेची कल्पना सुचविली. हे मानपत्र समर्पण करण्यासाठी पुण्यांतून खादी-वेषधारी सार्वजनिक काकांची रवानगी करण्यांत आली होती व त्यानीं तें कार्य फार उत्कृष्टपणें पार पाडिलें. या वेळीं सार्वजनिक सभेनें अर्पण केलेल्या मानपत्रांतील अखेरचा भाग पुढीलप्रमाणें आहे:

## ब्रिटिश राष्ट्राशीं समान दर्जा व जबाबदारीचे हक्क

"हिंदी राज्यकारभाराची सुधारणा आम्हांला कशी हवी आहे, याचें हें दिग्दर्शन

आहे 'सम्राज्ञी' ही पदवी धारण करण्याच्या प्रसंगीं हिंदी लोकांना नवे राजकीय हक्क देऊन या राष्ट्रांतील राज्यसंस्थांच्या विकासाच्या नव्या युगाला प्रारंभ करा, **हिंदी लोकांना ब्रिटिश राष्ट्राच्या बरोबरीचा राजकीय व सामाजिक दर्जा प्राप्त करून द्या, आणि जबाबदारीचे हक्क उपभोगून हिंदी लोकांना स्वावलंबी व पुरुषार्थी बनण्याचे शिक्षण द्या.** आपण 'सम्राज्ञी' हा किताब घेतला ही गोष्ट आम्हास भविष्यकाळात प्राप्त होणाऱ्या व आपणांपाशीं साठवून ठेवलेल्या आमच्या सुखाच्या ठेव्याचे पूर्वचिन्हच होय असे आम्ही समजतों याच-करितां ईश्वराजवळ आमची प्रार्थना आहे, कीं आपणाला दीर्घायुष्य लाभो व इंग्लंड आणि हिंदुस्थान याच्यामध्ये उत्पन्न झालेले वात्सल्याचे संबंध वाढत जाऊन दृढ होवोत"

हे मानपत्र अर्पण केल्यानंतर काकांनीं तेथे जमलेल्या राजेरजवाड्यास उद्देशून भाषण केले त्यांत तेथे जमलेल्या इतर मंडळींस उद्देशून पुढील भावना व्यक्त केल्या.

"इंग्रज सरकारने उंची पदवीचे, थोर घराण्याचे, श्रीमान्, विद्वान्, औदार्य-संपन्न, लोकहिताविषयीं उत्सुक, धर्मसंबंधीं महत्त्व पावलेले, फार दिवस उत्तम कामगिऱ्या बजावलेले, असे हिंदुस्थानांतील सर्व भागातील गृहस्थ, याना दरबारास आमंत्रणे करून मान दिला आहे, म्हणजे सर्व राष्ट्रास मान दिला आहे तेव्हां हल्लीं सर्व जातींच्या व धर्मांच्या लोकाचा व त्यांच्या मुखत्यारांचा जमाव होण्याचा जो प्रसंग आला आहे, तो एकदर राष्ट्राला फार महत्त्वाचा आहे आणि तो पुढे इति-हासांत त्या सर्वांचे ऐक्य होण्यासच काय, तर हिंदुस्थानच्या राष्ट्रीय पुनरुज्जीवनाचा आरंभ झाल्याचा सूचक म्हणून मानला जाईल... आपण या राष्ट्रांतील थोर व प्रसिद्ध पुरुष आहांत तसेच हिंदुस्थानातील एकत्र राष्ट्राचे पार्लमेंट आहां त्याच-प्रमाणें हिंदुस्थानातील सर्व संस्थानाची व राष्ट्राच्या राजकीय संबधांची सभाच आहां तेव्हा आता हा जो जमाव जमला आहे, तो पुढे हिंदुस्थानचा व इंग्लंडचा कधींहि न सुटण्यासारखा संबंध झाल्याच्या योगाने जगामध्ये ज्या मोठ्या गोष्टी होणार आहेत, त्यांचा केवळ प्रारंभ आहे" अशाच अर्थाचीं पत्रें त्या वेळीं निर-निराळया पुढाऱ्यांना पाठवून राष्ट्रीय सभेची कल्पना पुण्याच्या सार्वजनिक सभेने लोकांपुढे मांडिली असे कै. मंडलीक यांच्या चरित्रात लिहिलें आहे नुकतेच आय्. सी एस् मधून निवृत्त झालेले कलकत्त्याचे बाबू सुरेंद्रनाथ हे या वेळीं दिल्लीस आले होते व या दरबाराच्या वेळींच आपणास राष्ट्रसभेची कल्पना प्रथम सुचली, असे त्यांनींहि म्हटले आहे *

अशा प्रकारें डिझ्रायली आणि लॉर्ड लिटन यांनीं जो दरबार आपल्या अनियंत्रित व अबाधित साम्राज्यसत्तेचें प्रदर्शन करण्यासाठीं भरविला, त्याच दरबाराची संधि साधून पुण्यातील मुत्सद्यानीं अखिल भारतीय संयुक्त राज्य,

* Indian National Evolution, P 32-33 by A C Mujumdar

जबाबदारीचे हक्क, ब्रिटिश राष्ट्राच्या बरोबरीचा दर्जा आणि हिंदी पार्लमेंट वगैरे भावनांचे बीज हिंदी लोकांच्या अतःकरणांत रोविलें ! अशा प्रकारें हिंदुस्थानांत साम्राज्यनिष्ठेंतून जन्मास आलेलें एक सनदशीर राजकारण प्रथम संचार करूं लागलें. ब्रिटिश सरकार जर आपल्या साम्राज्याचें वैभव व्यक्त करण्यासाठीं सर्वांना एकत्र आणू शकते, तर लोकांच्या वतीने सरकारकडे दाद मागणाऱ्या निरनिराळ्या प्रांतांतील पुढाऱ्यांनीं या साम्राज्यनिष्ठ सनदशीर राजकारणासाठीं एकत्र कां जमू नये, असा विचार तेथें जमलेल्या लोकाना साहजिकच सुचला. पण या विचाराला अंकुर फुटण्यास आणखी सात-आठ वर्षे जावीं लागलीं आणि कांहीं गोरे अधिकारी व खुद्द व्हाइसरॉय यांच्या सहानुभूतीचे जलसिंचन या बीजांवर व्हावे लागलें. ही सहानुभूति का व कशी मिळाली व तें जलसिंचन कोणत्या प्रकारें झालें, त्याचा विचार पुढील प्रकरणीं करावयाचा आहे

न्यायमूर्तींनीं हे जें सनदशीर साम्राज्यनिष्ठ राजकारण रचिलें, त्याचें स्वरूप वरकरणीं ब्रिटिश राजकारणासारखेंच दिसत होते. १८५८ सालचा राणीचा जाहीरनामा यालाच "मॅग्नाचार्टा" कल्पून या राजकारणाचा पाया घालण्यांत आला होता, आणि इंग्लंडांत ज्याप्रमाणें सरदारवर्गापासून शेतकऱ्यापर्यंतचे सर्व वर्ग एका निशाणाखालीं येऊन आपल्या हक्काची मागणी राजनिष्ठ शब्दात राजापुढें माडीत असत, त्याचप्रमाणें हिंदी सरदारापासून शेतकऱ्यापर्यंत सर्व वर्गाच्या हक्कांची मागणी राजनिष्ठ शब्दांत न्यायमूर्तींनीं भारतीय सम्राज्ञीच्या प्रतिनिधीपुढे दरबारी भाषेंत या मानपत्राच्या द्वारें मांडली आहे पण हे सर्व ब्रिटिश सरदार आणि प्रजाजन यांच्या वरपांगी राजनिष्ठेचे निर्जीव अनुकरण होते. इंग्लिश सरदारांची व प्रजेची राजनिष्ठा व त्यांनीं अवलंबिलेला सनदशीर मार्ग आणि न्यायमूर्तींनीं व त्यांच्या अनुयायांनीं हिंदुस्थानांत रुजविण्याचा प्रयत्न केलेली राजनिष्ठा व सनदशीर राजकारण यांत जमीनअस्मानाचे अतर आहे ब्रिटिश सरदारानीं जॉन राजाचा रणांगणांत पराभव करून त्याच्याकडून मॅग्नाचार्टा लिहवून घेतला होता इतकेंच नव्हे, तर त्यानें हा करार मोडल्यास त्याला राज्यावरून काढून टाकण्याचाहि हक्क आपणांस आहे, असे ब्रिटिश सरदारांनीं त्याजकडून लिहवून घेतलें होते. "हा करार जर मीं पाळला नाहीं तर तुम्हीं माझ्याविरुद्ध बंड करावें, माझें सर्व राज्य घ्यावें, मात्र माझ्या व माझ्या कुटुंबियांच्या जिवाला धक्का लावूं नये व मीं पुनः करार अमलांत आणिल्यास माझें राज्य मला परत द्यावें," अशा अर्थाचे एक स्पष्ट कलम या करारांत होतें. इंग्लिश राज्यघटनेचा सुप्रसिद्ध इतिहासकार टॅस्वेल लॅंगमीड लिहितो: "या योजनेमुळें जॉननें आपल्या सर्व प्रजाजनांना एका मर्यादित स्वरूपांत बंड करण्याचाच अधिकार देऊन टाकिला जर राजानें अगर त्याच्या अधिकाऱ्यांनीं या कराराविरुद्ध यत्किंचित् वर्तन केलें, तर सर्व सरदारांनीं पंचवीस सरदारांचे एक मंडळ नेमावें आणि या मंडळानें आपली सर्व शक्ति खर्च करून करारांतील अटी पाळल्या जातील

अशी व्यवस्था करावी या मडळानें किंवा त्यांच्यापैकीं चौघांनीं प्रथम राजाकडे तक्रार करावी किंवा राजा नसेल तर न्यायाधिकाऱ्यांकडे तक्रार करावी व आपलीं गाऱ्हाणीं तात्काल दूर करण्याची विनाति करावी. जर या तक्रारीवर चाळीस दिवसांत कांहीं उपाय योजण्यांत आले नाहींत, तर या पचवीस सरदारांनीं सामान्य प्रजाजनांच्या साह्याने सर्व प्रकारे आमची सपात्ति जप्त करावी आमचे किल्ले, आमची मालमत्ता, आमच्या जमिनी जप्त करून किंवा दुसऱ्या कोणत्याहि प्रकारे आपल्या इच्छेप्रमाणें आपल्या तक्रारी दूर होईपर्यंत आमच्यावर सक्ती करावी मात्र आमच्या राणीच्या व आमच्या मुलाच्या शरीराला धक्का लावू नये आणि सर्व तक्रारी दूर झाल्यावर पुनः आमच्या आज्ञा पूर्ववत् पाळू लागावे आम्हीं दिलेलीं वचनें पाळण्यासाठीं आमच्यावर हे पंचवीस सरदार जी सक्ती करतील, तींत देशांतील कोणत्याहि मनुष्यानें सामील व्हावे आणि आपण या सरदारांशीं एकनिष्ठ राहू व ते देतील त्या आज्ञा पाळू, अशी शपथ घ्यावी. अशी शपथ घेण्यास आम्ही मोकळया मनानें व राजीखुषीनें मोकळीक देत असून तशी शपथ घेण्यास आम्हीं कोणासहि प्रतिबंध करणार नाहीं."*

पण ब्रिटिश सरदार एवढ्यावरच थाबले नाहींत. जॉन राजानें यानंतर जेव्हां हा करार मोडला आणि त्याना या कलमाप्रमाणें वागून आपल्या हक्काचें रक्षण करणेहि कठिण झालें, तेव्हां ते याच्याहि पुढे गेले व फ्रान्सचा राजा लुई याला आपल्या राज्यावर येऊन बसण्याची त्यांनीं विनंति केली. तेव्हां तो सरदाराच्या अटी मान्य करून आपले सैन्य घेऊन इग्लडात येऊन दाखलहि झाला पण इतक्यांत जॉन राजा मेला व हे भाडण थोडक्यांतच मिटले ब्रिटिशांच्या सनदशीर राजकारणाचें व राजनिष्ठेचें स्वरूप असे असून त्यांनीं मिळविलेल्या मॅग्नाचार्टाचा इतिहास हा असा आहे.

न्यायमूर्तिप्रभृति आमचे राजकीय पुढारी ज्याला 'मॅग्नाचार्टा' म्हणून गौरवीत होते, त्याचा इतिहास व स्वरूप याच्या अगदीं उलट होते ब्रिटिश मॅग्नाचार्टा विजयशाली सरदारांनीं पराभूत राजाकडून लिहून घेतलेला करार असून तो मोडल्यास राजाचें पारिपत्य करण्याची स्पष्ट योजना त्यात ग्रथित झालेली होती व ही उपाययोजना अमलांत आणण्याची शक्ति ब्रिटिश सरदारांपाशीं भरपूर होती राणीचा जाहीरनामा हा बंडखोर सैनिकांचे कबरडे मोडून विजयशाली झालेल्या राणीनें आपल्या राजनिष्ठ प्रजेला व दुर्बल सस्थानिकांना दिलेलें कोरडें आश्वासन होते. या आश्वासनाला कायदेशीर कराराचे निश्चित स्वरूप नसून ते मोडणाऱ्या राज्यकर्त्यांना शासन करण्याचा उपाय किवा ताकद, ज्यांना तें आश्वासन दिले होते, त्यांच्यापाशीं मुळींच नव्हती परंतु अश्वत्थामा आपल्या आईनें दिलेले पिठाचें पाणी दूध म्हणून पीत असे, त्याप्रमाणें लोकसत्ताक राजकारणात मागासलेल्या हिंदी राष्ट्रांतील एकोणिसाव्या शतकांतले बाल मुत्सद्दी या राणीच्या जाहीरनाम्याला आपल्या हक्कांची मोठी सनद समजत होते! आपल्या राजकीय मागणीपाठीमागें शक्ति असावी लागते, याची जाणीव

* History of the English Constitution, P. 121-22 by Taswell Langmead

राष्ट्रसभेंतील राष्ट्रीय पक्षाला १९०५ च्या नंतर होऊं लागली. तेव्हां या नव्या राष्ट्रीय पक्षाला राजकारण मुळींच कळत नाहीं असे म्हणून तिचे वृद्ध प्रागतिक पुढारी त्याला अवहेलनापूर्वक तुच्छतेने वागवू लागले. आपलें बहुमत करून राष्ट्रसभा आपल्या पक्षाच्या हातीं आणण्याचा प्रयत्न या नव्या पक्षानें केला, तेव्हां त्याला बाहेर हांकलून देण्यांतच आपल्या राजकीय मुत्सद्देगिरीचा विजय आहे, असे त्यांनीं मानिलें.

## सशस्त्र क्रांतीचा विफल प्रयत्न

पण या वेळींहि हे सनदशीर राजकारण निष्फळ आहे असे ओळखून सशस्त्र बंडाचें भावनाप्रधान पण अशास्त्रीय व अतएव अव्यवहार्य राजकारणाचे खेळ खेळणारे कांहीं तरुण होते त्यांचें नेतृत्व स्वीकारून कै वासुदेव बळवत फडके यांनीं १८७६ च्या दुष्काळांत सुरू झालेल्या शेतकऱ्यांच्या दग्यांचा फायदा घेऊन नगर, नाशिक, खानदेश येथील रामोशी व भिल्ल लोकांच्या साहाय्याने लोकसत्ताक राज्यस्थापनेचा एक प्रयत्न, शिवाजीमहाराजांच्या नांवाने केला या दग्यांचा उपद्रव पुण्यापर्यंत येऊन ठेपला आणि एके दिवशीं तर बुधवारवाड्यासहि आग लागली! वस्तुतः या आगीचा सबंध वासुदेव बळवतांच्या बडाशीं मुळींच नव्हता आणि सार्वजनिक सभेचे पुढारी न्या रानडे व सार्वजनिक काका यांचाहि वासुदेव बळवंतांशीं कांहीं संबध नव्हता पण सरकारला या सर्व गोष्टी एकाच सूत्रांत गोविल्यासारख्या वाटल्या आणि मुंबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेपल यांना हें सर्व कारस्थान न्यायमूर्तींनींच रचले असून वरून राजनिष्ठ राजकारणाचे सनदशीर फासे टाकणारा हा पुण्यांतील ब्राह्मणांचा व दक्षिणेतील सरदारांचा बुद्धिमान् पुढारी ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याचा गुप्त कट रचीत असावा, असा सशय आला! यामुळे न्यायमूर्तींची बदली ताबडतोब प्रथम नाशकास व धुळयास झाली व नंतर काहीं काळ त्यांच्या पत्रव्यवहारावरहि गुप्त पोलिसांची पाहणी सुरू झाली पण त्यात काहींच निष्पन्न झालें नाहीं वासुदेव बळवंत यांच्यावर रीतसर खटला होऊन त्यांना काळया पाण्याची शिक्षा झाली. त्यांची वकिली मात्र सार्वजनिक सभेचे पुढारी सार्वजनिक काका यांनी केली. यातहि त्यांनीं एक प्रकारे अलौकिक धैर्य दाखविलें, असेंच त्या वेळचें लोकमत होते. फडके यांनीं जें राजकारण केलें ते चुकीचें असले, तरी ते देशभक्त आहेत व म्हणून त्यांची वकिली करण्यासाठीं मला कोणी फांसावर चढविलें तरी त्याबद्दल मला खेद होणार नाहीं, असे उद्गार या वेळीं काकांनीं काढिले होते अशी आख्यायिका आहे *

## सार्वजनिक काका व अखिल भारतीय राजकारण

यानतर थोड्याच दिवसांत (१८८०) सार्वजनिक काका निवर्तले आणि

* सार्वजनिक काका याचे चरित्र ले बोरवणकर, पृ. ५९-६०.

पुण्यांत एक नव्याच विचारसंप्रदायाचा पक्ष पुढे येऊं लागला. त्याचा विचार करण्यापूर्वी आपणांस याच राजकारणांतून निर्माण झालेल्या राष्ट्रसभेच्या स्थापनेचा व तिच्या पहिल्या धोरणाचा इतिहास समजून घ्यावयाचा आहे तो इतिहास सांगण्या-पूर्वी सार्वजनिक काकांच्या एक-दोन कामगिऱ्यांचा निर्देश करून हें प्रकरण संपवूं. लॉर्ड लिटन यांनीं वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचा एक कायदा केला होता. त्याचा निषेध करण्यासाठीं मुंबईस वृत्तपत्रकारांचें एक संमेलन भरविण्याचें कार्य काकांनीं केलें तसेंच असे एक संमेलन कलकत्त्यासहि भरविलें होतें, त्यास काका हजर राहिले. या संमेलनाचे नेतृत्व बाबू सुरेंद्रनाथ यांनीं स्वीकारिले होते. यानंतर असेच एक समेलन पंजाबांतहि भरविण्याचा प्रयत्न काकांनीं केला, पण तो सफल झाला नाहीं.

याहिपेक्षा एक प्रकारे विशेष महत्त्वाची अशी गोष्ट करण्याची विलक्षण कल्पना या वेळीं काकांच्या डोक्यांत आली ती म्हणजे अफगाणिस्तानच्या अमीराशीं दर-बदली करून युद्ध टाळण्याचा व त्याचा ब्रिटिश सरकाराशीं स्नेह घडवून आणण्याचा प्रयत्न करण्यास आपण तयार आहो व त्यासाठीं अफगाणिस्तानात जाण्यास आपणास परवानगी द्यावी, असा अर्ज काकांनीं हिंदुस्थान सरकारकडे केला या वेळीं ब्रिटिशांचा वकील अफगाण अमीरानें अटक करून बंदींत ठेविला होता. अशा वेळीं अफगाणि-स्तानांत जाऊन ब्रिटिशांची वकिली करण्यांत जसे धैर्य व्यक्त होत होते, तसेंच आम्ही आपल्या देशाचे परराष्ट्रीय राजकारण योग्य प्रकारे बजावूं शकतो, असा एक आत्मविश्वासहि त्यांत व्यक्त होत होता पण या धैर्याला आणि आत्मविश्वासाला पोसू देण्याची इच्छा ब्रिटिश सरकाराला नसल्यामुळें आणि पुण्याच्या ब्राह्मणाच्या हातीं अफगाणिस्तानचें राजकारण देण्यांत त्यांना धोका वाटत असल्यानें त्यांनीं काकांच्या राजनिष्ठेबद्दल अभिनंदन करूनच त्यांचे आभार मानिले; व अफगाणि-स्तानावर चाल करून जाण्याचें आगाऊच ठरविले असल्याने त्यांनीं आपला तो बेत सिद्धीस नेला

६

# राष्ट्रसभेचा उद्भव आणि प्रचार

" Within less than twenty years after the great mutiny the nationalist movement of India was born almost at the same time and place at which Lord Lytton was presiding at the great Imperial Darbar and announcing that the great Queen of England was assuming the title of Empress of India "

— *Lala Lajpatrai 'Youag India' p. 124.*

**इ**सवी सन १८७५ पासून हिंदुस्थानच्या इतिहासांत एक नवी शक्ति निर्माण झाली हिंदुस्थानांतील निरनिराळया प्रांतांचा इतिहास अवलोकन केला, तर या

सुमारास कांहीं महत्त्वाच्या घडामोडी घडून येत असल्याचें दिसते. मागील प्रकरणांत पुण्यांतील सार्वजानिक सभा, सार्वजानिक काका, न्या रानडे वगैरेंच्या लोकजागृतीच्या कार्याची माहिती दिली पण यापेक्षांहि अधिक महत्त्वाची अशी दुसरी गोष्ट या सुमारास पुण्यांत घडून आली व ती म्हणजे इ स १८७४ च्या जानेवारींत कै विष्णुशास्त्री चिपळूणकर याची "निबधमाला" सुरू झाली ही होय निबधमालेच्या पहिल्याच अकात "मराठी भाषेची साप्रतची स्थिति" हा नव्या जोमाचा देशाभिमानाने ठासून भरलेला असा लेख प्रसिद्ध झाला त्यांत ते म्हणतात: "जी भाषा बोलणाऱ्यांनीं दिल्ली-अटकेपर्यंत आपले झेडे नेऊन लाविले, जींत तुकाराम-रामदासासारख्या भगवत्परायण साधूनीं आपले श्रुतिवद्य अर्थ ग्रथित केले, जीस मुक्तेश्वर, वामनपडित, मोरोपत इत्यादि कवींनीं आपल्या रसाळ व प्रासादिक वाणीने संस्कृत भाषेचीच प्रौढी आणिली, त्या भाषेस आवेश, गांभीर्य व सरसता या गुणांकरितां कोणत्याहि अन्य भाषेच्या तोडाकडे बघण्याची खास गरज नाहीं, अशी आमची खात्री आहे" यानंतर मराठी भाषेवर इग्रजी भाषेचे जे आक्रमण या वेळीं चाललें होते, त्यास उद्देशून शास्त्रीबुवा म्हणतात : "हा अनर्थ होतां होतां इतका भयकर होणार आहे, कीं शेवटीं त्याचे अनर्थत्वच नाहींसे होऊन, आपल्या भाषेस इग्रेजी विद्येपासून व भाषेपासून लाभ झाला या शब्दांतच कांहीं अर्थ राहणार नाहीं. कारण जर सध्यांप्रमाणें इग्रेजी शब्दाची व रचनेची आपल्या भाषेत सतत भेसळ होत गेली—आणि जर कांहीं प्रतिबधक कारण न झालें तर असेच होणार हें कोणीहि सांगेल !—तर तिचे रूप पालटतां पालटता असें होईल, कीं ती इग्रेजीपासून निवडतां येणार नाहीं, व तिच्या मूळच्या रूपाचा मागमूसहि राहणार नाहीं मग असे झाल्यावर 'आपल्या भाषेस असे असे लाभ झाले' असें म्हणतांना 'आपल्या' या शब्दांत काहीं अर्थ राहिला काय? तसेच, मराठीस वर सांगितलेली सरूपता मुक्तीच मिळाल्यावर तिचा आधींचा देह कोठे राहिला? व म्हणूनच अनर्थ तरी कसचा? वास्तव मोक्षमुल्लर साहेबांनीं आपल्या देशातील लोकांस जो धर्माच्या बाबतींत उपदेश केला आहे, तोच आम्ही एतद्देशीय भाषाविषयीं त्यांस करितों. म्हणजे जर आपण सर्व इग्रेज व खिस्ती बनलो, तर आपला आपलेपणा अर्थातच समूळ विनष्ट झाला, मग आमच्या देशाचे आम्हीं पुनरुज्जीवन केलें हे शब्द सहज विगतार्थ झाले! त्याप्रमाणेंच जर मराठी भाषा होतां होतां इग्रेजीच बनली, तर आपल्या लोकांचा तींत ग्रथ लिहिल्याचा आटाट सर्व केवळ व्यर्थ झालासें होईल" या उताऱ्यात स्वभाषेसबंधीं जे उद्गार काढले आहेत, तेच 'स्वधर्म' आणि 'स्वदेश' याना लागू केले म्हणजे शास्त्रीबुवांच्या निबधमालेच्या सप्तवार्षिक कार्यानें महाराष्ट्रांत कोणती विचारक्रांति घडवून आणली, त्याची यथार्थ कल्पना होणार आहे निबधमालेच्या अखेरच्या म्हणजे ८२ व्या अंकांत शास्त्रीबुवा लिहितात : "वरील तहकुबीचें दुसरें कारण असे आहे, कीं ज्या उद्देशाने प्रकृत निबधरचनेस आम्ही प्रवृत्त झालों, तो

आतां पुष्कळ अशीं सिद्धीस गेला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं आठ वर्षांपूर्वी 'आमच्या भाषेची स्थिति' या विषयावर आम्हीं प्रथमतः लेखणी धरली, त्य काळांत आणि आजच्यांत वरील विषयाच्या संबंधानेंच काय, पण एकंदर लोक· स्थितीच्या संबंधानें पाहतांहि पुष्कळच फरक पडला आहे. त्या वेळची व त्याच्य पूर्वीची स्थिति म्हटली म्हणजे अशी होती, कीं जे नवीन विद्वान् देशोन्नतीचे सुकर्णधार म्हणून म्हणविलेले त्यांनीं कागदास मराठी लेखणीचा टाक म्हणून कधीं लावायचा नाहीं, आपल्या देशाच्या इतिहासाची वगैरे माहिती म्हटली म्हणजे कांहीं अप्रयोजक इंग्रेज ग्रंथकारांच्या प्रसादाने जी त्यांस कधीं काळीं मिळाली असेल तेवढी, त्याप्रमाणेच लोकहितवादींना ज्या मतांचा आपल्या 'निबधसग्रहा'त जागोजाग उल्लेख केलेला आहे त्यांचा सार्वत्रिक प्रचार आणि इंग्रेजी ग्रंथकारांच्या पेनांतून उतरलेले म्हटले म्हणजे तें ब्रह्मवाक्यच, त्यांत असत्य म्हणून लेशमात्रहि असावयाचे नाहीं, ही बळकट समजूत! ही परम शोचनीय स्थिति उत्तरोत्तर अगदीं पालटत चालली आहे हे पाहून कोणासहि सतोष वाटल्यावांचून राहणार नाहीं. तर आमचे देशबधू जे वर सागितल्याप्रमाणे अगदींच बहकून गेले होते, त्यांस ताळ्यावर आणण्याचा संकल्प योजून आम्हीं कलम हातात धरलें होते. ते आता जरी खालीं ठेवले तरी हरकत नाहीं, असे आम्हांस वाटते." अर्थात् स्वभाषा, स्वधर्म, स्वसमाज व स्वदेश यांसबंधीं ही जी सुशिक्षित वर्गाच्या वृत्तींत क्रांति होऊं लागली होती, ती सर्वस्वीं निबधमालेतील लेखांनींच झाली होती असा या लेखाचा अभिप्रेत अर्थ आहे, असे समजण्याचे कांहींच कारण नाहीं

हा लेख शास्त्रीबुवांच्या निधनानंतर त्यांच्या बंधूनीं प्रसिद्ध केला असून तो शास्त्रीबुवांचा अखेरचा लेख आहे शास्त्रीबुवा इ स. १८८२ च्या १७ मार्च रोजी मरण पावले या वेळीं त्यांनीं टिळक व आगरकर यांच्या साहाय्यानें न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना करून 'केसरी' व 'मराठा' वर्तमानपत्रे सुरू केलीं होतीं. याशिवाय 'चित्रशाळा', 'किताबखाना' वगैरे संस्थाहि त्यानीं सुरू केल्या होत्या. चिपळूणकर, आगरकर आणि टिळक यांनीं या वेळीं महाराष्ट्रांत एक नवे युग प्रवर्तित केलें होते.

## अखिल भारतांत नवें युग

याच प्रकारच्या नवयुगाचा अरुणोदय बंगाल, पंजाब व मद्रास या प्रांतांत या वेळीं होत होता बगालमध्यें १८७६ त बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांची सरकारी नोकरी सुटल्यानंतर कलकत्त्यास 'इंडियन असोसिएशन' नांवाची राजकीय संस्था बाबू आनदमोहन बोस यांच्या सहकार्यानें त्यांनीं स्थापन केली याच्या पूर्वी १८५१ च्या सुमारास ब्रिटिश इडियन असोसिएशन नांवाची एक राजकीय सभा कलकत्त्यास स्थापन झाली होती, पण ती आतां मागें पडून 'इडियन असोसिएशन'

पुढें आली पहिल्या सभेंत बगालमधील जमीनदार-वर्गाचें प्रामुख्य होतें, तर दुसरींत इग्रजी सुशिक्षित वर्गाचे प्राधान्य होतें या दुसऱ्या संस्थेचे चालक लोकजागृति, राजकीय चळवळ यांवर जोर देत असत, तर पहिली सस्था सरकारकडे अर्ज करण्या-वर सर्व भर देई. बाबू सुरेंद्रनाथ हे १८७६ साली कलकत्त्यास जोसेफ मॉझिनीच्या चरित्रावर बोलतांना म्हणतात :

" We do not want many political associations whose only concern would be to heap cart-loads of pititions on the devoted heads of our Government officials. On the contrary, let us have political associations on the model of the Catholic Associations of Daniel O'cconell. How was it that the great Irish liberator wrung from unwilling Parliament and an unwilling minister the great boon of Catholic Emancipation Bill ? It was certainly not by deluding Parliament or the Lord Lieutenant with pititions, but by creating a deep and an ardent feeling in the minds of his countrymen in favour of the Bill. Let our political associations seriously set themselves to the task of educating public opinion; and then, I say, they will supply a real want and discharge an important public duty." §

बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं १८७९ मध्यें बगाली पत्र आपल्या हाती घेतलें, १८८२ मध्ये त्यांनीं एक लहानसें विद्यालय आपल्या हातीं घेतलें व त्यांतूनच पुढे त्यांनी रिपन कॉलेज या संस्थेची स्थापना केली सुरेंद्रबाबूंचे हे सर्व उद्योग चिपळूणकर, आगरकर व टिळक यांच्या न्यू इग्लिश स्कूल, फर्ग्युसन कॉलेज, केसरी, मराठा वगैरे उद्योगांशीं समकालीन असेच आहेत. याच सुमारास १८७८ सालीं मद्रासमध्ये ' हिंदु ' या पत्राची स्थापना झाली आणि या पत्राच्या स्थापनेत एम्. वीर राघवाचार्य, रगय्या नायडू, जी सुब्रह्मण्य ऐय्यर आणि एन्. सुब्बाराव पतलु हे गृहस्थ प्रमुख होते पुढे याच लोकांच्या प्रेरणेनें १८८४ सालीं ' मद्रास महाजन सभा ' या नांवाची सस्था आस्तित्वांत आली. याच्या पूर्वी १८५१ च्या सुमारास स्थापन झालेली ' मद्रास नेटिव्ह असोसिएशन ' ही सभा आतां बंद पडली व लौकरच नामशेष झाली.

१८७५ पासून १८८५ पर्यंतच्या काळांत हे जें एक नवचैतन्य राष्ट्रांत निर्माण होत होते, त्याला एक सांस्कृतिक अंगहि होतें. हें सांस्कृतिक अंग म्हणजे भारतीय सस्कृतीच्या श्रेष्ठत्वाचा अभिमान हेच होय. महाराष्ट्र, बंगाल, पंजाब व मद्रास या

§ Speeches of Surendra Nath Bannerji, P. 412-13.

चार प्रांतांत आपल्या भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठत्वाचा अभिमान वाढविणाऱ्या चळवळी या काळांत झालेल्या आहेत. महाराष्ट्रांत या चळवळीचे स्वरूप थोडक्यांत "महाराष्ट्रधर्माचें पुनरुज्जीवन" या नावानें सांगतां येईल बंगालमध्ये रामकृष्ण परमहंसांचे शिष्य स्वामी विवेकानंद यांनीं याच वेळीं भारतीय वेदान्ताची पताका जगभर पसरविण्यासाठीं सन्यासदीक्षा घेतली व पुढें रामकृष्णमिशनची स्थापना केली. पंजाबांत स्वामी दयानद यांनीं स्थापन केलेल्या आर्यसमाजाची शाखा १८७७ सालीं लाहोर येथे रुजली व तिनेच पंजाबात नवजीवन निर्माण केलें मद्रासमध्यें याच सुमारास थिऑसफीचा विशेष प्रचार झाला आणि त्या प्रांतांत राष्ट्रीय स्वाभिमान जागृत करण्याचे कार्य थिऑसफीने केले अशा प्रकारे महाराष्ट्रधर्म, रामकृष्णमिशन, आर्यसमाज आणि थिऑसफी यांच्या आधारें महाराष्ट्र, बगाल, पजाब आणि मद्रास या चार प्रांतांत राष्ट्रीय अभिमानाचें एक नवे युग या वेळीं प्रवर्तित होत होते

या वेळीं सर्व भरतखंडांत ज्या या नव्या स्वाभिमानी युगाचा अवतार होत होता, त्यांतूनच पुढे जहाल राष्ट्रीय राजकारणाचा उदय झाला. पण या जहाल राष्ट्रीय राजकारणाचा उदय प्रथम महाराष्ट्रांत झाला. याचे कारण शोधूं लागल्यास, आपणांस महाराष्ट्रांतील या नव्या जागृतीच्या सांस्कृतिक अगाचा अधिक तपशिलानें विचार करावा लागेल. पण हा विषय आम्हीं पुढील प्रकरणासाठीं राखून ठेविला आहे. या प्रकरणांत फक्त राजकीय चळवळींचाच विचार करावयाचा आहे. या दृष्टीने येथें एवढे सांगितलें म्हणजे पुरे आहे, कीं या वेळीं जे तरुण लोक देशभक्तीचे कंकण हातात बांधून स्वार्थत्यागाने देशसेवेस लागले, त्यांच्या राजकीय विचारात आणि पूर्वीच्या पिढीच्या राजकीय विचारांत फार मोठे अतर पडलेलें दिसून येतें.

## नव्या पिढीचे नवे विचार

या नव्या पिढीच्या विचारांत आणि जुन्या पिढीच्या विचारांत पहिलें मोठें अतर कोणतें पडले असेल, तर तें म्हणजे या तरुण देशभक्तांना आपलें राजकीय पारतंत्र्य नष्ट करणें अत्यत अवश्य आहे याबद्दल तीव्र तळमळ लागली होती व त्यामुळे त्याच्या सर्व विचारांत राजकीय सुधारणेला प्राधान्य मिळू लागले होतें हे होय चिपळूणकरांनीं 'आमच्या देशाची स्थिति' या सुप्रसिद्ध लेखांत म्हटले आहे : "आमच्या प्रस्तुतच्या दैन्याचे मुख्य कारण काय आहे हे कोणालाहि सांगावयास नको. ते परकी अंमल हे होय, हे उघडच आहे. इंग्रज लोक इकडे प्रभु होण्यापूर्वी हा देश संपन्न होता व मुसलमानांची जुलुमी म्हटलेली कारकीर्द सांप्रतच्या सुधार-लेल्या कारकीर्दीहून शभर वाट्यांनीं बरी वगैरे गोष्टी अलीकडे सिद्धांतासारख्या होऊन बसल्या आहेत व प्रत्यक्ष इग्रज लोकहि त्या बोलून दाखवितात, हे आज बहुधा सर्वांस माहीत असेलच. तर आमच्या पाश्चात्य आर्यबधूंचे आधिपत्य हे जर आमच्या विपत्तीचें मोठें कारण होय, तर तें नाहींसें झालें असतां आमची स्थिति

सुधारेल ही अर्थातच कोणाच्या मनांत प्रथमनः मोठी कल्पना येणार आहे ..
आमची अन्नान्नगत झाली आहे, दुष्काळाचा तडाका उडाला म्हणजे लाखो लोकांची
चांदी उडते आहे, सरकारदेण्यासाठीं रयतेचा चुराडा होत आहे, लोकांस आपल्या
सामान्य हक्कांचें व गोष्टींचेसुद्धां ज्ञान नसून त्याच्या अभावीं त्यांची स्थिति पशु-
वर्गासारखी होऊन गेलेली आहे, एवढा हा संपन्न देश असतां, येथील लोकसंख्या
एवढी असतां, लोकांची बुद्धि एवढी प्रखर असतां व आहे तेथे अर्थसचयहि विपुल
असतां, कल्पवृक्षाखालीं उपवास या न्यायाने इतकी प्रजा व्यर्थ हाल सोसत आहे,
— ही स्थिति सर्वांच्या डोळ्यांसमोर आहे, आणि देशोन्नतीचे धुरंधर वरील
विपत्तीच्या प्रतिकारार्थ उद्योग काय करीत आहेत म्हणाल, तर एक आकाशांतील
बापास आरोळी देत आहेत, दुसरे आपल्या लेडीकरवीं कोणा गौरकाय अधिकाऱ्याचे
हस्तपीडनपूर्वक स्वागत करताहेत, कोणी पार्लमेंटच्या गर्दीत गुंग होऊन गेले
आहेत, कोणी अर्वाचीन सोमरसांत तल्लीन होऊन जातिभेदरूप महान् अरिष्टाचा
उपशम होऊन या देशास आराम पडावा म्हणून अर्वाचीन ऋषींचा तांडा जुळवून
गवालंभाचे अनुष्ठान करीत आहेत, कोणी सरकारी अधिकाऱ्यांचे प्रतिदिवशीं
उंबरठे पुजून त्यांच्यापुढे निरतर लांगूलचालन करीत आहेत इ इ ! हा सर्व
प्रकार आम्हांस तर केवळ लज्जास्पद दिसतो ”

केवळ चिपळूणकर यानाच लोकांचें दारिद्य व राजकीय दास्य यांच्या हननास
अग्रस्थान द्यावें असे वाटत होते असे नाहीं, तर आमच्या सामाजिक व धार्मिक
विचारांतहि क्रांति झाली पाहिजे असें प्रतिपादन करणारे आगरकर यानाहि राजकीय
सुधारणेला व तज्जन्य दारिद्यविनाशाला अग्रस्थान दिले पाहिजे, ही गोष्ट मान्य होती.
इतकेंच नव्हे, तर ब्रिटिश राज्यकर्ते आम्हांस केवळ धार्मिक व सामाजिक सुधारणा
करण्यातच गुंतून रहा असा उपदेश करतात, यांत त्यांचा एक राजकीय किंवा
आर्थिक स्वार्थ आहे हेंहि त्यांनीं स्पष्टपणें लोकांपुढें मांडिले आहे. “ फेर जमाबदी
आणि लष्करी खर्च ” या ‘ सुधारका ’तील लेखात ते लिहितात :

“ आमचे परदेशस्थ प्रभु आमच्या सामाजिक आचारांतील गौणत्वें शोधून
काढून तीं दूर करण्याविषयीं आम्हांस मोठीं प्रेमपुरस्सर व्याख्याने देत असतात,
पण त्यांच्या अमलांत ज्या चुका होत आहेत व ज्यामुळें आमचें अतोनात नुकसान
होत आहे, त्याबद्दल टाकाने व तोंडाने आम्ही वर्षेच्या वर्षे त्यांच्यापुढे किटकिट
करीत असलो, तरी ती त्यांना ऐकूं येत नाहीं व ऐकूं आले तरी चुका दूर करण्याचा
धीर त्यांना होत नाहीं. जशा सामाजिक सुधारणा आवश्यक आहेत, तशा राजकीय
सुधारणाहि आवश्यक आहेत. किंबहुना, मागे एका प्रसंगीं ऑ. मि. जस्टिस तेलग
यांनीं अत्युत्कृष्ट रीतीनें प्रतिपादन केल्याप्रमाणें सामाजिक सुधारणांपेक्षांहि राजकीय
सुधारणा विशेष आवश्यक आहेत आणि म्हणून राजकीय सुधारणा सामाजिक
सुधारणांच्या अगोदर झाल्या पाहिजेत सुधारणांचा वास्तविक पाहतां असा क्रम

असून सरकार त्याचा व्युत्क्रम करूं पाहते, हे आश्चर्य नव्हे काय? अथवा हे आश्चर्य कसलें? ह्या वर सांगितल्याप्रमाणें मनुष्यस्वभावच आहे सरकार म्हणून कोणी अशरीरी बागुलबोवा किंवा देवता आहे असे ज्यास वाटत असेल, त्याना या गोष्टीचें आश्चर्य वाटेल तर वाटो; पण सरकार म्हणजे मनुष्यांच्या इतर समुदायासारखाच एक समुदाय आहे, असे ज्यांच्या मनांत नेहमीं वागत असेल, त्यांना आमच्या सरकारची आमच्या सामाजिक सुधारणेविषयीं कळकळ आणि आमच्या राजकीय सुधारणेकडे दुर्लक्ष पाहून मोठेसें नवल वाटणार नाहीं तथापि सरकारी अधिकाऱ्यांनीं ही गोष्ट नेहमीं लक्षात वागविली पाहिजे, कीं स्थिति आणि प्रगति ( Order and Progress ) याच्या अन्योन्य संबधासारखा राजकीय व सामाजिक सुधारणांचा परस्पर-संबध आहे. अगोदर जगणें आणि मग चांगल्या रीतीने जगणें. चैतन्यरक्षण झाल्याशिवाय ते सुखाने घालविता येणे अशक्य आहे. मूळ द्रव्य असल्याशिवाय कारागिरी कोठून येणार? विशिष्ट प्रकारच्या राजकीय व्यवस्था समाजाच्या अस्तित्वाला अत्यावश्यक आहेत, म्हणजे त्या नसल्या तर समाजाची वाताहत होते सामाजिक सुधारणाची तशी गोष्ट नाहीं. त्या समाजास शोभा देतात किंवा विशेष प्रकारचा आनद उत्पन्न करितात. तेव्हां त्या मागून झाल्या तरी चालतील. जातिभेद, बालविवाह, असमत वैधव्य, केशवपन वगैरे दुष्ट चालींपासून आम्हांस पुष्कळ त्रास होत आहे पण मिठावरील जबरदस्त कर, दर तीस वर्षांनीं आमच्या जमिनीच्या बोकाडीस बसणारा रेव्हिन्यू सर्वेचा फेरा व यमोदराप्रमाणे प्रतिवर्षी कोट्यवधि रुपये भक्ष्यस्थानीं पडले तरी फिरून आपलें हपापल्यासारखे करणारे लष्करी खातें, इत्यादिकापासून आम्हास जो त्रास होत आहे, त्यापुढें सामाजिक शोचनीय दुराचारापासून होणारा त्रास काहींच नाहीं असे म्हटलें तरी चालेल. या घटकेस ज्या विधवा वैधव्यदुःख भोगीत आहेत किंवा येथून पुढे आणखी शेंपन्नास वर्षांत ज्याना तें भोगावे लागेल, त्या सर्वांचे दुःख एके ठिकाणीं केले, तरी तें १८७५-७६-७७ सालच्या दुष्काळात जीं साठ लक्ष मनुष्यें अन्नान्न करून मेलीं, त्याच्या दुःखाबरोबर येणार नाहीं अशी आमची खातरी आहे."*

आगरकर यांचे असे मत असूनहि त्यानीं सामाजिक व धार्मिक विचारक्रांतीबद्दल आग्रह कां धरिला होता, त्याची युक्तायुक्तता व विवेचन पुढे येईल येथे एवढेंच दाखवावयाचें आहे, कीं १८८० सालापासून देशांतील सर्व विचारी तरुणमंडळींच्या विचारांत दारिद्र्य आणि दास्य याच्या हननाच्या प्रश्नास आद्य स्थान मिळूं लागले. या बाबतींत चिपळूणकर, आगरकर व टिळक यांच्यांत मतभेद मुळींच नव्हता. लो. टिळक लिहितात : "१८८८ सालापर्यंत 'केसरी'त जे राजकीय विषयांवर लेख आले ते बहुतेक आगरकरांचे आहेत; आणि त्यानंतर 'सुधारका'तहि अशा प्रकारचे बरेच निबंध आले आहेत या सर्वांचें सूक्ष्म निरीक्षण केलें असता असें दिसून येईल,

* निबधसग्रह, भाग २ रा, पृ. ११५-१६.

कीं आगरकर हे पक्के स्वराज्यवादी होते आणि कै. विष्णुशास्त्री चिपळूणकरांप्रमाणें देशातील दारिद्य, परावलंबिता, चांगल्या पुरुषांचा तेजोभंग, गोऱ्या अधिकाऱ्यांची चरणी व वरणी, व्यापारनाश वगैरे राजकीय व औद्योगिक अवनति पाहून त्यांचे चित्त केशवपनादि चालींच्या निरीक्षणापेक्षांहि अधिक सतप्त व दुःखित होत असे व याला मिल्ल आणि स्पेन्सर यांनीं प्रतिपादन केलेल्या स्वराज्याच्या तत्त्वाखेरीज दुसरा उपाय नाहीं, अशी त्यांची पक्की खात्री झालेली होती. मिल्लनें ज्याप्रमाणें आपली लेखणी केवळ स्त्रीस्वातन्त्र्यावरच चालविली नाहीं, तद्वतच आगरकरांची गोष्ट आहे. आणि जो तार्किकपणा समाजसुधारणेसबधाने त्यांच्या अंगीं वसत होता, तोच तार्किकपणा त्यांनीं राजकीय बाबींवरील आपल्या लेखातहि पूर्णपणें उपयोगांत आणला आहे. टिळक आणि आगरकर यांचा जो मतभेद झाला, तो राजकीय बाबतींत किंवा शिक्षणाच्या बाबतींतहि नाहीं. मतभेद धार्मिक व सामाजिक बाबतींत उत्पन्न झालेला होता धर्मदृष्टया आगरकर केवळ बौद्धिकवादी होते आणि तोच पथ सामाजिक बाबतीतहि निदानपक्षीं आपल्या लेखांत त्यानीं स्वीकारला होता.. सुधारणा नको असे 'केसरी'चें म्हणणें केव्हांहि नव्हते, पण केवळ बौद्धिक दृष्टया किंवा तर्कदृष्टया सुधारणेचा विचार करण्यास 'केसरी' तयार नव्हता अर्थात् हीच पद्धत स्वीकारणे असल्यास आगरकरांस दुसरे वर्तमानपत्र काढणें जरूर होतें व तें त्यांनीं काढलेंहि."* लो. टिळकांनीं यांत आपल्या व आगरकरांच्या मतभेदांचें व मतैक्यांचें स्पष्ट आणि तात्त्विक विवेचन केलें आहे व त्यास अनुसरूनच आम्ही ते या पुस्तकांतील पुढील प्रकरणांत करणार आहों. चिपळूणकर हे केसरी काढल्यावर एक वर्ष होतांच वारले. यामुळे या नव्या राष्ट्रीय पक्षाचे राजकीय विचार महाराष्ट्रापुढें मांडण्याचे कार्य प्रामुख्यानें केसरी टिळकाकडे जाईपर्यंत आगरकरांच्याच अंगावर येऊन पडलें होते १८८८ पर्यंतच्या कालांतील केसरींतील निबंध वाचल्यास या नव्या राजकीय विचारांचे स्पष्ट स्वरूप दृष्टोत्पत्तीस येतें

पूर्वीच्या पिढींतील लोकांत इंग्रज व हिंदी लोक यांचे सख्य घडवून आणण्याची जी एक वृत्ति दिसत होती, ती 'केसरी'ला भ्रामक व अनर्थावह वाटत होती. हिंदुस्थानांतील इंग्रज व हिंदी लोक यांच्यांतील सख्य दिवसेदिवस वाढत जाऊन त्यांचा दुजाभाव नष्ट होणार नसून ते उत्तरोत्तर कमी होत जाऊन अखेरीस हिंदुस्थान स्वतंत्र होणार हे ध्येय पुढे ठेवूनच आपण वागलें पाहिजे, ही गोष्ट केसरींतून आगरकरांनीं आग्रहानें प्रतिपादिली आहे.

"ज्याप्रमाणें जड अशा बाह्य सृष्टींत पदार्थांच्या सयोग-वियोगाला त्यांचें समानधर्मत्व किंवा असमानधर्मत्व हीं कारण होतात, त्याप्रमाणेंच चल अशा अतःसृष्टीची गोष्ट आहे. पाषाण आणि काष्ठ, धातु आणि मृत्तिका यांचें जसें समेलन होत नाहीं, त्याप्रमाणेंच अधिकारी आणि अनधिकारी, स्वामी आणि सेवक, सकांचन

* लो. टिळकांचे 'केसरी'तील लेख, भाग ४ था, पृष्ठ ५३४–३५.

आणि निष्कांचन, स्वतंत्र आणि परतंत्र यांची मैत्री जुळत नाहीं. समशीलत्व हे अन्योन्य मैत्रीचें आद्य बीज किंवा अनन्यथासिद्ध आदिकारण आहे स्वभावविपर्यास जेथें झाला, तेथें संघट्टन होण्याची बिलकुल अपेक्षा राहिली नाहीं. वरील वाक्यांचें याथार्थ्य ज्यांच्या लक्षात बरोबर उतरेल त्यांना, युरोपियन आणि नेटिव यांचें परम सख्य कधींहि बनावयाचें नाहीं असें जें आम्ही आग्रहाने म्हणतो, त्याचा चमत्कार वाटणार नाहीं मनुप्रणीत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या वर्णांनीं झालेल्या जातिभेदांपेक्षां पराभवजन्य जो जातिभेद असतो, तो फारच तीव्र असतो दुसऱ्या लाखों गोष्टींमध्यें जरी एकता असली, तरी 'प्रभु-प्रजा' या एका भावाने सर्वांवर विरजण पडून एकजीव होण्याचा संभव नाहींसा होतो " आता याच दृष्टिकोणाचा अवलंब करून ते आपल्या राजकीय भवितव्यासंबंधीं पुढे लिहितात: "कोणतेंहि राष्ट्र कितीहि सामर्थ्यवान् असो, त्यानें अशी घमेंड बाळगू नये, कीं अमुक एक देश मीं जिंकिला आहे, त्याचें स्वामित्व माझ्याकडे निरंतर राहीलच राहील. आतां पराजित देशांतील मनुष्यन् मनुष्य नाहींसा केला तर ती गोष्ट निराळी, पण कोणत्याहि प्रकारे त्यांचें देशत्व मागें राहिलें, तर तें जिंकणाऱ्या राष्ट्राच्या मुळावर आल्याशिवाय कधींहि सोडणार नाहीं.. .. हिंदुस्थान देशाचें ज्ञान आणि धन प्रतिवर्षी वाढत आहेत हें खरें असेल, तर इंग्रज आणि नेटिव यांची उत्तरोत्तर मैत्री वाढत जाणार नाहीं. इतकेंच नाहीं, तर दिवसेदिवस यांच्यांत कलागती लागत जाऊन परिणामीं हातघाईवर काम येऊन ठेपेल व या रीतीने हिंदुस्थानाला आपली मुक्तता करून घेतां येईल असे मानल्याखेरीज प्रत्यवाय नाहीं .. किती जरी झालें, तरी हिंदू लोक धनसंपन्न आणि ज्ञानसंपन्न झाले म्हणजे इंग्रज लोक एके दिवशीं आपलें चंबूगबाळें आटोपून चालते होतील असे कोणींहि मानू नये. राज्यशास्त्राप्रमाणे व ऐतिहासिक अनुभवाप्रमाणें हिंदुस्थानच्या लोकाची अक्कल आणि ताकद दिवसेदिवस अधिकाधिक वाढत जाऊन इंग्रजांची आणि त्यांची अधिकाधिक फाटाफूट होत जाऊन शेवटीं घरची मंडळी आगतुकांना धुडकावून लावणार "§ इतिहास व राज्यशास्त्र यांच्याकडे परमेश्वरी प्रसादाच्या भाविक चष्म्यातून बघण्याचे युग सपले असून त्याकडे शुद्ध भौतिक व बौद्धिक दृष्टीनें बघण्याचें युग आतां महाराष्ट्रांत सुरू झाले असल्याचें वरील उतारा वाचल्यास कोणाच्याहि लक्षांत येईल.

या दृष्टीनें विचार करणाऱ्या तरुणांना न्यायमूर्तींचा किंवा लोकहितवादींचा राजकीय दृष्टिकोण मुळींच पटणारा नव्हता त्यांना शासित व शास्ते यांच्या हितांतील व्यावहारिक विरोध स्पष्ट दिसत होता व तो लोकांपुढे स्पष्ट मांडूनच त्यांनीं लोकजागृतीचें कार्य सुरू केले होतें. अर्थात् राज्यकर्त्यांकडे भिक्षांदेही करून आपली दाद लागणार नाहीं, हेहि त्यांनीं आता लोकांस सांगावयास प्रारंभ केला होता. " इंग्लिश राज्यांत पोटभर अन्न मिळत नाहीं " या लेखांत आगरकर लिहितात:

§ केसरींतील निवडक निबंध, १ लें पुस्तक, पृ. १५८–१६०.

"सरकार आणि प्रजा किंवा शास्ते आणि शासित यांचा स्वाभाविकपणे परस्परांशीं विरोध असतो. कोणतेहि सरकार जुलुमी असणे किंवा नसणे हे त्या सरकारच्या अमलांत असलेल्या प्रजेच्या नैसर्गिक प्रकृतीवर अवलबून आहे ज्यास स्वभावतः स्वातत्र्याची व सुखानुभवाची चाड असेल, ते प्रसगविशेषीं निरुपायास्तव कांहीं काल परवशतेचा अंगीकार करतील किंवा हालात दिवस काढतील, पण योग्य सधि सांपडल्याबरोबर आपले स्वातंत्र्य फिरून मिळविल्याशिवाय कधींहि राहावयाचे नाहींत राजकीय हक्कांची, जड सुखांची किवा स्वातत्र्याची 'घाल' म्हणून कोणी भीक घालीत नाहीं या गोष्टी केवळ ज्याच्या त्याच्या अकलेने व परिश्रमानेच प्राप्त होण्यासारख्या आहेत सरकारच्या कृपाळूपणापासून, न्यायतेपासून किंवा सारासार-विचारांपासून आम्हांस मिळणाऱ्या हक्कांचा व त्यापासून मिळणाऱ्या सुखांचा परिघ अत्यत मर्यादित आहे. तेव्हा हिंदुस्थानच्या दारिद्र्याविषयीं जे आजपर्यंत लिहिण्यांत आले आहे व पुढें येईल, त्याविषयीं आमच्या वाचकानीं असे समजावे, कीं तसें करण्यांत आमच्या राज्यकर्त्यांचे दोष दाखविण्यापेक्षां किंवा त्यांच्यापुढे झोळी पसरून त्यांत एकादा तुकडा टाकण्याबद्दल त्याची प्रार्थना करण्यापेक्षां लोकांस आमच्या स्थितीचे खरें ज्ञान होऊन, ती सुधारण्याविषयीं उत्साह उत्पन्न व्हावा हा आमचा प्रधान हेतु होता, आहे, व असेल"*

अशा प्रकारें स्वातत्र्य हे साध्य आणि स्वावलबन हें साधन, अशी राजकीय व औद्योगिक बाबतींत तरुण पक्षाची वृत्ति असून मनुष्यस्वभाव आणि ऐतिहासिक घडामोडी यांच्याकडे भोळ्या, भाविक किवा आधिदैविक दृष्टीने न पाहतां वास्तव-वादी व्यावहारिक दृष्टीनें पाहण्याचा उपदेश तो लोकाना करीत असे पूर्वीच्या पिढीची भाविक राजनिष्ठा त्याना फारशी प्रशसनीय वाटत नसे किंवा तिचे वारंवार प्रदर्शन करणें त्याना स्वाभिमानाचें वाटत नसे याचा अर्थ ते राजद्रोही किंवा बंडखोर होते असा नाहीं, पण त्याची राजनिष्ठा भाविक नसून कायदेशीर किंवा व्यावहारिक होती साम्राज्यशाहीचे शास्त्रीय विवेचन करताना आगरकर वर उद्धृत केलेल्या केसरींतील लेखमालेत म्हणतात :

"साता समुद्रांपलीकडील आमचे प्रभु इकडे येऊन त्यानीं आम्हास आपल्या पराक्रमाने जिकिले आणि आपल्या अमलाची या सुवर्णभूमींत स्थापना केली; तेव्हां त्यांच्या या परमार्थबुद्धीबद्दल आम्हांस स्वभावतः न होतां आलें तरी विचारांतीं कृतज्ञ आणि राजनिष्ठ झालेंच पाहिजे परतु एका राष्ट्रास दुसरे राष्ट्र जे जिंकितें, ते आपल्या फायद्यासाठीं जिंकितें असे कोठेच होत नाहीं! कोणत्याहि राष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट करून त्याला पराजित करण्यांत जिंकणाऱ्या राष्ट्राचा त्याचे कल्याण करण्याचाच हेतु असतो व ज्या बुद्धीनें इग्लडाने हिंदुस्थानचे राज्य काबीज केलें, त्याच बुद्धीनें ऐर्लंड देशहि इंग्रज लोकानीं आपल्या ताब्यांत ठेविला आहे व आज तीन-चारशें

* निबधसग्रह, भाग २ रा, पृ. २४४-४६.

वर्षें ते त्याच्या उन्नतीसाठीं आपले नफा-नुकसान न पाहतां शुद्ध परमार्थबुद्धीनें अहर्निश झटत आहेत! तरी ऐर्लंडचे बटाटेखाऊ कृतघ्न कॅथोलिक लोक दोन्ही बेटांचा चांगला मिलाफ होऊ देत नाहींत! त्या मदबुद्ध बेट्यांना इंग्रज लोकांचा आणि आपला एकजीव करून घेतल्याने आपले केवढे हित होणार आहे, हे कांहीं केल्यानें लक्षांत येतच नाहीं ऑस्ट्रिया, प्रशिया आणि रशिया यांनीं १८ व्या शतकांत पोलड देशाचे तुकडे पाडून तो अजीबात गट्ट केला हा सर्व प्रकार त्यानीं पोलिश लोकांच्या हितासाठींच केला! ट्यूनिस-प्रकरण, झुलू-प्रकरण, ट्रान्सवाल-प्रकरण, अफगाणिस्तानची लढाई वगैरे सर्व गोष्टी त्या त्या ठिकाणच्या लोकांच्या कल्याणासाठीं चालल्या आहेत! दूर कशाला? महाराष्ट्राबाहेरच्या मराठ्यांच्या स्वाऱ्या देखील शुद्ध परमार्थबुद्धीने झाल्या होत्या, असे कोणाच्यानेहि निःशंकपणे म्हणवणार नाहीं सारांश, 'बळी तो कान पिळी' हा न्याय जगांत जेथे तेथे दृष्टीस पडतो व याच न्यायाने जोपर्यंत राष्ट्राचे वर्तन चालेल, तोपर्यंत त्याच्या परमार्थाच्या पोकळ गप्पांवर कोणीहि समजस मनुष्य भरवसा ठेवणार नाहीं व अशा दोन राष्ट्रांचा एकजीव होऊन त्यांची घट्ट मैत्री होण्याचा किंवा त्याचे अन्योन्य संघट्टन होण्याचा फारच थोडा सभव असतो."*

## कायद्यासंबंधींची भावना

दुसऱ्या एका बाबींत जुन्या पिढीच्या व नव्या पिढीच्या दृष्टिकोणात फरक पडत होता, व तो म्हणजे आपल्या लोकांतील कायदे पाळण्याच्या वृत्तीसबधीं होय. या वृत्तीसबधीं आगरकर लिहितात. "शास्त्यानीं घालून दिलेल्या नियमांचा अतःकरणपूर्वक प्रतिपाल करणे हेच मनुष्यसुधारणेचे मुख्य कारण आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं पण हे पालन दोन भिन्न हेतूंमुळे घडत असते, इतकेच नाहीं, तर हेतुभेदाप्रमाणे त्याच्या परिणामांतहि मोठा भेद दिसून येतो. कोणत्याहि कायद्यामुळें जुलूम किंवा त्रास होत असला, तर एकदम त्या कायद्याच्या विरुद्ध न जातां योग्य रीतीने तो रद्द करविण्याची किंवा त्यांत फेरबदल करण्याची खटपट करणे आणि ती खटपट तडीस जाईपर्यंत त्यापासून होणारी पीडा निमूटपणे साहणे हे नियमपालन, दडाच्या, तुरुगाच्या किंवा दुसऱ्या कोणत्याहि शिक्षेच्या भयानें कायद्याचा जुलूम वर्षेच्या वर्षे बिनतक्रार सोशीत राहणें याहून अगदीं भिन्न आहे हवा तो मनुष्य कायदा आपल्या हातांत घेऊन समाजांत अनवस्था उत्पन्न करील, तर तीपासून सर्वांचेंच नुकसान होणार आहे, अशी पक्की खातरी झाल्यामुळे सरकारी अधिकाऱ्यांचा अंमल न तोडणें हे जितके प्रशसनीय आहे, तितकेच शुद्ध भेकडपणामुळे युगेच्या युगे पारतन्त्र्यांत राहणें खऱ्या मनुष्यपणास अत्यंत लाजिरवाणे आहे."§

* केसरीतील निवडक निबंध, १ ले पुस्तक, पृ १५६-५८

§ आगरकर-निबधसंग्रह, भाग १ ला, पृ १८९.

तात्पर्य, धर्माच्या बाबतींत ज्याप्रमाणे शब्दप्रामाण्याला मर्यादा आहे, त्याचप्रमाणें राजकीय बाबतींतहि कायदे पाळण्याच्या वृत्तीला मर्यादा आहे आणि धर्माच्या नांवानें जसा जुलूम होतो, त्याचप्रमाणें कायद्याच्या नावानेंहि जुलूम होतो या जुलुमाचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य ज्याच्या अगीं नाहीं, त्यांच्या कायदे पाळण्याच्या वृत्तीचें अभिनंदन करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आपल्या पारतन्त्र्याचा व आपणांवरील जुलुमाचा प्रतिकार हे मनुष्याचें आद्य कर्तव्य असून लोकांत नुसती कायदे पाळण्याची वृत्ति फैलावण्याचा प्रयत्न करणे हेच पुढाऱ्याचे काम नाहीं; तर त्यांची जुलुमाचा प्रतिकार करण्याची बुद्धि व स्वातन्त्र्याकांक्षा जागृत करणे हें लोकनायकांचें आद्य कर्तव्य आहे चिपळूणकर-आगरकर यांच्यापूर्वी कोणास हे तत्त्व माहीत नसेल असे नाहीं; पण हे तत्त्व केवळ माहीत असणे आणि त्याचा उघडपणे प्रचार करण्यास पुढे येणें आणि त्यासाठीं होतील ते कष्ट सोसण्यास तयार होणें, यांत महदतर आहे तें अतर प्रथम ओलांडण्याचा मान कायदेशीर चळवळ करणाऱ्यांत महाराष्ट्रांतील या लोकांसच दिला पाहिजे “ कोणीं एकदां शास्त्रीबोवांना असा प्रश्न केला होता, कीं असे कडक लेख लिहिण्यास तुम्ही कसे धजतां ? त्यावर त्यांनीं असें उत्तर केलें, कीं अगोदर तुरुगांत एक पाय ठेवून आम्हीं देशोन्नतीसाठीं आपली लेखणी हातीं घेतली,” असे उद्गार आगरकरांनीं चिपळूणकरांच्या मृत्युलेखांत काढिले आहेत. हे शब्द खरोखरच त्यांचा पाय बर्वे-प्रकरणात तुरुगाच्या दारांत असतांनाच त्यांनीं लिहिले आहेत हे ध्यानांत घेतल्यास त्याचे औचित्य व महत्त्व बरोबर लक्षांत येतें. पुढें थोड्याच दिवसात टिळक-आगरकरांना डोंगरीच्या तुरुंगात जावे लागलें. तेथें आपण कोणकोणत्या विषयांची चर्चा केली त्याचे वर्णन करतांना आगरकर म्हणतात : “ आतांप्रमाणे फिरून तुरुगांत न येण्याबद्दल कोणत्या गोष्टींची खबरदारी ठेविली पाहिजे, फिरून तुरुंगात यावे लागलें तरी ज्या गोष्टी केल्याच पाहिजेत अशा गोष्टी कोणत्या, वगैरे नाहीं नाहीं त्या विषयांवर आमचा एकेक वेळ एवढ्या जोरानें वाद चाले, कीं आसपासचे शिपाई ‘ हळू बोला, हळू बोला ’ असा इषारा करीत व बोलतां बोलतां रात्र निघून जाई.” अशा प्रकारे या वेळीं महाराष्ट्रांत सुरू होणाऱ्या या नव्या युगाच्या पुरस्कर्त्यांचा बुद्धिविहंगम उच्च आकाशांत उड्डाण करून कायद्यांच्या क्षितिजापलीकडील प्रदेशांतील चळवळींचें दर्शन आपल्या आटोक्यांत आणू शकत असे कायद्याचें जाणूनबुजून प्रत्यक्ष उल्लघन आगरकरांनींच काय, पण लो. टिळकांनींहि आपल्या चाळीस वर्षांच्या चळवळींत केलें नाहीं; पण कायदा हीच आपल्या चळवळींची अखेरची मर्यादा नव्हे आणि कोणत्याहि उपायाने तुरुगाच्या बाहेर राहणें हेंच लोकनायकांचे नित्य कर्तव्य नव्हे, याची जाणीव महाराष्ट्रांत प्रथम टिळक-आगरकरांच्या डोंगरीवासानें करून दिली “ डोंगरीच्या तुरुंगांतील आमचे एकशेंएक दिवस ” या छोट्याशा पुस्तकांत आगरकर लिहितात : “ सॉक्रेटिसाला असें पक्कें ठाऊक होतें, कीं मला जी शिक्षा होत आहे ती अगदीं अन्याय्य आहे,

तरी त्याच्या न्यायाधीशाच्या नजरेला जी गोष्ट आली, ती त्यानें संतोषानें मान्य केली.. सॉक्रेटिसावर आणलेल्या आरोपाची चौकशी करण्यास दहा-पांच लोक बसले होते असे नाहीं. अथेन्सच्या प्रजासत्ताक राज्यांतील लोकाच्या बहुमतानें तो दोषी ठरला, व त्याला विषप्राशन करावे लागलें ! पण कालांतराने त्याच्यासबधाने एवढें मतांतर झालें, कीं तो भला ठरून त्याचे पांच-सहाशे न्यायाधीश अगदीं चुकले अशी लोकांची खात्री झाली व आतांपर्यंत सुधारलेल्या राष्ट्रांचा तसाच ग्रह आहे. 'सत्यमेव जयते' हा पूर्वापार चालत आलेला जो सिद्धात आहे, त्याची पूर्तता होण्यास बराच काळ लागतो. एवढे खरे आहे, कीं कोणताहि पक्ष असो, तो जेथपर्यंत अधिकारारूढ असतो, तेथपर्यंत त्याच्या चुकीच्या करण्याला देखील कोणी नांवे ठेवण्यास धजत नाहीं; कारण तसे केल्याने त्याच्याकडून दड होण्याचा सभव असतो.. जिवाची पर्वा न करितां जगाचे कल्याण करण्याच्या मिषाने तसे करण्यात प्रतिष्ठा मानणारे ग्यालिलिओ, क्रानमर, रामशास्त्री यांसारखे वेडे पीर कोठे कोठे असतात, पण नि.सीम संसारचतुर जो आहे, तो अशांचे अनुकरण कधींहि करणार नाही !...तात्पर्य काय, कीं सरकार म्हणून जरी स्वर्गीय वस्तु नाहीं व सरकारचे अधिकार सरकारला लोकांपासून प्राप्त झालेले असतात, तरी ते फार दिवस त्याच्याकडे असल्याने ते त्यांच्याच जोरावर लोकांशीं शिरजोरपणा करू लागते व त्यांना आपले गुलाम करून टाकण्याचा प्रयत्न करितें. असे झाले म्हणजे लोकांत पिढीजात कांहीं तरी तरतरी असल्यास ते औदासीन्य-निद्रेंतून जागे होतात व अरेराव सरकारला दोन समजुतीच्या गोष्टी सांगून वळणावर आणितात अशा प्रकारचे लोक ज्या देशात नसतात, त्या देशाचे सरकार प्रजेचे किती हाल करील याचा नेम नसतो सरकार जुलुमी आणि प्रजा मुग्ध असल्याने थोड्या वेळांत उभयता लयास जातात" असो अशा प्रकारे १८८२ सालीं टिळक-आगरकर याना जी तीन महिन्यांची अगदीं छोटी साधी कैद झाली, तेवढ्यानेच महाराष्ट्राला एक नवी दृष्टि प्राप्त झाली आणि या दृष्टीला टिळक-आगरकरांच्या रूपाने ग्यालिलिओ, क्रानमर, रामशास्त्री, सॉक्रेटीस अशांसारख्या कांहीं दिव्य विभूती दिसू लागल्या. देशभक्तीसबधींच्या औदासीन्यनिद्रेंत घोरत पडलेल्या 'निःसीम संसारचतुर' लोकांनीं जरी त्यांचे अनुकरण केले नाहीं आणि त्यांच्या व्यावहारिक दृष्टीला जरी हे 'वेडे पीर' दिसले, तरी असले वेडे पीर ज्या देशांत थोडे तरी निघतात, त्यांचाच उद्धार होतो व ते जेथे निघत नाहींत तेथील सरकार व प्रजा या उभयतांचाहि कालान्तराने विनाश होतो, हे आगरकरांचे लिहिणे महाराष्ट्रीय तरुणाच्या अंतःकरणावर कोरलें गेले ! या नव्या प्रकाशांत जुन्या पिढीच्या पुढाऱ्यांचे तेज थोडे तरी मंद होणें व त्यांपैकीं सामान्य पुढाऱ्यांचा अस्तच होणें अगदीं स्वाभाविक होतें.

## सशस्त्र क्रांतीचे उपासक

कायदेशीर मार्गानें लोकजागृतीचें कार्य करणाऱ्या तरुणांचा असा एक नवा

पक्ष या वेळीं महाराष्ट्रांत उदयास येत होता; पण याच वेळीं प्रत्यक्ष सशस्त्र क्रांतीचा मार्ग स्वीकारणारेहि कांहीं लोक देशांत होते. आपल्या इकडील वासुदेव बळवत फडके हे अशाचपैकीं एक प्रसिद्ध पुरुष होत पण या संप्रदायाचा आश्रय करून हिंदुस्थानांत पुनः एकाद्या क्रांतीचा उठाव करण्याचा प्रयत्न करणारे अनेक अप्रसिद्ध लोक या वेळीं देशात संचार करीत होते. त्याचा वेष संन्याशाचा होता, तथापि देशांतील दरिद्री जनतेच्या उपासमारीनें त्यांचे अंतःकरण तिळतिळ तुटत होते आणि या जनतेच्या मुक्ततेस व आपल्या राष्ट्राच्या उद्धारास बडाखेरीज दुसरा कोणताच मार्ग नाहीं, असे त्यांना वाटत होते. संन्यासवेषाने देशांत संचार करणाऱ्या या लोकांचा एक मोठाच दगा हिंदुस्थानांत होईल अशी भीति मि ए ओ. ह्यूम यांच्यासारख्या हिंदुस्थान-सरकारातील गृहमंत्र्याच्या चिटणिसासहि वाटत होती त्यांच्या चरित्रांत ही माहिती वेडरबर्न यानीं दिली असून त्या वेळीं कशा प्रकारची भीति वाटत होती, त्याचे वर्णन ते पुढील शब्दांत करितात: "स्वयंप्रेरित असे अत्याचार, दुष्ट लोकांचे खून, सावकारांच्या घरीं दरवडे आणि बाजारांच्या लुटालुटी जिकडेतिकडे एकदम सुरू होतील अगदीं खालच्या वर्गातील लोक अर्धपोटी आहेत अशा आजच्या स्थितींत पहिले काहीं गुन्हे होताच तशा प्रकारचे शेंकडों गुन्हे जिकडेतिकडे पसरतील. त्यामुळे सार्वत्रिक बेचदशाही माजून राज्यसत्ता लुळी पडेल व प्रतिष्ठित लोकांचे सर्व व्यवहार बद पडतील एकाच पानावर पडलेले लहानलहान पाण्याचे थेंब एकमेकांत मिसळूं लागतात, त्याप्रमाणे समाजांतील ठिकठिकाणच्या दगेखोरांच्या टोळ्या एकमेकाशीं मिसळून त्यांना लवकरच दुर्धर्ष स्वरूप प्राप्त होईल अशा वेळीं सरकारविरुद्ध असणारे असमजस वृत्तीचे कांहीं सुशिक्षित लोकहि त्यात सामील होतील आणि ठिकठिकाणीं त्यांचे नेतृत्व स्वीकारून या दग्याचें संघटन करून त्याला राष्ट्रीय बडाचे स्वरूप देतील"§ कै वासुदेव बळवत फडके याचा उद्योग अशाच प्रकारचा होता ते आपल्या जबानींत म्हणतात: "चार-चार माणसें महिना-महिना पूर्वी पाठवून.... देशांत लहानलहान बंडें करीन. एवढें केले तरी इंग्रजाचे मनांत मोठी भीति उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं .अशीं बंडे केलीं तर डाका बद होतील, आगगाडी बंद होईल, तारा बद पाडतां येतील, .म्हणजे तुरुंग मोकळे करण्यास हरकत नाहीं अशीं लहानलहान बंडे झालीं तर...सर्वच चमत्कार व्हावा त्याप्रमाणें होऊन जाईल व इंग्रजांना हांकून लावून प्रजासत्ताक राज्यस्थापना करण्याचा जो आपला हेतु तो तडीस जाईल"[१]

सुशिक्षित लोकानीं या मार्गाचें अवलबन केलें, तर फ्रेंच राज्यक्रांतीसारखी एकादी क्रांति या देशांत होऊ शकेल अशी भीति त्या वेळीं अनेक हिंदी पुढाऱ्यांनाहि

---

§ A O Hume by Wedderburn, P 81

* रा. ग बोरवणकरकृत वासुदेव बळवत फडके-चरित्र, पृ २९.

'आजकालचा महाराष्ट्र' पृ ७५ वरून

वाटत होती १८८० सालीं इंग्लडांतील स्टेट्समन् मासिकात एक लेख डॉ हंटर यांना उत्तर म्हणून गुरुगोविद या सहीने प्रसिद्ध झाला होता त्याचा विस्तृत गोषवारा केसरीच्या दुसऱ्या वर्षाच्या २१ ते २५ अकांत म्हणजे शास्त्रीबुवांच्या निधनानंतर तीन-चार महिन्यांत प्रसिद्ध झाला असून तो आगरकरांनीं प्रसिद्ध केलेल्या निवडक निबंधात समग्र आला आहे. त्यांतील पुढील भाग त्या वेळच्या परिस्थितीवर प्रकाश पाडण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे: "मी सत्य स्मरून सांगतों, कीं हिंदू लोकांच्या मनांत जबरदस्त विचारक्रांति चालली आहे आणि मोठे वादळ होण्यापूर्वी जशी थोडा वेळ चहूकडे शांतता असते, त्याप्रमाणे दक्षिणेतील दगे आणि रपा येथील बंड यांनीं सूचित केलेल्या प्रचड तुफानाची प्रस्तुत स्वस्थता ही पुरोगामिनी होय. वासुदेव बळवत फडके नांवाचा दक्षिणेतील दरवडेखोर सर्वत्र प्रसिद्ध आहे यावर सरकारनें राजद्रोहाचा आरोप ठेविल्यामुळें देशाच्या कल्याणासाठीं प्राणत्याग करण्यास सिद्ध झाल्याचा याचा जिकडेतिकडे लौकिक झाला. हा वासुदेव पुण्याचे रस्त्यांतून तुरुंगाकडे जात असतां लोकांनीं 'वासुदेव बळवत की जय' असा गजर केला ही गोष्ट फार महत्त्वाची नाही, तथापि एवढ्यावरून सरकारानें लोकाचे अतरग ताडावे आणि सभाळून असावें देशाच्या राज्यस्थितींत सध्यां पराकाष्ठेची चलबिचल होऊन गेली आहे व तिची थावराथावर होण्यास फारच उदार मनाचा मनुष्य पाहिजे. नेटिव लोकांपैकीं पुढे सरसावलेल्या मडळींचे असे म्हणणें आहे, कीं पार्लमेंटसभेत तसेंच कायदे-कौन्सिलांत लोकांनीं निवडलेले मुखत्यार असावेत व हिंदू लोकांचा राज्यकारभारांत बराच हात असावा धंदेवाल्याचे असे म्हणणें आहे, कीं कराचा बोजा कमी होऊन आपल्या श्रमास आणि मालास उत्तेजन मिळावें या नेमस्त आणि वाजवी मागण्या सरकाराने आम्ही कबूल करीत नाहीं असे म्हटले, कीं विद्वान् आणि धदेवाले यांचा एकोपा होईल व असल्या एकोप्यानें होणाऱ्या परिणामाचे स्वरूप माझ्या डोळ्यांपुढे आलें म्हणजे माझ्या अंत:करणात धडकी भरते लोक नि:शस्त्र आहेत व आपल्या-पाशीं भले मोठे सैन्य आहे, अशा ऐटीवर सरकाराने निवांत राहू नये लोक कोणत्या वेळेस काय करतात याचा पत्ता लागत नाहीं. यासाठीं सरकाराने मोठ्या सावधगिरीनें राहिलें पाहिजे इ स १७८९ च्या जुलई महिन्याच्या १४ व्या तारखेस पारीस येथील नि:शस्त्र लोकांनीं दारूखाना लुटून त्यातील हत्यारे लांबविलीं, त्यामुळें एका दिवसांत सगळें शहर हत्यारबद झालें व राजाच्या पक्षाकडील मोठमोठ्या पठ्याची गाळण होऊन गेली! एका शतकाने त्याच ऐतिहासिक प्रकाराची पुनरावृत्ति झाली तर काहीं नवल नाहीं सध्याची नेटिव लोकाची भिकार स्थिति तशीच राहिली, तर हिंदुस्थान सरकारनें पुढच्या दुष्काळांत चांगली खबरदारी ठेवावी, असे त्यास माझें सुचविणें आहे तथापि लोकाचीं मने अशा रीतीनें बेफाम होऊं दिल्यानें या देशांतील लोकांवर जो भयंकर प्रसग गुदरणार आहे, तो इंग्लंडातील लोकांना टाळतां येण्यासारखा आहे"*

---

* केसरीतील निवडक निबध, पुस्तक १ लें. आगरकर, पृ २४-२५.

## सुशिक्षितांमधील राष्ट्रभावना

दादाभाईंनीं हीच भीति १८८० सालीं व्यक्त केली आहे; इतकेंच नाहीं, तर आतां ब्रिटिशांना आपल्या भेदनीतीचा उपयोग होण्याचाहि काळ जात चालला आहे, असा स्पष्ट इशारा दिला आहे.

"Englishmen sometimes indulge the notion that England is secure in the division and disunion among the various races and nationalities of India. But even in this new forces are working their way. Those Englishmen who sleep such foolish sleep of security know very little what is going on. The kind of education that is being recieved by thousands of all classes and creeds is throwing them all in a similar mould; a sympathy of sentiment, ideas and aspirations is growing amongst them; and more particularly, a political union and sympathy is the first fruit of the new awakening, as all feel alike their deprivation and the degradation and destruction of their country. All differences of race and religion, and rivalry, are gradually sinking before this common cause. This beginning, no doubt, is at present insignificant; but it is surely and steadily progressing. Hindus, Mohammedans and Parsees are alike asking whether English rule is to be a blessing or a curse. Politics now engross their attention more and more."

यानतर या राजकीय विचारक्रांतीचा आणि औद्योगिक उन्नतीच्या आकांक्षांचा मिलाफ ब्रिटिश मालाच्या बहिष्काराच्या चळवळींत होत असून या मालाच्या बहिष्कारांतूनच पुढे ब्रिटिश सरकारच्या बहिष्काराचीही चळवळ उद्भवेल, असे भविष्य दादाभाईंनीं १८८० सालींच केलें होतें. ते म्हणतात:

"Dr. Birdwood has brought to the notice of the English public certain songs now being spread among the people of Western India against the destruction of Indian industry and arts. We may laugh at this as a futile attempt to shut out English machine-made cheaper goods against hand-made dearer ones. But little do we think what this movement is likely to grow into and what new phases it may take in time.

The songs are at present directed against English wares, but they also are a natural and effective preparation against other English things, if the English in their blindness allow such things to come. The songs are full of loyalty, and I have not the remotest doubt in the sincerity of that loyalty. But if the present downward course of India continue, if the mass of the people at last begin to despair of any amelioration, and if educated youths, without the wisdom and experience of the world, become their leaders it will be but a *very very* short step from loyalty to disloyalty, to turn the course of indignation from English wares to English rule. The songs will remain the same, one word of curse for the rule will supply the spark."*

वरील तीन-चार उतारे लक्षपूर्वक वाचिल्यास १८५७ नंतर वीस वर्षांत हिंदुस्थानच्या परिस्थितींत कोणता फरक पडूं लागला होता, त्याची कांहींशी कल्पना आपणांस येऊं शकेल हिंदुस्थानांतील सामान्य जनता म्हणजे शेतकरीवर्ग जबर-दस्त साऱ्याखालीं चुरडून जाऊन सावकाराच्या पाशांत सांपडत होता आणि हे पाश तोडून टाकण्यासाठीं दुष्काळांत दगेधोपे करण्यास प्रवृत्त होत होता सुशिक्षित वर्गांतील कांहीं धाडसी लोक यांचे नेतृत्व करून प्रजासत्ताक स्वराज्य स्थापण्याचा साहसी खेळ खेळण्यास पुढे येण्याचा संभव दिसत होता हिंदुस्थानच्या प्राचीन संस्कृतींत वाढलेले बैरागी १८५७ सालाप्रमाणे उठावणी करण्याची आशा धरून होते; आणि चिपळूणकर, आगरकर, टिळक वगैरे लोक कायदेशीर राजकारणातच कांहीं नव्या उत्कट, स्वार्थत्यागी, स्वावलंबी आणि स्वातंत्र्यवादी भावनांचा जोम ओतून जहाल राष्ट्रीय राजकारणाचें बीजारोपण करीत होते या तरुण सुशिक्षितांचें ध्येय पूर्ण स्वातंत्र्य आणि साधनें आजन्म उत्कट देशसेवा हीं असून जुन्या पिढीचें मांडलिकी स्वराज्याचे ध्येय व परावलंबी साधनें त्यांना मान्य नव्हतीं याखेरीज ब्रिटिश राज्यांत शांतता असल्यामुळें व्यापारधंद्याची भरभराट सहज होईल अशी जी आशा वाटत होती, ती नष्ट झाली होती, व धंदेवाल्याना आपल्या उन्नतीच्या आड सरकार येत आहे याची जाणीव झाल्याने तो वर्गहि असंतुष्ट होऊन राजकारणाकडे वळूं लागला होता. धर्मभेद व जातिभेद यांच्यामुळे उद्भवणाऱ्या भेदांपेक्षां 'प्रभु-प्रजा' या संबंधांतून उद्भवणारा जातिभेद अधिक तीव्रतर आहे, याची जाणीव होऊन निरानिराळ्या धर्मांतील व जातींतील व्यक्तींत दारिद्र्यहनन आणि दास्यविमोचन यांसाठीं एक होण्याची आकांक्षा निर्माण होत होती. या सर्व शक्तींचें परस्पर पूर्ण

* Poverty and Un-British rule in India by Dada Bhai, P. 207.

सहकार्य असतें आणि या सर्वांच्या अतर्यामीं एकाच ध्येयरूप प्राणशक्तीचे अधिष्ठान असतें, तर कदाचित् या वेळीं हिंदुस्थानात क्रांतीहि झाली असती पण हिंदुस्थानच्या अवाढव्य शरीरांत या वेळीं ही एकराष्ट्रीयत्वाची प्राणशक्ति निर्माण झालेली नव्हती.

## राष्ट्रसभेच्या स्थापनेची आवश्यकता

हिंदी राष्ट्रांत ही प्राणप्रतिष्ठा करण्याचे कार्य राष्ट्रसभेसारख्या संस्थेखेरीज होणारें नव्हते आणि अशी प्राणप्रतिष्ठा करणारी राष्ट्रीय संस्था स्थापन करण्यास वर सांगितलेली कोणतीहि शक्ति समर्थ नव्हती ज्यांना हिंदुस्थानांत तात्काल क्रांति करण्याचे धोरण स्वीकारावयाचे होते, त्यांच्याकडून अर्थातच राष्ट्रसभेसारखी उघडपणे कार्य करून राष्ट्रीयत्वाचा प्राण निर्माण करणारी सस्था स्थापन होणे शक्य नव्हतें ज्यांना क्राति फार दूरच्या काळांत दिसत होती, पण जे कायदेशीर राजकारणाला जहाल राष्ट्रीय स्वरूप देत होते, ते या कार्याच्या मानाने त्या वेळीं अगदींच अपरिपक्व आणि अननुभवी होते दहा-वीस वर्षे उघडपणें देशसेवा करून प्रसिद्धी, कीर्ति आणि लोकप्रियता सपादन केल्यानतर त्यांना अखिल भारतीय राजकारण करण्याची ताकद येण्यासारखी होती राहता राहिला नेमस्त प्रागतिक राजकारण करणारांचा वर्ग. अशा वर्गात या वेळीं कलकत्त्याचे उमेशचद्र बानर्जी, आनंदमोहन बोस आणि सुरेंद्रनाथ बानर्जी, मुबईचे मगळदास नथुभाई, नौरोजी फर्दुमजी, विश्वनाथ नारायण मडलीक, काशिनाथ त्रिंबक तेलंग, फेरोजशहा मेथा; मद्रासचे एस्. सुब्रह्मण्य ऐय्यर, पी. रंगय्या नायडू, पी आनदचार्लू वगैरे प्रमुख असून या सर्वांचे अग्रणी दादाभाई नौरोजी व न्या रानडे हे होते असे म्हणतां येईल. या लोकांना १८७७ पासून एकादी राष्ट्रीय संस्था स्थापन करावी अशी इच्छा झाली होती व त्यांचे त्या दृष्टीने कांहीं प्रयत्नहि चालू होते. पण या वर्गात या कार्याला वाहून घेऊन तें नावारूपास आणण्याइतका आत्मविश्वास नव्हता, असे म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं ना गोखले यांनीं एकदां म्हटले होते कीं "राष्ट्रसभेचे प्रस्थापक जर एक इग्रज गृहस्थ नसते, तर कोणाहि हिंदी मनुष्याला तिची स्थापना करतां आली नसती आणि ती कोणीं केली असती, तरी त्या वेळीं राजकीय चळवळी-सबंधीं इतका वहीम होता, कीं अधिकाऱ्यानीं ती कोणत्या तरी मिषानें दडपून टाकली असती "§ हे उद्गार तत्कालीन रानडेप्रभृति हिंदी राजकारणी पुरुषांच्या मनोवृत्तीचे निदर्शक समजण्यास कांहींच हरकत नाहीं तथापि निरनिराळ्या प्रांतांत जे हिंदी पुढारी त्या वेळीं कार्य करीत होते त्यांना राष्ट्रसभेसारख्या एका अखिल भारतीय संस्थेची आवश्यकता भासूं लागली होती हे निश्चित.

---

§ No Indian could have started the Indian National Congress if the founder of the Congress had not been a great Englishman and a distinguished exofficial, such was the official distrust of political agitation in those days that the authorities would have at once found some way or other to suppress the movement — *Quoted in 'Young India' by Lajpatrai, P. 114*

## ब्रिटिश मुत्सद्यांचें सहकार्य

हिंदी राजकारणांतील या पहिल्या पिढीशीं राष्ट्रसभेच्या स्थापनेंत सहकार्य करण्यास लवकरच हिंदुस्थानातील ब्रिटिश अधिकारी-वर्गातील दोन-तीन प्रमुख गृहस्थ पुढे सरसावले. ते म्हणजे अॅलन ऑक्टेव्हिअन ह्यूम, सर विल्यम् वेडरबर्न आणि सर हेन्री कॉटन हे होत ह्यूम हे १८७० ते १८७९ या काळांत हिंदुस्थान-सरकारच्या गृहमन्त्र्यांचे चिटणीस होते. सर विल्यम् वेडरबर्न हे मुंबई इलाख्यांतील अधिकारी असून सर हेन्री कॉटन हे बंगालमधील अधिकारी होते. १८५७ सालीं ह्यूम हे इटावा जिल्ह्यांत मॅजिस्ट्रेट असून बंडाच्या घनचक्करींत साम्राज्याच्या रक्षणाचे कार्य त्यांनीं उत्तम प्रकारे केलें होते. तथापि, ब्रिटिश साम्राज्य वरून वाटते तितकें सुस्थिर नाहीं आणि हिंदी लोकात राज्यासंबंधीं तीव्र असतोष माजला असतां त्याच्या वणव्यांत ह्याची राखरांगोळी होणे शक्य आहे, याची त्याना बरोबर कल्पना होती सर विल्यम् वेडरबर्न यांनीं अधिकारी असताना दख्खनच्या दऱ्यांतून उद्भवलेले वासुदेव बळवंतांचें बड प्रत्यक्ष पाहिलेलें असून ब्रिटिश सत्तेचें दौर्बल्य उत्तम प्रकारें त्यांच्याहि निदर्शनास आले होते सर हेन्री कॉटन यांच्याहि मनावर अशाच प्रकारचे सस्कार झालेले असून ‘ हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्य हे तरवारीच्या जोरावर टिकलेलें नाहीं व लोक ते चालूं देतात म्हणूनच चालूं शकतें ’ असें त्यांचे मत होतें. ‘ न्यू इंडिया ’ या नावाचे एक पुस्तक त्यानीं १८८६ सालीं प्रसिद्ध केलें होते त्यांत हे मत त्यांनीं पुढील शब्दांत मांडिलें आहे : “ It is not literally true that India is maintained by the sword...... The sword has no occasion to come into play for there is no resistance. The real state of things would be better described by calling the Government of India a government by the sufferance of the people.”* लोक जर सरकारचा एकसारखा प्रतिकार करूं लागले, तर हिंदुस्थानांत राज्य करणे अशक्यच होईल असे त्यांना वाटत होते जोपर्यंत हिंदुस्थानांत राष्ट्रभावना संघटित झाली नाहीं, तोपर्यंत हा प्रतिकार एकसारखा दडपून टाकितां येईल असें जरी गृहीत धरिले, तरी त्यामुळें देशांत बेबंदशाही माजून आपल्या व्यापाराला व जीविताला धोका येईल आणि आपल्या पूर्वजांनीं स्थापन केलेले हे प्रचड राज्ययंत्र कोलमडून पडेल, अशी भीति या सर्वांना वाटत होती अर्थात् ही आपत्ति टाळण्यास केवळ सैन्यावर आणि शस्त्रावर अवलबून न राहतां हिंदुस्थानांत जें राष्ट्रीयत्व निर्माण होत आहे त्याला राजनिष्ठेचें व शांततेचे स्वरूप देणे, यांतच आपल्या साम्राज्याचें व हिंदी राष्ट्राचेहि हित आहे, अशी त्यांची भावना होती. या भावनेच्या दृष्टीने त्यांना हिंदुस्थानचे हित आणि ब्रिटिश राष्ट्राचें हित यात विरोध दिसत नव्हता.

---

* New India by Sir Henry Cotton, P 8.

हिंदुस्थान पूर्णपणें साम्राज्याखालीं आला त्या वेळचे एल्फिन्स्टन्, मन्रो, मालकम्, मेटकाफ् वगैरे ब्रिटिश मुत्सद्दी आणि ह्यूम, वेडरबर्न, कॉटन वगैरे १८५७ च्या बडानंतर वीस वर्षांनीं राष्ट्रसभेच्या स्थापनेस साहाय्य करणारे ब्रिटिश मुत्सद्दी, या दोघांचा दृष्टिकोण एकच आहे थोडासा जो फरक आहे तो परिस्थितीचा आहे एल्फिन्स्टन्, मन्रो, मालकम् यांच्या वेळीं हिंदी लोकांत पाश्चात्य विद्येचा प्रसार करावा किंवा नाहीं, त्यांना भाषण व लेखनस्वातंत्र्य द्यावें किंवा नाहीं याची चर्चा चालू होती या मार्गाचा अवलंब केल्यास हिंदुस्थानात राष्ट्रीयत्व निर्माण होईल अशी भीति त्या वेळीं व्यक्त केली जात होती आतां हे राष्ट्रीयत्व निर्माण होऊं लागल्याचीं स्पष्ट चिन्हे दिसू लागलीं होतीं तेव्हां या राष्ट्रीयत्वाचें नेतृत्व करून त्याला राजनिष्ठेचे स्वरूप देता येईल किंवा नाहीं, हा प्रश्न त्यांच्यापुढे आला ते तसे देतां येईल असे ह्यूम, वेडरबर्न, कॉटन वगैरेंचें मत होते. अर्थात् हे मत बनण्यास त्यांच्या अंगची औदार्यबुद्धि व स्वातंत्र्यप्रेम हीं कारण झालीं होतीं यात शंका नाहीं ते मुत्सद्दी होते, साम्राज्यनिष्ठहि होते, पण त्याचबरोबर उदार व स्वातंत्र्यभक्तहि होते त्यांची स्वातंत्र्यप्रीति केवळ रानडे-दादाभाई यांच्या पिढीलाच मान्य होती असे नाहीं, तर लो टिळक व लाला लजपतराय याच्या पिढींतील लोकांनाहि ती पटलेली होती त्याच्या पुढील पिढीला मात्र ती तितकीशी पटल्याचें दिसत नाहीं, पण या पिढीचा त्यांच्याशीं प्रत्यक्ष संबधच न आल्याने या मताला आम्ही विशेष महत्त्व देत नाहीं ह्यूम, वेडरबर्न यांना आपण काय करीत आहो याची बरोबर कल्पना होती ह्यूम याच्या चरित्रात वेडरबर्न म्हणतात. "In Japan, a peaceful revolution converted a mediaeval military despotism in a constitutional goverment, based on the people's will. By a process of evolution, equally peaceful, the followers of Mr. Hume have set themselves gradually to convert the precarious domination of a foreign bureaucracy in a stable national government, under the aegis of the British Empire."* परकीय नोकरशाहीच्या अस्थिर प्रभुत्वाला साम्राज्यछत्राखालील सुस्थिर राष्ट्रीय सरकारचे स्वरूप क्रमविकासमार्गानें देणें, हे ह्यूम-वेडरबर्न यांचें ध्येय होते आणि त्यांच्यापुढे जपानमधील शांततामय क्रांतीचा आदर्श होता राष्ट्रसभेची स्थापना करणारे हिंदी पुढारी हेहि दुसऱ्या एका दिशेने विचार करतां करतां अशाच निर्णयाला येऊन पोहोचलेले होते देशांत अशांतता माजण्यापासून आपल्या देशाचे हित नसून नुकसानच आहे असे त्यांना वाटत होते ब्रिटिश साम्राज्यानें हिंदुस्थानांत जी शांतता स्थापन केली आहे, तिच्या शीतल छायेत हिंदुस्थानची सांस्कृतिक वाढ होत आहे असे त्याना वाटत होते हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यांत राहण्यांत सांस्कृतिक दृष्ट्या

* A O Hume by Wedderburn, P. 48.

त्याची उन्नति आहे असेहि त्यांच्यापैकीं बहुतेकांचें मत असून हिंदुस्थानला औद्योगिक दृष्टया ब्रिटिश साम्राज्य मारक होत आहे याची त्याना जाणीव होती तथापि ब्रिटिशांच्याच नेतृत्वाखालीं व ब्रिटिश भाडवलाच्या साहाय्याने हळूहळू हिंदुस्थानात औद्योगिक क्रांतीहि होऊं शकेल असे त्यांना वाटत होते या औद्योगिक क्रातीला जकातींचें सरक्षण मिळवावें आणि राज्यकारभारांत थोडा थोडा अश मिळवितां मिळवितां ब्रिटिश साम्राज्याच्या छत्राखालीं मांडलिकी स्वराज्य मिळविण्याचा सनदशीर प्रयत्न करावा, असे त्यांचे धोरण होते . या कामीं आपणांस इग्लंडातील उदार लोक, ब्रिटिश अधिकारीवर्गातील दूरदर्शी मुत्सद्दी आणि हिंदुस्थानात आलेले गोरे व्यापारी व भाडवलवाले याचेहि साहाय्य मिळेल, अशी त्याना आशा होती.

जितका आत्मप्रत्यय कमी तितका परप्रत्यय अधिक, असा एक मानसशास्त्रांतील सिद्धान्त समजण्यास हरकत नाहीं आत्मप्रत्ययहि नाहीं व परप्रत्ययहि नाहीं, अशा मानसिक अवस्थेत मनुष्य फार काळ राहू शकत नाहीं त्याला आशेचे कोठें तरी स्थान हवे असतें कर्मप्रवण मनुष्य कोणत्या तरी श्रद्धेने कार्य करीत असतो. दुर्बल मनुष्य निसर्गतः परप्रत्ययी असतो आणि तो परप्रत्ययी असतो म्हणून त्याचें दौर्बल्य वाढत असतें. या पिढीची राष्ट्रीय भावना इग्लिश सस्कृतीच्या परिचयानें वाढलेली होती. इग्लिश वाङ्मयाचे खतपाणीच तिला मिळालेले होतें. अर्थात् हें राष्ट्रीयत्व दुर्बल असेपर्यंत परप्रत्ययी असणे नैसर्गिकच होते शिवाय या राष्ट्रीयत्वासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्याची या पिढींतील लोकांची तयारी नव्हती हे त्याचे अगभूत दौर्बल्य होते व या त्यांच्या अगभूत दौर्बल्यामुळे त्याचा परप्रत्यय व परश्रद्धा याची नकळत वाढ होत होती यांच्यापैकीं बहुतेक लोक स्वार्थ साधून परार्थ करणारे होते स्वार्थावर लाथ मारून परार्थाला वाहून घेणारे लोक त्यात हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेहि नव्हते याचा अर्थ त्या वेळीं स्वार्थाचा सर्वथैव त्याग करून परार्थाला वाहून घेणारे लोक देशांत कोणीच नव्हते असा नाहीं, तर जे लोक या राजकारणात पडले होते त्यांत तसे लोक फारसे नव्हते, एवढाच याचा अर्थ आहे अर्थात् या लोकांना ह्यूम, वेडरबर्न, कॉटन याच्यासारख्या सेवानिवृत्त ब्रिटिश अधिकाऱ्याचे साहाय्य मिळाले नसते, तर राष्ट्रसभेच्या स्थापनेचे व प्रचाराचे कार्य त्यांच्या हातून झाले नसतें, असे म्हणण्यास काहीं हरकत नाहीं अशा परिस्थितींत राष्ट्रसभा स्थापन झाल्यापासून सुमारे आठ-दहा वर्षे तिच्या कार्याचा व प्रचाराचा बहुतेक भार स्वत: ह्यूम यांनाच उचलावा लागला आणि यानंतर जेव्हां त्यांना आपल्या देशीं जाण्याची इच्छा झाली तेव्हां आतां ही राष्ट्रसभा चालवावी कीं बंद करावी, असा मोठाच वाद या देशांत माजून राहिला होता! पण एकदां स्थापन केलेली सस्था अगदींच बंद करणे फारच अपकीर्तीचे आहे असे वाटून या पिढीनें ती कशी तरी दहा वर्षे चालू ठेविली, हेच त्या पिढीचे भावी पिढीवर उपकार मानिले पाहिजेत. पुढें याच संस्थेत टिळक-गोखले यांच्यासारखे आजन्म राष्ट्रसेवक शिरले व तिच्यांत त्यांनीं कांहीं नवा जोम

आणिला. सारांश, ह्यूम, वेडरबर्न यांच्यासारखे सेवानिवृत्त ब्रिटिश अधिकारी आणि दादाभाई, रानडे, बानर्जी, बोस, तेलंग वगैरे हिंदी राष्ट्रीय पुढारी, यांच्या सहकार्यानें साम्राज्यनिष्ठेच्या पायावर आणि सनदशीर चळवळीच्या आधारावर हिंदी राष्ट्रसभेची स्थापना इ स. १८८५ च्या २८ डिसेंबर रोजीं मुंबईस करण्यात आली

पण राष्ट्रसभेच्या उत्पत्तीचें बीज केवळ या दोन विचारप्रवाहांच्या संगमांतच सांपडतें असे नाहीं त्याचा शोध करण्यास आपणांस त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड डफरीन यांच्या विचारसरणीशीं परिचय करून घेणे अवश्य आहे ह्यूम यांना एक अखिल भारतीय राष्ट्रीय संस्था स्थापन करावी अशी कल्पना प्रथम सुचली, असली तरी तिचे स्वरूप प्रामुख्याने सामाजिकच असावें अशी त्यांची पहिली कल्पना होती, पण लॉर्ड डफरीन यांनींच त्यांना या सस्थेचे स्वरूप राजकीय असावें, असे सुचविले. ह्यूम यांच्या सद्धेतूबद्दल आणि स्वातंत्र्यप्रीतीबद्दल तत्कालीन हिंदी पुढारी एकमुखाने ग्वाही देताना आढळतात. तशी लॉर्ड डफरीन याची स्थिति नाहीं तेव्हां राष्ट्रसभा स्थापन झाल्यास आपल्या राज्यकारभारास साहाय्य होईल या विचारापेक्षां हिंदी राष्ट्रीय चळवळीचें नेतृत्व युरोपियन गृहस्थांनीं केल्यास अंतिम परिणामांच्या दृष्टीने तें साम्राज्यहिताचें होईल हा विचार त्यांच्या मनांत अधिक प्रबळ असला, तर त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. इंग्लडात ज्याप्रमाणे पार्लमेंटांतील विरोधी पक्षाकडून लोकांचें अंतःकरण अधिकारारूढ पक्षाला कळते, तसे कार्य करणारी एकादी सस्था हिंदुस्थानांत निर्माण झाली तर राज्यकर्त्यांना तिचा उपयोग होईल, असे त्यांचें मत असून ह्यूमसारख्या लोकांनीं हे राजकीय कार्य सुरू केल्यास त्यामुळे राज्यकारभारास धोका न येतां अधिकच साहाय्य होईल असे त्यांना वाटे व तसेच त्यांनीं ह्यूम याना सुचविले. मात्र राष्ट्रसभेच्या स्थापनेचा सल्ला आपण दिला आहे हे निदान आपण सेवानिवृत्त होईपर्यंत कोणासहि कळूं नये, असे त्यांनीं ह्यूम यांना बजाविलें होते * अशा प्रकारे व्हाइसरॉयांचीसुद्धा आपल्या उपक्रमास संमति, किंबहुना प्रोत्साहनच आहे, असे जेव्हा त्या वेळच्या हिंदी पुढाऱ्यांना समजलें, तेव्हां त्यांनीं पुढे पाऊल टाकून राष्ट्रीय सभा स्थापन करण्याचा आपला विचार अमलांत आणण्याचा निश्चय केला.

## राष्ट्रीय सभेची स्थापना

अशा प्रकारे हिंदी पुढारी अखिल भारतीय राजकारणाची निर्मिती करीत

* "Lord Dufferin seems to have told him that as head of the Government he had found the greatest difficulty in ascertaining the real wishes of the people, and that for the purposes of administration it would be a benefit if there existed some responsible organization, through which the Government might be kept informed regarding the best Indian public opinion He further observed that, owing to the wide differences in caste, race and religion, social reform in India required local treatment, rather than the guidance of a national organization." —*A. O. Hume by Wedderburn*, *P. 60*.

आहेत, तोंच १८८२ मध्ये मि. ह्यूम हे सेवानिवृत्त होऊन या राष्ट्रीय संघटनेच्या कार्याचे धुरीणत्व करण्यास पुढें आले. त्यांनीं लॉर्ड डफरिन यांचा सल्ला घेऊन या सघटनेचें धोरण आंखून घेतले, आणि १८८४ मध्ये 'इंडियन नॅशनल यूनियन' या नांवाची एक संस्था स्थापिली या संस्थेमार्फत पुण्यास १८८५ च्या डिसेंबरमध्ये एक कॉन्फरन्स म्हणजे परिषद् भरविण्याचे ठरले. या परिषदेनें १८८५ च्या एप्रिल महिन्यांत पुढील जाहीरपत्रक प्रसिद्ध केलें :

"इंडियन नॅशनल यूनिअनची एक परिषद् ता २५ डिसेंबर ते ३१ डिसेंबर-पर्यंत पुणें येथें भरविणेत येईल या परिषदेस बंगाल, मुंबई, मद्रास या प्रांतांतील सर्व भागातील इंग्रजी भाषा उत्तम प्रकारे जाणणारे राजकीय पुढारी प्रतिनिधी म्हणून उपस्थित होतील

"या परिषदेचे प्रत्यक्ष हेतू दोन असतील : (१) राष्ट्रीय प्रगतीच्या कार्यात अत्यंत कळकळीने भाग घेणारांचा परस्पराशीं परिचय व्हावा आणि (२) पुढील सालीं हातीं घ्यावयाच्या राजकीय कार्यांची चर्चा करून ती कार्यें निश्चित करण्यांत यावींत.

"अप्रत्यक्ष रीत्या ही परिषद् म्हणजे हिंदी लोकांच्या पार्लमेंटचें बीजच होईल आणि ती जर योग्य प्रकारे चालविण्यात आली, तर हिंदुस्थान अद्यापि कोणत्याहि प्रकारच्या प्रातिनिधिक सस्था चालविण्यास नालायक आहे या आक्षेपास हे कार्य थोड्याच वर्षात, खोडतां न येण्यासारखे उत्तर देऊ शकेल पुढील परिषद् पुण्यासच भरावी, कीं ब्रिटिश असोसिएशनप्रमाणे ती दरसाल निरनिराळ्या प्रमुख केंद्रांत भरावी, हे या परिषदेतच ठरविण्यात येईल पुण्याव्यतिरिक्त सिंधसहित मुंबई इलाखा व वऱ्हाड येथून या परिषदेस वीस प्रतिनिधी येतील. मद्रास व दक्षिण बंगाल या प्रांतांतून प्रत्येकीं तितकेच येतील आणि वायव्य प्रांत, अयोध्या आणि पंजाब इकडून यांच्या निम्मे प्रतिनिधी येतील असा विश्वास वाटतो"

यानतर ह्यूम यांनीं व्हाइसरॉयांची गांठ घेतली व विलायतची सफर करून तेथील लोकांशींहि आपल्या कार्याची चर्चा केली व त्यास सहानुभूति मिळविली तसेंच या परिषदेच्या बातम्या इंग्लडात निःपक्षपातीपणाने प्रसिद्ध व्हाव्यात अशीहि व्यवस्था करून ठेविली यानतर या परिषदेचे अध्यक्षस्थान मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे यानींच स्वीकारावे अशीहि सूचना लॉर्ड डफरिन यांच्यापुढे ठेवण्यांत आली; पण राजा आणि प्रजा यांत इतके अद्वैत इतक्यांतच नको, असे म्हणून यांनीं ही सूचना अमान्य केली, तथापि आपली या कार्यास पूर्ण सहानुभूति व्यक्त केली अशा प्रकारें सर्व तयारी चालू झाली, पण आयत्या वेळी पुण्यास महामारीची सांथ उद्भवल्यामुळे हें अधिवेशन मुंबईस भरविण्यांत आले अर्थात् पुण्यांतील सार्वजनिक सभा जें या राष्ट्रीय प्रतिनिधींचें स्वागत करणार होती, ते कार्य करण्यास मुंबईस नुकतीच स्थापन झालेली 'प्रेसिडेन्सी असोसिएशन' ही संस्था पुढे आली. ही संस्था ना. बद्रुद्दिन तय्यबजी, ना. काशिनाथ त्रिं. तेलंग आणि श्री फेरोजशहा मेथा या हिंदु,

मुसलमान व पारशी धर्मांच्या तरुण, तडफदार, उत्साही राष्ट्रभक्तानी स्थापन केलेली होती आणि प्रत्येक पिढीच्या तरुणांना आशीर्वाद देणारे दादाभाई नौरोजी या तिघांच्या पाठीमागे उभे होतेच

मुबईस भरलेल्या या पहिल्या राष्ट्रसभेस एकंदर ७२ प्रतिनिधी उपस्थित होते. त्यांपैकीं मुंबईचे १८, पुण्याचे ८, कराचीचे २, विरमगांवचे ११, सुरतचे ६ आणि अहमदाबादचे ३ असे मुबई इलाख्यांतील ३८ सभासद होते. मद्रासचे ८, कलकत्त्याचे ३, लखनौचे ३, तंजावरचे २ आणि लाहोर, अबाला, बऱ्हाणपूर, मच्छलीपट्टण, चिंगलपूर, मदुरा, तिनेवल्ली, कोइमतूर, कुंभकोणम्, सालेम, कुडाप्पा, अनतपूर, बल्लारी, आणि सिमला, येथून प्रत्येकीं १ अशी विभागणी झालेली होती त्यांत कलकत्त्याचे उमेशचद्र बानर्जी, नरेद्रनाथ सेन आणि गिरिजाभूषण मुकर्जी हे प्रसिद्ध असून पहिले या राष्ट्रसभेचे नियोजित अध्यक्षच होते उमेशचद्र हे कलकत्ता हायकोर्टातील सुप्रसिद्ध ॲड्व्होकेट असून ते धर्मानें ख्रिस्ती होते यांचा धंदा उत्तम चाललेला असून त्याचें मासिक उत्पन्न दहाबारा हजारांपर्यंत तरी होतें ते ब्रिटिश संस्कृतीचे भोक्ते असून हिंदुस्थानात लोकसत्ताक राज्यपद्धति निर्माण व्हावी याबद्दल प्रयत्न करण्यांत आपण ब्रिटिश साम्राज्याचा द्रोह करीत आहो असे मानण्याचे कांही कारण नाहीं, असे त्यांनीं आपल्या भाषणांत स्पष्टपणे सांगितलें कलकत्त्यास याच वेळीं एक राष्ट्रीय परिषद् सुरेद्रनाथप्रभृतींनीं भरविली असल्याने कलकत्त्याचे अधिक लोक या परिषदेला उपस्थित नव्हते. पुढील सालीं ही राष्ट्रीय परिषद् राष्ट्रसभेत विलीन झाली आणि बाबू सुरेद्रनाथ बानर्जी व आनदमोहन बोस हे दोन उत्साही राष्ट्रभक्त राष्ट्रसभेला मिळाले उमेशचद्र बानर्जी, सुरेंद्रनाथ व आनदमोहन हे राष्ट्रसभेच्या पहिल्या प्रमुख आधारस्तभांपैकीं बगाली पुढारी होत. मुंबईच्या पुढाऱ्यांत दादाभाई हे वयोवृद्ध राष्ट्रपितामह आणि त्यांच्या नेतृत्वाखालीं फेरोजशहा, वाच्छा आणि तेलंग हे उत्साही तरुण देशभक्त राष्ट्रसभेची धुरा वाहण्यास पुढे आले होते पुण्यांतून न्या रानडे, डॉ भाडारकर, नूलकर, साठे, आगरकर, टिळक, आपटे वगैरे जुन्या-नव्या पिढ्याचे पुढारी उपस्थित होते. मद्रासच्या प्रतिनिधींत तेथील महाजनसभेचे अध्यक्ष रगय्या नायडू, जी. सुब्रह्मण्य ऐय्यर, वीर राघवाचार्य, आनंदाचार्लू, एस्. सुब्रह्मण्य ऐय्यर असे प्रमुख पुढारी होते संयुक्त प्रांतांतून गगाप्रसाद वर्मा आणि पजाबचे लाला मुरलीधर हे दोन प्रमुख गृहस्थ आले होते. अशा प्रकारे या ७२ प्रतिनिधींत निरनिराळ्या प्रांतांतील उत्साही आणि अनुभवी असे सर्व राजकीय कार्यकर्ते समाविष्ट झाले होते, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## पहिल्या अधिवेशनांतील ठराव

या पहिल्या राष्ट्रसभेचें कार्य तीन दिवस चाललें आणि एकंदर नऊ ठराव

पास करण्यांत आले. राज्यकारभाराची चौकशी करण्यासाठीं एक रॉयल कमिशन नेमावें, त्यांत योग्य प्रमाणांत हिंदी प्रतिनिधी घ्यावेत आणि त्याने इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशांत हिंडून पुरावा गोळा करावा अशा अर्थाचा पहिला ठराव होता. तिसरा ठराव येथील मध्यवर्ती व प्रांतिक कायदेमंडळात मोठ्या प्रमाणांत लोकनियुक्त प्रतिनिधी घ्यावेत, या कायदेमंडळापुढे अंदाजपत्रके मांडण्यात यावीं, सभासदांना राज्यकारभारासंबधीं प्रश्न विचारण्याचा अधिकार असावा आणि येथील अधिकारीवर्गाला या कायदेमंडळाच्या सल्ल्याविरुद्ध जाण्याचा अधिकार असला, तरी कायदेमंडळास आपलें म्हणणें पार्लमेंटपुढे मांडता यावे म्हणून पार्लमेंटचे या कामासाठीं एक कायम मंडळ नेमण्यांत यावे, असा होता दुसऱ्या ठरवाने भारतमन्त्र्याचें 'इंडिया कौन्सिल' रद्द करावें अशी मागणी करण्यात आली होती या दुसऱ्या व तिसऱ्या ठरावांचा साकल्यानें विचार केल्यास, त्यांत येथील अधिकारीवर्ग हा एक पक्ष, लोकनियुक्त प्रतिनिधी हा दुसरा पक्ष आणि या दोघांतील मतभेदांचा अंतिम निर्णय देणारें ब्रिटिश पार्लमेंट किंवा त्याचें कायम मंडळ हा तिसरा पक्ष, असे तीन पक्ष गृहीत धरून पार्लमेंटचा अंतिम अधिकार मान्य केला गेला होता असे दिसून येते. तरी नोकरशाहीने सुशिक्षित वर्गाला राज्यकारभारात बरोबरीची भागीदारी द्यावी अशी मागणी त्यात अंतर्भूत आहे भारतमन्त्र्याला सल्ला देण्यास जे इंडिया कौन्सिल होते, त्यांत येथील नोकरशाहीचेच सर्व प्रतिनिधी असल्याने येथील राज्यकारभार पार्लमेंटला जबाबदार आहे असे तत्त्वतः म्हणतां आले, तरी व्यवहारतः तो एका अनियंत्रित नोकरशाहीच्याच ताब्यात होता ही अनियंत्रित पद्धति मोडून येथील राज्यकारभार लोकप्रतिनिधींच्या सल्ल्याने चालावा, या सल्ल्याविरुद्ध नोकरशाही वागल्यास तिच्यावर पार्लमेंटच्या मंडळाकडे दाद मागता यावी आणि नोकरशाहीला लोकमताची थोडी तरी जरब बसावी, अशी या वेळच्या तात्कालिक मागण्याची रचना करण्यांत आली होती या वेळी कायदेमंडळांत एकहि लोकनियुक्त प्रतिनिधि नव्हता ही स्थिति ध्यानांत घेतल्यास ही सुधारणा ताबडतोब अमलात आली असती, तरी लोकात एक आत्मविश्वास निर्माण होऊन हिंदुस्थानांत क्रांतिकारक राजकारण निर्माण झालें नसतें आणि सनदशीर मार्गाने स्वराज्य प्राप्त होईल, अशी आशा बहुतेक सुशिक्षित वर्गात स्थिर झाली असती. तथापि ही नेमस्त मागणी पूर्णपणे मान्य होण्याचें तर दूरच राहिले, पण कायदेमंडळांत राजरोसपणें लोकनियुक्त प्रतिनिधींचा प्रवेश व्हावा ही मागणीहि पदरांत पडण्यास १९०९ साल उजाडावे लागले! तोपर्यंत हिंदी पुढाऱ्यांचा सनदशीर मार्गावरचा विश्वास उडून गेला होता; व देशांत निःशस्त्र क्रांतिवादी आणि सशस्त्र क्रांतिवादी असे दोन पक्ष निर्माण झाले होते. अर्थात् या १९०९ च्या सुधारणाहि यांपैकीं कोणाच्या प्रयत्नांचे फल आहे, हा प्रश्न अनिर्णीतच राहिला व तो तसाच राहणार!

यानंतर येथील नोकरशाहींत हिंदी लोकांचा अधिक प्रवेश व्हावा म्हणून

सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा इंग्लडाप्रमाणे हिंदुस्थानांतहि घेण्यात यावी, उमेदवाराचें वय २३ वर्षांचे असलें तरी चालावे, लष्करी खर्च वाढवू नये, वाढविला तरी सरक्षक जकाती बसवून वाढवावा, हिंदुस्थान सरकारच्या कर्जाला साम्राज्य सरकारने हमी द्यावी, ब्रह्मदेश खालसा करू नये, वगैरे इतर ठराव पास झालेले आहेत. तथापि राष्ट्रसभेची पहिलीं आठ वर्षें मुख्यतः वर सांगितलेल्या राज्यघटनेंतील सुधारणा घडवून आणण्यासाठीं कसून प्रयत्न करण्यांत गेलीं १८९२ सालीं लॉर्ड क्रॉसचे 'इंडियन कौन्सिल' बिल पुढे आले व तो कायदा १८९३ सालापासून अमलांत येऊन आतां निदान दहापधरा वर्षें तरी राज्यघटनेत कांहीं सुधारणा होणें शक्य नाहीं, अशी हिंदी पुढाऱ्याची खात्री झाली. या कायद्याने लोकानियुक्त प्रतिनिधी निवडण्याचा लोकांचा हक्कहि उघडपणे मान्य करण्यात आला नाहीं. फक्त स्थानिक स्वराज्यसस्थानीं उमेदवार सुचवावेत व ते सरकारने मान्य करावेत, अशी पद्धति अस्तित्वांत आली शिवाय या सभासदाना कांहीं हक्कहि प्राप्त झाले नव्हते. पण या सुधारणांच्या पहिल्या हप्त्यानतर थोड्याच दिवसांत देशांत जहाल-मवाळ असे दोन राजकीय पक्ष अस्तित्वांत आले, हिंदु-मुसलमानांचे दगे सुरू झाले आणि राष्ट्रसभेनें राज्यघटनेंतील सुधारणाची चळवळ सोडून दिली; व तिला लोकमत प्रदर्शित करणाऱ्या केवळ वार्षिक समेलनाचे स्वरूप प्राप्त झाले. जहाल राजकारण आणि लोकजागृतीची चळवळ करणाऱ्या पक्षाला नोकरशाहीच्या रोषाला बळी पडून राजद्रोहाच्या आरोपाखालीं तुरुगाचा रस्ता सुधारावा लागला. हे जहाल-मवाळ राजकीय मतभेद, हिंदु-मुसलमानाचे दगे आणि जहाल पक्षाचा कारावास, या सर्व गोष्टी मुंबई-पुण्यांतच घडून आल्यामुळे या काळांत मुबई-पुण्यांतील पुढाऱ्यांकडे सर्व राष्ट्राचे चित्त आकर्षिले जाणें अगदीं साहजिक होते पण या सर्व गोष्टी १८९३ चा कायदेमंडळांच्या सुधारणांचा कायदा झाल्यानतरच्या आहेत. त्यापूर्वीच्या आठ वर्षांचा इतिहास आणखी थोड्या विस्ताराने आपण पाहू.

## पहिल्या आठ वर्षांचा इतिहास

राष्ट्रसभेचे दुसरें अधिवेशन कलकत्त्यास दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखालीं आणि तिसरे अधिवेशन मद्रासमध्यें बद्रुद्दिन तैय्यबजी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें पहिले अध्यक्ष ख्रिस्ती, दुसरे पारशी आणि तिसरे मुसलमान, हे दृश्य पाहून नोकरशाहीला मनांतून राष्ट्रसभेचा हेवा आणि धास्ती वाटू लागली त्यांतून मद्रास येथें झालेल्या तिसऱ्या अधिवेशनानंतर मि० ह्यूम यांनीं राष्ट्रसभेची वाढती लोकप्रियता पाहून तिचे केवळ वार्षिक संमेलनाचें स्वरूप बदलून तिला इग्लंडांतील 'ॲंटी कॉर्न लॉ लीग' प्रमाणें लोकांत चळवळ करणाऱ्या संस्थेचें स्वरूप देण्याचे ठरविलें. ह्यूम आपल्या भाषणात म्हणाले, "प्रतिनिधींनीं आजपर्यंत सरकारला जागें करण्याचा प्रयत्न केला आहे; पण सरकारनें जागें होण्याचें नाकारिलें आहे.

सर्व अनियंत्रित सरकारांप्रमाणें आमचें सरकारहि बोध घेण्याचें नाकारीत आहे. आतां आपण राष्ट्राला जागे केले पाहिजे विलायतेतील बेटात राहणारें मोठे ब्रिटिश राष्ट्र आणि त्यांहूनहि मोठें असें हें खंडतुल्य राष्ट्र, यांना आपण जागें केले पाहिजे. कॉब्डेनप्रमाणेच आपल्या हक्कांसाठीं, स्वातंत्र्यासाठीं आणि न्यायासाठीं जो लढा आम्हीं सुरू केला आहे, त्यांत ह्या भारतमातेच्या पवित्र भूमीवर जगणारा प्रत्येक हिंदी मनुष्य आमचा सहकारी, आमचा बधु व गरज पडल्यास आमचा सैनिक बनला पाहिजे" हे लोकजागृतीच्या चळवळीचे नवें धोरण राष्ट्रसभेने स्वीकारल्या-बरोबर सरकार आणि राष्ट्रसभा याच्यांत विरोध उत्पन्न होऊ लागला. १८८६ सालीं कलकत्त्यास दुसऱ्या अधिवेशनानतर लॉर्ड डफरीन यानीं राष्ट्रसभेच्या प्रतिनिधींना एक "उद्यानोपहार" दिला होता आणि मद्रासच्या वेळीं तेथील गव्हर्नरानीं तर सभा चालू असतां भेटहि दिली होती पण चौथ्या अधिवेशनाच्या वेळीं अलाहाबादेस राष्ट्रसभेला मंडप बाधण्यासहि जागा मिळू नये अशी कारवाई सरकारी अधिकाऱ्यांकडून सुरू झाली! अखेरीस दरभग्याच्या महाराजानीं गव्हर्नराच्या बगल्याशेजारींच एक प्रशस्त बाग असणारा बंगला विकत घेतला व तेथें राष्ट्रसभेचें अधिवेशन भरविण्यास जागा दिली अर्थात् आपल्यासमोर भरणारे हे राष्ट्रभक्तांचें संमेलन डोळयांनीं पाहण्यापेक्षां आपण कोठे तरी दौऱ्यावर जावे हेच उचित आहे, असे ठरवून गव्हर्नरसाहेबानीं तो रस्ता स्वीकारिला.

तथापि या वेळीं ठिकठिकाणाहून राष्ट्रसभेला येणाऱ्या प्रतिनिधींना प्रतिबंध करण्याचे धोरण सरकारने स्वीकारिले होते राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांकडून चांगल्या वर्तनाबद्दल हमी म्हणून जामीन मागण्यांत येऊं लागले आणि राष्ट्रसभेला हजर राहणें हें दुर्वर्तन ठरविण्यांत येऊ लागलें! पजाबमध्यें या वर्षी पांच-सहा हजार लोकाकडून जामीन घेण्यांत आले होते, असे राष्ट्रसभेच्या त्या वर्षीच्या वृत्तान्तांत नमूद आहे हा वृत्तान्त पुढे म्हणतो :

"राष्ट्रसभेची कल्पना आज लोकांत इतकी रुजली आहे, कीं कोणतीहि ऐहिक शक्ति तिला दडपून टाकू शकणार नाहीं आज जरी राष्ट्रसभेचें कार्य करणारें दहा हजार लोक हद्दपार करण्यांत आले, तरीहि ही कल्पना पसरतच राहील आणि ती हिंदुस्थानांतील प्रत्येक स्त्री-पुरुषाचे व बालकाचे चित्त भारून टाकील. ज्या ज्या मनात तिचा प्रवेश होईल, त्या त्या मनापासून तिला अधिकाधिक शक्ति प्राप्त होत राहील. मूलतः हिचें स्वरूप हितकारक असून लोकांत शांतता व सद्वृत्ति यांची वृद्धि व्हावी असेंच ते आहे पण अधिकारीवर्गाचा विरोध आणि छळ यामुळें हिचें सामर्थ्य वाढेल; इतकेच नाहीं, तर त्यामुळे तिचे उघड, संशयातीत आणि सनदशीर असें जें स्वरूप आहे तें नष्ट होऊन त्याला गुप्तकटांच्या बेसनदशीर चळवळीचें रूप प्राप्त होईल" हा वृत्तांत ह्यूम यांनीं लिहिला असून त्यात लॉर्ड लिटन यांच्या कारकीर्दीत दडपशाहीमुळें क्रांतिकारक वातावरण कसे निर्माण झाले होतें, व तें पुढें लॉर्ड रिपन

यांच्या उदार धोरणामुळें कसे नष्ट झालें, ते त्यांनीं दाखवून दिले आहे राष्ट्रसभेची लोकप्रियता खरोखरच या अधिकारीवर्गाच्या विरोधामुळे वाढू लागली होती या अधिवेशनास निरनिराळया ठिकाणांहून मिळून १२४८ प्रतिनिधी हजर राहिले होते अध्यक्षस्थानीं कलकत्त्यांतील युरोपियन व्यापारी मि. यूल हे विराजमान झाले होते. त्यांनीं आपल्या भाषणांत प्रातिनिधिक राज्यपद्धतीचा पुरस्कार केला आणि १८५८ सालींच लॉर्ड पामर्स्टन यानीं प्रातिनिधिक संस्थांची एक योजना पुढे मांडण्याचा विचार केला होता, पण त्या वेळीं देशांत शांतता नसल्यामुळे शांतता प्रस्थापित होईपर्यंत इंग्लडनें हिंदुस्थानचे राज्य ट्रस्टी म्हणून करावे असे ठरलें, याचा उल्लेख करून राष्ट्र-सभेची चळवळ पार्लमेंटच्या व महाराणीच्या हेतूस धरूनच आहे, असे प्रतिपादन केले

या अधिवेशनानतर राष्ट्रसभेचे सरचिटणीस ह्यूम आणि सयुक्त प्रांताचे गव्हर्नर सर ऑक्लंड कोल्विन यांच्यात पत्रव्यवहार झाला त्यांत सर ऑक्लड कोल्विन यानीं आपले म्हणणें पुढीलप्रमाणे मांडिले: "केवळ तात्त्विक दृष्टया राष्ट्रसभेबद्दल आपली सहानुभूति आहे कार्यपद्धतीसंबधींहि पहिल्या तीन सभा होईपर्यतच्या कार्यपद्धतींत आक्षेपार्ह असें कांहीं नव्हतें पण १८८७ मधील मद्रास-अधिवेशनानतर माझ्या सहानुभूतीला जोराचा धक्का बसला व तिने उलट खाल्ली 'अँटी कॉर्न लॉ लीग'च्या धर्तीवर जो चढाऊ धोरणाचा प्रचार चालू झाला आहे, तो हिंदुस्थानच्या आजच्या परिस्थितीत अकालीं आहे व त्यामुळे मूळचा हेतु सिद्धीस जाणार नाहीं. या प्रचारांत सरकार व अधिकारीवर्ग याच्याविरुद्ध कडक शब्द वापरल्याने द्वेष पसरतो आणि याला विरोधी प्रचारहि सुरू होऊन देशात दोन विरोधी तट पडण्याची भीति आहे. आम्हीच राष्ट्राचे प्रतिनिधी आहोंत, हे राष्ट्रसभेचे म्हणणे खरे नाहीं"* शेवटी त्यांनीं राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यास अशी सूचना केली आहे, कीं लोकहिताच्या दृष्टीनें राजकीय सुधारणेपेक्षा सामाजिक सुधारणा अधिक महत्त्वाची आहे, हे राष्ट्र-सभेने लोकांना पटवावे.

यावर ह्यूम यांनीं जें उत्तर दिले, त्यातील मुख्य मुद्दे पुढीलप्रमाणें आहेत: "हा प्रचार अकालीं नसून वस्तुतः तो फार उशीरा सुरू झाला आहे खेड्यातील लोकांत राज्यकारभाराबद्दल फारच असतोष माजला असून ते आपापसांत बोलतांना सरकारबद्दल फारच कटु शब्द वापरतात दु:ख व अन्याय हीं असह्य झालीं आहेत व त्यांचे निराकरण केल्याखेरीज भावी सकट टळणार नाहीं आम्ही आमचा प्रचार करतांना इंग्लिश सरकारविषयीं द्वेप न पसरवितां प्रेमच पसरवितो व अत्याचारांचा निषेध करतो. विरोधी प्रचार मूठभर अँग्लो-इंडियन लोकच सुरू करीत आहेत देशांतील सर्व सुसंस्कृत, बुद्धिमान् व देशभक्त लोकांचा राष्ट्रसभेलाच पाठिंबा आहे व मुसलमानसमाजाला राष्ट्रसभेविरुद्ध उठविण्याचे कार्य भेदनीतीने राज्य टिकवू इच्छिणारे ब्रिटिश अधिकारीच करीत आहेत."

---

* A. O Hume by Wedderburn, P 68-69.

अशा प्रकारे अधिकारीवर्गाच्या रोषाला न जुमानतां ह्यूम यांनीं आपलें अंगीकृत कार्य नेटाने पुढे चालविले या वेळीं दादाभाई इंग्लंडात जाऊन तेथील पार्लमेंटच्या सभासदाची सहानुभूति आपल्या कार्यास मिळवून घेत होते जॉन ब्राइट व फॉसेट हे यापूर्वी हिंदी राजकारणाकडे आपले लक्ष देत असत आता चार्ल्स ब्रॅडलॉ या उत्साही, स्वातंत्र्यप्रिय आणि धडाडीच्या पार्लमेंटच्या सभासदास हिंदी पुढाऱ्यांनीं आपल्या कार्यास वश करून घेतलें आणि त्याच्या मार्फत ब्रिटिश पार्लेमेंटांत कायदेमंडळांच्या सुधारणाचें एक बिल आणण्याचे ठरविले १८८९ सालीं मुंबई येथें भरलेल्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनास ब्रॅडलॉ समक्ष हजर राहिले व येथील परिस्थिति पाहून राष्ट्रसभेच्या पुढाऱ्याच्या संमतीनें त्यांनीं आपल्या बिलाची रचना केली. ब्रॅडलॉ यांचें या आधिवेशनांत भाषणहि झाले यामुळें ही सभा त्या वेळीं फारच गाजली. ब्रॅडलॉ यांना आपल्या कार्यांत गोवून घेण्याचे श्रेय मि उमेशचंद्र बानर्जी यांना देण्यात येत असते या वर्षी मि वेडरबर्न हे अध्यक्ष होते. पुढील आधिवेशन फेरोजशहा मेथा याच्या अध्यक्षतेखालीं कलकत्त्यास भरले या वेळीं सरकारी अधिकाऱ्यांनीं राष्ट्रसभेस प्रेक्षक म्हणूनहि हजर राहू नये, असा हुकूम काढण्यांत आला. या वेळेपासून न्या रानडे यांच्यासारख्याची फार कुचंबणा होऊ लागली तथापि सामाजिक परिषदेच्या निमित्ताने ते राष्ट्रसभेच्या वेळीं त्या त्या गावीं हजर असत व खाजगी सल्लामसलतीचा लाभ तिला देत असत. चार्ल्स ब्रॅडलॉ यांनीं पार्लमेंटात आणलेल्या बिलाला, आम्ही ज्या सुधारणासाठीं चळवळ करीत आहो त्यांचा त्यांत अंशतः अंतर्भाव झाला आहे, म्हणून राष्ट्रसभा पाठिंबा देत आहे असा ठराव या सहाव्या अधिवेशनात करण्यात आला तसेंच सरकारी अधिकाऱ्यांनीं प्रेक्षक म्हणूनहि राष्ट्रसभेस हजर राहू नये या सरकारी धोरणाचा निषेध करण्यांत आला. या वेळीं इंग्लडात जाणारे शिष्टमडळ म्हणून दादाभाई नौरोजी, जॉर्ज यूल, ह्यूम, ॲडाम, नॉर्टन, हॉवर्ड, फेरोजशहा मेथा, सुरेंद्रनाथ बानर्जी, मनमोहन घोष, शरीफउद्दीन, मुधोळकर, उमेशचद्र बानर्जी याची योजना गेल्या सालीं झाली होती, ती कायम करून श्री. दाजी आबाजी खरे, कालीचरण बानर्जी वगैरे एक-दोन अधिक लोकांचीहि नेमणूक करण्यांत आली इतकेंच नाहीं, तर १८९२ सालीं खुद्द इंग्लडांतच राष्ट्रसभेचे अधिवेशन भरवावे आणि त्यासाठीं हिंदुस्थानांतून शंभर प्रतिनिधी पाठविण्यांत यावेत, असाहि एक ठराव करण्यांत आला.

हा ठराव झाल्यापासून राष्ट्रसभेचे सूत्रचालक मि ह्यूम याच्या विचाराला एक नवीनच दिशा लागूं लागली व ती म्हणजे राष्ट्रसभेचे हिंदुस्थानातील कार्य आतां निदान कांहीं वर्षें तरी तहकूब करून ते केवळ इंग्लंडांतच सुरू ठेवावे १८९१ अखेर नागपूर येथें राष्ट्रसभेचे सातवे अधिवेशन भरणार होते. त्याच्या आधीं कांहीं दिवस त्यांनीं आपली ही कल्पना जाहीरपणें लोकांपुढे मांडली या निर्णयाचीं आपलीं कारणें त्यांनीं पुढीलप्रमाणे मांडलीं होतीं असे २१-९-१८९१ च्या 'सुधारकां'त आगरकर

लिहितातः " हिंदुस्थानांत कोणत्या गोष्टी पाहिजेत व त्या कोणत्या रीतीनें मिळण्याचा संभव आहे, याविषयीं सगळया हिंदुस्थानभर चर्चा होऊन त्या संबंधानें सर्व समंजस लोकांचे विचार कायम व्हावे आणि ते त्यांच्या हृत्पटलावर खोदले जावे हा जो ह्या सभेचा मूळ उद्देश, तो ह्यूमसाहेबाच्या मते पूर्णपणे तडीस गेला आहे अशोक राजाच्या शिलालेखांपैकीं कांहीं घासून गेले आहेत व थोड्या वर्षांनीं इतरांचीहि तीच अवस्था होणार आहे, पण या राष्ट्रसभेने भारतीयाच्या हृत्पट्टिकेवर जो ठसा उमटविला आहे, तो केव्हांहि लयास जाण्यासारखा नाहीं ! तेव्हा कांहीं वर्षे या सभेची समिध शेकण्यास हरकत नाहीं ! दुसरे या सभेकरिता प्रतिवर्षी लोकास दीड लक्ष रुपये खर्च करावे लागतात. आजपर्यंत हा खर्च करणें आवश्यक होते. पण सध्यां ज्या अर्थी राष्ट्रसभेने करण्यासारखे कोणतेहि काम राहिलेले नाहीं, त्या अर्थी आणखी एकादें विशेष महत्त्वाचे काम निघेतोपर्यंत हा खर्च विनाकारण होणार आहे. सव्वा लाखाची किंवा दीड लाखाची रक्कम कांहीं लहान नाहीं तेव्हां ती निष्कारण खर्च करणे योग्य नाहीं तिसरे ह्यूम साहेबांची प्रकृति नीट नसल्या-मुळें त्यांस येथून पुढें राष्ट्रसभेच्या चिटणिसाचें काम करण्याचें सामर्थ्य उरलें नाहीं. तें इंग्लंडांत राहून करावें, तर प्रतिवर्षी राष्ट्रसभेच्या बैठकीच्या सुमारास येथें राहण्याची दगदग त्यांच्याने होईल असें वाटत नाहीं. शिवाय यापुढे येथल्यापेक्षां इंग्लडात राहून आपल्या शक्तीप्रमाणे या देशाचा अधिक फायदा करतां येईल असे त्यांस वाटू लागले आहे या व अशाच कांही आणखी कारणांकरितां राष्ट्रसभा कांहीं वर्षे बद ठेवावी असा ह्यूमसाहेबाचा अभिप्राय झाला आहे व त्यास कॉंग्रेसच्या ब्रिटिश कमिटीची समति पडली आहे "§ या लेखाच्या अखेरीस आगरकर म्हणतात: " येथल्या सभेनें करण्यासारखा कांहीं कार्यभाग आतां उरला नाहीं, हा अभिप्राय ह्यूमसाहेबांनीं आमच्या कर्तृत्वाविषयीं, देशाभिमानाविषयीं व उद्योगपरायणतेविषयीं अत्यत निराश होऊन दिला असावा, असा आमचा समज आहे " यानतर या विषयावरील दुसऱ्या लेखांत ते लिहितात : " ह्यूमसाहेबानीं येथील कांहीं मित्रांस जीं पत्रें लिहिलीं आहेत त्यांवरून आमचा तर्क खरा आहे, असे आम्हांस आमचा लेख लिहून गेल्यानंतर समजण्यांत आले आहे." या लेखाच्या अखेरीस राष्ट्रसभा बंद ठेवतां कामा नये असें आग्रहाने प्रतिपादितांना ते लिहितात : " आमच्या देशांतील मोठमोठ्या पगारांच्या जागा परक्या लोकांच्या हातांत गेल्या आहेत; जबाबदारीचीं व वजनदारीचीं सर्व कामे परके लोक करीत आहेत, आमच्या व्यापाराचा बराच भाग परक्या लोकांच्या हातांत गेला आहे; अनेक वर्षांच्या परराज्यतपनतापामुळें आमचें स्वावलंबन, आमची कर्तबगारी, आमचा उल्हास, आमचें शौर्य वगैरे गुणांचा ऱ्हास झाला आहे, किंवा त्यास जबरदस्त उतरता पाय लागला आहे; राष्ट्रसभेसारख्या गोष्टींचें महत्त्व ज्यास समजतें ते निर्धन आहेत, व जे सधन आहेत

§ निबधसग्रह, भाग १ रा, पृ. १२०.

त्यांस तें समजत नाहीं, यामुळे पंचवीस किंवा तीस कोटी लोकसंख्येच्या राष्ट्रांत शुद्ध राष्ट्रीय कामासाठीं लाख किंवा दीड लाख रुपये गोळा करण्याची मारामार पडूं लागली आहे—हें सारें जरी खरे आहे व यामुळे आमची अनास्था केवळ निष्कारण नाहीं असें दाखवितां येणार आहे, तथापि अशा स्थितींतहि आम्ही थोडेबहुत हातपाय न हालविले व कालच्या दिवसापेक्षा आजचा दिवस बरा करण्याचा प्रयत्न न केला, तर आजच्यापेक्षां उद्याचा दिवस अधिक वाईट येईल आणि उत्तरोत्तर आमची स्थिति अत्यत शोचनीय होत जाऊन अखेरीस पार्शियन, ग्रीक व रोमन लोकां-प्रमाणें भारतीयांस नामशेष व्हावे लागेल, हे सर्वांनीं ध्यानांत ठेविले पाहिजे; व हा दुर्धर व दुःखकारक प्रसग आपणावर न येऊं देण्याबद्दल ज्यानें त्यानें आपापल्या सामर्थ्याप्रमाणे झटले पाहिजे हा दुःखाचा प्रसंग टाळण्यास राष्ट्रसभेचें अप्रतिहत अस्तित्व एक बलवत्तर साधन सुदैवकरून आपणांस प्राप्त झाले आहे तेव्हां हरप्रयत्न करून ते आपल्या हातातून जाऊ न देणें हें आपलें आद्य कर्तव्य आहे राष्ट्रसभेचा कार्यभाग अद्यापि उरकला नाहीं. कसा नाहीं, हे पुढल्या अकांत दाखविण्याचें आश्वासन देतों आणि आज येथेच मुक्काम करतों ”

## राष्ट्रसभेच्या ध्येयाचा विचार

पुढील अंकांत राष्ट्रसभेचें कार्य कोणते व ते केव्हां सपेल यासंबधीं आगरकरांनीं पुढील विवेचन केले आहे: “ आमच्या राष्ट्रास खरें राष्ट्रपण आणण्या-साठीं राष्ट्रसभेची स्थापना झाली आहे असें आम्ही समजतों तेव्हां ते राष्ट्रपण येईतोपर्यंत आमच्या राष्ट्रसभेचे काम झालें असे कोणासहि वाजवी रीतीनें म्हणतां यावयाचें नाहीं. अलीकडील राजकीय विचारपद्धतीप्रमाणे कोणत्याहि राष्ट्राला राष्ट्रपण येणें म्हणजे त्यावर अंमल करणाऱ्या सरकारचें नियत्रण किंवा नियमन त्यांतील लोकांचे हातीं येणें होय. ज्या प्रमाणाने हिंदुस्थानचें राज्य इंग्लडांतून होत राहील, त्या प्रमाणानें इंग्लंडच्या धर्तीवर येथें स्थापिलेल्या राजकीय संस्थांत आधिकाराचा उणेपणा राहिलाच पाहिजे. पण जर यासंबधानें इंग्लंडाचें अनुकरण करणे इष्ट असेल, तर तेथील हौस ऑफ कॉमन्ससारखी राजसभा येथें स्थापण्यांत येईतोंपर्यंत राष्ट्रसभेचा कार्यभाग उरकला असे म्हणणे अप्रयोजक होणार आहे ”*

अखेरीस या विषयाची बरीच भवति न भवति नागपुरास होऊन त्याचा विचार करण्यासाठीं एक मंडळ नेमण्याचा ठराव त्या अधिवेशनांत करण्यात आला. पुढें राष्ट्रसभा बद करू नये व चालू ठेवावी असाच निर्णय झाला हें जरी खरें असलें, तरी तिला जनतेंत जागृति करणाऱ्या चळवळया संस्थेचें स्वरूप द्यावे हा जो ह्यूम-दादाभाईचा उद्देश, तो मुळींच सिद्धीस न जातां ती संस्था केवळ वार्षिक संमेलनाच्या स्वरूपांतच जिवत राहिली. १८९२ सालीं ह्यूम यांनीं लोकांत चळवळ

* किता, पृ १२७–२९.

करण्याची कां व कशी आवश्यकता आहे, यासबंधीं चर्चा करणारे एक गुप्त सर्क्युलर राष्ट्रसभेच्या सभासदांकडे पाठविले व ते ठिकठिकाणच्या कार्यकर्त्यांत वाटण्याची विनति प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांना केली हे सर्क्युलर राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांत वाटणे मोठे धोक्याचें आहे, असें अलाहाबाद व मुंबई येथील प्रांतिक कमिट्यांनीं ह्यूमसाहेबांस कळविलें अखेरीस ह्यूम यांच्या आग्रहावरून अलाहाबादच्या कमिटीने ते राष्ट्रसभेच्या सभासदांत वाटिलें, पण मुंबईच्या कमिटीनें तसे करण्याचे स्पष्टपणें नाकारिले व तसे केल्यास राष्ट्रसभेवर राजद्रोहाचा आरोप येईल, असे आपले मत व्यक्त केलें !

## दडपशाहीची भीति

हा सर्व प्रकार पाहून पुण्यांतील तरुण पक्षाचे पुढारी टिळक व आगरकर यांचीं अतःकरणे सतप्त झालीं व त्यांनीं त्या पत्रकांतील आशय उघडपणें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करून सरकारास एक प्रकारे आपणावर खटले भरण्यास आव्हानच दिले यासबंधीं आगरकर लिहितात : "पण याहिपेक्षा अधिक चमत्कार व विस्मय वाटण्यासारखी गोष्ट ही, कीं ज्या ह्यूमसाहेबानें ही राष्ट्रसभा आस्तित्वांत आणिली आणि आपले सामर्थ्यसर्वस्व खर्च करून तिचें हरएक प्रकारे आज सात वर्षें सरक्षण केलें, तीवर त्याच्या जातभाईनी राजद्रोहाचा बडगा उचलतांच आमच्यांतील शहाणेसुर्ते म्हणविणारे लोकहि तीवर तुटून पडू लागले ! खासा न्याय ! खासे धैर्य ! खाशी देशभक्ति ! हिंदुस्थानच्या काळीचे उत्पन्न सुमारे वीस कोटी रुपये आहे व तेवढाच लष्करी खात्याचा खर्च आहे हिंदुस्थानच्या सैन्याइतकें महागडें सैन्य दुसऱ्या कोणत्याहि देशात नाहीं व सैन्यावर होणाऱ्या धिप्पाड खर्चाचा बराच भाग हिंदू लोकांच्या खिशात पडत नाहीं. जवळजवळ याचप्रमाणे इतर खात्यांचीहि व्यवस्था आहे त्यामुळे हिंदुस्थानच्या पाऊणशे किवा ऐंशी कोटी उत्पन्नापैकीं सुमारे दोन तृतीयांश उत्पन्नापासून द्रव्यद्वारा कवडीचाहि मोबदला मिळत नाहीं, असे म्हणण्यास हरकत नाहीं. असा प्रकार एक वर्ष नाहीं, दोन वर्षें नाहीं, सुमारें शभर वर्षे चालला आहे. या शंभर वर्षांत हिंदुस्थानचे उत्पन्न सरासरीने चाळीस कोटी पडलें असें धरिलें आणि त्याचा फक्त अर्धा भाग इंग्लिश लोकांच्या खिशांत अचानक पडला असे मानिले, तरी एका शतकांत दोन निखर्व रुपये या देशांतून परदेशात गेले असा हिशेब होतो. ज्या देशाच्या उत्पन्नाला असा पाझर लागला आहे, त्या देशांतील लोकांना अशी अन्नान्नदशा प्राप्त होणे हे किती स्वाभाविक आहे ! इग्रजी राज्यापासून या देशावर घडणाऱ्या या भयंकर परिणामांची पुरी कल्पना ज्यांच्या मनांत पक्की बिंबली असेल, त्यांना आणखी पांच-पचवीस वर्षें असाच क्रम चालू राहील तर हिंदुस्थानचे लोक एकमेकास खाऊ लागतील किंवा भुकेच्या दुःसह यातनामुळें बेफाम होऊन ते आपल्या राज्यकर्त्यांचें जू झुगारून देण्यास प्रवृत्त होतील असे

डोळ्यांपुढे ढळढळीत दिसून आल्याखेरीज राहील काय? व ज्यांच्या अंतःकरणांत खऱ्या देशाभिमानाचा व खऱ्या मनुष्यपणाचा काहीं अंश आहे, त्याला ही गोष्ट उघडपणें बोलल्यावांचून राहवेल काय? ह्यूमसाहेबानीं आपल्या पत्रात याहून अधिक काय म्हटलें आहे? हिंदुस्थानच्या भयप्रद दारिद्र्याचे त्यांत जें भयंकर चित्र काढलें आहे, तें खोटें आहे असे म्हणण्याची कोणाची छाती आहे? दादाभाई नौरोजी, सर एव्हलिंग बेअरिंग, डॉक्टर हटर, सर चार्ल्स डिल्क वगैरे बहुश्रुत गृहस्थ तर राजद्रोही नाहींत ना? पण त्यानीं प्रसिद्ध केलेल्या हिशेबांवरून असे उघड होते, कीं ब्रिटिश अमलातील हिंदी मनुष्याचें वार्षिक उत्पन्न सरासरीनें तीस रुपयापेक्षां अधिक नाहीं, तसेंच हिंदुस्थानातील निम्मे किंवा दोनतृतीयाश लोक अर्ध्यापोटीं सारा जन्म काढतात! राजनिष्ठ लोकांनीं अशी जबानी दिली असून अँग्लो-इंडियन पत्राबरोबर आमच्या लोकानीं ह्यूमसाहेब अतिशयोक्ति करतात, ह्यूमसाहेब पराचा कावळा करतात, वार्धक्यामुळें ह्यूमसाहेबास वेड लागल्यासारखें झालें आहे, अशा रीतीने बरळणे हा केवढा प्रमाद व कृतघ्नपणा होय! चार साहेब लोकाकडून बरे म्हणवून घेण्यासाठीं हिंदुस्थानच्या व इंग्लडच्या खऱ्या हितचिंतकांवर अशा रीतीने उलटून पडणे हे आम्हा भेकड, लोभी, अविचारी व स्वार्थी हिंदू लोकाशिवाय दुसऱ्या कोणाच्यानेहि होण्यासारखे कर्म नाहीं. ज्यांनीं ह्यूमसाहेबास भ्रमिष्ट ठरविलें, त्यानाच तसे ठरविणे उचित होणार आहे! ह्यूमसाहेबा-सारखी आमची आम्हास काळजी असती, तर राजद्रोहाचा किंवा दुसरा कसलाहि आरोप आपणावर आणून घेण्यास व त्याचे परिणाम साहण्यास आम्ही तयार झालो असतो. ह्यूमसाहेबास बेवकूफ ठरविणाऱ्या या वृद्ध शाहण्याना एवढे तरी समजाव-याला हवे होते, कीं ह्यूमसाहेबास अगोदर फाशीं चढविल्याशिवाय फांसाचे पदर आपल्या गळयाभोवतीं बसण्याचा सभव नाहीं पण इतके धैर्य आमच्या अंगीं असतें, तर आमची साप्रत दास्यावस्था आम्हास कोठून प्राप्त झाली असती!"*

लो टिळक या सर्क्युलरासबंधीं ता ५ एप्रिल १८९२ च्या केसरींत लिहितातः "ह्यूमसाहेबाचें असे म्हणणें आहे, कीं हा जो तुम्ही निष्काळजीपणा व बेफिकीरपणा चालविला आहे, त्याचे भयकर परिणाम तुम्हास केव्हांना केव्हा तरी सोसावे लागतील तुम्ही आपल्या डोळ्यावर कातडे ओढून घ्याल, पण एकंदर प्रजा दारिद्र्याच्या व भुकेच्या भट्टींत पडून तावून निघाली, म्हणजे त्यास तुमच्या डोळ्यावरील कातडें दूर करण्यास एक क्षणभरहि वेळ लागणार नाहीं तुम्हास असे वाटत असेल, कीं या गरीब प्रजेच्या हातून काय होणार? परंतु हा तुमचा समज अगदीं चुकीचा आहे. क्षुधा व दारिद्र्य मनुष्यास काय करावयास लावील याचा नेम नाहीं फ्रान्स देशांत राज्यक्रांति होण्यापूर्वी अशीच शांतता दृष्टीस पडत होती; पण प्रसग आला तेव्हां ती सर्व एका क्षणांत नाहींशी होऊन जिकडेतिकडे एकच कल्लोळ होऊन गेला. सरकार अशा समयीं तुमचें संरक्षण करील असें जर तुम्हांस वाटत असेल, तर तीहि चूक आहे

---

* निबधसग्रह, भाग १ ला, पृ. १८५.

दारिद्यानें व क्षुधेनें गांजलेल्या लोकांपुढे सरकार व तुम्ही या दोघाचाहि टिकाव लागणार नाहीं. गरीब लोकांस पुढारी मिळणार नाहींत असें तुम्हांस वाटत असेल; पण वेळ आली म्हणजे पुढारीहि निपजतात, हे तत्त्व लक्षांत ठेवा ज्यात सरकारचें हित आहे त्यातच तुमचेहि हित आहे इंग्रज सरकारचे राज्य आहे तोंपर्यंत तुमची बढती व मान्यता आहे हे राज्य गेले कीं तुम्हास कोणीहि विचारणार नाहीं व तुमची संपत्तीहि कोणी तुमच्याजवळ टिकूं देणार नाहीं; करितां वेळींच जागे व्हा व सरकार झोप घेत असलें, तर त्यासहि जागें करा हिंदुस्थानांतील प्रजेची स्थिति सुधारल्याखेरीज तुमची अगर सरकारचीहि शाश्वती नाहीं .. ... आपण मेल्याने जग बुडाले असे होत नाहीं, म्हणून ही जी हिंदुस्थानच्या प्रजेस भयंकर स्थिति येत चालली आहे ती पूर्ण लक्षात आणून तिचा प्रतिकार करण्यास तुम्हांस झटलें पाहिजे व त्यासाठीं द्रव्याची जी मदत लागेल ती तुम्हीं उत्सुकतेने व हौसेनें दिली पाहिजे" यावर स्वतः लोकमान्य लिहितात: "ह्यूमसाहेबांचें सर्क्युलर सामान्य लोकास उद्देशून लिहिलेले नाहीं इंग्रजी राज्यात अगर इंग्रजांच्या मेहेरबानीनें ज्यांनीं द्रव्याचा संचय केला आहे, त्यांस उद्देशून हे सर्क्युलर काढिले आहे या लोकांची विद्या, धन, हुषारी, अधिकार आणि पदव्या सर्व काहीं इंग्रजी राज्याच्या शाश्वतीवर अवलंबून आहे, करिता इंग्रजी राज्याच्या शाश्वतीसाठीं सामान्य प्रजेपेक्षां यांसच झटून उद्योग व मेहनत केली पाहिजे. ह्यूमसाहेब काही कोणास बंड करण्यास सांगत नाहींत अगर चिथावूनहि देत नाहीत. प्रजा दरिद्री होत चालली आहे त्याचा आम्हीं योग्य वेळी प्रतिकार न केल्यास काय परिणास होईल, एवढेंच काय तें त्यांनीं सरकारास व संपन्न लोकांस कळाविले आहे व ज्या लोकांस ही गोष्ट कळविली ते लोक स्वतः बंड करणारे नसून उलट इंग्रजी राज्य चिरस्थायी व्हावे हेच त्यांच्या हिताचें आहे. अशा लोकांस जर आपल्या कर्तव्याचा कोणीं खणखणीत उपदेश केला, तर तो मनुष्य पिनल कोडांतील राजद्रोहाच्या व्याख्येप्रमाणे 'लोकांत सरकाराबद्दल अप्रीति उत्पन्न करतो' असें म्हणणें कधींहि वाजवी होणारे नाहीं. कित्येक शहाण्या लोकांनीं असा तर्क काढिला आहे, कीं ह्यूम साहेबाचें आम्हास काहीं वाटत नाहीं, परंतु निदान कॉंग्रेसच्या कामास धक्का येऊं नये एवढ्यासाठीं तरी हे सर्क्युलर प्रसिद्ध होणें इष्ट नाहीं. केवढी ही राष्ट्रीय सभेची जबरदस्त काळजी! जणु काय आज तीस जे स्वरूप आलें आहे, तें (यांच्या) दूरदर्शी विचारांचे फल होय आपला भित्रेपणा कसा झांकावा हे आम्ही फार चांगलें शिकलों आहो बाकी राष्ट्रहिताच्या कामीं झटून, कळकळीनें व स्वार्थाकडे लक्ष न देतां, मेहनत करण्याचा मक्ता मात्र आम्हीं ह्यूमसाहेबावर सोपविला आहे. त्यानें खुशाल मेहनत करावी व एकाद्या वेळीं कडक सर्क्युलर काढलें, तर आम्हीं त्याचा भिऊन निषेध करावा, असा त्यांचा-आमचा श्रमविभाग झाला आहे! अशानें कॉंग्रेस ह्यूमसाहेबांचे मार्गें कशी चालेल, याची आम्हांलाहि मोठी काळजीच वाटते."*

* लो. टिळकांचे केसरीतील लेख, भा. १ ला, पृ ४४-४६.

ब्रिटिश सरकार या वेळीं एका हाताने कायदेमंडळाच्या तकलुपी सुधारणांचा एक हप्ता देऊन दुसऱ्या हाताने ह्यूमसारख्या लोकांनीं सामान्य जनतेत जागृति करण्याचें धोरण राष्ट्रसभेला लावू नये म्हणून राजद्रोहाचा बागुलबोवा दाखवीत होतें, आणि आमच्या बाल्यावस्थेतील राष्ट्रसभेचे हिंदी पुढारी सावधगिरीच्या आणि मुत्सद्देगिरीच्या नावाखालीं ह्यूमसाहेबांना वेड्यांत किंवा माथेफिरूत काढीत होते, असा या सर्व प्रकरणावरून बोध होतो. अशा प्रकारे पहिल्या सात-आठ वर्षांतच राष्ट्रसभेच्या गोटांत जहाल-मवाल असा भेद उत्पन्न होण्याची भीति वाटूं लागली. यासबंधीं लो टिळक दुसऱ्या एका लेखांत लिहितात : " ह्यूमसाहेबाचें सर्क्युलर निघाल्यापासून कॉंग्रेसपक्षाची कशी काय स्थिति होते, याची सर्वांसच काळजी पडल्यासारखी झाली आहे.. मुंबई, अलाहाबाद, मद्रास वगैरे कमिट्यांकडून याचा उघड निषेध करण्यांत आला व कांहीं लोक राजद्रोहाच्या भीतीनें स्वस्थ बसले; परंतु हा भित्रेपणा सुदैवानें सर्वत्र फैलावला नाहीं.. ...आमच्यामध्यें अशा रीतीने उघड मतभेद झाला होता, तरी एकंदरींत नेटिव वर्तमानपत्रकारांनीं हळूहळू ह्यूम-साहेबांचीच बाजू धरून आपली पूर्ण अनुमति दर्शविली व कॉंग्रेसच्या पक्षात फूट पडण्याचा जो सभव होता तो बराच नाहींसा केला. अशा वेळीं ब्रिटिश कमिटीचें जर आम्हांस चांगलें पाठबळ मिळाले असतें, तर हिंदुस्थानातील राष्ट्रीय सभेच्या पक्षास बरीच हिमत आली असती; परतु खुद्द ब्रिटिश कमिटींतहि मतभेद होऊन डिग्बी व वेडरबर्न खेरीजकरून बहुतेकांनीं ह्यूमसाहेबांचें सर्क्युलर ब्रिटिश कमिटीस नापसत आहे असे जेव्हां प्रसिद्ध केले, तेव्हा आमचेकडील काहीं शकेखोर लोकास पुनः थोडीशी सधि सांपडली व या मतभेदापासून कॉंग्रेसच्या कामास पुनः काहीं धक्का येईल कीं काय, अशा कित्येकांनीं शंकाहि काढल्या होत्या. अशा स्थितींत अलाहाबादेस यंदाच्या कॉंग्रेसचे काम झपाट्याने चाललेले ऐकून पुष्कळ लोकास समाधान वाटेल यांत शका नाहीं राजद्रोही सर्क्युलराचे लेखक ह्यूमसाहेब यास अद्यापि कॉंग्रेसचे सेक्रेटरी राहूं देतील कीं काय, असे कुटिल प्रश्न कित्येक विघ्न-संतोषी लोक विचारीत आहेत, परतु सदर प्रश्न विचारणारांची हौस फिटण्याचा आमचेकडे तरी काहीं सभव नाहीं, इतकेच त्यास आम्ही खात्रीने कळवितो "*

अशा प्रकारे राष्ट्रसभेत या वेळीं दुफळी माजणार होती ती माजली नाहीं, याचें कारण सर्व राष्ट्रसभेने ह्यूम यांच्या कल्पनेप्रमाणे प्रचड चळवळ करण्याचे ठरविले हें नसून त्या कल्पनेला कोणींच पाठिंबा दिला नाहीं व ह्यूमसाहेब विलायतेस निघून गेले हे होय! पुण्यांत ज्या दोन तरुण देशभक्तांनीं ह्यूमसाहेबांस पाठिंबा दिला, त्यांपैकीं एक–म्हणजे आगरकर–लवकरच स्वर्गवासी झाले आणि लो टिळकांनीं सार्वजनिक सभेत नव्या चळवळीचा कडकपणा उत्पन्न करतांच जुने लोक त्यांतून बाहेर पडले. त्यांनीं नेमस्त प्रागतिक राजकारणासाठीं नवी डेक्कन सभा काढली.

* किता, पृ. ५५–५६.

या गोष्टी दोन-तीन वर्षांतच घडून आल्या आणि त्यामुळें राष्ट्रसभा चळवळ करणारी संस्था बनली नाहीं इ. स १८९२ सालीं नव्या सुधारणांचा कायदा झाला तेव्हां ही सुधारणा अपुरी असली, तरी तिचा राजनिष्ठेने स्वीकार करावा, असें राष्ट्रसभेने ठरविले व आपले वार्षिक समेलनाचे कार्य पुढे दहा-बारा वर्षे कसें तरी चालविलें पहिल्या दहा वर्षांतील ह्यूम-दादाभाईच्या युगांतील तिचा उत्साह पुढील दहा वर्षांतील मेथा-वाच्छांच्या युगात उरला नाहीं आणि राष्ट्रसभा सरकारी रोषापुढें नमली, असेंच देशातील तरुण पिढीच्या पुढाऱ्यांना वाटू लागलें.

## लजपतराय यांचा अभिप्राय

लाला लजपतराय यांनीं यासंबंधीं आपले असेंच मत दिलें आहे ते आपल्या "यंग इंडिया" पुस्तकांत लिहितात : "इंग्लडांतील चळवळ पैशाच्या अभावीं फसली आणि हिंदुस्थानांतील चळवळ चिकाटी, जोम आणि कळकळ यांच्या अभावीं ढांसळली. या बाबतींतहि आमचे असे मत आहे, कीं ह्यूमनीं पुढे जें धोरण स्वीकारिले ते स्वतःच्या बुद्धीच्या निर्णयानुसार स्वीकारले नसून ते स्वीकारिण्यास हिंदी पुढाऱ्याची भीति आणि अंगचुकारपणा याचा त्यांच्या मनावर झालेला परिणामच त्यास कारण झाला असावा. हिंदी पुढाऱ्यानीं आपलीं हत्यारें खालीं ठेविलीं नसतीं आणि प्रचाराचें काम पुढे रेटले असते, तर देशाने त्याना पैशाचा पुरवठा केला असता; आणि त्यांच्या निशाणाखालीं राष्ट्र गोळा झाले असते कदाचित् कांहीं थोडे दगे झाले असते व कांहीं लोकांचा छळहि झाला असता; पण त्यामुळेच त्यांनीं वीस वर्षे इंग्लडांत केलेल्या कामगिरीपेक्षा ब्रिटिश लोकांचे लक्ष हिंदुस्थानच्या स्थितीकडे अधिक परिणामकारकपणें ओढिले गेले असतें लोकाचें राजकीय शिक्षण अधिक जलद झालें असतें आणि चळवळीला इतका जोम प्राप्त झाला असता, कीं ती दुर्दम्य ठरली असती. हें शक्य आहे, किंबहुना संभवनीय आहे, कीं सरकारने ही चळवळ दडपून टाकिली असती पण तोच एक मोठा विजय ठरला असता आणि लोकांच्या राजकीय शिक्षणाचें पाऊल निश्चितपणे व परिणामकारक रीत्या पुढे पडलें असतें. क्रातिकारक चळवळहि कदाचित् आधीं झाली असती आणि १९०९ च्या फार पूर्वी नेमस्तांना संतुष्ट करण्याचें शहाणपण सरकारला सुचले असते १९०९ सालीं जें आम्हांस मिळालें, ते वीस वर्षें आधी मिळाले असतें १९०९ सालीं मुसलमानांना जे मिळालें, तेंच १८८९ सालीं मिळालें असते, तर त्यानाहि आनद झाला असता. तथापि हिंदी पुढाऱ्यांना वाटले, कीं आपल्या अंगीं पुरेसें सामर्थ्य नाहीं आणि चळवळ दडपली जाण्याचा संभव आहे म्हणून त्यानीं माघार घेतली आणि आपलीं राजकीय गाऱ्हाणीं दूर करण्याचे जें एक हत्यार तयार झाले होतें, ते त्यांनीं फेकून दिलें! आमच्या मागण्या नाकारल्या गेल्यास दोन्ही पक्षास गंभीर स्वरूपाचे परिणाम भोगावे लागतील अशी प्रतिपक्षाची खात्री करण्याइतकी कळकळ

जर कोणत्याहि राष्ट्रानें किंवा राजकीय पक्षानें केवळ बोलून नव्हे, तर वास्तविक-रीत्या व्यक्त केली नाहीं, तर त्यांना आपली चळवळ यशस्वी करितां येणे शक्य नसते इंग्लड, जर्मनी, फ्रान्स, इत्यादि देशातील राजकीय प्रगतीचा इतिहास हेच दाखवून देतो कोणत्याहि राजकीय चळवळीला तिचे पुरस्कर्ते जर आपल्या द्रव्याच्या व निश्चयाच्या बळाने पाठिंबा देण्यास तयार नसतील, तर अशी चळवळ सुरू न केलेली बरी "* तात्पर्य, महाराष्ट्रांतील लो टिळकप्रभृति तरुण पुढाऱ्यांप्रमाणेंच पंजाबमधील लालाजींचे या सर्व इतिहासाबद्दल मत आहे

## हिंदु-मुसलमानांत तंटे लाविले

असो. आता या प्रकरणाचा शेवट करण्यापूर्वी १८९३-९४ सालीं झालेल्या हिंदु-मुसलमानाच्या दंग्यासबंधी दोन शब्द तत्कालीन लेखाच्या आधारे देऊन हा विषय सपवू. १८९२ च्या सुधारणा-कायद्याचा व राष्ट्रसभेच्या चळवळीचा या दंग्यांशीं संबध असून त्याच्यामागें नोकरशाहीचे भेदनीतींचें राजकारण आहे, हे टिळक व आगरकर या दोघानीं स्पष्ट शब्दात लोकांपुढें माडिले आहे "आजपर्यंत कोणत्याहि राज्यात ज्या बडाळ्या किंवा मारामाऱ्या झाल्या, त्या ग्लॅड्स्टन् किंवा रिपन-सारख्याच्या वर्तनानें झालेल्या नाहींत; त्याला डिझ्रायली, लिटन अथवा टेपल यासारखे कोत्या समजुतीचे राज्यधुरधर लागतात! आपल्या अमलाला शाश्वती आणण्यासाठीं आपण होऊन एकाचा दुसऱ्याशीं तटा लावून देणे आवश्यक नसलें तरी त्याचें भाडण आपणास अपकारक नाहीं, तर काहीं अशीं उपकारक आहे असें यास वाटते तसेच प्रसगविशेषीं मुसलमान लोक आपल्या उपयोगी पडण्यासारखे आहेत, तेव्हा विशेष आयासावाचून त्याची मैत्री संपादून ठेवता आली, तर तसें करणें आपले कर्तव्य आहे असे हे लोक समजतात पण त्याना हे कसे कळत नाहीं, कीं जेव्हां आम्ही हिदू लोक ब्रिटिश पलटणींची पर्वा न करता ब्रिटिश लोकांच्या हातून आपले राज्य हिसकावून घेण्यास तयार होऊं, तेव्हा त्यांबरोबर त्यांना टेकू देणाऱ्या मुसलमान लोकाचाहि समाचार आम्हास सहज घेतां येणार आहे? ज्या इंग्रजी अधिकाऱ्यांना मुसलमानांची विशेष कळकळ येत असेल त्यांनीं त्याना पाहिजे तर स्वतःचे पगार लावून द्यावे, पण गरीब हिदूवर त्यांचेसाठीं विनाकारण इतराजी करूं नये, कारण हिंदु हा जरी पराकाष्ठेचा कृतज्ञ, राजनिष्ठ व शांतिप्रिय प्राणी आहे, तरी अन्यायाचा अतिरेक झाला असता त्याचेसुद्धां स्वस्वामित्व नाहींसें होणे हे अगदीं स्वाभाविक आहे, हे असल्या अधिकाऱ्यानीं हमेश ध्यानात ठेवले पाहिजे," असे अगदीं निर्वाणीचे शब्द या प्रकरणीं आगरकरांनीं १८९३ च्या जुलै महिन्यांत काढिले आहेत.

लो टिळकांनीं तर या विषयावर अनेक लेख लिहून सरकारचा पिच्छाच

* Young India by Lala Lajpatrai, P 152-53.

पुरविला होता. त्यांनीं १८९५ सालीं राष्ट्रसभेच्या दहा वर्षांतील कार्याचा जो आढावा घेतला आहे, त्यांत या दंग्यांचा प्रत्यक्ष संबंध राष्ट्रसभेच्या वाढत्या बलाशीं कसा आहे, ते पुढील शब्दांत उत्कृष्टपणे विशद केले आहे :

"राष्ट्रीय सभा ही केवळ सरकारला शिव्या देण्याकरितांच उत्पन्न झाली नसून हल्लींच्या राज्यव्यवस्थेतील दोष दूर होऊन सरकारचे व लोकाचें कल्याण व्हावे अशी तिची खरोखर इच्छा आहे व तदनुरूप उपाय सुचविण्याचीहि तिची तयारी आहे, असे सरकारच्या पक्केपणी लक्षांत येऊन चुकले. यामुळें अर्थात् राष्ट्रीय सभेच्या ठरावांना अधिक वजन आले व त्याचा परिणाम अखेर १८९२ सालीं लॉर्ड क्रॉस-साहेबांनीं मोठ्या मेहेरबानीने केलेला कौन्सिल-सुधारणेचा कायदा होय हा कायदा निव्वळ फसवणूक असून फक्त आमच्या समजुतीखातर तोंडावर फेकला होता, हे तेव्हांच सर्वांच्या लक्षांत आले व आतां अनुभवहि तसाच आला आहे हे खरे, पण असले सोंग तरी करण्यास स्टेट सेक्रेटरीला भाग पाडले, हा राष्ट्रीय सभेचा लहान-सहान कार्यभाग नाहीं. राष्ट्रीय सभेची दिशा कायम झाली व त्यामुळे तिच्या मागण्या व सूचनाहि नियमित होऊं लागल्या पहिल्या पंचवार्षिक यात्रेने एवढा फेरफार घडून आल्यावर राष्ट्रीय सभेचें दुसरे देशपर्यटन सुरू झालें पुनः कलकत्ता, नागपूर, प्रयाग, लाहोर व मद्रास अशी आवृत्ति होऊन दर वर्षीं थोडेबहुत पाऊल पुढें पडत गेले ही राष्ट्रीय सभेची चढती कला पाहून आमच्या ॲंग्लो-इंडियन हितशत्रूंस फारच धास्ती उत्पन्न झाली तिकडे पार्लमेंटातहि येथील गोऱ्या काम-दाराची काळींबेरीं कृत्ये एकामागून एक बाहेर येऊं लागलीं. स्पर्शजन्य रोगाच्या कायद्यासंबधानें लॉर्ड रॉबर्ट्ससारख्या वीरासहि दोन बायांची माफी मागावी लागली अफूवर कमिशन बसलें व शेवटीं सिव्हिल सर्व्हिससंबधाने हाउस ऑफ कॉमन्समध्ये आम्हास अनुकूल असा ठराव झाला. इकडे तिजोरी रिकामी पडण्याची वेळ आली मग काय विचारतां? आता हिंदुस्थानांतील इंग्रजांचे राज्य ऊर्फ गोऱ्या कामदारांचीं चैनबाजी खास बुडणार, असे त्यास वाटू लागले. या अनर्थाला कारण राष्ट्रीय सभेने सुरू केलेली राजकीय चळवळ असेहि त्याच्या मनाने घेतलें व म्हणून 'मूले कुठार.' करण्याकरितां सामदामापैकीं चौथा उपाय योजण्याचा कित्येकांनीं उपक्रम केला. सर सय्यद अहमद प्रभृतींना बगलेंत मारून मुसलमानास फितविण्यास प्रारंभ झाला. पण मुसलमानांस आपलेकडे घेण्यास काहीं आमिष दाखविले पाहिजे; पण गोऱ्या जांवयांची चैन कमी केल्याशिवाय मुसलमानांस तरी काय देतां येणार? व कोरड्या थापाथापीवर किती दिवस निभणार? तेव्हां कुंपणी-सरकारचा इतिहासप्रसिद्ध मार्ग बरा वाटू लागला व देशांत ठिकठिकाणीं हिंदु-मुसलमानांचे दंगे उपस्थित झाले १८९३ च्या जूनचा सिव्हिल सर्व्हिससंबधींचा अनुकूल ठराव झाला नसता, तर ऑगस्टपासून हिंदु-मुसलमानांचे तंटे कदाचित् सुरू झाले नसते असे पुष्कळांस वाटतें व तें अगदींच निर्मूल आहे असें आमच्यानें म्हणवत नाहीं. तात्पर्य, गेल्या वर्षापासून

राष्ट्रीय सभेला हे नवीनच अरिष्ट उत्पन्न झालें व एका प्रकारे मागच्यापेक्षां हें तरून जाणे कठिण होते...पण येथेंहि आमच्या देशाचें भाग्य पुन. उदयास आलें व दंग्यांच्या धामधुमींतूनहि गेलीं दोन वर्षे राष्ट्रीय सभा निर्विघ्नपणें पार पडली "*

अशा प्रकारचा ह्या राष्ट्रीय सभेच्या पहिल्या दहा अधिवेशनाचा त्रोटक इतिहास आहे. यांत राष्ट्रसभेवर दोन मोठीं सकटे आलीं. तीं म्हणजे एक सरकारच्या रोषाचे व दुसरें हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांचें; आणि तिच्या पदरांत १८९३ चा एक पोचट सुधारणा-कायदा पडला तथापि त्या वेळच्या परिस्थितींत ही प्रगतीहि समाधानकारक मानण्याशिवाय गत्यतर नव्हतें येथून पुढे म्हणजे १८९५ नंतर महाराष्ट्रात लो. टिळकांचा स्वतत्र राष्ट्रीय पक्ष निर्माण झाला त्याचे अस्तित्व इतर प्रातातील लोकाना प्रथम १८९५ च्या पुण्याच्या राष्ट्रसभेच्या वेळीं तिचा मडप सामाजिक परिषदेला द्यावा किंवा नाहीं या क्षुद्र वादाच्या स्वरूपात समजलें व त्यामुळें इतर प्रातीयाचा थोडा गैरसमजहि झाला तथापि पुढे हे गैरसमजाचे ढग वितळून जाऊन त्याचा प्रकाश सर्व हिंदुस्थानभर पसरला हा इतिहास वर्णन करण्यापूर्वी १८७५ पासून १८९५ पर्यंतच्या काळात सामाजिक व धार्मिक दृष्टया भारतीय संस्कृतीसबधीं कोणकोणते नवे विचारप्रवाह हिंदी वातावरणांत सचरू लागले, त्याचा विचार एका प्रकरणांत करणे अवश्य आहे

## ७

# भारतीय संस्कृतीचें तत्त्वमंथन

"आमचें मनुष्यत्व मुक्त झालें पाहिजे, आमच्या आशा उसळू लागल्या पाहिजेत, कर्तव्यात कधीहि कसूर न करणारी श्रद्धा जागृत झाली पाहिजे, सर्वांशी समदृष्टीनें व्यवहार करणारी न्यायबुद्धि प्रज्वलित झाली पाहिजे, बुद्धीवर आलेले सर्व अभ्र वितळून गेले पाहिजे आणि सर्व तटबदीचे उल्लघन करून आमच्या प्रेमाची गगा नदी वाहू लागली पाहिजे—म्हणजेच हिंदुस्थानला नवजीवन प्राप्त होईल आणि जगातील इतर राष्ट्रात आपलें योग्य स्थान प्राप्त करून घेऊन हा देश आपल्या परिस्थितीवर आणि भवितव्यावर प्रभुत्व गाजवू लागेल. हेच साध्य आम्हास प्राप्त करून घ्यावयाचे आहे, हींच अमरभूमि आहे ही ज्याना आपल्या दृष्टिपथात आणता येत असेल ते खरोखर सुखी होतात, ज्याना त्या भूमीकडे जाण्याचा रस्ता तयार करण्याची सधि लाभते, ते त्याहून सुखी होतात आणि जे या भूमीच्या पवित्र धूलीवर पदार्पण करतील आणि तिचे दर्शन घेण्यास जगतील, ते तर सर्वांतच सुखी गणले पाहिजेत. त्या वेळीं दुष्काळ आणि रोग, जुलूम आणि दु ख या गोष्टी केवळ दतकथात राहतील आणि ज्या पुराणाना आम्ही आज दतकथा म्हणतो, त्या पुराणातील काळाप्रमाणे पुन या भूमीत देव अवतरतील आणि ते मानवसमाजात वावरू लागतील"

—न्या. रानडे

---

*लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग १ ला, पृ. ३९८–९९.

"आकाशांतून देव येथे कधी आले नाहीत व येथून परत कधी गेले नाहीत. आम्हीच त्याना येथल्या येथे निर्माण करतो, त्याच्या गुणाचे पवाडे गातो, आणि चाहील तेव्हा त्यास नाहींसे करतो जो जों बुद्धीचा विकास होत जाऊन कार्यकारणाचा संबंध चांगला कळू लागतो, तो तो प्राथमिक व पौराणिक कल्पना मिथ्या भासू लागून भूत-पिशाच, देव-दानव वगैरे शुद्ध कल्पनेने उत्पन्न केलेल्या शक्तींची असत्यता प्रत्ययास येते, पूजेस व प्रार्थनेस ओहोटी लागते, आणि काही वेळ सर्व ब्रह्माण्डास उत्पन्न करून त्याचे परिपालन व नाश करणाऱ्या एका परमात्म्याच्या कल्पनेचा उदय होतो. पण पुढे वेदान्तविचाराच्या कुंडात पेटलल्या अग्नीत हे द्वैतहि खाक होऊन जाते आणि '**अहं ब्रह्माऽस्मि**' एवढा अनिर्वचनीय विचार माग राहतो। व्यक्तीच्या व राष्ट्राच्या धर्मविचाराचा हा कळस आहे. येथपर्यंत ज्याची मजल आली, त्याला सर्व धर्म तुच्छ आहत।" —गो ग आगरकर

"ह्यामुळे कर्म, बुद्धि (ज्ञान) आणि प्रेम (भक्ति) या तिहींमधील विरोध नाहीसा होऊन सर्व आयुष्य यज्ञमय करण्यास सांगणाऱ्या गीताधर्मात सकल वैदिक धर्माचे सार आहे. हा नित्य धर्म ओळखून केवळ कर्तव्य म्हणून सर्वभूतहितार्थ शेकडो खटाटोप करणारे व कर्ते पुरुष जेव्हां या भरतभूमीस अलंकृत करीत होते, तेव्हा हा देश परमेश्वराच्या कृपेस पात्र होऊन ज्ञानाच्याच नव्हे, तर ऐश्वर्याच्याहि शिखरास पोचला होता, आणि हा उभयत्र श्रेयस्कर पूर्वतर धर्म सुटला, तेव्हा त्याला निकृष्ट स्थिति प्राप्त झाली हे कोणासहि सांगावयास नको."

—लो० टिळक

**इसवी** सन १८७५ पासून १८९५ पर्यंतच्या काळांत हिंदी लोकांना आपल्या संस्कृतीच्या श्रेष्ठत्वाची जाणीव झाली आणि पूर्वी पाश्चात्य संस्कृतीच्या प्रकाशाने सुशिक्षित लोकांची दृष्टि दिपून गेली होती ती स्थिति नाहींशी होऊन त्याना आपल्या कर्तृत्वासंबधीं आत्मविश्वास आणि आपल्या राष्ट्राच्या भवितव्यासंबधीं उज्ज्वल आशा वाटू लागली १८७५ पूर्वीचे आमच्या लोकाचे सर्व उद्गार आणि त्यानंतरच्या देशभक्त कार्यकर्त्यांचे उद्गार यांत हेच मोठे अंतर दिसून येते. या सुमारास ज्या ज्या नव्या चळवळी उदयास आल्या, त्या त्या सर्व या नव्या आत्मविश्वासावर अधिष्ठित झालेल्या असून पूर्वीच्या पिढींतील कार्यकर्त्यांसहि हे नवें दृश्य पाहून आपल्या राष्ट्राच्या भवितव्यासंबधीं नवी आशा वाटू लागली (पारतंत्र्याच्या आघातामुळे मूर्च्छित होऊन पडलेल्या या खंडतुल्य प्रचंड राष्ट्रांत नवचैतन्य संचरू लागले आणि आपल्या स्वातंत्र्याचे दर्शन त्याच्या दृष्टिपथांत येऊं लागलें. या नवजीवनाच्या आणि नूतन आशावादाच्या काळात लोकजागृतीचे निरनिराळे संप्रदाय अस्तित्वांत आले आणि त्या संप्रदायांनी आधुनिक भारताच्या मनावर निरनिराळे संस्कार करण्यास सुरुवात केली महाराष्ट्रांत विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं १८७४ सालीं निबंधमाला सुरू करून एक नवा स्वाभिमानी राष्ट्रीय विचारसंप्रदाय निर्माण केला. त्याचीच वाढ करून पुढे लो टिळक आणि इतिहासाचार्य राजवाडे यांनीं महाराष्ट्रीय इतिहासाच्या पार्श्वभूमीवर आधुनिक भारताचा चित्रपट रेखाटण्यास सुरवात केली. या संप्रदायाची सामाजिक सुधारणेसंबधींची तात्त्विक भूमिका लोकमान्यांच्या शब्दांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल: "स्वतंत्रतेचा किंवा राष्ट्रीयत्वाचा अभिमान

म्हणून जो कांहीं जोम आहे, तो जोंपर्यंत जागृत असतो तोपर्यंत समाजरचना कशीहि असली तरी त्यांतील दोष राष्ट्राच्या उन्नतीस अथवा भरभराटीस आड येत नाहींत. पण एकदां का तो जोम नाहींसा झाला, म्हणजे तेच दोष रावणाच्या धनुष्याप्रमाणें छातीवर बसून जगातल्या लोकाची उपहास्यता होण्यास कारण होतात ! तात्पर्य, (विशिष्ट) समाजरचनेपेक्षा लोकांमध्ये एक प्रकारचा आपल्या सस्थाबद्दल व देशांबद्दल अभिमान जागृत ठेवण्याची प्रत्येक देशकल्याणाकरितां झटणाऱ्या माणसाने आधीं तजवीज ठेविली पाहिजे."* यालाच आम्ही 'स्वाभिमानी राष्ट्रवाद' असे नाव देतों सामान्यतः या राष्ट्रवादाचा आधार आपला वर्णाश्रमधर्म हा असून यालाच महाराष्ट्राच्या इतिहासात "महाराष्ट्र-धर्म" असे नांव मिळाले होतें, असें इतिहासाचार्य राजवाडे यांचे मत आहे या परपरागत वर्णाश्रमधर्मात किंवा महाराष्ट्र-धर्मात आधुनिक राष्ट्र-निर्मितीस लागणारीं बहुतेक सर्व तत्त्वे असून भगवद्गीता व दासबोधादि समर्थ-वाङ्मय हे या राष्ट्रवादाचे अगर राष्ट्रधर्माचे आधारग्रथ आहेत श्रीशिवाजीमहाराज ही या धर्मातील आराध्यदेवता आणि भगवान् श्रीकृष्णाचा प्रवृत्तिपर कर्मयोग आणि शंकराचार्यांचा अद्वैत सिद्धान्त व सनातन धर्मनिष्ठा हे याचे परपराप्राप्त सस्कृतिधन आहे (याला सामाजिक सुधारणा इष्ट वाटत असल्या, तरी आपल्या सस्कृतीचा पाया पाश्चात्य संस्कृतीपेक्षां अधिक श्रेष्ठ तत्त्वावर आधारलेला आहे, असे वाटत असून सर्व जगाला मार्गदर्शक होण्याचें सामर्थ्य भारतीय सस्कृतींत आहे अशी श्रद्धा महाराष्ट्रात निर्माण करण्याचे श्रेय याच संप्रदायाला द्यावें लागते महाराष्ट्रातील जहाल राज-कारणाची वाढ व जोपासना याच सप्रदायाने केलेली असून अखिल भारतीय राष्ट्रीय पक्षाचें राजकीय नेतृत्व करून प्रागतिक पक्षाच्या हातीं असणारी व त्यानेच स्थापन केलेली राष्ट्रसभा जहाल राष्ट्रीय पक्षाच्या हातीं घेण्याचे महत्कार्य याच पक्षाचे धुरधर नेते लो. टिळक यानीं घडवून आणिले.)

## आगरकरांचें विशिष्ट स्थान

पण महाराष्ट्रातील राष्ट्रवादाच्या इतिहासांत कै. आगरकर यांचे एक विशिष्ट स्थान आहे (शुद्ध विवेकवादाच्या आधारावर जहाल राष्ट्रीयत्व निर्माण करण्याचा प्रयत्न त्यांनीं १८८० पासून १८९५ पर्यंतच्या काळात केला त्याच्या कार्याचें व धोरणाचे सांस्कृतिक स्वरूप त्यांच्या पुढील उद्गारांवरून सहज समजून येईल ते म्हणतात : "इग्रजी ज्ञान, इग्रजी स्वातंत्र्य, इग्रजी ऐषआराम, इग्रजी स्त्री-पुरुषांचे बरोबरीचे वर्तन, अननुभूत रुचि, इंग्रजी खाना व चित्तास उल्हास देणारीं इग्रजी पेये इत्यादिकांनीं आमच्या सुशिक्षितांचा पहिला घाणा दिपून, वेडावून, भांबावून गेला ! पण तो मनु आतां बदलत चालला आहे. जेवढे साहेबलोकाचें तेवढे चागले आणि आमचें तेवढे गचाळ, असे मानण्याचा परिपाठ कमी होत आहे व काहीं देशाभिमानी

---

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ४ था, पृ. १८८-८९.

सुशिक्षितांत तर अगदीं उलट रीतीने विचार करण्याचा प्रघात पडूं लागला आहे, आणि न जाणो कदाचित् कांहीं दिवसांनीं हें आणखी एक नवीनच लचांड आमच्या पाठीमागें लागेल कीं काय अशी भीति वाटू लागली आहे! एकदां देशाभिमान-शून्यता आमच्या विद्वानास आली होती! आता कित्येकांस देशाभिमानातिरेक घेरूं लागला आहे! आम्हांस हे दोन्हीहि पथ मान्य नाहींत. आमच्या मते खरी वाट दोहोंच्या मधून जाते व याच वाटेने चालत राहण्याचा आमचा इरादा आहे."*

या उताऱ्यावरून आगरकरांच्या विचारसप्रदायाची कल्पना बरोबर येणारी असून आम्ही या संप्रदायास 'विवेकनिष्ठ राष्ट्रवाद' असे नाव देतों यांचें सामाजिक धोरण आगरकरांनीं "सुधारक काढण्याचा हेतु" या आपल्या लेखात पुढीलप्रमाणे विशद केलें आहे. "मूळ आर्यशाखा येथे येऊन तिच्यापासून जें झाड येथें लागलें, तेच आजमितीपर्यंत अस्तित्वांत आहे, असे म्हणण्यास हरकत नाहीं ग्रीक, रोमन, सिथियन तार्तर, मोगल, अफगाण वगैरे लोकांच्या ज्या वावटळी त्यावर आल्या, त्यामुळें त्याला बराच त्रास झाला कधीं त्याच्या कांहीं फांद्या मोडून पडल्या; कधीं तें मुळापासून उपटून पडत आहे कीं काय असे वाटले, पण कर्मधर्मसंयोगाने युरोपातील ग्रीक व रोमन शाखांवर आणि इकडील इराणी शाखेवर जो प्रसंग गुदरला, तो या भारतीय आर्यशाखेवर गुदरला नाहीं! यामुळें हे जरठ झाड कसें तरी अजून उभे आहे पण त्यांत कांहीं त्राण उरलेले नाहीं! ते आंतून अगदीं शुष्क होत आले आहे व त्याचे खोड व फांद्या डळमळू लागल्या आहेत याला आता असेच उभे ठेवण्यास व यापासून नवीन शाखाचा उद्भव होऊन यास फिरून नवीनावस्था आणण्यास एकच उपाय आहे तो कोणता म्हणाल, तर त्याची खूप खची करून त्यास अर्वाचीन कल्पनांचें भरपूर पाणी द्यावयाचे! असे केले तरच त्याचे पूर्वस्वरूप पूर्ण नष्ट न होतां, त्यापासून नूतनशाखावृत वृक्ष अस्तित्वांत येईल, पण तसे न केले तर त्यावर प्रस्तुत काळीं चोहोंकडून जे तीव्र आघात होत आहेत, त्याखालीं ते अगदीं जेर होऊन अखेरीस जमिनीवर उलथून पडेल येथे एवढेंच सांगितलें पाहिजे, कीं मूळ प्रकृति म्हणजे भारतीय आर्यत्व न सोडता, या पाश्चिमात्य नवीन शिक्षणाचा व त्याबरोबर ज्या नवीन कल्पना येत आहेत त्याचा आम्ही योग्य रीतीनें अंगीकार करीत गेलों, तरच आमचा निभाव लागणार आहे.. ज्या तत्त्वाचे अवलंबन केल्यामुळे इतर राष्ट्रे अधिकाधिक सुधारत चालली आहेत, त्या तत्त्वाचा स्वीकार करण्यास आम्हीं आनंदानें तयार झाले पाहिजे"‡

## महाराष्ट्राचें वैशिष्ट्य

१८७५ पासून १८९९ पर्यंतच्या महाराष्ट्रांतील सांस्कृतिक विचारकलहाचा इतिहास अवलोकन करणारास दोन विशेष दृष्टीस पडतात. याच कालांत बंगाल,

* निबंधसंग्रह, भाग २ रा, पृ ४६९. ‡ निबंधसंग्रह, भा. १ ला, पृ ६–९

पंजाब व मद्रास या प्रांतांतहि एक प्रकारची विचारक्रांति होत होती आणि भारतीय संस्कृतीचे श्रेष्ठत्व, वेदान्तविचाराचें माहात्म्य व वर्णाश्रमधर्माच्या कल्पनेतील समाजधारणेस उपयुक्त असणारीं तत्त्वे, यांना सर्वत्र प्राधान्य मिळत चाललें होते; (बंगालमधील रामकृष्णमिशन, पंजाबांतील आर्यसमाज आणि मद्रासेतील थिऑसफी हे सर्व भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठत्वावरच आधारलेले विचारसंप्रदाय होते. पण त्यांत लो. टिळकांच्याप्रमाणें सामाजिक सुधारकांना कसून विरोध करणारा आणि राजकीय स्वातंत्र्यावरच आपल्या राष्ट्राची सर्व शक्ति केंद्रित करणारा पुढारी दिसत नाहीं तेथें सनातनी वृत्तीनें सामाजिक सुधारणेला विरोध करणारे पुष्कळ लोक होते, पण त्याच्या या समाजसुधारणेच्या विरोधाचा जहाल राजकारणाशीं कांहींहि संबंध नव्हता शिवाय रामकृष्णमिशन, आर्यसमाज किंवा थिऑसफी हे भारतीय संस्कृतीचे श्रेष्ठत्व प्रतिपादीत असले, तरी त्याचा तत्कालीन समाजसुधारणेला विरोध नव्हता.) महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षाचा मात्र सुधारकपक्षाला विरोध होता आपणास राजकीय स्वातंत्र्य मिळेपर्यंत समाजाची आमूलाग्र सुधारणा करण्याचे प्रयत्न करण्यात राष्ट्रीय शक्तीचा अपव्यय होत आहे, असे त्याचें स्पष्ट मत होते मराठ्यांच्या इतिहासांत स्वराज्यस्थापना झाली, यावरूनच ज्या प्रकारची सामाजिक क्रांति सुधारकांना अभिप्रेत होती त्या प्रकारच्या क्रांतीची स्वराज्यस्थापनेस आवश्यकता नाहीं असे सिद्ध होतें, असा या पक्षाचा युक्तिवाद होता (महाराष्ट्रांतील साधुसंतानीं एक प्रकारची सामाजिक व धार्मिक क्रांति केली, तेव्हांच शिवाजीमहाराजांची राजकीय क्रांति यशस्वी झाली, असें पुढें न्या रानडे यानीं प्रतिपादिले, तेव्हां कै राजवाड्यानीं त्याचें ते म्हणणे खोडून काढिले. संतांनीं जी धार्मिक क्रांति केली, किंवा सामाजिक क्रांति केली, ती आज सुधारक ज्या प्रकारची क्रांति करूं इच्छितात त्याहून भिन्न होती, ती चातुर्वर्ण्य व मूर्तिपूजा यांना धक्का न लाविता केलेली होती, त्यांची वृत्ति चातुर्वर्ण्याचा पाया उखडण्याची किंवा मूर्तिपूजा उधळून लावण्याची नसून त्याच्याच आधारावर राष्ट्रनिर्मिती करण्याची होती, ते बुद्ध किंवा जैन याच्याप्रमाणे भारतीय संस्कृतीची परंपरा मोडणारे नास्तिक नसून तिचा उद्धार करणारे होते, आजचे सुधारक आमची सनातन परंपरा उखडून टाकीत आहेत, सबगोलकार करूं पहात आहेत, चातुर्वर्ण्याकित समाजरचना हीच पाश्चात्यांच्या व्यक्तिस्वातंत्र्यवादी समाजरचनेहून श्रेष्ठ आहे, तेव्हा आमच्या समाजरचनेचा पाया उखडण्याची काहीं गरज नाहीं आणि तो उखडावयाचाच असेल तर स्वराज्य मिळाल्यावर आमचा आम्ही उखडूं, तोपर्यंत परकीयांच्या आश्रयाने असा प्रयत्न करण्याने आमचे 'राष्ट्रत्व' नष्ट होत आहे, असा पक्ष लो टिळकांनीं घेतला हे एक महाराष्ट्रांतील या वेळच्या जागृतीचें वैशिष्ट्य आहे तसेंच दुसरे असेंच वैशिष्ट्य म्हणजे आगरकरांनीं शुद्ध बुद्धिवादाचा आश्रय करून सर्वांगीण सुधारणेच्या तत्त्वांचा पुरस्कार केला हे होय) ज्याप्रमाणें टिळकांच्यासारखा पुढारी इतर प्रांतांत नव्हता, त्याचप्रमाणें आगरकरांच्या-

सारखा बुद्धिवादी सुधारक त्या वेळीं इतर प्रांतांत नव्हता; निदान स्वार्थत्यागी, करारी आणि सत्यनिष्ठ देशभक्तांच्या कोटीत येणारा तरी कोणी बुद्धिवादी सुधारक हिंदुस्थानांत त्या वेळीं दिसून येत नाहीं. आगरकरांच्या याच गुणामुळे टिळकानाहि त्याचे श्रेष्ठत्व पटले होते आणि त्यानीं त्यांना कितीहि विरोध केला असला, तरी आगरकराचे व्यक्तिमाहात्म्य त्यानीं केव्हांहि नाकारिले नाहीं. किंबहुना, सुधारकांनाहि आगरकराचें खरे मोठेपण समजले नाहीं व त्यांना सगळा आगरकर पचला नाहीं असेच त्यांचें मत अखेरपर्यंत होते. यामुळे महाराष्ट्रांतील केसरी-सुधारकाच्या वाद-रणाला एक विशेष महत्त्व आहे व या प्रकरणांतील उत्तरार्धांत आम्ही त्याचेंच विशेष तात्त्विक विवेचन करणार आहो

येथे एवढें थोडक्यांत सांगतो, कीं सुधारणेच्या कामीं रानडेपक्ष व आगरकरपक्ष हे तत्त्वतः अगदीं भिन्न आहेत. हिंदु-संस्कृतींत गौतमबुद्ध आणि शंकराचार्य या दोन फार मोठ्या विभूती प्राचीन काळीं होऊन गेल्या. त्याच प्रकारच्या आगरकर आणि टिळक या दोन विभूती महाराष्ट्रांत आधुनिक काळांत झाल्या असे आमचें मत आहे. बुद्ध आणि शंकराचार्य हे दोघेहि प्रखर बुद्धिवादी होते; पण पहिल्याने वैदिक परंपरेवर आणि चातुर्वर्ण्यावर उघड हल्ला चढविला आणि बुद्धिवादाच्या आश्रयाने अज्ञेयवादाचे शिखर गाठलें, आणि दुसऱ्याने अद्वैतवेदान्ताचा आश्रय करून मायिक ईश्वराचे अस्तित्व मान्य करून व वैदिक परंपरा आणि चातुर्वर्ण्य याना धक्का न लावतांच हिंदु-संस्कृतीचा उद्धार केला आगरकरांचा पथ गौतमबुद्धाच्या प्रयत्ना-सारखा होता आणि टिळकांचा प्रयत्न शंकराचार्यांच्या प्रयत्नासारखा होता अर्थात् टिळकांना जसा शंकराचार्यांचा निवृत्तिमार्ग मान्य नव्हता, तसा आगरकरांनाहि बुद्धाचा निवृत्तिमार्ग मान्य नव्हता ही गोष्ट खरी आहे पण हा भेद लक्षात घेऊनहि टिळकांना आधुनिक महाराष्ट्राचे शंकराचार्य व आगरकरांना गौतम बुद्ध म्हणतां येईल असे आम्हास वाटते याच दृष्टीने महाराष्ट्रांतील या सांस्कृतिक विचारकलहाला विशेष महत्त्व आहे टिळक आपल्या तत्त्वविचारांची पूर्ण परिणति करीपर्यंत जगले; पण आगरकर अल्पायुषी झाले, हे महाराष्ट्राचे व कदाचित् भारतवर्षाचेंहि दुर्दैव गणिलें जाईल.

## रानडे विरुद्ध आगरकर व टिळक

भारत वर्षातील आधुनिक सुधारकपक्ष खिस्ती संस्कृतीशीं झालेल्या संघर्षा-तून निर्माण झाला, यामुळे सुधारकपक्षातील बहुतेक पुढारी द्वैती भक्तिमार्गाच्या पलीकडे गेले नाहींत न्या रानडे यांनाहि अद्वैतवाद व बौद्धमत हीं नास्तिक मतेंच वाटत असत, हे प्रसिद्ध आहे आपल्या प्रार्थनासमाजास 'ब्रह्मसमाज' हे नांव देऊं नये असे आग्रहपूर्वक प्रतिपादितांना 'ब्रह्म' शब्दाने वेदान्त्यांचें 'निर्गुण परब्रह्म' सूचित होते, म्हणून आपल्या द्वैती किंवा विशिष्टाद्वैती भूमिकेस 'प्रार्थनासमाज' हेंच

नांव अधिक शोभतें, असें त्यांनीं लिहिलें आहे. शिवाय अद्वैतवाद किंवा बौद्धमत यांहून समाजधारणेस श्रद्धेची अधिक आवश्यकता आहे, असेंहि त्यांना वाटत असे मूर्तिपूजा आणि जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य हीं त्यांना मान्य नसलीं, तरी परंपरेचा त्याग न करतांच सुधारणा झाली पाहिजे याबद्दल त्यांचा आग्रह असल्यानें आगरकरांचा बुद्धि-वाद त्यांना सहन होत नसे. १८८५ सालीं डेक्कन कॉलेजच्या वार्षिक समारभाच्या वेळीं डॉ. भांडारकर यांच्या धर्मपर विचारांवर आगरकरांनीं टीका केली आणि त्यास टिळकांनीहि पूर्ण पाठिंबा दिला पण न्यायमूर्तींना या दोन तरुणाचा बुद्धिवाद खपला नाहीं व म्हणून त्यांनीं आपली नेहमींची समतोल शांतवृत्ति सोडून सतापाने आवेशपूर्ण भाषण केलें. या वेळीं केवळ बुद्धिवादानें नीतिमत्ता टिकूं शकत नाहीं, तिला ईश्वरावरील श्रद्धेचा आधार अवश्य आहे, असे उद्गार त्यानीं काढिले. तेव्हां विष्णु मोरेश्वर महाजनींनीं आगरकर अज्ञेयवादी असूनहि त्यांचें शील शुद्ध असून तरुणांना आदर्शभूत आहे, असे न्यायमूर्तींना उत्तर दिलें या सर्वाचा मथितार्थ इतकाच, कीं (आगरकर याचा बुद्धिवाद जसा टिळकांना पुढे पटेनासा झाला, त्याच-प्रमाणें तो रानड्याना प्रथमपासूनच मान्य नव्हता. न्या रानडे याचे राजकारणहि श्रद्धायुगांतलेंच होतें आणि त्याना परपरा मोडण्यापेक्षांहि राजशासन मोडण्याची भीति अधिक वाटत होती,) हे मागील प्रकरणात दाखविलेंच आहे आगरकराची स्वतत्र बुद्धि परपरा व राजशासन या दोहोंचेहि प्रसगीं उल्लघन करून आपली सत्यनिष्ठा कायम ठेवावी, या मताचा पुरस्कार करीत होती. याच त्याच्या स्वतत्र बुद्धीमुळे त्यानीं जहाल राजकारण व जहाल समाजकारण, यांची मुहूर्तमेढ महाराष्ट्रात रोविली आणि आपल्या सस्कृतीच्या गुणानुवादांत तिचे दोष विसरूं नका व जगातील इतर राष्ट्रांतील यशस्वी सामाजिक व राजकीय तत्त्वाचा आनंदाने स्वीकार करा, असा उपदेश महाराष्ट्रीयाना केला. लो टिळकांनीं परपरारक्षणाचे तत्त्व सामाजिक व धार्मिक बाबतींत स्वीकारून राजकीय पारतत्र्याची परंपरा रक्षण करणे, हे खरे परंपरारक्षण नसून, या पारतत्र्याच्या शृखला तोडल्याखेरीज आपल्या सामाजिक व धार्मिक परपरांचेंहि रक्षण व सवर्धन होणार नाहीं, या मताचा पुरस्कार केला, आणि आपल्या प्रखर बुद्धिवादाला वेदान्ताचे आवरण घालून वर्णाश्रमावर उभारलेल्या धर्माच्या पायाला यत्किंचितहि धक्का न लावतां राष्ट्रनिर्मितीचा प्रयत्न केला व राष्ट्राची सर्व शक्ति व बुद्धि केवळ जहाल राजकारणावर केंद्रित केली 'इतर सर्व प्राताच्या आधीं महाराष्ट्रात जहाल, किंबहुना क्रातिकारक राजकारणाचा जन्म झाला, याचेहि श्रेय लोकमान्यांनाच दिले पाहिजे अर्थात् त्यांच्या सामाजिक विचारभूमिकेचा या परिणामाशीं अपरिहार्य सबंध कितपत आहे, याबद्दल मतभेद होणे शक्य आहे पण यानींच सर्व हिंदुस्थानांत ब्रिटिश साम्राज्याला प्रथम धक्के दिले आणि अखिल भारतीय राष्ट्रीय जहाल राजकारणाचे नेतृत्व करून तें आमरण अखड टिकाविण्याचा मानहि त्यांच्याखेरीज इतर कोणत्याहि व्यक्तीस देतां येत नाहीं, याबद्दल मात्र मतभेद

होणे शक्य नाहीं तेव्हां शुद्ध तात्त्विक भूमिका सोडल्यास व्यावहारिक फलप्रदतेच्या दृष्टीनें टिळकांची सामाजिक विचारांची भूमिका राष्ट्रीयत्वाच्या परिपोषास त्या कालात तरी अधिक साहाय्यभूत झाली, हेहि ऐतिहासिक दृष्ट्या मान्य करावें लागेल टिळक व आगरकर या दोनहि विभूतींनीं महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासांत महत्त्वाची भर घातली आहे व एकाचे कार्य दुसऱ्याच्याने होणे शक्य नव्हतें, याची जाणीव लोकमान्यानाहि होती व म्हणूनच त्यानी "गोपाळरावजींचा व टिळकांचा कांहीं बाबतींत कितीहि मतभेद असला, तरी गोपाळरावजींची योग्यता टिळकांना पूर्णपणे अवगत होती" असे उद्गार आगरकराच्या मृत्यूनंतर पचवीस वर्षांनीं काढिले. तेथेच आपल्या मतभेदाचे कारण सांगताना निर्विकार मनाने "जगामध्ये मतवैचित्र्य असणे ही गोष्ट इतकी स्वाभाविक आहे, कीं स्वयवरांत अनेक चांगले राजे आले असता त्यांना सोडून अजालाच इदुमतीने कां वरावें याचे कारण देतांना 'नासौ न काम्यो न च वेद सम्यक् द्रष्टु हि सा भिन्नरुचिर्हि लोकः' या तत्त्वावर निर्वाह करून घ्यावा लागला आहे" असे म्हटले आहे । न्या. चंदावरकरांसारख्या प्रार्थनासमाजी धुरीणास आगरकरांचा महिमा वर्णावा लागला, त्यास उद्देशून लोकमान्य म्हणतात: "सत्याचा, करारीपणाचा, एकनिष्ठतेचा आणि स्वार्थत्यागाचा महिमा इतका विलक्षण आहे, कीं 'निःस्वो वष्टि शत शती दशशत लक्ष सहस्राधिपः' याप्रमाणें व्यावहारिक दृष्ट्या भरभराटीच्या पाठीस लागलेल्या मनुष्यासहि दारिद्र्यांत राहून पूर्ण एकनिष्ठेने देशसेवेस लागणाऱ्या मनुष्याचा महिमा अखेर गावा लागतो...परिस्थितीचा गुलाम न बनता परिस्थितीला यथासंभव, यथाशक्ति व यावच्छक्य आपल्या ताब्यात आणण्यास जो मनोनिग्रह, स्वार्थत्याग आणि ध्येय लागतें, तें ज्याच्या अगांत आहे आणि दुःखाची अथवा सकटाची भीति अगर पर्वा न बाळगतां जो आपल्या ठायीं असणाऱ्या या सद्गुणाचा लोकोपयोगार्थ उपयोग करतो, तोच मोठा म्हणावयाचा. गोपाळराव आगरकर हे या कोटींतले होते" असो आपण टिळक-आगरकरांच्या या मतभेदाच्या तपशिलात तूर्त न शिरतां, इतर प्रांतात या वेळीं जी विचारक्रांति याच क्षेत्रांत चालू होती तिची माहिती करून घेऊ.

## बंगालमधील धार्मिक मतभेद

प्रथमतः बगाल प्रांताकडे नजर फेकल्यास आपणांस असे दिसते, कीं १८७५ पासून १८८५-८६ पर्यंतच्या काळांत तेथील (सुशिक्षित वर्गाचे चित्त ब्राह्मसमाजाकडून आपल्या वेदान्ताकडे खेचून घेणारी एक महान् व्यक्ति कलकत्त्याजवळ दक्षिणेश्वरच्या मदिरांत या वेळीं येऊन राहिली होती ही व्यक्ति म्हणजे रामकृष्ण परमहस ही होय.) ब्राह्मसमाजांत राममोहन यांच्या मृत्यूनतर महर्षि देवेंद्रनाथ ठाकुर आणि केशवचंद्र सेन हे दोन प्रसिद्ध पुढारी झाले देवेंद्रनाथ ठाकुर यांच्याकडे १८४२ मध्यें त्याचें नेतृत्व आले व केशवचद्र सेन १८५७ सालानतर पुढें येऊं लागले केशव-

चंद्रांनीं ब्राह्मसमाजास ख्रिस्तीधर्माच्या वळणावर नेण्यास सुरुवात केली आणि इ. स. १८६६ मध्ये आपल्या विचारांच्या अनुयायांची ‘ भारतवर्षीय ब्राह्मसमाज ’ या नावाने एक स्वतंत्र शाखाच स्थापन केली. अर्थात् ही नवी शाखा निघाल्यानंतर जुन्या वृक्षाचे संगोपन करणारांना ‘ आदिब्राह्मसमाज ’ हे नांव प्राप्त झाले या आदिब्राह्मसमाजाचा भारतीय संस्कृतीच्या श्रेष्ठत्वावर विशेष भर असून पाश्चात्य व पौरस्त्य संस्कृतींचा समन्वय झाल्यानेच मानवसुधारणेची खरी प्रगति होणार आहे, अशी त्याची श्रद्धा आहे. (जगत्प्रसिद्ध कविवर्य रवींद्रनाथ ठाकुर ही या ब्राह्मसमाजाची आधुनिक भारताला बहुमोल देणगी असून भारतवर्षाची कीर्ति महात्मा गांधींच्या खालोखाल जगातील इतर राष्ट्रांत पसरविण्यास त्यांचे विभूतिमत्त्वच कारण झालेले आहे बंगाली राष्ट्रीय पक्षाच्या राजकारणातहि त्यांनीं कांहीं काळ थोडा भाग घेतला होता, पण लवकरच त्यांनीं ते कार्य आपल्या प्रकृतिगुणास अननुरूप म्हणून सोडून दिलें. ते जसे एक सर्वश्रेष्ठ कवि होते त्याचप्रमाणें तत्त्वज्ञहि होते आणि त्यांचीं तात्त्विक धर्मप्रवचनें भक्तिरसानें ओथबलेलीं आणि औपनिषदिक तत्त्वज्ञानानें भारावलेली अशीं असत पाश्चात्यांच्या संकुचित राष्ट्रभावनेंतून निर्माण झालेला साम्राज्यवाद, त्याची भौतिक सुखाबद्दलची अनिवार तृष्णा, भांडवलशाहीचा संघटित लोभ व लष्करशाहीची संघटित हिंसा यांच्या खाईत युरोपीय संस्कृति जळून खाक होत आहे, म्हणून त्या संस्कृतीचे अंधानुकरण करू नका, आणि आपल्या संस्कृतीची प्राचीन आध्यात्मिक भूमिका सोडून जपानप्रमाणें आंतरबाह्य पाश्चात्य, जडवादी आणि हिंसक बनू नका, असा संदेश ते भारतवर्षाला देत असत हे त्यांचें कार्य महत्त्वाचे आहे तथापि त्यामुळें आदिब्राह्मसमाजासारख्या विशिष्ट संप्रदायाचे महत्त्व फारसे वाढलेले आहे, असे मात्र नाहीं )

केशवचंद्र सेन यांचा १८७५ नंतर रामकृष्ण परमहंस यांच्याशीं विशेष स्नेह जडला आणि त्यांच्यापासून योगप्राप्तीचे महत्त्व त्यांनीं जाणिले. या त्यांच्या प्रवृत्तीची परिणति होत होत अखेरीस त्यांनीं ब्राह्मसमाजांत ‘ नवविधान ’ या नांवाची एक नवीनच शाखा स्थापन केली ही घटना इ. स. १८८१ सालीं घडली. या वेळेपासून बंगालमधील ब्राह्मसमाजाचें महत्त्व पुष्कळच कमी झालें आणि रामकृष्ण परमहंसाकडे सुशिक्षित बंगाली तरुण आकर्षित होऊ लागले, असे म्हणण्यास हरकत नाहीं

नरेंद्रनाथ दत्त या नांवाच्या एका ग्रॅज्युएटाचे व त्यांचें प्रथम दर्शन १८८२ साली झाले नरेंद्रनाथ हे स्पेन्सरचे अनुयायी असून त्यांनीं स्पेन्सर यांच्या तत्त्वज्ञानांतील कांहीं दोषस्थळे दाखवून देणारे एक पत्र त्यांना पाठविले होते व तें वाचून स्पेन्सरसाहेब फार खुष झाले होते असे म्हणतात. भौतिक शास्त्रीय विचारसरणीच्या आधारावर तत्त्वज्ञानाची उभारणी करण्याची स्पेन्सर यांची अभिनव पद्धति नरेंद्रनाथांना आकर्षक वाटली होती आणि आपल्या सर्व ज्ञानाचा आधार अनुभव हाच असला पाहिजे, हें तत्त्व त्यांच्या बुद्धीला पूर्णपणें पटले होते. रामकृष्णांशीं जेव्हां

त्याची प्रथम भेट झाली, तेव्हां तुम्ही परमेश्वराचा साक्षात्कार मला घडवून द्याल का, असाच प्रश्न त्यांनीं त्यांस विचारिला असे म्हणतात; आणि रामकृष्णांनीं आत्मप्रत्ययाने 'होय' असे त्यांस उत्तर दिलें तें ऐकून नरेंद्रनाथ त्यांचे शिष्य बनले अशी एक आख्यायिका आहे. हिंदुस्थानांत परमेश्वरप्राप्तीचे एक अनुभवगम्य शास्त्र बनलेलें आहे आणि या अध्यात्मशास्त्रातील सिद्धान्त भौतिक शास्त्राप्रमाणेच प्रमाणसिद्ध व अनुभवगम्य आहेत अशी त्याची खात्री होत गेली. धर्म ही बाह्य विधिविधानांची आणि कर्मठपणाच्या कवायतीची गोष्ट नसून ती एक आत्मसाक्षात्काराची गोष्ट आहे आणि या आत्मसाक्षात्काराची प्राप्ति हेच सर्व धर्मांचें साध्य असल्यामुळे त्याचीं बहिरंगे कितीहि विविध, किंबहुना विरोधी भासत असलीं, तरी खरा धर्म एकच असून निरनिराळे धर्म हे या एका विश्वधर्माचेच विशिष्ट संप्रदाय किंवा पथ आहेत, असे दोन सिद्धान्त त्यांनीं आपल्या गुरूपासून उचलले मूर्तिपूजेनेहि आत्मसाक्षात्कारास साहाय्य होऊं शकते, तर मग तिच्याविरुद्ध एवढी ओरड का, असें त्याना वाटू लागले. "अहं ब्रह्मास्मि" या सिद्धान्तांत अंतर्भूत होणारे अद्वैत तत्त्वज्ञान हे जगातील सर्व तत्त्वज्ञानात श्रेष्ठ असून त्याच्याच आधारे जगाला विश्वधर्माची प्राप्ति होईल, असा संदेश देण्यासाठींच ते चिकॅगो येथे १८९३ सालीं भरलेल्या सर्वधर्मपरिषदेस गेले होते स्वामी विवेकानंद हे त्याचे नाव याच वेळीं सर्वश्रुत झाले व त्यांची कीर्ति दिगंत पसरली १८८६ सालींच रामकृष्ण परमहंसांच्या देहावसानानंतर थोड्याच दिवसात त्याच्या शिष्यांनीं आपल्या गुरूचा संदेश सर्व जगभर पसरविण्यासाठीं 'रामकृष्ण मिशन' या संस्थेची स्थापना केली होती; पण तिची ख्याति १८९३ नंतरच सर्वत्र झाली. सनातन हिंदुधर्माच्या आधारावर व्यापक विश्वधर्माचा संदेश जगाला देणे, अद्वैत वेदान्त हा भौतिक शास्त्रीय प्रगतीने खोटा ठरू शकत नाहीं अशी लोकांची खात्री करून देणें, भौतिक प्रगतीला व प्रवृत्तिपरतेला प्राधान्य देऊन वेदान्ताला कर्मप्रवण बनविणे, ख्रिस्ती मिशनऱ्याप्रमाणें धर्माचरणात लोकसेवेला प्राधान्य देणे आणि धर्माच्या आधारावर राष्ट्रभक्तीची व स्वाभिमानाची ज्योत पेटवून लोकांत पारतंत्र्याविरुद्ध क्रांतिकारक वृत्ति फैलावणें, असें बहुविध कार्य या रामकृष्ण-मिशनने केलेले आहे.

## आर्यसमाजाचा उदय

बंगालमध्यें ज्या प्रकारची विचारक्रांति चालू होती, तशाच प्रकारची एक विचारक्रांति या सुमारास किंवा थोडी आधीं पंजाबात चालू होती. तिचें श्रेय स्वामी दयानंद यांनीं स्थापन केलेल्या आर्यसमाजाला आहे. स्वामी दयानंद यांचा जन्म मोर्वी संस्थानांतील टंकारा या गांवीं काठेवाडांत एका ब्राह्मणकुलांत १८२४ मध्यें झाला त्याचे पूर्वाश्रमींचे नाव मूळशंकर असें होते एका शिवरात्रीच्या रात्रीं महादेवाच्या देवळांत देवापुढे ठेवलेला प्रसाद एका उंदराने खाल्ला, हें पाहून देवाच्या

मूर्तींत कांहीं सामर्थ्य नसतें व मूर्तिपूजा करणें शहाणपणाचें नाहीं, अशी शंका त्याच्या मनांत अगदीं बालपणींच उद्भवली ही नास्तिकपणाची शंका त्यांनीं आपल्या पित्यापुढे मांडिली, तेव्हां वृद्ध पित्यानें त्याना असल्या अधार्मिक विचारसरणीबद्दल बराच दोष दिला तथापि या वेळेपासून त्याची धर्मजिज्ञासा जागृत झाली आणि परमेश्वराचे सत्यज्ञान करून घेणे हेंच त्यानीं आपलें जीवितकार्य आखून घेतले. त्याचा विवाह करावा असा प्रयत्न त्यांच्या मातापितरांनीं केला, तेव्हा ते घराचा त्याग करून पळून गेले आणि त्यांनीं धर्मप्रचारासाठीं ब्रह्मचर्यव्रताचा अंगीकार केला. पुढे त्यानीं सरस्वतीसंप्रदायाकडून संन्यासदीक्षा घेतली व दयानद सरस्वती असे नांव धारण केलें. ते प्रथमतः ब्राह्मसमाजाच्या व त्याच्या शाखांच्या सहकार्यानेंच धर्मप्रचाराचे किंवा धर्मसुधारणेचे कार्य करीत असत; पण १८७५ सालीं त्यांनीं मुबईस 'आर्यसमाज' नांवाचा आपला स्वतंत्र संप्रदाय स्थापन केला आणि त्याचीच एक शाखा १८७७ सालीं पजाबात काढिली लाला हंसराज, लाला मुन्शीराम ऊर्फ स्वामी श्रद्धानद आणि लाला लजपतराय या तीन विभूतींमुळे पजाबातील या आर्यसमाजाच्या शाखेला पुष्कळ महत्त्व प्राप्त झालें लाला हसराज याचे दयानद 'ॲंग्लो-वैदिक कॉलेज' व स्वामी श्रद्धानद याचे 'गुरुकुल' या शिक्षणसस्था प्रसिद्ध असून, लाला लजपतराय राष्ट्रीय पक्षाच्या त्रिमूर्तींतील जहाल राजकीय पुढारी म्हणून हिंदुस्थानात व युरोप-अमेरिकेंत प्रसिद्धीस आले. त्यानीं लोकमान्याच्या राजकारणाच्या स्मरणार्थ 'टिळक स्कूल ऑफ पॉलिटिक्स्' ही ना. गोखल्याच्या भारत सेवक समाजाच्या धर्तीवर राष्ट्रीय राजकारणाची संस्था काढिली असून हिंदुस्थानात समाजवादी विचाराचा प्रथम पुरस्कार करण्याचे श्रेयहि त्यांनाच द्यावे लागेल. त्यांचीं धार्मिक मतें पुढे पुढे नास्तिकवादी बनलीं होतीं. त्यांच्या मृत्यूनंतर 'पीपल' पत्रांत प्रसिद्ध झालेल्या त्याच्या पत्रावरून त्यानीं शुद्ध बुद्धिवादाचा स्वीकार केल्याचें आढळते तथापि त्यांच्या देशभक्तीचा प्रारंभ आर्यसमाजी धर्मसुधारणेच्या वृत्तींतूनच झाला, हें सर्वश्रुत आहे

स्वामी दयानद यानीं स्थापन केलेल्या आर्यसमाजाचीं धार्मिक व सामाजिक मतें थोडक्यांत पुढीलप्रमाणे सागता येतील : परमेश्वराच्या शुद्ध स्वरूपाचे ज्ञान वेदांत असून वेदाचे अध्ययन करणे हे प्रत्येक हिंदुमात्राचे कर्तव्य आहे. वेदाध्ययनाचा हक्क सर्व मनुष्यमात्राना आहे. वेद हा आर्यांचा पवित्र धर्मग्रंथ असून त्याचें प्रामाण्य सर्व आर्यांनीं मानिले पाहिजे (वैदिककालीं मानवसंस्कृति पूर्णावस्थेस पोहोचलेली असून समाजरचनेचीं सर्व श्रेष्ठ तत्त्वे वर्णाश्रमधर्मांत आहेत चातुवर्ण्य हें जन्मसिद्ध नसून गुणकर्मांवर अवलबून असावें आणि ज्याच्या अगीं ज्या वर्णाचे गुण असतील, त्याला त्या वर्णाचा अधिकार प्राप्त व्हावा. आर्यांच्या वैदिक धर्माचे दरवाजे सर्व धर्मीयांना खुले असावे व शुद्धीकरणानें कोणासहि या धर्मात प्रवेश मिळावा. आर्यधर्माची दीक्षा सर्व जगाला देणें हाच जगदुद्धाराचा मार्ग असून आर्यावर्त हा आर्यांचाच देश आहे.

आर्यसमाजानें हिंदु-समाजाला आक्रमक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. खिस्ती व मुसलमान धर्मप्रचारकाचा कडवेपणा आणि आक्रमक वृत्ति, त्याने हिंदू लोकांत बाणविण्याचा प्रयत्न केला त्याचप्रमाणे मूर्तिपूजा, बालविवाह, स्त्रीदास्य, जन्मसिद्ध अस्पृश्यता वगैरे हिंदु-समाजातील दोषाविरुद्धहि चढाईचा हल्ला त्याने चढविला या चढाईच्या धोरणामुळे काही काळ सनातनी हिंदू व आर्यसमाजी सुधारक याच्यांत एक तुंबळ वाद-रण माजून राहिले आणि सुधारकांच्या गोटांत त्यागी संन्यासी वृत्ति, लोकसेवेचे व्रत आणि धर्मनिष्ठेचे तेज निर्माण झालें. खिस्ती धर्मप्रचारकाना हिंदु-समाजात निर्माण झालेल्या या चढाऊ सप्रदायाचा हेवा वाटू लागला आणि हिंदु-समाजात जागृत होणाऱ्या या नव्या अहंकारामुळे आपल्या राजकीय प्रभुत्वाला धक्का देणारी क्रातिकारक वृत्ति हिंदु-समाजात बाणणार, अशी भीति ब्रिटिश राज्यकर्त्यानाहि वाटूं लागली यामुळें खिस्ती मिशनरी आणि ब्रिटिश अधिकारी याना आर्यसमाजासंबंधीं क्रातिकारकत्वाचा वहीम वाटू लागला. पण थोड्या वर्षांनंतर हा एक धर्मसंप्रदाय आहे अशी सरकारचीहि खात्री झाली व पुढे पुढे त्याने निर्माण केलेली चढाऊ वृत्ति आपणावर होणाऱ्या मुसलमान समाजाच्या हल्ल्यांना तोड देण्यास उपयोगी आहे असे वाटल्याने हिंदुसभेचे व आर्यसमाजाचे बरेच सख्य होऊं लागले, पण आर्यसमाजाची सुधारणावृत्ति मात्र हिंदुसभेत शिरली नाहीं एके काळीं आर्यसमाजानें राष्ट्रीयत्वाला आणि जहाल राजकारणाला व हिंदु-समाजांतील राजकीय क्रातिवृत्तीला चालना दिली यांत शका नाहीं

## थिऑसफीचें आगमन

स्वामी दयानंद यानीं केलेलें आणखी एक कार्य भारतीय संस्कृतीच्या पुनरुज्जीवनास साहाय्यकारी झालेलें आहे हे कार्य म्हणजे त्यानी हिंदुस्थानात थिऑसफीच्या पुढाऱ्याना बोलावून आणिले हे होय. थिऑसफी हा धर्मसप्रदाय १८७५ च्या नोव्हेंबरात न्यू यॉर्क शहरांत मॅडम ब्लॅव्हाटस्की आणि कर्नल ऑलकॉट यांनीं स्थापन केला मॅडम ब्लॅव्हाटस्की या रशियन विदुषी असून कर्नल ऑलकॉट हे अमेरिकेंतील एक लष्करी अधिकारी होते. स्वामी दयानद यांच्या निमत्रणावरून थिऑसफीचे हे दोन सस्थापक १८७९ च्या १६ फेब्रुवारीस मुबईस येऊन दाखल झाले त्याच वर्षी २३ मार्च रोजीं त्याचे मुबईस फ्रामजी कॉवसजी हॉलमध्ये व्याख्यान झाले व त्यानीं हिंदी राष्ट्राचे नेतृत्व हिंदी पुढाऱ्यानींच केले पाहिजे, हिंदुस्थाननें आपल्या आध्यात्मिक संस्कृतीचा अभिमान कधींहि सोडू नये व त्यांतूनच हिंदुस्थानचा खरा उद्धार होईल, असा उपदेश केला काहीं दिवस थिऑसफी व आर्यसमाज या एकाच कार्याच्या दोन शाखा आहेत असे मानण्यात येत होते पण थोड्याच दिवसात थिऑसफी व आर्यसमाज यांची कार्यें भिन्नभिन्न आहेत, याची स्पष्ट कल्पना त्यांच्या पुढाऱ्याना झाली. थिऑसफी हा सर्वधर्मसंग्राहक विचारसंप्रदाय असून आर्यसमाज ही

वैदिक धर्माचीच एक शाखा आहे. कर्नल ऑलकॉट यांच्यासारखा एक विद्वान् अमेरिकन गृहस्थ हिंदुस्थानात येऊन आपल्या आध्यात्मिक संस्कृतीचे गुणानुवाद गात आहे हे ऐकून अथवा पाहून भारतीयाचा स्वाभिमान आणि अहंकार जागृत झाला, आणि आपले प्राचीन वैभव आपणांस पुनः प्राप्त होऊन राष्ट्रगुरुत्वाचा मान भारतमातेकडे पुनः येऊ शकेल अशी आशा येथील लोकांना वाटूं लागली १८८२ सालीं कर्नल ऑलकॉट यानीं मद्रास इलाख्यात अड्यार येथें एक जागा घेऊन आपल्या सप्रदायाचें 'गृह' (Home) स्थापन केलें. महाराष्ट्र, बंगाल व पजाब या प्रांतापेक्षां मद्रास इलाखा आपल्या कार्यास अधिक अनुरूप व अनुकूल आहे असे पाहून हें 'गृह' त्यांनीं तेथे स्थापन केले असावें (१८९३ मध्ये ॲनी बेझटबाई हिंदुस्थानात आल्या. त्याचा जन्म आयर्लंडात झालेला असून त्यांचे पति इग्लिश होते. चार्ल्स ब्रॅडलॉ याच्या त्या सहकारी असून त्याचीं पहिलीं मते नास्तिक होतीं. पुढें त्यांना आध्यात्मिक सस्कृतीचे महत्त्व पटले आणि बौद्धतत्त्वज्ञानाच्या द्वारातून त्यानीं भागवतधर्मात प्रवेश केला. कर्नल ऑलकॉट याचा बुद्धधर्माकडे ओढा होता, तर बेझंटबाई या श्रीकृष्णाच्याच भक्त बनल्या, यामुळें हिंदु-समाजाला त्याच्याविषयीं अधिकच आपुलकी वाटू लागली पुढे त्यानीं बनारस येथे 'सेंट्रल हिंदु कॉलेज' ही सस्था स्थापन केली व प्रथम कांहीं दिवस राजकारणापासून अलिप्त राहून हिंदु लोकात धर्मजागृति आणि राष्ट्रभक्ति निर्माण करण्याचे प्रयत्न केले. अखेरीस त्यानीं प्रत्यक्ष राजकारणांतहि भाग घेतला पण त्याचा विचार पुढे करण्यांत येईल. त्यानीं जहाल राष्ट्रीय राजकारणाला फारसें साहाय्य केलेले नाहीं; किंबहुना, अनेक प्रसंगीं विरोधच केलेला आहे. तथापि हिंदी लोकात आपल्या सस्कृतीबद्दल अभिमान निर्माण करण्यास थिऑसफीचा उपयोग झालेला आहे महाराष्ट्रधर्म, रामकृष्णमिशन आणि आर्यसमाज यांनीं जागृत केलेल्या वृत्तींतून क्रांतिकारक राजकीय वृत्ति निर्माण झाल्याचे आढळते, तसे थिऑसफींतून निर्माण झाल्याचें कोठेच आढळत नाहीं या वृत्तींतून निर्माण झालेलें राजकारण साम्राज्यनिष्ठेच्या व कायद्याच्या मर्यादेचें उल्लंघन करून पलीकडे गेल्याचे सहसा कोठे आढळणार नाहीं.)

राष्ट्रसभेच्या स्थापनेच्या वेळीं ज्याप्रमाणे निरनिराळ्या केंद्रांत अशी संस्था निर्माण करण्याचे विचार चालत असत, त्याचप्रमाणे १८८४ सालीं थिऑसफीच्या वार्षिक उत्सवाच्या प्रसंगी अड्यार येथे जे निरनिराळ्या प्रातातील लोक एकत्र जमले होते, त्यानीं राष्ट्रीय सभेच्या स्थापनेची योजना प्रथम निश्चित केली, असे बेझंटबाई यांचे म्हणणे आहे. या उत्सवाच्या निमित्ताने १८८४ च्या डिसेंबरात अड्यारला जमलेल्या लोकात मद्रासचे एस्. सुब्रम्हण्य ऐय्यर, पी. रंगय्या नायडू, पी. आनदा चार्लू, कलकत्त्याचे सुरेंद्रनाथ बानर्जी, नरेंद्रनाथ सेन आणि मनमोहन घोष मुंबईचे दादाभाई, तेलंग व मंडलीक, संयुक्त प्रातातील बाबू काशीप्रसाद आणि पंडित लक्ष्मीनारायण इत्यादि अनेक प्रांतांतील पुढारी जमले होते व त्यांनीं राष्ट्र-

सभेच्या स्थापनेचा निश्चय याच वेळीं केला, असे बेझंटबाई लिहितात अर्थात् या त्याच्या निश्चयाचा थिऑसफीच्या कार्याशीं प्रत्यक्ष संबंध नसून या लोकाची या कार्यासाठीं जी सभा भरली तीहि थिऑसफीच्या अध्यक्षाच्या गृहात न भरता दिवाण-बहादूर रघुनाथराव याच्या बगल्यांत भरली होती, म्हणजे या लोकांच्या या कल्पनेशीं अगर संकल्पाशीं थिऑसफीचा काहींहि सबध नव्हता तसेच या पुढाऱ्यांतहि प्रत्यक्ष थिऑसाफिस्ट असे फारसे कोणी दिसत नाहींत त्या वेळीं या प्रश्नाची चर्चा देशातील सर्व पुढारी करीत होते तशी त्यानीं या निमित्ताने एकत्र आल्यावरहि केली, एवढाच याचा अर्थ दिसतो

आतापर्यंत आपण स्थूलमानाने १८७५ पासून १८९५ पर्यंतच्या वीस वर्षांत भारतवर्षांतील निरनिराळ्या प्रांतांत सांस्कृतिक विचारात जी एक क्रांति चालू होती, तिचे विहंगमावलोकन केले या सर्व चळवळींचा परिणाम पुढे काहीं काळाने लोकात राष्ट्रीय वत्तीचें जहाल राजकारण निर्माण करण्यांत झाला असला, तरी तशा राजकारणाचा प्रत्यक्ष उदय प्रथम फक्त महाराष्ट्रातच झाला व त्याचे श्रेय लो टिळकानाच दिलें पाहिजे मागें म्हटल्याप्रमाणे चिपळूणकर-टिळक यांनीं महाराष्ट्राच्या निकट भूतकालीन इतिहासाच्या आधारे स्वराज्यस्थापनेच्या कार्यास आमची सस्कृति पूर्णपणें लायक आहे असा जो एक आत्मविश्वास लोकात निर्माण केला, त्या आत्म-विश्वासाच्या आधारावरच हिंदुस्थानातील राष्ट्रीय जहाल राजकारण प्रथम महाराष्ट्रातील आणि नंतर इतर प्रातांतील सुशिक्षित मध्यम वर्गांत रुजले, आणि हेच लोकमान्यानीं समाजसुधारणेला केलेल्या विरोधाचे अशतः परिमार्जन व काहींसे समर्थनहि करू शकते. म्हणून आता आपणास पुनः महाराष्ट्रातील टिळक, आगरकर आणि रानडे यांच्या सांस्कृतिक विचाराकडे वळणे भाग आहे

## संस्कृति आणि स्वराज्य

**सास्कृतिक अभिमान आणि जहाल राष्ट्रीय राजकारण यांचा अपरिहार्य नित्यसंबंध नाही,** हे या विषयाची चर्चा करितांना नेहमीं ध्यानात ठेविले पाहिजे. ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं हिंदुस्थान जिकितांना व जिकिल्यानतर आम्ही तुमच्या संस्कृतींत व धर्मांत हात घालणार नाहीं असे आश्वासन दिले होते व ते धोरण त्यांनीं सामान्यतः अखेरपर्यंत पाळिले असल्याने केवळ संस्कृतिरक्षण किंवा धर्मरक्षण या दृष्टीने विचार करणारास स्वराज्याची किंवा स्वातंत्र्याची नेहमींच आवश्यकता भासत असे, असे म्हणता येत नाहीं संस्कृति व धर्म याची व्यापक कल्पना स्वीकारून तींत आर्थिक व राजकीय उन्नति यांचा अंतर्भाव केला तरच स्वसस्कृति, स्वधर्म आणि स्वराज्य यांचा निकट संबध लक्षांत येतो आणि मगच स्वधर्मासाठीं स्वराज्य किंवा सस्कृतिरक्षणासाठीं स्वराज्य या म्हणण्याचा अर्थ लोकांना कळू शकतो. पण महाराष्ट्रात मराठी साम्राज्याची कल्पना जिवत असल्यानें महाराष्ट्रधर्माच्या नांवाने

स्वधर्माला अगर स्वसंस्कृतीला स्वराज्याची आवश्यकता आहे, ही भावना जागृत होणें शक्य होतें व तेंच कार्य लोकमान्य टिळक आणि इतिहासाचार्य राजवाडे यांनीं अनुक्रमे व्यावहारिक राजकारण आणि ऐतिहासिक सशोधन याच्या क्षेत्रांत केलें. पण लोकहितवादी, न्या रानडे किंवा आगरकर या सर्वच महाराष्ट्रीय पुढाऱ्यांकडे पाहिल्यास आपणांस असे दिसून येईल, कीं त्यांपैकीं कोणीहि पुढारी केवळ सस्कृति-सुधारणेवर किंवा धर्मसुधारणेवर भर देऊन थाबत नसून प्रत्येकाला स्वराज्याची व राजकीय सुधारणेची विशेष आवश्यकता पटलेली होती लोकहितवादींनीं स्पष्टपणे असे दाखवून दिले आहे, कीं ब्रिटिश राज्यांत सर्व लोक शूद्र होऊन बसले आहेत खरे वैश्य, खरे क्षात्रिय आणि खरे ब्राह्मण याचा उद्धार होण्याच्या आड आपले पारतन्त्र्य येत आहे, याची जाणीव सर्वच महाराष्ट्रीय पुढाऱ्यास इतर प्रांतांतल्यापेक्षा अधिक उत्कट होती, असे स्पष्ट दिसून येतें, ब्रिटिशानीं सर्व व्यापारधदे आणि राज्यरक्षण व राज्यकारभार हस्तगत केल्यामुळे वैश्य व क्षत्रियवर्णाची स्थापना होण्यास पारतंत्र्य आड येते हे उघड दिसतें, पण ब्राह्मणवर्णाच्या स्थापनेस पारतंत्र्य कसे आड येते, याची कांहीं लोकांना बरोबर कल्पना येणार नाहीं. याचे कारण खरे ब्राह्मण्य म्हणजे काय, याची बरोबर कल्पना पुष्कळाना येत नाहीं हेच होय. लोकहितवादींनीं एके ठिकाणीं सर्व पेशवाईत फक्त एकटे रामशास्त्री हेच काय ते खरे ब्राह्मण होते, असे म्हटले आहे त्यांतील मर्म समजून घेतल्यास खरे ब्राह्मण निर्माण होण्यासहि राजकीय पारतन्त्र्य कसे प्रतिकूल असते तें कळून येईल कारण ब्राह्मणवर्णाचे मुख्य कर्तव्य राजसत्तेवरहि न्यायाचे नियंत्रण ठेवून सर्व वर्णाचे सर्व व्यवहार न्यायानुसार व नीत्यनुसार चालतील अशी खटपट करणे आणि स्वतः सपत्तीचा व सत्तेचा लोभ न धरिता दारिद्र्यात राहून भौतिक व आत्मिक विद्येची उपासना करणे व समाजांत न्यायप्रस्थापना करण्यांत आनंद मानणे हेच होय ) हे कर्तव्य करण्यास स्वराज्यापेक्षां परराज्य अधिक प्रतिकूल असते व म्हणून पारतन्त्र्यातील ब्राह्मणवर्णाचेंहि पहिलें कर्तव्य राजकीय क्रांति घडवून आणून स्वराज्यसस्थापना करणे हेच होय, असें म्हणावे लागते औद्योगिक साम्राज्याखालीं चुरडून जाणाऱ्या राष्ट्रांत क्षत्रिय व वैश्य वर्णाचा उद्धार करणे तर अशक्यच असते, कारण त्याच वर्णाच्या मुळावर परकीय राज्यकर्ते आलेले असतात या दृष्टीने विचार केल्यास वर्णाश्रमधर्माची खरी सस्थापना स्वराज्याखेरीज होऊच शकत नाहीं व ही दृष्टि स्वीकारली तरच सस्कृति-रक्षण व स्वराज्यसंस्थापना यांचा अत्यत निकट सबंध व कार्यकारणभाव ध्यानात येतो तथापि स्वराज्यसंस्थापना तरी कोणीं करावयाची, असा प्रश्न उपस्थित केल्यास त्याचें उत्तर त्यासाठीं कांहीं तरी सद्ब्राह्मण आणि सत्क्षत्रिय प्रथम निर्माण झाले पाहिजेत, असेच द्यावे लागते व हेच कार्य १७ व्या शतकांत महाराष्ट्रातील समर्थ रामदास व शिवाजीमहाराज यांनीं केलें असे राजवाडे प्रतिपादितात. इतकेच नाहीं, तर महाराष्ट्राला पारतन्त्र्य कां आलें, याचे उत्तरहि ब्राह्मण-क्षत्रिय भ्रष्ट झाले असेंच

राजवाडे यानीं दिलें आहे. तात्पर्य, आपल्या पारतंत्र्यामुळे संस्कृति टिकत नाहीं हे जितकें खरें आहे, तितकेंच आपली संस्कृति अवनत झाली असतां स्वातंत्र्य टिकत नाहीं आणि आपल्या संस्कृतीला उन्नतावस्था प्राप्त करून देण्यासाठीं त्याग करणारे ब्राह्मण व क्षत्रिय निर्माण झाल्याखेरीज स्वातंत्र्य स्थापन करतां येत नाहीं, हे लो. टिळक किंवा राजवाडे यांनाहि मान्य होते या दृष्टीने स्वराज्याची राजकीय क्रांति होण्यापूर्वी एक प्रकारचो धार्मिक व सामाजिक विचारक्रांति झाली पाहिजे व ही विचारक्रांति काहीं कर्त्या पुरुषांनीं तरी आचरणांत आणिली पाहिजे, हे राजकीय क्रांतिकारकानाहि मान्य करावेंच लागते. 'महाराष्ट्रांतील शिवकालीन समाजरचना' या निबधांतील राजवाडे याचे पुढील विचार मननीय आहेत. त्यात शिवकालापूर्वी महाराष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट होण्यास त्याची सांस्कृतिक अवनति कशी कारण झाली व त्याचे स्वातंत्र्य पुनः त्यास प्राप्त होण्यापूर्वी एक प्रकारची सामाजिक क्राति कशी घडून आलेली होती, ते त्यांनीं उत्कृष्टपणे विशद केले आहे.

प्रथमतः आपल्या स्वातंत्र्याच्या अखेरीस आपला सास्कृतिक ऱ्हास कसा होत होता त्याचें वर्णन करताना राजवाडे लिहितात : "दक्षिणेंत चातुर्वर्ण्यसंस्थेची शक ४०० च्या सुमारास शबरस्वामी व शंकराचार्य ह्यांच्यासारख्या ब्राह्मणांच्या बुद्धि-वैभवाने आणि चालुक्यांसारख्या क्षत्रियांच्या बाहुबलाने जी पुनः स्थापना झाली, ती शक १२४० पर्यंत अव्याहत चालली ह्या पुनरुज्जीवित चातुर्वर्ण्यांत एक बाब विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे, ती ही, कीं ब्राह्मणांनी या वेळेपासून दक्षिणेंत मद्य व मांस अगदी वर्ज्य केलीं व तीं सेविणे महापापात गणिले हीं आठशे वर्षे महाराष्ट्रात ब्राह्मणाच्या सल्ल्याने क्षत्रियाचे राज्य चालले होते या कालात विज्ञानेश्वर व हेमाद्रि याच्यासारखे धर्मशास्त्रज्ञ या भूमींत अवतरले तत्रापि या कालाच्या शेवटीं ब्राह्मणवर्ण फार सुखावलेला व स्वधर्मपराङ्मुख झालेला दिसतो. ऋग्वेदकालीं यज्ञ-यागादींचा जसा अतिरेक झाला, तसा या कालांत व्रतोद्यापनांचा अतिरेक झाला चालुक्य, राष्ट्रकूट व यादव ह्यांनीं जितकीं देवालये बांधिलीं, तितकीं इतर राजानी बांधिलीं असतील कीं नाहीं याची शंकाच आहे. हेमाद्रीच्या व्रतखडांत दर दिवसाला पाच-चार व्रते व उद्यापने सांगितलेलीं आहेत ह्या कालीं बहुत ब्राह्मणांनीं कायस्थ-कर्म स्वीकारिलेले दिसते. दक्षिणेत कायस्थ जाति मुळापासूनच नव्हती—तेव्हा कुळ-करण, जोसपण, देशलेखकपण, सर्व देशांतील ब्राह्मणानाच करावे लागले.. हेमाद्रीच्या कचेरींत ब्राह्मणच कारकून होते. ह्या कामांत ब्राह्मणांचे शमदमादि सत्त्व-गुण कितपत दिसले असतील त्याचा अंदाज सहज करतां येतो त्या कालीं कित्येक ब्राह्मणांनीं लष्करी पेशा म्हणजे क्षात्रकर्महि स्वीकारलेले दिसते सारांश, ह्या कालाच्या शेवटीं ब्राह्मणवर्ण स्वधर्मच्युत होत असलेला दृष्टीस पडतो क्षत्रियहि ह्या कालाच्या शेवटीं शेवटीं यादवांच्या विरुद्ध झालेले आढळतात... ब्राह्मणांत स्वधर्मच्युति व क्षत्रियांत फूट असल्यावर भीष्माचार्यांचे शब्द पुनः एकदां प्रत्ययास कां न येतील ?

शके १२४० त दक्षिणेत मुसलमानांचें म्हणजे पूर्वीच्या शकयवनादींच्या वंशजांचे पुनः एकदां राज्य झाले !" यानंतर पारतंत्र्यांत संस्कृतीचा ऱ्हास अधिकच कसा झाला, ते वर्णन करताना राजवाडे लिहितातः "ह्या कालांत ब्राह्मण-क्षत्रियांची जी दैना झाली ती सांगतां पुरवत नाहीं शक १३५० च्या सुमाराला एकहि क्षत्रिय सस्थानिक राहिला नाहीं सर्व खालसा झाले. हिंदुमात्राला नेऊन मुसलमान सुतेची दीक्षा बलात्कारानें देऊ लागले देवळे मोडलीं गेलीं, देव फोडले गेले, बायका भ्रष्ट केल्या गेल्या, साधु-सत छळले गेले आणि लक्षावधि लोक दुष्काळाने मृत्युमुखीं पडले ब्राह्मणाला स्वधर्म चोरून पाळणें कपाळीं आले आणि क्षत्रियाचें शौर्य वाझ झालें. पुनः चातुर्वर्ण्यसंस्थेला उतरती कळा लागली वैश्यवर्ग नागवला गेला आणि शेट-महाजन हे नाव मात्र राहिले महाराष्ट्रांतून वैश्यवर्ग अजीबात नाहींसा झाला." "ब्राह्मण व क्षत्रिय स्वधर्मभ्रष्ट कसे झाले म्हणाल, तर दोघेहि जणु काय आपले काहींच हरवले नाहीं अशा ढोंगाने यवनाची म्हणजे शत्रूची सेवा करू लागले . शिवाय यादवाच्या काळापासून ब्राह्मण-क्षत्रियाना सेवाधर्म आगवळणीं पडला होता"

## संतांची कामगिरी

अशा या पडत्या काळांत आपल्या संस्कृतिरक्षणाचे कार्य भक्तिमार्गी साधु-संतांनीं केलें, हे राजवाड्याना मान्य होते मात्र भक्तिमार्ग चालू ठेवणे एवढेंच स्वधर्मरक्षण नव्हे, असे ते आग्रहपूर्वक प्रतिपादितात भक्तिमार्ग आणि महाराष्ट्रधर्म यातील भेद त्याना पुढीलप्रमाणे वाटतो: 'भक्तिमार्ग हा केवळ वैयक्तिक मुक्तीचा आहे, तर महाराष्ट्रधर्म हा राष्ट्रधर्म ( Nationalism ) आहे तथापि भक्तिमार्गानें पडत्या काळात फार मोठे कार्य केलेले आहे हेहि त्याना मान्य होतें. वरील लेखांतच ते म्हणतात:

"भक्तिमार्ग हा व्यक्तीचा मोक्षधर्म आहे चातुर्वर्ण्यसमाजरचनेत वर्णाश्रम-धर्मरज्जूंनींच तेवढे समष्टिस्वरूप शक्य असते वर्णाश्रम शिथिल झाल्यामुळे प्रत्येक मनुष्य केवळ व्यक्ति ह्या एकत्याच नात्याने राहिले व व्यक्ति या एकत्याच नात्याने मोक्षाकडे भक्तिमार्गाने जाऊ लागले ती भक्ति कृष्ण, दत्त, स्कद या हिंदु दैवताची असल्याकारणाने ते मनुष्य हिंदुत्वांत जसे गणले जाई, तसेच राज्यकर्ते जे म्लेंच्छ लोक त्याच्या जुलमास व अवहेलनेस पात्र होई. हा जुलूम व ही अवहेलना केवळ भक्तिमार्गानें नाहींशी होण्यासारखी नव्हती भक्तिमार्ग हा सशस्त्र प्रतिकाराचा तर नव्हेच, पण अशस्त्र प्रतिकाराचाहि मार्ग नाहीं. प्रतिकार म्हणजे प्रवृत्ति ती निवृत्त्येक-प्रधान भक्तीच्या अगदीं उलट. तेव्हा तामस प्रवृत्त्येकप्रधान जे म्लेंच्छ राज्यकर्ते त्यांच्या छलास महाराष्ट्रांतील भक्तव्यक्ति दिवसेंदिवस जास्त पात्र होऊं लागली प्रत्येक भक्तव्यक्ति हिंदुत्वात राहिली, एवढा एकच उपयोग साधुसतांच्या भक्ति-मार्गाचा झाला आणि हा उपयोग काहीं लहानसहान नव्हता. जर भरतखडात व

महाराष्ट्रांत त्या काळीं भक्तिमार्ग नसता, तर अफगाणिस्तान, इराण वगैरे देशांतल्याप्रमाणे ह्या देशातील सर्व प्रजा एकवर्णी मुसलमान झाली असती आणि आर्यसंस्कृति, आर्यसारस्वत, आर्यसमाज, आर्यचातुर्वर्ण्य, आर्यशील ह्या जगतांतून समूळ उच्छिन्न झाले असते. ज्ञानेश्वरमहाराजांपासून एकनाथमहाराजापर्यंतचे जे साधुसंत झाले, त्यांनीं महाराष्ट्रांतील लोक हिंदुत्वात राखिले, ही तर अजब कर्तबगारी खरीच ह्या कर्तबगारीवरूनहि एका अजब कर्तबगारीचें वर्णन आतां करावयाचे आहे वर्णाश्रमधर्म मोडणे म्हणजेच कलियुग होणे आहे व तो पुन्हां प्रचलित होतो, म्हणजेच इतर युगांची स्थापना होते अशा उत्तम युगाचा प्रचार करण्याचा कित्येक थोर पुरुषांनीं शिवकाळीं प्रयत्न केला...वर्णाश्रमधर्म लोपलेला आहे, फक्त नांवाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य राहिलेले आहेत. राजा क्षत्रिय नाही, ब्राह्मण षट्कर्मे करीत नसून निव्वळ वृषल बनले आहेत, अशी प्रतीति साधुसंताप्रमाणेच सामान्य जनांची झाली शक १२०० पासून १५०० पर्यंतच्या तीनशे वर्षांत ही जाणीव लोकांमध्ये अवतरली एकवर्णी मुसलमान बनण्याचा उच्छृंखल कुधारणेचा झटका पहिल्या पाच-पन्नास वर्षांतच उतरला नंतर भक्तिमार्गानें आचारशुद्धि, चित्तशुद्धि व पूर्वेतिहासज्ञान झालें आणि चातुर्वर्ण्य व वर्णाश्रम या उत्तमोत्तम संस्थेकडे लोकांचे लक्ष वळले खरे ब्राह्मण व खरे क्षत्रिय आपण बनावे, असें ब्राह्मण-क्षत्रियांना वाटू लागले. कसें बनावे ते मात्र समजेना. ती समज रामदासादि साधुसंतांनीं तत्कालीन जन्मब्राह्मण-क्षत्रियांना करून दिली."

## रामदासांचें वैशिष्ट्य

"भक्तिमार्गाची सवय स्वधर्मशून्य व संस्कृतविद्याशून्य ब्राह्मणांना साधुसंतांनीं लाविली होतीच व विठोबा, खंडोबा, दत्त वगैरेंची उपासना महाराष्ट्रांतील कुलकर्णी व देशपांडे फार दिवसांपासून करीतच होते तिलाच दुसऱ्या एका उपासनेची जोड रामदासांनीं दिली. रामराज्य करणारा जो चातुर्वर्ण्याभिमानी सीतापति दाशरथि राम, त्याच्या उपासनेचा गुरुमंत्र रामदासानीं महाराष्ट्रांतील एकूणएक कुळकर्णी-देशपांड्यांना दिला.. परंतु एवढ्याने विशेषसें कार्य झाले नाहीं. कुळकर्णी व देशपांडे यद्यपि जातिब्राह्मण होते, तथापि ते कायस्थांचीं ब्राह्मणाला लाज आणणारीं कामे करीतच होते. अशा ब्राह्मणब्रुवांबद्दल जनतेच्या ठायीं आदरबुद्धि उत्पन्न होणे दुरापास्त होते ज्यांनीं रयतेच्या दररोज माना मुरगळावयाच्या, त्या ब्राह्मणांबद्दल इतर वर्णांना द्वेष वाटल्यावांचून कसा राहावा?...कायस्थ-धंदा सोडून धर्मनिष्ठ असे ब्राह्मण व्हा म्हणून रामदास ह्या लोकांना सांगते, तर ते त्याचे खचित ऐकतेना. समर्थांनींहि न पेलणारें असें हे व्रत त्यांना कधीं सांगितले नाहीं हे बिकट काम त्यांनीं दुसऱ्याच एका विशिष्ट लोकांपासून घेतले. ते लोक कोण तर समर्थांचे खास जे शिष्य, ते होत...मराठ्यांवर म्हणजे क्षत्रियांवर निःसीम प्रेम

करणारे, कोणत्याहि वर्णाचा द्वेष न करणारे, केवळ कोरड्या भिक्षेवर राहणारे व ती भिक्षाहि एकाच गांवीं एक-दोन दिवस मागणारे, चातुर्वर्ण्यधर्मज्ञ, स्वधर्मनिष्ठ, तपोबलाने केवळ अपरसूर्य, लोकस्थिति बारकाईने अवलोकणारे, सर्वांना हवेसे परतु कोणालाहि उपसर्ग न देणारे, साक्षात् वेदोनारायण, सर्वांचे हितकर्ते असे पांच-चार हजार स्त्री-पुरुष, शिष्यप्रशिष्य, समर्थांनीं बाराबारा वर्षे स्वतःच्या देखरेखीखालीं ठेवून तयार केले व प्रांतोप्रांतीं स्थापिले हे पांच-चार हजार शिष्य महाराष्ट्रातील तत्कालीन अस्सल नखशिखांत ब्राह्मण होत ब्राह्मणांच्याप्रमाणे महाराष्ट्रात क्षत्रियाचीहि धर्मलोपाने दुर्दशा झाली होती बहुतेक सर्व मराठे म्लेच्छाचे नोकर बनले होते, व कित्येक शेतीवर उदरनिर्वाह करीत होते. ह्या लोकांना रामदासी ब्राह्मणांनीं क्षात्रधर्माची ओळख करून दिली. ब्राह्मणानीं व क्षत्रियानीं दासवृत्ति करू नये, असे रामदासी ब्राह्मणांना ठांसून सागतां आले व त्याचा परिणाम कित्येक तरुण क्षत्रियावर बेमालूम घडला. यवनाच्या नोकरींत पिढ्यान्‌पिढ्या जे मराठे होते, त्यानीं आपल्या नोकऱ्या व मनसबदाऱ्या तर सोडल्या नाहींतच, परतु त्याच्या पुत्रांच्या व तरुण नातलगाच्या मनात क्षात्रधर्म उतरून तदनुरूप आपले कर्म असावे, अशी उत्कठा उत्पन्न झाली ही उत्कठा सह्याद्रीजवळील मावळांत व तळकोकणांत विशेष प्रादुर्भूत झाली. ज्या क्षत्रियाच्या ठायीं ही उत्कठा उत्पन्न झाली, त्यापैकीं बहुतेक सर्व स्कदोपासक असून रामोपासक ऊर्फ रामदास सप्रदायाचे उपदिष्ट झाले. महाराष्ट्रांतील नवीन स्वधर्मनिष्ठ क्षत्रिय ते हेच होत.'

"अशा तऱ्हेनें स्वधर्मनिष्ठ ब्राह्मण व क्षत्रिय निर्माण झाल्यावर, त्यांनीं नाहींसा झालेला वैश्यवर्ग नवीन निर्माण केला आणि गुजराथेत व मारवाडातून वाणी आणून महाराष्ट्रातील खेडोखेडी त्याची स्थापना केली शूद्र, अतिशूद्र पूर्वीं होते तसेच या वेळींहि असते झाले.

"येणेप्रमाणें चातुवर्ण्य समाजरचना रामदासांनीं निर्माण केली. रामदासांनीं दासपथ काढून जे अद्‌भुत कृत्य केलें ते हेच होय. पूर्वींच्या विस्कळित समाजांत स्वधर्मनिष्ठ अशा त्रैवर्णिकांचा प्रादुर्भाव झाल्यामुळे एका सामाजिक क्रांतीचे राजकीय क्रांतींत स्वाभाविकपणे रूपान्तर झाले. ...रामदासानीं सामाजिक क्रांति घडवून आणिल्याबरोबर शिवराजाने राजकीय क्रांतीस आरभ केला तो रास्तच होता. पहिली झाल्याशिवाय दुसरी होणे केवळ अशक्य असते राष्ट्रांतील सर्व घटक ऊर्फ वर्ण ऊर्फ वर्ग जेव्हा अन्योन्योपकारक होतात, तेव्हाच त्यांच्या हातून एकादी राष्ट्रीय कामगिरी होते. अन्योन्योपकरिष्णु असे चारी वर्णांतील जेवढे लोक, तेवढेच समाज व राष्ट्र या पदवीस पात्र असतात हेहि लक्षांत घेतलें पाहिजे"*

वरील उतारा लक्षपूर्वक वाचिल्यास आपल्या संस्कृतीच्या आधारेच स्वराज्याची जागृति करावी म्हणणारांना सुद्धां एक प्रकारची सामाजिक क्राति होण्याची आवश्य-

* राजवाडे-लेखसग्रह, भाग २ रा, पृ. १००–११५.

कता वाटत होती आणि राजकीय क्रांतीपूर्वी सामाजिक क्रांति व्हावी या मतांतील तत्त्व त्यांना मान्य होते, पण ही सामाजिक क्रांति कोणत्या पायावर आणि कोणता आदर्श पुढे ठेवून करावी याबद्दल त्यांचा तत्कालीन सुधारकाशीं मतभेद होता, असे दिसून येईल.)

## तीन भिन्न दृष्टिकोण

चिपळूणकर, रानडे आणि आगरकर यांचे सामाजिक किंवा सांस्कृतिक क्रांती-संबंधींचे विचार परस्परांहून भिन्न होते, हा मूलभूत दृष्टिकोणातील भेद ध्यानांत घेतल्याखेरीज त्यांच्या मतभेदाचा स्पष्ट उलगडा होऊ शकत नाहीं. चिपळूणकर "आमच्या देशाची स्थिति" या आपल्या लेखमालेत म्हणतात:

"अवघे युरोप खंड हे सोळाव्या शतकापूर्वी आमच्या देशाप्रमाणेच स्वस्थपणे घोरत पडले होते पण चीन देशांतून मुद्रणकलेनें येऊन पाश्चात्य राष्ट्रांचे ठायीं वस्ती केली मात्र, तो लागलींच पन्नास-साठ वर्षांत जिकडेतिकडे चळवळ सुरू झाली जुन्या ग्रीक व लाटिन ग्रंथाचा साऱ्या देशांत अभ्यास व्हावयाला लागून युरोपची बुद्धिदेवता फार दिवसपर्यंत जी निद्रिस्त झाली होती, ती एकाएकीं जागृत झाली हिचें फळ सोळाव्या शतकांतील जगप्रसिद्ध धर्मक्रांति हे होय याप्रमाणेच फ्रान्स देशातहि अठराव्या शतकापर्यंत बिलकुल गडबड नसून हवी तशी अंदाधुदी चालली होती व एकदर राष्ट्र हे मेंढरासारखे होऊन गेले होते. सरकारी अधिकाऱ्यानीं हवे तसे जुलूम करावे आणि ते खुशाल खपले जावे पण व्हाल्टेरप्रभृति महान् महान् ग्रंथ-कारांनीं देशभाषेच्या द्वारे लोकांचे मन क्षुब्ध करून त्यांस सुजाण केल्याबरोबर वरील शतकाच्या शेवटीं अशी धुमश्चक्री उडाली, कीं तिनें फ्रान्सच काय, पण सारे युरोप खंड खळबळून सोडले! .. असो तर ज्ञानाच्या प्रसाराचा महिमा असा विचित्र आहे. तेव्हां आमच्या देशाची हलाखी पाहून ज्यांस खरोखर दुःख होत असेल व तिजपासून त्याची सुटका व्हावी म्हणून जे झटत असतील, त्यानीं वरील ज्ञाना-जनाचा प्रयोग करण्याचे मनावर घेतलें पाहिजे." याच लेखांत थोडे आधीं ते लिहितात: "मनुष्याची किंवा राष्ट्राची सुधारणा करायाची म्हटली म्हणजे तिचा पाया आत्मस्थितीचे पूर्ण ज्ञान हे होय ज्यास आपली स्थिति काय आहे, पुढे काय होणार, आपले बलाबळ किती वगैरे गोष्टींचे चांगलेसें ज्ञान नाहीं, त्याची स्थिति कधीं सुधारायाची नाहीं तर आमच्या लोकास प्रथमतः स्वतःविषयींचें ज्ञान करून देणें अवश्य होय"*

वरील उताऱ्यांत युरोपांतील तीन विचारक्रांतींचा उल्लेख आहे: (१) ग्रीक व रोमन प्राचीन विद्येचे पुनरुज्जीवन, (२) ल्यूथरकृत सोळाव्या शतकांतील धर्मक्रांति आणि (३) व्हॉल्टेरप्रभृतींनीं फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी केलेली विवेकवादी

* निबंधमाला, अंक ८३ वा.

विचारक्रांति. यांपैकीं चिपळूणकर, टिळक, राजवाडे वगैरेंचा भर पहिल्या प्रकारच्या विचारक्रांतीवर होता, रानडेप्रभृतींचा भर दुसऱ्या प्रकारच्या विचारक्रांतीवर होता, आणि आगरकरांचा भर तिसऱ्या प्रकारच्या क्रांतीवर होता पहिल्या पथांतील संशोधकांनीं महाराष्ट्राच्या व भारतीय संस्कृतीच्या पुनरुद्धारावर भर दिलेला असून महाराष्ट्रांतील साधुसंतांच्या कार्याकडे त्याच दृष्टीने पाहण्यास त्यानीं लोकास शिकविलें आणि वर्णाश्रमधर्मसंस्था हीच जगांतील सर्वश्रेष्ठ समाजरचना होय, असा अहंकार अथवा अभिमान लोकांत जागृत केला न्या. रानडे यांनीं ज्ञानेश्वर-तुकारामांना ल्यूथर-प्रमाणे धार्मिक सुधारक बनविलें आणि आगरकरानीं व्हाल्टेरप्रमाणे विवेकयुगाची स्थापना करण्याच्या हेतूने 'सुधारक' पत्र काढिले त्याना आपल्या देशात एक सर्वांगीण क्रांति होत आहे असे दिसत होते व तिचें स्वरूप फ्रेंच राज्यक्रांतीप्रमाणे होईल असे ते वारवार लिहितात : "फ्रान्स देशातील कुलीन घराण्यातले लोक, धर्माधिकारी, दरबारी लोक, आणि सरकारी अधिकारी आपल्या जुलुमाच्या काढण्या योग्य वेळीं थोड्या ढिल्या करते, तर इ स. १७८९ त त्या देशात जी टोलेजंग राज्यक्रांति झाली, ती कदाचित् त्यास टाळता आली असती, असे कित्येक इति-हासकाराचे म्हणणें आहे पण योग्य वेळीं त्यांना तसे करणे प्रशस्त वाटले नाहीं, म्हणून फ्रान्स देशांत तो प्रचंड वणवा पेटला आणि त्याच्या भडक्यांत साऱ्यासच दारुण यातना सोसाव्या लागल्या! आमच्या सांप्रत धर्मकलहाचीहि अशीच अवस्था होणार आहे" हे उद्गार त्यांनीं सुधारकावर बहिष्कार टाकणाऱ्या सनातनी धर्म-निष्ठांना उद्देशून काढिले आहेत आमच्या सामान्य शेतकऱ्यांचें वाढतें दारिद्र्य पाहून ते राज्यकर्त्यांना असाच इषारा देत असत, हे मागील प्रकरणांतील विवेचना-वरून ध्यानांत आलेच असेल केसरींतील निवडक लेखाच्या पहिल्या भागात 'गुरु गोविंद' या मथळ्याचा जो लेख आला आहे, त्यात सध्याच्या राज्यकर्त्यांविरुद्ध 'विद्वान् आणि धंदेवाले यांचा एकोपा होईल' व येथे फ्रेंच राज्यक्रांतीची पुनरावृत्ति होईल असे म्हटले आहे राजवाड्याच्या शब्दात थोडा बदल करून सांगावयाचे म्हणजे या देशातील 'सद्ब्राह्मण' आणि 'सद्वैश्य' हे एक होऊन या देशात क्रांति करतील असे आगरकरांना वाटत होते अमेरिका व फ्रान्स या देशातील राज्य-क्रांत्या ब्राह्मण-वैश्यानीं एक होऊन केल्या व त्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या क्रांतिकारक तत्त्वाचा अवलंब करून केल्या ब्रिटिश कितीहि सुधारलेले असले, तरी "हिंदू लोक धनसंपन्न आणि ज्ञानसंपन्न झाले, म्हणजे इंग्रज लोक एके दिवशीं आपले चंबूगबाळें आटोपून चालते होतील असे कोणींहि मानू नये. राज्यशास्त्राप्रमाणें व ऐतिहासिक अनुभवाप्रमाणें हिंदुस्थानच्या लोकांची अक्कल आणि ताकद दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत जाऊन त्यांची अधिकाधिक फाटाफूट होऊन शेवटीं घरची मंडळी आगंतुकांना धुडकावून लावणार" असे त्यांचें या बाबतींत मत होते

न्या. रानडे यांनीं महाराष्ट्रांतील साधुसंतांच्या कार्याची युरोपांतील

धर्मसुधारकांशीं तुलना केली ती चुकीची असून त्यांच्या कार्याचा आधार आधुनिक सुधारकांना घेतां येणार नाहीं, असे राजवाडे जन्मभर आग्रहपूर्वक प्रतिपादीत असत त्याचे मत असे होते, कीं हिंदु संस्कृति ही वर्णाश्रमधर्माची चौकट सोडून कधींच गेली नाहीं आणि ज्या जैन, बौद्ध किंवा महानुभावांनीं तसे करण्याचा प्रयत्न केला, त्यांना हिंदु संस्कृतीने बाहेर टाकिले व त्यांचा पराभव केला साधुसंतांनींहि ही परंपरागत चौकट सभाळूनच धर्मोद्धार केला व त्याचा उपयोग महानुभावादि 'नास्तिक' मते नष्ट करण्यासाठींच झालेला आहे वर्णाश्रमधर्मसंस्थेचे गुणवर्णन ते पुढील शब्दात करतात: "धर्म म्हणजे कायदा, सर्व प्रकारचा कायदा—ससाराचा कायदा, नित्यकर्माचा कायदा, न्याय-मनसुबा निवडण्याचा कायदा, शुचिर्भूतपणाने वागण्याचा कायदा...... असे हे कायद्याचे, धर्माचे, चातुर्वर्ण्याचे राज्य, संस्थान व समाजन शौनकाने प्रवर्तविले धर्मराज्य धर्मराज्य म्हणतात ते हेच रामराज्य म्हणून जे गातात ते हेच सौराज्य म्हणून म्हणतात ते हेच") अलीकडील सुधारकांचे मूर्तिपूजादि धर्माच्या कर्मकाडावरील आघात त्याना बुद्धाने वैदिक धर्मावर केलेल्या आघाता-प्रमाणें परंपरेचा भग करणारे भासत तसेच जातिभेदांचा उच्छेद करण्याचा त्यांचा प्रयत्नहि बुद्धाच्या प्रयत्नासारखाच त्याना भासे (युरोपातील धर्मक्रांतीप्रमाणे आपल्याकडे जर कोणीं धर्मक्राति अगर समाजक्राति करण्याचा प्रयत्न केला असेल, तर तो जैन-बौद्धांनींच होय) पण तो फसला भागवतधर्मी साधुसंतांनीं भूतदया, समता वगैरे तत्त्वांचा पुरस्कार केला असला तरी ते बुद्धाप्रमाणें नास्तिक नव्हते, परंपरेचे भंजक नव्हते आणि वर्णाश्रमधर्माचे द्वेष्टे नव्हते त्या वर्णाश्रमधर्माचा उद्धार त्याना अभिप्रेत होता असे राजवाड्यांना सांगावयाचे आहे केवळ ऐतिहासिक दृष्टीने पाहता साधु-संताच्या कार्यासबधींचे राजवाड्यांचे हे मत रानड्यांच्यापेक्षां अधिक बरोबर आहे, असे आम्हांस वाटते तथापि आजच्या परिस्थितीत वर्णाश्रमधर्माची चौकट शाबूत ठेवून घडणारी सुधारणा पुरी पडणार नाहीं, हे त्याहूनहि अधिक खरे आहे

रानडे यांची धर्मसुधारणेची व सामाजिक सुधारणेची कल्पना अधिक उदार असली, तरी परंपरेचा भग करू नये ही त्याची वृत्ति, या बाबतींत सुधारणेच्या कार्याशीं विसंगतच दिसते बुद्धधर्मासबधीं ते म्हणतात: "We have outlived Budhism, and we conquered it by imbibing its excellences and rejecting its errors." म्हणजे बुद्धधर्मावर विजय मिळवितांना आम्हीं त्यांतील चांगल्या गोष्टी आत्मसात् केल्या व त्यांतील प्रमाद फेकून दिले यावरून बुद्धधर्माची परंपरा आपण चालवीत नाहीं, असे त्यांचे स्पष्ट मत दिसते. पण प्रार्थनासमाज व ब्राह्मसमाज हा मूर्तिपूजेविरुद्ध मोहीम करण्यांत आणि जातिभेद मोडण्यांत बुद्धधर्माचीच परंपरा चालवीत नव्हता काय? बुद्धाने मूर्तिपूजेविरुद्ध मोहीम केली नाहीं हे खरे आहे, पण त्याचें कारण त्या वेळीं मूर्तिपूजाच नव्हती हे आहे. बुद्धानें तत्कालीन धर्मातील कर्मकांडावर उघड हत्यार उपसले. हे तत्कालीन कर्मकांड

म्हणजे यज्ञयाग. बुद्धकालात यज्ञयाग माजले, तसेच पुढील काळात मूर्तिपूजेचें थोतांड माजलें. या दृष्टीनें विचार केला किंवा जातिभेद नष्ट करण्याच्या दृष्टीनें पाहिलें, तरी प्रार्थनासमाजाचे कार्य हे भागवतधर्मी साधुसतांच्या कार्यापेक्षा बुद्धधर्माच्या कार्या-सारखेच अधिक दिसते. पण परपरेचा भग न करतां सुधारणा करावयाची, तर मग ती वर्णाश्रमधर्माच्या पायावरच कां करू नये, असा प्रश्न येतो. पण जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य सुधारकांपैकीं कोणासच मान्य होण्यासारखे नव्हते. (आगरकराना बुद्धाच्या कार्याबदल नापसंती व्यक्त करण्याचे काहींच कारण नव्हते केवळ जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य न मानण्याच्याच दृष्टीनें नव्हे, तर अज्ञेयवादाच्या दृष्टीनेंहि आगरकराना बुद्धाचे माहात्म्य वाटत असे गौतमबुद्ध हाच आपल्या इकडच्या सर्व तत्त्वज्ञान्यात त्याना अधिक बुद्धिवादी असा वाटत असे.) याचा अर्थ त्यांचीं सर्वच मते त्यांना मान्य होतीं असा नाहीं! पण जर पूर्वींच्या कोणा सस्कृति-सुधारकाचा त्यांनीं गौरवाने उल्लेख केला असेल, तर तो गौतम बुद्धाचाच होय)

## टिळक विरुद्ध आगरकर

आतां समाजसुधारणेच्या दृष्टीनें टिळकाचा व आगरकराचा मुख्य मतभेद कोठे होता ते पाहूं आगरकराच्या सर्व सुधारणाचा आधार व्यक्तिस्वातत्र्य हा होता "समाजाचे कुशल राहून त्यास अधिकाधिक उन्नतावस्था येण्यास जेवढीं बंधनें अपरिहार्य आहेत तेवढी कायम ठेवून बाकी सर्व गोष्टींत व्यक्तिमात्रास ( पुरुषास व स्त्रीस ) जितक्या स्वातत्र्याचा उपभोग घेतां येईल तितका द्यावयाचा, हे अर्वाचीन पाश्चिमात्य सुधारणेचे मुख्य तत्त्व आहे, व हे ज्यांच्या अत:करणांत बिंबले असेल त्याना आमच्या समाजव्यवस्थेत अनेक दोषस्थले दिसणार आहेत, हे उघड आहे हीं दोषस्थळें वारंवार लोकाच्या नजरेस आणावीं, तीं दूर करण्याचे उपाय सुचवावे, आणि युरोपीय सुधारणेत अनुकरण करण्यासारखे काय आहे तें पुनःपुनः दाखवावे, यास्तव हे सुधारक पत्र काढले आहे" असे ते आपले धोरण सांगतात जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यपद्धति ही या व्यक्तिस्वातत्र्याच्या तत्त्वाशीं विरुद्ध असल्यानें त्याना ती पसंत नव्हती आपल्या समाजात मनुष्याला त्याच्या जीवितातील बहुतेक महत्त्वाच्या बाबतींत स्वातत्र्य उपभोगतां न येता दास्य करावे लागतें त्याचे धार्मिक व सामाजिक आचार हजारो वर्षांच्या परपरागत रूढींच्या रूपानीं त्याला जडशृंखला-प्रमाणे बाधून टाकितात, स्त्री-पुरुषाचा विवाह बालपणींच होत असल्यानें त्या बाबतींतहि त्यांना स्वातंत्र्य उपभोगिता येत नाहीं आणि चातुर्वर्ण्यहि जन्मसिद्ध असले, तर वृत्तीच्या किंवा धद्याच्या बाबतींतहि त्याला स्वातत्र्य लाभत नाहीं. तात्पर्य, विचारस्वातत्र्य, विवाहस्वातंत्र्य आणि व्यवसायस्वातत्र्य या बाबतींत हिंदु-संस्कृतींतील व्यक्ति सर्व बाजूंनीं बांधलेली असते विचार, विवाह आणि व्यवसाय या बाबतींत व्यक्तीला स्वातंत्र्य असल्याखेरीज व्यक्तीचा विकास होऊन त्याला

सुख लागणार नाहीं हें जितकें खरें आहे, तितकेंच त्याखेरीज अशा समाजाची उन्नतीहि होणार नाहीं व तो समाज प्रगतिपर राहणार नाहीं, असे आगरकरांचें मत होते मनुष्यजीवनातील तीन प्रमुख पुरुषार्थ म्हणजे धर्म, अर्थ व काम हे होत. या बाबतींत ज्या समाजांतील सर्व व्यक्ती केवळ परपरेचेंच अवलबन करतात, तो समाज प्रगतिपर होणें शक्य नाहीं त्या समाजांतील प्रत्येक व्यक्ति प्रत्येक महत्त्वाच्या बाबतींत आपल्या कर्तृत्वापेक्षां पूर्वीच्या पिढीकडेच पाहणार, आणि तिची दृष्टि पुढे न राहता मागेच वळलेली राहणार. म्हणून जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य हें समाजाचें स्थितितत्त्व आहे, असे ते म्हणत त्याच्या अंगीं परपरागत स्थिति कायम ठेवण्याचे बरेंच मोठे सामर्थ्य असले, तरी समाजाची प्रगति होण्याच्या दृष्टीने ते अगदींच कुचकामाचे आहे अर्थात् या बाबतींत आपणास पाश्चात्य समाजाचें अनुकरण करावे लागणार व जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य सोडून द्यावे लागणार, असेंच त्यांचे इतर सुधारकाप्रमाणे मत होते

लो. टिळकाचें या बाबतीत नि.संदिग्ध मत काय होतें, तें समजत नाहीं. न्या रानड्यावर टीका करताना ते म्हणतात : “वर्णव्यवस्थेत प्रत्येक मनुष्याचा धंदा अथवा उद्योग त्याच्या इच्छेहून भिन्न कारणानीं नियत्रित झालेला असतो, परतु युरोपांतील स्वतत्र देशांत हवा तो धदा हवा त्यास करण्यास मोकळीक असते. त्यामुळे परस्पराची चढाओढ लागून चांगले तेवढेच लोक पुढे येतात व बाकीच्यास अन्नाचीहि भ्रात पडते, असे आता पूर्णपणे आढळण्यांत आले आहे. सारांश, कोणतीहि समाजरचना घ्या, ती सर्वांशीं निर्दोष म्हणून कधींहि असावयाची नाहीं, हे तत्त्व आतां बऱ्याच लोकाच्या लक्षात येऊन चुकले आहे ‘चातुवर्ण्यं मया सृष्ट गुणकर्मविभागशः’ हा हिंदु-समाजाचा पाया आहे, व इच्छेस येईल तसे करण्यास प्रत्येकास तो कराराने बाधला नसल्यास मोकळीक आहे, हे पाश्चात्य राष्ट्रांतील समाजरचनेचे तत्त्व आहे. आता रा ब. रानडे वगैरे काहीं गृहस्थाचे असे म्हणणे आहे, कीं आमच्या समाजाची इमारत या पूर्वीच्या पायावरून ओढून या दुसऱ्या पायावर ठेविली पाहिजे नाहींपेक्षा एकोणिसाव्या शतकांतील झगड्यांत आपला निभाव लागणार नाहीं! आमच्या मते हे सयुक्तिक नाहीं युरोपांतील राष्ट्राच्या समाजाची घटना जरी निराळ्या तत्त्वावर झाली असली, तरी त्या राष्ट्रांतील समाजपद्धतीपासून वाईट परिणाम होत नाहींत असे नाहीं चढाओढीच्या तत्त्वावर रचलेल्या समाजात सपत्तीची सारखी वाटणी न होता काहीं अतिशय श्रीमत व काहीं अतिशय दरिद्री अशी स्थिति प्राप्त होते; आणि विवाहसस्कारासहि कराराचे स्वरूप आल्यामुळे विधवाच्याऐवजीं कुमारिकाची सख्या वाढून गृहस्थाश्रमाच्या सुखांस पुष्कळ स्त्रिया अंतरतात. या दोन उदाहरणावरून अमुकच तत्त्वांवर समाजाची रचना झाली असल्यास ते राष्ट्र सुखी होते, हें म्हणणें किती अविचाराचे आहे हे लक्षांत येईल. हिंदु-समाजाच्या स्वरूपांत अगर रचनेत फेरफार व्हावयास

नको अगर तो व्हावयाचा नाहीं, असे आम्ही म्हणत नाहीं प्राच्य व पाश्चात्य, आध्यात्मिक व आधिभौतिक अथवा वर्णव्यवस्थांकित व यदृच्छाचारप्रवर्तक अशा नव्या-जुन्या सुधारणाचा संयोग झाल्याने जुन्या समाजरचनेच्या तत्त्वात कांहीं तरी फेरफार झाला पाहिजे व होईल, हे म्हणणें कोणासहि मान्य करावे लागेल याबद्दल वाद नाहीं. वाद काय तो एवढाच, कीं वर ज्या दोन तऱ्हेच्या सुधारणा सांगितल्या त्यांपैकीं एकीचा लोप करून दुसरी स्थापन करावयाची, अथवा जुन्या संस्थेतच योग्य असे काहीं फेरफार करून तिचे पुनरुज्जीवन करावयाचे. ......युरोपांतील समाजरचनेचे तत्त्व आम्हीं सर्वांशीं घेऊ म्हटले, तर आमच्या प्रयत्नास यश येण्याची फारशी आशा बाळगावयास नको वर्णव्यवस्थेमुळेच हजारों वर्षे आम्हीं आपला आपलेपणा कायम राखून एकसारखे स्वतंत्र नाहीं, तरी जिवत तरी राहिलो आहों हा आपलेपणा एकदां सोडून द्या, म्हणजे आमचेजवळ आहे तें आम्ही गमावून बसू, इतकेंच नाहीं तर 'इदं च नास्ति' आणि 'पर च न लभ्यते' अशी आमची स्थिति होऊन इसापनीतींतील भाकरीचा तुकडा तोंडात धरून जाणाऱ्या कुत्र्याप्रमाणें आम्ही अन्नासहि मोताद होऊन जाऊं सुधारणा कोणास नको आहे असें नाहीं, पण तिचे मार्ग अगदीं भिन्न आहेत, हे वरील विवेचनावरून वाचकाच्या ध्यानात येईल."*

या युक्तिवादांत आपल्या परपरागत वर्णव्यवस्थेचे समर्थन आणि पाश्चात्य व्यक्तिवादी समाजरचनेंतील दोषदर्शन हीं दोन सरमिसळपणाने प्रतिपादिलीं आहेत. शिवाय आपली परपरागत जन्मसिद्ध वर्णव्यवस्था अद्यापि कायम आहे, असें गृहीत धरण्यात आलें आहे वस्तुतः वर्णव्यवस्था आणि आनुवंशिक व्यवसायपद्धति मोडून जाऊन त्या वेळींहि बराच काळ झालेला होता तिची पुनः स्थापना करणें, ज्या वेळीं हा लेख लिहिला त्या वेळींहि, शक्य नव्हते १८९३ सालीं ॲनी बेझट या हिंदुस्थानांत आल्या आणि त्यानीं पुण्यास पाश्चात्य व भारतीय समाजरचनेची तुलना करून भारतीय समाजरचना श्रेष्ठ आहे असे प्रतिपादन करणारे आणि पाश्चात्य समाजात अति श्रीमत व अति दरिद्री असे दोन वर्ग पडत आहेत, ती समाजरचना वर्णव्यवस्थेपेक्षां हीन आहे असे प्रतिपादन करणारे एक व्याख्यान दिले त्यास उद्देशून आगरकर म्हणतात:

"हिंदुस्थानच्या ज्या ज्या मोठमोठ्या शहरीं मिसेस ॲनी बेझट याचीं व्याख्याने झालीं, तेथें तेथे धर्माभिमानी म्हणविणाऱ्या लोकास या असामान्य स्त्रीस कोठे ठेवू आणि कोठे न ठेवू असे होऊन गेलें आहे आणि असे व्हावें यांत नवल नाहीं. आपल्या देशाची आणि आपल्या पूर्वजाची स्तुति कोणास प्रिय नाहीं?... आतां ज्या दृष्टीने हिंदुस्थानकडे साऱ्या जगाचें नेतृत्व येणार असे मिसेस ॲनी बेझट याचे म्हणणे आहे ते कितपत यथार्थ किंवा अयथार्थ आहे, या वादात आम्ही सध्यां पडत नाहीं..|अत्यत प्राचीन कालीं हिंदुस्थानचे धर्मविचार व हिंदुस्थानची

* लो टिळकाचे केसरीतील लेख, भाग ४ था, पृ. १८८-१९०.

समाजरचना अगदीं पूर्णत्वास जाऊन पोचली होती, त्यात सुधारणा करण्यास अणुमात्रहि जागा राहिली नव्हती व त्याचें सर्वांकडून अनुकरण होण्यातच जगाचा तरणोपाय आहे असे जरी निर्विवाद सिद्ध झाले—तसे होईल असे आम्हांस वाटत नाहीं—तथापि आमचे धर्मविचार व आमची प्राचीन समाजरचना आणि सध्याचें आमचे धर्माचरण व आमची सामाजिक स्थिति यात जमीनअस्मानाचे अतर आहे, ही गोष्ट कोणासहि नाकारतां येणार नाहीं. उदाहरणार्थ, आमची जातिभेदाची सस्था घेतली, तर एका विशिष्ट वर्गानें ऐहिक वैभवाच्या भरीं न पडता आपला काल अध्ययन व अध्यापन यातच घालवावा, दुसऱ्या वर्गानें क्षात्रधर्म स्वीकारावा, तिसऱ्याने द्रव्यार्जनाच्या नादीं लागावें व चौथ्याने सेवकवृत्तीचा अगीकार करावा, ही व्यवस्था केवळ निसर्गप्राप्त असून इतर देशातहि तत्त्वत. तीच अस्तित्वांत आहे असे प्रतिपादन करणाऱ्या या जातिभेदाच्या कैवारणीस या चार जातींत जे असख्य पोटभेद झाले आहेत ते मुळींच समत नाहींत, ही गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे. ते मोडून टाकणे अत्यवश्य आहे असे तिचे मत आहे आमचे लोक हे करण्यास तयार आहेत काय? असतील तर या हिंदु आचार-विचाराचे मडन करणाऱ्या विदुषीचे आम्हावर अगणित उपकार झाले, असे आम्ही मोठ्या आनंदाने कबूल करू तसेच हल्लीं जे लोक 'ब्राह्मण' या नावाखालीं मोडतात, त्यास त्या नावाचा अधिकार प्राप्त होण्यास त्यांनीं आपला सर्व वेळ केवळ अध्यात्मविचारांतच घालविला पाहिजे, परतु व्याख्यात्रीच्या उपदेशाप्रमाणे सर्व आधिभौतिक वैभव केवळ अनर्थप्रचुर मानून द्रव्यार्जनाच्या व ऐहिक उन्नतीच्या साऱ्या खटपटी सोडून देऊन आमचे ब्राह्मण जर आध्यात्मिक उन्नतीकडेच आपल्या बुद्धीचा व्यय करण्यास राजी नसतील, तर त्यांनीं आपणांस ब्राह्मण म्हणवून घेऊन फुकाची आढ्यता मारण्यात व टाळ्याच्या गजरात व्याख्यात्रीचे अभिनदन करण्यात काय अर्थ आहे, तें आम्हास समजत नाहीं तात्पर्य, भूतभूतकाळीं आमचे धर्मविचार व आमची समाजव्यवस्था ही कितीहि स्पृहणीय असली व भविष्यकाळीं आम्ही साऱ्या जगाचे मार्गदर्शक होणार असलों, तरी प्रत्येक दृष्टीने वर्तमानकाळीं तरी आमची स्थिति अगदीं खालावलेली आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे, आणि भोंवतालीं चाललेल्या जीवनार्थ कलहात आम्हांस सरशी मिळवावयाची असो किंवा मिसेस बेझंट सागतात त्याप्रमाणे साऱ्या जगास आध्यात्मिक विचाराचा धडा घालून देणें असो, आम्हास प्रथम आपल्या सुधारणेस लागलें पाहिजे, यांत मुळींच मतभेद नाहीं नुसतें आमचे बाबा असे होते आणि तसे होते म्हणून पोकळ फुशारकी मारण्याने आमची सुधारणा होणें नाहीं ती होण्यास आम्हीं आमचा आयुष्यक्रम बदलला पाहिजे, परतु आमची गोम काय ती येथेच आहे...एका कालीं पूर्व दिशा ज्ञानसूर्यानें तेजःपुज झाली होती व पश्चिम दिशा अज्ञानतिमिरानें व्याप्त झाली होती; पण आज त्या स्थितीचा व्युत्क्रम होऊन पूर्व दिशा अधकारात ठेचा खाऊ लागली असता अस्तमित ज्ञानसूर्यप्रभेच्या नुसत्या स्मरणाने आमचा व्यवहार

सुरळीत चालावा कसा?" तात्पर्य, जी वर्णव्यवस्था आमची आधारभूत संस्था म्हणून आम्ही समजत होतो, ती आम्हीं सोडूनच दिली होती. मग व्यक्तिवादी समाजरचनेवर आम्ही जात नाहीं, या म्हणण्यांत तरी अर्थ काय होता? पुढे शके १८४४ सालीं म्हणजे १९२२ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'राधामाधवविलासचंपू'च्या प्रस्तावनेंत राजवाडे म्हणतात:

"वर्णांचे व जातींचें समाजरचनेत जे कार्य व्हावयाचे ते बरेच होऊन चुकलें आहे याहून उच्चतर समाजरचनेचा काल पुढे उगवेल असा निश्चित अदाज दिसतो चातुर्वर्ण्य व जाती अनादि नाहींत. चातुर्वर्ण्य उत्तर कुरूत उत्पन्न झाले व बौद्धकालात त्याचे रूपान्तर जातिसस्थेंत झाले सर्व जातीचा एकच सावळा रग झाल्याकारणाने वर्णभेदाचे आता कारण उरले नाहीं आणि बहुतेक सर्व जाती अन्योन्य वृत्तींचं उल्लघन गेलीं हजार वर्षें करू लागल्यामुळे, जातिभेदाचीहि मातब्बरी कातकरी, भिल्ल वगैरे वन्य लोक वगळले, तर वृत्तिदृष्ट्या म्हणजे निर्वाहदृष्ट्या राहिली नाहीं. ....परतु पिढीजात म्हणजे पीठिकाजात वांशिक गुणाच्या दृष्टीने जातिसंस्था एकाएकीं राभस्यानें मोडणे इष्ट म्हणजे राष्ट्रहितपोषक होणार नाहीं"

तात्पर्य, मानववशाची भेसळ आणि आनुवंशिक वृत्तीचे उल्लघन या दोन्ही दृष्टींनीं चातुर्वर्ण्यसस्था आज टिकू शकत नाहीं इतकेंच नाहीं, तर आता याहून श्रेष्ठ समाजरचना करण्याचा काळ आला आहे, हे राजवाड्याना आयुष्याच्या अखेरीस दिसूं लागले होते असा आम्ही या विवेचनाचा अर्थ काढितो, व यानतर 'जातिसस्था राभस्याने मोडू नये' या त्याच्या उपदेशात फारसे स्वारस्य उरते, असे आम्हास वाटत नाहीं लो टिळकांनींहि आपल्या अखेरच्या दिवसात जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य मानणें लोकशाहीच्या काळास अननुरूप आहे, व सर्व जातींतील लोकानीं स्वराज्याच्या कार्यांत पडणे आणि जातिभेद जन्मसिद्ध न मानता गुणकर्मानुसार मानणे हेच युक्त आहे, असे उद्गार काढिले आहेत. "हल्लींच्या कालात देशहिताचे व्यापारदृष्ट्या, शेतकीदृष्ट्या, धदेदृष्ट्या, लष्करीदृष्ट्या, राजकीयदृष्ट्या अगर आर्थिकदृष्ट्या असे निरनिराळे प्रकार होऊ शकतात हे खरे, पण हे भिन्न भिन्न देशहिताचे प्रकार सिद्धीस नेण्यास भिन्न भिन्न जातवारच लोक पाहिजेत, असें मात्र त्याने सिद्ध होत नाहीं. अधिकारारूढ पुरुष त्या त्या विषयांत निष्णात असला म्हणजे झाले. मग तो जातीचा ब्राह्मण असो वा ब्राह्मणेतर असो, जैन असो वा लिंगायत असो, तिकडे पाहण्याचे कारण नाही हल्लीं उदयास येऊं घातलेल्या लोकशाहींत जे काय शिकावयाचें आहे ते हेच होय मग नोकरशाही किंवा तिचे अनुयायी त्याकरितां आमची स्तुति करोत वा निंदा करोत रणांगणात तरवार गाजविणारा कोणी असला तरी ज्याप्रमाणें तो क्षत्रिय अगर मराठा समजावयाचा, तद्वतच हल्लींच्या कठिण प्रसंगीं कामास आलेला किंवा येणारा पुरुष ब्राह्मणेतर असला तरी तो ब्राह्मणच समजला पाहिजे जातिभेद जन्मसिद्ध न मानितां गुणकर्मसिद्ध मानण्यास येथेच सुरुवात होते

व झाली पाहिजे. आमचे ग्रंथातच नव्हे, तर सुत्तनिपातांतहि असें म्हटले आहे कीं,

'न जच्चा वसलो होति । न जच्चा होति ब्राह्मणो ।
कम्मणा वसलो होति । कम्मणा होति ब्राह्मणो ॥'

म्हणून आडीचे काम कोणते हे पाहून तत्सिध्यर्थ सर्वांनींच ब्राह्मण किंवा ब्राह्मणेतर झालें पाहिजे."* अशा प्रकारे जातीने वृषल किंवा ब्राह्मण होत नसून कर्मानें वृषल किंवा ब्राह्मण होतो, हे तत्त्व अखेरीस बुद्धग्रंथाच्या आधारे हिंदुसमाजापुढे मांडण्याचा प्रसंग लोकमान्यांच्यावर आलेला आहे! आपले स्वराज्य लोकशाहीचे होणार आणि जातिभेद ठेविला कीं जातिविशिष्ट प्रातिनिधिक पद्धति येऊन लोकशाहीचा पूर्ण नाश होणार, हे पाहून त्यानीं हे उद्गार काढिले आहेत. असें असूनहि त्या लेखांत वर्णसकराची स्वराज्याला आवश्यकता नाहीं असें प्रतिपादिले आहेच! ते या लेखाच्या प्रारंभीं म्हणतात: "हिंदु-समाजाची रचना वर्णव्यवस्थेच्या पायावर झाली आहे व त्यांत अर्वाचीन इतिहासदृष्ट्या दुसरे कांहीं दोष असले, तरी आपापल्या गुणकर्मा-पुरता प्रत्येक वर्ण स्वतंत्र असून त्यामुळे प्रत्येक वर्णाची भरभराट त्या त्या वर्णांतील लोकांच्या हिंमतीवर आणि उद्योगावर अवलंबून असते. दुसरा वर्ण त्यांत हात घालू शकत नाहीं, हा त्यांतील एक विशिष्ट गुण आहे हे विसरतां येत नाहीं कालांतराने अशी स्थिति येऊ शकेल, कीं ही वर्णव्यवस्था मोडून सर्व समाज पाश्चिमात्य समाजा-प्रमाणें कराराच्या पायावर उभारला जाईल ही स्थिति सर्वांशीं इष्ट आहे किंवा नाहीं याबद्दल बोल्शेविकांच्या उदयामुळे आतां थोडी शंका येऊं लागली आहे पण कसेंहि असलें, तरी तो आपला सध्यांचा प्रश्न नाहीं" "शिवाजीमहाराजांनीं जी स्वराज्य-स्थापना केली ती वर्णसंकर करून केलेली नव्हती, आणि सध्याच्या काळीं इंग्रजी साम्राज्यांतर्गत ज्या स्वराज्याची स्थापना करावयाची आहे, ते स्वराज्य मिळण्यासहि वर्णसंकराची वाट पाहण्याची आवश्यकता नाहीं... पाश्चिमात्य दृष्ट्या न्याय्य असल्या, तरी ज्याला हजारो वर्षांची परंपरा आहे अशा पौर्वात्य समाजांत या गोष्टी रूढ होण्यास निदानपक्षीं पुष्कळ काल लोटला पाहिजे हें निर्विवाद आहे." तात्पर्य, वर्णसंकर पुढे कदाचित् होईल, पण तो होण्याची स्वराज्यप्राप्तीस आवश्यकता नाहीं एवढेंच हें प्रतिपादन आहे. तसेंच व्यक्तिस्वातंत्र्यावर समाज गेला, तरी पुढे बोल्शे-विझम् होतो, तेव्हां ते तरी इष्ट आहे किंवा नाहीं याबद्दल शंकाच आहे, असे येथे प्रतिपादन केलें आहे पूर्वीं १८९६ सालीं, पाश्चिमात्य समाजांत अति श्रीमंत व अति गरीब असे वर्ग पडत आहेत, तेव्हां ती समाजरचनाहि सर्वांशीं इष्ट नाहीं असें म्हटलें होते, त्यांतीलच हा प्रकार आहे

पण जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य असावें कीं गुणकर्मसिद्ध असावें, या वादाची श्रीमंत-गरीब हा वर्गभेद कसा मोडावा या वादाशीं गल्लत करण्यांत अर्थ नाहीं. जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य असले, तरीहि उत्पादनाची पूर्वींची पद्धति मोडून कारखानदारी पद्धति

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ. ४५३–५८.

स्वीकारिली कीं श्रीमंत-गरीब यांच्यामधील अंतर वाढत जातें आणि असंख्य लोक दारिद्र्यांत व बेकारींत खितपत पडले असूनहि मूठभर लोक चैनींत व ऐषआरामांत कालक्रमणा करीत असतात. समाजाला ही स्थिति औद्योगिक क्रांतीमुळें येते व ती नको असेल, तर एक तर नवीं धनोत्पादनाचीं साधनें घेतांच कामा नयेत, म्हणजे मोठे कारखानेच न स्थापिले पाहिजेत, किंवा ते व्यक्तीच्या मालकीचे न ठेविता समाजाच्या मालकीचे तरी बनविले पाहिजेत. चातुर्वर्ण्य जन्मसिद्ध असावें किंवा नसावें या प्रश्नाशीं या दुसऱ्या प्रश्नाचा तितकासा संबंध नाहीं, कारण केवळ बापाचेच धंदे मुलांनीं करावे म्हटले, तरी यांत्रिक कारखाने निर्माण झाले कीं आर्थिक विषमता व सामान्य जनतेचे दारिद्र्य व बेकारी याची वाढ होणारच शिवाय ज्या काळांत धनोत्पादनात हरघडी नवे शोध, नव्या कला उदयास येतात आणि जुन्या कला व जुने धंदे मरतात, त्या समाजांत आनुवंशिक धंदे तरी करून पोट कसें भरणार? आणि पोट न भरेल तर समाज कसा टिकणार? पूर्वी जो माल समाजाला पुरविण्यास शभर लोक लागत, तो माल आज दहा मनुष्याच्या श्रमाने निर्माण होतो आणि त्या दहांपैकीं नऊ दास बनून दहावा मालक बनतो व त्याना पोटापुरतें देऊन उरलेला नफा एकटा खातो नऊ लोक त्याचे गुलाम किंवा बैल होतात आणि पूर्वींच्या शंभरांपैकीं नव्वद लोक बेकार बनून देशोधडीला लागतात या देशोधडीला लागलेल्यांचे धारणपोषण जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यहि करूं शकत नाहीं आणि गुणकर्मसिद्ध चातुर्वर्ण्य व जातिभेदहि करू शकत नाहीं. ब्राह्मणापासून चांभारापर्यंत सर्वांनीं परस्पराशीं विवाह केले किंवा न केले, तरीहि नव्वदाची बेकारी, नऊचें दास्य आणि एकाची श्रीमती आणि प्रभुत्व याचा नाश होऊं शकत नाहीं. हे नवे प्रश्न नव्या धनोत्पादनाच्या पद्धतीनें निर्माण होतात व ते नको असतील तर आधुनिक धनोत्पादनाचीं साधनेंच घेतां उपयोगी नाहींत पण हीं साधनें घेतलीं नाहींत, तरी तेव्हाहि जें चातुर्वर्ण्य राहील ते जन्मसिद्ध असावें कीं गुणकर्मसिद्ध असावें हा प्रश्न राहणारच. तेव्हा या दोन प्रश्नाची गल्लत न करता दोन्ही प्रश्नाचीं उत्तरें पृथक्पणे दिलीं पाहिजेत

चातुर्वर्ण्यासंबधीं युरोपीय समाजाची व आपल्या समाजाची तुलना करून आगरकर म्हणतात :—"जो कोणी या प्रश्नाचा निरभिमानबुद्धीनें विचार करील त्यास असे दिसून येईल, कीं प्रत्येक समाजाच्या विशिष्ट स्थितींत आमच्या देशांतील वर्णव्यवस्थेसारखा किंवा जातिभेदासारखा लोकविभाग अस्तित्वांत आल्याशिवाय रहात नाहीं. एका लोकांनीं दुसऱ्या लोकांस जिंकून त्यांस विशिष्ट धंदे करावयास लावणें किंवा लढाई होऊन जेते व जित असा भेद उत्पन्न न होतां, शुद्ध श्रम-विभागापासून सहजगत्या उत्पन्न होणाऱ्या व्यवसायभिन्नत्वामुळें जातिभेद बहुशः उत्पन्न होतो. ज्यांना आपण सुधारलेले म्हणूं असे कोणतेहि नवे किंवा जुने लोक घ्या, त्यांत हा जातिभेदाचा प्रकार या नाहीं तर त्या रूपाने आढळल्याशिवाय रहात

नाहीं. विशेष कारणामुळें कोठे तो अत्यंत क्षीण असेल तर कोठे पराकाष्ठेचा सक्तीचा असेल पण प्रत्येक सुधारलेल्या देशात तो थोडाबहुत तरी दृष्टीस पडल्यावेरीज राहणार नाहीं नाकाने वांगीं सोलणाऱ्या व आमच्या देशांतील अद्वितीय जातिभेदाची टवाळी करणाऱ्या मि ली वॉर्नरसारख्यांच्या देशातहि ज्यांना ट्रेड्स गिल्ड्स किंवा क्राफ्ट गिल्ड्स म्हणून म्हणत, ते आमच्यांतील जातींसारखे व्यावर्तक वर्ग नव्हेत काय? ज्या धंद्यांत जो जन्मास आला त्यानेंच तो धंदा करावा व इतरांनीं त्यात पडू नये, अशाविषयीं इंग्लडांतील प्रत्येक प्रमुख धंद्यातील जुन्या लोकाचा केवढा आग्रह असे हे इतिहासांत सुप्रसिद्ध आहे....( तेव्हां जातिभेदाच्या विचारानें आपले माथें फिरूं न देतां, त्याने समाजाच्या आद्यस्थितींत कोणता कार्यभाग उरकला हें ध्यानांत आणून व आतां तो कोणत्या कारणांमुळे अहितकारक होत आहे याची चिकित्सा करून तीं कारणे दूर करण्यासाठीं सामोपचाराचे उपाय योजणे, यांतच शहाणपण आहे आपणांतील ज्या जातिभेदाविषयीं आपणापैकीं काहीं जणांस इतका तिरस्कार उत्पन्न होतो, त्या जातिभेदापासून आम्हांस एके काळीं जे फायदे झाले, त्यांचे वर्णन फ्रेंच देशातील प्रसिद्ध तत्त्ववेत्ता ऑगस्ट कोट याचे ग्रंथांत केलें आहे जातिभेदापासून कितीहि तोटे असोत, त्यामुळे एक फायदा खचित होतो तो हा, कीं त्याच्या योगानें प्रस्थापित आचार यथास्थितपणे चालून समाजास एका प्रकारचें स्थैर्य येते. जो तो क्रमागत अथवा अन्वयागत आलेला मार्ग आनदाने आचरितो, फायद्यासाठीं एक वर्ग दुसऱ्या वर्गाशीं प्रतिस्पर्धा करीत नाहीं, वर्गावर वर्गाचा दाब असतो, समयविशेषीं चागली किंवा वाईट गोष्ट करण्यास जूट लौकर होते, कष्टार्जित कलेचे उत्तम रीतीने सगोपन होते. साराश, परंपरागत दोषाचे किंवा गुणाचे सरक्षण होऊन समाजसनिधानात बिघाड न होऊ देण्यास जातीसारखे दुसरे साधन नाहीं प्रत्येक व्यक्ति आपापल्या जागीं खिळली जाऊन आपापले कार्य नीटपणे बजावते यामुळे जाती या सामाजिक सनिधानाचे स्थितितत्त्व होत, असे म्हणण्यास हरकत नाही ".*

जातिभेदाने एके काळीं केलेली ही कामगिरी आगरकरांना ऐतिहासिक दृष्ट्या मान्य असली आणि तें एक समाजाचे स्थितितत्त्व आहे हेहि मान्य असले, तरी तो आज आमच्या प्रगतीच्या आड येत आहे व सामाजिक समतेच्या तत्त्वाशीं तो विरोधी असल्यानें त्यावर आपण हत्यार उपसले पाहिजे, असा त्यानीं आपल्या बुद्धीचा निर्णय केला होता दुसऱ्या एका लेखांत ते म्हणतात : " सर्व मानवप्राणी जन्मत. सारख्या योग्यतेचे अधिकारी असून त्यांचे हक्कहि एकसारखे असतात व ती योग्यता व ते हक्क त्याच्याकडे राहणें हे केवळ त्याच्या कमीअधिक बुद्धिविकासावर व उद्योगशीलतेवर अवलबून आहे या श्रेष्ठ तत्त्वाची या जगात प्रस्थापना करण्याच्या कामीं सर्वकालीन व सर्वदेशीय सुधारकांनीं आजपर्यंत अनेक दिशांनीं प्रयत्न केले आहेत व त्या प्रयत्नास उत्तरोत्तर सिद्धीहि मिळत चालली आहे....कालगतीनें

* निबधसग्रह, भाग २ रा, पृ. ३४–३५

जातिभेदकल्पनावृक्षाचा आज येथें इतका कांहीं विलक्षण विस्तार होऊन गेला आहे व त्याचीं मुळे इतकीं कांहीं खोल गेलीं आहेत, कीं त्याचे समूळ छेदन करणे एका सुधारकासच काय, तर सुधारकसहस्राच्या कपनीसहि भारी व जोखमीचे वाटलें तर त्यांत नवल नाहीं तथापि सुधारणेची विजयपताका अव्याहत फडकत राहण्यास वर निर्दिष्ट केलेल्या श्रेष्ठ नीतिप्रणीत तत्त्वाचेच साम्राज्य झालें पाहिजे अशी ज्यांची बालंबाल खात्री होऊन गेली आहे, त्यांनीं या वृक्षाच्या अफाट विस्ताराने यत्-किंचितहि डगमगून न जातां 'थेंबे थेंबे तळे सांचे' या न्यायाने निदान जी जी फादी त्याच्या मार्गाआड येत असेल, तिच्यावर तरी आपली कुऱ्हाड चालवून साधेल तेवढी गुतागुत कमी करण्यास झटले पाहिजे. समुद्रांतील यःकश्चित् कीटकांच्या सतत प्रयत्नाने मोठमोठ्या जहाजांचींहि शकले करून टाकणारे प्रचंड खडक जर उत्पन्न होतात, तर सदसद्विचारकुठारापुढे या अज्ञानमूलक जातिभेद कल्पनावृक्षाच्या अखद्ध जाळयाचा पाड काय ?"*

हिंदुस्थानांतील जन्मसिद्ध वर्णव्यवस्था व जातिभेद या कितीहि जुन्या संस्था असल्या, तरी त्या आता टिकणें शक्य व इष्ट नाहीं याची जशी आगरकरांना खात्री होती, त्याचप्रमाणे येथे जे व्यवसायस्वातंत्र्य निर्माण होत आहे त्यांतून केवळ द्रव्या-वर अधिष्ठित होणारा दुसरा एक वर्गभेद अस्तित्वांत येत असून त्यामुळें आमच्या राजकीय पारतंत्र्याच्या दृढीकरणास साहाय्य होत आहे, इकडेहि त्यांचें लक्ष गेल्या-खेरीज राहिले नव्हते.) केसरींतील एका लेखात याचें फार मार्मिक विवेचन करण्यात आले आहे : "आमच्यामध्ये विचारस्वातंत्र्य व व्यवसायस्वातंत्र्य आल्याने आमच्या समाजाचे पूर्वी जे जातिभेदामुळे व धर्मभेदामुळे वर्गीकरण झालें होते, त्याचा आतां लोप होत जाऊन प्राप्तीच्या व संपत्तीच्या मानानें वर्गीकरण होत चालले आहे असें वर्गीकरण होण्याचीं मूळ कारणे म्हटलीं म्हणजे दोन एक आम्हांस आमच्या प्राचीन रीतिभातींचा जो तिरस्कार व तिटकारा वाटू लागला आहे तो, व दुसरे इंग्रज लोकांच्या रीतिभातींचे अनुकरण करण्याची जी उत्कट इच्छा उत्पन्न होत चालली आहे ती प्रत्येक मनुष्य प्राप्तीच्या मानाने या दोनहि गोष्टी साधण्यास पहात असतो, व त्या प्राप्तीच्याच मानानें सिद्धीस जातात .. आता याप्रमाणें प्राप्तीच्या मानाने समाजाचें वर्गीकरण होऊन, प्रत्येक वरच्या वर्गाचा खालच्या वर्गाशीं सबध तुटणें व त्याबद्दल कळकळ नाहींशी होणे, हे समाजास राज्यकारणीं किती अपायकारक आहे व त्यापासून आपणांवर किती जुलूम होत आहे याचा थोडा विचार करू. आजकाल आम्हांमध्ये ज्यांची प्राप्ति फार मोठी असे लोक बहुतेक सर्व सरकारी लोकाचे अमलदार, हायकोर्टाचे बडे बडे वकील हे होत. या लोकास सामान्य लोकांत मिसळणें किंवा त्यांबद्दल कळकळ बाळगणे कितपत आवडतें, हे सर्वांस माहीतच आहे... येणेंप्रमाणे आमच्या समाजाची स्थिति झाल्याने आम्हांत एकी मुळींच उरली

* कित्ता, पृ. १८०.

नाहीं; स्वहितपरता निरंतर प्रत्येकाच्या अंगांत वास करीत आहे, दुराचारांचा दिवसानुदिवस उत्कर्षच होत चालला आहे; राज्यकारणीं सारखा जुलूम चालला असतांहि कोणास हातपाय हालविण्याचें सामर्थ्य उरलें नाहीं व एका स्वातंत्र्याच्या देणगीनें सरकारने आमचे सर्व हक्क हिरावून घेतले आहेत व आम्हांतील बहुतेकांस सरकारचे दासानुदास व्हावे किंवा अन्नान्नदशेंत आयुष्यक्रमण करावे यांवाचून शरीर-संरक्षणास तिसरा उपाय दिसत नाहीं" याच लेखमालेत पुढे म्हटले आहे : "इंग्रज सरकारने एकामागून एक एतद्देशीय राज्ये तोंडांत टाकिल्यावर, प्रथम राज्यकारभार मोठ्या दक्षतेने चालविला व पूर्वीचे धर्मसबधीं ग्रह जितके न दुखावतील तितके न दुखावण्याचा प्रयत्न केला. पूर्वीहून शेतकऱ्यांचा सारा कमी केला. अशा अनेक गोष्टींनीं आमच्या भाविक लोकास स्वराज्यापेक्षां हे परकीय राज्यच बरे, असे वाटावयास लाविले लोकांची जुलूम झाला असतां एकत्र होण्याची–बडाच्या रूपाने का होईना–जी प्रवृत्ति, ती याप्रमाणें पुष्कळ दिवस मलिन झाल्यानें व त्याच मानानें इंग्रजी अंमल उत्तरोत्तर बळकटी पावत गेल्याने, आतां लोकांस सरकारी जुलुमाच्या प्रतिकारास मार्ग उरला नाहीं असें वाटू लागलें आहे व त्यांस सभांची योग्यता व शक्ति हीं कळेनाशीं झालीं आहेत.. वास्तविक पाहिलें तर आम्हांत व्यक्तिपरता व दारिद्र्य जों जों वाढत जातील, तो तो सभांवाचून दुसरा तरणोपायच उरणार नाहीं"*

## वर्गकलहाचें भविष्य

आपल्या देशात ज्या मानाने कारखानदारी माजणार, त्या मानाने या मोठमोठ्या कारखान्यांतील लोकांना आपल्या हक्कांसाठीं आपल्या मालकांशीं भांडावें लागणार व त्यांतून एक स्वामी सेवकांचा वर्गकलह निर्माण होणार, हे त्यांना दिसत होतें. आपल्या देशांतील रेल्वेच्या नोकरांनीं आपल्या हक्कांचा हा लढा चालविण्यासाठीं आपला संघ स्थापन करावा, असा उपदेश आगरकरांनीं १८९१ सालींच केला आहे. 'रेल्वे कंपन्या व रेल्वेकडील नोकर' या लेखांत ते लिहितात :

"कोणालाहि आपला फायदा सहसा सोडवत नाहीं. तेव्हां ज्याप्रमाणे राजा आणि प्रजा यांमध्ये अनादि कालापासून द्वंद्व सुरू आहे, त्याप्रमाणे स्वामी-सेवकांचा झगडाहि अनादिसिद्ध होऊन बसला आहे. बहुतेक राजांचा आणि धन्यांचा आपापल्या प्रजेशीं आणि नोकरांशीं नित्य कलह चाललेला असतो (तो इतका, कीं हा कलह हा उभयतांच्या मनोवृत्तींचा स्वाभाविक परिणाम आणि उभयतांचा सलोखा हा अपवाद, असे म्हटले तरी चालेल)! आमच्या रेल्वे कंपन्या आणि त्यांचे नोकर या दुसऱ्या कोटींत पडतात. रेल्वेकडील नोकरांनीं आपल्या धन्याशीं कलह करण्याचा निश्चय केल्याशिवाय त्यांची विपत्ति दूर होण्याचा सभव नाहीं." यानंतर युरोपांत व अमेरिकेंत तेथील कामगारवर्ग कसे संप करीत आहे त्याचें वर्णन करून

* केसरीतील निवडक निबध, पुस्तक १ ले, पृ. १२९–१३५.

आगरकर म्हणतात : " कट ( सप ) आहे तोंपर्यंत अशा लोकांचा चरितार्थ कटाच्या फंडांतून चालविला पाहिजे अशा कामाकरितां अमेरिकेंतील कटवाले युरोपांतील कटवाल्यांस आणि युरोपांतील कटवाले अमेरिकेंतील कटवाल्यांस मदत करूं लागले आहेत यामुळे कटवाल्यांचा हवे तितके दिवस निभाव लागून कारखान्यांचे मालक जेरीस येतात आणि कटवाल्यांच्या मागण्या कबूल करतात! कोळशाच्या खाणी, गोद्या, आगगाड्या, तारायंत्रें वगैरे अनेक धंद्यांत इग्लंडातल्या व युरोपांतील इतर देशांतल्या मजुरांनीं जंगी कट चालविले आहेत आणि ते एकमेकांस भक्कम पाठबळ देत असल्यामुळें त्यांना एकसारखें यश येत आहे. कटाचे हेतू ज्याना मान्य नसतील त्यांनीं पाहिजे तर त्यात मुळींच शिरूं नये; पण त्यांत एक वेळ शिरून मग त्यातून अग काढून घेणे व इतरांस तोंडघशीं देणें, यासारखा दुसरा अधमपणा नाहीं.. रेल्वेकडे अशा प्रकारचे बरेच इसम असतील तर त्याना अशा प्रकारच्या कटांपासून यत्किंचित् फायदा न होता उलट त्याचें मोठें नुकसान, फजिती व दुर्लौकिक होईल, पण त्यांपैकीं बहुतेकात बराच प्रामाणिकपणा, सामान्य हितासाठीं थोडीबहुत दगदग करण्याची व प्रसंगविशेषीं दोन पैसे खर्च करण्याची इच्छा आणि चांगल्या पुढाऱ्यांच्या अनुषगानें वागण्याचे बरेच धैर्य असेल तर रजा, पेन्शनें, पगार, ग्रॅच्युइटी, कामाचे तास, भत्ता वगैरेसंबधाने सरकारी नोकराचे हक्क स्वल्प कामांत त्याना प्राप्त होणें अशक्य नाहीं, अशी आमची खात्री आहे "*

( तात्पर्य, व्यक्तिवादी समाजरचनेबरोबर येथील औद्योगिक क्षेत्रांत स्वामी-सेवकांचा वर्गकलह निर्माण होत असून तो कलह चालविण्यासाठीं कामगारवर्गानें आपल्या संस्था स्थापून संपाची तयारी केल्याखेरीज मालक त्यांच्या न्याय्य मागण्या मान्य करणार नाहींत व राजा-प्रजा यांच्यांतील कलहाप्रमाणे हाहि एक नित्य कलह येथून पुढें सुरू होणार, हे त्यांनीं लोकांना सागितलें आहे समाजात आर्थिक व शैक्षणिक विषमता वाढल्याने अखेरीस राज्यक्रांति होते, हेहि त्यांनीं स्पष्टपणें लोकांपुढे माडलें आहे :)

" विचार करणे, सुखदुःखांचा अनुभव घेणें आणि क्रिया करणे या तीन गोष्टींपैकीं पहिलींत, दुसरींत किंवा तिसरींत प्रत्येक मनुष्य चूर होऊन गेलेला असतो. मोठमोठ्या ग्रंथांचीं पारायणे करावीं, रात्रीच्या रात्री चिंतनांत घालवाव्या, विचार व्यवस्थित झाला कीं तो पुस्तकद्वारानें किंवा दुसऱ्या कोणत्या तरी साधनानें लोकांपुढें आणावा, अशा रीतीनें कित्येक आपलीं आयुष्ये कंठीत असतात. अशांस बाह्य सुखांचा उपभोग सांपडत नाहीं व बाह्यक्रिया करतां येत नाहींत वाचनापासून होणारा जो आनद तोच यांचें स्थायिक व आवडते सुख आणि विचार करण्यास व लिहिण्यास लागणारी जी शारीरिक हालचाल तीच त्याची बाह्यक्रिया. दुसरा वर्ग सुखाभिलाषी लोकांचा यांस मानसिक सुखांपेक्षां शारीरिक सुखांची चाड विशेष

* निबधसग्रह, भाग १ रा, पृ. ६८-७०.

असते वारुळात जशी एक खुशालचेंडू राणीमुंगी असते म्हणून सांगतात, तीसारखे हे सुखपरायण लोक होत. सुखोपभोगासाठीं सर्व प्राणिमात्र धडपडत असतो व ज्यास जो प्राप्त होईल त्याने त्यापासून आनंद करून घ्यावा, हे योग्य आहे, पण ज्या सुखोपभोगामुळें निरंतर तो घेतां येण्याची शक्यता नाहींशी होते, बुद्धीस माद्य येते, गात्रे निःशक्त होतात, उत्साह नाहींसा होतो, आणि कुटुंबास व राष्ट्रांस कोणत्याहि प्रकारचा फायदा न होता उलट नुकसान किंवा त्रास सोसावा लागतो, अशा सुखोपभोगांत निमग्न असण्यांत काय फायदा आहे बरें ? पण असे लोक कोणत्याहि देशात थोडेथोडके नसतात ज्या ठिकाणीं अविद्या आणि वित्त यांचा संयोग दृष्टीस पडतो, त्या ठिकाणीं व्यसनासक्ति दृष्टीस पडत नाहीं असे सहसा होत नाहीं (सुदैवाने ज्याना सुखोपभोग करून घेता येत असतील, त्यांनीं ते आपणास व इतरास शेवटपर्यंत हितावह होतील किंवा नाहीत एवढे पहात जावे म्हणजे झालें ) या सुखपरायण वर्गाशिवाय लोकाचा आणखी एक तिसरा वर्ग असतो या वर्गातील लोकाची क्रियाप्रवृत्ति फार जबरदस्त असते व एका दृष्टीने यास समाजाचे आधारस्तंभ म्हणतां येईल. यांनीं काबाडकष्ट करून आवश्यकतेचे आणि चैनीचे पदार्थ उत्पन्न करावे आणि त्याचा उपभोग वरील दोन वर्गांतील किंवा मधल्या वर्गातील लोकांनीं घ्यावा, असे आजपर्यंत बऱ्याच अंशीं होत आले आहे व पुढेहि अल्पकाळात या स्थितींत विशेष फेरबदल करता येईल असे वाटत नाहीं. तथापि निरपेक्षबुद्धीने व आस्थापूर्वक परिश्रम करीत गेल्यास ही असमता थोड्या वर्षात बरीच दूर करतां येण्यासारखी आहे ज्या देशात ही असमता वाढत जाऊ लागली असेल, त्या देशाच्या ऱ्हासास आरभ झाला आहे असे समजावे. **जेव्हां या असमतेची परमावधि होते, तेव्हां घनघोर राज्यक्रांति होऊन समाजचे समाज लयास जातात, धुळीस मिळतात किंवा त्यांत अपूर्व स्थित्यंतरे होतात.** निरतर कष्ट साहण्यास खालच्या प्रतीचे प्राणीसुद्धा तयार असत नाहींत, तर मनुष्य कसा असेल ? कष्ट साहणे म्हणजे जीविततत्त्व क्षीण करून घेणे होय, आणि तसे करून घेण्यास बहुतेक मनुष्यें तयार होतील, तर सारी मनुष्यजात नाहीशी होईल ! परंतु मनुष्यें अस्तित्वांत आलीं आहेत व दिवसेंदिवस त्याची संख्या वाढत आहे, यावरूनच त्यांच्या नाशास अनुकूल अशा कारणांपेक्षां त्यांच्या अस्तित्वास व वृद्धीस अनुकूल अशीं कारणे पृथ्वींतील परमाणुसघात निगूढ आहेत, असे सिद्ध होते तेव्हा काय दिसून येते, कीं **विचार करणारे, उपभोग घेणारे व काम करणारे असे जे सांप्रतकाळी प्रत्येक देशांत तीन ठळक वर्ग दृष्टीस पडतात, ते कायमचे नव्हत. हळूहळू प्रत्येक व्यक्तीस विचार, उपभोग आणि काम हीं समप्रमाणानें करावीं लागून, साऱ्यांच्या सुखानुभवाची इयत्ता सारखी होत जाणार आहे; व जों जों ती तशी होत जाईल, तों तों खरी उन्नति होऊं लागली असें म्हणतां येऊं लागेल.** एवढे खरे आहे, कीं कांहीं झालें तरी

सर्वांच्या बुद्धी सारख्या तीव्र होतील व पाहिजे त्या कामांत पाहिजे त्याला पडतां येऊन ते उत्तम रीतीनें वठवितां येईल, असे पूर्णपणें होण्याचा सभव फार थोडा आहे. तथापि प्रस्तुत काली निरनिराळया वर्गातील लोकात व स्त्री-पुरुषात जे विलक्षण अतर दृष्टीस पडत आहे, तें पुष्कळच सकुचित करतां येणार आहे, आणि ज्या देशांत ते तसें करण्याचा प्रयत्न झपाट्याने चालत राहील, तेच देश अखेरीस तगतील. बाकीचे सर्वत्र जो जीवनार्थ कलह मोठ्या निकराने चालला आहे, त्यात भाडतां भांडता नाहींसे होतील "*

## सुधारकाचें अंतिम ध्येय

समाजात सत्ता व सपत्ति यांची समान विभागणी करणे हेच समाजसुधारणेचे खरे ध्येय आहे हे सांगतांना आगरकर लिहितातः "कित्येक जण हा स्थूल अर्थ सकुचित करून राष्ट्राच्या राजाचे किंवा त्यातील श्रेष्ठ लोकांचे जें कल्याण, ते साऱ्या राष्ट्राचें किंवा समाजाचें कल्याण असा विशिष्ट अर्थ करतात. अशा अर्थानुरोधानें ज्या समाजांत वर्तन होत असतें, त्यांत एका पक्षाकडे सपत्ति आणि सत्ता व दुसऱ्या पक्षाकडे दारिद्य आणि दास्य अशी वांटणी झालेली असते अशा समाजांतील सामान्य लोकांस शुद्ध वन्यावस्थेतील सुखाहून आधिक सुख होत असेल असे जरी मानितां आलें, तरी त्यांत त्याचे पूर्ण समाधान होण्यासारखे तें नसलेच पाहिजे हे उघड आहे पण मनुष्ये समाज स्थापू लागल्याबरोबर त्यात जीं शारीरिक किवा मानासिक सामर्थ्याने इतरापेक्षां श्रेष्ठ असतील, त्याच्या हातीं सत्ता व बहुतेकाच्या श्रमाचें फळ जाणें अगदीं स्वाभाविक आहे. तेव्हा समाजाच्या प्रथमावस्थेंत जे सामर्थ्यवान् असतील त्याच्या हातीं सत्ता असणें व दुर्बलांना दास्य करावे लागणे, हे ज्या दिशेकडे उतार असेल त्या दिशेकडे पाण्याचा ओघ जाण्यासारखे होय. **हा ओघ बंद करून सर्वांस सारखें, निदान होईल तितकें सारखें, सुख मिळण्याची व्यवस्था होत जाणे म्हणजे सुधारणा होत जाणें, असे म्हणण्यास हरकत नाहीं.**"§

तुम्हाला एकदर समाजांत सुधारणा तरी कोणत्या पाहिजेत, असा प्रश्न एकाने विचारला होता. त्यास उत्तर देतांना ते लिहितातः "आपल्या देशांत ज्या सुधारणांची वाटाघाट चालली आहे त्या अमलांत आल्यावर जातिभेद मोडणे, धर्मसुधारणा करणें, मदिरा व मांस यांचें सेवन बंद होणें वगैरे गोष्टींकडे लोकाचे लक्ष लागले पाहिजे. सर्वांत सार्वजनिक शिक्षणाची फार आवश्यकता आहे हिंदुस्थानांतील एकूण एक प्रौढ स्त्री-पुरुषांस लिहितां-वाचतां आलें पाहिजे; तसेच प्रत्येक व्यक्तीस चरितार्थ चालविण्यासारखा एकादा तरी धंदा येत असला पाहिजे. (सारांश, वयांत आलेल्या कोणत्याहि व्यक्तीस आपल्या उदरनिर्वाहासाठीं दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी येऊ नये. इतकेच नाहीं, तर सहजगत्या उदरपोषण करता येऊन दिवसाचा

* निबधसग्रह, भाग १ ला, पृ. ५६-५८. § निबधसग्रह, भाग १ ला, पृ. ४१-४२.

कांहीं काळ आत्मचिंतनाकडे, आवडत्या शास्त्राच्या अभ्यासाकडे, मनास रुचेल ती करमणूक करण्याकडे किंवा विश्रांतीकडे लावतां आला पाहिजे या सर्व गोष्टी घडून येण्यास किती शतकें लागतील हे सांगतां येत नाहीं पण ज्या अर्थी अपरिचित मित्राने समाजांत सुधारणा हव्यात तरी कोणत्या असा प्रश्न केला आहे, त्या अर्थी कांहीं ठळक सुधारणांचे दिग्दर्शन करणे भाग पडले."*

## अज्ञेयवाद् आणि वेदान्त

आतां आपण टिळक-आगरकरांच्या धार्मिक मतभेदांसबधीं थोडा विचार करू. हा विचार करीत असतां एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे, की ब्रह्मविद्येतील अंतिम सिद्धान्तासबधीं दोघांचे विचार बरेचसे सारखे होते. अद्वैतवेदान्तांतील निर्गुण परब्रह्म आणि स्पेन्सरच्या ग्रथांत वर्णिलेलें 'अज्ञेय जगत्कारण' हीं दोन्ही एकच आहेत, असे दोघेहि मानितात. लो टिळकांनीं १९०३ सालीं हर्बर्ट स्पेन्सर यांचा मृत्युलेख लिहिला आहे, त्यांत ते म्हणतात: "वेदान्तातील परब्रह्महि अशाच प्रकारचे अज्ञेय असून तें सत्, चित् आणि आनंदरूप आहे, यापेक्षा जास्त कांहीं सांगवत नाहीं असे जें वेदान्त्याचे तत्त्व आहे, त्याचा आणि स्पेन्सरसाहेबांनीं सिद्ध केलेल्या सत्तारूप अज्ञेयाचा बहुतेक अंशीं पूर्ण मेळ आहे, असें यावरून ध्यानात येईल सारांश, जगाच्या बुडाशीं जें तत्त्व आहे ते अज्ञेय असलें, तरी तें विद्रूप आहे एवढें तरी त्याबद्दलचें ज्ञान आपणांस होते, असे स्पेन्सरसाहेबांनीं सर्व आधुनिक शास्त्रांचा अभ्यास करून सप्रमाण व व्यवस्थित रीतीनें सिद्ध केले आहे "..."स्पेन्सरीय तत्त्वज्ञानापासून वेदान्तमताचें अशा प्रकारें जरी पुष्टीकरण झालें, तरी दुसऱ्या एका बाबतींत स्पेन्सरसाहेबाचें मत बहुतेक प्राचीन तत्त्ववेत्त्यांच्या मतांशीं अगदीं विरुद्ध आहे. हे मत चैतन्य किंवा जीव यासंबधींचे होय. चैतन्यरूपी जीव नित्य आहे, अविनाशी आहे, देहाव्यतिरिक्त तो राहूं शकतो, असे सांख्य, वेदान्त, न्याय किंवा वैशेषिक या सर्वांचें म्हणणे आहे. पण स्पेन्सरसाहेब असे म्हणतात, कीं ज्याप्रमाणें गति नेहमीं द्रव्याश्रित असते त्याप्रमाणे चैतन्यहि देहामधील विशिष्ट रीतीने परिणत झालेल्या मेंदूखेरीज अन्यत्र दृष्टोत्पत्तीस येत नाहीं........सारांश, सज्ञा किंवा संवेदनशक्ति ( Consciousness ) ही देहाच्या नाशाबरोबरच नाहींशी होते असे स्पेन्सरसाहेब मानितात. म्हणजे या बाबतींत 'न हि प्रेत्य संज्ञाऽस्ति' हें चार्वाकांचे मत त्यांस ग्राह्य आहे.. . . जीव आणि आत्मा यासबंधाने स्पेन्सरसाहेबांचे मत चार्वाकांप्रमाणें आणि जगाच्या बुडाशीं जें अज्ञेय तत्त्व आहे त्या बाबतींत त्यांचे मत वेदान्त्याप्रमाणें आहे.. .. ..जगामध्ये दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या निरनिराळया भेदांची उत्पत्ति द्रव्य आणि शक्ति यांच्या साम्यावस्थेपासूनच उत्पन्न होते असें जें त्यांचें मत, तें वैशेषिक-मतास जरी विरुद्ध आहे, तरी सांख्यांच्या मतांशीं मिळतें. तेव्हां

---

* निबधसग्रह, भाग १ ला, पृ. १७९-८०.

एकदर विचार करतां परमेश्वर, जीव आणि जडसृष्टि यासबधाचीं स्पेन्सरसाहेबांचीं मतें अनुक्रमें वेदान्त, चार्वाक आणि सांख्य यांच्या मतांच्या मिश्रणानें झालीं आहेत असें म्हणावें लागतें. परतु यांत जें चार्वाक-मताचें मिश्रण आहे, तें जुन्या चार्वाक-मताहून अत्यत भिन्न आहे देहाबरोबर जीवाचाहि नाश होतो असे जरी स्पेन्सरसाहेब मानितात, तरी चार्वाकाप्रमाणें 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत्' या तत्त्वाचा त्यांनीं कोठेंहि अंगीकार केलेला नाहीं. इतकेंच नव्हे, तर उत्क्रांतीचें तत्त्व समाजास व नीतिशास्त्रास लावून सर्व समाजाचे, किंबहुना मानवजातीचें हित साधून परोपकार करणे हीच जगामध्यें जीवाच्या कर्तव्याची सीमा आहे, असें त्यांनीं सोपपत्तिक व आपल्या नेहमींच्या पद्धतीने अनेक शास्त्रातील दृष्टान्त देऊन प्रतिपादन केले आहे वेदान्ता-प्रमाणे ते सृष्टीस केवळ आभास मानीत नाहींत आणि सांख्याप्रमाणें प्रकृति-पुरुषाच्या पलीकडे कांहीं नाहीं असेहि म्हणत नाहींत, हा त्याच्या आणि वेदान्त व सांख्य यांच्या मतांत मोठा फरक आहे."*

स्पेन्सरसाहेबांचें ब्रह्मज्ञान वेदान्तविचाराशीं सुसंगत आहे व तें बुद्धिवादी मनुष्यासहि पटण्यासारखें आहे या समजुतीनें टिळक आणि आगरकर या दोघांनाहि प्रथम ते मान्य झाले होतें. याचमुळे आगरकर 'अह ब्रह्मास्मि' हा धर्मसंबंधींचा अखेरचा सिद्धान्त मानितात पण स्पेन्सरप्रमाणेंच त्यांचा पुनर्जन्मावर किवा आत्म्याच्या विदेही अस्तित्वावर विश्वास नव्हता. आगरकरांच्या लेखांत शकरा-चार्यांचा फारसा कोठे उल्लेख आढळत नाहीं. गौतमबुद्धाचा मात्र ठिकठिकाणीं गौरवपर उल्लेख केलेला आढळतो. तथापि बुद्धानेंहि जीवात्म्याचें अमरत्व मानिले आहे हें त्यांस पटत नाहीं ते यासंबंधीं एके ठिकाणीं लिहितात :

"प्राण्यास होणारे सुखदु खादि सर्व विकार गौतमानें सर्वथैव त्याच्याच कर्माधीन करून ठेविले आहेत हे खरें आहे व एकदां सर्व गोष्टी कर्माधीन आहेत अशी त्याच्या बुद्धीची खात्री झाल्यावर ईश्वराचें अस्तित्व मानण्याची त्याला आवश्य-कता वाटली नाहीं हेंहि खरे आहे, तथापि कर्मकल्पना प्रधान धरून जेव्हा तो नव्या धर्माची रचना करू लागला, तेव्हां त्याला पूर्वजन्म आणि पुनर्जन्म या कल्पना गृहीत धरणें अवश्य वाटलें कारण या कल्पनाशिवाय त्याचा निरीश्वर धर्म लोकांस मान्य होण्याचा किंवा त्यावर त्यांची श्रद्धा बसण्याचा मुळींच सभव नव्हता. सत्कर्माला बक्षीस मिळणें आणि दुष्कर्माला दड होणे जरूर आहे, हे मनुष्यांच्या प्ररूढ नीतिमत्तेस अत्यत अवश्य आहे असें वाटतें. पण जगाच्या सांप्रत अवस्थेंत तसे होतेंच असा सार्वत्रिक अनुभव नाहीं. तेव्हां जगाची खरी स्थिति आणि नीत्यनीतीच्या फळां-विषयीं मनुष्याच्या मनांत दृढ होऊन बसलेली समजूत यांच्यामध्ये उत्पन्न होणारा विरोध जन्मान्तराचे अस्तित्व मानल्याशिवाय नाहींसा होत नाहीं, असे त्या धर्मकर्त्यास वाटून त्या कल्पनेचा अंगीकार त्यानें केला असावा हे उघड आहे" पुनर्जन्मावर

* लो. टिळकाचे केसरींतील लेख, भाग ४ था, पृ. ३६.

विश्वास ठेवण्यास बुद्धीला पटणारा हाच काय तो युक्तिवाद आहे, पण तोहि पुरेसा समाधानकारक नाहीं कारण अमुक गोष्ट इष्ट आहे असें म्हटल्याने ती तशी असेलच असा निष्कर्ष काढतां येत नाहीं. शिवाय पूर्वजन्म व पुनर्जन्म यांवरील विश्वास हा मनुष्यसमाजांच्या सुधारणेला विरोधीहि होत असतो कारण समाजांतील व्यक्तींचें सुखदुःख हे त्याच्या पूर्वजन्माचे फल आहे असें एकदां ठरले, म्हणजे दुःखाचें, अन्यायाचें, विषमतेचें परिमार्जन करण्यास उत्साहहि रहात नाही. मनुष्याला पापाचें फल या जन्मीं किंवा पुढील जन्मीं आपोआपच मिळणार असे धरल्यास त्याला शिक्षा करण्याच्या मनुष्यकृत संस्था निर्माण करण्याचाहि उत्साह कमीच होणार तेव्हां मनुष्यांना कर्तव्यपरायण आणि समाजसुधारणापर करावयाचें, तर त्यांना पूर्वजन्म-पुनर्जन्माच्या अज्ञात प्रदेशाकडे पाहून आपलीं ऐहिक कर्तव्ये ठरविण्याच्या संवयी-पासून पराङ्मुख केले पाहिजे आणि आजच्या समाजांत सत्कर्माला चागले फळ आलें आणि दुष्कर्माला वाईट फळ आलें, तरी ते ज्याचे त्याला मिळतेच असे नाहीं, असे स्पष्टपणे सांगितले पाहिजे आणि फलाविषयीं अनासक्त राहूनच सत्कर्माचे आचरण करण्यास लोकांस शिकविलें पाहिजे म्हणजेच मनुष्यसमाजाची स्थिति सुधारत जाईल व अखेरीस समाजाला पूर्णावस्था प्राप्त होईल म्हणून जोपर्यंत पुनर्जन्मावर विश्वास ठेवण्यास प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध झाला नाहीं, तोपर्यंत त्याच्या आधारावर नीतिमत्तेची अगर समाजधारणेची उभारणी करता येणार नाहीं ; गौतमबुद्धाच्या या विश्वासा-संबंधीं आगरकर लिहितात . " बुद्धि केवढाहि विचार करावयास शिकली व प्रत्येक गोष्टींत साधकबाधक प्रमाणांचें समतोलन करून निश्चय करण्याच्या कामांत पटाईत झाली, मनोनिग्रह हवा तितका वाढून कामक्रोधादि मनोविकार अगदीं मुठींत आले व शांतिदयादि गुणाचा पूर्ण विकास झाला, आणि खुद्द स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या अनुभवावरून पूर्वजन्मावर विश्वास ठेवण्याला काडीचा देखील आधार मिळाला नाहीं, तरी शेंपन्नास वर्षांचा चैतन्यानुभव मनुष्यास इतका प्रिय होऊन जातो, कीं जोंपर्यंत त्या चैतन्याचा तो उपभोक्ता असतो तोपर्यंत त्याला ते अमर व्हावे अशी इच्छा मधूनमधून उत्पन्न होते व कधींकधीं तर तें तसें असेल देखील असे वाटते. सुसंस्कृत व सुशिक्षित मनुष्याच्या बुद्धीवर जर या कल्पनेचा असा अमल चालतो, तर प्रथमा-वस्थेंतील अविचारी व अज्ञान मनुष्यास तिने अगदीं ग्रासून टाकावे, हे फारच स्वाभा-विक आहे "*

या उताऱ्यांतील एक-दोन मुद्दे फार महत्त्वाचे आहेत ते म्हणजे मनुष्याची बुद्धि योग्य प्रकारचे निर्णय करण्यास तिला विचार करण्याची संवय व शिक्षण मिळाले पाहिजे , इतकेच नाहीं, तर तिने कामक्रोधादि मनोविकारावर प्रभुत्व मिळविलें पाहिजे आणि शांतिदयादि सद्भावनांचा अंतःकरणात विकास झाला पाहिजे, असें येथे सूचित केलें आहे. यावरून आगरकरांच्या बुद्धिवादाला एक प्रकारची 'स्थित-

* निबंधसंग्रह, भाग २ रा, पृ १५१–५२.

प्रज्ञता ' आवश्यक वाटत होती, किंबहुना त्यात ती अंतर्भूतच होती असें म्हणण्यास हरकत नाहीं पण अशी स्थितप्रज्ञासुद्धां प्रमाद करू शकते हेहि यांत गृहीत धरिलें आहे मनुष्याला मोठमोठे गहन प्रश्न सोडविण्यास स्थितप्रज्ञ, निर्विकार, मनोनिग्रही आणि सद्भावनायुक्त व्हावे लागतें हे खरे असले, तरी अशा मनुष्याचे निर्णयहि त्रिकालाबाधित सत्य मानण्याचें कारण नाहीं, असे म्हटल्याखेरीज बुद्धिवादाची पूर्तता होऊ शकत नाहीं बुद्धीच्या या अवस्थेलाच आत्मनिष्ठ अवस्था किंवा योगस्थ बुद्धि असे वेदांत्यानीं म्हटले आहे अशी ज्याची बुद्धि झाली व जो सुखदुःखादि द्वंद्वाच्या पलीकडे जाऊन केवळ निष्कामबुद्धीनें मनुष्यसमाजाला पूर्णावस्थेकडे नेण्याचा प्रयत्न करू लागला, तोच निष्काम कर्मयोगी होय

या बाबतींत ' सायकिकल रीसर्च सोसायटी ' ही पूर्वजन्माचा व पुनर्जन्माचा काहीं तरी पुरावा काढू शकेल, असे लोकमान्याचे मत होते आणि पूर्वजन्म आणि पुनर्जन्म याचे अस्तित्व सिद्ध व्हावयाचे असेल, तर ते केवळ तर्काने न ठरतां असल्या अनुभवगम्य शास्त्रीय मार्गानेच सिद्ध होऊ शकेल असे ते समजत १९०५ सालीं लिहिलेल्या ' देह व आत्मा ' या लेखात ते म्हणतात : " जड शरीर म्हणजेच आत्मा हे तत्त्व खोटे ठरून आत्म्याचें स्वतंत्र स्वरूप आणि मागे व पुढे असणारें अस्तित्व शास्त्रीय पद्धतीने ठरविण्यात आले आहे हा सिद्धान्त बारीकसारीक क्षुद्र लोकांचा नसून तत्त्ववेत्त्याचा व शास्त्रज्ञांचा आहे हे आपण विसरता कामा नये तथापि पाश्चात्य पंडितानीं प्रयोगाच्या साह्यानें जो सिद्धान्त दोन वर्षांपूर्वी ठरविला, तोच सिद्धान्त हजारो वर्षांपूर्वी आमचे वेदान्त-ग्रथात नमूद होऊन राहिला आहे पण नवीन शिक्षणाने मंडळीस हा वेदान्तातील सिद्धान्त चुकीचा वाटून आमच्यातील पुष्कळ लोक पाश्चात्यानीं तयार केलेलीं मतं जशींच्या तशींच ग्रहण करून जडवादी बनलेले आढळतात नवीन लोक असे दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणारे, तर जुने शास्त्री सनातन ग्रथावर हवाला देऊन स्वस्थ बसणारे ! दोघेहि डबक्यात साचलेल्या पाण्याप्रमाणे आहेत "§

## आगरकरांचा धर्म

आगरकरांनीं पूर्वजन्म, पुनर्जन्म या कल्पनांना सोडून दिल्यामुळें अर्थात् त्यांचा धर्म म्हणजे ' मनुष्यतेचे ऐहिक सुखवर्धन ' हाच बनला हें साहजिकच आहे. याच धर्माचे ते आजन्म उपासक होते ते एके ठिकाणीं म्हणतात (" मनुष्यतेचें ऐहिक सुखवर्धन या भावी सार्वत्रिक धर्माची ज्यांनीं दीक्षा घेतली असेल, त्यानीं कोणास न भितां जें शुद्ध, प्रशस्त, कल्याणप्रद वाटत असेल ते दुसऱ्यास सांगावे, आणि तदनुसार होईल तेवढे आचरण करावे, हेच त्यास उचित आहे)* पण

§ लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ४ था, पृ. ४८३.

* निबधसग्रह, भाग १ ला, पृ १७८

मनुष्यतेचें ऐहिक सुख यांत केवळ जड इंद्रियसुख एवढाच अर्थ त्यांना अभिप्रेत नव्हता, हें येथें लक्षांत ठेविले पाहिजे. परोपकार, सदाचार, सत्यनिष्ठा आणि आत्मसंयम यांमुळें प्राप्त होणारीं आत्मिक व बौद्धिक सुखें हीं या ऐहिक सुखांत अंतर्भूत होतात. मनुष्यसमाजाला हे ऐहिक सुख प्राप्त व्हावयाचे, तर त्याची दृष्टि परलोक, देव-दानव, भूतपिशाच्च आणि पूर्वजन्म-पुनर्जन्म या कल्पनांवरून काढून केवळ ऐहिक उन्नतीवरच खिळून राहिली पाहिजे, या बुद्धीने ते या सर्व कल्पना भ्रामक व अज्ञानमूलक आहेत असा उघड उपदेश करीत. आणि मनुष्यसमाजाची अशी खात्री झाली म्हणजे त्यांतील व्यक्तींचे केवळ नीतीच्या नियमांनींच नियंत्रण होईल आणि आजचे जे धर्माचार ऐहिकदृष्टया असमंजस वाटतात, पण परलोक व पुनर्जन्म यांवरील विश्वासाने लोक करीत आहेत, ते सर्व लयास जातील असा त्यांचा विश्वास होता.

"आमच्या व अस्मत्समधर्मी लोकांच्या परिश्रमामुळें पुढल्या पिढींत आमच्या विचारांचे अनेक तरुण निघाले म्हणजे आणि त्यांनीं तोडानें व हातांनीं या विषयांची सारखी टाकी चालविली तर थोड्या वर्षांत तुमचे देव मनुष्यांपासून व पिशाच्चांपासून निघाले आहेत अशी बहुतेकांची खात्री होऊन जाईल इतकेंच नाहीं, तर तुमच्या धर्माचारातहि प्रचंड क्रांति होऊन तुमचें वर्तन पराकाष्ठेचें साधें व फक्त नीतीच्या नियमांनीं चालणारें असे होईल. संध्या, ब्रह्मयज्ञ, श्रावण्या, साधे यज्ञ, श्राद्धें वगैरे चालू धर्माचार पूर्णपणे लयास जाऊन त्याचे जागीं अधिक उपयुक्त व समजसपणाचे आचार प्रचारात येतील आणि सत्यपरायणता, न्यायरति, परोपकृति आणि शहाणपण इत्यादि सद्‌गुणांची वृद्धि होऊन लोकांना आतांपेक्षा शतपट अधिक सुख मिळूं लागेल."§)

"धर्म आणि नीति यांतील द्वैत उत्पन्न होण्यास परलोक, देवदेवता आणि भूतपिशाच्च वगैरे भ्रामक कल्पना कारण होतात व त्या भ्रामक आहेत अशी मनुष्याची खात्री झाली म्हणजे नीति तीच धर्म व धर्म तीच नीति अशी अवस्था प्राप्त होऊन सत्यनिष्ठा, न्यायप्रीति, परोपकार आणि शहाणपण या सद्‌गुणाची वृद्धि होऊन मनुष्यें स्वावलंबनानें आपला मार्ग आक्रमू लागतील. पूजा व प्रार्थना करण्यांत मनुष्य परावलंबी होतो आणि सृष्टींतील निरनिराळया शक्तींची उपासना करून तिच्यावर प्रभुत्व मिळविण्याचे प्रयत्न करू लागतो. ही दास्यवृत्ति त्यानें सोडून स्वावलंबी आणि 'अहं ब्रह्मास्मि' ही प्रभुत्वाची वृत्ति धारण केली पाहिजे.

"आतांपर्यंत या विषयाच्या संबधानें जें लिहिण्यांत येऊन गेलें तेवढ्यावरून वाचकांच्या हे ध्यानांत आले असेल, कीं मनुष्य अज्ञानावस्थेंत असतां बाह्य सृष्टींतील सचेतन व अचेतन वस्तूंच्या व्यापारांचे जे परिणाम त्याच्या अंतःकरणावर घडतात, त्यामुळें त्या पदार्थांचे ठायीं आपल्या मनोवृत्तींसारख्या मनोवृत्ती असतील

§ निबंधसंग्रह, भाग २ रा, पृ ६१७–१८.

अशी त्याची भावना होऊन तो निर्जीव वस्तूंची, प्राण्यांची, वनस्पतींची व अखेरीस विश्वाची पूजा करूं लागतो. या वस्तूंच्या पूजनांत कांहीं अर्थ नाहीं. त्यांच्या ठायीं आपल्यासारख्या मनोवृत्ती असतील असें मानणे चूक आहे. मनुष्य हाच सर्वांत श्रेष्ठ प्राणी होय; निर्जीव व सजीव वस्तूंचे व्यापार व्यवस्थित नियमाने चालतात. या वस्तूंपासून आपला उपयोग करून घ्यावयाचा असेल तर त्यांच्यावर रागावण्यांत, त्यांना शिक्षा करण्यांत किंवा त्यांची प्रार्थना करण्यांत कांहीं हशील नाहीं. त्यांच्या व्यापारांचे नियम शोधून काढून तदनुसार त्यापासून आपली कार्यसिद्धि करून घेतली पाहिजे, अशी मनुष्याच्या मनाची खात्री होण्यास फार काल लागतो" आगरकरांनीं वर्णिलेली ही मानवसमाजाच्या वृत्तीची अवस्था म्हणजेच जिला ऑगस्ट कोंट 'पॉझिटिव्ह' अवस्था म्हणतो तीच होय.

## राजवाड्यांचा भौतिकवाद

राजवाड्यांनीं आपली सस्कृति या 'पॉझिटिव्ह' अवस्थेपर्यंत आली नाहीं, यामुळेच आपल्या संस्कृतीचा युरोपीय संस्कृतीपुढे निभाव लागला नाहीं, हे अनेक ठिकाणीं लोकांपुढे मांडिलें आहे राधामाधवविलासचंपूच्या प्रस्तावनेत राजवाडे लिहितात :

"येथें एक आनुषंगिक प्रश्न असा निघतो, कीं टोपीवाल्यांकडून कारीगार बंदुका, तोफा व दारूगोळा जो शहाजी घेई, तो त्याने महाराष्ट्रांत त्याबरहुकूम बनविण्याची व्यवस्था का केली नाहीं ? अथवा शहाजीचा मुलगा शिवाजी त्यानें तरी का केली नाहीं ?.. . प्रश्नाला उत्तर एकच आहे व ते अगदीं साधे आहे तें हे कीं उत्तम, रेखीव व नेमकें हत्यार बनविण्याची कला पैदा होण्यास शास्त्रीय ज्ञानाची जी पूर्वतयारी राष्ट्रांत व्हावी लागते, ती त्या कालीं महाराष्ट्रात नव्हती शहाजीच्या हयातींत युरोपांत डकार्ट, बेकन इत्यादि विचारवंत सृष्टपदार्थसशोधनकार्याचे वाली ज्यारीनें पचभूतांचा शोध लावण्यास लोकांना प्रोत्साहित करीत होते आणि आपल्या इकडे एकनाथ, तुकाराम, दासोपत, निपटनिरंजन इत्यादि संत पंचभूतांना मारून ब्रह्मसाक्षात्कारांत राष्ट्राला नेऊन मुक्त करण्याच्या खटपटींत होते. अशांना स्क्रू, टांचणी, बंदूक व तोफ यांचा विचार वमनप्राय वाटल्यास त्यांत नवल कसचे ? थोडक्यांत ऑगस्ट कोंट याच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे महाराष्ट्र त्या कालीं 'Metaphysical' अवस्थेत होते आणि 'Positive' अवस्थेंत येण्यास त्याला पांचशें वर्षें अवकाश होता. म्हणजे शक २००० च्या सुमारास महाराष्ट्र Positive बनणार होते"* पाश्चात्य युरोपीय संस्कृतीचें श्रेष्ठत्व या तिच्या भौतिक शास्त्रीय वृत्तींत आहे हे आपलें मत राजवाडे याच प्रस्तावनेंत पुढीलप्रमाणे मांडतात : "हा प्रचंड संस्कृतिप्रवाह म्हणजे ज्याला आधुनिक भौतिक शास्त्रीय संस्कृति म्हणतात तो

* राधामाधवविलासचपू, पृ १०७-१०८.

या शास्त्रीय संस्कृतिप्रवाहानें एकट्या इस्लामी विकृतीलाच तेवढें क्षीण केलें असें नाहीं. या प्रवाहाने ख्रिस्ती विकृतीलाहि दुर्बल करून सोडिले ही संस्कृति कालान्तरानें हिंदु विकृतीला व बौद्ध विकृतीलाहि मुरगळून टाकणार होती अशा या अजिंक्य व त्रिभुवनविजयी व कालत्रयव्यापक सनातन भौतिक शास्त्रीय संस्कृतीच्या धगधगीत तेजापुढे जुनाट मध्ययुगीन व रानटी इस्लामी विकृति शक १४०० पासून क्षय पावत पावत शक १५५० च्या सुमारास अतिच क्षीण झाली "§ (आपल्या संस्कृतीला अशा प्रकारे भौतिक शास्त्रीय स्वरूप यावे याबद्दल टिळक, आगरकर व राजवाडे या तिघांचेहि एकमत होते यात शंका नाहीं मात्र हे तिघेहि या बाबतींत कोटचे अनुयायी नसून इंद्रियानुभवगम्य सृष्टीमागे एक इंद्रियांना अगोचर असे अज्ञेय तत्त्व आहे व तेंच आपल्या अंतःकरणातहि आहे, असे त्यांचे मत असून ते कोटपेक्षा स्पेन्सर किंवा वेदान्त यांच्या विचारांशी या बाबतींत अधिक सहमत होते मात्र वेदान्ताला निवृत्तिमार्गी न ठेवतां तो प्रवृत्तिपर बनला पाहिजे असे त्यांचें मत असून त्यांपैकीं टिळक व राजवाडे यांच्या मते गीतेंत व दासबोधांत हा प्रवृत्तिपर वेदान्त उपदेशिला आहे व म्हणूनच ते या ग्रंथाच्या आधारे आपल्या संस्कृतीचे पुनरुज्जीवन केल्यास आपण युरोपीय संस्कृतीचा पराभव करू शकू, असा आत्मविश्वास लोकात जागृत करीत असत

लो. टिळक आणि इतिहासाचार्य राजवाडे यांच्या वृत्तीत प्रथमपासून बरेच साम्य असले, तरी पहिल्याची प्रवृत्ति अध्यात्माकडे विशेष तर दुसऱ्याची प्रवृत्ति भौतिकवादाकडे अधिक, अशी मूळपासूनच होती टिळकांनीं मनुष्यसमाजाला नीतिशास्त्र हवे असेल तर अध्यात्मशास्त्र सोडून चालणार नाहीं हे सिद्ध करण्यासाठीं आपल्या आयुष्याच्या अखेरीस 'गीतारहस्य' लिहिले, तर राजवाडे आपल्या आयुष्याच्या अखेरीस नास्तिकशिरोमणि नित्शे याचे अनुयायी बनले ऑगस्ट कोटप्रमाणें त्यानेंहि चातुर्वर्ण्याचें समर्थन केले आहे व त्याचा आधार आनुवंशिक जातिसंस्थेलाहि आहे हे पाहून त्यांना त्याच्याबद्दल विशेष आदर वाटला असल्यास नवल नाहीं महिकावतीच्या बखरीच्या प्रस्तावनेत त्यांनीं आपला वेदान्त म्हणजे शुद्ध नास्तिकवादच आहे, असे प्रतिपादिले आहे या प्रस्तावनेत ते लिहितात : " देव एक आहे हे जितकें खरे, तितकेंच ते कोट्यवधि आहेत हेंहि खरें असल्यामुळे, म्हणजे दोन्ही कल्पना केवळ बागुलबुवाप्रमाणे असत्य असल्यामुळे कातकरी, यहुदी, ख्रिस्ती व हिंदू हे सारेच निराधार व अवास्तव कल्पनांच्या पाठीमागे धांवत होते . . . . . . देवकल्पनेचे असत्य युग पाच-चार हजार वर्षें चालून समाप्तीस येण्याच्या रंगांत आहे हे देवभोळ्या लोकांच्या लक्षांत अद्याप आलें नव्हतें. एकट्या अद्वैतवेदान्त्याने तेवढें देवकल्पनेला लाथाडलें होतें."* राजवाड्यांचा लोकसत्तेवर विश्वास नव्हता आणि सामाजिक समतेवरहि नव्हता. तथापि चातुर्वर्ण्याहून श्रेष्ठ समाजरचना करण्याचा

§ राधामाधवविलासचंपू, पृ. ११६ * महिकावतीची बखर प्रस्तावना, पृ. ९७.

काळ आला आहे आणि महाराष्ट्रांतील ब्राह्मण-क्षत्रियांनीं "मराठा क्षत्रिय, मराठा कुणबी व नागवंशी महार यांना साक्षर करण्याचा जारीनें प्रयत्न न केल्यामुळें व या लोकांची संख्या देशांत बहुमत झाल्यामुळें, बुद्धिमान् व कर्तबगार अशा उच्च ब्राह्मणाना व उच्च क्षत्रियाना ह्यांच्याबरोबर अधोगतींत रखडत बसण्याची यथायोग्य शिक्षा मिळाली आहे" असे उद्‌गार त्यांनीं काढिले आहेत "महाराष्ट्र-देशाचे गुरुत्वमध्य उपरिनिर्दिष्ट चार जातींच्या ठायीं आहे आणि ते म्हणतील ती बहुत कालांतरानें का होईना, पण पूर्व दिशा होते"‡ असे सागून त्यानीं महाराष्ट्रीय सुशिक्षितांना जणु काय या सामान्य जनतेची उन्नति केल्यावेरीज तुमचा उद्धार होणार नाहीं, असाच अखेरचा संदेश देऊन ठेविला आहे .

लो टिळक हे शुद्ध भौतिकवादी कधींच नव्हते ते वेदान्तीच होते आणि नित्शेच्या काहीं मताबद्दल त्याना आदर असला, तरी ते त्याचे अनुयायी कधींच बनले नाहींत स्पेन्सरनें अद्वैत वेदान्तातील निर्गुण परब्रह्माचेंच 'अज्ञेय तत्त्व' या नावानें प्रतिपादन केलें म्हणून ते स्पेन्सरला आधुनिक ऋषि म्हणत, त्याचप्रमाणे नित्शेनें जर्मनीला कर्मप्रवण बनविलें याबद्दल त्यांना तो मोठा वाटे. तसेच त्याने चातुर्वर्ण्याचें महत्त्व मान्य केले, याबद्दलहि त्याना एक प्रकारचा आदर वाटणे साहजिक होते पण भूतदया, समता, स्वातन्त्र्य वगैरेसबधींचा त्याचा अनादर त्याना कधींच मान्य नव्हता

उलट, नित्शेच्या "सुपरमॅन"ला ज्याच्या मनोवृत्ती अत्यत विकसित होऊन पूर्णावस्थेस पोचल्या आहेत असे 'मानवी जनावर' हे नाव त्यानीं दिले आहे. त्यावरूनच त्याच्या मानवादर्शासबधीं लोकमान्याना अनादरच वाटत होता हे सिद्ध होते त्याचा वर्णव्यवस्थेवर विश्वास असला, तरी तींत एक निष्काम कर्मयोगी मानवधर्म ग्रथित झाला आहे म्हणूनच होता. ते राजकारणांत शुद्ध लोकशाहीचे भोक्ते असून त्यांचा हा विश्वास अखेरपर्यंत एकसारखा वाढतच गेलेला आहे आपणांस आपल्या दास्यातून मुक्त करण्याची शक्ति या सामान्य जनतेंतच आहे, असें त्यांचे प्रथमपासूनचे मत असून ते जेव्हा स्वराज्यासाठीं लोकानीं संन्यासी व्हावें किंवा रामदासी व्हावे असे म्हणत, तेव्हा त्यात वर्णश्रेष्ठत्व मिरविणाऱ्या ब्राह्मणाच्या जात्यभिमानाचा मुळींच स्पर्श नसे. सामान्य जनतेंत मिसळून तिची सेवा करण्यासंबधीं ते एके ठिकाणीं म्हणतात: "हे लोक पशू आहेत म्हणून त्यांचा तिरस्कार करणे काहीं पुरुषार्थ नाहीं त्याचा व आमचा गळा एके ठिकाणीं बाधलेला आहे व अखेरीस आम्हांस जर कोणी तारणार किंवा मारणार असेल, तर हेच तारतील किंवा मारतील क्षणभर युरोपियनांत मिसळून वाहवा मिळविल्यानें आमचा कांहीं निभाव लागणार नाहीं . सार्वजनिक हित साधण्याची दिशा याहून भिन्न आहे त्याकरितां खरोखरीच सर्व प्रकारच्या व जातींच्या लोकांत आम्ही मिसळून वागलें पाहिजे व

‡ राधामाधवविलासचपू, पृ २७१.

आमच्या स्वतःचे सर्व हित सोडून निष्कामबुद्धीने रामदासांप्रमाणें किंवा साल्व्हेशनिस्टांप्रमाणे या बाबतींत उपदेशकाचा व मार्गदर्शकाचा धंदा स्वीकारला पाहिजे" ब्राह्मण्याच्या उच्च आदर्शापासून लोकनायकत्वाची ही जी कल्पना निघते, ती सामाजिक समता, लोकसत्ता किंवा समाजसत्ता याच्याशीं विरोधी नसून त्यांना पोषक अशीच आहे अशा प्रकारच्या गुणश्रेष्ठ आणि लोकसेवारत ब्राह्मणांचा कोणासहि हेवा वाटणार नाही व त्यांचा जन्म एकाच जातींत होईल असेहि नाहीं

## लोकशाही व सर्वांगीण सुधारणा

लोकमान्यानी अखेरीस स्वराज्याच्या लढ्यात शाततेने व स्वार्थत्यागाने लढणारे ते सर्व ब्राह्मणच आहेत—मग ते जातीने कोणीहि असोत, असा उपदेश करून याच वृत्तीचा अवलब करीत गेल्याने जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य नष्ट होऊन गुणकर्मप्रधान वर्णव्यवस्था स्थापन होऊ शकेल असे 'राष्ट्रसभानिष्ठ लोकशाहीपक्ष' स्थापन करताना लोकाना सागितले तात्पर्य, लोकमान्याना लोकशाही आपल्या देशांत येत आहे व तदनुरूप आपल्या पूर्वापार सामाजिक व धार्मिक आचारविचारात फेरफार होत जाणार हे दिसत असले, तरी त्यावर भर देणे हे लोकाचें लक्ष गौण गोष्टीकडे खेचून मुख्य स्वराज्याच्या कार्यांत अडथळे उत्पन्न करतें, असे वाटत असे

यावर आगरकर म्हणतात: "या देशांत ज्या विद्येचा पाय शिरला आहे, ती आमच्या राज्यविषयक विचारांप्रमाणे आमच्या धार्मिक व सामाजिक विचारातहि प्रचंड क्राति करणार आणि तदनुसार आमचे आचरण बदलत जाणार. आमच्या अर्वाचीन विचारास ज्या धार्मिक व सामाजिक गोष्टी अप्रशस्त वाटू लागल्या आहेत, त्यास शेकडो मनूचे व सहस्त्रावधि पाराशराचे आधार दाखविलेत व त्यांचा प्रसार न व्हावा म्हणून त्याच्या मार्गांत कोट्यवधि लोकांचा मूर्खपणा, वृथा धर्माभिमान आणि उठावणीचे आरडे आणून घातलेत, तरी ज्याप्रमाणे पर्वताच्या माथ्यावरील सरोवराच्या भिंती फोडून तुफान वेगानें कड्यावरून पडू लागलेल्या वारिवाहाची गति कुठित करण्यास कोणीहि धजत नाहीं, त्याप्रमाणे आमच्या मूर्खपणाच्या सामाजिक व धार्मिक समजुतींस लागलेला वणवा कोट्यवधि अजागळ कीटकांच्या क्षुद्र पक्षवाताने किंवा मोठ्या किड्याच्या शुष्क श्वासवाताने विझण्याचा मुळीच सभव नाहीं"* टिळक म्हणत कीं एक प्रकारची सामाजिक व धार्मिक जागृति अथवा विचारक्रांति होणे अवश्य असले, तरी ती आपल्या पूर्वपरपरेस धरून केली तरच लोकांस पटेल. आतांच सर्व जाती मोडा, धर्मबधने तोडा आणि सर्व शुद्ध बुद्धिवादी बना, असे म्हटल्यानें लोक तसे होत नाहींत व उगीच मतभेदांचे तट पडून स्वराज्याच्या कार्याची हानि होते. लोकनायकांनीं पूर्वपरपरेवर एकदम हल्ला करून केवळ तार्किक हल्ले समाजावर चढविले, तर त्यात आमचें कोणतेंहि हित न होतां लोकांची शक्ति दुभगते. लोकमत

* निबधसग्रह, भाग १ ला, पृ. १४६-४७.

हळूहळू बदलेल त्या मानाने परिस्थितीस अनुसरून जे धार्मिक व सामाजिक आचार स्वराज्याच्या आड येतील, ते लोक आपोआप तोडतील तेव्हां प्रथमतः त्यांच्यांत स्वराज्याची आकांक्षा निर्माण करा व त्याना स्वराज्योन्मुख करा, त्यांच्यात स्वाभिमान जागृत करा, आपल्या संस्कृतीचें श्रेष्ठत्व पटवून द्या, म्हणजे त्यांच्यात जोम उत्पन्न होईल व हा आत्मश्रद्धेचा जोम उत्पन्न झाला म्हणजे सर्व सुधारणा क्रमाक्रमानें घडून येतील यावर आगरकर म्हणत, कीं पूर्वीच्या संस्कृतीचा अभिमान निर्माण करा, पण त्याचबरोबर तींतील दोषहि काढून टाका. आमची संस्कृति जगाच्या मागे पडली आहे याची जाणीव ठेवून ती पुढे नेण्याचीहि वृत्ति जागृत करा. अशा प्रकारें हा वाद चाले

## टिळक-आगरकरांचा प्रकृतिभेद

या वादात शुद्ध तात्त्विक असा मतभेद बराच होता हे जरी खरे असले, तरी लो टिळकाची राजकीय व्यवहारबुद्धि त्याना आगरकराच्या मतापासून दूर लोटीत होती, हेहि खोटे नाहीं आगरकराचीं मतें इतर सुधारकांहून अधिक तर्कशुद्ध आणि सर्वांगीण क्रांतिवादी आहेत, हे त्याना माहीत होते आगरकर हे रानड्यापेक्षा सामाजिक व धार्मिक क्षेत्रांत जसे पुरोगामी आहेत, त्याचप्रमाणे राजकीय बाबींतहि ते जहाल आहेत हे त्यानीं कधीहि नाकबूल केले नाहीं, पण याच त्याच्या तार्किक वृत्तीमुळे आपल्या राजकारणात अधिक अडथळा येतो, असें त्यांना वाटे राजकीय सुधारकानें एकांतिक धार्मिक व सामाजिक सुधारणेचा पुरस्कार करणे निदान परतंत्र राष्ट्रात तरी योग्य नाहीं, असे त्याना वाटे. आगरकराना यात सत्याशीं प्रतारणा होते असे वाटे ते म्हणत, सीता निरपराधी आहे हे माहीत असून रामचंद्राने केवळ लोकाराधनेसाठीं तिचा त्याग केला, तसे वर्तन समाजसुधारणेला दूर लोटण्यात टिळक करीत आहेत या आगरकराच्या म्हणण्यात मुळींच तथ्य नव्हतें असे नाहीं, पण राजकारण करताना अशी लोकाराधना करण्यात स्वार्थ किंवा प्रमाद तरी काय आहे, असे टिळकाना वाटे सीतेचा त्याग केल्यानतर वाल्मीकीनें तिला रानांतून आणून आपल्या आश्रमात ठेविली आणि तिचे बाळतपण करून मुलांची शुश्रूषा करून त्यांचें संगोपन केलें रामचंद्राच्या पराक्रमाबद्दल मला केवढाहि आदर असला, तरी तू निरपराधी असता तुझा त्याग त्यानें केला, याबद्दल माझा त्याच्यावर रोषच झाला आहे, असे वाल्मीकीनें सीतेजवळ बोलून दाखविले

( वाल्मीकीसारख्या निःस्पृह ऋषीपेक्षा अडाणी लोकाच्या मतांना मान देणें आणि स्वतःच्या अंतःकरणाचीहि साक्ष बाजूला सारून सीतेचा त्याग करणे रामास शोभत नाहीं, असे आगरकराचें मत होते " व्यक्तीनें किंवा सरकारने साधारणपणें लोकमतास धरून वर्तन करणे किंवा कायदे करणे हे सामान्य गोष्टींत ठीक आहे; पण लोकाच्या गाढ अज्ञानामुळे किंवा दुराग्रहामुळें व्यक्तीस लोकांची पर्वा न करतां

स्वतंत्रपणे वर्तावे लागते व सरकारास लोकमताविरुद्ध कायदे करावे लागतात. तथापि सामान्यतः सरकारचें वर्तन लोकमतास धरून असेल तितके बरे पण जे लोक हा सिद्धांत कबूल करतात, ते लोकमत दिवसेंदिवस सुधारत चालले आहे असे गृहीत धरतात तेव्हां आतां असा प्रश्न उत्पन्न होतो, कीं लोकमताची सुधारणा व्हावी तरी कशी ? . म्हणून कोणी तरी अस्तित्वांत असलेल्या लोकमतातील दोषस्थले दाखविल्याचे व समाजांतील बहुतेक लोकास अप्रिय पण पथ्यकारक असे विचार त्यांच्यापुढे आणण्याचे अनभिमत काम करण्यास तयार झालेच पाहिजे असे करण्यास लागणारे धैर्य ज्या समाजांतील कांहीं व्यक्तींच्यासुद्धां अंगीं नसेल, त्या समाजांनीं वर डोकें काढण्याची आशा कधींहि करू नये."‡ "चार-दोन गोष्टींत लोकास न रुचणारे असे तुमचे विचार असले, आणि ते तुम्ही उघड बोललात तर कांहीं दिवस ते तुम्हांस त्रास देतील, तुमचा तिरस्कार करतील, व तुमचें बोलणे ऐकून घेणार नाहींत हे जरी खरें आहे, तरी सत्य तुमच्या पक्षांत असेल, निदान कोणत्याहि क्षुल्लक स्वार्थासाठीं हातीं घेतलेल्या पक्षाच्या वतीनें तुम्ही भाडत नसाल, लोकांच्या कल्याणाची खरी कळकळ तुमच्या अंतःकरणात वसत असेल, व ते कल्याण घडवून आणण्यासाठीं निरपेक्षबुद्धीने तुम्ही आपल्या जिवापाड श्रम करीत असाल, तर तुमच्या हातून ते कल्याण होवो अगर न होवो, तुमचे चागले हेतू व तुमचे निर्लोभी कष्ट यांमुळें लोकांच्या मनांत तुमच्याविषयीं उत्पन्न झालेला पीळ हळूहळू नाहींसा होत जाऊन त्याना तुमच्या गुणांचे माहात्म्य समजू लागेल व तुम्हांपासून होणाऱ्या फायद्याबद्दल त्याच्या मनात तुम्हाविषयीं कृतज्ञताबुद्धि व पूज्यताबुद्धि उत्पन्न होतील"* पण या वृत्तीनें वागणाऱ्याच्या हातून व्यावहारिक राजकीय नेतृत्व होणार नाहीं, असे लोकमान्याचे मत होते. मागच्या दृष्टान्तानेच बोलायचे, तर सीतेला लोकमताविरुद्ध आपल्या आश्रमात ठेवून घेणे वाल्मीकीला शक्य असले, तरी राज्य करणाऱ्या रामचद्राला लोकमत निवळेपर्यंत ते शक्य नव्हतें. वाल्मीकीनें तिला आश्रमांत ठेवून घेऊन मुलांचे संगोपन करण्यास आणि त्यामुळें लोकमत अनुकूल झाल्यानतर तिला परत बोलाविण्यासहि रामाची हरकत नव्हती, पण राजकारणासाठीं त्याला कांहीं काळ तरी तिचा त्याग करणें भाग होते दृष्टान्त सोडून बोलावयाचें, तर टिळक व आगरकर याच्या मनोभूमिकाच भिन्न होत्या. पहिल्याची भूमिका राजकीय मुत्सद्दीपणाची व राष्ट्रीय पक्ष-संघटनेची आणि दुसऱ्याची भूमिका केवळ तत्त्वनिष्ठ सर्वांगीण सस्कृति-सुधारकाची होती § )

‡ निबधसग्रह, भाग १ ला, पृ. ७ * निबधसग्रह, भाग १ ला, पृ १९७

§ ज्या विषयावर लोकमत तयार झालेलें आहे, त्यासंबधी ते सघटित बनवून त्याच्या प्रभावानें प्रस्थापित राज्यसस्थेंत अभिप्रेत अशा सुधारणा घडवून आणू इच्छिणाऱ्या मुत्सद्यास पुष्कळ वेळा केवळ तात्त्विक सुधारणाचे विचार लोकापुढे माडून लोकमताची शक्ति दुभगणाऱ्या तत्त्वनिष्ठ सुधारकाचे कार्य विघातक वाटतें तथापि, अशा मुत्सद्यानी हें कार्य आपल्या हातीं

लो टिळकांना राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या सिद्धीच्या दृष्टीनें धार्मिक व सामाजिक क्रांतीवर राष्ट्रातील तरुणांची इतकी शक्ति घालविणे योग्य वाटत नव्हतें म्हणून त्यांनीं आपल्या सस्कृतीच्या अभिमानाच्याच परपरागत पायावर जहाल राजकारणाचा पाया घातला. आगरकराच्या जहाल राजकीय विचारांचा पाया केवळ जनतेचें वाढते दारिद्य आणि स्वातत्र्याची, समतेची आणि सत्यनिष्ठेची सार्वत्रिक आकाक्षा हा होता लोकमान्यांना असे दिसत होतें, कीं सामान्य समाजात असे लक्षावधि लोक आहेत, कीं त्यांना सामाजिक व धार्मिक सुधारणा मान्य नाहींत, पण ते स्वसंस्कृतीचे अभिमानी आहेत त्याच्यांत हा सस्कृतीचा अभिमान जागृत केला, तर ते स्वराज्यासाठीं झगडण्यास तयार होतील ते तसे तयार झाले व त्यांच्यांत जोम उत्पन्न झाला, म्हणजे स्वराज्याच्या मार्गात त्यांना आड येणारे सामाजिक व धार्मिक निर्बंध ते दूर करतील, त्यासाठीं एवढें अकांडतांडव करावयास नको शिवाय आम्ही आज मागे राहिलो असलों, तरी आमची सस्कृति हीन दर्जाची नाही, तर ती श्रेष्ठ दर्जाचीच आहे मग उगीच आमच्या संस्कृतीचा पाया उखडण्याचा आग्रह का, अशीहि त्यांची वृत्ति होती या वृत्तीनें लोकमान्यानीं राष्ट्रीय जागृतीला जोरानें सुरुवात केली आणि त्यानीं आपल्या कार्याने ब्रिटिश सत्तेला हादराविलें! त्यांच्या स्वतत्र राजकीय कार्याचा प्रारभ १८९५ पासून झाला असे म्हणण्यास हरकत नाहीं चारपांच वर्षांत त्यांची कीर्ति सर्व हिंदुस्थानभर पसरली आणि महाराष्ट्रात सुधारकपक्षाला विरोध करणारा टिळकांचा पक्ष राजकीय क्रांतिवादाचा जनक आहे, असा ओरडा ब्रिटिश अधिकारीवर्गाने सुरू केला. पण या ओरड्याने अगर त्याचा येथील राज्यकर्त्यांनीं जो छळ केला त्यामुळे,

---

घेतले नाही, तरी समाजातील तत्त्वनिष्ठ व स्वार्थत्यागी सुधारकानी हे कार्य चालू ठेवणे समाजाची प्रगति व लोकमताची सुधारणा या दृष्टीने आवश्यक असते. अशा प्रसगी या दोन वृत्तीच्या लोकानी एकमेकाच्या मार्गात आड न येता श्रमविभागाचे तत्त्व अवलबिणे हा यावर तात्त्विक दृष्ट्या योग्य उपाय दिसतो. तथापि हा उपाय अवलबिण्यासहि कांही व्यावहारिक अडचणी उपस्थित होत असतात, व त्यामुळे उभयपक्षी गैरसमज आणि परस्परासबधी अवहेलना-बुद्धि व्यक्त होऊ लागतात असे असले तरी समाजाची प्रगति होण्याच्या दृष्टीने वरील दोनहि कार्ये चालू राहणे अवश्य असते लॉर्ड मोर्ले यानी आपल्या 'ऑन कॉम्प्रमाइज' या पुस्तकात अशा बाबतीत व्यवहारमग्न मुत्सद्दी आणि तत्त्वनिष्ठ सुधारक या दोघाचीहि समाजास कशी आवश्यकता असते, त्याचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे

"Of course there are excellent reasons why a statesman immersed in the actual conduct of affairs, should confine his attention to the work which his hands find to do But the fact that leading statesmen are of necessity so absorbed in the tasks of the hour furnishes all the better reason why as many other people as possible should busy themselves in helping to prepare opinion for the practical application of unfamiliar but weighty and promising suggestions, by constant and ready discussion of them upon their merits"

— *On Compromise, page 98 ( Macmillan and Co, edition 1913 )*

या पक्षाचे बल कमी न होतां ते अधिकाधिक वाढतच गेलें आणि १९०५ च्या सुमारास त्याच्या नेतृत्वाखालीं सर्व हिंदुस्थानांतील तरुण देशभक्त एकत्र येऊन त्यांनीं राष्ट्रीय राजकारणाचे नवे धोरण राष्ट्रसभेला लावण्याचा आपला निश्चय जाहीर केला हे नवे धोरण कोणते होते आणि महाराष्ट्रांत जहाल राजकारणाचा क्रांतिकारक उद्भव व प्रसार कसा झाला, याचा विचार आतां आपणांस करावयाचा आहे

तथापि हा नवा विषय सुरू करण्यापूर्वी हे सांगितलें पाहिजे, कीं लोकमान्यांनीं सांस्कृतिक पुनरुज्जीवनाच्या आधारावर जें राष्ट्रीयत्व निर्माण केलें, त्यामुळे त्यांच्या हयातींत महाराष्ट्रांतील ब्राह्मणेतर जनतेत फारशी राजकीय जागृति झाली नव्हती व त्याच्या मृत्यूनतरच्या परिस्थितींत याच सास्कृतिक राष्ट्रीयत्वाचा आधार घेऊन त्यांचे अनुयायी म्हणविणारे कांहीं लोक पुढे राष्ट्रसभेला विरोध करू लागले व आमची विशिष्ट सस्कृति रक्षण होत नसेल तर तें स्वराज्य आम्हांस नको, म्हणून परकीय सत्तेशीं सहकार्यहि करू लागले ! यावरून स्वसस्कृतीचा अभिमान हा नेहमीं प्रखर राष्ट्रीय राजकारणास पोषकच होईल, असे म्हणतां येत नाहीं इतकेच नाहीं, तर पाश्चात्य भांडवलशाही हीच आपली सस्कृति म्हणून तिला प्रेमानें कवटाळणारे आणि हिंदु-सस्कृतीच्या नांवाने फॅसिझम्चा पुरस्कार करणारेहि अनेक लोक आज निघत आहेत याच्या उलट, आपल्या राजकारणास प्राचीन संस्कृतीचा आधार फारसा न घेता इतर देशातील यशस्वी तत्त्वाचा आधार घ्यावा आणि त्याला क्रांतिकारक स्वरूप द्यावें, असे म्हणणारा एक समाजवादी पक्ष हिंदी राजकारणात आज उदय पावला आहे राष्ट्रीय राजकारणास प्राचीन इतिहासातून स्फूर्ति घेणारे म. गाधी आणि त्यात अर्वाचीन जगाच्या इतिहासापासून स्फूर्ति ओतणारे प. जवाहरलाल नेहरू हे एका दृष्टीनें विचार करता महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासातील टिळक व आगरकर यांचेच नवे अवतार भासतात टिळक-आगरकरांच्या वेळीं मिल-स्पेन्सरचें तत्त्वज्ञान इकडे येत होते , आज मार्क्स्-एन्जलसचे तत्त्वज्ञान येत आहे लोकसत्तेच्या व सामाजिक समतेच्या तत्त्वाना मान्यता देऊन मिल-स्पेन्सरचे तत्त्वज्ञान हिंदुस्थाननें आज बहुतांशीं आत्मसात् केलें आहे व ते करूनहि आपल्या प्राचीन संस्कृतीचा अभिमान तो धारण करीत आहे आता या नव्या समाजवादी तत्त्वज्ञानाची काय अवस्था होणार, हा प्रश्न आहे आमच्या मते हे नवे तत्त्वज्ञान आत्मसात् करूनहि भारतीय संस्कृतीचे वैशिष्ट्य व श्रेष्ठत्व कायम राहील पण या आमच्या म्हणण्याचा उलगडा वाचकास या ग्रंथाच्या अखेरीसच होऊ शकेल.



८

# महाराष्ट्रांतील जहाल व क्रांतिकारक राजकारण

"The first popular movement in India thus began in the Deccan Poona was its centre and Tilak was its inspirer And though Tilak himself never took part in the revolutionary movement, some of those who had received their first lessons from him or his writings later became revolutionaries, and the credit or blame of starting the revolutionary or the terrorist movement also belongs to the people of Maharashtra"

—*Landmarks in Indian Constitutional and National Development, by G N Singh, P. 302.*

राष्ट्रसभेतील नेमस्त प्रागतिक राजकारणाला व्यवस्थित स्वरूप देऊन त्याची तत्त्वे ठरवून देण्याचें कार्य जरी मुख्यतः न्या रानडे यांनीं महाराष्ट्रात केले, तरी या पक्षाच्या विचारप्रवाहाचा उगम बगालमधील आद्य सुधारक आणि ब्राह्मसमाजाचे सस्थापक राजा राममोहन रॉय याच्याकडे आहे, हे मागें सूचित करण्यात आलेच आहे या विचारप्रवाहाचे मुख्य लक्षण म्हणजे हिंदुस्थान व इग्लंड यांचा जो राजकीय योग घडून आला आहे, तो परमेश्वरी प्रसादाने घडून आला असून तो तसाच निरतर चालू राहण्यात हिंदुस्थानचे व जगाचे हित आहे हे होय अर्थात् या विचारसंप्रदायाच्या लोकांना पुढें कधीं काळीं हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्यांतून बाहेर फुटून निघेल अशी भीति कधीं कधीं वाटत असली, तरी तसें होणें इष्ट नाहीं व म्हणून ही अनिष्ट आपत्ति टाळण्यासाठीं आतांपासून प्रयत्न करणे हेच आपले कर्तव्य आहे, असे या सप्रदायातील लोकाचे मुख्य राजकीय धोरण होते बंगालमधील हिंदु-समाजाला मुसलमान सुभेदारांचें वर्चस्व नकोसें झालें होते, पण ते नष्ट करण्याचे कार्य घडवून आणण्याचे सामर्थ्य तेथील शेठसावकाराना व हिंदू राजांना नसल्यामुळे त्यांनीं ईस्ट इडिया कपनीला मुसलमान सुभेदाराविरुद्ध साहाय्य केले आणि बगालमधील क्रांति घडवून आणिली पण या क्रांतीनंतर बंगालमधील सर्व व्यापार आणि राजकीय सत्ता गोऱ्या लोकांच्या हातीं गेली तरीहि गोऱ्या लोकांच्या सहवासाने आपल्या देशाची सर्वांगीण उन्नति होत आहे, असा भास बंगाली सुधारकाना दोनतीन पिढ्यापर्यंत होत राहिला!

महाराष्ट्राच्या राजधानींत म्हणजे पुण्यांत राहणाऱ्या लोकांना प्रथमपासूनच इग्रजांनीं आपले राज्य हरण केलें आणि आपला सर्व व्यापारधंदा काबीज केला, हे पाहून स्वराज्याची व स्वदेशी धद्यांच्या उन्नतीची हळहळ लागली होती यामुळे महाराष्ट्रांतील आद्य सुधारक लोकहितवादी यांनीं राजा राममोहन रॉय यांनीं रूढ केलेली, ब्रिटिश राज्यपद्धति हा परमेश्वरी प्रसाद आहे, ही विचारप्रणाली इकडे आणिली; तथापि

अखेरीस हिंदुस्थान अमेरिकेप्रमाणे ब्रिटिश साम्राज्यांतून फुटून जाणे अपरिहार्य आहे असे आपले मत त्यांनीं जाहीर केले होते. पण पुढें न्या रानडे यांनीं या मताच्या आधारावर आपले राजकारण न आंखता बगालमधील आद्य सुधारक राजा राममोहन यांच्या विचारांच्या भूमिकेवरच ते रचिले तथापि याच वेळी महाराष्ट्रांत एक जहाल राजकीय विचारप्रणाली निर्माण होत होती हिदुस्थानात वाढणाऱ्या दारिद्र्यांतून येथें एक फ्रेंच राज्यक्रातीसारखी प्रचड राज्यक्रांति होईल असे विचार दादाभाई व ह्यूम यांच्या लेखनभाषणाच्या आधारे लोकांपुढे येऊ लागले होते. लो टिळक आणि आगरकर यांनीं ही विचारप्रणाली प्रथम लोकांपुढे मांडण्यास सुरुवात केली आणि राजा-प्रजा व जित-जेते याच्या संबधांतून निर्माण होणाऱ्या हितविरोधावर भर देऊन जहाल राजकीय विचार लोकात प्रसृत केले. लो टिळकांनीं या जहाल राजकारणाला सर्वांगीण क्रांतीचे स्वरूप न देता आपल्या संस्कृतीच्या अभिमानाचा आधार दिला आणि हिंदुस्थान राजकीय स्वातंत्र्य उपभोगू लागेपर्यंत तरी या देशात सामाजिक व धार्मिक विचारक्रांतीला प्राधान्य देऊं नये, असे नवे राजकारण सुरू केले न्या रानडे यांचा नेमस्त सर्वांगीण सुधारणावाद, आगरकर यांचा जहाल सर्वांगीण सुधारणावाद आणि चिपळूणकर–टिळक याचा जहाल राजकारणवाद, हे विचाराचे तीन स्वतंत्र प्रवाह आहेत इ स. १८९५ च्या पूर्वी महाराष्ट्रांत दहापंधरा वर्षें जे विचारमंथन झाले, त्यात या तीन विचारप्रवाहाचा त्रिवेणीसगम दृष्टीस पडतो यानतर मात्र आगरकराच्या विचाराची सरस्वती गुप्त होऊन रानड्याचा नेमस्त प्रागतिक पक्ष आणि टिळकाचा जहाल राष्ट्रीय पक्ष असे दोनच पक्ष महाराष्ट्रात स्थापन झाले

## राजकीय जहाल व सामाजिक नेमस्त

लो. टिळकाचा जहाल राष्ट्रीय पक्ष हा सामाजिक व धार्मिक सुधारणात मागासलेला अथवा नेमस्त असता तो राजकारणात जहाल कसा, याबद्दल कित्येक लोकांना मोठें आश्चर्य वाटतें त्याना रानड्यांची सर्वांगीण नेमस्त वृत्ति सुसगत वाटते आणि आगरकराची सर्वांगीण जहाल वृत्तीहि सुसगत वाटते पण टिळकपक्षाची सामाजिक नेमस्त वृत्ति आणि राजकीय जहाल वृत्ति यात त्याना विसगति दिसते पण आमच्या मतें यांत विसंगत असे काहींच नसून सूक्ष्म दृष्टीने पाहूं लागल्यास परतत्र राष्ट्रांतच नव्हे, तर स्वतंत्र राष्ट्रातहि असा पक्ष असतो असे दिसून येईल इग्लडातील कॉन्झर्वेटिव पक्ष किंवा आज ज्याला राष्ट्रीय पक्ष हे नाव मिळाले आहे तो पक्ष, एका अर्थी अशाच वृत्तीचा आहे. तो पक्ष राजकीय, आर्थिक व सामाजिक अशा सर्वच अंतर्गत सुधारणात नेमस्त असा दिसतो; पण परकीयांचे आक्रमण सहन न करणे अथवा परराष्ट्रावर आक्रमण करणे या बाबतींत त्याची वृत्ति जहाल आहे हे कोणीहि नाकबूल करू शकणार नाहीं परतत्र राष्ट्रात राजकीय सुधारणा या शब्दांचा अर्थ आणि स्वतत्र राष्ट्रांत त्या शब्दाचा अर्थ यांत मोठा भेद असतो स्वतत्र राष्ट्रात

राजकीय सुधारणा या शब्दांचा अर्थ एका विशिष्ट वर्गाच्या हातांतील सत्ता सामान्य जनतेच्या हातीं जाणे असा असून या सुधारणेस अनुकूल असणारे लोक तितक्या प्रमाणांत सामान्य जनतेच्या सामाजिक, आर्थिक व धार्मिक सुधारणांसहि अनुकूल असतात व तेथे जे राजकीय जहाल ते सामाजिक दृष्ट्याहि जहाल असतात पण परतत्र राष्ट्रांत राजकीय दृष्ट्या जहाल असणारे अनेक लोक सामाजिक क्रातीला अनुकूल असतीलच असा नियम नसतो; किंबहुना, ते बहुतांशीं तिला प्रतिकूलच असतात आपणावर झालेल्या परकीयाच्या आक्रमणाचा आधीं निरास करावा व मगच आपण सामाजिक पुनर्घटनेचा विचार करावा, ही वृत्ति सामान्यतः सर्व लोकात दिसून येते विशेषतः जित राष्ट्रातील समाजाच्या वरच्या थरात तरी ही वृत्ति उत्कटत्वाने वास करीत असते या वृत्तींतूनच राजकीय दृष्ट्या जहाल व सामाजिक दृष्ट्या नेमस्त असा पक्ष अस्तित्वांत येतो स्वतत्र देशांत सामाजिक क्रांति झाल्यानतरच राजकीय क्रांतीचे विचार सुचतात व ती घडून येते उदाहरणार्थ, इंग्लडांत सोळाव्या शतकात एक सामाजिक क्रांति घडून आली व जुना सरजामदारवर्ग मागे पडून मध्यम व्यापारी-वर्ग पुढे आला. नतर या वर्गानें लोकसत्तेची राजकीय क्राति घडवून आणिली. तसेंच अठराव्या शतकाच्या मध्यापासून एकोणिसाव्या शतकाच्या प्रथम चरणाच्या अतापर्यंत एक दुसरी औद्योगिक क्रांति घडून आली व त्यानतर पुनः समाजवादी क्रांतीचे विचार प्रसार पावू लागले. पण परतंत्र देशात राजकीय क्रातीचे विचार अशा सामाजिक क्रातीमुळे प्रथम उद्भवत नाहींत, तर आपणांवर होणारें परकीयाचे आक्रमण पाहून जी चीड येते, तींतून क्रातिकारक राजकारण जन्मास येते ही चीड येणाऱ्यांस जर सामाजिक क्राति झाल्याखेरीज परकीयाचे राज्य नष्ट होणार नाहीं, अशी खात्री होईल तरच ते सामाजिक क्रातीला अनुकूल होतील, नाहीं तर होणार नाहींत याच्या उलट, ज्यांना ही चीड येत नाहीं ते राजकीय क्रांतीचा विचारहि करणार नाहींत हे उघड आहे. यामुळे परकीय आक्रमणाविषयीं चीड उत्पन्न करणे हेच पर-तत्र राष्ट्रांत जहाल राजकारण फैलावण्याचे प्रमुख साधन असते लोकमान्यानीं याच साधनाचा भरपूर उपयोग करून घेतला व तो करीत असतां सामाजिक रचनेच्या परपरेला फारसा धक्का लाविला नाहीं पण ही सामाजिक रचना आपोआपच ढासळत होती कारण ती रचना ज्या सरजामदारी राजकीय व आर्थिक सस्थाच्या आधारावर उभारलेली होती, त्या सस्था ब्रिटिश सत्तेनेंच मोडून टाकिल्या होत्या.

चातुर्वर्ण्याची आणि जन्मसिद्ध जातिव्यवस्थेची समाजरचना मध्ययुगीन सरजामी व वतनदारी राज्यघटनेवर आधारलेली होती ब्रिटिशानीं ही राज्यपद्धति उलथून पाडली; इतकेंच नाहीं, तर देशांतील लोकांचे पूर्वापार चालत आलेले धदे मारून टाकून परकीय व्यापाऱ्याची व भाडवलशाहीची दलाली आणि परकीय साम्राज्यशाहीची नोकरी, यांखेरीज लोकांना उपजीविकेचें साधन असे कोणतेहि उरूं दिले नाहीं यामुळें या दोन कामांत ज्यांची सोय लागली नाहीं, ते सर्व शेतीवर

उदरनिर्वाह करू लागले, पण शेतीच्या उत्पन्नावरहि त्यांचा उदरनिर्वाह होईना. यामुळे जी सामाजिक क्रांति घडून आली, तिच्यांतूनच राजकीय लोकसत्तेची आकांक्षा लोकांत निर्माण होऊं लागली पण ही सामाजिक क्रांति सर्वस्वीं येथील सुधारकाच्या प्रयत्नांनीं होत नसून ती ब्रिटिश राजसत्तेच्या आक्रमणानें घडत होती. यामुळे तिचें सर्वांगीण स्वरूप कोणाच्या लक्षात भरत नव्हते परकीय सत्तेच्या आक्रमणामुळे दारिद्र्य व बेकारी वाढत आहेत याची मात्र जाणीव सर्वांना होत होती ही जाणीव आणि आपल्या परपरागत सम्कृतीचा अभिमान यांची गाठ पडतांच क्रांतिवादी व जहाल राजकारणाचा जन्म झाला ही गांठ घालून देण्याचे कार्य लोकमान्यांनीं केलें त्याबरोबर स्वदेशी, स्वराज्य, बहिष्कार, स्वातन्त्र्य या भावना सर्वत्र फैलावूं लागल्या

## स्वातंत्र्यप्राप्तीचे निरनिराळे प्रयत्न

या भावनानीं प्रेरित होऊन निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळ्या दिशांनीं व मार्गांनीं स्वातंत्र्यप्राप्तीचे प्रयत्न चालविले कोणीं "रणावीण स्वातन्त्र्य कोणा मिळाले ?" या मन्त्राचा आधार घेऊन शस्त्रास्त्रें जमवून स्वराज्यस्थापनेचे प्रयत्न केले, कोणीं जुलमी अधिकाऱ्यांचे खून केले, कोणीं शिवाजी क्लब स्थापन करून बलोपासना चालविली, कोणीं संस्थानिकाच्या साहाय्याने येथील क्रांति होऊ शकेल असा कयास बांधिला, तर कोणीं आपल्या देशांतील सर्व संस्थानिक मेषपात्र झालेले आहेत हे ओळखून अफगाणिस्तान, नेपाळ वगैरे दूरच्या स्वतत्र राज्यांचा आश्रय केला कोणीं रामदासी मठांचें पुनरुज्जीवन करण्याची कल्पना काढिली आणि कांहींनीं मंत्रसामर्थ्याने व योगसामर्थ्यानें ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याचा प्रयत्न चालविला ! हे सर्व प्रयत्न एकाच वेळीं एका ठिकाणीं झाले असें नाहीं, व लोकमान्याना या सर्व प्रयत्नांची निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या ठिकाणांहून वार्ता पोहोचत असली, तरी त्यानीं असल्या राजकारणांत स्वतः भाग घेतला नाहीं अथवा त्यांना प्रत्यक्षपणे अथवा अप्रत्यक्षपणें प्रोत्साहनहि दिले नाहीं आपले राजकारण कितीहि जहाल झाले, तरी तें उघड व कायदेशीरच चालले पाहिजे आणि सामान्य जनतेत मोठी जागृति होऊन तिला राष्ट्रसभेसारख्या संघटित राजकीय सस्थेचें नेतृत्व प्राप्त झाल्याखेरीज हिंदुस्थानला स्वराज्य मिळणार नाहीं, हा त्यांच्या बुद्धीचा ठाम निश्चय त्यानी कधींहि ढळूं दिला नाहीं त्यांचें राजकारण सार्वजनिक सभा आणि राष्ट्रसभा अशा उघड काम करणाऱ्या सस्थांमार्फतच चालणारे होते पण न्या रानडे यांच्या पक्षाच्या हातीं जोपर्यंत सार्वजनिक सभेचीं सूत्रे आहेत, तोपर्यंत तिचे राजकारण आपणास हवे तसें चालणार नाहीं व तिच्या राजकारणात खरा जोमहि येणार नाहीं, हे त्याना हळूहळू स्पष्ट दिसू लागलें होतें १८९५ सालीं नव्या कौन्सिलच्या निवडणुकी झाल्या तेव्हां लो टिळक व ना गोखले असे दोन उमेदवार परस्परांविरुद्ध पुण्यातून उभे राहिले इतकेच नाहीं, तर लॉर्ड हॅरिस हे मुंबईचे गव्हर्नर आपली कारकीर्द संपवून

विलायतेस जाऊ लागले, तेव्हां त्यांना मानपत्र देण्याच्या कार्यात जुन्या लोकांनीं भाग घेतला व ज्या गव्हर्नरांच्या कारकीर्दीत पुण्या-मुंबईसारख्या महाराष्ट्रांतील प्रमुख ठिकाणीं हिंदु-मुसलमानांचे दंगे होऊन सरकारी अधिकाऱ्यांच्या भेदनीतीचा लोकांना कटु अनुभव आला व ज्यानीं लोकमताचा उघडउघड उपमर्द करून लोकांच्या पुढाऱ्यांना धमक्या दिल्या, त्यांना मानपत्र देण्याचे राजकारण चुकीचे आहे, असे लोकमान्यांनीं उघडपणे प्रतिपादण्यास सुरुवात केली. अर्थात् आता पुण्यातील पक्षभेद हे सामाजिक सुधारणेच्या क्षेत्रांतून निघून राजकारणात शिरू लागले हे स्पष्ट झाले. लोकमान्यांनीं याच सालीं सार्वजनिक सभेंत आपल्या पक्षाचे बहुमत केलें आणि एकटे ना. गोखले वगळून रानडेपक्षाच्या इतर लोकाना तिच्या कार्यकारी-मंडळातून खो दिला

## प्रागतिकांचा वेगळा पक्ष

सार्वजनिक सभा अशा प्रकारें टिळकांच्या राष्ट्रीय पक्षाच्या हातीं गेली आणि तिचे राजकारण नेमस्तपणाने चालणे शक्य नाही हे पाहतांच न्या. रानडे यांच्या सल्ल्याने जुन्या पद्धतीने नेमस्त राजकारण करणारी आणि पेन्शनर-सरदार मंडळींनाहि झेपणारी अशी नवी डेक्कन सभा पुण्यांत १८९६ सालीं अस्तित्वात आली. पुण्यांतील राजकीय कार्य करणारी सार्वजनिक सभा टिळकपक्षाच्या हातीं गेली, हे पाहून अँग्लो-इंडियन वृत्तपत्रांना जितका विषाद वाटू लागला होता, तितकाच आनंद त्याना नेमस्त पक्षाने नवी राजकीय संस्था स्थापन केली हे पाहून झाला! नव्या तरुण पक्षानें आपल्या संस्थेत जर नवा जोम उत्पन्न केला, तर वृद्ध लोकांनीं आपलें जुनें राजकारण चालविण्यासाठीं स्वतंत्र संस्था स्थापन करावी, याचे हिंदी राजकारणातील हे पहिलेच उदाहरण होय देशातील राजकीय संस्था बहुमतानें आपल्या पक्षाच्या हातीं आणण्याचा नव्या तरुण पक्षाचा नैसर्गिक हक्क आहे व तो जुन्या पक्षानें आनंदाने मान्य केला पाहिजे. ज्यांना नव्या पिढीनें निर्माण केलेली वृत्ति पसंत नसेल, त्यांनीं आपल्या राजकारणाचे दिवस संपले म्हणून स्वस्थ बसावें आणि नव्या पक्षाला आपल्या राष्ट्राचे राजकारण आपल्या जबाबदारीवर चालवूं द्यावें अगर नव्या पक्षाला शक्य तितकें साहाय्य करावें पण हे दोन्ही मार्ग सोडून जेव्हा न्यायमूर्तींनीं नवी राजकीय संस्था स्थापन करून बहुमताला न रुचणाऱ्या आपल्या राजकारणास चिरंतन करण्याचा प्रयत्न केला, तेव्हा टिळकांनीं त्यांच्यावर टीकेची झोड उठविली आणि हा "म्हातारचळ कीं पोरखेळ?" असा उघड सवाल टाकिला

टिळकांनीं या वेळीं रानड्यांच्यावर जी टीका केली, तिच्या बुडाशीं एक अत्यंत महत्त्वाचें तत्त्व होतें आणि त्या टीकेंतील भाषा कितीहि कडक असली, तरी ज्या तत्त्वाचा पुरस्कार त्यांनीं या लेखात केला आहे, ते तत्त्व जर हिंदी राजकारणांत पाळिलें गेले असते, तर त्याचे पाऊल एका पिढीने तरी खास पुढे पडले असतें मागील पिढीने स्थापन केलेली राजकीय संस्था पुढील पिढीने बहुमताच्या जोरावर

आपल्या हातीं घेतली असतां जुन्या पिढीनें जर बहुमताच्या निर्णयाला झुगारून आपले राजकारण चिरतन करण्यासाठीं स्वतंत्र राजकीय संस्था काढिल्या, तर राष्ट्रांत एकी राहावी कशी आणि राष्ट्राची शक्ति सघटित होऊन तिचा प्रभाव परकीय सत्तेवर पडावा कसा? न्यायमूर्तींचें त्या वेळचे हे कृत्य राष्ट्रीयत्वाच्या विकासास आणि लोकसत्तेच्या तत्त्वास पूर्णपणे हरताळ फासणारे आणि वाढत्या राष्ट्रवृक्षावर दुहीच्या विषरसाचे सिचन करणारे होते, असे टिळकांना वाटले.

## टिळकांचा वर्धिष्णु क्रांतिवाद

लो. टिळकाचे राष्ट्रीय राजकारण अतिम दृष्टया क्रांतिवादी होते, पण तात्कालिक दृष्टया ते कायदेशीर होते. ते अतिम दृष्टया क्रातिवादी असून त्यांनीं आजन्म कायदेशीर राजकारणच का केलें? याचे उत्तर हिंदुस्थानांतील क्राति राष्ट्रसभेसारखी सामान्य जनतेची प्रातिनिधिक संस्थाच करू शकेल, अशी त्याची खात्री होती हेंच होय तिच्या संघटनेत जोपर्यंत सामान्य जनता सामील झाली नाही व तिच्या राजकारणाला क्रातिवादी स्वरूप देण्याचा काळ आला नाहीं, तोपर्यंत कोणतेहि क्रातिवादी राजकारण यशस्वी होणें शक्य नाहीं, असे त्यांना वाटत होते हेच त्यांच्या कायदेशीर राजकारणातील मर्म होय त्याचे प्रयत्न राष्ट्रसभा ही जनतेची खरी प्रातिनिधिक सस्था कशी बनेल आणि तिचे राजकारण पुरोगामी कसे बनेल, ह्यासाठींच चालू असत ज्याला राष्ट्राचें राजकीय नेतृत्व करावयाचे त्याने एकसारखे पुढं जावे, पण आपल्या पाठीमागून राष्ट्र येत आहे किंवा नाहीं याचे नित्य अनुसधान ठेवावे, असे त्याचें मत होते अर्थात् विशिष्ट काळीं राष्ट्राची तयारी किती झालेली आहे, याबद्दल निरनिराळ्या पुढाऱ्यात मतभेद होणे शक्य आहे, पण या बाबतींत सर्वांनीं बहुमताचा निर्णय मान्य करावा, असा त्याचा आग्रह होता लोकमान्यांनीं आपल्या चाळीस वर्षाच्या सार्वजनिक आयुष्यात या तत्त्वाच्या विरुद्ध आचरण कधींहि केलेलें नाहीं व ज्यानीं ज्यानीं त्याच्याविरुद्ध आचरण केले, त्याच्या त्यांच्यावर त्यानीं अराष्ट्रीय वृत्तीचा आरोप केला आहे न्यायमूर्तींनीं आपल्या अनुयायाना डेक्कन सभा स्थापन करण्याचा जो सल्ला दिला तो केवळ वैयक्तिक अहकारानें दिला नाहीं, त्यांच्याहि अंतःकरणात देशभक्ति होती व त्या देशभक्तीनें प्रेरित होऊनच त्यांनी तो सल्ला दिला असेल, असे त्याच्यातर्फे म्हणणे शक्य व योग्यहि होईल. पण त्याच्या देशभक्तीचा हा मार्ग चुकीचा होता व त्यामुळे राष्ट्रात दुहीचें बीज पेरले जात आहे अशी ज्याची प्रामाणिक समजूत होती, तेहि ही टीका केवळ व्यक्तिस्वार्थाने करीत नव्हते. लो. टिळकाचे राजकारण ज्याना मान्य आहे, त्याना ही टीका फार तर अधिक कडक आहे असे म्हणतां येईल, पण ती तत्त्वप्रेरित होती व त्या महत्त्वाच्या तत्त्वाचे त्यानीं आजन्म उल्लघन केलें नाहीं, इतका त्यांचा त्या तत्त्वावर विश्वास होता, असेच ते म्हणतील.

## राष्ट्रीय उत्सवाचा उपक्रम

असो याप्रमाणे पुण्यात दोन स्वतंत्र राजकारणांचा उदय १८९५-९६ सालीं उघडपणे होऊन सार्वजनिक सभा नव्या पक्षाने काबीज केली लो टिळकांनीं या वेळी आपल्या राजकारणांत शक्ति निर्माण करण्यासाठीं गणपति-उत्सवाला १८९४ सालीं सार्वजनिक स्वरूप दिले व १८९५ मध्ये शिवाजी-उत्सवहि साजरा करण्यास प्रारंभ केला. अशा प्रकारे लोकांतील धर्मभावना आणि ऐतिहासिक विभूतीबद्दलची पूज्य भावना याचा पाठिंबा आपल्या राजकारणास देण्याचे प्रयत्न त्यांनीं चालविले. लोकांत ज्या वेळीं नवी राष्ट्रीय भावना जोरकस बनली नव्हती, अशा वेळीं या उत्सवांच्या रूपाने तिचे खोल बीजारोपण लोकांच्या अंत:करणात करण्याचा हा प्रयत्न होता राष्ट्रसभा जे कार्य करीत होती, त्या कार्याचा सामान्य जनतेत व्यापकपणे फैलाव करण्याची ही खटपट होती "ज्याप्रमाणे आम्ही आपल्या वडिलांचें स्मरण कायम ठेवून त्याच्यायोगें आपल्या घराण्याचा पूर्वापार चालत आलेला लौकिक राखण्याचे एक साधन करून ठेवितो, तद्वतच राष्ट्रातील महापुरुषाचे स्मरण हें राष्ट्रीयत्व कायम राखण्यास एक चांगलें साधन आहे एकराष्ट्रीयत्व म्हणजे कांहीं दृश्य पदार्थ नव्हे ही एक प्रकारची कल्पना असून ती सतत जागृत ठेविली तरच ती टिकण्यासारखी आहे, व ज्या ज्या राष्ट्रांनीं ती कायम राखिली आहे त्यांनीं आपल्या ऐतिहासिक थोर पुरुषांच्या इतिहासाची या कामीं योग्य मदत घेतली असे थोड्या विचारांतीं कोणाच्याहि लक्षात येईल श्रीशिवछत्रपतिमहाराजाचे चरित्र अशाच प्रकारचे होय महाराष्ट्रांतील निरनिराळया जातींचे प्रेम एकाच ठिकाणीं बसण्यासारखे जर कोणतेंहि स्थळ असेल तर त शिवछत्रपतींचे चरित्र हेच होय, हे शिवछत्रपतींचा उत्सव करणाऱ्या सर्व लोकांनीं नेहमीं ध्यानांत बाळगावयास पाहिजे या उत्सवात मराठे आणि ब्राह्मण, ब्राह्मण अगर परभू अशा प्रकारचा कोणताहि भेद ठेवणे अगदीं गैरशिस्त आहे यंदाचे उत्सवांत एक-दोन ठिकाणीं असला प्रकार झाल्याचे ऐकिवात आहे, व ही जर गोष्ट खरी असेल तर वेळींच तिचा बींमोड केला पाहिजे"*

गणपत्युत्सव करण्यातहि लोकमान्याचा राष्ट्रीय व विशेषतः राजकीय जागृति करण्याचाच उद्देश होता हे सर्वप्रसिद्ध आहे 'राष्ट्रीय महोत्सवाची आवश्यकता' या आपल्या लेखांत इ स १८९६ च्या १ सप्टेंबरच्या अंकात लोकमान्य लिहितात : "पाश्चिमात्यात धर्म हा समाजाकरिता आहे व समाज मात्र धर्माकरिता नव्हे, असें मानण्याकडे विशेष कल असल्यामुळे राष्ट्रीय महोत्सवातील धर्मश्रद्धेचा भाग लुप्त होत जाऊन नवीन प्रकारचे राजकीय किंवा औद्योगिक महोत्सव उत्पन्न होऊ लागले आहेत, हे त्याच्या पालटलेल्या स्थितीला धरूनच आहे आमच्याकडे धर्म हा नेहमीं श्रेष्ठ पदावरच राहणार, तेव्हा आमचे महोत्सव पुष्कळ अशीं धर्ममूलकच

---

* लो टिळकाचे केसरीतील लेख, भाग १ ला, पृ ५३२.

असणार आमच्या या धर्मश्रद्धेपासून उत्पन्न होणाऱ्या महोत्सवांचा फायदा आम्ही पाश्चिमात्याप्रमाणेंच घेत होतो. ह्या उत्सवाचे वेळीं लोकाची धर्मबुद्धि जागृत करून नैतिक, सामाजिक व राजकीय शिक्षण आबालवृद्धास सहजगत्या देण्यांत येत असे .. रामनवमीचे महोत्सव करणारे मठ कमींत कमी शेंसव्वाशे रामदासस्वामींनीं महाराष्ट्रात स्थापिले होते त्याच राष्ट्रीय महोत्सवांमुळे महाराष्ट्रांतील धर्मबुद्धि त्या वेळीं जागृत झाली 'शिवरायासि आठवावे', 'मराठा तितुका मेळवावा', 'महाराष्ट्र-धर्म वाढवावा' असलीं उदात्त वाक्ये महोत्सवामुळेच महाराष्ट्रातील आबाल-वृद्धाच्या तोंडीं त्या वेळीं बसून गेलीं तीं गेलीं; व त्यांचा परिणाम असा झाला, कीं औरंगजेब दक्षिणेत प्रचड सैन्यासह उतरला असता स्वधर्मरक्षणार्थ रांगणारीं पोरेहि युद्ध करण्यास तयार झाली आहेत कीं काय असे त्यास वाटण्याइतका महाराष्ट्र देश तयार झाला आमच्या देशातील स्थानिक जत्रांचा, स्थानिक उत्सवांचा, त्या त्या प्रमाणे राष्ट्रावर कमी-जास्ती परिणाम होतच असे. पूर्वीच्या जत्रा म्हणजे राष्ट्रांतील धार्मिक, औद्योगिक व सामाजिक चळवळीचीं जंगी प्रदर्शनेच होत ह्याच किरकोळ जत्रांना व ह्याच लहान उत्सवाना चांगल्या लोकाचे पाठबळ मिळाल्यावर त्यापासून लोकांना अतिशय फायदे होणारे आहेत"* "राष्ट्रीय सभेइतके हे काम दगदगीचे व खर्चाचेहि नाहीं असे असूनहि राष्ट्रीय सभेच्या हातून जी कामगिरी बजावणें अशक्य आहे, ती कामगिरी महोत्सवाच्या द्वारे सुशिक्षित लोक सहज बजावू शकतील मोठ्या जत्राना प्रचंड सभांचें स्वरूप आम्हीं का देऊ नये? तुमच्या राजकीय चळवळीचा प्रवेश खेड्यापाड्यातील झोपडींतहि अशा प्रकाराने व्हावयाचा नाही काय? बहुत श्रमाने तुम्हीं पैदा केलेले नैतिक व धार्मिक ज्ञान, लिहिता-वाचतां न येणाऱ्या खेड्यापाड्यातील तुमच्या बधूंस तुम्हीं सुलभ उपायाने करून दिले, असे होणार नाही काय? हिदू लोक काहीं कैदी नाहींत, हिंदू लोक जिकलेले असले तरी गुलाम नव्हेत, तेव्हां ते महोत्सवांचा दिवस आनदांत घालविणारच जत्रा असेल त्या ठिकाणीं आपोआप जमणारच अशा वेळीं आपली खरी स्थिति काय आहे, याचें ज्ञान लोकसमूहाला सुशिक्षितांनीं का करून देऊ नये? सरकार करीत असलेल्या जुलुमाची आठवण त्या वेळीं लोकांना शहाणे म्हणविणाऱ्या मंडळींनीं कां करून देऊं नये? अथवा सर्वात धर्मबुद्धि जागृत करून आमच्या राष्ट्रीयत्वास कां बळकटी आणूं नये? आमच्या पूर्वजानीं आमच्याकरिता ह्या महोत्सवांच्या सार्वजनिक सस्था उत्पन्न करून ठेविल्या आहेत, पण वाढलेलें अन्न जेवण्याइतकेहि आमच्यांत सामर्थ्य उरले नाहीं ना? राष्ट्रीय सभेला, आमच्या धर्मव्याख्यानांना जमावे तितके लोक जमत नाहींत म्हणून आम्ही हाका मारतों, पण लोक जमतात त्या ठिकाणीं आम्हाला कोठे जावयाला पाहिजे? देव देतो पण कर्म नेते, अशांतली आमची स्थिति झाली आहे. लोक एका ठिकाणीं जमण्याचे प्रसंग पूर्वजांनीं आयते तयार करून ठेविले, पण

* किता, पृ ५६३–५६५.

सुशिक्षित मंडळींना हे प्रसंग असून नसल्यासारखेच आहेत आम्ही शिकलेले ही त्यांना ऐट आहे ना! लोकांत कसें मिसळावे? ह्यांना मोठी पचाईत पडते ती हीच. 'पर्वत महमदाकडे गेला नाहीं तर महमदाने पर्वताकडे जावें,' हे तत्त्व आमच्यांतील कांहीं वृद्ध-तरुण मंडळी पुष्कळदां घोकून-शिकून झाल्यावरहि विसरतात"*

## दुष्काळांतील चळवळी

१८९६ च्या नोव्हेंबर-डिसेंबरपासून पुण्याच्या सार्वजनिक सभेपुढे दुष्काळाचा फार मोठा प्रश्न येऊन उभा राहिला आणि या वेळीं शेतकरी लोकाना शक्य तितकी सारातहकुबी आणि माफी मिळवून देण्याबद्दल शेतकरीवर्गांत जागृति करावयाची असा निर्धार लोकमान्यानीं केला या वेळच्या दुष्काळाचें स्वरूप १८७६–१८७७ सालच्या दुष्काळाप्रमाणेच भयंकर असले, तरी या वेळच्या व त्या वेळच्या परिस्थितींत एक फार मोठे अंतर पडले होते, तें म्हणजे १८७६ च्या दुष्काळानंतर सरकारनें 'फॅमिन रिलीफ कोड' तयार करून व 'फॅमिन रिलीफ फंड' करून दुष्काळात लोकांना कशी मदत द्यावी, कोठें व केव्हां सारासूट व तहकुबी द्यावी, वगैरेसंबधीं नियम करून आणि एक प्रकारें रयतेचा विमा उतरून दुष्काळामुळें रयतेवर उपाशी मरण्याची पाळी येऊं नये, हे पाहण्याची जबाबदारी आपणावर घेतली होती

अशा प्रकारे लोकमान्यांनीं सरकारने दिलेल्या अभिवचनाच्या आणि कायद्यानें घेतलेल्या जबाबदारीच्या आधारावरच शेतकरी लोकात आपल्या हक्कांची जाणीव उत्पन्न करून सरकारशीं कायदेशीर रीतीनें कसे भांडावें आणि कायद्याने आपणांस दिलेले हक्क आपल्या पदरांत कसे पाडून घ्यावेत, याचे शिक्षण देण्याचे कार्य सुरू केलें या कामासाठी थोड्याच दिवसात सार्वजनिक सभेचे प्रचारक गावोगावीं जाऊन जागृति करू लागले आणि तुमच्या अगीं ऐपत नसेल व पीक भरपूर आलें नसेल तर सारा भरू नका, अशा परिस्थितीत सारा न भरल्यास तुमची जमीन किंवा जनावरे विकण्याचा हक्क सरकारी अधिकाऱ्याना नाहीं, असे खेडोपाडीं जाऊन सांगूं लागले. केसरीच्या प्रत्येक अंकांतून यासबधीं मोहीम सुरू झाली तेव्हां सरकारी अधि-काऱ्यानी ओरड सुरू केली आणि ॲंग्लो-इंडियन पत्रकारांनीं टिळकांनीं आयर्लंडांतील पार्नेलप्रमाणे हिंदी शेतकऱ्यात खडबंदीची चळवळ सुरू केली आहे, अशी हाकाटी पिटली

## दंडपशाहीची दहशत

दिवसेंदिवस शेतकऱ्यांतील चळवळ फोफावू लागली आणि अधिकाऱ्यांची दांडगाई व दहशतबाजी वाढूं लागली लोकांतहि धैर्य येऊं लागलें आणि सार्वजनिक

* किता, पृ ५६९

सभेच्या प्रचारकांच्या सभांना हजारो शेतकरी हजर राहून आपले हक्क समजून घेऊं लागले. " पोलिसांच्या पेटलेल्या बदुकीच्या टप्प्यात भरलेली रयतेची जगी सभा " या लाबलचक पण जनतेच्या उत्साहाला व शौर्याला येणाऱ्या भरतीच्या निदर्शक अशा मथळ्याच्या केसरींतील लेखात लोकमान्य लिहितात :

" पुणें-सार्वजनिक-सभेनें पाठविलेले मुखत्यार-एजट ठिकठिकाणीं जाऊन लोकास फॉमिन रिलीफ कोडातील कलमें समजावून देऊन त्याप्रमाणे वागण्याची रयतेस सूचना व शिफारस करीत आहेत ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे तथापि, अमल चालविण्याची सरकारी अधिकाऱ्यास नेहमीच सवय लागल्यामुळे त्यांनीं काही ठिकाणी दाडगाई चालविली आहे असे जुन्नर, करमाळे, सोलापूर, वगैरे ठिकाणच्या पत्रावरून दिसून येईल, पण असल्या **दांडगाईस आम्ही जुमानतां कामा नये.** हे दिवस दाडगाईचे नाहींत, कायद्याचे आहेत, हे रयत व सरकारी अंमलदार या दोघानीं लक्षात ठेवले पाहिजे अमुक आणे पीक बुडाल्यास साऱ्याची तहकुबी अगर माफी मिळेल असा जर कायदा आहे, तर सरकारी अधिकाऱ्यानीं लोकांस ती माफी अवश्य दिली पाहिजे व लोकानींहि ती निश्चयाने पण शाततेने आग्रहपूर्वक मागून घेतली पाहिजे. जगलाची व्यवस्थाहि याचप्रमाणें होय जंगले सरकारनें खुलीं केलींच आहेत, करिता त्यात गुरे सोडावयास आता कोणाचीहि भीति नाहीं कायदेशीर रीतीने सरकाराशीं भाडावयास कसे शिकवावे ही विद्या आमच्या पुढारी लोकास शिकावयाची आहे व ती जेव्हा ते शिकतील, तेव्हाच सरकारी अधिकाऱ्यांचा उर्मटपणा उतरेल व रयतेस काहीं फायदा होईल.. **कायदा करण्याचे काम सरकारचे आहे, पण त्याची अंमलबजावणी करून घेणे ही आमच्या हातांतली गोष्ट आहे** व त्याकरिता शभरदा नाहीं हजारदा ओरडावयास लागले तरी ते आम्ही केले पाहिजे लक्षांत ठेवा, की **हे राज्य कायद्याचें आहे, दांडगाईचें नव्हे** भांडणें झाले तरी कायदेशीर रीतीने भाडावयास पाहिजे, तसे आपण भांडू तेव्हांच आपणास काहीं हक्क मिळतील असो या गोष्टीचे प्रत्यक्ष उदाहरण ता १३ रविवार रोजीं उबरगाव पेट्यात खत्तलवाड येथे सुमारे दोन हजारांवर कोळी, वारली आणि पांढरपेशे लोकाची जी जंगी सभा झाली तेथे घडून आलें ठाणें जिल्ह्यातील कोळी, वारली वगैरे लोक एके ठिकाणी जमून दगा करितात अशी सरकारची समजूत झाल्यामुळें या सभेस महालकरी, पोलीस, फौजदार आणि मि दुबोले असिस्टट कलेक्टर हे स्वत. हजर होते व बदुका भरून पोलिसानीं गराडा दिला होता मनात हेतु, कीं कोणी एकादा शब्द चुकून बोलला किंवा काही थोडीशी गडबड केली कीं गोळी घातलीच ! अशा परिस्थितींत सभा कशी काय पार पडते, याची सर्वांस मोठी काळजी होती पण सार्वजनिक सभेच्या दुष्काळ कमिटीचे सेक्रेटरी प्रो साठे हे येथून मुद्दाम त्या सभेकरिता तेथे गेले होते त्यानीं असिस्टट कलेक्टरासमोर " तुमची पिके बुडालीं असलीं तर तुम्ही सरकारास सारा देऊ नका " असे

त्रिवार लोकांस समजून सांगितले किंबहुना, लोकांस गोळ्या घालण्याच्या तयारीनें जे पोलिस आले होते, त्यांचीच प्रो साठे याचें तीन तास चाललेले अस्खलित भाषण शांततेने लोकांनी ऐकण्याचे कामीं चांगली मदत झाली, असे म्हटले तरी चालेल "*

अशा परिस्थितींत तालुक्यांतील पुढाऱ्यांचे कर्तव्य समजावून देतांना लोकमान्य लिहितात: " दरएक गावात किंवा तालुक्यात कमिटी करून पुढाऱ्यानीं करावयाचीं कामें बरींच आहेत व तीं सर्व अशीं आहेत, कीं सुशिक्षित लोकांच्या मदतीखेरीज गरीब रयतेस यावयाचीं नाहीत. तीं कामें खालीं लिहिल्याप्रमाणें: (१) दर तालुक्यास निदान एक तरी रिलीफ वर्क व एक तरी अन्नसत्र आहे कीं नाहीं ते पाहणें व नसल्यास मागून घेणे (२) रिलीफ वर्कवर जे लोक कामास जातात त्यास मजुरी अगर शिधा बरोबर मिळतो कीं नाहीं, त्याची चौकशी ठेवून त्याच्याकडून अर्ज करवून त्यांची दाद लावून घेणें (३) पीक बहुतेक बुडालें असल्यास साऱ्याच्या तहकुबीबद्दल व माफीबद्दल अर्ज करविणे. ज्यांस ऐपत नाहीं, त्यांजवळून दुष्काळाचे सालीं तरी सारा घेऊ नये असे फॅमिन कोडांत स्पष्टपणें सांगितले आहे (४) दरएक गांवांत गायरान अगर कुरण आसपास असेल, ते सुटले कीं नाहीं ते पाहणे व नसल्यास . ... अमुक कुरण आपणांस मोकळें सोडा असे गांवकऱ्याकडून अर्ज करविणें (५) आपल्या तालुक्यात अगर गावात कमिशनर, कलेक्टर वगैरे जे अधिकारी जातील त्यास रयतेची खरी स्थिति कळवून देणें (६) कोष्टी, विणकर वगैरे लोकास फॅमिन कोडाप्रमाणे मदत मिळते कीं नाही याची चौकशी करून त्याप्रमाणें सरकारास अर्ज करणे (७) जनावरांची गांवचे गावांत सोय होण्यासारखी नसल्यास त्यांस मामलेदारामार्फत इतर जिल्ह्यातील सरकारी जंगलांत पाठविण्याची तजवीज करणे. येणेप्रमाणे कामें आहेत

" हीं कामें थोडीबहुत करण्याचा उद्योग करील, त्यावर अधिकाऱ्याची थोडीबहुत गैरमर्जी होईल व जुन्नरास परवा एका शहाण्या असिस्टंट कलेक्टराने ज्याप्रमाणे काही जणावर फिर्याद केली, तशीहि फिर्याद करण्यास कांहीं अधिकारी मागेपुढें पाहणार नाहींत पण असल्या गोष्टीस आतां भिऊन उपयोगाचें नाहीं, किंबहुना, योग्य रीतीने रयतेच्या पोटाकरिता भाडत असता एकाद्यास तुरुगांत जाण्याचा जरी प्रसंग आला तरी हरकत नाहीं; पण ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांनीं या वेळीं मनापासून झटलेच पाहिजे, असे त्यास आग्रहपूर्वक आमचें सांगणें आहे हे राज्य कायद्याचे व ओरडीचे आहे. कायदा सरकारने केला आहे, ओरड करण्याचें काम आमचे आहे व ते जर आम्हीं नीटपणे केले नाहीं, तर त्याचा सर्व दोष आमच्या माथीं येणार आहे "§

अशा रीतीनें शेतकरी जनतेंत सरकारी कायद्याच्या आधारे चळवळ जोरांत सुरू झाली, तरी तींत चळवळ करणारांवर खटले होणार हे निश्चितच होते त्याप्रमाणे १८९६ च्या डिसेंबरांत सार्वजनिक सभेच्या प्रचारकावर व इतरावर खटले

* किता, पृ ५८८-९०    § किता, पृ ५९५-९६

भरण्यात आले त्यात प्रो. अच्युतराव साठे व श्री दत्तोपंत आपटे यांच्यावर कुलाबा जिल्ह्यांत आणि ठाणें जिल्ह्यांत उंबरगांवचे परांजपे, कारुळकर व पिंपुटकर यांच्यावर खटले झाले. त्यांपैकीं फक्त श्री दत्तोपंत आपटे यांस एक वर्षाची साधी कैद आणि दोनशें रुपये दंड अशी शिक्षा झाली. बाकीचे सर्व लोक सुटले

अशा प्रकारे सार्वजनिक सभेचे कार्य जोरांत चालू असता १८९७ च्या मार्चमध्ये तिच्या एका एजटानें काढलेल्या पत्रकांत कांहीं निराधार मजकूर छापला, या सबबीवर सरकारनें या सभेने केलेल्या अर्जांचा आम्ही विचार करणार नाहीं असा ठराव करून तो सभेला कळविला अर्थात् यामुळे सभेच्या कार्यांत खंड पडण्याचे काहींच कारण नव्हते. लोकमान्यांनीं त्यावर लिहिलें : " हंसावर ब्रह्मदेव रागावले तर काय करणार ? कमळाच्या वनातून त्यास हांकून देणार, पण दूध आणि पाणी निराळें करण्याची जी हंसाच्या अगांत शक्ति आहे, ती काढून घेण्याचें सामर्थ्य त्याच्या अगात नाहीं ! हाच न्याय प्रस्तुत ठिकाणीं लागू आहे लोकास आपले हक्क समजावून देणें व आपली दुःखें सरकारास कळवून तीं निवारण करून घेण्यास त्यास सागणे अथवा त्याचीं दुःखें सरकारापुढे माडणें, यात वरील प्रकारच्या ठरावानें कोणत्याहि प्रकारची हरकत येत नाहीं सभेनें केलेला अर्ज केराच्या टोपलीत टाकणे किंवा त्याचा विचार करणे हे सरकारचे काम आहे व ते त्यास पाहिजे तसे करतील .. सभेचे काम सभा करीत राहीलच " हे म्हणणे अगदीं बरोबर होते आतां रयत जागी होऊन तीच सरकारकडे दाद मागू लागल्यामुळे आणि सभेने तिला जागी करून एक प्रकारे सरकारच्या जुलुमाचा प्रत्यक्ष प्रतिकारच करण्यास शिकविण्याचे धोरण अगीकारिल्यामुळे सार्वजनिक सभेला सरकारने मान्यता दिली किंवा न दिली, याला फारसे महत्त्व नव्हतें ज्या संस्थेला लोकांची मान्यता आहे आणि जिचे लोकावर वजन आहे, तिचे म्हणणे ज्याना राज्यकारभार करावयाचा आहे त्याना राज्यकारभाराच्या सोयीसाठी म्हणून तरी विचारात घ्यावेच लागते लोकात प्रत्यक्ष प्रतिकाराची शक्ति वाढू लागल्यानतर आम्ही तुमच्या सभेला किंवा पुढाऱ्याला मानीत नाहीं हे सरकारचें म्हणणे अखेरीस पोरकटच ठरते, व तसाच हा सरकारचा ठराव पोरकट आहे असे लो. टिळकांनीं लिहिले आता सरकारमान्यतेच्या युगातून सार्वजनिक जीवन लोकमान्यतेच्या युगात जाऊ लागलें होते !

## स्वदेशीची चळवळ

अशा प्रकारे १८९६-९७ सालीं खेड्यातील रयतेत प्रत्यक्ष प्रतिकाराची पण कायद्याच्या मर्यादेतील चळवळ चालू असतां शहरांतील मध्यमवर्गात सरकारी जुलुमी कायद्याचा प्रत्यक्ष प्रतिकार करण्याची स्वदेशीची चळवळ लोकमान्य संघटित करीत होते. १८९६ सालीं सरकारने विलायतेंतून येथे येणाऱ्या सुतावरील जकात काढून टाकली आणि विलायतेंतून इकडे येणाऱ्या कापडावर आणि येथील गिरण्यात

निघणाऱ्या सर्व प्रकारच्या कापडावर शेंकडा पाचाऐवजीं शेकडा साडेतीन जकात बसविली. मँचेस्टरच्या कापडाला उत्तेजन देण्यासाठीं आतां गरीब लोकांना लागणाऱ्या देशी जाड कापडावरहि साडेतीन टक्के जकात बसविली, हा यांत नवा अन्याय होता आतांपर्यंत विलायतेतून इकडे येणाऱ्या कापडावर व सुतावर शेंकडा पाच जकात होती पण देशी सुतावर व कापडावर जी जकात होती ती फक्त २० नंबरच्या वरील सुतावर व कापडावरच होती पण आतां खालच्या नबरच्या जाड सुतावरहि शेंकडा साडेतीन जकात बसली आणि वरील नबरच्या देशी, विलायती सुतावरील व कापडावरील जकात पाचावरून साडेतीन टक्क्यावर आली यामुळे विलायती गिरणीवाल्याना जाड कापडाच्या बाबतींतहि स्वदेशी गिरणीवाल्याशीं चढाओढ करतां येऊ लागली आणि तलम कापड वापरणाऱ्या श्रीमतांवरील कर कमी होऊन स्वदेशी जाड कापड वापरणाऱ्या गरिबांवर नवा कर बसला या अन्यायी कायद्याचे परिणाम सागून नतर लोकमान्य टिळक म्हणतात: “ सर्व लोकांस आमची आग्रहपूर्वक अशी विनति आहे, कीं त्यांनीं आपल्या हातून या अन्यायाचा होईल तितकें करून प्रतिकार करण्यास झटले पाहिजे हिंदुस्थान सरकारच्या कायदेकौन्सिलांतील सभासद आपणास अनुकूल असते, तर ठीकच झालें असतें, पण ते अनुकूल नाहींत म्हणून रडत बसण्यात कांहीं हशील नाहीं सरकारनें जरी अन्याय केला, तरी त्याचा प्रतिकार करणे काहीं अशीं तरी तुमच्या स्वाधीन आहे तो प्रतिकार कोणता म्हणाल, तर सर्वांनीं देशी कपडा वापरावयास लागावे हा होय. मुंबईच्या सभेंत शेट वसतजी खिमजी यांनीं अशाच अर्थाची सूचना केली, तेव्हां सर्वांनीं मोठ्या आनदानें टाळ्या वाजवून तीस आपली संमति दिली पुणें, सातारा, नगर आणि उमरावती ह्या ठिकाणीं लोकांच्या सभा भरून देशी कपडा वापरण्याचे ठराव मंजूर करण्यात आले आहेत, व इतर ठिकाणचे लोक ह्यांचे अनुकरण करतील अशी आम्हांस उमेद आहे जोपर्यंत तुमच्या अंगांत अशा रीतीनें प्रतिकार करण्याची शक्ति आली नाहीं, तोपर्यंत तुमच्या अर्जास अथवा कायदेकौन्सिलात तुमच्या प्रतिनिधींच्या भाषणास अगर युक्तिवादास कोणीहि भीक घालणार नाहीं यापेक्षां जास्त लिहिणे अशक्य आहे ”* स्वदेशीची कल्पना लोकहितवादींच्या काळाइतकी जुनी असून सार्वजनिक काकानीं त्याप्रीत्यर्थ सुमारे वीस वर्षापूर्वी संघटित चळवळहि केली होती पण कायदे-कौन्सिलातील प्रतिकारापेक्षां अधिक प्रभावी अशी ही प्रत्यक्ष प्रतिकाराची शक्ति लोकांजवळ आहे आणि तिचा पाठिंबा असल्याखेरीज सरकार आमच्या युक्तिवादाचा विचारहि करण्याचा संभव नाहीं, ही राजकीय दृष्टि या प्रतिपादनांत नवी आहे. आपल्या मागणीपाठीमागे लोकसघटनेची शक्ति पाहिजे आणि या लोकसघटनेसाठीं लोकांत व पुढाऱ्यात स्वार्थत्यागाचे व धैर्याचें बल जागृत असलें पाहिजे ही विचार-सरणी राष्ट्रसभेच्या राजकारणांत प्रविष्ट करण्याचे पहिले श्रेय लो टिळकाना आहे या

* कित्ता, पृ ५१०-१२

नव्या शक्तीचा जन्म १८९६-९७ सालीं शहरातील मध्यमवर्गांत स्वदेशी चळवळीच्या रूपाने आणि खेड्यांतील शेतकऱ्यांत दुष्काळ-निवारणाच्या चळवळीच्या रूपानें होत होता व ती शक्ति सघटित करून, तिची जोपासना करून, तिच्या आधारावर सरकारी सत्तेला शह देण्याचे अत्यत महत्त्वाचे कार्य लोकमान्य टिळक महाराष्ट्रांत करीत होते. अशा प्रकारचें कार्य त्या वेळीं सर्व हिंदुस्थानांत कोठेंच चालू नसून ज्यांच्या हातीं राष्ट्रसभेचीं सूत्रे या वेळीं आलीं होतीं, त्या मुंबईच्या मेथा-वाच्छादि पुढाऱ्यांना या स्वार्थत्यागी प्रतिकारशक्तीचें महत्त्व कधींच समजलें नाहीं, हे दुर्दैव आहे मि. वाच्छा यानीं या वेळीं पुढे येऊन सर्वांनीं देशी कापड वापरण्याच्या शपथा घेतल्यास त्यांना पुरण्याइतके देशी कापड या देशांत पैदा होणे शक्य नाहीं, असा युक्तिवाद पुढे आणिला! त्याला उत्तर म्हणून लोकमान्य लिहितात :" देशी कापड सर्वांनीं निश्चय केल्यास आज वापरावयास मिळेल असें नाहीं ; पण सर्वांचा निश्चय तरी आज कुठं आहे? मि वाच्छा यांची जी चूक आहे ती येथेच ते म्हणतात, कीं देशी कापड वापरण्याचा निश्चय करण्यास सांगून कांहीं उपयोग नाहीं पुष्कळ लोकांनीं असा निश्चय केल्यास देशी मालाचे गिऱ्हाईक वाढून तो माल उत्पन्न करण्यास उत्तेजन येईल, हा अर्थशास्त्राचा सिद्धान्त मि. वाच्छा हे नाकबूल करीत नाहींत व तो इतका उघड आहे, कीं तो त्यास नाकबूल करतांहि यावयाचा नाहीं तेव्हां त्यांनीं असा प्रश्न काढला आहे, कीं या उपदेशापासून जर आजपर्यंत फायदा झाला नाहीं, तर पुढे तरी कसा होणार? मि वाच्छा यांचा प्रश्न पाहून खरोखरच आम्हास आश्चर्य वाटले कारण ते आजपर्यंत असे पुष्कळ उद्योग करीत आले आहेत, कीं ज्यापासून आतांपर्यंत कांहीं फायदा झाला नाहीं ... आधीं, देशी कापड वापरण्याचा सार्वजनिक सभेच्या काकांनीं काढिलेल्या चळवळीपासून कांहीं एक फायदा झाला नाहीं, हे म्हणणेच मुदलांत चुकीचे आहे फायदा व्हावा तितका झाला नसेल असे म्हटले, तर ते आम्ही कबूल करूं, पण मुळींच झाला नाहीं हे म्हणणे आणि कॉंग्रेस आणि कॉन्फरन्स यांपासून कांहीं एक उपयोग झाला नाहीं असे जे कित्येक कॉंग्रेस-द्वेष्टे म्हणतात तें प्रतिपादन करणे, ह्या दोन्हीहि गोष्टी सारख्याच चुकीच्या, दुराग्रहाच्या आणि असत्यपणाच्या आहेत देशी कापड वापरणे ही जर चांगली गोष्ट असेल, तर तिच्याबद्दल कळकळ व अभिमान लोकांत उत्पन्न करणे ही देशाभिमानाचीच एक गोष्ट आहे असे मानिले पाहिजे व त्यासाठीं जर सार्वजनिक सभा उद्योग करण्यास तयार आहे, तर त्याकरितां सभेस नांवे ठेवणें हे अत्यंत अनुचित होय "* दुर्दैवाची गोष्ट आहे, कीं पुढें लोकमान्यांच्या मृत्यूनंतर म गांधींनीं खादीची चळवळ काढिली, तेव्हांहि मि वाच्छा यानीं केले तसे युक्तिवाद 'खादीविरुद्ध' केसरींतून येऊं लागले! सर्वांनीं खादी वापरण्याचे व्रत घेतल्यास खादीची निपज वाढाविणें जितके सुलभ आहे, तितके देशी गिरण्या स्थापणें सुलभ नाहीं हे ज्यांच्या लक्षांत येईल, त्यांना मि वाच्छा

* कित्ता, पृ. ५२६-२७.

यांचा आक्षेप जितका स्वदेशी गिरणीच्या कापडास लागू पडतो तितका 'खादी'ला लागू पडत नाही हे दिसून येणार आहे म्हणजे हा आक्षेप खादीविरुद्ध आणणाराचें अज्ञान अधिकच व्यक्त होतें पण लोकांतील वाढत्या देशभक्तीच्या, स्वार्थत्यागाच्या आणि स्वावलंबी वृत्तीच्या संघटनेवर ज्याचा विश्वास नाही, ते तेच तेच आक्षेप अशा चळवळींवर आणणार आणि ज्यांचा या प्रकारच्या लोकसंघटनेवर विश्वास आहे व तिचा प्रभाव ज्यांना पटला आहे, ते लोकसंघटनेची शक्ति वाढविण्यासाठीं त्या आक्षेपाना तींच उत्तरें देऊन ते आक्षेप खोडून काढणार ! 'खादी' किंवा 'स्वदेशी' या चळवळी केवळ आकडेमोडीच्या निर्जीव अर्थशास्त्राच्या नसून वाढत्या देशभक्तींतून निर्माण होणाऱ्या लोकातील प्रत्यक्ष प्रतिकारशक्तीच्या संघटनेच्या या गोष्टी आहेत या प्रतिकारशक्तीचा प्रभाव आणि तिचे माहात्म्य ज्यानीं राष्ट्रनिर्मितीची कला हस्तगत केली आहे, अशा लोकमान्याना किंवा महात्मा गांधींनाच कळू शकतात राष्ट्रसभेच्या पहिल्या पिढीला ते माहात्म्य कधींच समजले नाही व ते पटवून देण्यासाठीं लोकमान्यांना तिच्या जुन्या पुढाऱ्यांशीं आजन्म झगडावे लागलें. या प्रतिकारशक्तीचा जन्म महाराष्ट्रात या वेळीं झाला

## कसोटीची वेळ

लोकात निर्माण होणारी ही प्रतिकारभावना या वेळीं अगदीं बाल्यावस्थेत होती व या बाल्यावस्थेस अनुरूप असे तिचे स्वरूप कित्येक वेळां उच्छृंखलहि होत असे लोकमान्याना हे उच्छृखलत्व दिसलें, तरी त्यानीं त्यामुळे आपल्या प्रतिकारशक्तीच्या वाढीच्या कार्यात खंड पडू दिला नाहीं अशा गोष्टी अपरिहार्य आहेत असे मानून ते आपले कार्य नेटानें पुढे चालवीत असत लोकांत प्रतिकारशक्ति जागृत होत आहे हे पाहूनच त्याना आनंद होत असे आणि उच्छृंखलपणाला आळा घालून तिच्यावर प्रभावी संघटनेचे नियंत्रण व आवरण घालण्याचा ते प्रयत्न करीत असले, तरी लोकांचा उत्साहभंग करणे किंवा लोक उत्साहातिरेकाने काहीं प्रमाद करतील म्हणून त्याच्या उत्साहाला भरतीच न आणणे, असलें धोरण त्यानीं कधीं स्वीकारले नाहीं. आपली चळवळ प्रस्तुत परिस्थितींत कायद्याच्या बंधनातच राहिली पाहिजे, असा त्यानीं आपल्या बुद्धीचा निर्णय केला होता व त्या मर्यादेत राहून लोकांत जितकी प्रतिकारशक्ति निर्माण होणें शक्य आहे तितकी ते करीत होते. या धोरणानें वागण्यातच भावी हिंदी स्वराज्य निर्माण करणारी शक्ति जन्मास येत आहे व हिंदुस्थानांत याच शक्तींतून स्वराज्य स्थापन होणार असल्यानें तें लोकशाही स्वरूपाचेंच असणार, याबद्दल त्यांना संशय नव्हता आपण निर्माण करीत असलेली शक्ति आज ना उद्या राष्ट्रसभेत बहुमताच्या जोरावर आपणांस प्रविष्ट करणे शक्य आहे असा त्यांचा आत्मविश्वास होता आणि राष्ट्रसभेने या शक्तीचा अवलंब व सत्कार केल्याखेरीज तिचें राजकारण यशस्वी होणार नाहीं, अशीहि त्यांची खात्री होती. पण राष्ट्रसभेला

ही गोष्ट करावयास लावणें हेच आपले कर्तव्य आहे, असें ते समजत राष्ट्रसभेचा त्याग करून आपलें राजकारण स्वतंत्रपणे चालविण्याचा विचार त्यांनीं कधींहि आपल्या मनास शिवू दिला नाहीं कारण हिंदुस्थानला स्वराज्य मिळणार, ते राष्ट्रसभेसारख्या सस्थाच मिळवून देतील व त्याच हिंदी राजकारणाला प्रत्यक्ष प्रतिकाराचे किंवा क्रांतिवादी स्वरूप देऊ शकतील, अशी त्यांची श्रद्धा होती ते क्रांतिवादी असले, तरी त्यांचा क्रांतिवाद वर्धिष्णु असून सामान्य जनतेच्या प्रतिकारसामर्थ्यावर तो उभारलेला होता तिचे सामर्थ्य वाढेल त्या मानाने तो वाढणारा आणि ते कमी होईल त्या वेळीं कांहीं काळ कमी होऊन पुनः त्याची वृद्धि करणारा, असा हा क्रांतिवाद होता लोकांची क्रांतीला तयारी नाहीं म्हणून त्यांनीं क्रांतिवादाचा त्याग केला नाहीं आणि आपण क्रांतिवादी असतां लोक क्रांतीला तयार नाहीत म्हणून लोकांचाहि त्याग त्यांनीं केला नाहीं ते क्रांतिवादी होते म्हणून लोकनायक झाले, आणि ते लोकांना घेऊन चालले म्हणून लोकमान्य झाले त्याची लोकमान्यता त्याच्या लोकनायकत्वावर अवलंबून होती आणि 'मुखरस्तत्र हन्यते' या न्यायाने लोकांच्या नायकावर होणारे आघात त्यांनीं छातीवर झेलले व लोकांची व सरकारची लढाई जुपली असतां त्यांनीं रणांगणांतून पोबारा केला नाहीं, म्हणून त्यांची ती लोकमान्यता कधींहि मावळली नाहीं त्यांचे प्रतिपक्षी किंवा त्यांचेच अंध अनुयायी मानतात त्याप्रमाणे त्यांना मिळालेली 'लोकमान्यता' लोकानुरजनाच्या सवंग मोलानें पदरांत पडलेली भिकारडी वस्तु नसून निर्वाणीच्या निश्चयाने, अलौकिक धिटाईनें आणि सुखाच्या व स्वार्थाच्या मोलाने विकत घेतलेली ती बहुमोल वस्तु होती. त्यांच्या या निर्वाणीच्या निश्चयाची, अलौकिक धैर्याची आणि असामान्य स्वार्थत्यागाची कसोटी लागण्याचा काळ आतां प्राप्त झाला होता

ही कसोटीची वेळ म्हणजे १८९७ सालचें पुण्यांतील प्लेग-प्रकरण होय. १८३७ सालीं व्हिक्टोरिया राणी गादीवर बसली, त्यास या वर्षी साठ वर्षें झालीं या साठ वर्षांचा ज्युबिली महोत्सव १८९७ च्या जूनच्या २२ तारखेस साजरा झाला आणि त्याच रात्रीं पुण्यांत प्लेगच्या व्यवस्थेसाठीं नेमिलेले प्लेग-कमिशनर मि रँड याचा गणेशखिंडींतील गव्हर्नराचे बंगल्याकडून परत येताना पिस्तुलाची गोळी मारून कोणीं खून केला आणि त्यांच्या समोरच्या गाडींतील मि आयर्स्ट यांचाहि खून त्याच वेळीं झाला. आयर्स्ट हे तेथल्या तेथें मरण पावले आणि मि. रँड हे हॉस्पिटलमध्यें पाचसात दिवस पडून निवर्तले या वेळीं पुण्यांतील प्लेग बंद होऊन गांव भरलें होते आणि अशा वेळीं असला कांहीं भयंकर प्रकार होईल असे कोणासहि वाटले नव्हते पण ते झाल्याबरोबर सर्व ब्रिटिश साम्राज्य हादरून गेलें आणि विलायतेपासून पुण्यापर्यंत सर्वत्र हिंदुस्थानांतील वाढत्या असंतोषाची व राजद्रोहाची चर्चा सुरू झाली पुण्यावर पोलिसांचा तपास सुरू होऊन जादा पोलिस बसले आणि जिकडेतिकडे दहशतीचें आणि संशयाचें वातावरण पसरले. मि. रँड यांना पुण्याचे प्लेग-कमिशनर

नेमिले, त्यानतर म्हणजे १८९७ च्या फेब्रुवारीपासून मेपर्यंत पुण्यांत प्लेगच्या निवारणासाठीं एक प्रकारचा लष्करी करडा अमल गाजत होता आणि पुण्यांत गोरे व काळे लष्कर आणून गोऱ्या सोजिरांकडून लोकांचीं घरे तपासणें, लोकांना सक्तीने हॉस्पिटलमध्यें व सेग्रिगेशन कॅंपमध्ये नेऊन ठेवणे, लोकाचीं घरे साफ करणे, घरांना धुरी देऊन सफेती देणे आणि गोऱ्या सोजिरांकडून वाटेल त्या घराच्या व घरातील वाटेल त्या खोलीच्या झडत्या घेणें असे प्रकार घडत असून लोकांवर अनन्वित जुलूम होत होता अर्थात् मि रॅंड यांचा खून झाला हे ऐकतांच या खुनाचा सबध त्यांच्या अमदानींत लोकांवर जो अनन्वित जुलूम झाला, त्याच्याशीं असून याच्या पाठीमागें काहीं तरी मोठा कट असावा असा सशय सरकारला येणे साहाजिकच होतें, व लोकांनींहि हा खून करणाऱ्याचा पत्ता लागण्यापूर्वीच खुनाचा आणि प्लेगच्या काळांतील जुलुमाचा कार्यकारण सबंध लाविला, तर त्यांत नवल नव्हतें पण या खुनामागे कट असून त्याची उठावणी टिळकाच्यासारख्या कायदेशीर उघड चळवळ करणाऱ्या मनुष्यानें केली असेल, असे मानण्याला काहीं पुरावा त्या वेळीं नव्हता आणि नतरहि तो उपलब्ध झाला नाहीं तथापि टिळकांच्या जहाल राजकारणामुळे लोकांत प्रतिकारबुद्धि जागृत होते आणि लोकांत प्रतिकारबुद्धि जागृत झाली म्हणजे असे प्रकार होतात, असा बादरायण-सबध लावून पुण्यातील वृत्तपत्रावर आग पाखडण्यास जेव्हा सरकारी अधिकाऱ्यानीं आणि अॅंग्लो-इंडियन पत्रानी सुरुवात केली, तेव्हा टिळकानींहि "**सरकारचे डोके ठिकाणावर आहे काय?**" असा स्पष्ट सवाल विचारण्यास आणि "**राज्य करणें म्हणजे सूड घेणे नव्हे!**" असा निधड्या छातीचा उपदेश करण्यास मागेपुढे पाहिलें नाहीं.

या विषयावर केसरींत त्यांनीं जो पहिलाच लेख लिहिला आहे त्यात ते म्हणतात: "इग्रजी वर्तमानपत्रकार रागाच्या सपाट्यात काय हवे ते बरळूं लागले आहेत. पुण्याच्या पुढारी ब्राह्मण लोकानीं प्लेग-कमिटीस इतकी मदत केली आहे, कीं ब्राह्मणानींच प्लेगकमिटी पुण्यास आणिली असे लोक म्हणूं लागले होते तथापि पुनः सरकारचा डोळा ब्राह्मणावर आहे तो आहे. आमच्या मते हें भयकर कृत्य करणारे इसम बहुतकरून या कामात घटलेले असले पाहिजेत, एरवीं असले साहसाचें कृत्य त्याचे हातून व्हावयाचें नाहीं .. ले आयर्स्ट याजवर गोळी घालणारा मनुष्य एक तर त्याच्याशीं वाकडा झालेला लष्करांतला कोणी तरी असावा, अथवा रॅंडसाहेबांच्या मार्गेच याची गाडी असल्यामुळे पळून जाण्यास सोपे पडावे म्हणून रॅंडसाहेबांवर गोळी घालणाराने यांच्यावरहि गोळी घातली असावी असा आमचा तर्क आहे. पण हे सर्व तर्क आज सागत बसण्यांत काहीं अर्थ नाहीं साहेबलोकाची मनें आज अत्यत कलुषित झालेलीं असून ते किती सतापले आहेत, हे दुसरीकडे दिलेल्या कलेक्टरसाहेबांच्या भाषणावरूनच दिसून येईल आजपर्यंत पुणेकरानीं दाखविलेली सहनशीलता एका अविचारी मनुष्याच्या भयकर कृत्यानें सरकारच्या नजरेतून जावी

हे मोठें दुर्दैवच होय पण खुन्यांचा शोध लागून जरा शातता झाल्याखेरीज सध्यां याबद्दल विशेष कांहीं लिहिता येत नाहीं पुणेकरांवर हे पहिलेच काहूर आले आहे असे नाहीं, तर १८७८ सालीं बुधवारचा वाडा जळला, तेव्हाहि अशी स्थिति झाली होती व ते काहूर गेले तसे हेंहि निघून जाईल, अशी आम्हास पूर्ण आशा आहे मात्र लोकांनी आपला धीर न सोडता आपले हातून सरकारास मदत करण्याचा जो त्यांचा क्रम आहे, तो तसाच चालू ठेविला पाहिजे "*

## टिळक आणि राजद्रोह

१८७८ सालीं बुधवारवाडा जळला त्या वेळीं पुण्याचे नेतृत्व न्या. रानडे याच्याकडे होते आणि वासुदेव बळवत फडके याच्या बडात त्याचा हात असावा, असा सशय त्या वेळचे मुबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेपल याच्या मनात आला व तो त्याना सिद्ध करता आला नाहीं, तरी त्याच्या मनातून अखेरपर्यंत निघाला नाहीं यानंतर आज वीस वर्षानी त्याच इतिहासाची पुनरावृत्ति अधिक मोठ्या प्रमाणावर पुण्यांत होत होती फरक इतकाच, कीं लो टिळक हे आतां न्या रानडे याच्या जागीं होते. वस्तुतः फडके याच्या प्रयत्नापेक्षा चाफेकरबधूंनीं रॅडसाहेबांचा खून केला, हा प्रयत्न अधिक लहान प्रमाणावर होता तथापि वीस वर्षांपूर्वीं जी क्रातिकारक प्रवृत्ति सुशिक्षित लोकात प्रसार पावत होती, तीहून ती आज या वर्गात अधिक प्रमाणांत फैलावू लागली होती आणि कोल्हापूरपासून नागपूरपर्यंत सर्व सुशिक्षित वर्गात लोकमान्याच्या जहाल राजकारणाचा जारीनें प्रचार चालू होता दामोदर व बाळकृष्ण चाफेकर या चाफेकरबंधूची सस्था इ स १८९५ पासून पुण्यात निघालेली होती व धर्मरक्षण म्हणजेच एका अर्थी स्वराज्यप्राप्ति, हे त्या सस्थेंतील तरुणाचे ध्येय होतें स्वधर्मरक्षण आणि स्वराज्यप्राप्ति यात त्या वेळीं तरी भेद करीत नसत आणि शिवाजी व गणपति-उत्सवात याच धोरणाने उपदेश होत असे चाफेकरबधूंच्या सस्थेंतील मनुष्यानेच मुंबईतील व्हिक्टोरिया राणीच्या पुतळ्याला डांबर फासलें होतें, असे पुढे समजले. तात्पर्य, स्वधर्मरक्षणाच्या हेतूनें व स्वसंस्कृतीच्या अभिमानाने प्रेरित झालेले तरुण त्या वेळीं गुप्त कट आणि आखाडे स्थापन करून शिवाजीमहाराजाचें उदाहरण पुढे ठेवून स्वातन्त्र्यप्राप्तीचे प्रयत्न करीत होते आणि त्याच्या अतःकरणात देशाभिमानाची ज्योत प्रज्वलित होण्यास लो टिळक व त्यांचा केसरी हे कारणीभूत होत होते हे खरे असलें, तरी या क्रांतिकारकांचा मार्ग लो टिळकांना पसत असल्याचे दिसून येत नाहीं रॅड आणि आयर्स्ट याच्या खुनासबधीं लिहितांना लो टिळक म्हणतात : " ज्याने कोणी खून केला असेल त्यास खुशाल फाशी द्या, त्यांत आमचें कल्याण आहे व समाधान आहे वर्तमानपत्रकर्त्यांचे लेख गुन्ह्यास उत्तेजन देण्यासारखे असल्यास इडियन पिनल कोडाप्रमाणें त्यास

* किता, पृ. ६७१-७२.

गुन्हेगार ठरवून त्यांसहि शिक्षा करा; त्यास आमची हरकत नाहीं. पण निरपराधी लोकांस विनाकारण धमकी देऊन त्यांच्यावर आग पाखडणे हे खऱ्या मुत्सद्दीपणाचें व शहाणपणाचें लक्षण नव्हे. . . . आमच्या मते नेटिव्ह वर्तमानपत्रकारांनीं या धामधुमीमध्यें आपले कर्तव्य चागलें बजावले आहे व जर कोणी दोषी असेल, तर सरकारने या तक्रारीकडे दुर्लक्ष केल्यामुळें हा दोष सरकारकडे येऊ पाहतो हा आपल्यावरचा दोष टळावा एवढ्याकरितां नेटिव वर्तमानपत्रकारास राजद्रोही ठरविण्याची ही खटपट चालू आहे, बाकी कांहीं नाहीं"* तात्पर्य, सरकारी अमलदार खुनाचा दोष देशभक्ताच्या वर्तमानपत्रावर लोटीत होते, असे असलें तरी देशांत असे अत्याचार होतात याची खरी जबाबदारी प्रायः अधिकारी-वर्गाकडून लोकावर जो जुलूम होतो व राज्यकारभार करताना जे अत्याचार होतात, त्याच्यावरच असते. अशा प्रसंगीं या सरकारी जुलुमावर व अत्याचारावर टीका करून ते कायदेशीर मार्गानें दूर करण्याचा प्रयत्न करणे आणि लोकावर बेकायदा जुलूम होत असल्यास त्याचा प्रतिकार करण्याचे न्याय्य मार्ग त्यांना दाखवून देणे, हें देशभक्त लोकनायकांचे अवश्य कर्तव्य असते लोकात पारतन्त्र्याची चीड उत्पन्न करणे किंवा प्रतिकारबुद्धि जागृत करणें हा राजद्रोह नसून आपल्या-वरील अन्यायाविरुद्ध किंवा पारतन्त्र्याविरुद्ध शस्त्र उचलण्यास किंवा सशस्त्र बड करण्यास प्रत्यक्ष प्रोत्साहन देणे, हाच खरा राजद्रोह आहे तसें कोणीं केल्यास त्यास शिक्षा देणें आणि अत्याचारी व्यक्तींना शोधून काढून त्यांस शासन करणे, हे अधिकाऱ्याचे कर्तव्य आहे पण हे कर्तव्य करीत असता, अपराधी व अनपराधी याना सारखेच झोडपीत सुटणे हे शहाणपण नव्हे. अत्याचाराची प्रवृत्ति नष्ट करण्याचा हा मार्ग नसून लोकांवर अत्याचार न करणे हा तो मार्ग आहे. सरकारनें कायदा पाळला आणि डोके शात ठेविले म्हणजे लोकाचें डोके शात राहते सशस्त्र क्राति टाळण्याची जबाबदारी लोकनायकावर जशी आहे, तशीच ती सरकारी अधिकाऱ्यावरहि आहे व ती त्यांनीं पार न पाडल्यास लोकनायकांना लोकाच्या अत्याचाराबद्दल जबाबदार धरणे व त्याच्यावर ते केवळ देशभक्ति, धर्मभक्ति व प्रतिकारबुद्धि जागृत करतात म्हणून राजद्रोहाचा आरोप ठेवणें, हा अन्याय आहे. राजद्रोहाच्या गुन्ह्याची मीमांसा करताना लोकमान्य लिहितात: "इग्रजाचे राज्य व राजसत्ता याच्याविरुद्ध म्हणून जे गुन्हे सागितले आहेत, त्यात हा एक गुन्हा आहे म्हणजे अर्थात् ज्या लेखाने राज्याची उलथापालथ किवा बडे होण्याचा सभव आहे, त्या लेखाचा या कलमांत समावेश होतो परतु या लेखात जो खुलासा दिला आहे त्यामुळे आमच्या सरकारच्या हातून ज्या चुका व अन्याय होत आहेत, ते स्पष्टपणे सरकारास कळविण्यास अथवा लोकांस समजून देण्यास अथवा त्यांवर कडक टीका करण्यास आम्हांस कोणत्याहि प्रकारची हरकत दिसत नाहीं" अर्थात् ही मीमासा त्या वेळीं जो कायदा

* कित्ता, पृ ६७७.

होता त्यास अनुसरून आहे पुढें या कलमात बदल करून अत्याचाराला प्रोत्साहन नसलें, तरीहि सरकाराविरुद्ध अप्रीति उत्पन्न करणें हा गुन्हा ठरविण्यांत आला व त्या दुरुस्तीच्या आधींच लोकमान्याऱ्यावरील राजद्रोहाच्या खटल्याचा निकाल देणारे सर जॉन स्ट्रॅची यानीं प्रीतीचा अभाव म्हणजे 'अप्रीति' असा अर्थ करून लोकमान्यांना दीड वर्षांची शिक्षा ठोठावली या वेळींच पुण्यातील सरदार घराण्यांतील दोघां नातूबंधूना १८२७ च्या २५ व्या रेग्युलेशनखालीं पकडून बिगरचौकशी तुरुगांत डांबून ठेविण्यांत आले.

पुण्यात या वेळीं इतरहि कांहीं वृत्तपत्रावर खटले झाले होते, व पुण्याबाहेरहि मोदवृत्त, प्रतोद वगैरे पत्रावर खटले झाले पण लोकमान्यावरील खटल्याने सर्व राष्ट्राचें चित्त वेधून घेतलें आणि सरकारी अधिकाऱ्यांच्या रोषाला बळी पडलेल्या या महाराष्ट्रीय तरुण पुढाऱ्याची कीर्ति सर्व हिंदुस्थानभर पसरली केसरीमध्यें शिवाजी-उत्सवाची जी हाकिगत प्रसिद्ध झाली होती व त्यातील भाषणात लोकमान्यांनीं शिवाजीने केलेल्या अफझुलखानाच्या वधाचें जें समर्थन केलें होते, त्यावरून सरकारनें हा खटला भरला होता पुण्यांत झालेल्या खुनांचा या खटल्याशीं प्रत्यक्ष कांहीं संबंध नाहीं, असे ॲड्व्होकेट-जनरलने प्रथमच मान्य केलें होतें, तरी न्यायाधीशांनीं ज्यूरीला खटला समजावून देतांना, रँड-आयर्स्ट यांच्या खुनांचा प्रत्यक्ष सबध या लेखांशीं नसला, तरी त्यांमुळे जे वातावरण निर्माण झाले, त्याचा परिणाम या खुनांत होणें साहजिक आहे असे उद्गार काढिले होते ज्यूरींतील नऊपैकीं सहानीं टिळकाना दोषी व तिघानीं निर्दोषी ठरविलें व न्यायाधीशांनीं अठरा महिन्याची सक्तमजुरीची शिक्षा ठोठाविली

## टिळकांची अखिल भारतीय कीर्ति

१८९७ च्या डिसेबर महिन्यांत अमरावती येथे शंकरन् नायर यांच्या अध्यक्षतेखालीं राष्ट्रसभेचे तेरावे अधिवेशन भरले दादासाहेब खापर्डे हे लोकमान्यांचे मित्रच स्वागताध्यक्ष होते. त्यांनीं अर्थातच पुण्यातील दडपशाहीला, त्या वर्षीच्या प्लेगाला आणि दुष्काळाला आपल्या भाषणांत प्राधान्य दिलें अध्यक्ष श्री शंकरन् नायर यांनींहि आपल्या भाषणांत पुण्यांतील दडपशाही, नातूबधूचा विनाचौकशी बंदिवास आणि लो टिळकांची शिक्षा, यांकडे लोकांचें लक्ष वेधून घेतले टिळकांच्या खटल्यांत नऊपैकीं सहा ज्यूरर युरोपियन आणि तीन हिंदी होते. अर्थात् सहाविरुद्ध तीन मतानींच त्यांना दोषी ठरविण्यांत आले व जज्जांनीं कडक शिक्षा दिली, ही गोष्ट अध्यक्षांनीं मुद्देसूदपणें लोकांपुढे मांडिली आणि दुसऱ्या एका खटल्यांत सातविरुद्ध दोन मतांनीं आरोपी दोषी ठरविला गेला असतांहि या ज्यूरींत फक्त एकच हिंदी मनुष्य आहे हे लक्षांत घेऊन इंग्लिश न्यायाधीशाने आरोपीस निर्दोषी म्हणून सोडून दिले होतें, हे उदाहरण देऊन लोकमान्यावर येथील न्यायदानपद्धतीमुळें अन्याय झाला

आहे असें सिद्ध केले राजद्रोहाचा खटला तरी हिंदुस्थानात हिंदी ज्यूरीपुढेंच चालला पाहिजे असे त्यांनीं आपलें मत दिलें त्यानीं आपल्या भाषणात हिंदी व ब्रिटिश नागरिक याच्यांतील समान हक्कांचें व दर्जाचें तत्त्व जोरानें प्रतिपादून स्वराज्य आणि भाषण व लेखनस्वातंत्र्य हीं आपलीं ध्येयें आपणांस प्राप्त झालीं पाहिजेत, त्याखेरीज आपल्या देशांतील लोकांचें दारिद्र्य आणि रोग यांपासून संरक्षण होणार नाहीं असे प्रतिपादन केलें आपल्या भाषणाच्या अखेरीस ते म्हणाले:

"मला हें सांगितलें पाहिजे, कीं आम्ही जेव्हां टीका करतों तेव्हां ब्रिटिश राज्याशीं किंवा सिंहासनाशीं आम्ही राजनिष्ठ आहो आणि ब्रिटिशांचा संबध तोडण्याचें ध्येय इष्ट आहे असें बोलणाराशीं आमची यत्किंचितहि सहानुभूति नाहीं, हे जाहीर करण्याची गरज आहे असे मला वाटत नाहीं देशाच्या सेवेला ज्यांनीं आपलें जीवित अर्पण केलें, अशा आमच्या ऐतिहासिक थोर पुरुषांसबंधीं आम्हास अभिमान वाटावा हे अगदीं स्वाभाविक आहे आणि आमच्या इतिहासातील ज्या गोष्टी आमच्या राज्यकर्त्यांनाहि बोध घेण्यासारख्या असतील, त्या गोष्टी त्याच्यापुढें माडण्याची इच्छा आम्हास होणें साहजिक आहे पण आमच्या वर्तमानकालीन अवस्थेचीं बीजें भूतकालात आहेत व आमच्या आजच्या अवनतीला आमचा भूतकाल जबाबदार आहे, याचीहि जाणीव आम्हाला आहे फायद्याच्या दृष्टीने ज्या कालीं एकाद्या वर्गाला किंवा जातीला, उदाहरणार्थ, ब्राह्मणांना विशेष सवलती होत्या किंवा शिक्षा होत नसे, अशा भूत-कालाचे पुनरुज्जीवन करण्याचे प्रयत्न कोणीं केले, तर इंग्लिशाच्याबरोबर समतेसाठीं झगडणारे आम्ही अशा प्रयत्नाविरुद्धहि खेदानें झगडूं ब्राह्मणापासून अस्पृश्यापर्यंत सर्वांच्या समानतेसाठीं आम्ही झगडत आहो. याच समतेच्या भावनेने आम्ही आमच्या राज्यकर्त्यांच्या ज्या कृत्यात विषमतेला मान्यता दिल्याचें दिसेल, त्या-विरुद्धहि आम्ही टीका करीत असतों. युरोपियन व हिंदी यांच्यामधील कायदेशीर विषमता ज्या प्रमाणांत कमी होईल आणि आम्हांला ज्या प्रमाणांत स्वराज्य देण्यात येईल, त्या प्रमाणांत आमची स्वातंत्र्याच्या दिशेने प्रगति होत आहे असें आम्ही मानू "§ या उद्गारांत पुण्यांतील शिवाजी-उत्सवाचा अव्यक्त निर्देश असून पुनः ब्राह्मणी राज्य स्थापन करण्यासाठीं अशा उत्सवांची चळवळ कोणीहि विचारी मनुष्य करणार नाहीं व तसा कोणीं प्रयत्न केला तरी त्याला कोणाचा पाठिंबा मिळणार नाहीं, असा स्पष्ट ध्वनि आहे पण त्याचबरोबर इंग्रज व हिंदी यांच्यांतील विषमताहि आम्ही सहन करणार नाहीं व स्वराज्याचे हक्क मिळतील त्या मानानेंच आमचें समाधान होणार आहे, हेंहि स्पष्टपणें सांगण्यांत आले आहे.

नातूबधूंच्या विनाचौकशी बदिवासाचा निषेध करण्याच्या ठरावावर भाषण करतांना बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यानीं लो. टिळकांच्याबद्दल सर्व राष्ट्राचे अंतःकरण

---

§ Congress Presidential Addresses, Vol I, p 337-38
— Published by G A Natesan & Co

दुःखाने हळहळत आहे, हे व्यक्त करणारे उद्गार पुढीलप्रमाणें काढिले: "पुण्यावर जादा पोलिस लादण्यांत आले ही चूक आहे असे आमचें मत आहे श्री टिळक व पुण्यांतील इतर संपादक याना बदींत घालणे ही त्याहून मोठी चूक आहे असें आम्हास वाटतें श्री टिळक यांच्याबद्दलच्या सहानुभूतीने माझे अतःकरण भरून आले आहे सर्व राष्ट्राच्या डोळयातून अश्रू वहात आहेत..." अशा प्रकारें राष्ट्राच्या अतःकरणावर आपल्या स्वार्थत्यागाने आणि अलौकिक धैर्यानें लोकमान्यांनीं आपले सिंहासन थाटले आणि तुरुगातील कष्ट भोगीत असता सर्व राष्ट्राचीं अतःकरणे कष्टी करून हिंदुस्थान हे एक राष्ट्र आहे, त्याची सवेदनाशक्ति जागृत आहे, आणि आपणावर जुलूम करणारापेक्षा आपणासाठीं जुलूम सहन करणारासबधीं अधिक निष्ठा वाटण्याची मानववृत्ती हिंदुस्थानातहि जिवत आहे, असें जगाच्या निदर्शनास आणून दिले हिंदी जनतेवर राज्य करण्याचा नैसर्गिक अधिकार, तिच्या द्रव्याचा अपहार करून तिच्यावर जुलुमी सत्ता गाजविणाराना नसून या जुलुमाचा व द्रव्यहरणाचा प्रतिकार करण्यासाठीं कायदेशीर व न्याय्य मार्गाने झगडणाऱ्यांना व त्या मार्गातील अपरिहार्य आपत्ती भोगण्यास आनंदाने तयार होणाऱ्याना आहे, हेहि या वेळीं सिद्ध झाले पण या तत्त्वाची जाणीव होऊन त्या तत्त्वावर राष्ट्रसभेचे धोरण आंखिले जाण्याचा काळ अद्यापि आला नव्हता कायदेशीर चौकशीनतर राज्यकर्त्यांनीं दोषी ठरविलेल्या देशभक्ताचे उघड अभिनदन करण्याचा ठराव करण्याचें धैर्य अद्यापि राष्ट्रसभेत आले नव्हते

## गोखले यांचा उदय

याच सुमारास महाराष्ट्रांतील दुसरा एक तरुण पुढारी अखिल भारतीय राजकारणाच्या क्षितिजावर आपल्या प्रयत्नांच्या प्रकाशानें उदय पावूं लागला होता हा तरुण महाराष्ट्रीय पुढारी म्हणजे प्रो. गोपाळ कृष्ण ऊर्फ नामदार गोखले हेच होत. नामदार गोखले हे आपल्या राजदरबारातील राजकारणामुळें इतके प्रसिद्धी पावले, कीं त्याचे 'नामदार' हे उपपद नित्यच होऊन बसले आहे आणि टिळकांना जशी लोकमान्य ही पदवी लोकांनी अर्पण केली, त्याचप्रमाणें गोखल्यांना नामदार ही पदवीहि लोकांनींच अर्पण केली कीं काय असा भास होतो. लोकांच्या वतीनें राजदरबारीं राज्यकर्त्यांना विरोध करूनहि सरकारमान्यता कायम ठेवण्याचा मान त्यांनींच प्रथम मिळविला परतु राजमान्यता व लोकमान्यता हीं दोन्ही वैभवें त्यांनीं भोगिलीं असे जे कांहीं लोक म्हणतात, ते मात्र तितकेसे खरे नाहीं टिळकांना जशी राजमान्यता त्याच्या हयातींत कधीं मिळाली नाहीं, तशीच जवळजवळ गोखल्याना त्यांच्या हयातींत फारशी लोकमान्यता कधीं मिळाली नाहीं. राजमान्यता व लोकमान्यता या दोहोंचा भरपूर उपभोग घेण्याचा लाभ आधुनिक भारताच्या इतिहासांत फक्त म. गांधींनाच प्राप्त झाला होतो तथापि आपल्या हयातींत दरबारी

राजकारणांत ना. गोखले यांनीं अग्रस्थान पटकाविलें होते आणि १८९७ पासून पुढील वीस वर्षांचा आधुनिक भारताचा इतिहास म्हणजे ना. गोखले आणि लो. टिळक या दोन महाराष्ट्रीय पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं कार्य करणाऱ्या दोन अखिल भारतीय राजकीय पक्षाचाच इतिहास होय, असें म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं. ना गोखले हे टिळकाच्यापेक्षा वयानें दहा वर्षांनीं लहान होते, तथापि राजकीय विचारात त्यानीं लो. टिळकांच्या पूर्वींच्या पिढीचे शिष्यत्व पत्करिल्यामुळे मागील पिढीच्या राजकारणाचें नेतृत्व करण्याचा मान त्याना लाभून दरबारी राजकारण आणि राष्ट्रसभेचे कार्य यात त्यांची प्रगति वयाच्या मानानें झपाट्याने होत गेली प्रथमत. ते डेक्कन एज्युकेशन सोसायटींत आले, तेव्हां आगरकरांच्यापेक्षा टिळकाच्या मताकडेच त्याचा कल असावा असे म्हणतात पण थोड्याच दिवसात सुधारक या दृष्टीने आगरकरांचे नेतृत्व त्यांनीं स्वीकारलें आणि 'सुधारक' निघाला, त्यानंतर चार वर्षे त्यांनीं त्याच्या इग्रजी सपादकाचे कामहि केलें पण थोड्याच दिवसांत ते न्या रानडे याच्या कक्षेत आले आणि लवकरच त्याचे शिष्यत्व त्यानीं स्वीकारिले टिळक-आगरकरानीं आपल्या स्वतत्र प्रज्ञेनें आपले स्वतंत्र मार्ग आखून घेतले होते, तशी गोखल्याची स्थिति नव्हती त्यानी न्यायमूर्तींचे शिष्यत्व श्रद्धापूर्वक पत्करिले आणि आपले सर्व बुद्धिसर्वस्व त्यानीं त्या श्रद्धेच्या प्रकाशात दिसणाऱ्या मार्गाचें अनुसरण करण्यात घालविले रानडे हे त्याचे द्रष्टे गुरु होते आणि आपण त्याचे एकनिष्ठ शिष्य आहोत ही जाणीव त्यांनीं कधींहि बुझू दिली नाहीं. त्याची प्रज्ञा अलौकिक नसली, तरी त्याची श्रद्धा अलौकिक होती यात शंका नाहीं या श्रद्धेच्या जोरावर त्यांनीं राष्ट्रसभेचें नेतृत्व सपादन केले आणि प्रागतिक राजकारणाला स्वार्थत्यागाच्या आध्यात्मिक भूमिकेवर अधिष्ठित केलें प्रागतिक राजकारणात क्राति-कारकाच्या वीरवृत्तीला फारसा अवकाश नसला, तरी सतत लोकसेवाव्रत आणि आजन्म स्वार्थत्यागी जीवन याची आवश्यकता आहे, हे ओळखून त्यांनीं त्या-साठीं 'भारतसेवक समाज' ( Servants of India Society ) ही अपूर्व संस्था स्थापन केली प्रागतिक राजकारण म्हणजे स्वार्थसरक्षणाचा धदा नव्हे, आणि प्रागतिक पक्ष म्हणजे रावसाहेब-रावबहादुराचा पांजरपोळ नव्हे किवा धनिकवर्गाचा हितरक्षक सघहि नव्हे, तर क्रातिमार्गाने होणाऱ्या प्रगतीचे वैय्यर्थ्य जाणून क्रम-विकासाचा मार्ग चिकाटीने व नित्यसेवेच्या स्वार्थत्यागी वृत्तीने अनुसरणाराचा तो एक देशभक्तीचा संप्रदाय आहे, हे सिद्ध करण्याचे श्रेय ना गोखले यानाच आहे अनेक सामान्य बुद्धिमतांपेक्षां ना गोखले याची बुद्धिमत्ता असामान्य होती परंतु राष्ट्रीय उन्नतीच्या शिखराकडे जाणारा स्वतंत्र मार्ग शोधून काढण्यास लागणारी द्रष्टृत्वाची स्वतत्र प्रज्ञा आपली नाहीं, हे ओळखून एका द्रष्ट्या गुरूच्या उपदेशा-नुसार दृढ श्रद्धेने प्रगतिपथावर द्रुतगतीनें प्रवास करून ध्येयशिखर गाठणारे ते एक असामान्य भारतपुत्र होते यांत मुळींच शंका नाहीं. "अज्ञश्चाश्रद्धधानश्च संशयात्मा

विनश्यति ।" या गीतोक्तीप्रमाणें धड शिष्यत्वहि नाहीं आणि धड द्रष्टृत्वहि नाहीं अशा अवस्थेत स्वतंत्र मार्ग आंखण्याची व नेतृत्वाची महत्त्वाकांक्षा बाळगून आपला व आपल्या अनुयायांचा विनाश करणारे ते नव्हते. हिंदुस्थानसारख्या खडतुल्य प्रचड आणि प्राचीन राष्ट्राला स्वातत्र्याचा अभिनव मार्ग दाखवून देण्याचें कार्य फारच थोड्यांस साधणारे असते पण द्रष्ट्या पुरुषांनीं दाखवून दिलेल्या मार्गाचे अनुसरण करणे प्रत्येक सामान्य प्रज्ञेच्या मनुष्यासहि निश्चयानें, श्रद्धेनें आणि त्यागानें शक्य असते पण हे गुणहि फार दुर्मिळ असतात. आजन्म शिष्यत्वाचा पेशा पत्करूनहि स्वतत्र प्रज्ञेचा अहकार सुटत नाहीं, यामुळे अखेरीस ऐलतीरहि नाहीं व पैलतीरहि नाहीं अशा परिस्थितींत गटगळया खाऊन अहकारानें जगाकडून हंसे करून घेणारे आणि अगदीं सामान्य प्रतीच्या प्रज्ञेवर राष्ट्राचे स्वतत्र नेतृत्व करण्याचा मान विकत घेऊ इच्छिणारे लोक पुष्कळ आढळतात. पण हा मानाचा सौदा इतका स्वस्त नाहीं, असाच जगाच्या इतिहासाचा अनुभव आहे

हिंदुस्थानच्या जमाखर्चाची तपासणी करण्यासाठीं १८९६ सालीं वेल्बी-कमिशन नावाचे रॉयल कमिशन विलायतेत बसलें होते हे कमिशन नेमून घेऊन त्याच्याकडून हिंदुस्थानच्या राज्यपद्धतीमुळे हिंदुस्थान दिवसेदिवस कसा भिकारी होत चालला आहे तें पार्लमेंटला पटवून हिंदी राज्यकारभारांत हिंदी लोकांचा प्रवेश करून घ्यावा, लष्करी खर्चात काटकसर करावयास लावावी, साम्राज्यशाहीच्या वृद्धीसाठीं हिंदुस्थानवर लादला जाणारा लष्करी खर्च इग्लडनें उचलावा, विलायतेंत भारतमत्रि व भारतमडळ याच्याकरिता होणारा खर्च ईग्लडला करावयास लावावा, साराश, हिंदुस्थान व इग्लड यांच्यांतील सर्व आर्थिक व्यवहार मालक आणि गुलाम या तत्त्वावर न चालता ते एका साम्राज्यातील दोन समान दर्जाचे भागीदार या तत्त्वावर चालावेत आणि हिंदी जमाखर्चावर हिंदी जनतेचें थोडेफार नियत्रण चालू लागावे असे ब्रिटिश पार्लमेंटला पटवून द्यावें, असा हेतु दादाभाईप्रभृति हिंदी पुढाऱ्यांचा व हिंदी जनतेच्या इंग्लिश कैवाऱ्याचा होता या कमिशनवर स्वतः दादाभाईची नेमणूक झाली होती त्यामुळें लोकात बरीच आशाहि उत्पन्न झाली होती या कमिशनपुढे साक्षी देण्यासाठीं कलकत्त्याचे बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी, मुबईचे दिनशा एदलजी वाच्छा, मद्रासचे जी सुब्रम्हण्य ऐय्यर असे मोठमोठे पुढारी गेले होते. या वेळीं पुण्यातून डेक्कन सभेतर्फे प्रो. गोखले यांना पाठविण्यांत आलें होते इग्लंडांतील कार्यासाठीं पुण्यांतून लोकप्रतिनिधि जाण्याचा हा पहिलाच सुयोग होता आजपर्यंत इग्लडांत शिष्टाई करण्याला पुणेकरातर्फे खुद्द पुण्याहून कोणीच गेलें नव्हते आणि पुण्यांतील सार्वजनिक सभा येथील चळवळींत जरी बरीच गाजलेली होती, तरी इग्लडांतील राजकारण बगाली बाबू किंवा मुबईचे पारशी यांच्या मार्फतच बहुतांशीं चालत असे ना. गोखले यांच्यापूर्वी चंदावरकर हे गृहस्थ विलायतेस गेले होते, तरी त्यांचें पुढील आयुष्य सरकारी नोकरींतच गेल्यामुळे

त्याला फारसें महत्त्व उरलें नाहीं. ना गोखले यानीं वेल्बी-कमिशनपुढें जी साक्ष दिली ती अत्यंत मुद्देसूद आणि उत्कृष्ट वठली अशी बहुतेकांची त्या वेळीं खात्री झाली आणि त्या वेळेपासूनच न्या. रानडे यांचा हा तरुण शिष्य पुढें इंग्लंडांत शिष्टाई करण्यास लायक ठरणार, अशी लोकांची खात्री झाली लो. टिळकांनासुद्धा गोखले यांनीं विलायतच्या सफरीचें आणि आपल्या विद्वान् गुरूचें चीज केलें, असें कबूल करावें लागलें हिंदी राजकारणाचे स्वरूप प्रथमपासून सरकाराभिमुख आणि लोकाभिमुख असें द्विविध होतें या दोन तोंडामागचें अतःकरण आणि शक्ति एक असल्याखेरीज त्या राजकारणाला खरें यश येण्याचा संभव नव्हता. सार्वजनिक सभा किंवा राष्ट्रसभा यांसारख्या लोकप्रतिनिधिसभांमार्फत व त्यांच्या शिस्तीखालीं लोकसत्तेच्या तत्त्वानुसार बहुमताप्रमाणे हे राजकारण चालणें, यांतच खरें स्वारस्य आणि खरे बल होते. पण दुर्दैवाने महाराष्ट्रांत रानडेपक्ष व टिळकपक्ष असे जे दोन पक्ष या वेळीं निर्माण झाले होते, ते अशा प्रकारे एका संस्थेत नांदू शकले नाहींत. म्हणून सरकाराभिमुख राजकारण व लोकाभिमुख राजकारण यांचीं अतःकरणे एक राहूं शकलीं नाहींत यामुळेंच राष्ट्राचें अनन्वित नुकसान झालेलें आहे; मग त्याचा दोष कोणाकडे कितीहि असो.

प्रो. गोखले हे विलायतेंत असतांना त्याना पुण्यांतील रॅंडशाहीच्या जुलुमाच्या हकिगती कळत होत्या आणि रॅंड व आयर्स्ट याच्या खुनाचीहि बातमी त्याना तेथेंच समजली. या वेळीं काहीं खाजगी मित्रांच्या पत्रांतून पुण्यातील दोन स्त्रियावर सोजिरांनीं जुलूम केला व त्यापैकीं एकीनें पुढे जीवहि दिला अशी बातमी त्याना समजली व त्यानीं या गोष्टी मॅंचेस्टर गार्डियनमध्यें एक मुलाखत देऊन प्रसिद्धहि केल्या. पण या बातम्या अतिशयोक्तीच्या असून आपण केलेलीं विधानें सिद्ध करण्यास पुरावा मिळत नाहीं हे पाहून त्यानीं तीं विधानें परत घेऊन माफी मागितली. या माफीबद्दल व तीं तील मजकुराबद्दल त्यांच्यावर पुण्यांतील प्रतिपक्षीयानीं टीकेची झाड उठविली व त्यामुळे त्याना काहीं काळ लोकात अप्रियताहि प्राप्त झाली. पण त्यांनीं आपल्या मनोदेवतेला स्मरून ती अप्रियता सहन केली व आपला लोकसेवेचा आंखलेला कार्यक्रम तसाच पुढे चालविला. प्रागतिक राजकारणाचे नेतृत्व करणारां-वर लोकनिंदा सहन करण्याचे प्रसंग वारवार यावयाचे त्यापैकींच हा एक आहे, असे समजून त्यानीं आपल्या भावी कार्याची दिशाहि मुक्रर केली या प्रकरणाचा त्रयस्थ दृष्टीनें विचार करता या प्रकरणात गोखल्याची काहीं चूक झाली आहे असें म्हणता येणार नाहीं. तथापि, अशी माफी मागत असतां प्रतिपक्षी त्यातील शब्दात व्यक्त होणाऱ्या सद्भावनांचाहि आपल्या बाजूस अनुकूल असा फाजिल उपयोग करून घेतात व सद्भावनाबद्दलचें श्रेय मात्र देत नाहींत, हे लक्षांत घेऊन ते शब्द जितके जोखून घालावयास हवेत तितके घातलेले नाहींत, असें टिळकाच्यासारख्या मुत्सद्दी मनुष्याला वाटणें अगदीं साहजिक होतें. टिळकांची ब्रिटिश मुत्सद्यांकडे पाहण्याची

शत्रुत्वाची भूमिका आणि गोखल्याची ब्रिटिश साम्राज्याकडे परमेश्वरी प्रसाद या दृष्टीनें पाहण्याची भावनात्मक भूमिका, या मूळ भूमिकांतीलच हें अंतर होते असे आम्हांस वाटतें. टिळकांच्या राजकारणांत माफीला अवकाश असला, तरी तो फक्त कायदेशीर गरजेपुरताच होता. गोखल्यांच्या राजकारणांत माफीला एक प्रकारचे धार्मिक प्रायश्चित्ताचें स्वरूप होते या राजकारणाची मूळ भूमिकाच चुकीची असल्यामुळें त्यात अशा कांहीं चुका होणें अपरिहार्य होते असें एकाद्याला म्हणतां येईल व त्या दृष्टीने या दोन राजकारणांत वारवार खडाजंगी वाद-रण माजणें हेंहि अपरिहार्य वाटतें पण हे तंटे अपरिहार्य असले, तरी राष्ट्रीयत्वाच्या व लोकसत्तेच्या तत्त्वानुसार हे दोन्ही पक्ष एकाच संस्थेंत नांदणे अशक्य नव्हते व तसें घडणे हेच राष्ट्रहिताच्या दृष्टीने अवश्य व इष्ट होते. ते कांहीं असलें, तरी १८९७ च्या उमरावतीस भरलेल्या राष्ट्रसभेत हीं दोन राजकारणे भिन्न आहेत व त्यातील टिळकांचे राजकारणच लोकांना मान्य होऊं लागलें आहे, असें दिसून आलें.

## कर्झन आणि औरंगजेब

वेल्बी-कमिशनच्या नंतर थोड्याच दिवसांत हिंदुस्थानांत लॉर्ड कर्झन यांची कारकीर्द सुरू झाली लॉर्ड कर्झन हे १८९९ सालीं हिंदुस्थानचे व्हाइसरॉय म्हणून कलकत्त्यास येऊन दाखल झाले. त्यांच्या कारकीर्दीला औरंगजेबाच्या कारकीर्दीची उपमा लो. टिळकानीं केसरींत दिली होती व तीच उपमा ना. गोखले यांनीं १९०५ सालीं राष्ट्रसभेच्या अध्यक्षीय भाषणांत देऊन एक प्रकारे चिरंतन करून ठेविली आहे. औरंगजेबाची उद्दाम आणि कडवी वृत्ति, मनुष्यस्वभावासंबंधींचे अनुदार धोरण, साम्राज्यशाहीची अनिवार हांव, लष्करी सामर्थ्याचा अमर्याद अहंकार आणि जित लोकांच्या प्रतिकारसामर्थ्यासंबंधीं अत्यंत तुच्छताबुद्धि या दृष्टीनें ही उपमा कर्झनशाहीला देण्यात येत असते शिवाय महाराष्ट्रांतील लोकांना शिवाजी-उत्सवाच्या रूपाने स्वराज्याची स्मृति उत्कटत्वाने झालेल्या त्या काळात साम्राज्यशाहीचा दिमाख दाखवून या स्वराज्याच्या वाढत्या भावनेला आपल्या राजकारणांत डोंगरांतील उंदराप्रमाणे तुच्छ लेखणाऱ्या अरेराव साम्राज्य-प्रतिनिधीला महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं औरंगजेबाची उपमा द्यावी, हेंहि अगदीं साहजिकच होते. लॉर्ड कर्झन हा एक अत्यंत हुषार पण फार तरुण व्हाइसरॉय होता आणि त्याच्या दरबारांत म्हणजे कलकत्त्याच्या कायदेमंडळात त्याला लोकांच्या वतीने विरोध करणारा लोकप्रतिनिधिहि तितकाच तरुण होता ना. गोखले हे १९०२ सालीं मध्यवर्ती कायदेमंडळाचे लोकनियुक्त सभासद झाले व ते आपल्या आयुष्याच्या अखेरपर्यंत त्याचे सभासद होतेच. या काळात त्यांनीं कायदेमंडळातील कार्यांत आपलें अद्वितीय प्रावीण्य दाखविलें आणि अखिल भारतीय प्रागतिक पक्षाचें नेतृत्व विद्वत्ता, वक्तृत्व, कळकळ आणि देशभक्ति या आपल्या गुणांनीं आपणांकडे ओढून घेतलें. आपल्याहून वयानें थोर

अशा बहुतेक सर्व प्रागतिक पुढाऱ्याना हळूहळू त्यांनीं मागें टाकिलें व पुढें मोर्लें-मिंटो-सुधारणाच्या वेळीं शिष्टाई करण्याचे कार्यहि याच त्याच्या अंगच्या गुणांमुळें त्यांच्याकडे आलें पण तो भाग पुढील प्रकरणांत विचारांत घ्यावयाचा आहे.

## दुष्काळांचें भीषण स्वरूप

लॉर्ड कर्झन हिंदुस्थानांत आले, तो काळ हिंदुस्थानच्या दारिद्र्याचा व दुर्दैवाचा होता. १८९७ सालापासून हिंदी जनतेवर दुष्काळ आणि प्लेग हीं दोन अरिष्टें एकसारखीं येत राहिलीं आणि लॉर्ड कर्झन यांच्या अमदानीची सुरुवातच लोकांत उडालेल्या या हाहाःकाराने झाली १८९७ सालचा दुष्काळ हा त्या शतकांतील सर्व दुष्काळांत अत्यंत भयकर, असे लोक म्हणत असत; पण १८९९-१९०० या सालांतील दुष्काळाने त्याच्याहि वर कडी केली आणि लक्षावधि लोक अन्नान्न करून उपासमारीने टांचा घासून मेले यानंतर एकसारखीं चार वर्षें दुष्काळाचींच गेलीं तेव्हां अर्थातच या दुष्काळाचीं कारणे काय, हा प्रश्न लोकांच्यापुढे प्रामुख्यानें येऊन उभा राहिला दुष्काळ आणि प्लेग अशी आपत्तींची जोडगोळी पाहून इहलोक म्हणजे मृत्युलोक आहे असे मानणाऱ्या व बोलणाऱ्या हिंदी जनतेला, हिंदुस्थान म्हणजे या मृत्युलोकातील खाटीकखाना किंवा स्मशानभूमि आहे कीं काय, असें भासूं लागले ! हिंदुस्थान ही एके काळीं अमरभूमि होती, ती आज स्मशानभूमि कां झाली, हा विचार लोकात एकसारखा चर्चिला जात होता. हे दुष्काळ आणि प्लेग आपल्याच देशावर का धाड घालितात आणि इतर देशातील लोक या आपत्तींनीं बेजार कां होत नाहींत, असाहि प्रश्न लोक करू लागले, आणि आपल्या देशाला प्राप्त झालेलें हें स्मशानभूमीचे किंवा खाटीकखान्याचे स्वरूप नैसर्गिक नसून कृत्रिम आहे आणि याचीं कांहीं नैसर्गिक कारणे असलीं, तरी तीं दूर करण्याचीं साधनें आपणास उपलब्ध असून त्यांचा उपयोग आम्ही करू शकत नाहीं, याचे कारण आमचें राजकीय पारतंत्र्य आहे याची जाणीव हिंदुस्थानातील निवृत्तिमार्गी व अल्पसंतुष्ट जनतेलाहि होऊ लागली. इहलोक हा मृत्युलोक असल्यामुळे प्रत्येकास केव्हां तरी मरणे भागच आहे व म्हणून मनुष्याने मरणाची भीति धरू नये हें खरे असलें, तरी प्रत्येक घरातील तरणेताठे कर्ते पुरुष आणि बालबालिका यांच्या चिता रचण्याचा प्रसंग राष्ट्रावर यावा आणि प्रत्येक घरांत बालविधवांची सख्या वाढू लागावी, हे कांहीं या मृत्युलोकाचेंहि शाश्वत चिह्न नव्हे, हे समजण्यास फारशा शास्त्रीय ज्ञानाची गरज नव्हती. तसेंच आपल्याच देशांतील लक्षावधि खंडी धान्य परदेशांत जात असतां आपल्या देशातील शेतकऱ्यांवर लक्षावधि संख्येने उपासमारीने मरण्याची पाळी यावी, यातहि परमेश्वराचा किंवा निसर्गाचा काहीं दोष नसून आपला किंवा आपल्या राजकीय परिस्थितीचाच कांहीं तरी दोष असावा, हे अडाणी मनुष्यासहि सुचण्यासारखें होते.

## सरकारची शिल्लक आणि जनतेचें दारिद्य

पण या विचारांना चालना देऊन आपल्या राजकीय दास्यामुळेंच आपणांवर या आपत्तींची परंपरा ओढवत आहे, हे समजण्यास आणखीहि एक कारण होतें. तें म्हणजे देशांतील सामान्य जनता दारिद्र्यानें, दुष्काळानें आणि रोगाच्या साथींनीं मृत्युमुखीं पडत असता याच देशातील अधिकारीवर्ग सुखात आणि चैनींत रहात होता आणि शेतकऱ्याच्या तिजोरीचें दिवाळे निघत असता सरकारच्या तिजोरींत पैशाचा वर्षाव होत होता. लॉर्ड कर्झन याची कारकीर्द म्हणजे जनतेची उपासमार आणि सरकारची भरभराट अशी होती आणि या दोन स्थितींतील विरोध आंधळ्यालाहि दिसण्यासारखा होता. बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं इ. स. १९०१ सालच्या अहमदाबाद येथील राष्ट्रसभेच्या अध्यक्षीय भाषणात या विरोधी दृश्याचें फार मार्मिक विवेचन केलें आहे त्यात ते म्हणतात, "An overflowing treasury with a starving population is an anamoly which will strike everyone." या भाषणात त्यांनीं सर्व एकोणिसाव्या शतकांतील दुष्काळाचा आढावा घेऊन पुढील उद्गार काढिले आहेत : "अगदीं नेमस्त हिशेब केला तरी १८७७, १८७८, १८८९, १८९२, १८९७ आणि १९०० या सर्व दुष्काळांत मिळून दीड कोटी लोक तरी मृत्युमुखीं पडले आहेत दुसरा एक हिशेब असा आहे, कीं ही सख्या दोन कोटी, साठ लक्ष तरी असावी...जर युरोपियन तुर्कस्तानांतील मुसलमान राज्यकर्त्यांनीं आपल्या युरोपियन मुलुखात मृत्युसख्येचा आकडा असा फुगूं दिला असता, तर या राज्यकर्त्यांना आपल्या बाडबिछान्यासहित युरोपांतून हांकलून द्या अशी आग्रहाची मागणी सर्वांनीं केली असती; व त्याना कोणतीहि शिक्षा केली असती तरी ती सौम्यच गणली गेली असती. पण जगांतील सुधारलेल्या लोकमताच्या कक्षेंत हिंदुस्थान येऊ शकत नाहीं आणि ज्या मोठ्या राष्ट्राच्या हवालीं सर्वज्ञ परमेश्वरानें हिंदुस्थानचें भवितव्य केलें आहे, त्याची मनोदेवताहि हिंदी जनतेच्या आपत्तींनीं जागृत होत नाहीं असे दिसतें !

## वाढत्या मृत्युसंख्येची मीमांसा

"पण वरील आकड्यावरून जी कल्पना येते, त्याहूनहि आमचें दुष्काळजन्य मृत्युसख्येचें स्वरूप अधिकच भीषण आहे. याची कल्पना येण्यासाठीं आपण या शतकाचे पंचवीस वर्षांचा एकेक, असे चार विभाग करू या. पहिल्या विभागांत पांच दुष्काळ पडले व त्यांत मृत्युसंख्या एकूण दहा लक्ष झाली असावी. दुसऱ्या विभागांत दोनच दुष्काळ पडले, पण त्यांत पांच लाख लोक मेले. तिसऱ्या चरणांत सहा दुष्काळ पडले व त्यांत मेलेल्या लोकाची संख्या पन्नास लाख नमूद आहे. आपण शेवटच्या चौथ्या चरणांत आलों, म्हणजे परिस्थितीची वाढती भीषणता व्यक्त

होते व मृत्युसंख्येची नोंद फार मोठी व भयानक दृष्टीस पडते. या पंचवीस वर्षांत अठरा वर्षे दुष्काळाचीं गेलीं आणि त्या दुष्काळांत दोन कोटी, साठ लक्ष लोक मृत्युमुखीं पडल्याची नोंद दृष्टीस पडते. त्यांतल्या त्यांत गेल्या शतकाच्या शेवटच्या वर्षातील दुष्काळ सर्वांत अधिक भीषण होता, असे खुद्द व्हाइसरॉयसारख्या थोर अधिकारी पुरुषाचेंहि मत आहे. यावरून असे दिसून येईल, कीं गेल्या शतकांत दुष्काळ ही एक नित्याचीच आपत्ति होऊन बसली होती, त्यानें लक्षावधि लोकांचे बळी घेतले आणि जसजसा त्या शतकांतील काळ जाऊं लागला व शेवट जवळ आला तसतसे दुष्काळ वारंवार पडूं लागले आणि त्याची भीषणताहि वाढू लागली. या शतकातील पहिल्या अर्धापेक्षा दुसऱ्या अर्धांत दुष्काळ अधिक वारवार व अधिक भीषण कां होऊं लागले? अखेरच्या चरणातील दुष्काळ सर्वात अधिक व सर्वांत भीषण कां झाले? आणि शतकाच्या अखेरच्या वर्षात पडलेला दुष्काळ त्यांतल्या-त्यांत अधिक भीपण का होता? याचीं कारणे मला कोणी समजावून देईल काय? लोकांचें दारिद्र्य वाढत आहे असेंच यावरून दिसत नाहीं काय?" यानंतर या दुष्काळांचें कारण अनावृष्टि हें नाहीं हें समजावून देऊन ते म्हणतात: "दुसऱ्या देशांतहि अनावृष्टि होते, पण तेथें दुष्काळ पडत नाहींत. म्हणून हिंदी दुकाळांचीं कारणें आपण अधिक खोल दृष्टि पोहोंचवून शोधिलीं पाहिजेत. केवळ अनावृष्टीनें त्याचा उलगडा होऊं शकत नाहीं निर्धनता हे हिंदी दुष्काळांचें मुख्य कारण आहे. लोक जर यापेक्षा थोडे अधिक सुस्थितींत असते, नित्याच्या दारिद्र्याने ते ग्रस्त झालेले नसते, तर एकाद्या प्रदेशात अनावृष्टि झाल्यास लोकांनीं शेजारच्या प्रदेशातून धान्य विकत आणिले असतें किंवा आपल्याच गावात सुबत्तेच्या काळांत दुष्काळा-साठीं धान्याचीं कोठारे भरून ठेविलीं असतीं पण आज त्यांच्यापाशीं मुळींच द्रव्य उरलेले नाहीं. ते दारिद्र्याच्या खोल दरींत बुडालेले आहेत, ते हातांतोंडावर जगत असतात, पुष्कळ वेळा दिवसाकाठीं एकच जेवण जेवून अर्धपोटीं राहतात, दुष्काळाचा पहिला आघात झाला कीं हजारोंनीं अगर लाखोंनीं मरूं लागतात; आणि परिस्थितीची भीषणता वाढूं लागली म्हणजे लक्षावधि अगर कोट्यवधि संख्येनें होणारे हे मृत्यू निवारण करण्याचे उदार प्रयत्न सरकारने कितीहि केले, तरी त्यांचें निवारण होऊ शकत नाहीं" §

## टिळक-गोखले यांचें व्यक्तिमत्त्व

या वेळीं सरकारने रुपयाचा भाव १ शिलिंग २ पेन्सावरून १ शिलिंग ४ पेन्सांवर नेला होता सरकारनें १८८५ सालापासून दरसाल सुमारें ९ कोटी रुपये उत्पन्न अधिक येईल अशा मानाने कर वाढविले होते. आणि आता हुडणावळीचा भाव वाढल्याने विलायतेस पाठवावी लागणारी रक्कम मात्र कमी लागूं लागली, तरीहि

§ Congress Presidential Addresses, P. 572-74

सरकारनें करांचा भार कमी केलेला नव्हता. ना. गोखले यांनीं लॉर्ड कर्झन याच्या अमदानींत सरकारी अंदाजपत्रकांवर जीं मुद्देसूद, सुबोध आणि सरस भाषणे केलीं, त्यांत सरकारच्या तिजोरींत सालोसाल ही शिल्लक कां उरत आहे, तिचा विनियोग राष्ट्रसंवर्धनासाठीं कसा करावा, लोकांच्या डोक्यांवरील करांचा भार थोडा तरी उतरवून ही शिल्लक कमी करणे हे सरकारचे कर्तव्य कसें आहे, आणि या शिलकीमुळें देशाची भरभराट व्यक्त होत नसून जनतेवर वाजवीपेक्षा करांचा भार अधिक लादला जात आहे व तिच्यावर अधिक जुलूम होत आहे हेच कसें सिद्ध होते, ते उत्कृष्टपणें दाखवून दिलेले आहे दरिद्री देशाचे अदाजपत्रक कसे आंखावे, कोणत्या वर्गावर किती कर असावा, कोणता कर कसा कमी करावा, सामान्य जनतेची स्थिति सुधारण्यास कसे साहाय्य करावे आणि तिच्या सुशिक्षित पुढाऱ्यांना देशाच्या जमाखर्चावर नियत्रणाचा हक्क दिल्यास ते आपला आयव्यय कसा आखतील, याचे शास्त्रशुद्ध पण सुबोध, आणि साधार पण सरस विवेचन जर कोणास वाचावयाचें असेल, तर ते ना. गोखले यांच्या या वेळच्या अंदाजपत्रकांवरील भाषणात वाचावयास सापडेल. याचमुळें ज्या ॲंग्लो-इडियन पत्रकारांनीं लो टिळकांना पार्नेलची उपमा दिली, त्यानींच ना गोखले यांना ग्लॅडस्टन्‌ची उपमा दिली आणि आमच्या मते या दोन्ही उपमा यथार्थ होत्या. फरक इतकाच आहे, कीं ग्लॅडस्टन् हा भरपूर पगार घेऊन आपल्या देशाचा कारभार करूं शकत होता, आणि ना. गोखले याचा देश परतंत्र असल्यामुळे त्यांना दारिद्र्यांत राहण्याचे व्रत अगीकारून सरकारी धोरणावर निष्फळ टीका करून केवळ बुद्धिमत्तेचे व देशभक्तीचे प्रदर्शन करून स्वस्थ बसावे लागत होते ! असाच फरक लो. टिळक आणि पार्नेल याच्यात होता. चारित्र्याची शुद्धता व तेजस्विता या गुणात तर लोकमान्य पार्नेलपेक्षा श्रेष्ठ होतेच; पण त्याचा देश आयर्लंडच्या पंधरा-वीसपट तरी मोठा असून त्याची स्थितिहि तितक्याच प्रमाणात अधिक अवनत होती अशा खडतुल्य प्रचड राष्ट्राला जागृत आणि प्रतिकारक्षम करणे हें कार्य आयरिश पुढाऱ्यांपुढील कार्यापेक्षा अनेक पटींनीं अधिक बिकट आणि कमी फलप्रद असें होते. या देशातील हे कार्य करण्यास निष्काम कर्मयोगीच समर्थ होऊ शकतो, या दृष्टीने विचार केल्यास ना गोखले आणि लो टिळक याची वास्तविक योग्यता ग्लॅडस्टन् किंवा पार्नेल यांच्यापेक्षा व्यक्तिदृष्टया फार मोठी होती. पण त्यांचा जन्म मागासलेल्या संस्कृतींत झालेला असल्याने त्यांची तुलना युरोपीय संस्कृतींत जन्मास आलेल्या श्रेष्ठ मुत्सद्द्यांशीं होऊं शकते, हें पाहूनहि त्या वेळच्या लोकांना एक प्रकारचा अभिमान वाटत असे आणि आमचें प्राचीन श्रेष्ठत्व आम्हांस पुनः प्राप्त होऊ शकेल अथवा इतर राष्ट्रांच्या बरोबरीला आम्ही येऊं शकूं, असा आत्मविश्वास त्यांना वाटू लागे. ना. गोखले याच्या राजकारणांत, हिंदुस्थानांतील ॲंग्लो-इडियन समाज, नोकरशाही व ब्रिटिश भांडवलशाही यांचे प्रतिनिधिभूत हिंदुस्थान-सरकार हा परंपरारक्षक कॉन्झर्वेटिव पक्ष, आणि हिंदी जनतेचा प्रातिनिधि-

भूत सुशिक्षित पुढारी वर्ग हा प्रागतिक पक्ष किंवा लिबरल पक्ष, अशी भूमिका गृहीत धरलेली असे; आणि लोकमान्याच्या राजकारणात ब्रिटिश-सरकार हे परकीय जेते आणि हिंदी पुढारी हे देशाला पारतंत्र्यांतून स्वातंत्र्यांत नेणारे जनतेचे विश्वस्त लोकनायक ही भूमिका गृहीत असे पहिल्या पक्षाला हिंदुस्थानातील राजकारणाचें स्वरूप अनियंत्रित राजसत्तेचे लोकसत्तेत रूपांतर करण्याचे भासे, तर दुसऱ्या पक्षाला एका राष्ट्राच्या कचाटींतून दुसऱ्या राष्ट्राला मुक्त करणे हे त्याचे स्वरूप भासे. पहिल्याला आपण जित राष्ट्र आहो हे ढळढळीत दिसणारे दृश्य विसरणें शक्य नव्हतें, तसेच दुसऱ्याला आपले भावी स्वराज्य लोकसत्ताक होणार याची विस्मृति होणेंहि शक्य नव्हतें. पण पहिल्याचा भर लोकसत्ताक उदार तत्त्वावर विशेष, तर दुसऱ्याचा भर स्वातंत्र्यप्राप्तीच्या धगधगीत राष्ट्रीय भावनेवर अधिक. पहिल्याची राष्ट्रीय भावना चंद्राप्रमाणे शीतल आणि सौम्य, तर दुसऱ्याची स्वातंत्र्यभावना मध्याह्नीच्या सूर्याप्रमाणे प्रखर आणि तेजस्वी पहिल्या पक्षातील काही लोक केव्हा केव्हा आपण जित राष्ट्र आहों याचें विस्मरण होऊन अधिकारारूढ पक्षाशीं एकाच देशांतील भिन्नवर्गीयांप्रमाणे किंवा भिन्नपक्षीयांप्रमाणे वागत असत, तर दुसऱ्या पक्षातील काही लोक हिंदी स्वराज्य सामान्य लोकांच्या शक्तीनें मिळणार व ते लोकसत्ताकच असणार याचें विस्मरण होऊन देशातील स्वातंत्र्याचे अवशेष जे मध्ययुगीन संस्थानिक त्यांच्याकडे स्वातंत्र्यप्राप्तीच्या आशेनें पहात असत. असा या दोन पक्षातील मूलभूत दृष्टिकोणांत तात्त्विक भेद होता लॉर्ड कर्झन याच्या अरेरावी व उद्दाम कारकीर्दीत हा तात्त्विक भेद अधिकाधिक स्पष्ट आणि विशद होत गेला आणि त्या मानानें दोन पक्षातील अंतरहि वाढत चालले

## कर्झन यांची उद्दाम अमदानी

हिंदुस्थानातील प्रागतिक पक्षाच्या राजकारणाचा पायाच खणून काढणे, हे लॉर्ड कर्झन यांचें ध्येय किंवा धोरण होतें ब्रिटिश राणीनें १८५८ साली काढिलेला जाहीरनामा आणि ब्रिटिश मुत्सद्यानीं वेळोवेळीं दिलेलीं आभिवचने हा प्रागतिक राजकारणाचा आधारभूत पाया होता राणीचा जाहीरनामा म्हणजे कांहीं राजा व प्रजा यांच्यामध्ये झालेला कायदेशीर करार नव्हे, हे लॉर्ड कर्झन यांनीं स्पष्टपणे बोलून दाखविले आणि या जाहीरनाम्याला महाभारतादि पुराणात वर्णिलेल्या राजधर्माहून अधिक किंमत नाहीं, म्हणजे या पुराणांतील वाग्यानीं भुकेलेल्या हिंदी सुशिक्षितांचें पोट कधींच भरणार नाहीं, असें त्यांनीं सुशिक्षितांना सांगितलें तसेच हिंदी लोक कितीहि शिकले, तरी इंग्लिश नोकरशाहीच्या अंगीं जी कार्यक्षमता आहे व जी तिला अनुवंशिक संस्कारांनीं अथवा अनेक वर्षांच्या परंपरागत संस्कारांनीं प्राप्त झालेली आहे, ती हिंदी सुशिक्षिताच्या अंगीं कधींच येणें शक्य नसल्यामुळें देशांतील सर्व वरिष्ठ अधिकार नेहमींच इंग्रजांच्या हातीं ठेविले पाहिजेत, असे त्यांचे

मत होते* व तें ते उघडपणें बोलून दाखवीत. म्हणजे हिंदी लोकाना हळूहळू सुशिक्षित करून त्यांच्या हातीं त्याच्या देशाचा राज्यकारभार देणें हें आमचें ध्येय आहे असे जें पूर्वीचे कांहीं मुत्सद्दी बोलत व ज्यावर विसंबून राष्ट्रसभेची पहिली पिढी वागे, तें सर्व केवळ थोताड आहे व त्यावर विश्वास ठेवणारे लोक मूढ आहेत, असे ते आपल्या कृतीवरून व उक्तीवरून दाखवीत. याच्याहि पुढे जाऊन ते असे म्हणत, कीं हे जे इंग्रजी शिकून लोकसत्तेच्या गप्पा मारणारे मूठभर सुशिक्षित लोक आपणांला जनतेचे पुढारी म्हणवून घेत आहेत, त्यांना जनतेचें हित मुळींच कळत नाहीं व तिकडे त्यांचे मुळींच लक्ष नाहीं. या सुशिक्षिताना पूर्वीसारख्या नोकऱ्या आज मिळत नाहींत म्हणून हे राजद्रोही झाले आहेत, पण सामान्य जनता राजनिष्ठ आहे. तिचें हित कसें करावे ते ब्रिटिश नोकरशाहीलाच कळते व या गोऱ्या नोकरशाहीवर जनतेचे खरें प्रेमहि आहे, असें त्यांचें म्हणणें होतें यानतर सुशिक्षित लोकानीं आपली पात्रता सिद्ध करण्यासाठीं कितीहि युक्तिवाद लढविले, तरी ते निष्फळ होते. नोकरशाही समजते त्याप्रमाणे सामान्य जनता तिच्याशीं राजनिष्ठ नाहीं आणि लोकांवर राज्य करण्याची घमेंड गोऱ्या नोकरशाहीनें कितीहि मारिली, तरी ब्रिटिश राज्यघटनेचा गाडा ती त्याना चालवू देत नाहीं हे प्रत्यक्ष प्रत्ययाला आणून देणें, हाच एक मार्ग लॉर्ड कर्झन याचे मत खोटें आहे असे सिद्ध करण्यास उरला होता हे ओळखून आपल्या अडवणुकीच्या धोरणाची आंखणी करणें हें आतां सुशिक्षित पुढाऱ्याना क्रमप्राप्तच होते, पण ह कार्य ना. गोखले यांच्या पक्षाकडून होण्याची आशा नव्हती. तें कार्य करण्याच्या धोरणाचा अवलब राष्ट्रसभेनें आतां केला पाहिजे, असा तर्कशुद्ध निष्कर्ष लो टिळकानीं काढिला आणि तें धोरण तिला लाविण्यासाठीं राष्ट्रसभा हस्तगत करण्याचाहि प्रयत्न करण्याचा निश्चय त्यांनीं लॉर्ड कर्झन याच्या अमदानीच्या अखेरीस केला

लॉर्ड कर्झन यानीं आपल्या हातीं राजसत्ता घेतल्यापासून युनिव्हर्सिट्यांच्या सीनेटमधील सरकारनियुक्त सभासदाची संख्या वाढव, कलकत्ता-कॉर्पोरेशनमधील सरकारनियुक्त सभासद अधिक कर, प्रांतिक गव्हर्नराचे व प्रातिक सरकारांचे अधिकार कमी करून त्यांच्यावर देखरेख करणारे हिंदुस्थान-सरकारचे अधिकारी वाढव, प्रांतिक अधिकारी वर्गात भरणा करतांना चढाओढीच्या परीक्षाचें तत्त्व मागे टाकून सरकारनियुक्ततेचें धोरण स्वीकार, वगैरे अनेक गोष्टी करून हिदुस्थानांतील राज्य-

* "He decided to reserve all higher posts for Englishmen for the reason that they possess, partly by heredity, partly by upbringing and partly by education, the knowledge of the principles of government, the habits of mind and the vigour of character which are essential for the task"

—*Landmarks in Indian Constitutional and National Development*, *by G. N. Singh, P. 223.*

कारभार सर्वतोपरी अनियंत्रित व एकतंत्री करण्याचा प्रयत्न सुरू केला. अंतर्गत राज्य-कारभार अनियंत्रित व एकतंत्री करण्यांत हिंदुस्थानाबाहेर ब्रिटिश साम्राज्याची वृद्धि करणे हें त्याचें मुख्य धोरण होते. वायव्य-सरहद्दप्रांत स्वतंत्र करून अफगाणिस्तानला शह द्यावा, तिबेटवर स्वारी करून चीनला जरब बसवावी आणि रशियाला पायबंद घालावा, असें त्याचे साम्राज्यशाही व लष्करशाही धोरण होतें. अनियंत्रित सत्तेचें केंद्रीकरण आणि आक्रमणशील परराष्ट्रीय धोरण, यांच्यापुढे हिंदी पुढाऱ्यांच्या वाढत्या लोकसत्ताक आकांक्षांना मुळींच अवकाश नव्हता.

ता. २९ ऑगस्ट १९०५ रोजीं लिहिलेल्या केसरींतील अग्रलेखांत लोकमान्यांनीं लॉर्ड कर्झन यांचें वर्णन पुढीलप्रमाणें अत्यंत मार्मिकपणें केलें आहे : "लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दीच्या तोडीस जुना दाखला द्यावयाचा असल्यास, तो पुष्कळ अशीं औरंगजेबाचा घेतल्यास चालेल साम्राज्य, अखंडित साम्राज्य, अप्रतिहत आणि चिरस्थायी साम्राज्य; अर्थात् साम्राज्यांतील प्रजेचे चिरकालीन दास्य हीं कर्झन-साहेबाच्या धोरणाचीं प्रतिपदोक्त लक्षणें होत हिंदुस्थानातील किंवा आशिया-खंडातील लोकाबद्दल त्याच्या अंगीं थोडीबहुत सहानुभूति आहे, पण ती सहानुभूति आईबाप आपल्या लहान मुलाबद्दल जी ममता दाखवितात, तशा प्रकारची आहे. आम्ही, म्हणजे इंग्रजी राज्यकर्ते, हेच काय ते शारीरिक व मानसिक गुणानीं मोठे असून तुम्ही म्हणजे हिंदुस्थानांतील प्रजाजनांनीं त्यांच्या हाताखालीं पोराप्रमाणें वागावे, त्यांतच तुमचें कल्याण आहे, असा त्या सहानुभूतीचा अर्थ आहे. जोपर्यंत हिंदुस्थानांतील लोक अशा रीतीने वागतील, तोंपर्यंत त्यांस इतर बाबतींत त्रास होऊ नये असें लॉर्ड कर्झन यांचें मत होतें; आणि या मतास अनुसरूनच इंग्रजी सोल्जरांचा सुळसुळाट किंवा खालील दर्जाच्या इंग्रजी अंमलदाराचा जुलूम बंद करण्याबद्दल त्यांनीं सक्तीने हुकूम सोडले होते. साम्राज्य टिकण्याकरिता, साम्राज्य चिरस्थायी होण्याकरितां अथवा साम्राज्याची बडेजावी वाढण्याकरिता प्रजेचे हातपाय जितके तोडावयास पाहिजेत, किंवा त्यांचा जितका हिरमोड अथवा छाटाछाट करावयास पाहिजे, तितकी करण्यास लॉर्ड कर्झन यांस कधींहि दिक्कत वाटली नाहीं. परंतु याप्रमाणें जिंकिलेल्या देशांची किंवा लोकांची छाटाछाट करून त्यास कायमचें चीत केल्यावर मग त्यांचा विनाकारण कोणीं छळ करूं नये, याबद्दल लॉर्ड कर्झन यांची मोठी करडी नजर असे! किंबहुना, साम्राज्य चालविण्यास अशा प्रकारची जाचणूक अहितकारक आहे असे ते मानीत आपण ज्याप्रमाणें घरच्या गुरांचीं शिंगें तोडून किंवा वळवून त्यास निरुपद्रवी बनवितों आणि अशा रीतीने त्याच्यापासून भीति नाहींशी झाल्यावर त्यांच्या संगोपनाची, त्यांस योग्य वेळीं दाणावैरण देण्याची कोणी हयगय केल्यास अथवा विनाकारण त्यांस उपद्रव दिल्यास त्यास रागें भरतों, तशा प्रकारचें लॉर्ड कर्झन यांचें हिंदुस्थानच्या प्रजेवर प्रेम होते. शौर्यानें, विद्येने, व्यापारानें किंवा संपत्तीनें हिंदुस्थान देशानें नेहमीं अंकित राहिले पाहिजे, इंग्लंड

देशाच्या राज्यकर्त्यांशीं कधींहि स्पर्धा करून उपयोगी नाहीं, अशी या राजश्रीची पक्की समजूत होती."*

सुशिक्षित लोकांच्या स्वातंत्र्याकांक्षेला याप्रमाणें दडपून टाकिलें, तरी आपण सामान्य जनतेच्या हिताकरिता पुष्कळ गोष्टी केल्या आहेत अशी जी त्यांनीं प्रौढी मारिली होती, तिच्यांतील हेत्वाभास ना. गोखले यांनीं आपल्या १९०५ सालच्या राष्ट्रसभेच्या अध्यक्षीय भाषणांत पुढीलप्रमाणें दाखवून दिला आहे : " मिठावरील कर कमी केला, दुष्काळातील साऱ्याची थकबाकी माफ केली, प्राथमिक शिक्षणास व पाटबंधाऱ्यांस अधिक देणगी दिली आणि पोलीसखात्याच्या सुधारणेचे प्रयत्न केले, या आधारावर आपण जनतेचे हित केले आहे अशी प्रौढी लॉर्ड कर्झन सांगत आहेत. ते असे सुचवीत आहेत, कीं त्यांनीं या गोष्टी सुशिक्षितवर्गाच्या विरोधाला-निदान उदासीनतेला—न जुमानतां अमलांत आणिल्या, पण उघड वस्तुस्थिति अशी आहे, कीं या गोष्टी कराव्यात याबद्दल राष्ट्रसभाच सरकारला अनेक वर्षें विनति करीत होती व तिच्या अनेक वर्षांच्या चळवळीनतरच सरकारने या इष्ट दिशेनें थोडी प्रगति केली आहे. चार वर्षांपूर्वी सरकारी तिजोरींत सात कोटी रुपये किंवा सुमारें पन्नास लक्ष पौंड शिल्लक असतानासुद्धां जेव्हां सरकार करांचा भार यत्किंचित् कमी करण्यास तयार होईना आणि मीं मिठावरचा कर कमी करावा अशी सूचना केली, तेव्हा जनतेवरील करांच्या भारासंबधीं आणि मिठावरील कर कमी करून तिला साहाय्य करण्याची 'जे बडबड करतात' त्यांची लॉर्ड कर्झन यानींच कशी चेष्टा केली, ते मला बरोबर स्मरते लॉर्ड लॅन्सडाउन आणि सर डेव्हिड बार्बर यानीं रुपयाचा भाव कृत्रिम रीतीने वाढविण्याचा जो कायदा केला, त्यामुळे हिंदुस्थान-सरकारला विलायतेस पाठवाव्या लागणाऱ्या रकमेत सुमारे चाळीस लक्ष पौंड (सहा कोटी रुपये) बचत होऊं लागली. अशा वेळींच लॉर्ड कर्झन हे हिंदुस्थानांत आले हे त्याचे सुदैव होय याच्याचबरोबर अफूच्या जमाबदींतहि सरकारला अधिक फायदा होऊं लागल्यामुळे लॉर्ड कर्झन यांची कारकीर्द सपेपर्यंत सरकारी तिजोरींत सांठणारी मोठी शिल्लक नेहमीं त्यांच्या हातांत खेळत असे आणि त्यांच्या पूर्वींच्या अधिकाऱ्याना पैशाची जशी टचाई भासे, तशी त्यांना कधींच भासली नाहीं ही शिल्लक पडणारी रक्कम किती मोठी होती, याचा विचार केल्यास लॉर्ड कर्झन यांनीं कर भरणारांचा भार कमी करण्यांत फारसें औदार्य दाखविले आहे, असें मला वाटत नाहीं. गेल्या मार्चमध्यें त्यांनींच हा भार ७० लक्ष पौडांनीं कमी झाला असें म्हटलें होतें. पण याच काळांत सरकारच्या चालू खर्चास लागणाऱ्या खर्चापेक्षां ३ कोटी, ३० लक्ष पौडांइतकी रक्कम त्यांनीं कर भरणाऱ्या जनतेकडून जादा वसूल केली आहे, याचा मात्र उल्लेख त्यानीं त्या वेळीं केला नाहीं. शिवाय रुपयाचा भाव कृत्रिमतेनें वाढविल्यामुळें लोकांनीं चांदीच्या रूपानें टाकलेल्या शिलकेची किंमत

* लो. टिळकाचे केसरींतील लेख, भाग १ रा, पृ. १५-१६.

किती घटली, आणि रुपयाच्या नव्या भावाच्या प्रमाणांत मालाच्या किंमती मंदावूं लागल्याने जनतेवरील सावकारी देण्याचा भार किती वाढला, त्याचा विचार केल्यास मिठावरील कर कमी करून व साऱ्याची थकबाकी माफ करून जनतेचे केलेलें हित किती क्षुद्र आहे, त्याची बरोबर कल्पना आपणांस येऊ शकते. लॉर्ड कर्झन यांनीं प्राथमिक शिक्षणाला दिलेल्या देणग्यांचाहि बराच गाजावाजा करण्यांत येत असतो. पण हिंदुस्थानातील सरकार जनतेच्या शिक्षणासाठीं किती थोडा पैसा देतें, तें लक्षांत घेतल्यास इतकी मोठी शिल्लक तिजोरींत पडत असतां, लॉर्ड कर्झन यांनीं जनतेच्या शिक्षणाला जेवढी रक्कम दिली तेवढीहि दिली नसती, तर आश्चर्यच वाटलें असतें पण त्यांनीं एकीकडे शिक्षणाला अडीच लक्ष रुपये अधिक दिले असले, तर दुसरीकडे लष्करी खर्चात त्यांनीं दरसाल पन्नास लक्षांची भर टाकली आहे आणि अनेक खात्यांतील युरोपियनांचे पगार वाढवून आणि त्यांच्यासाठीं अनेक नव्या जागा निर्माण करून त्यांनीं निष्काळजीपणाने पैशांची उधळपट्टीहि केलेली आहे त्यांच्या काळांत ग्लॅडस्टन् म्हणत त्याप्रमाणें सर्व खात्यांत खर्च करण्याची वृत्ति फैलावत गेली असून जुन्या लोकांचा काटकसरीचा गुण त्यांनीं कधींच दाखविला नाहीं. पण राज्यकर्त्यांच्या या काटकसरीच्या गुणावरच जनतेचे खरें हित अवलंबून असतें ''* लॉर्ड कर्झन याच्या कारकीर्दीचे सामान्य राजकीय व आर्थिक धोरण काय होतें, याची कल्पना लो टिळकाचा याच्या मागचा उतारा आणि ना. गोखले यांचा हा उतारा, यांवरून वाचकांस येऊ शकेल त्यांच्या ज्या एका अरेरावी महत्कृत्यामुळे त्यांचें नांव आधुनिक भारताच्या इतिहासांत चिरतन झालें आहे, त्या कृत्याची माहिती अद्यापि वाचकांस द्यावयाचीच आहे तें महत्कृत्य म्हणजे बगालची फाळणी ऊर्फ वंगभंग हेंच होय बंगालमध्यें जो निःशस्त्र व सशस्त्र क्रातिवाद जन्मास आला आणि ज्या बगाली राष्ट्रवादाची शक्ति राष्ट्रसभेच्या राजकारणामागे उभी करण्यासाठीं लो टिळकांनीं जंगजंग पछाडले, त्याचा प्रथम आविर्भाव या वगभंगाच्या प्रतिकाराच्या रूपानें हिदुस्थानांत झाला. हा आधुनिक भारताच्या इतिहासांतील अत्यंत मनोरम आणि उत्साहवर्धक भाग आतां पुढील प्रकरणांत वाचकांस निवेदन करावयाचा आहे

* Gokhale's Congress Presidential Address, 1905.

९

# बंगालमधील क्रांतिवादी आध्यात्मिक राष्ट्रवाद

" Oppression was, therefore, inevitable, and oppression was necessary that the people as a whole might be disposed to accept Nationalism But Nationalism was not born of repression The oppressions and slaughters committed by Kansa upon the Yadavas did not give birth to Krishna but they were needed that the people of Muttra might look for the deliverer and accept him when he came. Nationalism is an Avatar and cannot be slain. Nationalism is a devinely appointed Shakti and must do its God-given work before it returns to the bosom of the Universal Energy from which it came "

—*Bande Mataram* *

**इसवी** सन १९०४, १९०५, १९०६, आणि १९०७ या सालातील राष्ट्रसभांचीं अधिवेशनें अत्यंत उत्साहाचीं आणि वाढत्या महत्त्वाचीं झालीं एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या चरणांत जे तरुण देशभक्त १८७५ पासून १८८५ पर्यंतच्या काळांत निरनिराळया प्रांतात देशकार्यास लागले, त्यांना १९०४-०५ पर्यंतच्या काळांत अखिल भारतीय कीर्ति प्राप्त होऊ लागली होती आणि त्याच्या स्वाभिमानी राष्ट्रीय वृत्तींतून एक प्रभावशाली असा नवा राष्ट्रीय पक्ष सघटित होऊ लागला होता. तसेंच इग्लडात १९०५ सालीं पार्लमेंटच्या नव्या निवडणुकी होऊन कॉन्झर्वेटिव पक्षाच्या ऐवजीं लिबरल पक्ष अधिकारावर आल्यास राष्ट्रसभेच्या मागण्यांस काहीं तरी फल प्राप्त होईल अशी आशा दादाभाई, ह्यूम, वेडरबर्न वगैरे राष्ट्रसभेच्या इग्लंडातील कार्यकर्त्यांस वाटू लागली होती. १९०४ सालीं मुंबईस भरणाऱ्या राष्ट्रसभेच्या अध्यक्षपदासाठीं सर हेन्री कॉटन यांची योजना करण्याचा सल्ला इग्लडांतील या कार्यकर्त्यांनीं विशिष्ट हेतूनें दिलेला दिसतो सर हेन्री कॉटन हे बंगाल प्रांतांत काम केलेले सेवानिवृत्त सिव्हिल सर्व्हंट असून ते आसामचे लेफ्टनट गव्हर्नरहि होते आणि त्यानीं नोकरीवर असतानाच बगाल प्राताची विभागणी करण्याच्या सूचनेला विरोध केलेला होता शिवाय, ते प्रथमपासून राष्ट्रसभेचे हितचिंतक होते त्यांनीं " न्यू इडिया " नांवाचें एक पुस्तक १८८७ सालीं लिहिलें होतें व त्याची त्यांनीं याच सुमारास नवी आवृत्ति काढून त्यात हिंदुस्थानांत अमेरिकेप्रमाणे एक संयुक्त लोकसत्ताक राज्य स्थापन करावे, अशा ध्येयाचा पुरस्कारहि केला होता शिवाय इंग्लंडांत राष्ट्रसभेच्या वतीनें निघणाऱ्या 'इडिया' पत्राच्या संपादकाचें कामहि ते करीत असत सर हेन्री कॉटन यांच्याबरोबर सर विल्यम वेडरबर्न हेहि येणार होते. राष्ट्रसभेंतील नव्या-जुन्या पिढीच्या राजकारणांत व दृष्टिकोणांत जें मोठें अंतर पडूं लागलें होतें ते नाहींसें करून राष्ट्रसभा सघटित, प्रभावी आणि तरुण पक्षाच्या उत्साहानें

* Selections from the Bande Mataram, P 168-69.

प्रबल बनवावी आणि या संघटित राष्ट्रीय बलाच्या साहाय्याने ब्रिटिश मुत्सद्याकडून राज्यघटनेंत बऱ्याच महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणाव्यात, असे इग्लंडांतील दादाभाई, ह्यूम, वेडरबर्न वगैरे मंडळींचें धोरण होतें. दादाभाई आणि सर हेन्री कॉटन हे ब्रिटिश पार्लमेंटच्या निवडणुकीसहि उभे राहणार होते

## वृद्ध दादाभाईंची दूरदृष्टि

दादाभाई, वेडरबर्नप्रभृति पुढाऱ्यांनीं नव्या पक्षाच्या पुढाऱ्यांना मुद्दाम पत्रें पाठवून तुम्हीं राष्ट्रसभेंत उत्साहानें भाग घ्यावा, जे निर्णय बहुमतानें ठरतील ते उभय पक्षांनीं मान्य करावेत आणि राष्ट्रसभा प्रबल बनवावी, अशी विनति केली होती. या वेळीं टिळकांना लिहिलेल्या पत्रांत दादाभाई म्हणतात : " मी जे लिहिणार आहें, तें केवळ स्नेहभावाचे आहे असें समजा पूर्वीं न्यू इंग्लिश स्कूल काढण्याच्या वेळीं तुमचें-माझें भाषण झालें तें मला चागले स्मरतें तेथपासून तुमचे कामहि फार चागले झाले आहे. तुम्ही छळहि पुष्कळ सोसला मी आज पत्र लिहितों याचे कारण असे : पुढील राजकारणाच्या क्षेत्रांत युद्ध करण्याचे राष्ट्रीय सभा हें एक आपलें शस्त्र झाले पाहिजे. आज ती सर्वगुणपूर्ण नाहीं पण हळूहळू तिला आम्ही प्रबल करूं इच्छितों केसरींतून तुम्ही तिला खालीं ओढीत आहा असे कळतें आणि अशा रीतीनें ती जर एक्दा निर्बल झाली व तिला इजा पोचली, तर याचीच दुरुस्ती करण्याला आम्हाला पुष्कळ काळ लागेल. सरकारशीं भांडतांना आम्ही सर्व एकदिलाचे असलों पाहिजे. टीका करावयाची, तर ती स्नेहभावाची व उत्तेजनकारक असावी. कॉंग्रेस आज मोडली तर ते हिंदुस्थानला मोठे सकट व ॲंग्लो-इडियन लोकांचा तो एक जय होईल. तुम्ही मुंबईस हजर राहून विषयमंडळात सूचना माडा बहुमतानें निकाल होईल तो सर्वांनीं मान्य करावा राष्ट्रीय कार्याकरितां तुम्हाला फार कष्ट सोसावे लागले, म्हणून तुमच्या प्रयत्नाला सहजच वजन येईल. याकरिता तुमच्या नेहमींच्या उत्साहानें राष्ट्रीय सभेला बळकटी आणण्याचा तुम्हीं प्रयत्न करा. आम्हाला ऐक्यवृद्धि सपादून काम वाढेल व कामाला माणसे अधिक मिळतील असेच करावयाचें आहे. तुमचीं दोन वर्तमानपत्रें व स्वतः तुम्ही यांच्याकडून देशहिताचे असे किती तरी काम होईल. मी लिहितो ते स्नेहभावाचें समजा " हे पत्र ता. २ नोव्हेंबर, १९०४ रोजीं लंडनहून पाठविलेलें आहे.

पार्लमेंटचे एक आयरिश सभासद मि स्विनि यांचें अशाच अर्थाचें ता ९ नोव्हेंबर रोजीं टाकलेलें एक पत्र लो टिळकाना आलें होतें. त्यांत म्हटलें होतें : " प्रो गोखले यांना त्यांच्या उद्योगप्रियतेमुळें राष्ट्रीय सभेत वाजवीहून अधिक वजनदारी देण्याचा आम्हां मंडळीचा विचार असल्याच्या बातम्या तुमच्या कानावर येत असतील. पण तशी आमची इच्छा नाहीं गोखले यांचा उत्साह व त्याचें वक्तृत्व यांचा उपयोग करून घ्यावा असें आम्हांला सहजच वाटतें. पण त्यामुळें धैर्य आणि कोणालाहि न

राजवाडे यांनीं दिलें आहे. तात्पर्य, आपल्या पारतंत्र्यामुळें संस्कृति टिकत नाहीं हें जितकें खरें आहे, तितकेंच आपली संस्कृति अवनत झाली असतां स्वातंत्र्य टिकत नाहीं आणि आपल्या संस्कृतीला उन्नतावस्था प्राप्त करून देण्यासाठीं त्याग करणारे ब्राह्मण व क्षत्रिय निर्माण झाल्याखेरीज स्वातंत्र्य स्थापन करतां येत नाहीं, हें लो. टिळक किंवा राजवाडे यानाहि मान्य होतें. या दृष्टीनें स्वराज्याची राजकीय क्रांति होण्यापूर्वी एक प्रकारची धार्मिक व सामाजिक विचारक्रांति झाली पाहिजे व ही विचारक्रांति कांहीं कर्त्या पुरुषांनीं तरी आचरणांत आणिली पाहिजे, हें राजकीय क्रांतिकारकांनाहि मान्य करावेंच लागतें. 'महाराष्ट्रांतील शिवकालीन समाजरचना' या निबंधांतील राजवाडे यांचे पुढील विचार मननीय आहेत. त्यांत शिवकालापूर्वी महाराष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट होण्यास त्याची सांस्कृतिक अवनति कशी कारण झाली व त्याचें स्वातंत्र्य पुनः त्यास प्राप्त होण्यापूर्वी एक प्रकारची सामाजिक क्रांति कशी घडून आलेली होती, तें त्यांनीं उत्कृष्टपणें विशद केलें आहे.

प्रथमतः आपल्या स्वातंत्र्याच्या अखेरीस आपला सांस्कृतिक ऱ्हास कसा होत होता त्याचें वर्णन करताना राजवाडे लिहितात : "दक्षिणेंत चातुर्वर्ण्यसंस्थेची शक ४०० च्या सुमारास शबरस्वामी व शंकराचार्य ह्यांच्यासारख्या ब्राह्मणांच्या बुद्धिवैभवानें आणि चालुक्यांसारख्या क्षत्रियांच्या बाहुबलानें जी पुनः स्थापना झाली, ती शक १२४० पर्यंत अव्याहत चालली. ह्या पुनरुज्जीवित चातुर्वर्ण्यांत एक बाब विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे; ती ही, कीं ब्राह्मणांनीं या वेळेपासून दक्षिणेंत मद्य व मांस अगदीं वर्ज्य केलीं व तीं सेविणें महापापांत गणिलें. हीं आठशें वर्षें महाराष्ट्रांत ब्राह्मणांच्या सल्ल्यानें क्षत्रियांचें राज्य चाललें होतें. या कालांत विज्ञानेश्वर व हेमाद्रि यांच्यासारखे धर्मशास्त्रज्ञ या भूमींत अवतरले. तत्रापि या कालाच्या शेवटीं ब्राह्मणवर्ण फार सुखावलेला व स्वधर्मपराङ्मुख झालेला दिसतो. ऋग्वेदकालीं यज्ञयागादींचा जसा अतिरेक झाला, तसा या कालांत व्रतोद्यापनांचा अतिरेक झाला. चालुक्य, राष्ट्रकूट व यादव ह्यांनीं जितकीं देवालयें बांधिलीं, तितकीं इतर राजांनीं बांधिलीं असतील कीं नाहीं याची शंकाच आहे. हेमाद्रीच्या व्रतखंडांत दर दिवसाला पांच-चार व्रतें व उद्यापनें सांगितलेलीं आहेत. ह्या कालीं बहुत ब्राह्मणांनीं कायस्थकर्म स्वीकारिलेलें दिसतें. दक्षिणेंत कायस्थ जाति मुळांपासूनच नव्हती—तेव्हां कुळकरण, जोसपण, देशलेखकपण, सर्व देशांतील ब्राह्मणांनाच करावें लागलें...... हेमाद्रीच्या कचेरींत ब्राह्मणच कारकून होते. ह्या कामांत ब्राह्मणांचे शमदमादि सत्त्वगुण कितपत दिसले असतील त्याचा अंदाज सहज करतां येतो. त्या कालीं कित्येक ब्राह्मणांनीं लष्करी पेशा म्हणजे क्षात्रकर्महि स्वीकारलेलें दिसतें. सारांश, ह्या कालाच्या शेवटीं ब्राह्मणवर्ण स्वधर्मच्युत होत असलेला दृष्टीस पडतो. क्षत्रियहि ह्या कालाच्या शेवटीं शेवटीं यादवांच्या विरुद्ध झालेले आढळतात......ब्राह्मणांत स्वधर्मच्युति व क्षत्रियांत फूट असल्यावर भीष्माचार्यांचे शब्द पुनः एकदां प्रत्ययास कां न येतील?

सुरू ठेवून इंग्रज लोकास सळो कीं पळो असें केल्याखेरीज 'भीक नको पण कुत्रा आटप' या न्यायानें यांस कांहीं तरी द्या आणि ही ब्याद या देशांतून एकदा जाऊं द्या, अशा पेचांत त्यांस घातल्याखेरीज तुम्हांस यशप्राप्ति व्हावयाची नाहीं. कॉंग्रेससभा काढली तेव्हां तिचा उद्देश हाच होता, पण दुर्दैवानें आता तिला वार्षिक श्राद्धाचें स्वरूप प्राप्त झालें आहे!"*

वरील उताऱ्यावरून हे स्पष्ट दिसून येईल, कीं टिळकांचें भांडण ह्यूम-दादाभाई यांच्याशीं नसून ते गोखले-मेहता यांच्याशीं होतें; आणि ह्यूम यांनीं १८९३ सालीं हिंदुस्थान सोडून विलायत गांठली त्या वेळीं राजद्रोहाच्या भीतीनें राष्ट्रसभेनें चळवळ करण्याचे धोरण सोडून दिले तेंच पुनः तिने स्वीकारिले पाहिजे आणि आपणास सध्यांची राज्यपद्धति असह्य झाली आहे असे आमच्या वर्तनानें सिद्ध करून इंग्रज लोकांस सळो कीं पळो करून सोडिले पाहिजे, हा त्यांच्या टीकेचा सर्व रोख होता. पुढें १९०६ सालीं दादाभाईनीं 'चळवळ करा, चळवळ करा, अखंड चळवळ करा' आणि 'चिकाटीनें व एकीनें स्वराज्य संपादन करा, कारण आपल्या सर्व दुःखावर स्वराज्य हा एकच व सर्वश्रेष्ठ उपाय आहे' असा जो संदेश राष्ट्रसभेला दिला तेच धोरण राष्ट्रसभेला लावण्याचा प्रयत्न लो. टिळक करीत होते. हे कार्य करण्यास केवळ गोखलेपक्षाचें वक्तृत्व व उत्साह पुरेसा पडणार नसून, टिळकपक्षांतील 'धैर्य आणि कोणासहि हार न जाणारा करारीपणा' यांची आवश्यकता आहे, हे दादाभाईप्रभृतींना पटले होते, व म्हणूनच टिळकपक्षाच्या या गुणांचा उपयोग राष्ट्रसभेला व्हावा व तिच्यात फुटाफूट होऊ नये अशी तिच्या मूळ संस्थापक वृद्ध पुढाऱ्याची मनापासून इच्छा होती लो. टिळकांचेहि तसेंच मत होते. त्याचे विचार कितीहि जहाल अगर क्रातिकारक असले तरी "पुढील राजकारणाच्या क्षेत्रांत युद्ध करण्याचें राष्ट्रीय सभा हेच एक आपले शस्त्र झालें पाहिजे" हें दादाभाईचे मत त्याना मान्य असल्यामुळेच नव्या पक्षानें आपले राजकारण बहुमताच्या जोरावर राष्ट्रसभेला पटवून देऊन तिला नवें धोरण लावावे, पण तिला सोडून जाऊं नये, असें त्यांचेहि प्रारंभापासून शेवटपर्यंत मत होतें. स्वराज्याचें युद्ध करण्यासाठींच हिंदुस्थानच्या राष्ट्रसभेचा जन्म झालेला असून तीच ते करूं शकेल, अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. अर्थात् १९०४ च्या मुंबईतील राष्ट्रसभेला ते उपस्थित राहिले आणि आपल्या विचारांच्या इतर सहकाऱ्यांबरोबर त्यांनीं राष्ट्रसभेच्या कार्यांत उत्साहानें भागहि घेतला. अध्यक्ष सर हेन्री कॉटन हे आपल्या भाषणांत हिंदी राजघटनेच्या सुधारणाची दिशा सांगतांना म्हणाले: "Autonomy is the keynote of England's true relations with her great Colonies. It is the keynote also of India's destiny. It is more than this: it is the destiny of the world......The ideal of an Indian Patriot

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग २ रा, पृ ४८८.

is the establishment of a Federation of free and separate States, The United States of India, placed on a fraternal footing with the selfgoverning colonies, each with its local autonomy, cemented together under the aegis of Great Britain." याच कल्पनेचा अनुवाद लो टिळक यांनीं १९०५ च्या जानेवारींत केसरींतील आपल्या अग्रलेखात पुढीलप्रमाणें केला आहे : " इग्रजी राज्याची किंवा लॉर्ड कर्झन याची पोकळ स्तुति करीत बसण्यांत अर्थ नाहीं, किंवा कांहीं लहान अगर मोठ्या तक्रारींच्या बाबींचें व्यक्तिशः विवेचन करण्यांतहि हंशील नाहीं मुख्य प्रश्न राज्य-पद्धतीचा आहे, माणसाचा नव्हे, अगर व्यक्तिशः लहान-मोठ्या तक्रारींचाहि नव्हे कानडा किंवा ऑस्ट्रेलियाप्रमाणे हिंदुस्थानाला प्रांतिक स्वराज्य पाहिजे आणि तें जेणेंकरून प्राप्त होईल अशा प्रकारची राज्यपद्धति हिंदुस्थानांत सुरू करा, हा मुख्य मुद्दा आहे आणि हा डोळ्यापुढें ठेवून नेटानें आणि एकनिष्ठपणानें जर आम्ही मेहनत करू व सरकारच्या प्रत्ययास असे आणून देऊं, कीं या प्रश्नाचा निकाल केल्याखेरीज गत्यतर नाहीं, तर हल्लींच्या पालटलेल्या मनूंत आम्हांस थोडेंबहुत तरी यश आल्या-खेरीज राहणार नाहीं."*

## बंगालमधील मूलग्राही ध्येयवाद

तरुण बगालचे पुढारी बाबू बिपिनचंद्र पाल यांनीं १९०५ सालच्या फेब्रुवारी महिन्यात मुंबईस भरलेल्या विसाव्या राष्ट्रसभेच्या कार्याचा आढावा घेऊन " नवा पक्ष आणि जुना पक्ष " यांच्या मूलभूत दृष्टिकोणांतील फरक पुढीलप्रमाणें विशद केला आहे :

" मुबईस भरलेल्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनाच्या कार्याचा शांत चित्ताने व विवेचक बुद्धीनें आढावा घेण्याची वेळ आता आल्याचे दिसतें. प्रत्येक सुशिक्षित हिंदी मनुष्य हा अंतःकरणांतून राष्ट्रसभाभक्तच असतो. कारण देशातील सघटित राजकीय कार्याची आवश्यकता प्रत्येक सुशिक्षित हिंदी मनुष्याला पटते आणि राष्ट्र-सभेच्या कांहीं उणीवा किंवा चुका असल्या, तरी आपल्या देशात काही राजकीय महत्त्व असणारी अशी जर कोणती संस्था असेल, तर ती राष्ट्रसभा हीच होय. राष्ट्र-सभेला सोडून चालणारच नाहीं. परतु या मोठ्या संस्थेच्या ध्येयाचा व कार्य-पद्धतीचा तात्काल फेरविचार करणे आज प्राप्त झालें आहे, असे वाटणारे लोकमत प्रत्येक प्रांतांत वाढत आहे याबद्दल शंका नाहीं ; आणि हें वाढतें लोकमत राष्ट्रसभेनें आत्मसात् केल्याखेरीज तिचे भवितव्य बिनधोक आहे, असे खात्रीनें अगर समजस-पणें म्हणतां येणार नाहीं.

" कांहीं राष्ट्रसभाभक्त जशी भाषा योजितात, तशीच त्यांची भावना असेल

* किचा, पृ. ५९८.

तर हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांतांत वृद्धिंगत होणारें प्रचल लोकमत आणि जुन्या लोकांचीं मते व ध्येय यांत आज ना उद्यां मोठेच अंतर निर्माण झाल्याखेरीज राहणार नाहीं हे बीजभूत मतभेद जर असेच वाढूं दिले, तर आमच्या देशांत राजनिष्ठ आणि राष्ट्रनिष्ठ असे दोन पृथक् राजकीय पक्ष लवकरच उदयास येतील. गेल्या मुंबई-अधिवेशनांतील स्वागताध्यक्षाचें भाषण म्हणजे हिंदी राजकारणातील या बीजभूत राजनिष्ठ राजकीय पक्षाचा एक जाहीरनामाच होय ब्रिटिश हिंदुस्थानातील 'सर' ही पदवी प्राप्त होऊन श्री मेथा यांचा जो नुकताच गौरव झाला आहे, त्यानतर थोड्याच दिवसांत त्यांनीं योजिलेले "राजनिष्ठ, राष्ट्रभक्ति" हे शब्द या पक्षाची मनोवृत्ति बरोबर व्यक्त करितात आणि मुबई-अधिवेशनांतील त्यांच्या भाषणाचें खरे रहस्य त्या शब्दांतच व्यक्त झालेलें आहे.

"आम्हीं वारवार या पत्रांत लिहिल्याप्रमाणे आमच्या अंतःकरणांत खरी राजनिष्ठा केवळ एकाच अर्थाने नादू शकते आणि ती म्हणजे देशातील प्रस्थापित कायद्याचीं बंधनें पाळणे हा जो राजनिष्ठेचा अर्थ त्या अर्थाचीच होय कायदे पाळणारे नागरिक या अर्थाने आम्ही सर्व राजनिष्ठच आहों आणि ज्या ॲंग्लो-इंडियन डिफेन्स असोसिएशननें लॉर्ड रिपन यांना पकडून सक्तीनें विलायतेस पाठवून देण्याची धमकी दिली होती, त्याच्यापेक्षा तरी आम्ही खात्रीने अधिक राजनिष्ठ आहो. परतु राजा या व्यक्तीसंबधींची भावना या अर्थानें आमच्या अंतःकरणांत सध्याच्या परिस्थितींत राजनिष्ठेचा आविर्भाव होणें शक्य नाहीं व या देशात तिला वास्तविक अस्तित्वहि नाहीं...... देशातील कायदे पाळणें या अर्थाने आम्ही राजनिष्ठ आहो व ते अंतःकरणपूर्वक आहो. अशा प्रकारची राजनिष्ठा हें एक आमच्या राष्ट्रभक्तीचें अंगच आहे कारण, हिंदुस्थानातील राज्यपद्धतींत मूलग्राही बदल केला पाहिजे अशी आमची मागणी असली, तरी देशात सध्या शातता रहावी आणि त्याची भावी काळात प्रगति व्हावी, याकरिता कोणत्याहि स्वरूपात अदाधुदी माजावी असे आम्ही प्रतिपादन करीत नाहीं. आमचें ध्येय क्रातिकारक असू शकेल व तें तसें खरोखर आहे, हेहि आम्ही मान्य करतो. पण हे ध्येय क्रांतिकारकांच्या साधनानीं प्राप्त करून घ्यावे असे आमचे प्रयत्न नाहींत व तशी आम्हांस आशाहि करतां येत नाहीं. आमचे देशभक्तीचे अतिम ध्येय राजानिष्ठ आहे; पण कायदे न मोडणें या अर्थानेंच तें राजानिष्ठ आहे, दुसऱ्या कोणत्याहि अर्थाने नव्हे

"परतु श्री मेहता व त्याचे मित्र यांची 'राजनिष्ठ देशभक्ति' किंवा मुबईतील भाषणांत त्यांनीं तिचा केलेला अर्थ, हे याहून थोड्या निराळ्या प्रकारचे आहेत. हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्य हा एक परमेश्वरी प्रसाद आहे, हे लॉर्ड कर्झन याचें छद्मी मत त्यांनीं उघडपणें उचलून धरिले आणि हिंदुस्थानासबधीं ब्रिटिश राष्ट्राचें धोरण व वृत्ति उदार आणि भूतदयेची आहे, असे लॉर्ड कर्झननें दिलेलें ताजें आश्वासन उद्धृत करून त्यांनीं त्यावरच भर दिला. ह्या गोष्टी किती पोकळ आहेत,

तें श्री लालमोहन घोष यांनीं मद्रास-अधिवेशनातील आपल्या अध्यक्षीय भाषणांत उत्कृष्टपणें विशद केलें आहे

" ही मुत्सद्दीपणाची भाषा आहे कीं सरळ सत्य आहे? हा प्रामाणिकपणा आहे कीं अंतरींची श्रद्धा आहे? ही केवळ मुत्सद्देगिरीचीच भाषा असेल, तरी ती निष्फळ व मूर्खपणाची आहे आणि ज्याना उद्देशून ती योजण्यात आली आहे त्याची तर यामुळे फसगत होणार नाहींच, पण तिचे बरेच दुष्परिणाम मात्र होणें शक्य आहे कोणताहि ब्रिटिश मुत्सद्दी दिसतो त्याहून फारच अधिक भोळसर नसेल, तर या राजनिष्ठेच्या घोषणेवर त्याचा विश्वास बसणे अशक्य आहे एडवर्ड राजाच्या हिंदी प्रजेची जी अवस्था आहे व तिला जो दर्जा प्राप्त झाला आहे, त्या दर्जाला आपणांस पोचविणाऱ्या राजसत्तेला कोणताहि इंग्लिश मनुष्य अंतःकरणापासून राजनिष्ठ राहूं शकणार नाहीं; तर मग आमची राजनिष्ठेची घोषणा मनःपूर्वक आहे, असा त्याचा विश्वास कसा बसेल? इतकीं वर्षें आम्हीं उच्च स्वराने राजानिष्ठेच्या अखंडित घोषणा केल्या आहेत, तथापि राजनिष्ठ प्रजाजनांचे मूलभूत हक्क याच काळांत तितक्याच अखडितपणे व वाढत्या प्रमाणात आमच्यापासून हिरावून घेण्यांत आले आहेत.. ......... ज्या लोकांवर आपला विश्वास नसतो, त्यांचींच हत्यारे आम्ही काढून घेतो; कारण त्याच्या हातातील शस्त्रें आमच्याविरुद्ध केव्हां उगारलीं जातील याबद्दल आम्हांस खात्री नसते मि. ग्लॅडस्टन् यानीं शस्त्रनिर्बंधाचा कायदा दूर केला नाहीं व तो अद्यापि कायद्याच्या पुस्तकात आहे, यावरूनच आमच्या राजनिष्ठेबद्दल इंग्लिश लोकांना किती विश्वास वाटतो तें व्यक्त होत आहे.. ..... ... यावरून ज्यांचा विश्वास संपादन करण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहों, ते आमच्या राजनिष्ठेच्या घोषणानीं फसले जात नाहींत असा निष्कर्ष काढणे जर अपरिहार्य असेल, तर या निष्फळ प्रयत्नात आमची शक्ति गमावण्यात काय अर्थ आहे? विशेषतः ते स्वतः या घोषणावर विश्वास न ठेवता सुधारलेल्या जगापुढे त्या मांडून त्याचा उपयोग ते आपल्या राजकारणास करून घेतात, हे आपणास दिसत असताना आपण या घोषणा का कराव्यात?

"धर्माप्रमाणे राजकारणातील ज्ञानहि भीतींतूनच उदय पावत असतें अनियंत्रित नोकरशाहीच्या राज्यात लोकांची भीति हीच सर्व सुधारणाची जननी असते. बेजबाबदार नोकरशाहीला लोकांपासून वाटणारी ही आरोग्यदायक भीति नष्ट करणे हे मूर्खपणाचे कृत्य आहे व त्यामुळें राज्यकर्ते व प्रजाजन या दोघांचेंहि नुकसान होते. म्हणून गेल्या अधिवेशनांतील श्री. मेथा याच्या भाषणात राजनिष्ठेच्या ज्या निरर्थक घोषणा केलेल्या आहेत, त्या मुत्सद्देगिरीच्या दृष्टीने चुकीच्या आहेत व त्यातील भावना खऱ्या असल्या, तरी त्याचे प्रदर्शन मांडणें हे अहितकारक आहे."*

अशा प्रकारे बाबू बिपिनचद्र पाल यांनीं पूर्वीच्या पिढीच्या राजकारणाचा जो

* New Spirit in India, by B. C. Pal, P. 213-23.

मूलाधार म्हणजे साम्राज्यनिष्ठा, त्यावरच कुठार घातली; पण तसें करतांनाहि कायदेशीर राजनिष्ठा आपणासहि मान्य आहे आणि राष्ट्रसभा हीच देशांतील महत्त्वाची राजकीय संस्था असून तिच्याबद्दलची भक्ति प्रत्येक समजस कार्यकर्त्यानें नित्य धारण केली पाहिजे, हे मोकळया मनानें मान्य केलें आहे देशांत अदाधुदी माजू नये हे आमच्या राष्ट्रीयत्वाच्या विकासासहि अवश्य असल्याने आम्ही दाडगाईची बेकायदेशीर वृत्ति लोकांत फैलावीत नाहीं, या अर्थाने आमची चळवळ कायदेशीर असल्याने ती राजनिष्ठहि आहे, पण अतःकरणाची साम्राज्यनिष्ठा परतत्र हिंदी लोकांच्या अतःकरणांत असणे शक्य नाहीं व म्हणून तिच्या आधारावर आपल्या राजकारणाची उभारणी करणे सत्यास धरून नाहीं व ते शहाणपणाचेंहि नाहीं राष्ट्रभक्ति हाच आमच्या राजकारणाचा खरा व प्रामाणिक आधार होऊ शकतो व त्या आधारावरच आपल्या राष्ट्रीय राजकारणाची उभारणी केली पाहिजे, असें या नव्या पक्षाचे म्हणणे बिपिनबाबूंनीं अगदीं स्पष्ट शब्दात माडिले आहे या नव्या राजकारणाची शास्त्रशुद्ध उभारणी १९०५ च्या डिसेंबरांत बनारस येथे भरलेल्या राष्ट्रसभेच्या वेळीं करण्यात येऊन लो टिळक यांच्याकडे या नव्या राष्ट्रीय पक्षाचें नेतृत्व स्वरूपतः देण्यात आले.

## काळकर्ते परांजपे व टिळक

बाबू बिपिनचंद्र पाल हे बगालमध्ये एक नवी क्रांतिकारक वृत्ति निर्माण करीत होते त्याचप्रमाणे महाराष्ट्रांत या वेळीं शिवराम महादेव ऊर्फ अण्णासाहेब परांजपे हे आपल्या 'काळ' पत्रांतून क्रातिकारक वृत्तीचे राजकारण तरुणात फैलावीत होते. आपल्या राजकीय प्रयत्नाचें ध्येय सपूर्ण स्वातत्र्य हेच आहे असे उघडपणे प्रतिपादून जगातील इतर स्वातत्र्यवादी पक्षांनीं ज्या मार्गाचे अवलबन केले, तशाच मार्गाचे अवलबन आपण करण्यास हरकत नाहीं, असें त्याच्या लेखातील सामान्य धोरण असे. त्याच्या स्वातंत्र्यवादाचें एकंदर प्रतिपादन महाराष्ट्रीय मनाला फारच आकर्षक आणि प्रोत्साहक अशा प्रकारचें असे; आणि महाराष्ट्राच्या गतवैभवाची आणि स्वातत्र्याची स्मृति जागृत होऊन महाराष्ट्रीय तरुणाना स्वातत्र्यप्राप्तीची तळमळ एकसारखी वाटत रहावी आणि त्या तळमळीनें त्यानीं वाटेल तो स्वार्थ-त्याग करावा अशा प्रकारची उत्कट देशभक्तीची भावना त्यांच्या लेखानीं महाराष्ट्रात जागृत होत असे हे त्यांचे क्रातिकारक वृत्तीचे लेखन मुंबईतील नेमस्त पक्षास मुळींच पसत नव्हते; आणि लो टिळकानीं त्याच्या या लेखांचा उघड निषेध करावा अशा सूचना सर फेरोजशहा मेथाप्रभृति नेमस्त पुढाऱ्यांकडून लोकमान्यां-कडे वारंवार येत असत. तथापि लो टिळक हे 'काळ' पत्राचा निषेध कधींच करीत नसत. हिंदुस्थानातील जित लोकांच्या अंतःकरणांत एक प्रकारची क्रांतिकारक भावना सदैव जागृत असणे हें त्यांना अपरिहार्य वाटे ही भावना जोपर्यंत कायद्याची

मर्यादा उल्लघून अथवा शांततेचा भग करून अत्याचाराच्या रूपानें प्रकट झालेली नाहीं, तोंपर्यंत तिचा निषेध करण्याची त्यांना आवश्यकता भासत नसे. लोकमान्यांच्या पक्षांत अशा प्रकारचीं क्रांतिकारक अंतःकरणें अनेक होतीं; व त्यांच्या अंतःकरणातील तेजस्वी शक्तीचा उपयोग ते आपल्या कायदेशीर राजकारणास करून घेत असत. हिंदुस्थानांतील राजकारण हें इंग्लडसारख्या स्वतंत्र व लोकसत्ताक देशातील सनदशीर राजकारणाच्या स्वरूपाचे होणें शक्य नाहीं व त्यास कोणत्या तरी प्रकारचें क्रांतिकारक स्वरूप प्राप्त होणे अपरिहार्य आहे, असें त्यास उघड दिसत होते हिंदी अंतःकरणातील या क्रांतिकारक स्वातंत्र्यभावनेला बहिष्कारयोगाचें निःशस्त्र क्रांतीचे स्वरूप देऊन ती शक्ति राष्ट्रसभेच्या राजकारणामागें उभी करणे आणि तिच्या जोरावर ब्रिटिश मुत्सद्यांना राष्ट्रसभेच्या मागण्या मान्य करावयास लाविणे हेंच खऱ्या मुत्सद्देगिरीचें लक्षण आहे, असे लोकमान्यांचे या वेळचें धोरण होतें

## राष्ट्रीय मागण्यांचें स्वरूप

आतां १९०४ च्या राष्ट्रसभेंत मजूर झालेल्या ठरावांची माहिती थोडक्यांत देऊं, म्हणजे त्या वेळच्या राष्ट्रसभेच्या कार्याची अधिक कल्पना येईल.

या बैठकींत एकूण बावीस ठराव मजूर झाले या बावीस ठरावांच्या यादीवरून त्या वेळच्या राष्ट्रीय सभेच्या राजकीय कार्याचें स्वरूप बरोबर कळून येतें (१) सामान्य जनतेच्या आर्थिक उन्नतीसाठीं करांचा व साऱ्याचा भार कमी करणें, कायमधारापद्धति मागणें, औद्योगिक उन्नतीसाठीं औद्योगिक, शास्त्रीय व शेतकी शिक्षणाची मागणी करणे, स्वदेशी कापडाच्या धद्यावरील जकाती उठवून त्या धंद्याला सरक्षण मागणें आणि देशांतील राज्यकारभारासाठीं घेतलेला पैसा देशांतच रहावा व राज्यकारभाराला स्वदेशी स्वरूप प्राप्त व्हावे, यासाठीं मोठ्या अधिकारीवर्गांत हिंदी लोकाचा अधिकाधिक प्रवेश व्हावा इत्यादि मागण्या करण्यांत येत असत. (२) राज्यघटनेंत सुधारणा होऊन लोकाच्या प्रतिनिधींचें नियंत्रण राज्यकारभारावर चालावें म्हणून ब्रिटिश पार्लमेंटांत हिंदी प्रतिनिधी असावेत; भारतमंत्रि, व्हाइसरॉय व गव्हर्नर याच्या कार्यकारी मंडळात हिंदी प्रतिनिधी असावेत, मध्यवर्ती व प्रांतिक कायदेमंडळांत हिंदी प्रतिनिधींची संख्या वाढवून त्यांना अधिक अधिकार द्यावेत, या मागण्या राज्यकारभार लोकनियंत्रित व्हावा या दृष्टीनें करण्यांत येत असत. असें झाल्याखेरीज जनतेची आर्थिक उन्नतिहि होणार नाहीं, असें प्रतिपादण्यांत येत असे. (३) न्यायदान चांगले होऊन अंमलबजावणी-खात्यांतील अधिकारीवर्गाचा जुलूम व धाकदपटशा कमी व्हावा म्हणून राजसत्तेच्या या दोन अंगांचे पृथक्करण करावें अशी मागणी केली जात होती आणि (४) साम्राज्यशाहीला व लष्करशाहीला आळा बसावा यासाठीं आक्रमक परराष्ट्रीय धोरणाचा आणि वाढत्या लष्करी खर्चाचा निषेध करण्यांत येत असे. या चतुर्विध स्वरूपाच्या मागण्या नित्य असून वंगभंगाच्या

योजनेचा निषेध किंवा दडपशाहीच्या कायद्याचा निषेध यांसारखे नैमित्तिक ठरावहि वारवार करण्यात येत असत. केवळ राजकीय सुधारणांचें तात्त्विक विवेचन आणि सुशिक्षित देशभक्तांचें देशातील राज्यकारभारासबधीं वार्षिक मतप्रदर्शन या दृष्टीनें हे कार्य ठीक होतें

## वंगभंग व जहाल पक्ष

पण या राजकीय तत्त्वज्ञानाला व्यावहारिक राजकारणाचें परिणामकारक स्वरूप प्राप्त होण्यास या मागण्यांच्या पाठीमागें संघटित लोकशक्ति उभी राहिली पाहिजे आणि तिच्या साहाय्याने प्रचलित राज्यघटना आम्हांस असह्य झाली आहे, असें प्रत्यक्ष कृतीनें लोकानीं सिद्ध केलें पाहिजे, याखेरीज या मागण्या प्रतिपक्षाकडून मान्य होणार नाहींत ही विचारसरणी लो टिळक, बाबू बिपिनचद्र पाल आणि लाला लजपतराय या तिघानीं १९०५ सालीं एकाच काळीं राष्ट्रसभेपुढे माडण्यास सुरुवात केली या धोरणावर राष्ट्रसभेचें राजकारण नेण्याचा प्रयत्न १९०५, १९०६ आणि १९०७ या तीन सालात त्यानीं केला हा प्रयत्न यशस्वी होऊ द्यावयाचा नाहीं असा दुराग्रह सर फेरोजशहा मेथा याच्या नेतृत्वाखालीं जुन्या पक्षाने धरिला व त्यामुळेच या दुराग्रहाच्या खडकावर राष्ट्रसभेची नौका १९०७ सालीं सुरतेस फुटली आणि लाल-बाल-पाल यांच्या नव्या पक्षाचे हे प्रयत्न व्यर्थ गेले. दादाभाई प्रभृतींचें जुन्या-नव्या पक्षाचे ऐक्य कायम ठेवून राष्ट्रसभा प्रबल व प्रभावी करण्याचे धोरणहि अशा प्रकारे अयशस्वी झाले आणि ब्रिटिश मुत्सद्याची भेदनीति यशस्वी होऊन राष्ट्रसभा दुर्बल झाली मोर्ले-मिंटोच्या पोंचट सुधारणा राष्ट्राच्या पदरीं पडल्या, राष्ट्रीय पक्ष दडपशाहीखालीं चेपला गेला, उत्साही तरुण राष्ट्रभक्तानीं सशस्त्र क्रातीचा अव्यवहार्य मार्ग स्वीकारिला आणि काहीं काळ ब्रिटिश साम्राज्याच्या सघटित, शास्त्रीय व भेदनीतिप्रधान दमननीतीचें ताडवनृत्य सर्व देशभर सुरू झाले!

वगभंगाचा निषेध हे या नव्या राजकारणाच्या अवताराचे निमित्तकारण होते याकरितां या प्रश्नाची थोडी माहिती येथें देणें आवश्यक आहे पूर्वीचा बंगाल प्रात हा एका लेफ्टनंट गव्हर्नराच्या ताब्यात असून तो राज्यव्यवस्थेच्या दृष्टीने खरोखरच अवजड किंवा अगडबंब झाला होता त्या प्रातांतील लोकसंख्या स्थूल मानानें आठ कोटी असल्यामुळें त्याची विभागणी करणे अवश्य आहे, याबद्दल फारसा मतभेद नव्हता. मतभेद काय तो ही विभागणी कशी करावी याबद्दलच होता या ८ कोटी लोकसख्येपैकीं बंगाली लोक ४ कोटी, ३० लक्ष असून बिहार-ओरिसा प्रातांतील लोक २ कोटी १० लक्ष होते. बगाली लोकांचा एक प्रात करून ही विभागणी केली असती, तर त्याबद्दल लोकांची तक्रार झाली नसती व राज्यकारभाराचीहि सोय झाली असती. हाच मार्ग पुढें सहा वर्षानीं म्हणजे १९११ सालीं अवलबिण्यांत आला. पण तसें होण्यापूर्वी सर्व हिंदुस्थानांत क्रातिकारक राजकारणाचा प्रसार व्हावा लागला!

यावरून शेळपट, सत्त्वहीन आणि राष्ट्रभावनाशून्य लोकांवर राज्य करण्यास लायक ठरलेले नोकरशाहीचे राज्ययंत्र स्वाभिमानी, राष्ट्रभावनाप्रेरित आणि जागृत लोकांवर राज्य करण्यास सर्वस्वीं नालायक आहे असें सिद्ध झालें आणि हिंदी लोकांत राष्ट्र-भावनेचा पूर्ण अभाव आहे व त्यांच्या केवळ वेडगळ धर्मसमजुतींना धक्का लाविला नाहीं, तर आपणास त्याच्यावर यावच्चद्रदिवाकरौ राज्य करतां येईल ही ब्रिटिश मुत्सद्यांची कल्पना प्रथमच खोटी ठरली हिंदुधर्माच्या आधारावरहि ब्रिटिश साम्राज्याला हादरून सोडणारा तेजस्वी राष्ट्रवाद निर्माण होऊं शकतो, अशी त्यांची खात्री झाली. जे बगाली लोक सर्व हिंदुस्थानात भेषपात्र म्हणून मानण्यात येत होते, आणि जो वेदान्त मनुष्यसमाजाला या जगात राहण्यास नालायक बनवितो असे प्रतिपादन करण्यात येत होते, त्याच बंगाली लोकांना त्याच वेदान्ताने राजकीय क्रातिकारक बनविलें, हे पाहून ब्रिटिश मुत्सद्दी आश्चर्याने थक्क झाले!

लॉर्ड कर्झन यानीं स्वतःची अशी जी पहिली वगभंगाची योजना लोकांपुढें मांडली, तींत पूर्व बंगालमधील डाक्का व मैमनसिंग हे जिल्हे व इतर कांहीं भाग आसाम प्रातास जोडावा अशी सूचना १९०३ च्या डिसेंबरमध्यें केली होती तिच्यामुळे पूर्व बगालमधील काहीं थोड्या बगाली लोकावर आसामच्या मागासलेल्या प्रांतात जाण्याची आपत्ति ओढवणार होती, म्हणून या योजनेविरुद्ध मोठी ओरड झाली यामुळें ही योजना मागें ठेवून सर्वच पूर्व बगाल हा पश्चिम बगालपासून अलग करण्यांत आला व पूर्व बगालमध्यें आसामचा समावेश करण्यांत आला या योजनेमुळे बगाली राष्ट्राचे दोन तुकडे झाले आणि पूर्व बगाल हा एक मुसलमानाचा प्रात बनवून या फाळणीला मुसलमान लोकांचा पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न लॉर्ड कर्झन यानीं उघडपणे सुरू केला. ही योजना १९०५ च्या फेब्रुवारींत भारतमंत्र्याकडे पाठविण्यांत आली व तिला मंजुरी मिळेपर्यंत यासबंधीं पूर्णपणें मुग्धता व गुप्तता ठेवण्यात आली तिला समति मिळताच १९ जुलै १९०५ रोजीं ही योजना जाहीर करण्यात येऊन १६ ऑक्टोबर १९०५ रोजीं तिची अमलबजावणीहि करण्यांत आली. या योजनेनुसार बगाल ५ कोटी, ४० लक्षांचा प्रात झाला त्यापैकीं १ कोटि, ८० लक्ष लोकच काय ते बगाली व बाकीचे बिहार, ओरिसा व छोटा नागपूर या प्रांतांतील होते. म्हणजे या प्रातातहि बंगाली लोक अल्पसख्य होते. दुसरा नवा केलेला पूर्व बंगाल हा प्रांत ३ कोटी, १० लक्षांचा बनविण्यात आला. त्यांपैकीं १ कोटी ८० लक्ष लोक मुसलमान धर्माचे अनुयायी होते. अशा प्रकारें कोणत्याच विभागात बंगाली हिंदूचें बहुमत होऊं नये आणि पूर्व बगाल हा मुसलमान बहुसख्येचा प्रांत व्हावा अशी योजना केली गेली बगालची फाळणी करावयाची व तिला मुसलमानांचा पाठिंबा मिळवावयाचा, अशी भेदनीतीची ही जोडगोळी बगालमधील वाढत्या राष्ट्र-भावनेच्या डोक्यावर उडवून त्यास जमीनदोस्त करण्याचा हा प्रयत्न होता. पण या जोडगोळीलाहि दाद न देतां बंगालमधील क्रांतिकारक राष्ट्रवाद सर्व हिंदुस्थानभर

पसरला आणि औरंगजेबाच्या मृत्यूनंतर मोंगल साम्राज्य ज्याप्रमाणें डळमळलें, त्याचप्रमाणे लॉर्ड कर्झन ' निजधामा 'स गेल्यानतर हिंदुस्थानातील ब्रिटिश साम्राज्य डळमळू लागले आणि हिंदी मुत्सद्यांनीं लॉर्ड कर्झन यांना दिलेली औरगजेबाची उपमा अशा अर्थानें सार्थ झाली !

वगभगविरोधाच्या चळवळीचा प्रारभ ता. ७ ऑगस्ट १९०५ रोजीं कलकत्त्यांत व बगाल प्रांतातील इतर शहरांत मोठमोठ्या जाहीर सभा भरवून करण्यांत आला आणि याच सभातून इग्लिश मालावर बहिष्कार घालण्याच्या शपथा घेण्यांत आल्या. या बहिष्काराच्या चळवळीला महाराष्ट्रांतून लोकमान्यांनीं ताबडतोब पाठिंबा दिला ता १५ ऑगस्टच्या केसरींत " आणिबाणीची वेळ !! " या मथळयाचा स्फूर्तिप्रद लेख लिहून लोकमान्यांनीं आपल्या स्वावलबी स्वतत्र राजकारणाचें नवे धोरण महाराष्ट्रापुढे मांडिलें आणि परतंत्र राष्ट्रातील राजकारण स्वतत्र राष्ट्रांतील सनदशीर व कायदेशीर राजकारणाहून भिन्न असले पाहिजे, अशी जाहीर घोषणा केली या लेखात कलकत्त्यातील या प्रचंड निषेधसभेचें वर्णन पुढीलप्रमाणें करण्यांत आले आहे : " इग्रजी राज्य हल्लीं चाललें आहे तितक्या सत्तीने हिंदुस्थानावर यावच्चद्र-दिवाकरौ राहील, हा सिद्धान्तच ऐतिहासिक दृष्ट्या खोटा आहे. पुराणांतील रावणादिकांच्या कथा सोडून दिल्या, तर इतिहासात असे एकहि उदाहरण नाहीं, कीं जेथें एका राष्ट्राने दुसऱ्या राष्ट्राच्या गळयाभोवतीं घातलेली पारतंत्र्याची दोरी यत्किंचितहि सैल न करतां हजारों वर्षे तशीच कायम ठेविली ! लॉर्ड कर्झन यास हे तत्त्व सहज कळावे इतके ते हुषार व बुद्धिमान् आहेत, पण वैभव आणि अधिकार याच्या मदाने त्याच्या बुद्धीवर इतके जबरदस्त आवरण पडले आहे, कीं मदोन्मत्त हत्तीप्रमाणें बंगाली राष्ट्राच्या लोकमतास गवतासारखे ते तुडवून टाकीत आहेत गेल्या सोमवारीं कलकत्ता येथें ज्या मोठ्या जगी सभा झाल्या, त्यामुळे जर एकादी गोष्ट चागली प्रत्ययास आली असली, तर ती हीच होय वॉरन हेस्टिंगास ज्या बंगाली लोकांनीं मदत केली त्यांचे वशज आणि दुसरे अनेक राजे, महाराजे, वकील, बॅरिस्टर आणि मारवाडी व्यापारीहि या सभेस हजर होते, इतकेंच नव्हे, तर सभेस आलेला जनसमूहाचा लोट इतका प्रचड होता, कीं एकाच जागीं सभा भरविणे अशक्य झाल्यामुळें गगेच्या प्रवाहाप्रमाणे ही सभा वर, खालीं, बाहेर अशा तीन ठिकाणीं भरवावी लागली एवढी मोठी प्रचंड सभा बंगाल्यांत यापूर्वी कधींहि झाली नव्हती म्हटले तरी चालेल, आणि तेथील लोकहि इतके कधीं खवळलेले किंवा असतुष्ट झालेले नव्हते "

यानतर आतां केवळ लोकमत जागृत व व्यक्त करून काम भागणार नाहीं असे सांगून लोकमान्य पुढे लिहितात : " बंगालच्या सभेत असा ठराव झाला आहे, कीं सरकार किंवा विलायतेतील लोक जर आपले म्हणणें ऐकत नाहींत, तर आपण विलायती माल न वापरण्याची शपथ घेऊ नाक धरल्याखेरीज तोंड उघडत

नाहीं आणि सरकारास झोंबेल अशी जर कांहीं गोष्ट आमच्या हातून घडणार नाहीं, तर सरकारचा दर्प कधींहि उतरणार नाहीं लोकमताची बिसततूप्रमाणे किंवा तृणा-प्रमाणें सरकार आज उपेक्षा करीत आहे खरी; पण या तृणाची जूट होऊन दोरी झाली म्हणजे एका कवीनें म्हटल्याप्रमाणें "तृणैरावेष्टयते रज्जुर्यया नागोऽपि बध्यते।" ह्याच तृणानीं हत्तीदेखील बाधला जात असतो...... दहा पधरा हजार लोक कलकत्त्याच्या टाउन हॉलातच काय, पण हिंदुस्थानच्या दुसऱ्या कोणत्याहि शहरांत केव्हांहि गोळा करता येतील, पण एका पोलीस शिपायाच्या दरडावणीनें वाऱ्यापुढे भूस जसे चोहोकडे उडून जाते, तद्वत् हे लोक जर पांगून जातील तर ते जमले काय न जमले काय, सारखेच! हजारो, लाखो लोकांचा समुदाय निश्चयानें बांधला गेला पाहिजे लोकमताचे बल निश्चयांत आहे केवळ समुच्चयांत नाहीं.. शब्द नकोत. कृति पाहिजे, आणि तीहि निश्चयाची कृति पाहिजे, अशी वेळ आता येऊन ठेपली आहे अशा वेळीं आम्ही जर आपल्या कर्तव्यास चुकलो आणि युवराज इकडे आल्याबरोबर विलायती डायमंड लेदरचा बूट चढवून लोटांगण घालीत त्यांच्याकडे गेलों, तर आमच्या व आमच्या मताच्या पोचटपणास काहीं पारावार नाहीं असे राज्यकर्त्यांच्याच नव्हे, तर सर्व जगाच्या निदर्शनास येऊन चुकणार आहे. साराश, हिंदुस्थानातील लोकमताच्या वाढीच्या इतिहासांत आज असा दिवस येऊन ठेपला आहे, कीं आमच्या पुढाऱ्यानीं निश्चयाने पुढे होऊन एक तर आपली कार्यसिद्धि करून घेतली पाहिजे, नाहीं तर तोडाच्या वाफाऱ्यानें दूषित झालेल्या वातावरणात फुकट कुजून मेलें पाहिजे यापैकीं कोणता मार्ग स्वीकारण्यास आमचे पुढारी तयार आहेत, इकडे सर्वांचे डोळे लागले आहेत व आमची या पुढाऱ्यास अशी सूचना आहे, कीं या वेळीं जर तुमचें पाऊल नीट पडणार नाहीं किंवा कच्चे पडेल, तर तुमच्या विद्या, तुमचें वक्तृत्व आणि तुमचा देशाभिमान यावरील लोकाचा विश्वास लवकरच सबंध उडून जाईल"

स्वतत्र देशातील सनदशीर व कायदेशीर राजकारण परतत्र देशांतील लोकांना उपयोगी पडत नाहीं, हे सिद्ध करण्यासाठीं या लेखाच्या प्रारंभीं पुढील विवेचन केलेले आहे: "परकीय राजसत्तेखालीं जिंकिलेल्या लोकानीं आपल्या हक्कांच्या बचावाकरिता किंवा नवीन हक्क मिळविण्याकरिता काय तजवीज केली पाहिजे हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे ... इग्लंड व हिंदुस्थान या दोन देशातील स्थिति अगदींच भिन्न आहे. इग्लड देश स्वतत्र आहे व तेथील राज्यपद्धतीप्रमाणें लोकांचे निरनिराळे पक्ष पर्यायानें अधिकारारूढ होण्याचा संभव असतो ... तात्पर्य, ज्याच्या बाजूचें बहुमत त्याच्या हातात सत्ता येण्याचा इंग्लडांतील राज्यपद्धतीमुळें तेथें संभव असल्यामुळें बहुमत आपल्या बाजूचे करून घेण्याचा प्रयत्न इग्लडांतील पुढारी करीत असतात. हिंदुस्थानची तशी स्थिति नाहीं हे राष्ट्र परकीयांनीं जिंकिलेलें आहे आणि लोकास फारसें न दुखविता येथील राज्य चालविण्याचा जरी

त्याचा संकल्प आहे, तरी लोकांच्या बहुमतास विलायतेंतील राज्यव्यवस्थेंत जो मान आहे तो, किंबहुना त्याच्या शतांश देखील मान, आमच्या पद्धतीत येथील लोकमतास मिळत नाहीं. ... असो; दहा, पधरा किंवा वीस हजार, किंबहुना लाखों लोकांच्या सभेंत व्यक्त झालेल्या मतास सरकार काडीइतका देखील मान देत नाहीं, हे हल्लींच्या उदाहरणावरून पूर्णपणें दृष्टीस येत आहे; आणि या गोष्टीचा प्रतिकार करण्याचा जर कांहीं मार्ग आम्हीं काढिला नाहीं, तर असल्या चळवळींवरील लोकांचा विश्वास लौकरच उडून जाईल." अखेरीस या लेखाचा समारोप करताना ते म्हणतात, "आजची वेळ अशी आहे, कीं एक तर हल्लींच्या तोंडाच्या चळवळीच्या पलीकडे आम्हीं गेले पाहिजे, नाहीं तर निरंतर दास्यत्वांत राहण्यास तयार झाले पाहिजे!"*

महाराष्ट्रांत लो टिळकांना ही चळवळ पाहून जसे उत्साहाचे भरते आले, त्याचप्रमाणे विलायतेंत असणाऱ्या वृद्ध दादाभाईंच्या डोळयातहि हे दृश्य पाहून आनंदाश्रू उभे राहिले. लॉर्ड कर्झन याच्या निषेधाची सभा विलायतेत कॅक्स्टन हॉलमध्यें भरली होती तींत भाषण करतांना ते म्हणाले : "हा एक स्पष्ट व उघड वादाचा मुद्दा निघालेला आहे आमचे राज्यकर्ते–अधिकारीवर्ग–आम्हास म्हणतात, कीं आमच्या देशाला स्वराज्याचा लाभ कधींहि होणार नाहीं; आमच्या अंगीं स्वराज्याची पात्रता आणण्याची सधीच आपण देणार नाहीं गेल्या दहा वर्षांत केलेल्या सर्व कायद्यांचा रोख असाच असून लॉर्ड रिपन यांच्या कारकीर्दींत काहीं काळ जी वृत्ति धारण करण्यात आली होती, ती सोडून देण्याचा हेतु या कायद्यावरून स्पष्ट होतो. याच्या उलट, हिंदी लोक प्रथमच जागे होऊन ही गोष्ट आम्ही चालू देणार नाहीं असें म्हणून उठले आहेत. राज्यकर्ते व लोक यांच्यामधील हा सरळ वाद आहे. ते एकमेकांसमोर येऊन भिडले आहेत. राज्यकर्ते म्हणताहेत, कीं 'आम्ही तुमच्यावर परकीय जेते या नात्यानेच राज्य करणार आणि तुमच्या देशातील सपत्ति धुऊन नेऊन लक्षावधि लोकाना दुष्काळाच्या, प्लेगाच्या, दारिद्र्याच्या व उपासमारीच्या भक्ष्यस्थानीं देणार' याच्या उलट प्रजाजन म्हणताहेत कीं 'आम्ही ही गोष्ट चालू देणार नाहीं.' कलकत्त्यांत याबाबत पहिली सभा भरली तो दिवस हिंदुस्थानच्या इतिहासात लाल शाईनें लिहिण्यासारखा आहे असे मला वाटतें हिंदी लोकांच्या स्वातंत्र्याचा जन्मदिवस पाहण्यास मी जगलों याबद्दल मी परमेश्वराचे आभार मानतों आता साहाजिकच असा प्रश्न उभा राहतो, कीं प्रजाजन आणि राज्यकर्ते याच्यांत जें हे उघड युद्ध जाहीर झालें आहे, त्याचे परिणाम काय होणार? या प्रश्नावर माझे स्वतःचें मत किंवा विचार मी आपणांस सागू इच्छीत नाहीं. ॲंग्लो-इंडियन अधिकाऱ्यानींच, सध्यांचें धोरण पुढें चालू ठेविल्यास काय परिणाम घडतील त्याचें उत्तर दिले आहे. मुंबई इलाख्याचा सुप्रसिद्ध गव्हर्नर आणि पोलिटिकल एजट (व इतर कामाबद्दल नांवलौकिक मिळविलेला अधिकारी) सर जॉन माल्कम् ब्रिटिश राज्यपद्धतीचें वर्णन करून

* लो. टिळकाचे केसरींतील लेख, भाग ४ था, पृ. १–६.

तिच्या अपरिहार्य परिणामासबंधीं म्हणतो : 'आमचा नैतिक अधःपात एवढाच याचा परिणाम नाहीं, तर त्याचे इतर दुष्परिणामहि भोगावे लागतील यांत साम्राज्याच्या विनाशाचींच बीजे आहेत.' यानतर आणखी कांहीं ब्रिटिश लोकाची मतें सागून दादाभाई म्हणतात : "मीं तुम्हांस फक्त मोठ्या सरकारी-अधिकाऱ्याचीं व सुप्रसिद्ध ॲंग्लो-इडियन लोकांचीं चार-पांच मते वाचून दाखविलीं त्या सर्वांचा निष्कर्ष इतकाच आहे, कीं सध्यांची अनर्थावह राज्यपद्धति अशीच चालू राहिल्यास त्यामुळे ब्रिटिश साम्राज्यावर अनर्थ ओढवेल–खरे सांगायचे म्हणजे हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्य नष्ट होईल ! या अनर्थावह राज्यपद्धतीमुळे आज आम्ही या अवस्थेस येऊन पोहोचलो आहो ही अनर्थावह राज्यपद्धति तरी नाहींशी झाली पाहिजे, नाहीं तर ब्रिटिश साम्राज्यावर अनर्थावह परिणाम तरी ओढवले पाहिजेत आपल्यापुढील मुद्दा अगदीं स्पष्ट आहे असे असल्यामुळें हिंदी लोकांवरहि एक कर्तव्याची जबाबदारी येऊन पडलेली आहे त्यानीं आता कामाला प्रारभ केला आहे, आम्ही गुलामांप्रमाणे नांदणार नाहीं असे त्यांनीं जाहीर केलें आहे, आतां त्यांनीं निर्धाराची वृत्ति धारण केली पाहिजे कारण स्वराज्य मिळविण्याचा हिदी लोकांनीं निर्धार केला आहे अशी एकदा ब्रिटिश लोकाची खात्री झाली, तर ते त्यांना स्वराज्य दिल्याखेरीज राहणार नाहींत याबद्दल मला फारशी शंका नाहीं. तो दिवस पाहण्यास कदाचित् मी जगणार नाहीं, पण हे तडीस जाणार याबद्दल मात्र मला निराशा वाटत नाहीं "*

अशा रीतीनें लॉर्ड कर्झन यांच्या अरेरावी अमलाविरुद्ध हिंदी राष्ट्र एकमुखाने झगडा करण्यास सज्ज होऊन उठले या वेळींच मुंबई-अधिवेशनाचे अध्यक्ष सर हेन्री कॉटन याच्या अध्यक्षतेखालीं एक शिष्टमडळ व्हाइसरॉयसाहेबांपुढें आपलीं गाऱ्हाणीं मांडावयास जाणार होते ; पण लॉर्ड कर्झन यांनीं त्या शिष्टमंडळाची भेटच घेण्याचें नाकारिले ! राष्ट्रसभेला लोकाच्या वतीने राज्यकर्त्याशीं बोलण्याचा मुळींच अधिकार नाहीं, असा लॉर्ड कर्झन याच्या या नकाराचा स्पष्ट अर्थ होता राष्ट्रसभा ही एक इग्लंडातील पार्लमेंटांत सरकारविरोधी पक्ष असतो तशा प्रकारची सस्था आहे ही कल्पना खोटी आहे आणि नामदार गोखले याच्यासारखे कायदेमंडळांत लोकातर्फे निवडून आलेले प्रतिनिधी हे कितीहि विद्वान् किंवा देशभक्त असले, तरी त्यानाहि इंग्लंडांतील सरकारविरोधी पक्षाचा दर्जा व मान देण्यास आम्ही तयार नाहीं, असेहि लॉर्ड कर्झन यांना या नकाराने दाखवावयाचें होते. पुण्यातील सार्वजनिक सभा लो. टिळकांच्या हातीं गेल्यामुळें ती उच्छृंखल बनली व म्हणूनच तिचें लोकप्रतिनिधित्व सरकारनें अमान्य केलें, असें म्हणणाऱ्या नेमस्त पुढाऱ्यांनाहि राष्ट्रसभेच्या बाबतींत तसाच अनुभव आतां आला आणि व्हाइसरॉयांनीं भेट घेतली नाहीं एवढ्यानें आमचें महत्त्व कांहीं कमी होत नाहीं, असे म्हणून त्यांना स्वस्थ बसणे भाग पडलें ! यानंतर

* Speeches and Writings of Dada Bhai, P. 274-75

मुंबईच्या ठरावाप्रमाणे इंग्लंडांत शिष्टमंडळ पाठवून तेथील लोकांना आपले म्हणणें पटवून देण्याचा प्रयत्न करण्याचा मार्गच काय तो शिल्लक उरला.

## टिळक-गोखले यांचें ऐक्य

ना गोखले व लाला लजपतराय हे तरुण पुढारी या वेळीं राष्ट्रसभेच्या वतीने इंग्लंडांत गेले या वेळची इंग्लडातील ना. गोखले यांची शिष्टाई लो टिळक यानाहि वाखाणावी लागली, इतकी ती चांगली वठली लो टिळकांना ना गोखले यांची या वेळची कामगिरी इतकी कां आवडली याचे रहस्य पाहू या वेळीं दादाभाई नौरोजी याच्या सल्ल्यानुसार ना गोखले यांनीं हिंदुस्थानांत सुरू झालेल्या बहिष्काराच्या चळवळीचा ब्रिटिश जनतेसमोर उघडपणे पुरस्कार केला आणि केवळ युक्तिवादाचा सदनशीर मार्ग पुरेसा पडत नाहीं, हे पाहून ते प्रत्यक्ष प्रतिकाराच्या साधनाकडे वळले! ता. २८ नोव्हेंबर १९०५ च्या केसरींत "हातघाईवर आले!" या मथळ्याचा लेख आला आहे. त्यांत लो टिळक लिहितातः "राष्ट्रीय सभा वीस वर्षें भीक मागत आहे; पण अधिकारीवर्गाच्या मनावर त्याचा अद्याप काहीं परिणाम झालेला नाहीं, ही गोष्ट ढळढळीत आमच्या डोळ्यापुढे आहे, व आमचे जे प्रतिनिधी विलायतेस गेले आहेत त्यांस तिकडील लोकहि असे विचारूं लागले आहेत, कीं 'काय हो, हिंदुस्थानांतील गोऱ्या अधिकाऱ्याच्या जुलुमांचा कृतीने प्रतिकार करण्यास तुम्ही कधींहि तयार होणार नाहीं, असे जे सदर अधिकारी किंवा त्यांचे पित्ते आम्हास सांगतात ते खरे काय?' असा कोणता हिंदुस्थानचा कैवारी आहे, कीं जो हा प्रश्न ऐकून स्वदेशी-चळवळीच्या सध्याच्या स्वरूपाचे मंडन किंवा अभिनंदन करणार नाहीं? मि दादाभाई नौरोजी, प्रो गोखले किंवा लाला लजपतराय हे मोठ्या कळकळीनें बहिष्कारयोगाचे कां समर्थन करतात, याचें कारण आता वाचकांस कळून येईल."§ राष्ट्रसभेच्या दोन्ही पक्षातील नवे-जुने पुढारी आतां केवळ बुद्धिबलाचा मार्ग सोडून प्रत्यक्ष कृतीच्या अथवा प्रत्यक्ष प्रतिकाराच्या मार्गावर येत आहेत, असें दृश्य १९०५ सालीं दिसू लागलें होतें व त्यामुळेच लो. टिळकाना आनद होत होता या वेळीं हिंदुस्थानांतील पूर्व बगालचे लेफ्टनट गव्हर्नर सर बॅंफील्ड फुलर हे होते आणि ते भेदनीतीचा व दमननीतीचा यथेच्छ उपयोग करून लोकांत निर्माण होणारी ही प्रत्यक्ष प्रतिकाराची क्रांतिकारक वृत्ति दडपून टाकण्याचा आसुरी प्रयत्न दडपशाहीच्या अत्याचारी मार्गानें करीत होते पण या वेळीं लोकांनीं निग्रहाने व एकजुटीने प्रत्यक्ष प्रतिकाराचा मार्ग अवलबिला, तर त्यापुढें फुल्लरशहासहि नमावें लागेल असा आत्म विश्वास लो टिळकांना वाटत होता ते वरील लेखाच्या प्रारभी लिहितात: "प्रजेचा निग्रह आणि सप यांची शक्ति कांहीं सामान्य नाहीं आमच्या इग्रज सरकारच्या अधिकाऱ्यांपेक्षां रशियाचे झार आणि त्यांचे अधिकारी अधिक जुलुमी व उर्मट आहेत

§ लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ. ६१–६२.

( किंवा होते असें आतां म्हटलें पाहिजे ) हें सुप्रसिद्ध आहे. पण रशियांतील लहान-मोठ्या लोकांनीं, प्रोफेसरानीं आणि विद्यार्थ्यांनीं, मजुरानीं आणि कारखानदारानीं, एडिटरांनीं आणि दुकानदारानीं सर्वत्र सप करून आपले मागणे नेटानें आणि धैर्यानें कशाचीहि पर्वा न करिता जेव्हा झारसाहेबांपुढे मांडिले, तेव्हां युरोपांतील, किंबहुना सर्व जगांतील बादशहांमध्ये प्रबल व वीस-बावीस लक्ष सेनेचे अधिपति जे सर्व 'रशियाचे झार' त्यासहि मद्दयास येऊन प्रजेचे म्हणणे बरेचसे कबूल करावें लागलें..... कांहीं वर्षांपूर्वी इंग्लडांत अशी समजूत होती, कीं रशियन लोकांच्या हातून अशा प्रकारचा सप कधींच व्हावयाचा नाहीं कारण, एक तर देश अफाट, लोक निरनिराळया जातींचे व धर्मांचे आणि झारच्या किंवा बादशहाच्या हातीं अनियंत्रित सत्ता असून सैन्याचा जोरहि अपार, तेव्हा अशा सत्तेविरुद्ध किंवा सामर्थ्याविरुद्ध गडबड करण्यास कोण धजणार ? पण हा भ्रम आता दूर झाला आहे, व मुंग्यांच्या अंगांतहि हत्तीला जेरीस आणण्याचे सामर्थ्य आहे, ही गोष्ट निर्विवाद सिद्ध झाली आहे ! हिंदुस्थानांत अशा प्रकारे लढाई जुंपण्याची नुकतींच कोठे थोडीं-बहुत चिन्हे दिसू लागलीं आहेत. परतु दुर्दैवाची गोष्ट ही, कीं इतक्यातच आमच्या-पैकीं कांहीं जण 'पुरे ही गडबड, आता शातता होऊ द्या !' असे म्हणू लागले आहेत. मूर्ख बेटे ! राष्ट्रीय चळवळ म्हणजे काय हे त्यांस समजते कीं नाहीं याचीच शंका आहे" तात्पर्य, हिंदुस्थानांतील पूर्व बगालमध्यें स्वदेशी-बहिष्काराची चळवळ सुरू होऊन फुल्लरसाहेब तिला दडपून टाकण्यास उद्युक्त झाले होते आणि त्यांच्या दडपशाहीचे अक्राळविक्राळ स्वरूप पाहून हिंदुस्थानातील काहीं लोक मुत्सद्दीपणाचा आव आणून आतां ही चळवळ पुरे झाली, असे म्हणूं लागले होते अशा वेळीं इंग्लंडात दादाभाई व लाला लजपतराय यांच्याप्रमाणें ना गोखलेहि बहिष्काराचें समर्थन करू लागले हें पाहून लोकमान्याना आनद झाला व तो त्यानीं ना गोखले हिंदुस्थानात परत आल्यावर पुण्यात त्याचे जाहीर अभिनदन करून व्यक्त केला

फुल्लर यांची दडपशाही पाहून लो. टिळकांना १८९७ सालच्या पुण्यांतील दडपशाहीची आठवण झाली वरील आपल्या लेखात ते म्हणतात : "बंगाली लोकानीं स्वदेशी-चळवळीचें जें नवें शस्त्र काढलें आहे, त्यामुळें हिंदुस्थानातील अधिकारीवर्ग पुढेंमागे जेरीस येईल असें मनात भरल्यामुळेच फुल्लरसाहेब वेडे होऊन गेले आहेत, व एकाद्या मदोन्मत्त हत्तीप्रमाणें बंगाली लोकाचा आताच समाचार घ्यावा असे त्यांनीं मनांत आणलें आहे गंगेच्या काठीं असलेल्या बारिसाल शहरांत साहेबांची स्वारी जाऊन शहरातील पुढाऱ्यास आगबोटीवर बोलावून आणून त्यानीं तबी दिल्याचें गेल्या अंकीं प्रसिद्ध झालेंच आहे आणि आता असें समजतें, कीं शहरात आणलेल्या लष्करी गुरखे शिपायाकडून लोकांनीं आपापल्या घरातहि 'वन्दे मातरम्' म्हणू नये, असा जुलूम चालला आहे. ...... १८९७ सालीं पुणें-मुंबईस, निदान पुण्यात तरी, अशा प्रकारची झोटिंग बादशाही उठली होती. पण फुल्लरसाहेबांनीं

त्यावरहि कडी करून दिली आहे! लोकांच्या पुढाऱ्यांस बोलावून आणून तोंडावर त्यांस शिव्याशाप देऊनच ते थांबले नाहींत; तर ज्या शहरात ते येण्यापूर्वी सर्वत्र शांतता होती, तेथें गुरखे शिपायांस आणून लोकांस त्यानीं त्राहि त्राहि करून सोडले आहे! आणि एवढे कशाकरिता म्हणाल, तर लोक स्वदेशी-चळवळ करतात म्हणून! फुल्लरसाहेबाचे मत झाले आहे, कीं ही स्वदेशी-चळवळ म्हणजे फ्रान्स देशात पूर्वी घडलेल्या राज्यक्रांतीसारखेंच बंड आहे, व हें वेळींच जर हाणून पाडलें नाहीं, तर हिंदुस्थानातील इंग्रजी साम्राज्यावर लवकरच घोरपड येऊन तें समूळ लयास जाईल.. ... विद्यार्थ्यास विद्यार्थी म्हणून, तरुणांस नोकर म्हणून आणि म्हाताऱ्यास पेन्शनर म्हणून, या चळवळींत सामील होण्याची मनाई करतील; सरकारी व निमसरकारी नोकऱ्याहि न देण्याचा ठराव होईल; आणि १८१८ साली पिनल कोडात ज्याप्रमाणे दुरुस्ती झाली त्याप्रमाणे आताहि होऊन सरकारी अंमला-विरुद्धच नव्हे, तर 'विलायती मालाविरुद्ध' चळवळ करणे हाहि राजद्रोहाचा गुन्हा ठरेल पण लोकाच्या मनाची हल्लीं जी स्थिति आहे त्यावरून आम्ही असें सांगतों, कीं हे सर्व प्रयत्न परिणामीं निष्फळ झाल्याखेरीज राहणार नाहींत" पुढें ते दादाभाई व गोखले यांचे अभिनदन करून लिहितात: "सर्वस्वीं हतभागी झालेल्या आमच्या लोकास वर येण्याचा जर कांहीं मार्ग असला तर तो स्वावलबन, स्वार्थत्याग, निश्चय आणि धैर्य हाच होय देशाच्या हल्लींच्या स्थितींत शांततेनें पण निश्चयाने आपल्या हातून होईल तितकी एकीने अगर संपाने आम्हीं आपणास मदत करण्यावाचून आम्हास दुसरा मार्ग राहिलेला नाहीं"

## हिंदी राष्ट्रवाद व ब्रिटिश समाजवाद

या वेळीं हिंदी राजकारणांत जी बहिष्काराची चळवळ सुरू झाली होती, तिची वाढ होतां होता तिला अखेरीस निःशस्त्र किंवा सशस्त्र क्रांतीचे स्वरूप प्राप्त होणार, हें लोकमान्यांच्या वरील लेखावरून त्यांनीं पूर्णपणे जाणले होते हे उघड आहे हिंदी राजकारण जसजसें क्रांतिवादी बनू लागले, तसतसा त्याचा संबध इंग्लडातील समाजवादी पक्षाशीं अधिकाधिक येऊं लागला, आतांपर्यंत हिंदी पुढाऱ्यांचा संबध इंग्लंडातील लिबरल पक्षाशींच असून दादाभाईप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्याचा त्या पक्षातील पुढाऱ्यावरच विश्वास होता पण १९०४ च्या सप्टेंबर महिन्यांत ॲम्स्टर्डाम या शहरीं समाजवादी पुढाऱ्यांची एक आतरराष्ट्रीय परिषद् भरली होती; तिला दादाभाई हजर राहिले आणि तेथें हिंदुस्थानच्या करुणास्पद दुःस्थितीचे हृदयस्पर्शी शब्दचित्र रेखाटून त्यांनीं ब्रिटिश साम्राज्यशाहीखालीं खितपत पडलेल्या हिंदुस्थानाकडे जगांतील समाजवादी क्रांतिकारकाचें लक्ष वेधून घेतलें. या वेळीं दादाभाईच्या भाषणाचा सर्व समाजवादी क्रातिकारकांनीं उभे राहून गौरव केला आणि दादाभाईच्या नांवाचा जयघोष केला! दुर्दैवानें दादाभाईच्या या परिषदे-

पुढील भाषणाचा वृत्तान्त त्याच्या प्रसिद्ध झालेल्या लेखांच्या व भाषणांच्या संग्रहांत समाविष्ट झालेला नाहीं ! या वेळीं दादाभाईचा, इंग्लडांतील समाजवादी पुढारी हिंडमन् यांच्याशीं बराच स्नेह जमलेला होता ही सर्व घटना हिंदुस्थानातील राष्ट्र-सभेच्या सूत्रधाराना पसत नव्हती आणि दादाभाईनीं समाजवादी पक्षाशीं संबध जोडला हे पाहून त्यांनीं दादाभाईना दोष देण्यासहि कमी केले नाहीं ! तथापि, दादाभाईनीं आपला सबध त्यामुळे तोडला असे नाहीं १९०५ च्या जुलै महिन्यांत विलायतेत श्री श्यामजी कृष्णवर्मा यानीं 'इडिया हाउस' या नांवाची एक सस्था काढिली व तिचे उद्घाटन हिडमन् याच्या हस्ते केले, त्या वेळींहि दादाभाई नौरोजी हे हजर होते. या समारभात भाषण करताना हिडमन् यानीं बहिष्काराच्या व्याप्तीचा जो उल्लेख केला, त्यासबधीं लो टिळक लिहितात : " राज्यकर्ते जेव्हां प्रजेचें ऐकत नाहींत, तेव्हा प्रजा क्षुब्ध होऊन राजास शासन करण्यास प्रवृत्त होते, याचें एक मोठे उदाहरण खुद्द इग्लडच्या इतिहासात घडून आलेले आहे. अनेक आचार-विचारांनीं भिन्न झालेल्या आणि राज्यकर्त्यांनीं निःशस्त्र केलेल्या गरीब बिचाऱ्या हिंदुस्थानास हा उपाय शक्य नाहीं हे सागावयास नकोच पण उत्तम रामबाण औषध मिळत नाहीं म्हणून सामान्य औषधाची देखील आम्हीं योजना करू नये, असे कोण म्हणेल ? ...... विलायतेंतील लोकापुढे आमची रड गायिली तर कांहीं उपयोग होईल असे वाटत होते पण ही समजूत खोटी आहे असे मि हिंडमन् यानीं पडित श्यामजी यानीं स्थापिलेले 'इंडिया हाउस' उघडते वेळीं जे भाषण केलें, त्यांत स्पष्ट सांगितले आहे अधिकार आणि स्वार्थ यानीं डोळयावर आलेलें पटल तोंडाच्या वाऱ्याने फुकून कधींहि नाहींसे होत नाहीं .... , लॉर्ड कर्झन ऐकत नाहींत, मि. ब्रॉडरिक ऐकत नाहींत, आणि पार्लमेंटहि ऐकत नाहीं, मग करावे काय ? या सर्वांचे डोळे उघडतील असा काहीं तरी इलाज करणे अवश्य आहे. शस्त्रास्त्रांनीं या अरेरावीचा प्रतिकार करणे अशक्य होय हे वर सागितलेच आहे. आणि शस्त्रास्त्रें गेलीं म्हणजे केवळ सघशक्तीच कायम राहते. आणि या संघशक्तीचा उपयोग कायदे-शीर रीतीनें राज्यकर्त्यांची धुदी उतरण्याचे कामीं जर करिता येईल, तर धैर्याने आणि हिंमतीनें अशा प्रकारचा उद्योग करणे हे हिंदुस्थानची कळकळ बाळगणाऱ्या प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य होय . मि हिडमन् यानीं हाच सिद्धान्त 'इडिया हाउस' उघडण्याच्या वेळीं केलेल्या आपल्या भाषणात सागितला आहे.. .. ऐतिहासिक दृष्टया विचार केला, तर 'राष्ट्रीय बहिष्कार' हा यापैकींच एक उपाय आहे असें आढळून येतें. सर डब्ल्यू वेडरबर्न यांचे विलायतेंत 'ग्रीनवुइस एथिकल सोसायटी'-पुढें राष्ट्रीय सभेवर जे नुकतेच व्याख्यान झालें त्यात त्यानीं असे सागितलें, कीं इटली देश जेव्हां ऑस्ट्रिया देशाच्या ताब्यांत होता, तेव्हां इटालियन लोकांनीं परकीय ऑस्ट्रियन अधिकाऱ्यांस बहिष्कार घालून राज्यव्यवस्थेचें काम दुष्कर करून टाकिलें होतें. सर डब्ल्यू. वेडरबर्न म्हणाले, कीं हिंदुस्थानांतील लोकांनीं हीच रीत

स्वीकारिली, तर हिंदुस्थानांत राज्यकारभार चालविणें राज्यकर्त्यास कठिण जाईल...
....... .. . . ... . .. सर डब्ल्यू. वेडरबर्न यांस ज्या बहिष्काराबद्दलची धास्ती वाटत होती तोच प्रसंग आज येऊन ठेपला आहे "* अर्थात् या बहिष्कारांत केवळ विलायती कापडावरील बहिष्काराचाच अतर्भाव होत होता असे नसून मालाचा बहिष्कार ही या बहिष्कार-योगातील केवळ पहिली पायरी होती या पायरीवरून चढून वर जातां जातां अखेरीस कायदेभंगाचें व करबंदीचे निःशस्त्र क्रांतींतील अखेरचे शिखर गांठावयाचें अशी या बहिष्कारयोगाची व्याप्ति होती

## निःशस्त्र प्रतिकार व सिनफेन

दादाभाई नौरोजी यांनीं १८८० सालींच स्वदेशी चळवळीच्या व विलायती मालाच्या बहिष्काराच्या चळवळीचे अंतिम पर्यवसान ब्रिटिश राज्यावरील बहिष्कारांत होईल व हिंदुस्थानांत क्रांतिवादी राजकारण फैलावेल असे बोलून दाखविले होतें, हे मागें पांचव्या प्रकरणात दिलेंच आहे. आतां या मार्गाचा उघडपणे उपदेश करणारा एक पक्ष हिंदुस्थानांत निर्माण होऊ लागला होता व त्याचे नेतृत्व लो टिळक यांच्याकडे येऊं लागलें होतें. याच सुमारास आयर्लंडातहि एक निःशस्त्र क्रातिवादी पक्ष आर्थर ग्रिफिथ यांच्या नेतृत्वाखालीं तयार होत होता; आणि पूर्वीपासून आयर्लंडातील पुढाऱ्यांच्या धोरणापासून बोध घेणाऱ्या टिळकाना ग्रिफिथ यांचा निःशस्त्र क्रातीचा मार्ग अवलंबावासा वाटले असलें, तर त्यांत नवल नाहीं पार्नेलच्या मृत्यूनंतर आयरिश राजकारण पार्लमेंटातील अडवणुकीवरून राज्ययंत्राला खीळ घालण्याच्या आणि प्रतिस्पर्धी राज्ययत्र स्थापन करण्याच्या निःशस्त्र क्रांतीच्या मार्गावर येऊन पोहोचले होते. अर्थात् हिंदी राजकारणाचाहि बहिष्कारयोगाच्या आश्रयाने निःशस्त्र क्रांतिमार्गात विकास होणे साहजिक होतें. आर्थर ग्रिफिथचा सिनफेन पक्ष हा प्रारभी निःशस्त्र क्रांतिवादी होता व त्याला आपले साध्य प्राप्त करून घेण्यास शस्त्रधारणाची आवश्यकता वाटत नव्हती. त्याचा सर्व भर स्वदेशी, स्वावलबन, बहिष्कार आणि निःशस्त्र प्रतिकार या साधनांवरच होता एका बाजूस पार्लमेंटांतील अडवणूक आणि दुसऱ्या बाजूस सशस्त्र क्रातिवाद या दोहोंच्या दरम्यानचा असा हा निःशस्त्र क्रांतिमार्ग होता पी. एस्. ओ हेगार्टी यानीं यासबंधींची माहिती आपल्या 'Sinn Fein : An Illumination' या पुस्तकांत दिली आहे.§ हिंदुस्थानात व

* लो. टिळकाचे केसरींतील लेख, भाग ३ रा, पृ. ८–९.

§ "The Sinn Fein movement as such, did not contemplate an appeal to arms, believing that its policy, with the majority of Ireland behind it, would be irresistible on a passive resistance basis '

—*Sinn Fein. An Illumination*, P. 25

"The Sinn Fein Policy is not a policy that could be made effective by a minority, though even a minority, determined and well led, could make it

आयर्लंडात अशा प्रकारें एकाच वेळीं नि.शस्त्र क्रांतिवादाचा उदय झाला. याच सुमारास समाजवादी क्रांतिकारकांतहि एक प्रकारचा " सार्वत्रिक सपा "च्या रूपांत निःशस्त्र क्रांतिवाद निर्माण होत होता पण या सर्व निःशस्त्र क्रांतिवादी कल्पनांना मूर्त स्वरूप देण्याचें कार्य फक्त हिंदुस्थानातच झालें असून त्याचें बहुतेक श्रेय म. गांधींना व त्यांच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानाला आहे हा राष्ट्रसभेच्या इतिहासांतील पुढील भाग आहे येथे फक्त १९०५ सालीं निःशस्त्र क्रांतिवादाची कल्पना हिंदुस्थानात प्रथम निर्माण कशी झाली व त्या कल्पनेच्या आधारावर राष्ट्रसभेला नवें धोरण लावण्याचा पहिला प्रयत्न लाला लजपतराय, लो टिळक आणि बाबू बिपिनचद्र पाल यांनीं १९०६ व १९०७ सालीं कसा केला, तेवढेच पहावयाचे आहे.

ना गोखले इग्लडांतील आपलें कार्य सपवून बनारस येथील राष्ट्रसभेच्या अध्यक्षपदासाठीं थोडेच दिवस आधीं हिदुस्थानात येऊन दाखल झाले त्यांच्या कार्याचा येथे आल्यावर सर्वोकडून कां व कसा गौरव झाला, तें मागें सागितलेंच आहे. हिंदुस्थानातील स्वदेशी-बहिष्काराच्या चळवळीचे त्यांनीं केलेलें समर्थन हेंच त्यांच्या गौरवाचें प्रमुख कारण होते. पुण्यात त्याचें जाहीर स्वागत करून लो टिळकांनीं जी वृत्ति दाखविली, त्यावरून आतां पुण्यांतील पक्षभेद मिटले असा भास काहीं काळ तरी लोकाना झाला आणि हा भास लॉर्ड मोर्ले भारतमंत्री होऊन त्यांच्या ना गोखले यांच्याशीं गांठीभेटी सुरू होईपर्यंत म्हणजे सुमारे एक वर्षभर टिकला. तथापि, या वर्षातहि लो टिळक आणि ना गोखले याच्या राजकारणांतील मूळ भूमिका भिन्न आहेत याचें ज्ञान सूक्ष्म दृष्टीने अवलोकन करणारांस झाले असतें लो टिळक हे हिंदी राजकारणाला सनदशीर सुधारणावादांतून निःशस्त्र क्रांतिवादाकडे नेण्याचा प्रयत्न करीत होते त्याच वेळीं ना गोखले आपल्या गुरूच्या नेमस्त सनदशीर राजकारणाला चिरतन करण्यासाठीं " भारतसेवक समाज " ही राष्ट्रसेवेला वाहून घेतलेल्या राष्ट्रसेवकाची संस्था काढीत होते. ही सस्था त्यांनीं १९०५ मध्यें जूनच्या १२ तारखेस स्थापन केली. तिच्या उद्देशपत्रिकेंत ब्रिटिश साम्राज्यांतील स्वराज्य हेच आपलें राष्ट्रीय ध्येय असून ब्रिटिशाशीं हिंदुस्थानचा सबंध जोडण्यांत हिंदुस्थानचें हित करण्याचाच परमेश्वराचा हेतु असावा, ही आपली श्रद्धा त्यानीं व्यक्त केलेली आहे; अर्थात् हा सबंध तोडून पूर्ण स्वातंत्र्य प्रस्थापित करणे किंवा

felt but if adopted by the majority of the Irish people, there is no doubt of its effectiveness It would make Government impossible, for it must always be remembered that in modern times a subject-nation remains a subject-nation, only because it accepts, in some or other way its government A nation which will resolutely and unitedly, on the lines of the Sinn Fein policy, ignore its government and proceed to the formation of a voluntary (so to speak) Government, would force the occupying power either to give in or to provide an armed guard for every unit of the subject-nation."

— *Ibid*, p. 26-27.

तसा प्रयत्न करणें म्हणजे परमेश्वरी इच्छेचा किंवा आज्ञेचा भंग करणें, असा सहजच अर्थ निघतो व तो तसा काढण्यांतहि येत असे.

## ऐतिहासिक घडामोडी व परमेश्वरी संकल्प

जगांतील किंवा मानवी इतिहासांतील कोणतीहि बरीवाईट गोष्ट परमेश्वराच्या अतर्क्य लीलेनेच घडून येत असते, या सामान्य धार्मिक तत्त्वज्ञानाहून वरील श्रद्धेला फारसा काहीं आधार आहे असे आम्हास वाटत नाहीं. पण हे सामान्य तत्त्व गृहीत धरिले, तरी जगांतील सर्व घडामोडी आपल्या हितासाठीं घडत आहेत असें मानून त्यांचा प्रतिकार किंवा त्यांपैकीं कोणत्याहि गोष्टीचें निराकरण करू नये, असें सिद्ध होत नाहीं. प्रत्येक आपत्तीपासूनहि आपणांस आपल्या उद्धारार्थ कांहीं तरी बोध घेतां येईल, एवढाच या तत्त्वाचा व्यावहारिक अर्थ करितां येईल. पण एवढ्यावर न थांबतां आपल्यावरील आपत्ति हाच परमेश्वरी प्रसाद समजून तिलाच प्रेमानें कवटाळणें अथवा पारतंत्र्यावरच स्वातंत्र्याचा अध्यारोप करणें हे योग्य नाहीं; व जे लोक या धार्मिक दृष्टीनें जगातील घडामोडींकडे पाहतात, ते सर्व तसें करीतहि नाहींत कोणत्याहि राष्ट्राला कायमचे दुसऱ्याच्या अंकित रहावे लागणें ही गोष्ट परमेश्वरी इच्छेस अनुसरून आहे, असे कोणत्याहि दृष्टीने समाधानकारक किंवा सयुक्तिक दिसत नाहीं आगरकरानीं एके ठिकाणीं म्हटलें आहे, कीं "जोंपर्यंत कोणताहि रोग सुसाध्य किंवा कष्टसाध्य वाटत आहे, तोंपर्यंत त्याच्या परिहारासाठीं होईल तेवढा प्रयत्न करणे हें योग्य व अवश्य आहे, पण तो एकदा पराकाष्ठेचा दुःसह झाला व असाध्य ठरला म्हणजे त्याच्या अनंत यातना सोसणाऱ्या रोग्याचे डोळे जितके लवकर मिटतील तितके बरे, असे मनांत येणें दूषणीय आहे असें आम्हांस वाटत नाहीं. त्याप्रमाणेच गुलामगिरी ज्या लोकांच्या हाडामासांत खिळून गेली आहे व स्वतंत्र राष्ट्रमालिकेंत जें राष्ट्र कधींहि गुंफले जाण्याची आशा नाहीं, असें राष्ट्र अजिबात नष्ट झालें तर कांहीं वावगे नाहीं असे कोणी म्हणेल, तर त्याला समर्पक प्रत्युत्तर देता येणार नाहीं, अशी आमची समजूत आहे एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राच्या नेहमीं अंकित राहणें हे योग्य आहे असे समजणें म्हणजे मनुष्यांच्या दोन पृथक् जाती आहेत व एकीचें पशूंशीं विशेष साम्य असून सहजगत्या तीस मनुष्यपदवी देण्यांत आली आहे, असें म्हणण्यासारखेंच होय. प्लेटो, ॲरिस्टॉटल वगैरे जुन्या ग्रीक तत्त्ववेत्त्यांचा कांहीं अंशीं अशा प्रकारचा समज होता, व सांप्रतकालींहि दुर्बल परक्या लोकांवर राज्य करणाऱ्या बलाढ्य राष्ट्रांतील कांहीं इसमांच्या तोंडूनहि अशा प्रकारचे उद्‌गार निघतात. पण अलीकडे या मतांस सामान्य विचारी मनुष्य संमति देत नाहीं. हेलेनिक (ग्रीक) लोक मात्र राज्य करण्यास योग्य आहेत, असा बुद्धिवाद आतां कोणी ऐकणार नाहीं प्रयत्नाने पाहिजे त्या लोकांस पाहिजे ती स्थिति प्राप्त करून घेतां येणार आहे, असें वळण अलीकडील राज्यविषयक विचारांस

लागलें आहे. तथापि, जर कोणी समाधानपूर्वक असें सिद्ध करून देईल, कीं अमुक लोकांचें पाऊल कांहीं केलें तरी पुढें पडण्याची आशा नाहीं, तर असे लोक केव्हां तरी समूळ नष्ट होतील असें म्हणणे हे खोटें तर्कशास्त्र नाहीं किंवा असे लोक त्वरित नष्ट व्हावे अशी इच्छा करणें हे कोणत्याहि नीतिशास्त्राला सदोष म्हणवणार नाहीं "* तात्पर्य, तर्कशास्त्र किंवा नीतिशास्त्र या दृष्टीने विचार केल्यास हिंदुस्थान नेहमींच अंकित राष्ट्र राहणार म्हणण्यापेक्षां तें समूळ नष्ट होणार व तें पारतंत्र्यांत राहण्यापेक्षां शक्य तितक्या लवकर नष्ट व्हावे हेंच इष्ट आहे असें म्हणणें अधिक समंजस आहे, असे आगरकर प्रतिपादीत म्हणून अंकित स्वराज्य हेच आमचें अंतिम ध्येय व स्वातंत्र्याचा विचार आम्हीं स्वप्नांतहि आणूं नये, असें म्हणणारांस लोकनायक म्हणावें किंवा नाहीं याचीच त्यांना शंका होती पण १९०५ पर्यंतच्या काळात राष्ट्रीय स्वाभिमानाची जी जागृति लोकमान्यादि पुढाऱ्यांनीं केली होती, तीमुळे आतां आम्ही नष्ट होणार नसून जगाचें नेतृत्व करण्यासाठीं स्वतंत्रच होणार, अशी निश्चित खात्री भारतपुत्रांना वाटू लागली होती.

हिंदुस्थान परतंत्र झाला हा ईश्वरी प्रसाद होय, ही कल्पना प्रथम ज्या बंगाली हिंदू पुढाऱ्यांनीं काढिली, त्याच बंगाली हिंदू पुढाऱ्यांनीं हिंदुस्थान पूर्ण स्वतंत्र व्हावा असाच परमेश्वरी आदेश आता झाला आहे आणि आधुनिक हिंदी राष्ट्रीयत्व ही एक परमेश्वराची अवतारशक्ति आहे अशी भावना लोकांत निर्माण केली अशा वेळीं पहिल्या सिद्धान्ताच्या आधारावर भारतीय राष्ट्रसेवकांचा संघ स्थापन करण्याचा प्रयत्न ना गोखले करीत होते ! अर्थात् त्या संघाकडे उत्साही तरुणांचीं अंतःकरणें आकृष्ट होणे अशक्यच होतें. या वेळीं हिंदी राष्ट्रसेवकांना आकृष्ट करणारी श्रेष्ठ भावना राष्ट्रीय स्वातंत्र्य हीच असून या भावनेने ज्यांच्या अंतःकरणांत संचार केला होता, ते सुखदुःखाच्या द्वंद्वांतून मुक्त झाले होते; किंबहुना, या भावनेच्या आविष्कारार्थ वाटेल ते कष्ट सहन करणें यांतच ते आपल्या जीविताचे सार्थक मानून पारमार्थिक आनंद उपभोगू लागले होते सुखदुःखादि द्वैताच्या पलीकडे गेलेल्या या अद्वैतानुभवी मुक्तात्म्यांना कोणतेंहि कार्य दुर्घट वाटत नव्हतें आणि कोणतीहि आपत्ति दुस्तर वाटत नव्हती. आपणावर येऊन आदळणाऱ्या आपत्तिसागराच्या लाटा आपणास भेडसावीत नसून आपल्या अंतःकरणातील त्याहूनहि प्रचंड शक्तीस आपले प्रचंडतर सामर्थ्य व्यक्त करण्यास प्रेमाने आवाहन करीत आहेत, असा त्यांना अनुभव येत होता बाह्यतः प्रचंड दिसणाऱ्या भौतिक शक्तीवरहि प्रभुत्व गाजविणारी एक प्रचंडतर शक्ति आपल्या अंतःकरणांत आहे आणि मानवी बुद्धींत अवतीर्ण होणारीं ध्येयें या आत्मशक्तींतून निर्माण होत आहेत, किंबहुना ही बाह्यतः विरोधी दिसणारी भौतिक शक्ति हीहि खरोखर आपल्या अंतःकरणांतील आत्मशक्तीशीं विरोधी नसून तिचेंच तें एक बाह्यतः जड दिसणारें स्वरूप आहे, असा त्यांना भास होऊं लागला होता. हे

* निबंधसंग्रह, भाग १ ला, पृ १८३.

ओळखून आपणांवर येणाऱ्या आपत्तींच्या लाटांतून तरून जाणें ही एक आपल्या अंतःकरणांतील अमर्याद प्रेरणाबलाची दैवी लीला आहे, असें अनुभवणाऱ्या बंगाली तरुणांच्या दृष्टीला आध्यात्मिक मोक्ष आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य यांत भेद दिसत नव्हता. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या विषमविग्रहातील आपत्तींच्या लाटांशीं ते देहभान विसरून आनंदानें झगडूं लागले आणि राजकीय लढ्यात आध्यात्मिक मोक्षपदाचा अनुभव घेऊं लागले अशा प्रकारें सर्व हिंदुस्थानांत दुर्बल मानले गेलेले बंगाली तरुण राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या झगड्यांत सर्व राष्ट्रांच्या आघाडीवर जाऊन उभे राहिले आणि जगांतील जीवनकलहांत व्यक्तीला अगर राष्ट्राला नालायक बनवितो अशी ज्या वेदान्ताची दुष्कीर्ति सर्व जगभर झाली होती, त्याच वेदान्ताच्या आधारें प्रवृत्तिक्षेत्रांत उडी घेऊन सर्व जगाला राष्ट्रसंघटना आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य या संबंधींचें मार्गदर्शन करण्याचा मान या प्राचीनतम भरतभूमीच्या पुत्रांनाच मिळणार आहे, अशी आत्मश्रद्धेची भाषा ते बोलूं लागले

## वेदान्त व बंगाली राष्ट्रवाद

या बंगाली आध्यात्मिक राष्ट्रवादाचें यथार्थ वर्णन योगी अरविंद घोष यांच्या भाषणांतील पुढील उताऱ्यात केलेलें आढळते उपनिषदांतील दोन पक्ष्यांच्या कथेचा आधार घेऊन अरविंदबाबू म्हणतात : " या कथेंत असें म्हटलें आहे, कीं मधुर आणि कटु अशा फळांनीं भरलेल्या एका प्रचंड वृक्षावर दोन पक्षी बसलेले आहेत. एक या वृक्षाच्या अग्रावर बसला असून दुसरा एका खालच्या फांदीवर बसलेला आहे दुसरा पक्षी जेव्हां वर पाहतो, तेव्हां त्याला आपला संपन्न पिसारा पसरून पूर्ण वैभवांत बसलेल्या पहिल्या पक्ष्याचे दर्शन होतें आणि त्याच्यावरील प्रेमाने मोहित झाल्यावर हा वैभवशाली पक्षी दुसरा कोणी नसून तो आपलाच श्रेष्ठतम अंतरात्मा आहे अशी भावना त्यास होते पण जेव्हा तो त्या वृक्षावरील मधुर फलांचा आस्वाद घेतो, तेव्हां त्या फलांच्या माधुर्याचा त्याला इतका मोह पडतो, कीं तो आपल्या या प्रियतम प्राणसख्याला विसरून जातो थोड्याच वेळांत त्याच्यावर त्या वृक्षाचीं कडू फळे खाण्याची पाळी येते आणि या फलाच्या दुःखदायक आस्वादाने त्याच्यावर चढलेली मोहिनी नष्ट होऊन तो पुनः आपल्या तेजःपुंज सहचराकडे वर पाहतो. ही कथा जीवात्म्यांच्या मोक्षासंबंधींची आहे हे उघड आहे हे जीवात्मे जेव्हा संसारवृक्षाचीं मधुर फळे खाऊं लागतात, तेव्हां त्यांचाच अंतरात्मा असा जो परमात्मा त्याच्याकडे वर पाहण्याची त्यांस विस्मृति होते; जेव्हां ते या जगाच्या मायेला भुलून आत्मस्वरूपाला विसरतात, तेव्हां त्यांच्या या मायेचा विनाश करण्याचें कार्य कडू फळें करितात आणि मग त्यांना खरे आत्मदर्शन होतें. ही कथा राष्ट्रीय मोक्षालाहि तितकीच लागू पडते. आम्ही हिंदुस्थानी लोक परकीयांच्या मायेला वश होऊन गेलों होतों व आमच्या आत्म्यावरहि तिचा पूर्ण पगडा बसला होता जे लोक आमच्यावर

राज्य करीत आहेत, त्या परकीय लोकांच्या परकीय अमलाची, परकीय संस्कृतीची, परकीय लोकांच्या शक्तीची व सामर्थ्याची ही माया होती आमच्या शारीरिक, बौद्धिक व नैतिक जीवनावर घातलेल्या या जणु काय शृंखलाच होत्या आम्ही स्वराज्याला व राजकारणाला अपात्र आहो असेंच आम्हांस वाटूं लागले, इंग्लडाकडेच आम्ही आदर्श राष्ट्र म्हणून पाहू लागलों आणि तेंच आम्हांस मुक्त करील असे मानूं लागलो. पण ही सर्व माया होती व त्याच शृखला होत्या ......... हिंदुस्थानात जें काहीं चैतन्य होते, तें नष्ट करण्यास आम्हींच त्याना साहाय्य केलें .... छे, आम्हीच आमच्या बद्धतेचीं साधने बनलों ! आम्ही बंगाली लोक त्यांच्या नोकऱ्यांत शिरलों आणि त्याचे राज्य स्थापन केले. आमची अवनति झाली असल्यामुळे आमचे सरक्षण करण्यास, आम्हांस शिक्षण देण्यास, किंबहुना आमचें भरण करण्या- सहि आम्हांस दुसऱ्याची गरज भासूं लागली आमची स्वावलंबनाची शक्ति इतकी नष्ट झाली होती, कीं मानवी जीवनाचे कोणतेंहि कार्य करण्यास आम्ही असमर्थ बनलो होतो

" या मायेचा विध्वंस दडपशाही आणि क्लेश यांवाचून होत नाहीं वगभंगाचें जें कडू फल लॉर्ड कर्झन यानीं आम्हांस चाखावयास भाग पाडले, त्यामुळें हा मोह नष्ट झाला आम्ही वर दृष्टि करून पाहू लागलों आणि संसारवृक्षाच्या शेंड्यावर बसलेला तेजःपुंज पक्षी हा दुसरा कोणी नसून तो आमचा अंतरात्माच आहे, आमचा खरा प्रत्यगात्मा तो हाच, असे ज्ञान आम्हांस झालें. अशा प्रकारें आमच्या- मध्येंच स्वराज्य आहे आणि त्याची प्राप्ति करून त्याचा साक्षात्कार करण्याची शक्ति आमच्याचपाशीं आहे, हे आम्हास समजले.

" आम्हांस कांहीं लोक सागतात, कीं आमच्या पायावर उभे राहण्याची ताकद आमच्यापाशीं नाहीं, त्यासाठीं परकीयाचे साहाय्य आम्हांस घेतलें पाहिजे, म्हणून त्यांच्याशीं विरोध करीत असतां, त्यांच्याशीं सहकार्यहि करावे पण आपणांस एकाच वेळीं परमेश्वरावर व मायेवर अवलंबून राहतां येईल काय ?...तुमच्या मार्गातील संकटांना भिऊं नका तुमचा मार्ग रोखून धरणाऱ्या शक्ती कितीहि मोठ्या असल्या, तरी त्यांची फिकीर नाहीं तुम्ही स्वतंत्र व्हा, हा परमेश्वराचाच आदेश आहे व तुम्हीं स्वातंत्र्य संपादन केलेंच पाहिजे.. तुम्ही जर आत्मस्वरूपाला जागला, तर तुम्हांला भिण्यासारखें काहींच नाहीं. सत्य, प्रेम आणि श्रद्धा यांना असाध्य असें काहींहि नाहीं, हाच तुमचा धर्ममत्र आहे व त्याच्या योगानें चमत्कार घडून येतील. आपल्या सुरक्षिततेसाठीं किंवा सुखासाठीं द्व्यर्थी शब्द योजू नका. दुर्बलतेला आवाहन करू नका ताठ उभे रहा. स्वदेशीला दडपून टाकण्याच्या प्रयत्नामुळेंच तिचें तेज अधिक प्रकाशत आहे. लोक म्हणतात आमच्यात ऐक्य नाहीं, हें ऐक्य कसे निर्माण करावें ? मातृभूमीच्या हांकेला तिच्या सर्व पुत्रांनीं ओ देण्यानेंच हें ऐक्य निर्माण होईल, तें इतर खोट्या उपायांनीं निर्माण होणार नाहीं. हा ध्वनि अद्यापि मद आहे;

पण तुमच्या ' अर्धोदय योगा'च्या कार्यावरून आणि दुष्काळ-निवारणाच्या पुराव्या-वरून स्पष्ट दिसत आहे, कीं हा जयघोष अधिकाधिक मोठा होत आहे परमेश्वरी शक्तीचा आविर्भाव आजच आमच्यामध्यें झाला आहे, तिचे कार्य सर्व देशभर पसरत आहे पश्चिम बंगालमध्येहि उत्तरपारा व बारिपूड येथें तिनें आपले कार्य सुरू केलें आहे हे आमचे कार्य नसून आमच्यापेक्षां प्रचंड अशी एक शक्ति आम्हांला पुढे लोटीत आहे व सर्व बंधनें तुटून पडून हिंदुस्थान सर्व जगांत स्वतंत्र राष्ट्र म्हणून नांदू लागेपर्यंत हे कार्य करीत राहण्यास ती आम्हांस प्रेरणा देत आहे "*

" राष्ट्रधर्माचें उदाहरण बंगालने घालून दिलें आहे सर्व हिंदी लोकात ज्या बंगालची अवहेलना होत असे व ज्या बंगालला सर्वांत कमी मान मिळत असे, तो बगाल या तीन वर्षांत इतका पालटला आहे, कारण तेथील ज्या लोकांना आपल्या अंतःकरणांत परमेश्वराचे स्वागत करण्याची संधि लाभली, ते त्याचे स्वागत करण्यास समर्थ होते त्या शक्तीशीं समरस होण्याला, तिच्या प्रेरणेने क्लेश भोगण्याला व ते सहन करण्यास तेथील लोक तयार होते हेच या पालटाचें कारण आहे ...... आणि म्हणून या तीन वर्षांत बंगालचें पूर्ण परिवर्तन झालें आहे बगालमध्यें आज काय चालू आहे, असा साश्चर्य प्रश्न आपण करीत आहां. कोणत्याहि अडथळयांना न जुमानतां चालू असणारी एक चळवळ, कोणत्याहि शक्तीला जिचा प्रतिकार करता येणार नाहीं अशी एक वाढ, किंवा राष्ट्रांत जन्मास आलेला एक नवा अवतार आज तुम्हांला तेथें दिसत आहे आणि जर हा परमेश्वर तुमच्या अतःकरणांत जागृत झाला असेल, जर ही शक्ति तुमच्यात सचार करीत असेल, तर तुम्हांला असे दिसून येईल, कीं यापेक्षाहि फार थोड्या अवधींत परमेश्वर सर्व हिंदुस्थानचें परिवर्तन घडवून आणील कारण, ही शक्ति आधींच सर्वत्र सचार करूं लागली असून आपल्या आगमनाची घोषणा करू लागली आहे ही घोषणा झाली, म्हणजे तिचे कार्य अधिकाधिक वेगाने होऊं लागेल परमेश्वराच्या परिपक्व शक्तीच्या सामर्थ्यानें ती आपलें कार्य चालू ठेवील जो श्रीकृष्ण आज गोकुळांत लपून राहिला आहे, जो जगातील तुच्छ गणलेल्या दरिद्री जनतेंत मिसळलेला आहे, जो वृंदावनां-तील गोपालांत वावरत आहे, तो श्रीकृष्ण जगाला दिसेपर्यंत व त्याची ओळख जगाला पटेपर्यंत हें कार्य चालू राहील या परमेश्वरी शक्तीनें भारलेलें हे सर्व राष्ट्र व त्यांतील सर्व लोक जागे होऊन उभे राहतील आणि सर्वशक्तिमान् परमेश्वर त्यांना प्रेरणा देईल मग कोणतीहि ऐहिक शक्ति त्याचा प्रतिकार करू शकणार नाहीं आणि तिचा प्रगतिपर संचार कोणत्याहि आपत्तींनीं किंवा अडथळयानीं थांबूं शकणार नाहीं. कारण, येथें परमेश्वराचें अधिष्ठान आहे व त्याचेच हें कार्य आहे आमच्या-कडून कांहीं कार्य घडवून आणण्याचें त्यानें योजिलेले आहे."§

---

* Speeches of Aurobindo Ghose, P 61–66

§ Speeches of Aurobindo Ghose, P. 46–48.

## लोकमान्यांचें राजकारण

बंगालमध्यें वंगभंगाच्या प्रतिकाराच्या निमित्ताने जी ही प्रचंड शक्ति निर्माण होत होती, तिला निःशस्त्र क्रांतीचें रूप देऊन ती राष्ट्रसभेच्या राजकारणामागें उभी करावी हें लोकमान्यांचें १९०५ पासून १९०८ पर्यंतचे राजकारण होतें; आणि या नव्या शक्तीच्या प्रकाशात दिसूं लागलेल्या मार्गानें राष्ट्रसभा जाऊं लागल्यास ती एकाद्या खोल दरींत जाऊन पडेल या भीतीनें तिला नव्या मार्गानें जाऊ न देतां पूर्वीच्याच परावलंबनाच्या मार्गावर हट्टानें व आग्रहाने खेचून ठेवण्याचा तुटेपर्यंत प्रयत्न करणे, हे सर फेरोजशहाप्रभृति जुन्या पुढाऱ्यांचें राजकारण होतें ना गोखले व बाबू सुरेंद्रनाथ हे जुन्या पक्षाचेच असले, तरी सर फेरोजशहाचा हा तमोगुणी हट्ट म्हणजे दुराग्रह आहे असे त्यांना वाटत होते. तरीहि या नव्या शक्तीचे उघड स्वागत करण्याचे मनोधैर्य त्यांच्यापाशीं नसल्यानें आणि त्यांची श्रद्धा जुन्या भूमिकेवर दृढ असल्यानें त्यांना अखेरीस सर फेरोजशहांच्या निशाणाखालींच जाणे भाग पडले या रस्सीखेचीचें अखेर पर्यवसान ती रस्सी तुटण्यांत म्हणजे राष्ट्रसभा दुभंगण्यांत झाले व त्याचा फायदा राज्यकर्त्यांना मिळून भारतीय राष्ट्रशक्ति कांहीं काल मूर्च्छित होऊन पडली.

लोकमान्यांनीं १९०५ च्या राष्ट्रसभेच्या आवारांतच नव्या पक्षाला बहिष्कार-योगाची दीक्षा देऊन लाला लजपतराय व बाबू बिपिनचंद्र पाल यांच्या साहाय्यानें नव्या निःशस्त्र क्रांतिकारक राष्ट्रीय पक्षाची स्थापना केली.* भारतसेवक समाजाची स्थापना करून जुन्या राजकारणाला चिरतन करणारे ना. गोखले हे या वर्षी राष्ट्रसभेच्या अध्यक्षपदावर आरूढ झाले असले आणि त्यांनीं आपल्या भाषणांत वसाहतींचें स्वराज्य हेंच आमचे अंतिम साध्य आहे असे जाहीर केलें असलें, तरी त्यांनीं बंगालमधील विलायती मालाच्या बहिष्काराच्या चळवळीचें समर्थन व अभिनंदन केलें आणि स्वदेशी-चळवळीला पूर्ण पाठिंबा दिला. तथापि, त्यांच्या विचाराची मूळ भूमिका कायम होती आणि राजनिष्ठा व राष्ट्रनिष्ठा याचा पूर्ण समन्वय करून त्यांनीं आपल्या भाषणांत युवराजांच्या आगमनाचे मनःपूर्वक स्वागत केले. बंगालमधील तरुणाचीं अंतःकरणे वंगभगानें खवळून गेलेलीं असून युव-राजांच्या स्वागताचा ठराव करण्यास त्यांचा तीव्र विरोध होता. त्यामुळे विषय-नियामक मंडळांत वादाची खडाजगी उडून राष्ट्रसभेच्या कार्यात विघ्न उपस्थित होणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं हा ठराव नापास झाल्यास आपण अध्यक्षपद सोडून देऊं असें अध्यक्षांनीं म्हणण्यापर्यंत पाळी आली, तेव्हां लोकमान्य टिळकांनीं व लाला लजपतराय यानीं बंगाली तरुणांची समजूत करून तूर्त स्वस्थ बसण्याची गळ घातली. अखेरीस या ठरावाच्या वेळीं बंगाली तरुणांनीं निषेधार्थ उठून जावे

*Young India, by Lajapatrai, P. 175.

आणि बहुमतानुसार ठराव मंजूर करावा अशी तडजोड लोकमान्यांनीं सुचविली व त्याप्रमाणें होऊन बनारसचें अधिवेशन निर्विघ्नपणे पार पडलें.

१९०६ साल हें हिंदी राष्ट्रीय चळवळींत दोन-तीन गोष्टींसाठीं सुप्रसिद्ध आहे. १९०५सालच्या अखेरीस लो. टिळकांनीं ज्या बहिष्कारयोगाचें बीजारोपण राष्ट्रसभेच्या आवारांत केलें, त्याला बंगालमध्यें शांततेच्या कायदेभंगाचा अंकुर फुटून ज्या मुद्यावर हा कायदेभंग किंवा हुकूमभंग झाला, त्या मुद्यावर बंगाली पुढाऱ्यांना तात्कालिक यश मिळाले या यशानंतर थोड्याच दिवसांत श्री. दादासाहेब खापर्डे यांनीं राष्ट्रीय सभेच्या धोरणाला नवी दिशा लावण्याचें कार्य येत्या राष्ट्रसभेत झाले पाहिजे, अशा अर्थाचे एक पत्रक राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांस पाठविलें हें पत्रक अर्थात् लो टिळकांच्या प्रेरणेनेच निघालेलें होते त्यास पाठिंबा देतांना लो. टिळकांनीं निःशस्त्र कायदेभंग आणि बहिष्कार यांचा अवलंब करून येथील राज्ययंत्राला खीळ घातल्याखेरीज मोर्लेसाहेब झाले तरी आपणांस कांहीं देणार नाहींत, असें स्पष्ट लिहिलें. लो टिळक अशा प्रकारे निःशस्त्र क्रांतीच्या मार्गावर राष्ट्रसभेला नेण्याचा प्रयत्न करीत असतां विलायतेंत ना. गोखले आणि मि जॉन मोर्ले यांच्या गांठीभेटी होत होत्या. त्यांच्या उदार वृत्तीच्या भाषणांचें जलसिंचन झाल्यामुळे ना गोखले यांच्या अंतःकरणांतील साम्राज्यनिष्ठेचें बद्धमूल झालेलें पण वठू लागलेलें प्रेम पुनः नवी पालवी फुटून ताजेतवाने झालें. अर्थात् आपल्या जुन्या राजकारणाचा त्याग न करतां त्याच्याच चाकोरींतून व मळलेल्या–रुळलेल्या मार्गावरून राष्ट्रसभेचा रथ हांकण्याचा त्यांचा निश्चय दृढ झाला व टिळकांच्या प्रयत्नास विरोध करण्याचा निर्धारहि त्यांच्या मनांत कायम झाला. इकडे बंगाली पुढाऱ्यांनीं कायदेभंगाचा जो एक छोटासा प्रयत्न केला, त्याबरोबर त्यांना बंदिवान् करण्यांत आलें, इतकेंच नाहीं, तर त्यांच्या पाठीपागून हजारों लोकांनीं तोच हुकूम मोडून आपणांस बंदिवान् करण्याचे आव्हान नोकरशाहीला देतांच तिनें त्यांना बंदी न करिता त्यांचीं डोकीं फोडलीं! हे दृश्य पाहून लोकमान्यांच्या पुढील पिढींतील कांहीं तरुणांचा निःशस्त्र क्रांतीवरचाहि विश्वास उडाला व त्यांनीं सशस्त्र क्रांतीचा मार्ग स्वीकारिला.

## जुन्या-नव्यांचा मतभेद

अशा प्रकारे १९०६ सालांत लॉर्ड मोर्ले अधिकारारूढ झाल्यानंतर थोड्याच दिवसांत राष्ट्रसभेंतील टिळक व गोखले यांच्या पक्षांतील अंतर वाढू लागलें आणि सशस्त्र क्रांतिकारक पक्षाची स्थापना झाली. पण या दोन घडामोडींपेक्षांहि १९०६ साल आधुनिक भारताच्या इतिहासांत जर कोणत्या एका गोष्टीबद्दल विशेष प्रसिद्ध असेल, तर ती म्हणजे दादाभाई नौरोजी यांनीं राष्ट्रसभेला स्वराज्याचा मंत्र देऊन नव्या-जुन्या पक्षांच्या सलोख्यानें व सहकार्यानें स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण, बहिष्कार आणि स्वराज्य या विषयांवरील ठराव मंजूर करवून घेतले व नव्या-जुन्या पिढीला 'चिकाटी धरा,

एकी राखा आणि स्वराज्य मिळवा' असा दिव्य संदेश दिला, हीच होय १९०६ सालीं कलकत्त्यास भरलेली राष्ट्रसभा यामुळे आधुनिक भारताच्या इतिहासांत चिरस्मरणीय आणि युगप्रवर्तक गणिली जाते. दादाभाईंनीं आखून दिलेलें हे धोरण जर जुन्या पिढीनें अनुसरिले असते आणि कलकत्त्यास राष्ट्रपितामहांच्या समक्ष ठरलेलें धोरण जसेंच्या तसे कायम ठेविले असते, अगर ते तसें ठेवणार अशी हमी नव्या पक्षाला दिली असती, तर राष्ट्रसभेचा व भारताचा इतिहास निराळाच झाला असता. पण असा उज्ज्वल इतिहास करण्याइतकी राष्ट्रीय बुद्धि आमच्या राष्ट्रांत त्या वेळीं निर्माण झाली नव्हती राष्ट्रीय सभेवर नव्या पिढीचा निसर्गदत्त हक्क आहे, याची जाणीव अद्यापि जुन्या पिढीला झाली नव्हती. जुन्या पिढीने आपलें राजकारण कर्मठ सनातन्यांप्रमाणें अचल व चैतन्यशून्य बनवून आपल्या साम्राज्यनिष्ठेला परमेश्वरनिष्ठेइतकें त्रिकालाबाधित सत्यनिष्ठेचे स्वरूप देण्याचा मोहांध प्रयत्न चालविला होता. आत्मप्रत्ययाचा अभाव आणि परकीय सत्तेच्या दडपशाहीखालीं चुरडून जाण्याची भीति, हीं या मोहांधतेचीं खरीं कारणे होतीं या मोहाधकारांत राष्ट्रसभेची नौका हट्टानें हाकारिल्याने ती फुटली, तरी त्याबद्दल जुन्या पक्षाच्या कर्णधारांस विषाद वाटूं नये इतका अहंकार त्यांच्या अगीं या वेळीं उद्भूत झाला होता. नव्या पक्षांतील अहंकारहि कांहीं कमी नव्हता, पण त्याच्या पाठीमागे आत्मश्रद्धेची आणि आत्माहुतीची चैतन्यशक्ति होती. यामुळे राष्ट्रसभेची नौका फुटण्याच्या कार्यास उभयपक्षाचा अहकार कारणीभूत झाला असला, तरी दोषाचा वाटा जुन्या पक्षाच्याच पदरात पडतो. हे कसे ते पुढील हकिगतीवरून दिसून येईलच

सन १९०६ च्या प्रारंभीं लिबरल मत्रिमंडळ इंग्लडांत स्थानापन्न झालें व थोड्याच दिवसात मि. मोर्ले यांनीं बगालची फाळणी रद्द होण्याची आशा कोणीहि करूं नये आणि राज्यघटनेंतील सुधारणाहि लिबरल पक्ष तावडतोब करील अशी आशा करणे वेडेपणाचें आहे, असे पार्लमेंटांत जाहीर केले त्याबरोबर ता. ६ मार्चच्या केसरीच्या अंकांत "भ्रमाचा भोपळा फुटला !" या मथळयाचा लेख आला. त्यांत "आम्ही कांहीं नैराश्यवादी नाहीं. आमची उन्नति केव्हा तरी झालीच पाहिजे असें आमचें ठाम मत आहे. प्रश्न काय तो उद्योगाच्या दिशेबद्दल आहे आमचें असें म्हणणे आहे, कीं आपल्या लोकांनीं आपली जी उन्नति करून घ्यावयाची, ती स्वदेशी चळवळ व बहिष्कार यांसारख्या विलायतवाल्यास फटकारा बसणाऱ्या उद्योगांनींच केली पाहिजे. सरकारचें शिक्षण तुम्हांस पसत नसेल, तर स्वतः ची युनिव्हर्सिटी तुम्ही काढा. सरकार तुमच्या उद्योगधंद्यांस उत्तेजन देत नसेल, तर तुम्ही द्या जे लोक तुम्हांस गांजीत आहेत त्यांच्याशीं सबध जितका कमी ठेवतां येईल तितका ठेवा, तुमच्या अंगांत कांहीं करामत आहे आणि काहीं निश्चय किंवा निग्रहसामर्थ्य आहे असें सरकारच्या प्रत्ययास आणून द्या, मग जॉन मोर्लेच काय, पण त्याच्या जागीं रिचर्ड फॉक्स जरी आला तरी तो तुमचे म्हणणे आदराने ऐकून घेऊन तुम्हांस दाद

देईल. अशा प्रकारचा उद्योग करण्याच्या कामीं ह्यूम, वेडरबर्न, कॉटन वगैरे आम्हांस मदत करीत असतील तर ती आम्हांस पाहिजेच आहे; ती कांहीं आम्ही टाकीत नाहीं; उलट आम्ही त्यांचे आभारच मानू. पण एवढें खूप लक्षांत ठेवले पाहिजे, कीं अशा तऱ्हेच्या निग्रहाच्या उद्योगाखेरीज–आणि तो उद्योग करणे किंवा न करणें ही गोष्ट सर्वस्वीं आपल्याच हातांत आहे–तुमची दाद कोणीहि घेणार नाहीं, मग तो तत्त्ववेत्ता असो, ग्रंथकार असो किंवा दुसरा कोणीहि असो. मोर्लेसाहेबांच्या उत्तरावरून जर हल्लीं कांहीं बोध घ्यावयाचा असला तर हाच होय व त्या उत्तराची तार वाचतांच बंगाली बाबूनीं विलायती कपड्यांची होळी करून तो बोध घेतला आहे, ही त्यांतल्या त्यांत आनदाची गोष्ट आहे. फाल्गुन महिना सुरू झाला आहे, करितां आमच्या-कडच्या लोकानींहि बगाली बाबूंचे अनुकरण केल्यास त्यांत कांहीं वावगे होणार नाहीं 'आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः।' हे भगवद्गीतेतील वचन जितके वेळां सांगावे तितके थोडेच होय!" मोर्लेसाहेबांच्या उदारपणावर आपण कितपत विसंबून रहावे यासबधीं ते लिहितातः "मोर्लेसाहेब उदारबुद्धीचे तत्त्ववेत्ते आहेत, पण स्टेट-सेक्रेटरी या नात्याने त्याच्याकडून आमच्या फायद्याची कोणतीहि महत्त्वाची गोष्ट, विना आम्हीं जोर केल्याखेरीज कधींहि व्हावयाची नाहीं हे निश्चित समजा ते गोड बोलतील, आमच्याकडून त्यांस कोणी भेटवयास गेल्यास त्यास एकादा चहाचा पेलाहि देतील! पण जोंपर्यंत हिंदुस्थानच्या राज्यपद्धतींतील गाजणारीं दुःखें आम्हांस असह्य झालीं आहेत याचा प्रत्यक्ष पुरावा त्यांचेजवळ नाहीं, किंवा जोपर्यंत आमच्या पाठीवर बसणाऱ्या कोरड्यांचे वळ थोड्याशा कालानें आम्ही विसरतों अशी खात्री त्यांस हिंदुस्थानांतील बडे अधिकारी देत आहेत, अगर जोंपर्यंत आमचीं दु.खें निवारण करण्याच्या उद्योगास आम्हींच लागलों नसून तीं निवारण केल्याखेरीज हल्लींची राज्यपद्धति सुरळीत चालणे शक्य नाहीं असे त्यांच्या निदर्शनास येत नाहीं, तोपर्यंत कोरड्या, शाब्दिक कळकळीपेक्षा मोर्लेसाहेबांकडून आम्हांस कांहींएक प्राप्त व्हावयाचे नाहीं"‡ तात्पर्य, मोर्ले याच्या उदारपणाला पान्हा फुटण्यास येथील जुलुमी राज्ययत्र सुरळीत चालत नाहीं याचा प्रत्यक्ष पुरावा त्याच्या हातीं आला पाहिजे आणि आम्ही निग्रहाने आमच्या उद्धाराचे प्रयत्न करू लागलों अशी त्यांची खात्री झाली पाहिजे, असें लो. टिळकांचे मत होते

## निःशस्त्र प्रतिकार

हा आत्मनिग्रह आणि दृढनिश्चय लोकांनीं कसा दाखवावा याचें उदाहरण बंगालमध्यें एप्रिल महिन्यात दिसून आले. १९०५ च्या नोव्हेंबर महिन्यांत पूर्व बंगालचे लेफ्टनट गव्हर्नर फुल्लर याच्या सेक्रेटरींनीं रस्त्यातून "वन्दे मातरम्"ची घोषणा करूं नये असा हुकूम काढिला होता आणि स्वदेशी–बहिष्काराची चळवळ

‡ लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ ७२–७४.

दडपून टाकण्यासाठीं गुरखे लोक आणून लष्करशाही सुरू केली होती. या फुल्लरशाहीचा निषेध करण्यासाठीं बंगाली पुढाऱ्यांनीं बारिसाल येथें सन १९०६ तील प्रांतिक परिषद् भरविण्याचें ठरविले होते. या प्रांतांत विद्यार्थ्यांनीं चळवळींत पडूं नये आणि ज्या निमसरकारी शाळांतील विद्यार्थी चळवळींत पडतील, त्याना सरकारी मदत मिळणार नाहीं असाहि हुकूम काढण्यांत आला होता. 'वन्दे मातरम्'च्या घोषणेने शांततेचा भंग होतो, हा हुकूम बेकायदा आहे असे लोकांचें म्हणणें असून त्याविरुद्ध सत्याग्रह करण्याचें पुढाऱ्यांनीं ठरविलें होतें. या परिषदेच्या अध्यक्षांच्या मिरवणुकीच्या वेळीं 'वन्दे मातरम्'चा जयघोष हजारों लोकांनीं केला व त्या मिरवणुकींत शेंकडो विद्यार्थी सामील झाले. 'वन्दे मातरम्'चा जयघोष होताच बाबू सुरेंद्रनाथ यांना अटक करण्यांत आली आणि मिरवणुकींतील लोकांचीं डोकीं पोलिसांच्या लाठ्यांनीं फोडण्यांत आलीं! या प्रकारासबंधीं केसरींत लिहितांना लो. टिळक म्हणतात: "असा हुतुतू अधिकाऱ्याना घालूं देणे कायदेशीर किंवा बेकायदेशीर आहे, आणि बारिसालच्या अधिकाऱ्यांनीं रस्त्यांत 'वन्दे मातरम्' म्हणण्याची मनाई केली असता कलकत्त्याच्या पुढाऱ्यानीं तेथें जाऊन 'वन्दे मातरम्'चा जयघोष करण्याचा विचार करावा ही गोष्ट कायदेशीर आहे किंवा बेकायदेशीर आहे, हा सांप्रत मुख्य प्रश्न नाहीं अधिकाऱ्यांचा जुलूम कायदेशीर असला, तरी लोकांवर जुलूम करूं देणें राज्यकर्त्यांस हितावह आहे काय, हा मुख्य प्रश्न मोर्लेसाहेबांपुढें होता अधिकाऱ्यांनीं कायदेशीरपणाने लोकांच्या तोडास गवसणी अडकविली किंवा कायदेशीरपणानें लोकांचीं डोकीं फोडलीं म्हणून लोकांनीं हा कायदेशीर छळ निमूटपणें सोसावयाचा किंवा कसें, हा बंगालच्या लोकांपुढे प्रश्न होता. ज्याप्रमाणें कायदेशीर जुलूम लोकावर करण्यांत येतो, त्याप्रमाणे शांततेनें, स्थिरबुद्धीनें आणि संकटाला धिमेपणानें डोकें द्यावयाचे पण हार जावयाचे नाहीं ह्या दृढनिश्चयानें जुलमी हुकुमांचा प्रतिकार प्रजेस करतां येतो. जुलूम तो जुलूम, तो कायदेशीर असो किंवा बेकायदेशीर असो. कायदेशीर जुलूम असला, तर शांततेनें व हाल सोसण्याच्या दृढनिश्चयानें त्याचा प्रतिकार केला पाहिजे. तो बेकायदेशीर असला, तर बेकायदेशीर रीतीने त्याचा प्रतिकार केला पाहिजे. कांहींच्या हालअपेष्टा झाल्या तरी हरकत नाहीं. पण काळ सोकावू देतां कामा नये. बारिसाल येथें प्रांतिक सभेकरिता जेव्हां बंगालचे प्रतिनिधी जमले, तेव्हां 'वन्दे मातरम्'चा जयघोष रस्त्यांत करूं नका अशा प्रकारच्या जुलुमी लियन सर्क्युलरने कायदेशीर केलेल्या हुकुमाचा प्रतिकार करावयाचा किंवा कसें, अर्थात् 'वन्दे मातरम्' हे शब्द उच्चारून पोलिसांच्या तडाक्यांत सांपडून दुःख भोगावयाचें किंवा कसे, हा त्यांच्यापुढें मुख्य प्रश्न होता. त्या प्रश्नाचा निकाल बंगालच्या पुढाऱ्यांनीं समाधानकारक लाविला व 'वन्दे मातरम्'-चा जयघोष करून अधिकाऱ्यांच्या अरेरावी रागास स्वतःचा बळी देण्याचा त्यांनीं निश्चय केला... कोणचाहि हुकूम कायदेशीर ठरविण्यास विशिष्ट संस्कारांच्या भट्टी-

तून त्या हुकुमास काढून घेण्याची इंग्रज सरकारची रीत आहे; त्याप्रमाणें कोणचाहि हुकूम जुलुमाचा आहे हें ठरविण्यास विशिष्ट हालअपेष्टांच्या भट्टींतून चालून जाण्यास तक्रार करणारांनीं तयार असलें पाहिजे, असा इंग्रजी राष्ट्राचा प्रघात आहे...' वन्दे-मातरम्'चा जयघोष करण्याची बंदी करणारा हुकूम कायदेशीर ठरविण्यास लियन सर्क्युलरचा संस्कार पूर्व बगाल सरकारनें पूर्वी करून ठेविला होता; पण ही बंदी जुलुमाची आहे हें ठरविण्याकरितां बंगालच्या सर्व पुढाऱ्यांनीं एके ठिकाणीं जमून 'वन्दे मातरम्' हे शब्द रस्त्यांत उच्चारावयाचे असा उघड ठराव पास करून, पोलिसांच्या दडुक्यांनीं डोकीं फोडून घेऊन 'दुःखें सोसण्यास आम्ही तयार आहो' असे जाहीर करण्याचा विधी ऐतिहासिक रीतीनें पार पाडला हा विधि यथासांग झाल्यामुळे लियन सर्क्युलरवर जुलूम असा छाप बसला. हा छाप नुसत्या अर्जांनीं किंवा सभांच्या ठरावांनीं बसत नसतो इंग्रजाच्या इतिहासांत हा छाप मारताना पाळावयाचे विशिष्ट विधी सांगितलेले आहेत व सर्व सुधारलेल्या राष्ट्रांतील शिष्टाचाराने हे विधी पसंत केले आहेत. बंगालच्या पुढाऱ्यांना सर्व हिंदुस्थानभर सांप्रत जो मान मिळत आहे, ह्याचे कारण वरील विधि शास्त्रोक्त रीतीने, कायदेशीर रीतीने व शांततेनें यथासांग करण्याचें सामर्थ्य प्रजाजनात आहे, हे त्यांनीं बारिसाल मुक्कामीं सिद्ध करून दाखविलें हे होय. झीज सोसण्याच्या इच्छेनें व स्वार्थत्यागानें बंगालच्या पुढाऱ्यांनीं लियन सर्क्युलर जुलुमाचें आहे असे सिद्ध केलें. विलायत-सरकारला हिंदुस्थानांत असा उघड जुलूम करावयाचा नसल्यामुळें ते सर्क्युलर सांप्रत पर्यायाने रद्द करण्यांत आलें. लियन सर्क्युलर पर्यायानें रद्द केलें, ह्याचें श्रेय लॉर्ड मिंटो व ना. मोर्ले यांना दिले पाहिजे. बारिसाल-प्रकरणासंबंधाने निदान हे दोघे खालच्या अधिकाऱ्यांच्या फसव्या जाळ्यांत पुरे सापडले नाहींत, हे त्याना भूषणावह असून त्याबद्दल आम्हीं त्याचे एका दृष्टीनें उपकार मानिले पाहिजेत ...' वन्दे मातरम्'चा उघडपणे जयघोष करण्याचा हक्क मिळविण्याचे कामीं बंगालच्या पुढाऱ्यांनीं अनुकरणीय करारीपणा दाखविला, ह्याबद्दल आम्ही त्याचें मनःपूर्वक अभिनंदन करितों. ह्या प्रसंगीं आम्हांस इतकेच सुचवावयाचें आहे, कीं 'वन्दे मातरम्' चा जयघोष करण्याचा हक्क हा प्रसंगोपात्त महत्त्वाचा झाला असून जी गोष्ट मिळविण्याकरिता एवढी खटपट, ती गोष्ट हा हक्क नव्हे, हे सर्वांनीं ध्यानांत ठेविलें पाहिजे... वाद ऐन रंगांत आला असतां, क्षुल्लक मुद्द्यावर सर्व भर पडू न देतां, एकादा कृत्रिम सूक्ष्म अडथळा मार्गांतला नाहींसा झाला असतां ज्या पद्धतीने हा अडथळा नाहींसा झाला, त्या पद्धतीचा तेवढा विचारपूर्वक अंगीकार करून, राज्यकर्त्यांपासून घ्यावयाच्या मुख्य हक्कासंबधानें आपली चळवळ केव्हांहि क्षणैक विजयामुळें कमजोराची न होऊं देण्याची खबरदारी बंगालचे पुढारी घेतील, अशी आम्हांस आशा आहे."§

§ लो. टिळकांचे केसरींतील लेख, भाग ३ रा, पृ. ८९–९०.

या उताऱ्यांतील कायदेशीर प्रतिकार या शब्दाचा विशिष्ट अर्थ ध्यानात घेतला पाहिजे. बंगाली पुढाऱ्यांनीं जो हुकूम मोडिला तो कायदेशीर होता असें म्हणून पुनः तो हुकूम मोडण्याचा प्रतिकारहि कायदेशीरच होय, असें लोकमान्य लिहितात याचा अर्थ काय? याचा अर्थ असा आहे, कीं जुलुमी कायदे मोडिले तरी त्या कायद्यांनीं ठरविलेली शिक्षा शांततेनें सहन करण्यास जोंपर्यंत लोक तयार आहेत, तोंपर्यंत तो प्रतिकार कायदेशीरच होय असें लो टिळकांचे मत होतें. अमुक तऱ्हेनें वागा नाहीं तर अमुक शिक्षा भोगा, असे कायदा सांगतो. यांपैकीं कोणताहि मार्ग अवलंबिला तरी तो एका अर्थी कायदेशीरच होय; कारण दोन्ही मार्गांचें अवलंबन करणारे लोक कायदे करणारांची सत्ता मान्य करतात तेव्हां कायदे मोडून त्याबद्दलची शिक्षा भोगण्यास तयार होणे हा सत्याग्रहाचा मार्ग, एका अर्थी कायदेशीर प्रतिकाराचाच पण शांततेचा, आत्मक्लेशाचा व दृढनिश्चयाचा आहे लियन सर्क्युलर या मार्गानें रद्द झालें व केवळ भिक्षांदेहीनें कार्यभाग होत नाहीं हे मोर्लेसाहेबांच्या वृत्तीवरून सिद्ध झालें यावरून हा शांततेच्या प्रतिकाराचा मार्ग आवश्यक आहे व तो फलप्रद होतो, असे दोन सिद्धांत लो. टिळकांनीं आपल्या बुद्धीनें ठरविले व याच सत्याग्रहाच्या मार्गानें जाण्याचा उपदेश राष्ट्रसभेला करण्यास त्यांनीं सुरुवात केली पुढील आठवड्यांतच खापर्डे यांचें सर्क्युलर सर्वत्र फिरलें आणि "राष्ट्रीय सभेच्या कामाची दिशा" हा महत्त्वाचा लेख केसरींत झळकला.

"कायदेशीर चळवळीस यश येईल असे म्हणणारांच्या थोबाडांत मि. मोर्ले यांनीं जी ही चापट दिली आहे ( वंगभंगाबद्दल ), ती सहन करून आणि सुजलेल्या गालास सिंपथीचें तेल लावून जर कोणी अद्याप भैक्ष्यवृत्तीचे किंवा सहानुभूतीचे पोवाडे गाण्यास तयार असेल, तर तो वेडा किंवा निर्लज्ज समजला पाहिजे. आमचें असें म्हणणे नाहीं, कीं राज्यकर्त्यांपाशीं किंवा त्यांजपुढे आपलीं दुःखे मांडून कोणत्याहि प्रकारची आपण मागणी करू नये मागितल्याखेरीज कोणी देत नाहीं हें खरें; पण त्याचबरोबर हेंहि लक्षांत ठेविले पाहिजे, कीं राजकीय बाबतींत महाभारतांत सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणी मागणीचा कांहीं उपयोग नाहीं.. . मद्रासच्या यंदांच्या सालच्या प्रांतिक सभेचे अध्यक्ष व मद्रास इलाख्यांतील प्रसिद्ध पुढारी मि. कृष्णस्वामी अय्यर यांनीं अध्यक्ष या नात्यानें केलेल्या आपल्या भाषणांत ही गोष्ट स्पष्टपणें नमूद केली आहे; आणि असें सांगितले आहे कीं 'आमच्या राजकीय चळवळीच्या दिशेंत आतां कांहीं तरी मोठा फरक केला पाहिजे' मि कृष्णस्वामी अय्यर याच्याप्रमाणेच 'हिंदु' पत्राच्या विलायतच्या बातमीदाराचें म्हणणें आहे. कोणत्या प्रकारें कां होईना, स्वदेशी-चळवळीस जी आतां सुरुवात झाली आहे, तीच पुढें कायम ठेवून हिंदुस्थानांतील लोकांनीं आतां आपलें हित करून घेतलें पाहिजे, अशा प्रकारच्या आग्रहाखेरीज कार्यभाग व्हावयाचा नाहीं यासच इंग्रजींत 'पॅसिव्ह रेझिस्टन्स' असें म्हणतात. आणि असा लोकांनीं आग्रह धरिल्यास विलायतेंतील उदार गृहस्थ

त्यास मदत करतील असें या बातमीदारानें लिहिलें आहे. तात्पर्य, हक्कासाठीं रडून किंवा भीक मागून कांहीं उपयोग नाहीं; ते हक्क आपणांस मिळतील असा आग्रह धरून आपल्या हातून शक्य असेल तेवढा उद्योग केला पाहिजे आणि जरूर पडल्यास सरकारास जितकें अडविता येईल तितकें अडवून ही गोष्ट आपले निश्चयानें साध्य करून घेतली पाहिजे, हें तत्त्व आतां बहुतेक सर्वमान्य झालें आहे."‡

लो. टिळकांनीं महाराष्ट्रांत सत्याग्रहाच्या मार्गाचा असा उपदेश सुरू करून राष्ट्रसभेला नवें धोरण लावण्याचें जाहीर करतांच बंगालचे पुढारी बाबू बिपिनचंद्र पाल यांनीं संपूर्ण निर्भेळ स्वातंत्र्य हे आमचें ध्येय आणि सत्याग्रह किंवा निःशस्त्र प्रतिकार हे आमचें साधन असे 'वन्दे मातरम्' या पत्रांतून जाहीर केलें. १८ सप्टेंबर १९०६ च्या अंकांत ते लिहितात :

"Our ideal is freedom, which means absence of all foreign control : it is a perfectly constitutional ideal in a truer and a higher sense than the meaningless jargon that is often times presented as such by our old school patriots–because it is ingrained in the very make of our being. Our method is passive resistance, which means an organised determination to refuse to render any voluntary and honourary service to the goverment, and who will dare say that this too is not a perfectly constitutional method even in the lower and common acceptance of the term ? We challenge those who are conspiring in secret against us, to prove that this ideal and this method are not absolutely legitimate anywhere in civilisation."§

अशा प्रकारें संपूर्ण स्वातंत्र्य हें साध्य व सत्याग्रह हे साधन या तत्त्वांवर नव्या राष्ट्रीय पक्षाची उभारणी करण्यांत लो. टिळक गुंतले असतां ना. गोखले विलायतेंतून आपले सहकारी श्री द्रवीड यांना पत्र लिहितात, कीं तुम्ही श्री न. चिं. केळकर याची गांठ घ्या आणि त्यांच्यामार्फत श्री. टिळक याना विनवा, कीं मि. मोर्ले यांच्या मार्गांत अडथळे आणूं नका व त्यांच्यावर आपला विश्वास नाहीं, असें जाहीर करूं नका *

---

‡ किता, पृ. ९३–९४. § The New Spirit, by B C Pal, P 248

* And now I want you to do what you can to prevent any ungenerous criticism of Mr Morley in the press See Mr Kelker and with him see Mr Tilak if necessary and beg them in my name to exert their influence for the sake of our common country to discourage any declaration on the part of the Indian Press just at present of want of faith in Mr Morley." Gokhale's letter to Dravid

—*Vide Life of Gokhale by V. S Shastri, P. 68.*

लो. टिळकाच्या वाड्यात शिरण्यास श्री. केळकर याचा दरवाजा ना. गोखले याना नेहमींच उघडा असे; पण या दरवाजांतून येणाऱ्या बातम्यांवर लोकमान्यांचें राजकारण अवलंबून नसे त्यांनीं ना गोखले यांच्या या निरोपास फारशी किंमत दिली नाहीं. कारण आपणांस मिळणाऱ्या राजकीय हक्कांचा उगम मि मोर्ले यांच्या उदार अंतःकरणांत नसून लोकांतील प्रतिकारशक्तींत आहे, असे त्यांचें निश्चित मत होतें. ना गोखले यांचे हे पत्र ता. ३ ऑगस्टचें आहे त्यानंतर दीड महिन्याने ता. १८ सप्टेंबर १९०६ च्या केसरींत लो. टिळकानी "तत्त्ववेत्ता आणि मुत्सद्दी" या मथळ्याचा एक तात्त्विक लेख लिहून मि. मोर्ले यांच्यापासून कोणती अपेक्षा करावी व कोणती करू नये याची स्पष्ट फोड केली आहे. ते या लेखांत लिहितातः

"इंग्रजी राज्यकर्त्यांकडून जर आम्हांस कांहीं प्राप्त करून घ्यावयाचे असेल, तर सुशिक्षित आणि अशिक्षित या दोघांनींहि एक होऊन हल्लींच्या राज्यकारभाराचें 'गाडें' अडून पडलें, असे राज्यकर्त्यांच्या अनुभवास आणून दिले पाहिजे. कॉटन किंवा मोर्ले यांसारखा एकादादुसरा पुरुष ही भावी अडचण लवकर लक्षांत घेईल; पण तेवढ्यानें आम्हास कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं त्याच्या सर्व जातभाईना ती अडचण खरी वाटली पाहिजे; आणि या जातभाईच्या प्रत्ययास ती अडचण येण्यास 'चक्षुर्वै सत्यं' हा एकच मार्ग आहे या मार्गानें जातभाईची जेव्हां खात्री झालेली नसते, तेव्हा ग्लॅडस्टन्सारख्याचेहि प्रयत्न निष्फळ होतात, हे आयरिश प्रकरणावरून सिद्ध झालेलें आहे साराश, हिदुस्थानांतील प्रजेस कांहीं विशेष महत्त्वाचे हक्क दिल्याखेरीज गत्यंतर नाहीं, हे केवळ मोर्लेसाहेबांसच नव्हे, तर कर्झन-साहेबांस देखील अपरिहार्य वाटू लागेल, तेव्हां हिंदुस्थानास कांहीं फायदा होण्याचा संभव आहे...इतक्या उपर शाळेंतील पोरांप्रमाणे आम्ही जर उदात्त तत्त्वाच्या मनोराज्यांत गढून जाऊन तत्त्वज्ञानाच्या विश्वासावर अवलंबून राहिलो, तर आमच्या-सारखे हतभागी कोणी नाहींत असें समजले पाहिजे. हे राजकारस्थान आहे, तत्त्वज्ञान नव्हे, ही गोष्ट कधींहि विसरतां कामा नये. आणि ती न विसरतां जर आम्हीं उद्योग केला, तरच त्यांत आपणास केव्हाना केव्हा तरी यश येईल"* हा लेख म्हणजे एक प्रकारें ना. गोखले याच्या पत्राला उत्तर आणि नेमस्त पक्षाची कानउघाडणी असून आपल्या राष्ट्रीय पक्षाच्या निःशस्त्र क्रांतिवादाची आंखणीच होय. तात्त्विक दृष्ट्या हिंदी लोकांची लायकी किंवा हक्क मान्य करणें हे राजकीय तत्त्वज्ञान आहे; पण व्यावहारिक दृष्ट्या ते हक्क देणें हा व्यावहारिक राजकारणातील प्रश्न आहे. हा सोड-विण्यास केवळ तत्त्वज्ञानी असमर्थ असतो. मुत्सद्याच्या हातून ही गोष्ट घडण्यास हे हक्क दिले नाहींत तर राज्यकारभार अडतो, असें त्याला दिसावें लागतें. इतकेंच नाहीं, तर तशी आपल्या सहकाऱ्यांचीहि खात्री त्याला करावी लागते. ही खात्री होण्यास राज्ययंत्र प्रत्यक्ष बंद पडल्याचा पुरावाच त्याच्या हातीं असावा लागतो. या दृष्टीनें

* लो. टिळकांचे केसरींतील लेख, भाग १ रा, पृ. १११

आम्ही अडवणूक करून मोर्ले यांना मदतच करतो, असें लो टिळक म्हणत होते. शिवाय, आमचें कार्य यशस्वी झाल्यास मोर्लेंच काय, तर लॉर्ड कर्झन सुद्धां आमचें मागणे मान्य करतील तात्पर्य, मागणी करा पण ती मागणी ब्राह्मणाची नको, क्षत्रियांची असूं द्या, तिच्या पाठीमागें शक्ति असू द्या, हेंच लोकमान्याचें म्हणणें होतें. यांत व्यक्तिशः मोर्लेंसंबंधीं अविश्वास व्यक्त करण्याचा प्रश्नच नव्हता फक्त तत्त्ववेत्ता मोर्ले आणि मुत्सद्दी मोर्ले या दोन भूमिकांतील भेद विशद करून त्याचें तत्त्वज्ञान कृतींत आणण्यास त्यास कसें भाग पाडावें, हाच येथें प्रश्न होता व त्याचे शास्त्रीय उत्तर लोकमान्यांनीं वरील लेखांत दिलें आहे

## सशस्त्र क्रांतिवाद

या वेळीं हिंदी राजकारणांत आणखी एक महत्त्वाची घडामोड होत होती. बारिसाल परिषदेच्या वेळचें निःशस्त्र प्रजेचीं डोकीं फोडण्याचें दृश्य पाहण्यास बाबू अरविंद घोष हे हजर होते तेथील निःशस्त्र प्रतिकाराचें ते उत्साहवर्धक दृश्य पाहून बडोद्यांतील शिक्षणाधिकाऱ्याची आपली नोकरी सोडून बंगालमधील निःशस्त्र क्रांतीच्या कार्यास वाहून घेण्याचा निश्चय त्यांनीं केला व पुढे लगेच कलकत्त्यास येऊन त्यानीं राष्ट्रीय शिक्षणाचें कार्य आपल्या अंगावर घेतलें याच वेळीं बंगालमध्ये स्थापन झालेल्या 'वन्दे मातरम्' पत्राशीं थोड्याच दिवसांत त्याचा संपादक म्हणून संबंध जडला बाबू अरविंद घोष यांची प्रवृत्ति प्रथमपासूनच अध्यात्मप्रवण असल्याने या निःशस्त्र क्रांतीच्या मार्गात त्यांना जगातील एक अभिनव क्रांतिशास्त्र दिसूं लागलें व त्या दृष्टीनें त्यानीं हिंदी राजकारणाचे हे आध्यात्मिक स्वरूप लोकां-पुढें मांडण्यास सुरुवात केली पण त्यांचे धाकटे बंधु वीरेंद्रकुमार घोष यांचा या निःशस्त्र क्रांतिमार्गावर मुळींच विश्वास बसेना. त्यानीं याच सुमारास स्वामी विवेकानंदांचे बंधु भूपेंद्रनाथ दत्त यांच्या साहाय्याने आध्यात्मिक शक्तीच्या आधारा-वरच पण सशस्त्र क्रांतिवादाचा फैलाव बंगाली तरुणांत करण्याचे कार्य सुरू केलें. क्रांतिकारकांना सोसावा लागणारा छळ सहन करण्यास आत्मबलाची आवश्यकता आहे असे त्यांचें मत असले, तरी भारतीय क्रांति निःशस्त्र मार्गानें यशस्वी होईल असा विश्वास त्यांना नव्हता. बारिसाल-प्रकरणांतील पोलिसांच्या लाठी-हल्ल्यानंतर थोड्याच दिवसांत बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी याच्याकडे दोन तरुण पिस्तुलें घेऊन आले आणि पूर्व बंगालचे ले. गव्हर्नर फुलर यांचा खून करण्याचा आपला बेत त्यानीं त्यांस सांगितला, पण आपण त्यांना या मार्गापासून परावृत्त केलें, अशी कथा बाबू सुरेंद्रनाथ यांनीं आपल्या आत्मचरित्रांत लिहिली आहे. याच सुमारास स्वा. विनायकराव सावरकर हे नाशकास 'अभिनव भारत समाज' या संस्थेला सशस्त्र क्रांतिवादाची दीक्षा देत होते. या वर्षी लो. टिळक नाशकास गेले असतां त्यांनीं तेथील मित्रमेळ्याच्या तरुण मुलांना सुरेंद्रबाबूसारखाच उपदेश केला होता. त्याचा

रिपोर्ट ता. २४ ऑगस्ट १९०६ च्या 'हिंदुपंचां'त पुढीलप्रमाणें आला आहे: "शनिवारीं दुपारीं टिळकांची व मित्रमेळयाच्या पोरकटपणें वागणाऱ्या पुढाऱ्यांची सुमारे तासदोन तास खाजगी गुप्त मुलाखत झाली. मित्रमेळयाचीं पद्यें, त्यांनीं दिलेलें मानपत्र वगैरे सर्वच दीडशहाणपणाचा प्रकार असल्याने मी त्यासबधीं कांहीं लिहूं इच्छीत नाहीं. हीं बेफाम तरुण मुलें केव्हां तरी आपल्या मानेला गळफांस लावून घेतील आणि नाशिकच्या पुढाऱ्यांना मान खालीं घालण्याचा प्रसग येईल, अशी माझी त्यांचे वर्तणुकीवरून बालंबाल खात्री झाली आहे टिळकांनीं त्यांचे वर्तन व आत्यंतिक निष्ठा यांची भाषणांत स्तुति केली, परतु त्याच भाषणांत तरुणाच्या वाह्यात् वर्तनाबद्दल त्याची त्यांनीं खरपूस हजेरी घेतली या गुप्त मुलाखतींत जें अंजन मिळालें, त्याने तरी मित्रमेळयाचे डोळे उघडतील तर बरे होईल!"* यानंतर थोड्याच दिवसांत लो. टिळक बेळगावास गेले. त्या वेळची लोकमान्यांची एक आठवण दे. गगाधरराव देशपांडे यांनीं लिहिली आहे, ती अशी: "१९०६ सालीं गणपतीच्या उत्सवाकरितां प्रथमच टिळक बेळगांवास आले. गोविंदराव याळगी हे स्वयंसेवकांचे पुढारी असून त्याच्याबरोबर शेंदोनशें उत्साही व तालीमबाज असलेले तरुण त्यांच्या दृष्टीस पडले मिरवणूक सपल्यानंतर लोकमान्यांनीं मला एकीकडे म्हटलें, मी नाशिकाहून नुकताच आलों आहे तेथेंहि अशीच तरुण मडळी मला दिसली व कांहीं मला भेटली त्यांचा उत्साह व महत्त्वाकांक्षा अपूर्व आहे, पण त्यांच्यामध्यें थोडा मूर्खपणा आहे तुमच्या तरुणांना साभाळा अशा मूर्खपणामुळें कार्यहानि होते!" अशा प्रकारचे त्याचे विचार त्याच्या लेखांत अनेक ठिकाणीं आले आहेतच. आपलें आजचे राजकारण निःशस्त्र क्रांतीच्या मार्गानेंच चालले पाहिजे, याबद्दल त्यांच्या बुद्धीचा निर्णय झालेला होता तथापि देशांतील तरुणात सशस्त्र क्रांतिवाद फैलावू लागला आहे, याची त्यांना माहिती होती त्यांनीं मूर्खपणा करून आपल्या चालू कार्याची हानि करूं नये याबद्दल ते पूर्ण दक्षता ठेवून त्यांना सदुपदेश करीत व त्याना योग्य मर्यादेंत ठेवण्याचा प्रयत्न करीत. असो. अशा प्रकारें एका बाजूस भिक्षादेहीचे सनदशीर राजकारण आणि दुसऱ्या बाजूस सशस्त्र क्रांतीचें उतावीळ व व्यवहारशून्य राजकारण, या दोहोंच्यामधून निःशस्त्र क्रांतीच्या मार्गानें राष्ट्रसभेची नौका हांकारावी व त्यासाठीं तिचे कर्णधारित्व नव्या पक्षाकडे द्यावें असे टिळकाना वाटत होते याच दृष्टीने खापर्डे यांच्या मागें उल्लेखिलेल्या पत्रकांत लाला लजपतराय याना कलकत्ता-अधिवेशनाचे अध्यक्ष करण्याची सूचनाहि करण्यांत आली होती.

## कलकत्त्याची राष्ट्रसभा

या वेळपासून अँग्लो-इंडियन पत्रांनीं आतां राष्ट्रसभा नव्या पक्षाच्या हातीं

* लो टिळक यांचें चरित्र: ले. केळकर, खंड १ रा, भाग ४ था, पृ. ९५.

जाणार म्हणून ओरड सुरू केली. बंगालमध्यें पालबाबूंनीं अध्यक्षपदासाठीं लो. टिळकांचेच नांव सुचविलें. मग तर काय! 'टाइम्स ऑफ इंडिया' सारख्या पत्रांच्या अंगात मंथरेचाच संचार झाला! अखेरीस ही आपत्ति टाळण्यासाठीं म्हणून सुरेंद्रनाथ व भूपेंद्रनाथ या नेमस्ताग्रणींनीं दादाभाई नौरोजींनाच बोलाविण्याचें ठरविलें. दादाभाईंचे नांव ऐकताच नव्या पक्षाने अध्यक्षपदाचा वाद सोडिला. कारण दादाभाई नव्या पक्षास सांभाळूनच वागणार, याबद्दल त्या पक्षाची खात्री होती; व अखेरीस घडलेहि तसेच दादाभाईंचें भाषण वाचून आणि कलकत्ता-राष्ट्रसभेने मंजूर केलेले ठराव पाहून 'इंग्लिशमन' या अँग्लो-इंडियन पत्राने लिहिलें : "ब्रिटिश साम्राज्या-विरुद्ध पेटलेला द्वेषाग्नि विझविण्यासाठीं ज्या गृहस्थास बोलाविलें, त्यानीं त्यात रॉकेलच आणून ओतले!"* या सभेंत जे ठराव झाले त्यात प्रमुख ठराव चारच होते. स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण, बहिष्कार आणि स्वराज्य हेच ते ठराव होत यापैकीं प्रत्येक ठरावावर खडाजंगी वाद होऊन सभा मोडण्याचा प्रसंग आला. पण अध्यक्षांच्या समजस धोरणाने तो प्रसंग निभावून गेला. गेल्या सालीं बनारसच्या वेळीं ना. गोखले यानीं तार केली असताहि जुन्या पक्षाचे धुरंधर पुढारी मेथा हजर राहिले नव्हते, पण यंदा ते स्वतः हजर राहिले होते व नव्या पक्षाला पदोपदीं विरोध करीत अगर करवीत होते स्वदेशीचा ठराव वादग्रस्त नव्हे पण 'झीज सोसूनहि' स्वदेशी माल घ्यावा यातील झीज सोसूनहि (even at a sacrifice) याला विरोध झाला! राष्ट्रीय शिक्षणावरील ठरावात "राष्ट्रीय नियंत्रणाखालीं" (under national control) या शब्दाना विरोध झाला. पण या दोन्ही प्रश्नात जुन्या पक्षाला पूर्ण हार खावी लागली तिसरा महत्त्वाचा ठराव बहिष्काराचा होता हाच ठराव सर्वांत वादग्रस्त होता ना गोखल्याच्यासारख्या पुढारलेल्या नेमस्ताना ब्रिटिश मालाचा बहिष्कार व तोहि बंगाल इलाख्यापुरताच मान्य होता पण राष्ट्रीय पक्षाला ब्रिटिश माल, ब्रिटिश सरकार, ब्रिटिश कायदेमंडळें, ब्रिटिश नोकऱ्या, ब्रिटिश न्यायकोर्टें या सर्वांवरचाच बहिष्कार अभिप्रेत होता व तो अमलांत आणण्याचा प्रयत्न तो पक्ष उघडपणे करीत होता पूर्व बंगालमध्यें कायदेभंग आणि सरकारी अधिकाऱ्यांवर बहिष्कार येथपर्यंत चळवळ गेलीच होती व बहिष्कारयोगात या सर्वांचा अंतर्भाव होतो, असें राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांनीं वारंवार लिहिलें होते. याच ठरावावर खरी रणधुमाळी माजली व पालबाबू उठून जाण्यापर्यंत पाळी आली पण अखेरीस उभय पक्षातील तडजोडीनें पुढील ठराव करावयाचे ठरले : "Resolved that having regard to the fact that the people of this country have little or no voice in its administration and that their representations to the Government do not receive due consideration, this Congress is of opinion that the Boycott movement inaugurated

* See How India wrought for freedom, P 447.

in Bengal by way of protest against the partition of that province, was and is legitimate." या ठरावात बंगालमध्यें प्रथम सुरू झालेली ( inaugurated in Bengal ) 'बहिष्काराची चळवळ' ही न्याय्य आहे, असें म्हटले होते यावर भाषण करताना पालबाबूंनीं सागितले, कीं बगालमध्ये सुरू झालेली बहिष्काराची चळवळ केवळ मालाच्या बहिष्काराची नसून त्यात सर्व प्रकारचा बहिष्कार येतो; आणि ही चळवळ प्रथम बगालनें सुरू केली असे म्हटले असले, तरी ती न्याय्य असल्याने तिचा स्वीकार सर्वांनीं केला पाहिजे ही चळवळ सर्वत्र पसरून तिचा व्यापहि वाढून स्वराज्य-संस्थापना होईपर्यंत ती चालू राहिली पाहिजे. ना गोखले आणि प मालवीय यांनीं यानतर भाषणें करून या ठरावाचा असा अर्थ होत नसून त्यात फक्त विलायती मालाचाच बहिष्कार व तोसुद्धा बगालपुरताच न्याय्य ठरविला आहे, असे वार्तिक केले पण ठरावाच्या शब्दातून दोन्ही अर्थ निघूं शकत होते तेव्हा अर्थातच तो सर्वानुमते पास झाला तडजोडीच्या ठरावांची शब्दरचना नेहमीं अशीच मुग्ध असते व दोन्ही पक्षांना आपापल्या मताप्रमाणें अर्थ करण्याची मुभा दिल्यास तडजोड टिकू शकते. पण ही दादाभाईच्या नेतृत्वाखालीं घडून आलेली तडजोड मेथापक्षाला मुळींच मान्य नव्हती व पुढील सालीं ही मोघम शब्दरचना बदलून तडजोड मोडण्याचा निश्चय त्याच वेळीं नेमस्त पक्षानें केला

यानतर दुसरा वादग्रस्त मुद्दा अंतिम ध्येयासबधीं व स्वराज्याच्या मागणीसंबधीं होता आपले अतिम ध्येय पूर्ण स्वातंत्र्य असावे असे नव्या पक्षाचे मत असलें, तरी तात्कालिक मागण्यांच्या ठरावांत वसाहतींच्या स्वराज्याचा स्पष्ट उल्लेख करून त्याचा पहिला हप्ता म्हणून काहीं विशिष्ट सुधारणा तावडतोब करण्याचा ठराव केल्याने नव्या पक्षाचे समाधान होणार होतें व तसाच ठराव अखेरीस झाला

"Resolved that the Congress is of opinion that the system of Government obtaining in the self-governing British Colonies should be extended to India, and that, as steps leading to it, it urges the following reforms should be immediately carried out .. . " यानतर काहीं सुधारणा मागितल्या होत्या त्यांत वरिष्ठ अधिकारीवर्गांत जी भरती करावयाची ती चढाओढीच्या परीक्षा घेऊन करावी, या परीक्षा हिंदुस्थानात व इग्लंडांत दोन्ही देशात घ्याव्या, भारतमत्री, व्हाइसरॉय व गव्हर्नर यांच्या कार्यकारी-मडळात हिंदी लोकांना भरपूर प्रतिनिधित्व मिळावे, मध्यवर्ती व प्रातिक कायदेमंडळें वाढवून त्यांत लोकप्रतिनिधी वाढवावेत व त्याना आयव्यय व राज्यकारभार यांवर अधिक नियंत्रणाचा हक्क द्यावा, स्थानिक स्वराज्याची वाढ करावी, वगैरे मागण्या होत्या हा स्वराज्याचा ठराव दोन्ही पक्षाच्या समतीने झाला हें लक्षांत घेतल्यास तात्कालिक राजकीय सुधारणांसबंधींच्या मागणींत

दोन पक्षांत फारसा मतभेद नव्हता असें वाटतें. पण वस्तुतः तशी स्थिति नव्हती. या तात्कालिक सुधारणा झाल्या कीं लगेच त्यांच्या आधारें वसाहतीच्या स्वराज्याचा मार्ग चालू लागावयाचें असे नव्या पक्षाचें धोरण असून वसाहतीच्या स्वराज्याचा तात्कालिक हक्क याच दृष्टीनें तो त्याकडे पहात होता शिवाय, प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें वसाहतीचें स्वराज्य हे ध्येय त्याने या ठरावानें मान्य केलें असलें, तरी आपलें अंतिम ध्येय पूर्ण स्वातंत्र्य हेंच होय असें तो म्हणत होता आपल्या या ध्येयासहि दादाभाईनीं आपल्या भाषणांत मान्यता दिली आहे असें पालबाबूचें म्हणणें होते दादाभाईच्या भाषणांत ध्येयाचा उच्चार पुढील शब्दांत करण्यांत आला होता: " Self-government or Swaraj like that of the United Kingdom or the Colonies " असे शब्द वापरून वसाहती किंवा इंग्लंड यांच्यासारखे स्वराज्य हे आपले ध्येय आहे असें दादाभाई सांगतात अर्थात् इंग्लंडासारखे स्वराज्य म्हटलें कीं निर्भेळ स्वातंत्र्य त्यात आलेंच व 'इंग्लंड किंवा वसाहती' अशी शब्द-योजना दादाभाईनीं बुद्ध्याच केली आहे, असे पालबाबू म्हणत शिवाय दादाभाईनीं समारोपाच्या भाषणांत वसाहती किंवा इंग्लंड यांपैकीं कोणाचाच उल्लेख न करता केवळ ' Be united, persevere and achieve self-government ' 'एकी करा, चिकाटी धरा व स्वराज्य मिळवा' एवढाच संदेश दिला होता या प्रसंगाचें वर्णन करताना लो. टिळक लिहितात : " राष्ट्रीय सभा आणि स्वराज्य यांची अशा रीतीने या वृद्ध महापितामहानें घालून दिलेली गाठ किंवा सांगड आता कोणाच्यानेंहि तोडली जाणार नाहीं राष्ट्रीय सभा आणि स्वराज्याचा हक्क याचा सभा वयांत आल्यानंतर राजकीय चळवळीचे सन्माननीय व वृद्ध महर्षि उपाध्याय दादाभाई यांच्या हातून गेल्या डिसेंबर महिन्यात सशास्त्र विवाह लावण्यात आला आहे व हा विवाहसंबंध राष्ट्रीय सभेशीं पितृत्वाचे नातें जोडणाऱ्या कित्येक गृहस्थास जरी पूर्ण संमत नसला, तरी तो तोडणे किंवा त्यात यत्किंचित् व्यत्यय आणणे आता अशक्य आहे. दादाभाई नौरोजी यांच्याखेरीज इतर कोणत्याहि उपाध्यायाच्या हातून ही कामगिरी वठली नसती, आणि यदा कदाचित् वठली असती तर पचली नसती स्वराज्य—लोकांनीं आपण होऊन चालविलेलें स्वराज्य—आपणांस प्राप्त झाल्याखेरीज आपल्या उद्धाराचा दुसरा मार्ग नाहीं असे नेटाने, स्पष्टपणें व सोप्या भाषेंत, गादीवरून दादाभाई यांनीं जेव्हा कॉंग्रेससभेच्या व्यासपीठावरून अखेरीस सांगितले, तेव्हा कोणी वृद्ध देवदूत आपल्या तरुण पिढीस शेवटचा उपदेश करण्याकरिताच अवतरला आहे कीं काय, असा क्षणभर भास झाला "*

## राष्ट्रीय पक्षाचीं तत्त्वें

कलकत्त्याची राष्ट्रसभा, तिच्यांत मंजूर झालेले स्वराज्यबहिष्कारादि ठराव

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग १ रा, पृ. १३३–३४

आणि दादाभाईंचे भाषण याबद्दल लोकमान्यानीं असे पूर्ण समाधान व्यक्त केलें असलें, तरी आपल्या पक्षाचें सर्व म्हणणें राष्ट्रसभेनें मान्य केले आहे असें मात्र त्याना वाटत नव्हते. तें म्हणणे काय आहे व आपल्या पक्षाचा समग्र कार्यक्रम कोणता आहे, ते त्यानीं राष्ट्रसभेनतर कलकत्त्यास भरलेल्या प्रचंड जाहीर सभेत पुढीलप्रमाणें निवेदन केले त्याच्या भाषणाचा विषय "Tenets of the new party" म्हणजे 'नव्या पक्षाचीं मूलतत्त्वें' हा होता व हे भाषण २ जानेवारी, १९०७ रोजीं कलकत्त्यास झालें त्यातील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे :

"आमच्या राजकारणात दोन नवे शब्द अलीकडे आले आहेत जहाल व मवाळ हे ते शब्द होत. या शब्दाचा विशिष्ट काळाशीं विशिष्ट संबध असून काल-क्रमानुसार त्याचा अर्थहि बदलेल. जेव्हां राष्ट्रसभा प्रथम स्थापन झाली, तेव्हां दादाभाईंचे जे विचार आज नेमस्त गणले जातात ते जाहीर होतांच त्यांना जहाल ही पदवी देण्यात आली यावरून तुम्हास दिसेल, की जहाल हा शब्द प्रगतिसूचक आहे. आज आम्ही जहाल आहो, उद्या आमचीं मुले आपणास जहाल म्हणवितील व आम्हांस मवाळ म्हणतील. प्रत्येक नवा पक्ष जहाल म्हणून जन्मास येतो व मवाळ ठरून अंत पावतो. व्यावहारिक राजकारणाचें क्षेत्र अमर्याद आहे.. नोकरशाहीकडे दाद मागणें व्यर्थ आहे, या मुद्यावर जुन्या व नव्या पक्षाचें एकमत आहे. जुन्या पक्षाचा ब्रिटिश राष्ट्राकडे दाद मागण्यावर विश्वास आहे व आमचा नाहीं आमची ही भूमिका असल्यामुळें आमच्यापाशीं काहीं तरी दुसरे साधन असलें पाहिजे हें तर्कसिद्ध आहे असे दुसरे साधन आमच्यापाशीं आहे. आम्ही काहीं स्वस्थ बसणार नाहीं. आम्हांला जें हवे आहे, ते प्राप्त करून घेण्याचें आम्ही दुसरे एकादें साधन घेऊ आम्ही निराश झालो नाहीं व निराशावादी नाहीं आमच्या स्वतःच्या प्रयत्नानीं आपले ध्येय गाठण्याची आशा आहे म्हणूनच नवा पक्ष अस्तित्वांत आला आहे. महाभारतांतील कथा सांगते, कीं श्रीकृष्णाला शिष्टाईला धाडिले होतें, पण कौरव व पाडव दोघेहि शिष्टाई यशस्वी झाली नाहीं, तर त्या प्रसगाला तोड देण्यासाठीं आपापलीं सैन्यें सघटित करीत होते. याला म्हणतात राजकारण तुमची मागणी जर फेटाळली गेली, तर अशा प्रकारे लढण्याची तुमची तयारी आहे काय? जर तुमची तयारी असेल, तर तुमची मागणी फेटाळली जाणार नाहीं याबद्दल खात्री बाळगा; पण तुमची जर तशी तयारी नसेल, तर तुमची मागणी फेटाळली जाईल व ती कदाचित् कायमचीच फेटाळली जाईल याबद्दलहि पूर्ण खात्री बाळगा. आमच्या-जवळ शस्त्रें नाहींत व शस्त्रांची आवश्यकताहि पण नाहीं आमच्याजवळ अधिक प्रबल शस्त्र आहे बहिष्कार हे आमचें राजकीय शस्त्र आहे एक गोष्ट आमच्या दृष्टीस पडली आहे ती ही, कीं मूठभर इंग्लिश लोकांनीं चालविलेला हा सर्व राज्यकारभार आमच्या सहकार्यानें चालला आहे. आम्ही सर्व खालच्या जागांवर आहों. सर्व राज्य आमच्या साहाय्यानें चालू आहे आणि ते आम्हांला आमच्यांतील सहकार्याच्या शक्ती-

संबधीं अज्ञानांत ठेवीत असतात या शक्तीचें ज्ञान आम्हांस होईल तर आम्ही जें आज आमच्या हातांनीं चालवीत आहो त्यावर आम्हांस हक्क सागतां येईल व तें आमचें आम्ही चालवू शकू नियंत्रणाची सर्व सत्ता आमच्या हातीं आली पाहिजे हा मुख्य मुद्दा आहे माझ्या घराची किल्ली माझ्या ताब्यांत हवी, त्यांतील एकदोन परकीयांना बाहेर घालविण्याचा हा प्रश्न नाहीं स्वराज्य हे आमचे साध्य आहे आमच्या राज्यकारभारावरचा ताबा आम्हांस हवा आहे कारकून होऊन राहावयास आम्हांस नको आहे आज आम्ही केवळ कारकून आहों आणि परकीय सरकारच्या हातांतील शस्त्रे बनून आम्ही आमच्यावरच खुषीनें जुल्म करीत आहो हे सरकार जें आमच्यावर राज्य करते, तें आपल्या अगच्या बळाने करीत नसून या वस्तुस्थितीसबधीं आम्हास अज्ञानात ठेवून करीत आहे. प्रो सीले याचे असेच मत आहे प्रत्येक इंग्रजाला हे माहीत आहे, कीं या देशात इग्रज केवळ मूठभर आहेत, पण तुम्ही दुर्बल आहा व ते प्रबल आहेत असा भ्रम तुम्हास पाडणें हा त्याच्यापैकीं प्रत्येकाचा धंदा आहे हेंच राजकारण होय आजपर्यंत आम्ही या धोरणानें फसलों आहों तुमचें भवितव्य पूर्णपणें तुमच्याच हातीं आहे याची जाणीव तुम्हांस व्हावी, हाच नव्या पक्षाचा हेतु आहे. स्वतत्र होण्याची जर तुम्हांस इच्छा असेल, तर तुम्ही स्वतंत्र होऊं शकाल. जर स्वतत्र होण्याची तुमची इच्छा नसेल, तर तुमचा अध.पात होईल व त्या स्थितींत तुम्ही कायम रहाल तुमच्यापैकीं पुष्कळाना शस्त्रें धरण्याची गरज नाहीं पण सशस्त्र प्रतिकार करण्याचे सामर्थ्य तुमच्या अगीं नसले, तरी स्वार्थत्याग आणि आत्मसयमन याचा उपयोग करून या परकीय सरकारला आपल्यावर राज्य करण्यास मदत न करण्याचेंहि सामर्थ्य तुमच्या अंगीं नाहीं काय? हाच बहिष्कार होय आणि बहिष्कार हे राजकीय शस्त्र आहे असे जेव्हा मी म्हणतों, तेव्हा त्याचा हाच अर्थ असतो सारावसुलीस व शांततारक्षणास आम्ही त्यास साहाय्य करणार नाहीं हिंदुस्थानचें रक्त साडून आणि हिंदुस्थानचा पैसा वेंचून सरहद्दींच्या पलीकडे किंवा हिंदुस्थानच्या बाहेर युद्ध करण्यास आम्ही त्याना साहाय्य करणार नाहीं न्यायदानाचे कार्य करण्यास आम्ही मदत करणार नाहीं आम्ही आमचीं कोर्टें स्थापन करू; आणि वेळ आली म्हणजे आम्ही करहि देणार नाहीं तुमच्या संघटित प्रयत्नांनी तुम्हास हें करता येईल काय? जर येत असेल, तर तुम्ही उद्यापासून स्वतंत्रच आहा आज येथें बोललेल्यापैकीं एका गृहस्थानीं अर्धी भाकरी व सबध भाकरी अशी भाषा वापरली. मी म्हणतो मला सगळीच भाकरी पाहिजे, व तीहि ताबडतोब पाहिजे पण मला सगळी मिळाली नाहीं तर माझा धीर सुटेल असे समजूं नका त्यानीं अर्धी दिली तर ती घेऊन उरलेली मिळविण्याचा मी प्रयत्न करीन आपल्या विचाराना व कृतींना हीच दिशा लावण्याचें शिक्षण तुम्हीं घेतलें पाहिजे ”*

लोकमान्यांचें वरील भाषण हे त्यांच्या सर्व राजकारणाच्या व राजकीय

* Speeches of Bal Gangadhar Tilak, P 108

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे प्रागतिक पक्षाच्या राजकारणावर टीका करीत असतां आपलें स्वतःचे असे कोणते राजकारण राष्ट्रीय पक्षापाशीं होतें, या प्रश्नाचें स्पष्ट उत्तर या भाषणांत लोकमान्यांनीं दिलेलें आहे प्रागतिकाचें नेमस्त सनदशीर राजकारण सोडिलें असतां सशस्त्र राज्यक्रांतीच्या राजकारणाखेरीज दुसरा कोणताच मार्ग उरत नाहीं असें गृहीत धरल्यास, लोकमान्यांची अगर बिपिन बाबू, लाला लजपतराय इत्यादि राष्ट्रीय पक्षाच्या पुढाऱ्यांची त्या वेळची प्रागतिक पक्षावरची टीका केवळ विध्वंसक ठरण्याची आपत्ति येते ; किंबहुना, प्रागतिक पक्ष म्हणत असे त्याप्रमाणे राष्ट्रीय पक्षाचें राजकारण म्हणजे केवळ नैराश्याचा वैताग असेंच होऊन बसते. पण सनदशीर राजकारण आणि सशस्त्र क्रांतीचें राजकारण याच्या दरम्यान निःशस्त्र क्रांतीचें एक स्वतंत्र राजकारण आहे व तेंच १९०५ सालापासून राष्ट्रीय पक्षानें उघडपणे पुरस्कारिलें होतें. हें राजकारण नैतिक दृष्ट्या किंवा सुधारलेल्या देशांतील प्रशस्त मानिलेल्या राजकीय व्यवहारदृष्ट्या अप्रशस्त आहे असें कोणासहि म्हणता येणें शक्य नव्हतें खुद्द ना गोखले यांनाहि यापैकीं कोणताहि कार्यक्रम केवळ तात्त्विक किंवा नैतिक दृष्ट्या गर्ह्य आहे असें म्हणणे शक्य नव्हते. यावर केवळ एकच आक्षेप घेतां येण्याजोगा होता व तो म्हणजे तें निःशस्त्र क्रांतीचें राजकारण त्या परिस्थितींत राष्ट्रास झेंपण्याजोगें नसल्यामुळें अव्यवहार्य आहे हा अव्यवहार्यतेचा आक्षेपच ना गोखले यानीं प्रस्तुत राजकारणावर घेतलेला होता आणि हेंच राजकारण पुढे महात्मा गांधींनीं असहकारितेच्या रूपानें पुढें आणिलें असता, व तें व्यवहार्य आहे अशी प्रचीति ब्रिटिश मुत्सद्यानाहि आणून दिली असता, ना. गोखले याचे अनुयायी तोच अव्यवहार्यतेचा आक्षेप पुढे तीस वर्षे झालीं तरी त्यावर आणीत होते. आश्चर्याची गोष्ट म्हणजे लो टिळकांचे अनुयायी म्हणविणारे महाराष्ट्रांतील काहीं लोकहि तोच आक्षेप या कार्यक्रमावर अखेरपर्यंत घेत होते लो टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्यानी आपलें स्वतंत्र राजकारण अशा रीतीनें लोकापुढें संपूर्णतः मांडिलेलें पाहून ना गोखले यांनाहि आपल्या राजकारणाची फेरमांडणी लोकापुढें करणें अवश्य झालें व तसें करण्यास त्यांनीं कलकत्त्याची राष्ट्रीय सभा झाल्यानंतर थोड्याच दिवसात सुरुवात केली

## नेमस्त पक्षाचें धोरण

१९०७ च्या ४ फेब्रुवारीस अलाहाबाद येथें प मोतीलाल नेहरू याच्या अध्यक्षतेखालीं 'आपल्यापुढील कार्य' या विषयावर नामदार गोखले यांचे एक सुप्रसिद्ध व्याख्यान झालें. या व्याख्यानात त्यानीं या नव्या पक्षाच्या राजकारणासंबंधी आपलें स्वतःचे विचार पुढीलप्रमाणें मांडिले आहेत या भाषणात प्रथमतः त्यानीं आपल्या राष्ट्राच्या महत्त्वाकांक्षेला मी कोणत्याहि प्रकारची मर्यादा मानीत नाहीं, असे सांगितलें "कोणताहि वर्णभेद किंवा धर्मभेद लक्षांत न घेतां आमच्या देशातील

स्त्री-पुरुषांना आपल्या अगच्या सर्व गुणाचा पूर्ण विकास करण्यास सधि मिळावी आणि त्याच्यावर कोणत्याहि प्रकारचीं कृत्रिम अथवा विकासविरोधी बधनें असू नयेत अशी माझी इच्छा आहे राजकीय, औद्योगिक, धार्मिक, साहित्यिक, शास्त्रीय आणि कलात्मक अशा सर्व क्षेत्रात जगातील मोठ्या राष्ट्रांत हिंदुस्थानला आपले योग्य स्थान प्राप्त व्हावे, अशी माझी इच्छा आहे हे सर्व मला पाहिजे आहे आणि हे सर्व वस्तुतः आणि सारतः आपणांस या साम्राज्यांतच प्राप्त होऊ शकेल अशीहि माझी भावना आहे." यानतर लोकमान्य टिळकानीं सुद्धा प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें वसाहतीचें स्वराज्य आपणास पुरेसें आहे असे मान्य केल्याचे सागून हें स्वराज्य प्राप्त करून घेण्याच्या मार्गाकडे वळून ते म्हणाले : "आमचा मार्ग सनदशीर राजकारण हाच असला पाहिजे सनदशीर राजकारण म्हणजे काय असा प्रश्न वारवार विचारण्यांत येत असतो या प्रश्नाचे उत्तर देण्याचा मी प्रयत्न करणार आहे कोणत्या साधनाचा उपयोग करण्याचा आम्हास अधिकार आहे, या प्रश्नाचा विचार करता पहिली जी कल्पना सुचते ती म्हणजे शस्त्रबल वगळले पाहिजे " या मुद्द्याची चर्चा करून ते पुढे म्हणाले : " बड, परचक्राला आवाहन किवा साहाय्य, आणि अत्याचाराचा अवलंब, या तीन गोष्टी वर्ज्य आहेत स्थूल मानाने बोलता या तीन गोष्टी वगळल्यास बाकी सर्व साधनें 'सनदशीर' या सदरात येतात अर्थात् जे जे सर्व सदनशीर आहे, ते तें सर्व शहाणपणाचे किवा व्यवहार्य असते असे नाहीं हे निश्चित पण हा मुद्दा निराळा एका टोकास अर्ज-विनत्या व दुसऱ्या टोकास करबंदीसुद्धा आत्यतिक स्वरूपाचा, आपलीं गाऱ्हाणीं दूर होईपर्यंत करण्यात येणारा, नि:शस्त्र प्रतिकार, हीं सर्व साधने सनदशीर या सदरात येतात, या दृष्टीनें पाहिल्यास आज आपल्या देशांत ज्या गोष्टी घडत आहेत त्यात बेसनदशीर असे काहीं नाहीं. मग काहीं लोकांच्या उद्गारासबधीं कोणास काहींहि वाटो दुसरे लक्षण असें सागता येईल, कीं आपणास जो न्याय मिळवून घ्यावयाचा, तो देशातील प्रस्थापित राजसत्तेकडूनच मिळवून घेतला पाहिजे अर्थात् यासाठीं सत्ताधाऱ्यावर एकसारखे दडपण आणीत गेलें पाहिजे, आणि म्हणून सत्ताधाऱ्यांशीं आपणास कांहींच कर्तव्य नाहीं ही कल्पना अजीबात सोडून दिली पाहिजे. हे दडपण किती असावयाचे ते आपल्या मागणीपाठीमागे असणारे लोकमताचें बल आणि निर्धार यावर अवलबून असणार हे खचित म्हणून हे बल निर्माण करणे आणि हा निर्धार दृढ करणे यांची अत्यत आवश्यकता आहे, हे उघड आहे पण आपल्या सत्ताधाऱ्यांशीं आपण कोणताच संबध ठेवू नये आणि त्यांचेकडे दुर्लक्ष करून आपले साध्य आपण प्राप्त करून घ्यावे, ही कल्पना अग्राह्य आणि असमंजस आहे " यानतर ना गोखले यानीं व्यवहार्यतेच्या दृष्टीने बहिष्कार-योगांतील निरनिराळया कार्यक्रमाचा विचार केला त्यापैकी ब्रिटिश मालाच्या बहिष्कारासबंधीं ते म्हणाले. "आपल्या देशातील उद्योगधंद्याची वाढ व्हावी एवढी केवळ सदिच्छा बाळगून न थाबता स्वदेशी उद्योगधद्याच्या वाढीसाठीं प्रत्येकाने

आपल्या परिस्थितीप्रमाणें स्वेच्छेनें त्याग करावा या कल्पनेचा अतर्भाव स्वदेशींत होत असतो पण हा अर्थ व्यक्त करण्यास बहिष्कार या शब्दाची योजना करणें योग्य नाहीं कारण बहिष्कार या शब्दानें आपले नुकसान झालें तरीहि दुसऱ्याचें नुकसान करण्याची सूडबुद्धि व्यक्त होत असते, आणि स्वदेशीच्या कार्यात निष्कारण विरोधी भावना जागृत होऊन अडथळे येतात" यानतर स्वदेशीच्या कार्या-साठीं सरकारच्याहि सहकार्याची आपणास कशी आवश्यकता आहे, हे विशद करून या मुद्द्यासबधीं ते म्हणाले कीं "या शाब्दिक वादासबधीं आपणास विशेष कांहीं बोलण्याचें कारण नाहीं" पण राजकीय बहिष्काराकडे वळून ते म्हणाले की "अशा प्रकारचा बहिष्कार मात्र आपल्या देशाच्या आजच्या परिस्थितींत शक्य आहे अशी कोणाची कल्पना होत असेल, तर ती विलक्षणच गोष्ट समजली पाहिजे हिंदुस्थानात सर्वत्र राष्ट्रीय शिक्षणाच्या शाळा व कॉलेज काढण्यास किती तरी वर्षे लागतील व किती तरी त्याग करावा लागेल" यानतर सरकारी नोकऱ्यावरील बहिष्कारा-सबधानें ते म्हणाले, "जर सरकारला जितके नोकर लागतात तितके मिळण्याची अडचण भासू लागली, तरच या बहिष्काराचा परिणाम सरकारला भासेल, पण ही गोष्ट व्यवहार्य आहे हे मत विचारांतहि घेण्यास पात्र नाहीं" अखेरीस स्थानिक स्वराज्य, म्युनिसिपालिट्या आणि कायदेमंडळे यांतील जागांच्या बहिष्कारासबधीं ते म्हणाले: "जर या जागांवरील लोकांनीं राजीनामे दिले, तर त्या पटकावण्यास वाटेल तितके इतर लोक पुढे येतील; आणि आपणास लोकसेवा करण्याची जी संधि लाभली होती ती आपण व्यर्थ सोडून दिली, असें ह्या राजीनामे देणाऱ्या लोकास लौकरच आढळून येईल. म्हणून या मार्गाचें अवलंबन केल्यास राष्ट्राचें हित न होतां अनहितच होईल आपल्या राजकारणाचा पूर्वीचा पाया उखडून काढण्याचा जो प्रयत्न होत आहे, त्याचा प्रतिकार सर्वांनीं मिळून केला पाहिजे हिंदुस्थानच्या आजच्या स्थितींत स्वराज्य मिळविण्याचा सार्वत्रिक बहिष्कार हा एकच उपाय आहे किंवा अनेकांपैकीं तरी तो एक आहे असे ज्याचे म्हणणें असेल, त्याना मी एक सूचना करतों. करबदी हा नि शस्त्र प्रतिकाराचा अत्यंत परिणामकारक आणि अगदीं सरळ असा मार्ग आहे आपल्या देशाच्या आजच्या स्थितींत स्वराज्य प्राप्त करण्यास नि.शस्त्र प्रतिकाराचा उपयोग करावा असे ज्याचे म्हणणें आहे, त्यांनीं नि शस्त्र प्रतिकाराच्या या मार्गाचें अवलंबन केल्यास आपण कोठे आहों, आणि आपणास लोकांचा कितपत पाठिंबा आहे हें त्यांना ताबडतोब दिसून येईल"§

## दोन पक्षांतील संघर्ष

या वेळच्या हिंदी राजकारणाचे अवलोकन केल्यास त्यास बगालचे पुढारी बाबू बिपिनचद्र पाल व अरविंद घोष एका टोकानें पुढे खेंचीत होते, तर दुसऱ्या

§ Speeches of Gopal Krishna Gokhale. P. 1104-12

टोकाने सर फेरोजशहा मेथा हे मार्ग खेचीत होते असें दृश्य दिसतें ना गोखले, सुरेंद्रनाथ बानर्जी, लो. टिळक व लाला लजपतराय हे या दोन टोकांच्या मध्यें उभे असलेले दिसतात. राष्ट्रसभा दुभगूं नये आणि तिची शक्ति विभिन्न होऊन प्रतिपक्षाला त्याचा फायदा घेता येऊ नये, याबद्दल या चारहि पुढाऱ्याना एक प्रकारची उत्कठा असल्याचे दिसून येतें पण राष्ट्रसभा दुभगण्याचे संकट कसें टाळावें हाच या चार पुढाऱ्यापुढील महत्त्वाचा मतभेदाचा प्रश्न होता त्यापैकीं बाबू बिपिनचंद्र पाल व अरविंद घोष यांना आवरून धरण्याचे कार्य लो टिळक यांच्याकडे आलेलें असून ना गोखले व बाबू सुरेंद्रनाथ यानीं मेथा-वाच्छाप्रभृति आपल्या जुन्या पुढाऱ्यांना परिस्थितीस अनुसरून थोडे पुढे खेचण्याचे कार्य करावयास हवे होतें हीं दोन्ही कार्यें कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेत महर्षि दादाभाई यांच्या अध्यक्षतेखालीं व त्याच्या वजनाने घडून आलीं दोन्ही पक्षांना एका संस्थेत कार्य करावयाचे असल्यास कलकत्त्याचे ठराव न बदलणे हा एकच उपाय होता हे ठराव अधिक जहाल करण्याचा आग्रह धरू नये, ही गोष्ट लो टिळकानीं आपल्या वजनानें तरुण बंगालकडून मान्य करवून घेतली होती अर्थात् ते अधिक मवाळ बनू नयेत या गोष्टीस बाबू सुरेंद्रनाथ व ना गोखले यानीं मेथा-वाच्छाप्रभृतींकडून मान्यता मिळवून घ्यावयास हवी होती पण त्याची इच्छा काहींहि असली, तरी त्यांच्या अगीं हे सामर्थ्य नव्हते व जुन्या पुढाऱ्यांची भीड मोडून तशी हमी देण्यास ते तयारहि नव्हते. राष्ट्रीय सभा दुभगली तरी हरकत नाहीं, पण तरुण बगालचे बहिष्कारवादी नवे राजकारण आम्ही तिच्यांतून खणून काढल्याखेरीज राहणार नाहीं, असा सर फेरोजशहा याचा दुराग्रह होता या दुराग्रहामुळेच व त्या दुराग्रहास गोखले, सुरेंद्रनाथ हेहि बळी पडल्यामुळे राष्ट्रीय सभा सुरतेच्या अधिवेशनात १९०७ सालीं मोडली.

या वर्षीचे अधिवेशन नागपूर येथे भरावयाचे ठरलें होते परंतु तेथील वातावरण आपल्या धोरणास अनुकूल नाहीं असे पाहून आयत्या वेळीं राष्ट्रीय सभा सुरतेस भरविण्याचें त्या वेळच्या तिच्या अधिकारीवर्गाने म्हणजे प्रागतिक पक्षानें ठरविलें राष्ट्रीय सभा नागपुराहून सुरतेस आयत्या वेळीं नेऊन, आपणास अनुकूल अशा तेथील स्थानिक बहुमताच्या जोरावर तिच्यावर एकादें ब्रीद लादून आणि तिनें गेल्या सालीं केलेल्या ठरावात पिछेहाट करून तरुण बंगालचे नवें राजकारण राष्ट्रसभेतून उखडून काढण्याचा हा उघड उघड प्रयत्न होता हे धोरण आपण अवलंबिल्यास तें बेसनदशीर ठरवून नवा पक्ष नागपुरासच स्वतंत्र राष्ट्रसभा भरविण्याचा आग्रह धरील व अशा रीतीनें राष्ट्रसभेचे दोन तुकडे होतील अशी भीति ना गोखले याना वाटत होती व ती त्यानीं पत्र लिहून सर डब्ल्यू वेडरबर्न याना विलायतेस कळविली होती. या पत्रांत राष्ट्रसभा दुभंगल्यास नोकरशाही दोन्ही पक्षास दाद देणार नाहीं व राष्ट्रकार्यांत विघ्न उपस्थित होईल अशी भीतिहि त्यांनीं व्यक्त केली होती हे पत्र वेडरबर्न यांच्याकडून मि मोर्ले यांच्या हातीं गेलें. अर्थातच मोर्ले यांनीं त्यातील मजकूर लॉर्ड

मिन्टो यांना कळवून ना गोखले हे जहाल पक्षाच्या नादीं लागण्यांत पोरकटपणा करीत आहेत, या वेळीं त्यांनीं जहाल पक्षाला सोडून आपणांस मिळाले पाहिजे व आम्ही जे देऊं त्यांतच समाधान मानून राहिले पाहिजे, असे आपले त्याच्यासंबंधींचें मतहि त्यानीं लॉर्ड मिन्टो यास कळविलें *

ना गोखले हे राष्ट्रसभेतील दुफळीला न भिता जर आपणांशीं 'सुधारणा आणि शातता' या तत्त्वावर समेट करतील, तर राष्ट्रसभा दुभगल्यास त्यांचे कांहींच अनहित होणार नाहीं व ते ज्या सुधारणा मागतील त्यापैकीं ६०-७० टक्के त्यांच्या पदरात पडतील असेहि मि मोर्ले यानीं प्रागतिक पक्षास मधाचें बोट या पत्रात दाखविले होते मि मोर्ले याची ही इच्छा पूर्णपणे सफल झाली आणि राष्ट्रसभा दुभगल्यावर जी आपत्ति राष्ट्रावर कोसळेल अशी भीति नामदार गोखले यानीं व्यक्त केली होती, ती अक्षरश· खरी ठरली याचा अर्थ राष्ट्रसभा मोडणार व त्यामुळे राष्ट्रावर आपत्ति येणार हे माहीत असूनहि सुरतेस राष्ट्रसभा नेण्याचे राजकारण करण्यात आलें असा स्पष्ट होतो नागपुरास नव्या-जुन्या पक्षातील भांडणे विकोपास गेलीं होतीं. यामुळें जुन्या पक्षास आपल्या या धोरणाचें वरकरणीं समर्थन करता आलें. तथापि, कलकत्त्याचे चार ठराव जसेच्या तसे राष्ट्रसभेपुढें उचलून धरण्यास आपण तयार आहों अशी हमी जुन्या पक्षानें दिली असती, तर हे सर्वच विरोधाचे व दगलीचे वातावरण त्यास ताबडतोब बद करता आले असते, हे लक्षात घेतल्यास

---

* मि. मोर्ले यानी लॉर्ड मिंटो याना पाठविलेल्या पत्रातील उतारा

"One of the most interesting Indian things that have come my way this week is a letter from to dated 11th October The one absorbing question, he says, is 'how the split in Congress, now apparently inevitable, is to be averted' 'The out-look at this moment is as dark as could be' He has no hope that any solution can be found, short of removing the sittings of the Congress from Nagpur But this means a split as the new party in that case will probably insist on holding their separate Congress at Nagpur 'If a *split does* come, it means a disaster, for the Bureaucracy will then put down both sections without much difficulty' They will brush Gokhale and his friends aside on the ground that they have no large following in the country and will put the new party down on the plea that the most thoughtful people are against them I have often thought during the last twelve months that Gokhale, as a party manager, is a baby... Now, if I were in Gokhale's shoes—if he wears shoes, I forget,—I should insist on quietly making terms with Bureaucracy on the basis of order *plus* Reforms If he would have the sense to see what is to be gained by this line, the 'split' when it comes, should do him no harm, because it would set him free to fix his aims on reasonable things, where he might get out of us sixty or seventy per cent of what he might ask for"

— *Vide Page 72-73, Life of Gopal Krishna Gokhale by Rt Hon V S Shastri*

नागपुरास निर्माण झालेले विरोधी वातावरण आणि सुरतेस झालेले प्रकार या सर्वांची जबाबदारी नव्यापेक्षां जुन्या पक्षावरच अधिक पडते असे दिसून येईल

पण जुन्या पक्षाचा आग्रह लक्षांत घेतां स्थानिक बहुमताच्या जोरावर राष्ट्रसभेतून वाढत्या नव्या पक्षास काढून लावण्याचें धोरण अयशस्वी करण्यास नव्या पक्षाला प्रथमपासून अडवणुकीचा मार्ग स्वीकारण्याखेरीज गत्यतरच नव्हते. जुना पक्ष नव्या पक्षाशीं कोणत्याहि प्रकारे तडजोड करण्यास तयार नसल्याने दोन पक्षातील विरोधाचे वातावरण सुरतेच्या अधिवेशनास प्रारभ होण्याच्या आधींच इतके तापले होते, कीं त्या वातावरणात राष्ट्रसभा दुभगली यांत मुळींच आश्चर्य नाहीं. त्या वेळच्या घडामोडींतील तपशिलाची चर्चा येथे करण्याची आवश्यकता नाहीं अधिवेशनाची पहिल्या दिवशींची बैठक, अध्यक्षांच्या सूचनेस बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी हे अनुमोदन देण्यास उठले असता त्याच्याविरुद्ध बंगाली लोकांनीं ओरड केल्यानें जी दगल माजली, त्यात मोडली दुसऱ्या दिवशीं अध्यक्षांची सूचना मांडण्यांत येऊन तिला अनुमोदन दिले गेल्यानतर आपण एक उपसूचना मांडणार आहोत असे लो टिळक यानीं स्वागताध्यक्षास आगाऊच कळविले होते तरीहि त्याना तसे करण्यास मनाई केल्यामुळे व ही मनाई निमूटपणे सहन करण्याचे लोकमान्यांनीं नाकारल्यामुळे दगल होऊन त्या दिवशींचीहि बैठक पहिल्या दिवसाप्रमाणेंच दगलींत मोडली लो. टिळक यानीं या वेळचे आपले वर्तन पूर्णपणे कायदेशीर होतें असे अनेक आधार देऊन केसरीतील आपल्या लेखांत सिद्ध केले आहे या बाबतींत ज्यांना अधिक तपशिलात शिरावयाचें असेल, त्यानीं हे लेख आणि त्या वेळचीं प्रागतिक पक्षाने त्यांस दिलेलीं उत्तरे वाचावींत व या मुद्द्यावर आपला निर्णय द्यावा आम्हास येथे दोन पक्षात तात्त्विक मतभेद कोणता होता, तो मतभेद असूनहि दोन पक्ष कलकत्त्याच्या अधिवेशनाचे ठराव जसेच्या तसे पास करण्याच्या हमीने एका राष्ट्रीय सस्थेत नांदणें कसे शक्य होतें व ही हमी न देण्यानेच राष्ट्रसभा दुभगण्याची आपत्ति कशी ओढवली, एवढेच दाखवावयाचे आहे, व ते येथपर्यंतच्या विवेचनावरून वाचकास पटले असेल अशी आम्हांस आशा आहे अशी हमी आपणास देता येत नाहीं, कारण विषयनियामकमडळात अखेरीस कोणता निर्णय लागेल हे आम्हास आगाऊ कसे सागता येणार, अशी सबब ना. गोखलेप्रभृति नेमस्त पुढाऱ्यांनीं पुढे केली होती परतु ही सबब अत्यत लंगडी आहे, कारण ना गोखले, बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी, लो टिळक व लाला लजपतराय अशा दोन्ही पक्षाच्या प्रमुख पुढाऱ्यानीं एकमताने पुढे मांडलेले ठराव विषयनियामक-मंडळात सहसा नामजूर होणे शक्य झाले नसते जर प्रतिपक्षाशीं समेट करण्याची वृत्ति बहुसख्य पक्षात असेल, तर असे धोरण अनेक वेळा अवलंबिण्यात येत असते महात्मा गांधींनीं राष्ट्रसभेंत निरनिराळया पक्षातील ऐक्य राखण्यासाठीं असे धोरण अनेक वेळां अवलंबिलेलें आहे, हे तिचा अलीकडील इतिहास जाणणारांस सांगण्याची आवश्यकता नाहीं यावरून त्या वेळीं राष्ट्रसभा

संघटित ठेवण्यापेक्षां स्थानिक बहुमताच्या जोरावर नव्या पक्षाला व त्याच्या राजकारणाला राष्ट्रसभेतून काढून लावण्याचा दुराग्रह हाच नेमस्त पक्षाच्या अग्रणींत विशेष दिसून येतो त्यानतर दोन्ही पक्षांकडून प्रसिद्ध झालेल्या कैफियती निर्विकार मनाने वाचिल्या आणि सुरतेत झालेल्या भांडणानतरहि राष्ट्रीय पक्षाने दोन्ही पक्षांची सयुक्त राष्ट्रसभा भरविण्यासाठीं जे प्रयत्न केले ते ज्या उद्दाम वृत्तीनें फेटाळून देण्यात आले ते पाहिले, तरी असाच निर्णय द्यावा लागतो. अखेरीस सर फेरोजशहा यांनीं दोन्ही पक्षांची राष्ट्रसभा भरविण्याची इच्छा ही केवळ वेडेपणाची भावना आहे असें स्पष्टपणें जाहीर केले व दोन राष्ट्रसभा भरणे हेच इष्ट आहे असे जेव्हां त्यानीं जाहीर केले, तेव्हां बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यानींसुद्धा फेरोजशहा मेथांची ही उक्ति चुकीची आणि लोकसत्तेशी विसगत अशी अरेरावीपणाची आहे असें बगाली पत्रातून स्पष्टपणें लिहिले § राष्ट्रसभा अभग रहावी याबद्दल बगाल इलाख्यांत किती व्यापक भावना पसरलेली होती त्याची कल्पना बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी याच्या खालीं दिलेल्या उताऱ्यावरून बरोबर येऊ शकते त्याचप्रमाणे एकदर राष्ट्रात आपल्या बाजूस बहुमत नाहीं याची जाणीव ना गोखले यांनीं वेडरबर्न याना पाठविलेल्या पत्रात व्यक्त झालेली आहे तात्पर्य, या दोन गोष्टींचा एकत्रित विचार केल्यास नेमस्त पक्षाचें धोरण तत्कालीन राष्ट्रभावनेशीं विरुद्ध होतें हे स्पष्ट आहे

## दुफळी, दडपशाही व दहशतवाद

सुरतेला राष्ट्रीय सभा मोडल्यानंतर थोड्याच दिवसात सरकारनें राष्ट्रीय पक्षातील पुढाऱ्यांवर अभूतपूर्व अशी दडपशाही करून त्यास नेस्तनाबूत करण्याचा प्रयत्न सुरू केला. या दडपशाहीस १९०७ च्या मे महिन्यातच लाला लजपतराय यांना बिगरचौकशी हद्दपार करून सुरुवात झाली होती यानतर थोड्याच दिवसात सुरतेच्या राष्ट्रसभेपूर्वी त्याना सोडून देण्यात आलें होते पण सुरतेस राष्ट्रसभेत दुफळी झाल्यानंतर ही दडपशाहीची मोहीम पुनः जारीनें सुरू झाली. लो. टिळकाना १९०८ सालच्या मध्याच्या सुमारास सहा वर्षांची काळेपाण्याची कडक शिक्षा ठोठावण्यात आली मद्रासमध्ये चिदबरम् पिले यांनाहि अशीच सहा वर्षांची शिक्षा ठोठावण्यांत

§ " Sir Pherozeshaha Metha has described the desire for united Congress as a mawkish sentimentality . The spirit which we condemn in the Government is not the spirit that we should foster in the bosom of the Congress Sir Pherozeshaha Metha's language is strong, unconciliatary, and we are constrained to say, too masterful to suit the democratic temper of those who have been brought up amid the traditions of the Congress and the free public life of our province We regret that he should have used this language in relation to a wide spread sentiment which inspires the political world of Bengal."

—*Sir Pherozeshaka Metha by H P. Modi, Vol III, P. 550–551*

आली. बाबू अरविंद घोष यांच्यावर बंड करण्याचा आरोप ठेवून खटला भरण्यात आला; पण अखेरीस एक वर्षानंतर ते दोषमुक्त होऊन सुटले बिपिन बाबू यानाहि याच सुमारास सहा महिने शिक्षा देण्यात आली होती. हे मोठमोठे पुढारी तुरुंगांत घालण्याचें सत्र सुरू असतां अनेक छोट्या पुढाऱ्यावर खटले करून लोकाना दहशत बसविण्याचा आपला इरादा सरकारने जाहीर केला व जिकडे तिकडे भीतीचें वातावरण निर्माण केलें राष्ट्रीय पक्षाने राष्ट्रसभा नागपूर येथें १९०८ च्या डिसेंबरमध्यें भरविण्याचा प्रयत्न केला, तोहि बेकायदा ठरविण्यात आला व राष्ट्रीय पक्षास उघडपणे कार्य करणे अशक्य झाले.

या वेळीं देशातील तरुणवर्गांत सशस्त्र क्रातीचें व गुप्त कटाचे राजकारण फार मोठ्या प्रमाणावर फैलावलें. १९०७ च्या डिसेंबर महिन्यात इंग्लडातील श्यामजी कृष्णवर्मा यांच्या 'Indian Sociologist' या पत्रांत हिंदुस्थानांतील चळवळ गुप्त रीतीनें आणि रशियातील क्रातिकारकांच्या मार्गानि चालविणे भाग आहे अशा प्रकारचे विचार प्रसिद्ध झाले याच वेळीं स्वा. विनायकराव सावरकर हे विलायतेंत जाऊन श्यामजी कृष्णवर्मा याना मिळाले होते तिकडे बंगालमध्ये गुप्त कटाची व सशस्त्र क्रांतीची चळवळ 'युगान्तर' व 'सन्ध्या' या पत्रातून फैलावली जात होती. बाबू बीरेंद्रकुमार घोष वगैरे बंगाली तरुण तिची गुप्त संघटना करीत होते १९०८ च्या एप्रिल महिन्यांत बंगालमध्यें पहिला बॉंब उडाला आणि याच प्रकरणावर लिहिलेल्या केसरींतील लेखांबद्दल लो टिळकाना शिक्षा ठोठावण्यांत आली. १९०८ पासून दोनतीन वर्षे एका बाजूस गुप्त कटवाले आणि दुसऱ्या बाजूस सरकार यांच्या दहशतवादातील झटापटी चालू होत्या. मध्यंतरीं लॉर्ड मोर्ले यानीं दिलेल्या सुधारणा स्वीकारून नेमस्त पक्षाची राष्ट्रसभा असहाय्यतेने हा देखावा पहात होती, आणि शांततारक्षणाच्या कामीं ना गोखले यांच्यासारखे पुढारी सरकाराशीं सहकार्य करीत होते. सरकार राष्ट्रीय पुढाऱ्याकडून शाततारक्षणाच्या कार्यासाठीं दहशत दाखवून सहकार्याची मागणी करीत होतें, आणि बाबू अरविंद घोष यांच्यासारखे कांहीं पुढारी तुम्ही आम्हांस नागरिकत्वाचे मूलभूत हक्क देत नाहीं व स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवीत नाहीं, तोपर्यंत तुम्हांस अशा प्रकारचें सहकार्य लोकाचे पुढारी देऊ शकणार नाहींत, असे बोलत व लिहीत होते

या वेळच्या सुमाराचे बाबू अरविंद घोष यांच्या भाषणांतील पुढील दोन उतारे वाचल्यास सरकार, राष्ट्रीय पक्ष आणि प्रागतिक पक्ष याच्या धोरणांची व वृत्तींची बरीच कल्पना येऊ शकते. कलकत्त्यांतील कॉलेज स्क्वेअरमध्यें झालेल्या भाषणांत अरविंद बाबू म्हणतात: "या प्रातातील कायदेमंडळापुढें नुकतेंच ले. गव्हर्नरांचे एक भाषण झालें आहे हें भाषण अत्यंत आश्चर्यकारक असून अशा मोठ्या जागेवरील अधिकाऱ्याने ते करावे हे दुर्दैव होय. लंडनमध्ये झालेल्या कांहीं खुनांसंबंधीं त्यांनीं तें भाषण केलें आहे या गुन्ह्यांची चौकशी अद्यापि कोर्टांत चालू आहे

अशा वेळीं लंडनमधील एका व्यक्तीनें केलेल्या गुन्ह्याशीं सर्व राष्ट्राचा संबंध जोडून व्यवहारतः सर्व राष्ट्रास त्याबद्दल जबाबदार धरण्यासारखी वृत्ति स्वीकारून बंगालच्या ले. गव्हर्नरांनीं कायदेमंडळांत भाषण करण्यास हा काळ योग्य होता काय ? इतकेंच नाहीं, तर अशा कृत्याचा पुष्कळ निषेध या देशांत झाला असला तरी तो अद्यापि पुरेसा झालेला नाहीं, असेहि त्यानीं बोलून दाखविले ते आमच्यापासून आणखीहि एका गोष्टीची अपेक्षा करतात त्याना आमचे सहकार्य हवे आहे; त्यांना सर्व समाजाचे सहकार्य पाहिजे आहे. या विनतीबरोबर त्यानी अशी एक दहशतहि दिली आहे, कीं हें सहकार्य जर मिळाले नाहीं तर असे उपाय योजावे लागतील, कीं ज्या वेळीं अपराधी आणि अनपराधी याच्यातील सूक्ष्म भेद करण्यास अवकाश राहणार नाहीं ! केवळ अशा गुन्ह्याचा आम्हीं निषेध केला व त्यापासून आम्ही अलिप्त राहिलों तर तेवढ्यानें त्याचे समाधान होत नाहीं. त्याना आमचें सहकार्य हवे आहे. त्यांनीं ही मागणी करताना जी दहशत दिली आहे ती अमलात आणण्यापूर्वी त्याना कोणत्या प्रकारचे सहकार्य हवें आहे, हें तरी त्यानीं स्पष्टपणें सागणे अवश्य आहे अलीकडे अधिक व्यापक अर्थाने सहकार्याची भाषा ऐकू येत आहे सद्गृहस्थहो, आम्ही स्वराज्याची मागणी करणारे लोक आहो, आमच्यावर जें सरकार राज्य करीत आहे त्याच्याशीं आमचा कोणताहि संबध नसून आमचें त्याच्यावर मुळींच नियत्रण नाहीं, असलें सरकार आमच्यापासून कोणत्या सहकार्याची अपेक्षा करू शकेल ? आम्ही कायदे पाळावे, आणि कायदा, सुव्यवस्था व शातता राखण्याच्या कामीं त्यांच्याशीं सहकार्य करावें एवढीच त्याना मागणी करता येईल याहून अधिक सहकार्याची ते आमच्या-कडून कोणती अपेक्षा करू शकतील ? ले गव्हर्नरांनीं ज्या गोष्टींचा उल्लेख केला आहे, त्या बाबतींतहि आमच्यासारख्या परिस्थितींतील लोक कोणती मदत देऊ शकतील हें आम्हास समजू शकत नाहीं तरीहि मी एक सूचना करू शकतो असे दुर्दैवी प्रकार थाबविण्याचा एकच मार्ग आहे असें मला वाटते. श्री गोखले यांनी नुकतेच पुण्यांत दिलेलें एक व्याख्यान उदाहरणादाखल बगालच्या गव्हर्नरानीं दिले आहे या भाषणांत श्री गोखले म्हणतात, कीं कोणताहि शहाणा मनुष्य स्वातंत्र्याचें ध्येय स्वीकारू शकत नाहीं ! ते म्हणतात, स्वातत्र्याची प्राप्ति शाततेच्या मार्गानें अशक्य आहे. जे लोक नि.शस्त्र प्रतिकाराचा शांततेचा मार्ग पुरस्कारीत आहेत, ते भ्याड आहेत व ते आपल्या अंतःकरणांतील विचार बोलून दाखवीत नाहींत.. .. श्री. गोखले यानीं आपल्या भाषणात जे तत्त्व गोविले आहे तेच फार भयंकर आहे.. श्री गोखले याना माहीत असावयास हवे, कीं ज्या ध्येयाविरुद्ध त्यांनीं हाकाटी चालविली आहे ते ध्येय हजारो लोकांच्या अंतःकरणांत खोल बद्धमूल झालेलें आहे व ते खणून काढता येणार नाहीं ज्या उत्साही अंतःकरणांत हें स्वातत्र्याचें ध्येय रुजलें आहे व त्याच्यासाठीं प्रयत्न करण्याचा ज्यांनीं निश्चय केला आहे त्यांना ते सांगत आहेत, कीं तुमचें ध्येय अत्याचारी मार्गाखेरीज प्राप्त होणार नाहीं जर कोणतें

तत्त्व भयकर असेल किंवा जर कोणता एकादा उपदेशक देशांतील शाततेला धोका आणतो असें म्हणावयाचें असेल, तर श्री गोखले हेच तो उपदेशक होत आम्ही लोकांना सांगतों, कीं स्वातंत्र्याचें ध्येय कोणत्याहि स्वरूपांत प्राप्त करून घ्यावयाचे असेल तर त्याला एक शाततेचा मार्ग आहे आम्ही म्हणतों, कीं स्वावलबनानें निःशस्त्र प्रतिकारानें आम्हांस तें प्राप्त होईल. आम्हाला असें सांगण्यांत येतें, कीं निःशस्त्र प्रतिकाराचा उपदेश करून तुम्ही लोकांना कायदे मोडण्यास, शांततेचा भंग करण्यास उत्तेजन देता व अत्याचारास व बडास प्रवृत्त करतां. पण वस्तुस्थिति याच्या अगदीं विरुद्ध आहे अत्याचाराचा अवलब न करतां आणि कायद्याच्या राज्यास धक्का न लावता आपल्या न्याय्य आकाक्षा तृप्त करण्याचा एकच मार्ग निःशस्त्र प्रतिकाराच्या स्वरूपांत आम्ही लोकांस दाखवून देत आहोत शातता व सुव्यवस्था-रक्षणाच्या कामीं आम्ही या एकाच मार्गानें सहकार्य करू शकतो बगालच्या ले गव्हर्नराकडून अथवा या देशातील सरकारकडून प्रतियोगी दृष्टीनें आम्ही ज्या सहकार्याची अपेक्षा करतो, ते एवढेच, कीं त्यानीं सभास्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य आणि संघस्वातंत्र्य याना मान्यता द्यावी जर एवढें सहकार्य त्यानीं आमच्याशीं केले तर आम्ही त्यास अशी हमी देऊं शकतो, कीं ही चळवळ शाततेच्याच मार्गांनीं चालत राहील, आणि ज्या गोष्टींचा त्याना आज त्रास होत आहे त्या कायमच्या नाहींशा होतील."*

देशांतील प्रस्थापित राजसत्तेने नागरिकाचे मूलभूत हक्क रक्षण केले असता लोकांतील स्वातंत्र्यभावनेनें कोणतेंहि स्वरूप धारण केलें, तरी तिला निःशस्त्र क्रातीच्या मार्गाने कार्य करिता येत असल्यानें सामान्यतः त्याच मार्गाचे अवलबन लोक करितात आणि देशांतील शांततेचा भग न करिता त्याना आपली स्वातंत्र्याची आकांक्षा तृप्त करून घेता येते परतु प्रस्थापित सरकारने या नागरिक-स्वातंत्र्यावर गदा घालून अत्याचाराचें धोरण अवलबिलें कीं लोकातहि अत्याचाराची प्रवृत्ति वाढते आणि जी स्वातंत्र्याची भावना दडपून टाकण्यासाठीं सरकार या अत्याचारी धोरणाचा अवलब करीत असते ती स्वातंत्र्याची भावना नष्ट तर होतच नाहीं, उलट तिला अत्याचारी स्वरूप प्राप्त होऊन राज्यकर्ते व प्रजाजन या दोहोंसहि अवन्वित कष्ट सहन करावे लागतात, व कदाचित् तें सरकार उलथून पडते किंवा राज्यकर्ते व प्रजाजन या दोघाचाहि नाश करणारी अराजकता माजून राहते. यासाठीं लोकात जागृत झालेली स्वातंत्र्याची भावना दडपून टाकण्याचे दडपशाहीचे धोरण राज्यकर्त्यांनीं न स्वीकारितां नागरिकत्वाचे हक्क सरक्षण करून तिला अनत्याचारी, निःशस्त्र क्रातीचा मार्ग मोकळा करून द्यावा हेंच उभयपक्षीं हितावह व श्रेयस्कर आहे. लोकांचे स्वातंत्र्यवादी पुढारी कोणत्याहि सरकारशीं याच शर्तीवर सहकार्य करू शकतात; याच्या उलट, स्वातंत्र्याची भावना दडपून टाकण्याच्या कामीं लोक-नायकानीं सरकारशीं सहकार्य करणें हें परिणामीं घातक असून तत्त्वभ्रष्टतेचे लक्षण

* Speeches of Aurobindo Ghose, Page 189-98

आहे, असा बाबू अरविंद घोष यांच्या वरील भाषणाचा आशय आहे; व तर्कशास्त्र, नीतिशास्त्र व सुसंस्कृत राज्यशास्त्र यांपैकीं कोणत्याहि दृष्टीनें त्या युक्तिवादाला खोडून काढणें अशक्य आहे तथापि सरकारने हें सहकार्य देण्याचें नाकारलें व दडपशाहीचें अत्याचारी धोरण स्वीकारिलें, तरी ही दडपशाही किंवा हे दहशतवादी धोरण यशस्वी होणे शक्य नाहीं व तें का शक्य नाहीं याचे मुद्देसूद विवेचन 'वन्दे मातरम्' मध्यें 'दडपशाहीचें नीतिशास्त्र' (Ethics of Repression) या लेखात पुढील-प्रमाणें करण्यात आलेलें आहे: ". सध्याच्या परिस्थितीला निर्भेळ किंवा सामिश्र दडपशाहीच्या धोरणानेच तोड देण्याचा जे प्रयत्न करीत आहेत, ते एक गोष्ट विसरतात असें स्पष्ट दिसते ती गोष्ट म्हणजे जो कायदा किंवा जें धोरण एखाद्या समाजास लागू करावयाचे त्यास त्या समाजाचा नैतिक पाठिंबा असल्याखेरीज, काहीं अपवादात्मक परिस्थिति सोडल्यास, ते यशस्वी होऊ शकत नाहीं हा नैतिक पाठिंबा सक्रिय असण्याची जरुरी नाहीं. तो विरोधाच्या अभावरूपानें असला तरी चालेल परतु तो कोणत्याहि स्वरूपात असला तरी प्रत्येक कायद्याच्या अथवा धोरणाच्या यशस्वितेस समाजाच्या या नैतिक पाठिंब्याची निरपवाद आवश्यकता असते. आमचें सरकार किंवा सध्याच्या त्यांच्या दडपशाहीच्या धोरणाला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष साहाय्य करणारे आमचे देशबाधव यानीं ह्या साऱ्या प्रश्नाचा विचार केला आहे काय? ......आम्ही हें कबूल करतों, कीं सरकारला ह्या दडपशाहीच्या धोरणानें लोकाना दहशत बसविता आली, तरीहि ते यशस्वी होऊं शकेल पण प्रश्न असा आहे, कीं तें लोकाचा इतका अधःपात करूं शकेल काय? हिंदुस्थानातील असंतुष्ट व राजद्रोही अन्तःकरणात ते दहशत निर्माण करू शकेल काय? लॉर्ड मोर्ले, मिन्टो व त्याना या धोरणात उचलून धरणारे हिंदी, ॲग्लो-इडियन व ब्रिटिश गृहस्थ यानीं ह्या प्रश्नाचा विचार केला आहे काय? कारण हें नेहमीं लक्षात ठेविले पाहिजे, कीं दडपशाहीच्या कडक उपायानीं जनतेच्या अन्तःकरणांत दहशत उत्पन्न करण्याचा प्रयत्न करणें हा विस्तवाशीं खेळ आहे. प्रेमानें प्रेमाची वृद्धि होते, विश्वासाच्या पोटीं विश्वास जन्मतो, समंजसपणानें समजसपणाला चालना मिळते आणि सहानुभूति सहानुभूतीला जागृत करते याच्या उलट, द्वेषानें द्वेष पसरतो, संशयानें सशय जागृत होतो, दहशतवादाने दहशतवाद निर्माण होतो. आजपर्यंत इंग्लंडचें हिंदुस्थानांतील राज्य नैतिक बलावर आधारलेलें होतें; त्याला मोह म्हणा, श्रेष्ठ सस्कृति म्हणा, श्रेष्ठ बुद्धिमत्ता म्हणा किंवा ब्रिटिशाचे श्रेष्ठ चारित्र्य म्हणा; त्याला काहींहि नांव दिलें तरी त्याचें स्वरूप नैतिक बलाचेंच होय. याच्या पाठीमागें शस्त्रबल होतें हे आम्हांस मान्य आहे, पण तें उघडपणें कधींच योजिण्यांत येत नसे अथवा क्वचितच योजण्यांत येई. त्याच्या आवश्यकतेची अथवा उदार धोरणाची लोकांना कळत अगर नकळत जाणीव होती अशा प्रकारचा लोकाचा नैतिक पाठिंबा ब्रिटिश राज्याला होता म्हणूनच बंडाच्या वेळीं केलेल्या भयंकर दडपशाहीविरुद्ध लोकातील

नैतिक भावनेनें विशेषसें बंड केले नाहीं. ही दडपशाही ज्या लोकांवर करण्यांत आली ते परकयांचे नोकर होते, त्यांनीं परकयांचें निमक खाल्लेलें होतें, आणि जुनीं राज्यें जिकण्यास त्यांनींच परकीयाना मदत केली होती आणि म्हणून पैशा-साठीं लढणाऱ्या या लोकांबद्दल सामान्य लोकांत आदरभाव नव्हता. बंडाच्या वेळीं केलेल्या दडपशाहीचा परिणाम सामान्य लोकांच्या मनावर विशेष झाला नाहीं, कारण सामान्य लोक त्या वेळीं राजद्रोही बनले नव्हते. राजद्रोही बनलेला वर्ग केवळ हिंदी लष्कर आणि वस्तुतः त्यापैकीं एक भागच होता बडवाल्याबद्दल सामान्य लोकात प्रेम नव्हते, लोकांस देण्यास त्याच्यापाशीं कांहीं सदेश नव्हता आज ज्याना जहाल पुढारी म्हणतात, त्याची जुन्या बडवाल्यांशीं तुलना करतां येणार नाहीं ते लोका-पासून अलग राहिलेले नाहींत. राष्ट्रीय चळवळ ही एका वर्गाची अथवा कोणत्याहि अर्थानें एका विभागाची चळवळ नाहीं बाळ गंगाधर टिळक अथवा चिदबरम् पिले हे आमच्या राष्ट्रीय जीवनातील अपवाद नव्हेत सर्व देशातील सामान्य जनतेचा जो दर्या खवळलेला आहे, त्यांतीलच त्या भरतीच्या लाटा आहेत सध्यांचा असतोष त्यानीं निर्माण केलेला नसून वस्तुतः या असतोषानेच त्याना निर्माण केलेलें आहे व्यापकत्वानें लोकात सचार करणाऱ्या महत्त्वाकाक्षा व विचार याचीं तीं मूर्त प्रतीकें आहेत त्यांना दडपल्यानें हे विचार किवा आकांक्षा दुर्बल होणार नाहींत, तर त्या प्रबल होऊन खोल रुजतील सध्यांची मोहीम पाहून लोकांची अशी खात्री होईल, कीं हे पुढारी ज्या ध्येयाकरिता झगडत होते, त्यांची प्राप्ति होणें हिंदुस्थानात ब्रिटिश अमल आहे तोपर्यंत शक्य नाहीं बहुधा यामुळे देशातील जहाल लोक अधिक वाढतील आणि नेमस्त प्रचार समूळ नष्ट होईल"*

## हिंदी राष्ट्रवादाचा अवतार

आपण राज्यकर्त्यांना व देशातील प्रागतिक पक्षाला करीत असलेला हा उपदेश एक प्रकारे फुकट जाणार आहे, याची जाणीव अरविंदबाबूना १९०९ साली पूर्णपणे होऊ लागली होती हिंदुस्थानातील राष्ट्रवाद हा आपल्या साम्राज्यशाहीच्या मुळावरच आलेला आहे, याची बरोबर कल्पना ब्रिटिश राज्यकर्त्यांना येऊ लागली होती परतु त्याचें समाधान कसें करावे यासबधींचा योग्य सल्ला देण्याच्या कामीं प्रागतिक पक्षाचे पुढारी आपली नालायकी व्यक्त करीत होते याचे कारण या नव्या राष्ट्रशक्तीचे यथातथ्य स्वरूपच त्याना बरोबर आकलन होत नव्हते. त्याची अशी भावना होती, कीं लॉर्ड कर्झन यांच्या अरेरावी व जुलमी कारकीर्दीमुळे निर्माण झालेल्या निराशेचें एक क्षणिक फल म्हणूनच हे जहाल राजकारण होय, आणि ब्रिटिश सरकारनें थोड्या सुधारणा देऊन दडपशाही बंद केली व थोडे उदार धोरण स्वीकारिले, म्हणजे हे राष्ट्रीय जहाल राजकारण आपोआप मरून जाईल. पण

* Selections from Bande Mataram, P 72-73

हा त्याचा शुद्ध भ्रम होता, हें बाबू अरविंद घोष जाणत होते. त्यानीं हिंदुस्थानांत जन्मास आलेल्या या राष्ट्रवादाचे स्वरूप आणि सामर्थ्य बरोबर ओळखिलें होतें; या राष्ट्रवादांत आणि ब्रिटिश साम्राज्यशाहींत एक प्रकारचा निर्वाणीचा लढा लवकरच सुरू होऊन देशात सर्वत्र अराजकता माजून राहणार हें त्यांना स्पष्ट दिसत होते. हिंदी राष्ट्रवादाचे स्वरूप सागताना ते लिहितात : " निराशेच्या कुशींत वाढलेलें आणि सर बॅम्फील्ड यांच्या सूतिकाकर्माने जन्मास आलेले राष्ट्रवाद हे एक लॉर्ड कर्झन यांचें अपत्य आहे, अशी त्याच्या जन्माची दतकथा नेमस्त लोक सांगत असतात, पण राष्ट्रवाद हा निराशेतून जन्मास आलेला संदेश कधींच नव्हता व जुलुमातूनहि त्याचा जन्म झालेला नाहीं लॉर्ड कर्झन यानीं प्रतिगामी धोरण स्वीकारल्यामुळे काहीं लोकाचा इग्लडवरील विश्वास उडाला व म्हणून ते जहाल झाले ही खरी हकिकत नव्हे म्हणून नोकरशाहीच्या कोपमुद्रेतून जन्मास आलेलें हें अपत्य तिनें आनदी मुद्रा धारण केली असता मरून जाईल, असे कौन्सिलात बोलणे हा एक भ्रामक राजकीय युक्तिवाद आहे लॉर्ड कर्झन आणि फुल्लर याच्या आगमनापूर्वी अनेक वर्षे राष्ट्रसभा उदार धोरणाच्या पण थोड्या दोषयुक्त ब्रिटिश सुराज्याचे पोवाडे गात होती, ती राजनिष्ठेचे मंत्र म्हणत होती आणि ब्रिटिश राज्यापासून होणाऱ्या लाभाचे वर्णन करीत होती, त्याच वेळीं राष्ट्रवादाचा जन्म झाला होता; व त्याची शक्ति हळूहळू वृद्धिंगत होत होती याचा जन्म राष्ट्रसभेच्या मंडपात झालेला नाहीं, तो मुबईच्या प्रेसिडेन्सी असोसिएशनमध्ये झालेला नाहीं, शहाणे अर्थशास्त्रज्ञ व विद्वान् सुधारक याच्या सघातूनहि तो झालेला नाहीं. त्याचा जन्म श्रीकृष्णाप्रमाणें बदिखान्यात झालेला आहे देशातील अनियंत्रित पण उदार सुराज्याखालचा हिंदुस्थान हा ज्याच्या अंतःकरणाला तुरुगातील अंधारकोठडीप्रमाणें असह्य वाटत होता, त्याच्या अतःकरणात याचा जन्म झाला होता श्रीकृष्णाची वाढ ज्याप्रमाणें राजदरबारीं झाली नाहीं, किंवा ब्राह्मणांच्या पाठशाळेंत त्याचें ज्ञान वाढले नाहीं, तर तुच्छ गणलेल्या अशा दरिद्री आणि अज्ञान जनतेच्या अज्ञात घरांत त्याची वाढ झाली, त्याचप्रमाणे हा राष्ट्रवाद सन्याशाच्या गुहेंत, फकिराच्या वेषात, तरुण लोकांच्या व मुलाच्या अंतःकरणात, ज्याना इंग्रजी शब्दहि उच्चारता येत नसत, परतु ज्यांना आपल्या मातृभूमीकरिता त्यागपूर्वक काम करावें असे वाटत होते, त्यांच्या अंतःकरणांत, ज्या सुशिक्षितांनीं हा मंत्र ऐकतांच संपत्तीचा आणि मानमरातबाचा त्याग करून लोकसेवेसाठीं आणि लोकजागृतीसाठीं देशसेवेचें व्रत अंगीकारिलें अशाच्या जीवनात या राष्ट्रवादाची वाढ हळूहळू झालेली आहे त्याच्याकडे कोणाचें लक्ष नव्हतें व त्यास कोणी जुमानीत नव्हतें पण योग्य वेळीं तो बगालमध्यें आला आणि हीच त्याची आविर्भूत होण्याची भूमि ठरली त्याच्यावर जुलूम होणें अपरिहार्य होते व ते अवश्यहि होतें. त्या जुलुमामुळेंच सर्व राष्ट्रानें त्याचा अंगीकार केला. पण त्या जुलुमाच्या पोटीं त्याचा जन्म

झालेला नाहीं. कसानें यादवांचा केलेला छळ किंवा त्याच्या केलेल्या कत्तली यातून श्रीकृष्णाचा जन्म झालेला नाहीं; पण त्याचीहि आवश्यकता होतीच कारण त्यामुळेच मथुरेतील लोकांची आपल्या मुक्तिदात्याकडे दृष्टि लागून राहिली, व तो जेव्हां आला तेव्हां त्यानीं त्याचें स्वागत केलें सौम्य धोरण स्वीकारल्याने राष्ट्रवादाचा अंत होईल अशी आशा करणें म्हणजे या नव्या शक्तीच्या जन्मासंबंधीं, तिच्या स्वरूपासंबधीं व कार्यासंबधीं अज्ञान प्रकट करणेच होय. इंग्लिश लोकांची मात्र अशी कधींहि खात्री होणार नाहीं त्यांना माहीत आहे, कीं आज ज्याला जहालवाद म्हणून क्षुद्र गणण्यांत येत आहे, तो वस्तुतः राष्ट्रधर्म आहे आणि असा राष्ट्रधर्म सौम्य धोरणाने कधींच मरत नाहीं त्याला दिलेल्या सुधारणाचा उपयोग, तो पुढील लढ्यात, सपूर्ण विजय प्राप्त करून आपले निर्मळ प्रभुत्व प्रस्थापित करण्यासाठीं, हातीं पडलेल्या नव्या शस्त्राप्रमाणें करील हा राष्ट्रधर्म म्हणजे एक अवतार आहे व त्याचा अंत होणार नाहीं. ती एक परमात्म्यानें योजिलेली शक्ति आहे, आणि ती आपले ईश्वरनियोजित कार्य केल्याखेरीज विश्वांतील चिच्छक्तींत—जिच्यातून तिचा उगम झाला त्या चिच्छक्तींत—जाऊन पुनः विलीन होणार नाहीं "*

या अप्रतिकार्य राष्ट्रशक्तीचें खरे स्वरूप प्रागतिकांना आकलन होत नाहीं, सत्ताधारी ब्रिटिश मुत्सद्दी त्याचा अंत करण्याचा चंग बाधून बसले आहेत आणि तिचा उत्साह तर एकसारखा वाढत आहे अशा परिस्थितींत काहीं काळ तरी देशांत जुलुमी साम्राज्यशाही व क्रातिकारक राष्ट्रवाद यांच्यांत एक प्रकारची सशस्त्र झटापट होण्याचे टाळणे बाबू अरविंद घोष याना अशक्यप्राय वाटत होतें व अशा सशस्त्र झटापटींत राष्ट्रवाद तात्काल विजयी होईल अशीहि पण त्याना आशा नव्हती. राष्ट्रवाद हा निःशस्त्र प्रतिकाराच्या रणक्षेत्रात दुर्धर्ष होईल, अशी त्यांच्या बुद्धीची खात्री होती तथापि त्याला नि.शस्त्र रणक्षेत्रावर कसे ठेवावे, हेच त्याना एक गूढ पडले होतें. या कामीं सरकार व प्रागतिक मुत्सद्दी त्याना यत्किंचितहि साहाय्य करण्यास तयार नव्हते सरकार तर इतर राष्ट्रीय पुढाऱ्याप्रमाणे लवकरच त्यांना हद्दपार करणार, अशी बातमीहि त्यांच्या कानावर येत होती अशा परिस्थितींत आपल्या बुद्धीला पटलेला निःशस्त्र क्रांतीचा प्रयोग यशस्वी करण्यास व राष्ट्राकडून त्याचें आचरण करवून घेण्यास आपले नेतृत्व पुरें पडत नाहीं व या कार्याची पूर्तता आपल्या हातून या वेळी तरी घडत नाहीं, हें जाणून त्यानीं कांहीं काल देशत्याग करून योगमार्गानें आपलें कार्य करण्याची शक्ति प्राप्त करून घेण्याचे ठरविले ! ब्रिटिश हिंदुस्थानचा त्याग करून ते पॉंडिचरीस जाऊन ध्यानधारणा करून राहिले. मात्र त्यांनीं जातांना १९०९ च्या जुलैमध्ये आपल्या देशबांधवांस एक अखेरचे पत्र लिहून ठेविलें आहे; त्यांतील महत्त्वाचा भाग पुढे देऊन हें प्रकरण आम्ही पुरें करतों.

* Selections from Bande Mataram, P. 163-169.

## अरविंदांचा राजकीय संदेश

" आज हिंदुस्थानात आपले कर्तव्य करणाऱ्या सार्वजनिक मनुष्याची स्थिति इतकी बिकट झाली आहे, कीं त्याला उद्यांची शाश्वती वाटू शकत नाहीं मला हद्दपार करण्याची दाट वदता उठलेली आहे अशा परिस्थितींत माझ्या देशबांधवाना आणि विशेषतः राष्ट्रीय पक्षाच्या तत्त्वांचा ज्यानीं स्वीकार केला आहे, अशा लोकांना उद्देशून सद्य.स्थितींतील आवश्यक कार्य आणि भावी धोरण ह्यासबधीं मी हे पत्र लिहीत आहें. मला जर हद्दपार करण्यांत आले, तर आपण कोणत्या मार्गाने कार्य करावे याबद्दल ज्याना शका वाटत असेल, त्याना हे मार्गदर्शक होईल आणि मी जर तिकडून परत आलो नाहीं, तर माझ्या देशबाधवाना लिहिलेलें ते एक अखेरचे मृत्युपत्रच होईल.

" राष्ट्रीय पक्षाची परिस्थिति बिकट झाली आहे पण या परिस्थितींतहि कार्य चालू ठेवणे अशक्य नाहीं. या पक्षाच्या पुढाऱ्याना शिक्षा झाल्या आहेत, किंवा ते हद्दपार झाले आहेत म्हणून तो पक्ष मेलाच आहे अशी जी काहींची कल्पना आहे ती चुकीची आहे. केवळ वरवर दृष्टि देण्यामुळेंच ही चूक होत असते हा पक्ष जिवत आहे, आणि त्याची शक्ति व व्याप्ति याहि पूर्वीपेक्षां कमी झालेल्या नाहींत त्याला एका पुढाऱ्याची व धोरणाची आवश्यकता आहे धोरण त्याला सापडू शकेल, पण पुढारी मात्र केवळ परमेश्वरच पुरवू शकेल आपला परमेश्वर-नियोजित पुढारी येईपर्यंत आणि आपण परमेश्वरी शक्तीच्या आविष्काराचे साधन बनेपर्यंत सर्वच मोठ्या चळवळी थाबून रहात असतात नतर जेव्हा तो येतो, तेव्हांच त्या आपल्या कार्यांत विजयशाली होण्यास पुढे सरसावतात. आजपर्यंत ज्या लोकानीं या चळवळीचे नेतृत्व केले ते खरे वीर होते. त्याच्या अगीं श्रेष्ठ गुण होते त्याची प्रतिभा प्रभावी होती. इतर कोणत्याहि चळवळीचें नेतृत्व करण्यास लागणारे मोठेपण त्याच्या अगीं होते, पण या जगद्व्यापक क्रातींतील प्रमुख प्रवाहाचें अखेरपर्यंत नेतृत्व करण्यास त्याचीहि शक्ति पुरी पडली नाहीं म्हणून भावी कालाचा निर्धारक अशा राष्ट्रीय पक्षाने असा पुढारी पुढे येईपर्यंत आता वाटच पाहिली पाहिजे आपत्तींतहि त्याने शांत रहावें, पराभवांतहि आशा सोडू नये, परिणामीं आपणांस विजय मिळेल याबद्दल खात्री बाळगावी, आणि हिंदुस्थानच्या भावी पिढ्या आणि जगांतील इतर राष्ट्रें यासबंधींच्या आपल्या जबाबदारीसबंधीं नेहमीं जागरूक रहावें

" हा काळ येईपर्यंत धैर्यानें पण धिमेपणानें पावले टाकीत रहावे, अशी आजची परिस्थिति आहे. या परिस्थितींत आमचें बल नैतिक आहे, भौतिक नव्हे आपण जगण्याची आणि परिणामीं यशस्वी होण्याची आशा या नैतिक बलांतच आहे व त्यावरच आपण अवलंबून राहिलें पाहिजे. उतावीळपणानें अथवा धाष्टर्यानें ज्या क्षेत्रात आपण प्रबल आहों तें क्षेत्र सोडून ज्या क्षेत्रात आपण दुर्बल आहों त्या क्षेत्रावर

जाण्याचे साहस करूं नये स्वराज्य किंवा परकीय नियत्रणापासून निर्भेळ असें पूर्ण स्वातन्त्र्य, हे आमचें ध्येय आहे स्वावलंबन आणि निःशस्त्र प्रतिकार हीं आमचीं साधने आहेत आमच्या स्वराज्याच्या ध्येयांत इतर कोणत्याहि राष्ट्राच्या किंवा आमच्या देशावर राज्य करीत असलेल्या कायदेशीर सरकारच्या द्वेषाचा अतर्भाव होत नाहीं. या आकांक्षेत द्वेष आणि अत्याचार याचा अतर्भाव होणे अपरिहार्य आहे असे जे म्हणतात, ते खोटे बोलतात आमच्या देशभक्तीच्या ध्येयाचे अधिष्ठान प्रेम आणि बधुभाव हीं असून त्यांत मानवजातीच्या अंतिम ऐक्याचाहि अतर्भाव होतो. आमच्या हक्कासाठीं आम्ही लढत असता जे चुकीने हक्क देण्याचे नाकारीत आहेत, त्याचा द्वेष करण्याची गरज नाहीं फक्त प्रयत्न करणें, क्लेश भोगणे, कोणताहि वैयक्तिक विचार मनांत न आणता सत्य बोलणें आणि प्रगतिधर्माच्या आड येणाऱ्या सत्तेला उलथून आमची सत्ता प्रस्थापित करण्यासाठीं प्रत्येक कायदेशीर दडपणाचें आणि नैतिक बलाचे साधन उपयोगात आणणें, याचा मात्र अतर्भाव यात होतो.

"सुरतेस झालेली आपापसांतील यादवी आणि त्यानतर थोड्याच दिवसांत सुरू झालेले दडपशाहीचे धोरण, त्यामुळें आमच्या सघटनाचा झालेला विनाश, आणि सरकारी नोकरांनी स्वदेशीच्या कार्यकर्त्यांमध्ये व त्यांच्या सहकाऱ्यांत निर्माण केलेली दहशत, या गोष्टींमुळे मात्र आमच्या प्रगतीला गभीर स्वरूपाचे अडथळे निर्माण झाले असून आमच्या आशाची सफलता दूरच्या भविष्यकालावर लोटली गेली आहे" यानंतर राष्ट्रीय पक्ष व प्रागतिक पक्ष याच्यात समेट घडवून आणण्याच्या मार्गासबधीं ते म्हणतात. "स्वराज्याच्या ठरावात वसाहतीच्या धर्तीवरचें स्वराज्य याऐवजी 'पूर्ण स्वराज्य' हे शब्द योजिले असता हा वाद मिटू शकेल निःशस्त्र प्रतिकारासबधींचा वाद बहिष्काराच्या ठरावासंबधीं आहे या बाबतींत राष्ट्रीय पक्ष आपल्या तत्त्वाचा त्याग करू शकणार नाहीं, व नेमस्तातीलहि पुष्कळ लोकांचा पाठिबा या बाबतींत त्याला आहे पण या प्रश्नाचाहि निकाल स्वतत्रपणे निवडलेल्या राष्ट्रसभेच्या बहुमताकडून करून घेण्यास त्याची तयारी आहे मात्र विषय-नियामक मडळ ह्याचाच निर्णय अतिम समजण्यास तो तयार नाहीं" यानंतर आपण असहकाराचे जे धोरण स्वीकारिले आहे ते पूर्ण स्वराज्य प्राप्त होईपर्यंत सतत आचरावयाचे असा अर्थ न करितां जोपर्यंत सत्ता नाहीं तोंपर्यंत सहकार्य नाहीं, असा अर्थ करावा आणि विशिष्ट क्षेत्रांत पूर्ण सत्ता प्राप्त झाल्यास तेवढ्यापुते असहकाराचे धोरण सोडून ती सत्ता काबीज करून पुढील लढा सुरू ठेवावा, असे त्यानीं म्हटलें आहे "प्रागतिकांचा व राष्ट्रीय पक्षाचा जो मतभेद आहे तो हाच आहे, कीं कोणत्याहि क्षुद्र व भ्रामक सुधारणा दिल्या तरी त्यांचा स्वीकार करून आपले ध्येय सोडण्यास व त्यामुळे आपणांस खरे हक्क प्राप्त झाले अशी लोकाची समजूत करून देण्यास राष्ट्रीय पक्ष तयार नाहीं."§

§ Speeches of Aurobindo Ghose, Appendix

हे पत्र लिहिल्यानतर थोड्याच दिवसांत बाबू अरविंद घोष हे पॉंडिचरीस जाऊन राहिले त्यानीं भविष्य केल्याप्रमाणे त्यांच्या गैरहजेरींत निदान बगालमध्यें तरी नेमस्त राजकारण कायमचें मरून गेलें तरुण बगाल बहुतेक सशस्त्र क्राति-वादीच बनला व हा सशस्त्र क्रांतिवाद तेथे अखेरपर्यंत जिवत होता. हा क्रातिवाद म्हणजे केवळ अधिकाऱ्याचे व्यक्तिशः खून पाडणारा दहशतवाद नव्हे व तसा त्याचा मूळ उद्देश नाहीं, असे वीरेंद्रकुमार यानीं आपल्या कोर्टांतील जबानींत सागितले होते. ते म्हणतात : "We never believed that political murder will bring independence. We do it because we believe the people want it."* या क्रातिकारक संस्था रशिया व इटली या देशातील गुप्तकटाच्या धर्तीवर उभारलेल्या होत्या

महात्मा गांधींनीं हिंदी राजकारणाचीं सूत्रे आपल्या हातीं घेतल्यानंतर बाबू अरविंद घोष, बिपिनचद्र पाल, लो. टिळक वगैरे पुढाऱ्यानीं १९०५ साली सुरू केलेल्या बहिष्कारयोगाचें पुनरुज्जीवन असहकारयोगाच्या रूपाने केलें त्यामुळें बंगालमध्यें रुजलेला सशस्त्र क्रातिवाद सर्वत्र फैलावला नाहीं

## १०

# राष्ट्रीय आपद्धर्म

ईसवी सन १९०९ सालीं हिंदी राज्यघटनेतील लॉर्ड मोर्ले याच्या सुधारणा आस्ति-त्वांत आल्या १९१० सालीं लॉर्ड मिन्टो हे सेवानिवृत्त झाले व लॉर्ड हार्डिज हे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय म्हणून येथे येऊन दाखल झाले. या वेळेपासून हिंदी राजकारणांत एक नवे युग सुरू झालें व तें थोड्याफार फरकानें १९२० पर्यंत चालू होते असें म्हणण्यास हरकत नाहीं हा दहा वर्षांचा काळ म्हणजे हिंदी राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें एक आपत्कालच होय मोर्ले मिन्टो-सुधारणांचा काळ म्हणून स्थूल मानाने याचे वर्णन करण्यात येत असते मोर्ले-मिन्टो-सुधारणा या देशातील राष्ट्रीय पक्षाने मान्य केलेल्या सुधारणा नव्हत्या त्या केवळ प्रागतिक पक्षाने मान्य केलेल्या असून त्या पक्षासहि त्या सर्वस्वीं समाधानकारक वाटत नव्हत्या शिवाय, बंगालची फाळणी रद्द झाल्याखेरीज आपण या सुधारणांचा स्वीकार करणार नाहीं व नव्या कायदेमंडळांतहि जाणार नाहीं, असे बाबू सुरेंद्रनाथप्रभृति नेमस्त बंगाली पुढाऱ्यांचेहि धोरण होते राष्ट्रीय पक्ष दडपशाहीच्या वरवंट्याखालीं जवळजवळ चुरडून टाकण्यांत आलेला होता व लो. टिळक अद्यापि मडालेच्या तुरुगात बंदिवास भोगीत होते,

* Quoted in Sedition Committee Report

देशांतील उत्साही तरुण सशस्त्र क्रान्तिवादी बनून काहीं अत्याचार करीत होते व इतर काहीं अमेरिका, युरोप वगैरे खडांत जाऊन कारस्थाने रचीत बसले होते या वेळीं बगाल व महाराष्ट्र यांच्याप्रमाणे पजाबमध्येंहि हरदयाळ याच्या नेतृत्वाखालीं एक सशस्त्र क्रान्तिपक्ष अस्तित्वांत येऊन त्याने अमेरिकेत गधर (बड) हे नांव घेऊन काम चालविले होतें. पुढें या क्रातिकारक पक्षाचीं सूत्रे युरोपीय महायुद्धाच्या काळांत जर्मनीशीं गोविलीं गेलीं आणि रशियांतील राज्यक्रांतीनतर भाई मानवेंद्रनाथ रॉय वगैरे हिंदी कम्युनिस्टाचा रशियातील बोल्शेव्हिकाशीं सबध जडला पण हिंदुस्थानात कम्युनिस्टाचा क्रातिवाद १९२२ पर्यंतच्या काळात पक्षरूपाने अस्तित्वात आला नव्हता तसेच इ स १९१० ते १९२० या काळात नि.शस्त्र क्रांतिवादी राष्ट्रीय पक्षहि एक प्रकारच्या प्रच्छन्न स्वरूपांतच कार्य करीत होता.

## केळकर यांच्या कार्याचें महत्त्व

या कालविभागाचे पुनः पाच पाच वर्षांचे दोन खड पडतात १९१० ते १९१५ या कालात दोन्ही प्रकारचे क्रांतिवाद किंवा राष्ट्रवाद केवळ जीव धरून आपले सरक्षण करण्याचेच धोरण अवलबीत होते १९१४ सालच्या अखेरीस युरोपीय महायुद्ध सुरू झालें, यामुळे या दोन्ही प्रकारच्या राष्ट्रवादास आपलें सामर्थ्य थोडेंफार वृद्धिगत करण्याची संधि सांपडली. १९१४ च्या जूनमध्ये लो टिळक हे मंडालेहून सुटून परत आले आणि त्यांनीं आपल्या राष्ट्रीय पक्षाचें बल सघटित करण्यास व वाढविण्यास सुरुवात केली या वेळेपर्यंत महाराष्ट्रांतील राष्ट्रीय पक्षास जिवत ठेविण्याचें कार्य श्री न. चिं केळकर हे ‘केसरी’तून करीत होते यानतर १९१५ पासून १९२० पर्यंतच्या काळात ह्या राष्ट्रीय पक्षाच्या सघटनेचे व सवर्धनाचें कार्य लो. टिळक यांनीं केले आणि प्रागतिकाची बनलेली राष्ट्रसभा आपल्या हातीं घेऊन म गाधींच्या निःशस्त्र क्रातिवादी भावी राजकारणास एक प्रभावी राष्ट्रीय सस्था तयार करून ठेविली मात्र १९०५ सालच्या बहिष्कारयोगाच्या क्रांतिवादी राजकारणाचे पुनरुज्जीवन त्याना या काळात करिता आले नाहीं हे कार्य पुढे महात्मा गाधींनीं १९२० सालीं केलें आणि १९०७ सालीं सुरतेस तुटलेली राष्ट्रीय राजकारणाची सांखळी पुन. जोडिली लोकमान्यांच्या बदिवासात महाराष्ट्रात ‘केसरी’ जिवंत ठेवण्याचें व त्यांच्या जहाल राजकारणाची स्मृति अखड ठेवण्याचे महत्त्वाचें कार्य श्री न चिं केळकर यांनीं केलेले आहे. या वेळीं राष्ट्र अगदीं विकलाग आणि असहाय होऊन पडलेले होते त्याच्या अंतःकरणांत जहाल, किंबहुना, क्रांतिवादी भावना जागृत होत्या, पण त्या कोणत्याहि प्रकारे कार्यप्रवण होण्याइतक्या प्रबल नव्हत्या जहाल भावनांचीं मनें मुकीं बनलीं होतीं अशा वेळीं या मुक्या मनातील भावना बोलून दाखविणें हेंहि एक महत्त्वाचे कार्य होते आणि ते करण्यास श्री. केळकर यांची लेखणी उपयोगी पडली. अशा आपत्कालांत चढाईचे धोरण स्वीकारणे शक्य

व इष्ट नव्हते त्या वेळीं लोकांच्या जहाल भावना जागृत ठेवावयाच्या, परंतु त्यांचा निःशस्त्र किंवा सशस्त्र कोणत्याच रूपांत आविष्कार होईल इतकया त्या तापूं द्यावयाच्या नाहींत, हे कार्य करण्यास श्री. केळकर यांची लेखणी व प्रकृति अत्यंत अनुरूप होती लो टिळक यांचा वर्धिष्णु क्रांतिवाद जेव्हां कायद्याचें बंधन उल्लघून निःशस्त्र प्रतिकाराच्या क्षेत्रांत प्रवेश करूं लागला आणि बंगालमधील आध्यात्मिक क्रांतिवादी योगी अरविंद घोष यांच्या सहकार्यासाठीं त्यांनीं नेमस्तांशीं भांडण करून राष्ट्रसभा दुभंगली तरी हरकत नाहीं, पण तिला मागे जाऊं द्यावयाचें नाहीं असें उग्र धोरण स्वीकारिलें, तेव्हा टिळकांचें ते तेजस्वी धोरण काहीं काल श्री केळकर यांना असह्य झालें. या वेळीं लोकमान्यांशीं त्यांचा प्रामाणिक मतभेद झाला सुरतेची कॉंग्रेस मोडल्यानंतर थोड्याच दिवसांत ती मोडण्यांत दोन्ही पक्ष थोडे थोडे दोषी आहेत अशा विचाराचा एक लेख सातारचे दादासाहेब करंदीकर यांनीं लिहिला व तो श्री केळकर यांनीं 'मराठ्या'त अग्रलेखाच्या जागीं छापला यानंतर धुळ्यास भरलेल्या प्रांतिक परिषदेंत लोकमान्यांनीं निर्भेळ स्वातंत्र्याचा पुरस्कार केला, या भाषणासहि आपण लिहिलेल्या टिळकचरित्रांत त्यांनी स्थळ दिलेलें नाहीं तसेंच लोकमान्यांनीं Tenets of the New Party या भाषणांत आपल्या पक्षास घालून दिलेलीं तत्त्वे हीं राष्ट्रीय पक्षाचीं मूलभूत तत्त्वें आहेत, असे त्यांना कधीं वाटले नाहीं या सुमारास त्यांचा लोकमान्यांच्याशीं इतका तीव्र विरोध होता, कीं ते त्यांचा पक्ष सोडून जातात कीं काय असे लोक म्हणत असत पण इतक्यांत लोकमान्यांचा बंदिवास सुरू होऊन राष्ट्रीय पक्षाच्या संरक्षणास साहाय्य करण्याची संधि त्यांना प्राप्त झाली या आपत्कालांत त्यांनीं बहिष्कारयोगाचें चढाऊ राजकारण सोडून दिलें आणि बदललेल्या परिस्थितीस अनुरूप असें मंद धोरण पुरस्कारिलें.

बाबू अरविंद घोष यांनीं देशत्याग करतांना लोकांस असे सांगितलेंच होतें, कीं आपल्या निःशस्त्र क्रांतीचें नेतृत्व करण्यास व ती सफल करण्यास योग्य असा अधिकारी नेता आज आपणापाशीं नाहीं देशांतील सामान्य पुढारी या महत्कार्यास समर्थ नव्हते अशा वेळीं आपलें सामर्थ्य ओळखून देशकार्य करीत राहणें यांतच खरी मुत्सद्देगिरी आहे, असे श्री केळकर यांचे मत होतें बहिष्कारयोगाचा एकसारखा जप करीत राहण्यापासून काहीं फायदा नाहीं, यापेक्षां जे कार्य आपल्या हाताशीं आहे तें करीत राहण्यातच व आपले सामर्थ्य ओळखून वागण्यांतच खरें देशहित आहे, असें ते प्रतिपादीत तशांत १९११ सालच्या अखेरीस दिल्ली-दरबार भरून पंचम जॉर्ज यांचा राज्याभिषेक-समारंभ हिंदुस्थानांत जाहीर करण्यांत आला या वेळीं बंगालची फाळणी रद्द करण्यांत आली आणि कलकत्त्याची राजधानी दिल्लीस नेण्यांत आली

याच सुमारास म्हणजे १९११ च्या ऑगस्टमध्ये लॉर्ड हार्डिंज यांनीं मोर्ले-मिंटो-सुधारणाचा विकास प्रांतिक स्वराज्यांत होणे अवश्य आहे, अशा प्रकारचा एक खलिता

विलायत-सरकारकडे पाठविला म्हणजे मोर्ले-मिंटो-सुधारणा ह्या अपुऱ्या असून त्याचे प्रांतिक स्वराज्यांत आज ना उद्यां रूपांतर करणे अवश्य आहे, असे सरकारी-रीत्याच जणुं काय मान्य करण्यांत आले ह्या सर्व घडामोडींमुळे बंगालमधील पुढारी बाबू सुरेंद्रनाथ, इतकेच नव्हे, तर बाबू बिपिनचंद्र पाल हेहि बरेच संतुष्ट झाले. लॉर्ड हार्डिंज यांच्यावर दिल्लींतील जाहीर प्रवेश समारंभाच्या मिरवणुकींतच कोणी तरी एक बॉंब टाकिला तथापि त्यांनीं त्यामुळे आपले माथे फिरू दिले नाहीं व दडपशाहीचें धोरण अवलंबिलें नाहीं, आणि लोकपक्षाशीं एकंदरींत समेटाचें व सामोपचाराचे धोरण स्वीकारिलें ना गोखले यांच्या नेमस्त राजकारणाच्या भरतीचा हा काळ होता दक्षिण आफ्रिकेतील हिंदी लोकांच्या सत्याग्रहाला पाठिंबा देण्याच्या कार्यांत ना गोखले व लॉर्ड हार्डिंज हे दोघेहि सहकार्याने भाग घेत होते. अशा वेळीं श्री केळकर यानीं बहिष्कारयोगाचे धोरण सोडले, तर ते आक्षेपार्ह ठरत नाहीं

१९१२ सालीं 'आमचे स्थानिक स्वराज्य' या विषयावर लिहिलेल्या लेखात ते म्हणतात : " बहिष्कार हे एक शस्त्र आहे, कोंडमारा झालेल्या निराश स्थितींतील मनुष्यास व राष्ट्रास बहिष्कार हे शस्त्र पुष्कळ वेळा चांगलेच उपयोगी पडते, व त्याचा उपयोग करावाहि पण बहिष्कार-शस्त्राचासुद्धा तीनत्रिकाळ, अष्टौप्रहर व बारामास उपयोग करून चालेल कीं काय, हा एक प्रश्नच आहे. कारण साम, दाम, दंड व भेद हे उपाय सरकारशी चालणाऱ्या सनदशीर युद्धात राष्ट्राने निरनिराळ्या अनुपानानेंच योजावयाचे असतात वंगभंग अस्तित्वांत असतां बंगालने व त्याच्या समर्थनार्थ इतर प्रांतानीं बहिष्कार उचलला होता व तो कायदेशीर होता असे सर्व-पक्षीय अशा कलकत्त्याच्या १९०६ सालच्या राष्ट्रीय सभेने ठरविले होते तसेच वंगभंगासारखा तीक्ष्ण राष्ट्रीय चळवळीचा प्रश्न उपस्थित झाला असता फिरून बहिष्काराच्या कायदेशीर हत्याराचे अवलंबन पुढेमागे हिंदी राष्ट्र पुनः करणार नाहीं हे तरी कोणीं सांगावे ? पण आज वंगभंग रद्द झाला असतांहि स्वराज्याचे आमचे गाऱ्हाणे अद्यापि शिल्लक आहे या सबबीवर राजेसाहेब हिंदुस्थानात आले असता त्याजवर बहिष्कार घालावा, असे कोणाच्याहि मनांत आले नाहीं व तसे कोणीहि प्रतिपादिले नाहीं . प्रसंगाच्या तीक्ष्णतेप्रमाणेच शस्त्रास्त्राचा उपयोग करावयाचा असतो " याच लेखात श्री केळकर यानीं स्वराज्य मिळेपर्यंत स्थानिक स्वराज्यावरहि बहिष्कार घालावा अशी वृत्ति धारण करणारे जे लोक होते, त्याना उद्देशून काढिलेले पुढील उद्गार त्याच्या एकंदर राजकीय तत्त्वज्ञानाचे व प्रकृतिधर्माचे निदर्शक म्हणून देतां येतील ते उद्गार असे : " जोंपर्यंत खरे स्वराज्याचे अधिकार आम्हास मिळत नाहींत, तोंपर्यंत स्थानिक स्वराज्याचे अधिकार मिळून काय व न मिळून काय, सारखेच ! खरे, जेव्हा ते अधिकार मिळतील तेव्हा हेहि त्यांजबरोबरच आपोआप येतील, व मग ते जसे नीट करण्यास आम्ही पात्र ठरू, तसे हेहि बजावण्यास आम्ही पात्र ठरूच ठरूं; तोंपर्यंत आम्हांस त्या कामांत मुळीं पडावयाचेच नाहीं, सरकार जाणे व ते स्थानिक

स्वराज्य जाणे; अशा तऱ्हेचा युक्तिवादहि दुसऱ्या बाजूनें करतां येण्याजोगा आहे. पण अशा युक्तिवादानें स्थानिक स्वराज्याचें काम अंगाबाहेर टाकणारीं माणसें राष्ट्रीय गुणानींहि तशींच श्रेष्ठ व लोकोत्तर असावीं लागतात, हे विसरतां कामा नये...ज्यांना श्रेष्ठ व अतिम राष्ट्रीय प्रश्नाशिवाय कांहीं सुचतच नाहीं, ज्याचा अहर्निश व्यवसाय अशा प्रश्नासबधानेंच चालू आहे, ज्याना जळीं,स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं राष्ट्रच दिसते अशा लोकांनाच कदाचित् वरील युक्तिवादांतील सबबींचा फायदा मिळाला तर मिळेल. . मॅझिनी, डॉ सन्यत्सेन — ज्यानीं स्वराज्याच्या वेडात देह किंवा व्यवहार कांहींच मानला नाहीं—अशा लोकानीं स्थानिक स्वराज्याकडे दुर्लक्ष केल्यास ते त्यास माफ होईल; पण ज्याचा सारा जन्म दुसऱ्याची नोकरी करण्यात, व्याजबट्टा करून पैसे कमाविण्यात किंवा वाङ्मयात्मक धंदा करून स्वार्थबुद्धीनें सोन्याच्या नाण्याच्या चवडी बांधून ठेवण्यांत गेला, त्यांनीं स्वराज्याच्या भल्या मोठ्या गोष्टी सागून स्थानिक स्वराज्यासारख्या लहान पण उपयुक्त गोष्टींकडे तिरस्कारबुद्धीनें स्वतः पहावें अगर दुसऱ्यास पहावयास सांगावे, हे आश्चर्य नव्हे काय?"‡

## सामान्य व्यक्ती आणि असामान्य विभूती

या लेखातील वरील युक्तिवाद सामान्य मनुष्ये आणि असामान्य विभूती याच्यातील भेदावर उभारलेला आहे. व त्यांत बरेंच तथ्यहि आहे विशेषतः ज्या वेळीं एकाद्या पक्षास फार मोठे कार्य करावयाचे असते, पण ते कसे करावे हें दाखवून देऊन त्याचे नेतृत्व स्वीकारण्यास एकादा असामान्य पुढारी नसतो, त्या वेळीं सामान्य लोकांनींच आपल्या कर्तृत्वाच्या मर्यादा न ओळखतां एकाद्या मोठ्या चळवळीचें नेतृत्व करण्याचा आव आणावा व अखेरीस आपले हंसें करून घेऊन आपल्या अनुयायास संकटात पाडावे, असे प्रकार न घडावेत यासाठीं असा उपदेश कित्येक वेळा करावाहि लागतो नि:शस्त्र क्रांतीसारख्या अपूर्व चळवळीचे नेतृत्व करण्यास तसाच असामान्य पुढारी पुढे आला पाहिजे व तोपर्यंत सामान्य पुढाऱ्यानीं लोकास भरीस घालण्यात कांहीं अर्थ नाहीं हे खरे आहे. पण असा असामान्य पुढारी पुढें आल्यावर मात्र या युक्तिवादाचे महत्त्व उरत नाहीं, किंबहुना, त्यामुळें राष्ट्रकार्यात हानीहि होण्याचा सभव असतो. शुद्ध बुद्धिवादाच्या दृष्टीनेंहि सामान्य मनुष्यें व असामान्य विभूती यातील भेद अनुभवगम्य म्हणून खरा धरावा लागतो. पण तो भेद सामान्य मनुष्यानीं असामान्य विभूतीची पूजा करण्याच्या किंवा त्याचें शिष्यत्व पत्करून त्यानें घालून दिलेले धोरण अवलंबिण्याच्या आड येऊं शकत नाहीं. असामान्य विभूती आपल्या अनुयायांस जेव्हां एकादा कार्यक्रम आंखून देतात, तेव्हां अर्थातच सामान्य पुढारी तो आचरणांत आणतात; पण त्यामुळे त्याच्यावर असामान्य विभूतींचें अधानुकरण करण्याचा आक्षेप येऊ शकत नाहीं असामान्य

‡ केळकरकृत लेखसग्रह, भाग ४ था, पृ १३२-३५

विभूती एकादें नवें सत्य आपल्या अतःप्रेरणेच्या बळावर शोधून काढू शकतात व त्याची जगांत प्रस्थापनाहि करू शकतात. या प्रस्थापनेच्या कामीं त्या व्यक्ती अलौकिक स्वार्थत्यागहि करीत असतात. पण जगात एकाद्या विभूतीच्या आत्मबलानें जेव्हां नव्या सत्याची प्रस्थापना होते, तेव्हां त्या अलौकिक स्वार्थत्यागी विभूतीला या सत्य-प्रस्थापनेच्या कार्यात अनेक सामान्य लोकांचेहि साहाय्य मिळावें लागतें व त्यांच्याकडूनहि स्वार्थत्यागाची अपेक्षा कांहीं काल तरी तिला करावी लागते. अशा वेळीं सामान्य लोक या असामान्य विभूतीचें शिष्यत्व पत्करतात व आपल्या शक्त्यनुसार स्वार्थत्याग करून तिने अंगीकारिलेल्या महत्कार्यास साहाय्य करतात. तात्पर्य, सामान्य मनुष्यानीं असामान्य विभूतींचें बाह्य अंधानुकरण करू नये या म्हणण्यात जरी तथ्य असलें, तरी त्याचबरोबर अशा असामान्य विभूतीच्या कार्यास साहाय्य करण्यासाठीं आपण शक्त्यनुसार त्याग करावा आणि ही त्याग करण्याची अतःप्रेरणा वृद्धिंगत करण्यासाठीं तिचें शिष्यत्व पत्करून तिचें माहात्म्य गावें, हेंहि जगाच्या प्रगतीस व सत्याच्या प्रस्थापनेस अथवा राष्ट्रीय स्वातंत्र्यासारख्या महत्कार्याच्या यशस्वितेस अत्यंत अवश्य आहे राष्ट्रनिर्मितीस महान् नेत्याची व विभूतिपूजेची जी आवश्यकता असते, ती याचसाठीं होय यासंबंधीं आगरकरानीं एके ठिकाणीं फार मार्मिक विवेचन केलें आहे, व ते शुद्ध बुद्धिवादाच्या दृष्टीने कोणासहि मान्य होण्यासारखें आहे. ते म्हणतात: "बुद्धिमंदिरात सत्याचा दीप प्रकाशित झाल्याबरोबर वृत्ति आनंदमय होऊन एका प्रकारें ज्याचे देहभान सुटतें, असा एकादा महात्माच आईबापाची, गणगोताची, धनद्रव्याची, जातीची, देशाची, किंबहुना समग्र मनुष्यतेची पर्वा न ठेवतां आंतरोत्थित अमर्याद प्रेरणाबलाच्या भरवशाबरोबर हवे तेवढे महत्कृत्य हातीं घेऊन तडीस नेतो! सामान्य मनुष्यानीं अशा नरवराचें आश्चर्य करावें, पूजन करावें, स्मरण करावें, शिष्यत्व करावें, पण अनुकरण करू नये" या म्हणण्याचा भावार्थ इतकाच आहे, की पुष्कळ वेळा सामान्य मनुष्ये असामान्य विभूतीसच साधणाऱ्या महत्कार्यास आपल्या एकट्याच्या बलावर हात घालून आपलें हसें करून घेतात, व आपल्याबरोबर आपल्या सहकाऱ्यांचेंहि नुकसान करतात पण त्याचबरोबर सामान्य मनुष्यानीं असामान्य पुढाऱ्याचे 'पूजन व शिष्यत्व' करावें हेंहि म्हणणे लक्षात घेतले पाहिजे श्री केळकर यांना अशा प्रकारची विभूतिपूजा पाहून एक प्रकारची चीड येई व ते तिला बुवाबाजी किंवा बुवाशाही अशीं नावें ठेवून महान् विभूतीने आरंभिलेल्या महत्कृत्यास अनेक वेळां अडथळाहि करीत. म्हणून ज्या वेळीं असा महात्मा राष्ट्राचें नेतृत्व स्वीकारून त्याच्याकडून स्वार्थत्यागाने महत्कृत्य घडवून आणण्यास पुढे आला, त्या वेळीं श्री केळकर याच्या वरील वृत्तीचा व उपदेशाचा त्याच्या कार्यास विघातक असाच परिणाम झाला पण ज्या वेळीं असा पुढारी राष्ट्रांत नव्हता, त्या वेळीं सामान्य मनुष्यांच्या हितसंबधास धक्का न लावतां त्यांच्यांतील जहाल मनोभावना व्यक्त करण्यास व त्यांना क्रांतिकारक न

बनविता आपल्या पुढाऱ्याची स्मृति जागृत ठेवण्यास त्यांची लेखणी फार उपयोगी पडली, असा अनुभव १९०८ पासून १९१४ पर्यंतच्या काळांत महाराष्ट्रास आलेला होता व त्याबद्दल टिळकपक्ष त्यांच्या या सेवेची थोरवी नित्य स्मरत असे

## बंगाल-पंजाबमधील राष्ट्रीय पक्ष

आतां या काळांतील म्हणजे १९१० पासून १९१४ पर्यंतच्या काळातील बगाल व पजाब प्रांतांतील राष्ट्रीय पुढाऱ्यांची काय हकिकत होती ते पाहू पजाबचे पुढारी लाला लजपतराय हे सुरत-कॉंग्रेसच्या वेळीं प्रागतिकाचें वसाहतींचे स्वराज्य हे ध्येय मान्य करून त्यांच्या राष्ट्रसभेत राहिले. यामुळे त्याना सरकारने ताबडतोब बंदिवासात ठेविले नाहीं पुढे ते १-२ वर्षानीं राष्ट्रसभेच्या कार्यासाठीं विलायतेस गेले व तेथून अमेरिकेस गेले यानतर मात्र त्यांच्यावर हिंदुस्थान-सरकारची पुनः वक्रदृष्टि वळली व सरकारने महायुद्ध सपेपर्यंत त्याना हिंदुस्थानात येऊ दिले नाहीं अमेरिकेंतील 'गधर' पक्षाशीं त्यांचा संबध असावा असा सरकारास संशय होता, पण पुढे तो खोटा ठरला १९१४ ते १९१९ मधील महायुद्धाच्या काळांत हिंदुस्थानात लोकमान्यांनीं 'होमरूलची चळवळ' सुरू केली, या वेळीं अमेरिकेत होमरूलच्या कार्याचा प्रचार लालाजी करीत असत बाबू बिपिनचद्र पाल हे सुरत-कॉंग्रेसच्या सुमारासच बदींत पडले होते त्यातून लवकरच त्याची मुक्तता झाली व ते कांहीं काळ इग्लडातच जाऊन राहिले इग्लडातून परत आल्यानतर त्यांनींहि आपले पूर्वीचें धोरण बदललें आणि ब्रिटिश साम्राज्याशीं आपला सबध कायम ठेवणें यांतच आपले व ब्रिटिश साम्राज्याचेहि हित आहे असे प्रतिपादण्यास त्यानीं सुरुवात केली लॉर्ड हार्डिज याच्या कारकीर्दींत दिल्लीस हिंदुस्थानची राजधानी नेण्यात आली याबद्दल त्यानीं समाधान व्यक्त केलें आणि लॉर्ड हार्डिज यानीं हिंदुस्थानात प्रांतिक स्वराज्याची स्थापना करण्याचे ध्येय मान्य केल्यामुळें आतां हिंदुस्थान हे एक स्वराज्यमडित सयुक्त राज्य लवकरच बनणार व त्याच्या साहाय्याची आवश्यकता ब्रिटिश मुत्सद्यानाहि पटू लागली आहे, असे लिहिण्यास त्यानीं सुरुवात केली १९१३ सालीं त्यानीं 'हिंदु रिव्ह्यू' या नांवाचें मासिक कलकत्त्यास सुरू केले त्याच्या दुसऱ्या वर्षाच्या तिसऱ्या अकांत लॉर्ड हार्डिज यांच्या प्रांतिक स्वराज्याच्या खलित्या-सबधीं व दिल्लीस राजधानी नेण्याच्या धोरणासबधीं ते लिहितात :

" The removal of the Capital to Delhi is a vital part of the larger policy, enunciated in the despatch of 1911. That policy, as I have repeatedly said, has for its objective the ultimate building up of a United States of India, composed of a number of Provincial Autonomies. Autonomy in the provincial administrations will gradually compel the trans-

formation of the Central Government into a thoroughly Constitutional and representative state authority."

म्हणजे हिंदुस्थानला प्रांतिक स्वराज्य दिले पाहिजे व या प्रांतिक स्वराज्याचा मध्यवर्ती सयुक्त स्वराज्यात लवकरच विकास झाला पाहिजे, ही गोष्ट ब्रिटिश मुत्सद्यानीं आपल्या बुद्धिचक्षूनें आकलन केली आहे, असें बाबू बिपिनचद्र पाल याचे या वेळीं मत झाले इतकेच नाहीं, तर हिंदुस्थानवर पश्चिमेकडून मुसलमानी राष्ट्रे व पूर्वेकडून चीन, हे चाल करून येण्याचा संभव असल्यामुळे आम्हास ब्रिटिश साम्राज्याच्या सहकार्याची व ब्रिटिश साम्राज्यास आमच्या सहकार्याची आज आवश्यकता उत्पन्न झाली आहे, असे त्याचे या वेळचे मत होते या मतानुसार हिंदी राष्ट्रीय पक्षानें आतां सरकारशीं असहकाराचे धोरण सोडून द्यावे आणि क्रांतिकारक राष्ट्रवाद हे आपल्या मार्गातील एक सकटच आहे असे मानू लागावे, असा त्यांचा या वेळीं उपदेश चालू झाला ब्रिटिश साम्राज्याला मुसलमानी राष्ट्राचें व चीनचे संकट उत्पन्न झाल्यामुळे व ते संकट आपणासहि असल्यामुळे ब्रिटिश साम्राज्यशाहीला हिंदी राष्ट्रवादाशीं आज ना उद्यां समेट करणे भाग पडेल, असे त्यानीं लिहिले आहे इ स १९१४ च्या एप्रिलच्या 'हिंदु रिव्ह्यू' च्या अकांत ते लिहितात.

"The Nationalists' rule of aloofness from all sorts of official associations and activities, except where the contrary was made positively binding upon us by Law,—was reasonable and justifiable then. It is no longer so now. Revolutionary patriotism is the greatest danger before Indian Nationalism to-day. It is more dangerous to the true Nationalist cause in India, than even Bureaucratic Absolutism. The real danger to the Indian Nationalism will come now not so much from the British Suzerainty as from the possibilities of Chinese irruption on the one side and Pan-Islamic intrigues on the other. British Imperialism will be forced, in the face of these fearful possibilities, to come to terms with Indian Nationalism in its own interest It was never true than it is to-day, that India and Great Britain must stand or fall together."

हिंदुस्थान आणि ब्रिटिश साम्राज्य यांचे सहकार्य झाल्यावेरीज हिंदुस्थानचा निभाव आशियातील राजकारणांत लागू शकत नाहीं, आणि हिंदुस्थानवर येणारे पॅन-इस्लामिझम्‌चे सकट लक्षांत घेऊन हिंदुस्थाननें क्रांतिकारक राष्ट्रवाद सोडून द्यावा व ब्रिटिश साम्राज्याशीं सख्य करावे, या विचारसरणीचा उगम बंगालचे एक वेळचे ज्वलज्जहाल पुढारी बाबू बिपिनचद्र पाल यांच्या वरील उद्गारांत आहे

## लो. टिळकांची सुटका व नवें राजकारण

१९१४ सालीं लो टिळक सुटून आले तेव्हा सर्व भरतखंडाला आपलें नष्ट झालेले चैतन्य पुनः आले असे भासले आणि राष्ट्रीय पक्षाचें चैतन्य संरक्षण करून ठेवण्याचा काळ सपून आतां त्याच्या बलसवर्धनाचा काळ प्राप्त झाला साम्राज्यशाहीविरुद्ध बड करून उठलेल्या भारतराष्ट्राच्या डोक्यावर साम्राज्यशाहीनें जी दडपशाहीची गदा घातली होती, त्यामुळे तें कांहीं काल मूर्च्छित होऊन पडलें होतें आणि या मूर्च्छितावस्थेत त्यास आत्मबलाची विस्मृति होऊन तिच्यांतून जागें झाल्यावरहि काहीं काल त्याला आपली विकलांगता भासत होती व त्याच्या बुद्धीलाहि दुर्बलता आली होती अशा अवस्थेतहि त्याच्या बलाचें संवर्धन कसें करावें आणि पुनः साम्राज्यशाहीशीं झुंज खेळण्याची ताकद त्याच्या अगीं कशी आणावी, हा लोकमान्याच्यापुढे या वेळीं मुख्य प्रश्न होता. या प्रश्नाचा पूर्ण विचार करून आणि आपल्या सभोवारची परिस्थिति पाहून त्यांनीं या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर दिले पांच-चार वर्षांच्या अवधींत भरतखडाला पुनः त्यांनीं ताजेतवानें केलें आणि संपूर्ण स्वराज्याचा झगडा करण्यास उभे केले राष्ट्र कोणत्याहि स्थितींत असले तरी त्याला कर्मप्रवण कसे करावे आणि त्याची छाप प्रतिपक्षावर कशी बसवावी, ही कला लोकमान्याना पूर्णपणें अवगत होती. ते जेव्हा सुटून आले त्या वेळीं त्यांच्या बंदिवासापूर्वी त्यानीं आपल्या राजकारणाची जी प्रचंड इमारत उभारली होती, ती सर्व जमीनदोस्त होऊन गेली होती या परिस्थितीचा विचार करणे प्राप्तच होते. पण परिस्थितीचा विचार तिच्यापुढें शरण जाण्यासाठीं करावयाचा नसून तिला आपल्यापुढे शरण आणण्यासाठीं करावयाचा असतो. मनुष्याची बुद्धि परिस्थितीनें बद्ध असते हे खरें असले, तरी त्याच बुद्धीच्या साहाय्याने तो तिच्यावर आपले प्रभुत्वहि प्रस्थापित करीत असतो. **याचसाठीं बुद्धि केवळ परिस्थितिनिष्ठ असून कार्य होत नाही, तर ती आत्मनिष्ठहि असावी लागते.** ही आत्मनिष्ठ बुद्धि ज्ञात परिस्थितीच्या पलीकडे जाऊन भावी कालातील अज्ञात परिस्थिति आपणांस अनुकूल अशी कशी निर्माण करावी, हे ओळखू शकते ज्ञाताच्या पलीकडे उड्डाण करून जाण्याची शक्ति मानवी बुद्धीला अतःप्रेरणेनें प्राप्त होत असते. सत्यसशोधन, काव्यसृष्टीची निर्मिती आणि राष्ट्रनिर्मितीसारख्या महत्कार्यास लागणारी नेतृत्वकला, या सर्वांस या आत्मनिष्ठबुद्धीची किंवा अंतःप्रेरणायुक्त बुद्धीची आवश्यकता असते लोकमान्याच्यासारखे अलौकिक लोकनायकत्व तिच्यामुळेच प्राप्त होत असतें **मात्र या अंतःप्रेरणेच्या नादीं लागून बुद्धीची परिस्थितीवरील पकड ढिली होऊं देतां कामा नये.** ती तशी ढिली झाली, कीं तो मनुष्य जगांतील प्रवृत्तीच्या झगड्यात जगण्यास नालायक बनतो बुद्धीच्या पाठीमागें या अंतःप्रेरणेचें बळ नसेल, तर ती बुद्धि परिस्थितीची दासी बनते; याच्या उलट, अंतःप्रेरणेला बुद्धीचें साहाय्य

नसेल, तर परिस्थितीच्या ज्ञानाच्या अभावीं तो व्यवहारशून्य ध्येयवादी बनतो. राष्ट्रनिर्मितीस अशा ध्येयवादाची फारशी उपयुक्तता नसते वास्तववाद आणि ध्येयवाद यांचा समन्वय ज्या बुद्धीला करता येतो तीच बुद्धि राष्ट्रनिर्मिती करूं शकते. लोकमान्यांची बुद्धि अशा प्रकारची होती 'सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ' हे बुद्धीचे समत्व त्यांच्यापाशीं होते व 'योगः कर्मसु कौशलम्' यात वर्णिलेला कर्मयोगहि त्यांना सहज प्राप्त होता

लोकमान्याच्या राजकारणाचे अतरग क्रातिवादी होतें, पण हिंदुस्थानांतील क्रांति ही सामान्य जनतेकडून घडवून आणावी लागणार व ती लोकसत्ताक स्वरूपाची होणार, अशी त्यांची प्रथमपासूनची निष्ठा होती लोकबल कसे सघटित होते व त्याचें सामर्थ्य कसे वाढते, हे त्यांना माहीत होतें. लोकसघटना करण्यासाठीं राष्ट्रसभेसारखी सस्था असल्याखेरीज व तिच्या शिस्तीखालीं सर्व राष्ट्र व त्यांतील पक्षोपपक्ष एकत्रित केल्याखेरीज हिंदुस्थानांतील क्रातीची भाषा फोल आहे हे ते जाणत होते सुरतेस राष्ट्रसभा दुभगली, प्रागतिकानीं आपली राष्ट्रसभा कशी तरी चालू ठेविली, आणि राष्ट्रीय पक्षास हवी असणारी राष्ट्रसभा जगू शकली नाही, या परिस्थितीचा विचार करून त्यांनीं शक्य तर प्रागतिकांनीं नेमस्त बनविलेली राष्ट्रसभा हस्तगत करून तिच्यामार्फत राष्ट्रकार्य चालू करण्याचे योजिलें अर्थात् तिचे ध्येय मान्य करूनच तिच्यात जाणे अवश्य होतें, पण ते ध्येय मान्य करून गेल्यानतरहि योग्य वाटेल तेव्हां ते बदलणे राष्ट्रास अशक्य नाहीं, हेंहि त्यांना माहीत होतें. कोणत्याहि राजकीय संस्थेंत एकदा राष्ट्रशक्ति प्रविष्ट झाली, म्हणजे तिचीं साधने व साध्यें त्या शक्तीच्या विकासाबरोबर बदलत गेलीच पाहिजेत. तेव्हां या राष्ट्रशक्तीचा प्रवेश कोणत्याहि सस्थेत होईल व तिच्या वाढीस कृत्रिम बधने अल्पसख्य अनुयायाच्या पुढाऱ्याकडून घातलीं जाणार नाहींत एवढे पाहिले, म्हणजे राष्ट्रशक्तीच्या विकासास अनुरूप अशी ती सस्था बनू शकते अशा सस्थेचीं पाळेमुळे सामान्य जनतेत रुजलीं आणि तिचे धोरण बहुमतानुसार बदलून घेण्याचा हक्क कोणत्याहि व्यक्तीस असला, म्हणजे तिचे आजचे ध्येय काय आहे यासबधीं विशेष फिकीर करण्याचे कारण नाहीं, असें त्यानीं ठरविले कारण, ज्या मानाने राष्ट्रशक्तीचा विकास होत जातो, त्या मानानें राष्ट्राच्या बुद्धीस अधिक उच्च ध्येयें सुचूं व पटू लागतात अर्थात् प्रागतिकाच्या राष्ट्रसभेंत आपणास असा अवसर मिळण्याची शक्यता नसेल किंवा इतर काहीं कारणानीं आपणांस तिच्यांत प्रवेश मिळणार नाहीं, तर राष्ट्रशक्ति सघटित करण्या-साठीं दुसरी सस्था काढून तिच्यामार्फत राष्ट्रीय राजकारण करण्याचीहि त्याची तयारी होती

## प्रागतिकांची राष्ट्रीय सभा

आतां आपण राष्ट्रीय सभेची या वेळीं काय वृत्ति होती तें पाहूं. या वेळची राष्ट्रीय सभा म्हणजे सुरतेस प्रागतिकांनीं वसाहतीचे स्वराज्य हें साध्य आणि सदनशीर

मार्ग हें साधन असे ब्रीद जिच्यावर लादलें होतें, ती प्रागतिकांची राष्ट्रीय सभाच होय. सुरतेस पूर्वीची राष्ट्रसभा दुभगली होती व ती पुनः सांधली जावी अशी कांहीं प्रागतिकांचीहि इच्छा होती, मात्र ते आपलें नवे ब्रीद सोडण्यास तयार नव्हते ही वृत्ति बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी, पंडित मदनमोहन मालवीय आणि ना गोखले यांच्यांत विशेष होती १९०८ साली सुरतेनंतर मद्रास येथील राष्ट्रसभा डॉ रासबिहारी घोष यांच्या अध्यक्षतेखालीं भरली १९०९ साली ती लाहोर येथें पंडित मालवियांच्या अध्यक्षतेखालीं भरली या अधिवेशनाचे अध्यक्षपद सर फेरोजशहा मेथा याना प्रथम देण्यांत आलें होते, पण याच वेळीं बंगालचे प्रागतिक पुढारी पुनः राष्ट्रसभा एकसंधी बनविण्याच्या व जहाल पक्षाला तिच्यांत आणण्याच्या उद्योगास लागले होते हे धोरण सर फेरोजशहा याना मुळींच पसंत नसल्यामुळे त्यानीं लाहोरच्या अध्यक्षपदाचा आयत्या वेळीं राजीनामा दिला सर फेरोजशहा मेथा हे काहीं झालें तरी जहाल पक्षास आपल्या राष्ट्रसभेत घेऊ नये, या धोरणास दृढ चिकटून होते ना. गोखले, पं. मालवीय व बाबू सुरेन्द्रनाथ हे जहाल पक्षानें बदललेली परिस्थिति ओळखून राष्ट्रसभेंत येण्याचे कबूल केल्यास त्यास आत घेऊन सुरतेस दुभगलेली राष्ट्रसभा पुनः सांधावी या विचारांत गर्क होते तथापि लो टिळक परत येईपर्यंत या त्यांच्या विचारास यश येण्याचे मुळींच चिह्न नव्हते १९१४ सालीं लोकमान्य परत आल्या-नंतर त्यांच्याशीं समेटाचें बोलणें सुरू करावे, या कल्पनेस राष्ट्रसभेस नुकत्याच येऊन मिळालेल्या डॉ ॲनी बेझंट यानींहि विशेष चालना दिली या वेळेपर्यंतच्या काळात मोर्ले-मिंटो-सुधारणा किती निराशाजनक आहेत व त्यातून प्राथमिक शिक्षणासारखा प्रश्नहि सुटणें कसे अशक्य आहे, याची बरोबर कल्पना ना गोखले यानाहि स्वानु-भवानें आली होती लॉर्ड हार्डिंज याच्या १९११ च्या प्रांतिक स्वराज्यासबंधींच्या खलित्यात या सुधारणाचा पुढे विकास करण्याची आवश्यकता ब्रिटिश मुत्सद्द्यांनाहि पटू लागल्याचें दिसत होते त्यातून आता तर एक युरोपीय महायुद्ध सुरू झालें असून महायुद्धात हिंदुस्थानचे साहाय्य मिळावे म्हणून महायुद्ध संपल्यानंतर काहीं तरी महत्त्वाच्या सुधारणा हिंदुस्थानला देण्यात येणार व याव्यात असे सर्वांनाच वाटू लागलें होते

## समेटाचे प्रयत्न

अशा वेळीं हे जहाल-मवाळ दोन्ही पक्ष एका राष्ट्रसभेत एक होऊन कार्य करू लागल्यास देशाचे कल्याण होईल अशी इच्छा ना गोखले, पं मालवीय व बाबू सुरेंद्रनाथ या प्रागतिक मुत्सद्द्याना झाली होती. हे समेटाचें बोलणे करण्यासाठीं राष्ट्रसभेचे त्या वेळचे चिटणीस श्री सुब्बाराव पंतलू आणि डॉ. ॲनी बेझंट हे १९१४ च्या अखेरीस पुण्यास आले होते ना गोखले या वेळीं फारच आजारी होते व लो टिळकाच्याशीं प्रत्यक्ष बोलणे डॉ बेझंट व सुब्बाराव पंतलू याच्यामार्फतच होत असे

तथापि ना. गोखले यांच्या सल्ल्यानेंच हें सर्व चालू असून आतां बदललेल्या परिस्थितींत लो टिळक यांचा पूर्वीचा जहालपणा किंवा बहिष्कारयोगावरील श्रद्धा कायम उरली नसेल, या अपेक्षेवर ना. गोखले या समेटाच्या बोलण्यास पाठिंबा देत होते सुब्बाराव यांच्याशीं लो टिळकाचे जे बोलणें झाले, त्यात लो टिळकांनीं म्हणजे राष्ट्रीय पक्षाने प्रागतिकाचें ब्रीद मान्य करावे, प्रागतिकांनीं राष्ट्रीय पक्षाच्या ज्या सस्था हे ब्रीद मान्य करतील त्याना राष्ट्रसभेला प्रतिनिधी पाठविण्याचा अधिकार द्यावा, आणि दोन्ही पक्षांनीं बहुमताच्या निर्णयानुसार एकीने वागावे, असा समेट ठरला. तो मद्रास येथें भरणाऱ्या राष्ट्रसभेत मजूर करून घेण्याचेहि प्रागतिकांनीं मान्य केले

या वेळीं श्री. सुब्बाराव यांच्याशीं लो टिळक याचें जें सविस्तर सभाषण झालें, त्यावरून ना गोखले यांना एका गोष्टीबद्दल मात्र नवाच प्रकाश मिळाला. तो म्हणजे हाच, कीं बाबू बिपिनचद्र पाल वगैरे जहाल पुढाऱ्याच्या किंवा महाराष्ट्रातील श्री केळकरप्रभृति राष्ट्रीय पक्षांतील नेमस्त वृत्तीच्या व्यक्तींच्या उद्गारांवरून व लेखनावरून राष्ट्रीय पक्षाचा आता वृत्तिपालट झाला आहे व पूर्वींच्या अडवणुकीच्या राजकारणावरील त्याचा विश्वास उडालेला आहे अशी जी कल्पना होती, ती लो टिळक याच्या अतःकरणातील विचारास मुळींच लागू पडत नाहीं व केवळ आपद्धर्म म्हणून ते आज प्रागतिकाच्या ब्रीदावर सही करून राष्ट्रसभेंत येण्यास तयार असले, तरी त्यांची आपल्या पूर्वींच्या राजकारणावर पूर्वीइतकीच दृढ श्रद्धा आहे, याची जाणीव ना गोखले यांना झाली यानंतर मध्यस्थ मंडळी मद्रासकडे गेल्यानंतर स्वतः ना गोखले हे गायकवाडवाड्यांत लो. टिळकांना भेटावयास गेले व तेथें त्या दोघाचें मनोमन खुलासेवार सर्व बोलणे झालें. या भेटीचे वर्णन श्री केळकर यांनीं टिळकचरित्रात पुढीलप्रमाणे दिलें आहे . “ सन १९१४ सालीं कॉंग्रेसच्या पूर्वी कॉंग्रेसचा वाद चालू असता गोखले हे टिळकाना परत भेट देण्याकरिता वाड्यात आले , दोघे दोघेच मॅनेजरच्या खोलींत बसून बोलले. गोखले गेल्यावर टिळक माडीवर आले तेव्हां खाडिलकरानीं टिळकाना विचारलें, ‘ गोखले काय म्हणतात ? ’ टिळक म्हणाले : ‘ गोखले म्हणाले, कीं तुम्ही कॉंग्रेसमध्यें येऊ नका , आजच्या कॉंग्रेसमधील मडळींचे व तुमचे पटणार नाहीं. त्यावर मी उत्तर दिलें, कॉंग्रेस सर्वांचीच आहे ती कांहीं कोणत्याहि एका पक्षाला आंदण दिलेली नाहीं मी प्रथम देश तयार करणार, कॉंग्रेसमध्ये शिरणार, व कॉंग्रेस काबीज करणार ’ हे ऐकून खाडिलकर, लवाटे वगैरे मंडळी आश्चर्यचकित झाली त्याना वाटले, कीं टिळकानीं इतके स्पष्ट बोलावयास नको होते होणे-जाणे पुढेच आहे मग अशी धमकी कां ? ते पाहून टिळक म्हणाले : ‘ पूर्ण विचारांतीं जीं माझीं ठाम मतें झालेलीं असतात, तीं मी प्रतिपक्षाला उघड व प्रथमच बजावीत असतों आपलें धोरण प्रतिपक्षाला उघड करून त्याच्याशीं दोन हात करण्यांतच पुरुषार्थ आहे असें

मला वाटतें."* ही हकिकत श्री केळकर यानीं लो. टिळक याच्या स्वभावातील वादाच्या भरांत स्पष्टपणें बोलून जाण्याचा एक दोष म्हणून दिली आहे! ही मुलाखत अत्यंत महत्त्वाची असून ती खाजगी असल्यामुळे तिचा फारसा बभ्रा बाहेर झाला नाहीं, व श्री केळकर यांनीं लिहिलेल्या चरित्रांत एका कोपऱ्यात ती ढकललेली आहे. तथापि या मुलाखतीनंतर ना गोखले यानीं टिळकपक्षाशीं यदा तरी समेट करावयाचा नाहीं असें ठरवून त्याप्रमाणें एक पत्र मद्रास-राष्ट्रसभेचे अध्यक्ष बाबू भूपेंद्रनाथ बसू यांना लिहिलें. यात त्यांनीं त्या वेळची लो. टिळकाची मनोभूमिका काय आहे व आपण इतक्यांत त्यांच्याशीं समेट का करू नये, यासबधीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे :

"My hope was that if we enabled the seceders by such relaxations to come in, they would, having seen the impossibility of political action on any other lines, co-operate with us in furthering the programme of the Congress by present methods. That hope, however, has been shattered. Mr. Tilak has told Mr. Subbarao frankly and in unequivocal terms that though he accepts the position laid down in what is known as the Congress creed, viz. that the aim of the Congress is the attainment by India of Self-government within the Empire by Constitutional means, he does not believe in the present methods of the Congress, which rest on association with Government where possible, and opposition to it where necessary. In place of these he wants to substitute the method of opposition to Government pure and simple within Constitutional limits—in other words a policy of Irish obstruction. We, on our side, are agitating for a larger and larger share in the government of the country in the Legislative Councils, on Municipal and Local Boards, in Public Services and so forth. Mr. Tilak wants to address only one demand to the Government here and to the British public in England, viz, for the concession of Self-government to India, and till that is conceded, he would urge his country-men to have nothing to do with either the public services or Legislative Councils and Local and Municipal Bodies. And by organising obstruction to the Government in every possible direction within the

* लो. टिळक याचें चरित्र, खड ३ रा, भाग ९ वा, पृ. १८.

limits of laws of the land, he hopes to be able to bring the administration to a stand-still, and compel the authorities to capitulate. This is briefly his programme and he says, that he wants to work for its realization through the Congress if he and his followers are enabled to rejoin it, or failing this by starting a new organization to be called the National League."§

तात्पर्य, लो. टिळक हे प्रागतिकांचें ब्रीद मान्य करून राष्ट्रसभेंत जात असले, तरी ब्रिटिश सरकारकडे राष्ट्रसभेमार्फत स्वराज्याची एकच एक मागणी करावी आणि ती प्राप्त होईपर्यंत राष्ट्रसभेमार्फत अडवणुकीची सघटना करून ब्रिटिश राज्ययंत्र बद पाडून ब्रिटिश मुत्सद्द्याना राष्ट्रसभेपुढे शरण येण्यास भाग पाडावें, असें त्यांचे धोरण आहे, हे धोरण पार पाडण्यासाठीं राष्ट्रसभेत जाणे आपणांस अशक्य झाल्यास 'राष्ट्रीय सघ' या नावाची स्वतत्र सघटना करून तिच्यामार्फत आपला कार्यक्रम अमलांत आणण्याचा त्याचा विचार निश्चित आहे व जुनेच टिळक अद्यापि कायम आहेत, असें ना. गोखले यांनीं बाबू भूपेन्द्रनाथ बसू यांना वरील पत्रानें कळविलें होते

## टिळकांचें अडवणुकीचें धोरण व राष्ट्रसभा

यानंतर अर्थातच त्या वर्षीं समेटाचा ठराव राष्ट्रसभेत मंजूर झाला नाहीं; व हें कार्य पुढील वर्षावर ढकलले गेलें पुढे ना. गोखले यांनीं लिहिलेल्या या पत्राची बातमी सर्व देशभर पसरली, आणि त्यानीं प्रथम समेटाला मान्यता देऊन नंतर त्याच्याच पत्रामुळे तो मोडला असे सिद्ध झालें तथापि ना. गोखले यांचे हें पत्र त्या वेळीं प्रसिद्ध झाले नाहीं आपण प्रथम समेटास अनुकूल का होतों व नतर प्रतिकूल का झालों यास गोखल्याचें उत्तर असे होते, कीं राष्ट्रीय पक्षाची पूर्वीची वृत्ति आता पालटली असेल अशी आपली समजूत होती, पण ती समजूत नाहींशी झाल्यावर आपण समेटास विरोध केला. या मुद्द्यासबंधीं उत्तर देताना लो टिळक लिहितात : "त्याच्या एका इतिहासज्ञ मित्रानें अशी कोटि लढविली आहे, कीं टिळकांस शिक्षा झाल्यामुळे त्यांचीं मते बदललीं असतील अशी गोखल्यांची समजूत होती, पण या महामूर्खाला असे कळलें नाहीं, कीं पूर्ण विचारांतीं शास्त्रीय रीत्या बनलेलीं मनुष्याची मते बदलण्यास तुरुंग हे कधींच कारण होत नाहीं. निदान टिळक आणि गोखले यांचा आज पुष्कळ वर्षांचा जो परस्परांचा संबध आहे, त्यावरून त्यांस तरी ही गोष्ट कळावयास पाहिजे होती, हें निर्विवाद आहे." यावरून लो. टिळकांचें अडवणुकीचें धोरण कायम होते एवढाच बोध वाचकांनीं घ्यावयाचा आहे तुरुंगाच्या भीतीनें टिळकाचीं मतें बदलतील असें गोखल्यांना वाटले नसले, तरी परिस्थितीमुळें

§ See Sir Pharozeshaha Mehta by H P. Modi, Vol II, P. 654-56.

बदललीं असतील असें त्याना वाटणे शक्य होते पण परिस्थितींतील भेदामुळेंहि लोकमान्यांचीं मतें बदललीं नाहींत; तीं कायम आहेत हे पाहून गोखल्यांनीं सभेटास दिलेली संमति मागे घेतली हे उघड आहे वस्तुतः १९०८ सालींसुद्धां अंतिम ध्येय कोणतें असावे, या वादापेक्षां आपले धोरण सार्वत्रिक अडवणुकीचें असावें कीं सह-कार्याचें व विरोधाचें असावें आणि आपली सर्व शक्ति केवळ एका स्वराज्याच्या मूलग्राही मागणीवरच केंद्रित करावी की फुटकळ सुधारणा करण्यावर ती विखुरावी हाच जहाल-मवाळातील वादाचा मुख्य प्रश्न होता. १९०८ सालीं सभेटास "खरी अडचण कोठे आहे?" या मथळयाचा लेख टिळकांनीं लिहिला आहे त्यात ते म्हणतात. "स्वराज्य किंवा स्वातंत्र्य या अंतिम साध्याबद्दलचा वाद लांबचा म्हणून क्षणभर बाजूला ठेवता येईल. पण नेटाची गोडीगुलाबी किंवा हट्टाची अडवणूक या साधनभेदामुळें पदोपदीं नेहमीं उत्पन्न होणारी विसंगतता किंवा विरोध कसा टाळावा हेच काय ते सांप्रत मोठे गूढ आहे" याच लेखांत थोडे आधीं ते म्हणतात: "गेलीं २५-३० वर्षें काम केलेले सर फिरोजशहा मेहतासारखे जुने पुढारी सरकारास उघड रीतीने अडविण्याचा लोकाना उपदेश करण्यास कधींहि तयार नव्हते व नाहींत. त्याचा मार्ग अडवणुकीचा नाहीं, स्वतंत्र पण गोडीगुलाबीचा आहे"*

लो टिळकाचे राज्यकारभार अडवून बंद पाडण्याचे हें धोरण अर्थातच सुटून आल्याबरोबर वर्ष दोन वर्षांत एकदम अमलात येणे शक्य नव्हते तसें होण्यापूर्वी राष्ट्रसभेसारखी संस्था आपल्या हातीं घेऊन ती संघटित व प्रबल बनविणें अवश्य होतें. अर्थात् राष्ट्रसभेत शिरणें हेच त्याचे त्या वेळचे तात्कालिक कार्य होते, व एकदा आपण तींत शिरलों म्हणजे हळूहळू तिला जहाल धोरण स्वीकारावयास लावू, असा त्याना आत्मविश्वास होता लोकमत आपल्याच बाजूस आहे, पण ते केवळ सरकारी दडपशाहीने दडपून गेले आहे, हे दडपण दूर होताच व देशातील चळवळीला तोंड लागतांच लोक आपल्या पाठीमागे येणार अशी त्याची खात्री होती याच आत्म-विश्वासाच्या बळावर त्यानीं मी राष्ट्रसभा काबीज करणार असे आत्मप्रत्ययाचे बोल ना गोखले याच्याशी झालेल्या मुलाखतीत उघडपणे बोलून दाखविले असले पाहिजेत. हा आत्मविश्वास, किंवा प्रतिकूल परिस्थितीला आपणापुढें नमविण्याची ही आत्मप्रेरणा ज्याच्यामध्ये नाही, त्याना लोकमान्यांची स्पष्टोक्ति अकालीं वाटणें साहजिक आहे परंतु भुकेने व्याकूळ झालेलाहि सिंह गवत खात नाहीं, आणि हत्तीच्या गंडस्थलावर उडी मारून ते मी फोडीन हा त्याचा आत्मविश्वास तशा स्थितींतहि नष्ट होत नाहीं, हे त्यांनीं लक्षांत घेणे अवश्य आहे. टिळकांचा हा स्वभाव-दोष नसून त्याचा तो नित्यप्रकृतिधर्मच होता याच्या उलट, प्रागतिकांना किंवा राष्ट्रीय पक्षातील नेमस्त प्रकृतीच्या लोकांना या वेळी असे वाटू लागलें होतें, कीं टिळकांचा बहिष्कार-योग फसला, त्यांचें अडवणुकीचे धोरण अव्यवहार्य ठरलें,

* किता, पृ. २५६-२५७

आणि ते अव्यवहार्य आहे असे प्रथमपासूनच ओळखणारे ना गोखलेप्रभृति नेमस्त लोक आतां प्रत्यक्ष पुराव्यानेंच शहाणे ठरले. अशा वेळीं लोक टिळकाच्या पाठीमागे कसे जाणार? टिळकांना मनुष्यस्वभावाचें ज्ञान नाहीं, मनुष्यें, निदान सामान्य मनुष्यें, त्याग करण्यास तयार होत नाहींत, तीं आता जहाल राजकारणाचा कधींहि स्वीकार करणार नाहींत. बहिष्कारयोग, अडवणूक, ही केवळ लोकमताच्या दर्यावर उठणारी क्षणिक लाट आहे, ती एक Passing phase आहे, तो राजकारणांतील नित्यधर्म नसून ते नैमित्तिक कर्म आहे. वंगभंगाच्या निमित्ताने ती लाट उठली व ते निमित्त दूर होतांच ती शमली आता प्रागतिक पक्षासच जनतेचा पाठिंबा मिळणार व लोकमान्याची राष्ट्रसभा हस्तगत करण्याची कल्पना कल्पनासृष्टींतच राहणार !

१९१५ सालीं ना गोखले व सर फेरोजशहा मेथा हे दोघेहि धुरंधर प्रागतिक पुढारी कालवश झाले त्या सालची राष्ट्रसभा मुबईस भरली होती. येथे राष्ट्रीय पक्षाशीं समेट करण्याचा ठराव पास झाला आणि १९१६ च्या लखनौ येथील राष्ट्रसभेंत राष्ट्रीय पक्ष लो टिळकाच्या नेतृत्वाखालीं येऊन उपस्थित झाला याच वर्षी लो टिळकांनीं राष्ट्रसभा खरोखरच हस्तगत केल्याचा देखावा दिसू लागला या वर्षी सर्वसमत अशी एक स्वराज्याची मागणी राष्ट्रसभेनें ठरावरूपानें मजूर केली आणि या मागणीला मुस्लीम लीगचाहि पाठिंबा मिळविण्यासाठीं लोकमान्यांनीं सुप्रसिद्ध लखनौ-करार बॅ. जिना, महमुदाबादचे राजे, डॉ अन्सारी, वगैरे मुसलमान पुढाऱ्याच्या मार्फत घडवून आणिला या सभेत स्वराज्याच्या ठरावावर बोलताना ते म्हणाले, "पूर्वी ज्या बहिष्काराच्या ठरावासबंधीं भाडलो त्यापेक्षा हा ठराव अधिक महत्त्वाचा आहे. लखनौला हिंदु-मुसलमान, प्रागतिक आणि राष्ट्रीय हे सर्व एक होऊन स्वराज्याची चळवळ करण्यास बाधले गेले हे दृश्य पाहून आता आपले दैव उजाडलें आणि लखनौनें—Luck-now –हे आपले नांव यथार्थ केलें" हिंदु-मुसलमानाच्या करारासबंधीं बोलतांना ते म्हणाले . "कांहीं लोक असें म्हणतात, कीं हिंदूनीं मुसलमानांना शरणागति दाखविली आहे, पण मी म्हणतों, कीं केवळ मुसलमानाना स्वराज्याचे हक्क देण्यांत आले, तरी आम्हास त्याचे कांहीं वाटणार नाहीं आणि ही भावना बोलून दाखविताना हिंदुस्थानांतील सर्व हिंदूंचे अतःकरण मी बोलून दाखवीत आहे, अशी माझी खात्री आहे. ते हक्क रजपुताना दिले तरीहि मला कांहीं वाटणार नाहीं आणि ते हक्क वापरण्यास सुशिक्षितापेक्षा हिंदूतील मागासलेले वर्ग अधिक लायक आहेत म्हणून त्यांना दिले, तरीहि मला त्याचे कांहीं वाटणार नाहीं किंबहुना, ते हिंदुस्थानांतील कोणत्याहि एका वर्गाला दिले, तरी त्याची मला फिकीर नाहीं कारण त्यानंतर हा लढा तो वर्ग आणि इतर समाज अशा दोन पक्षांतच सुरू राहील, व आजचे त्याचें तिरंगी सामन्याचे स्वरूप नष्ट होईल."*

आपण मागत असलेले स्वराज्याचे हक्क केवळ राष्ट्रीय सभेत ठराव करून

* Tilak 's Speeches, Page 44

आपल्या पदरात पडणार नाहींत, तर त्यासाठीं सर्व हिंदुस्थानभर प्रचंड चळवळ केली पाहिजे असे लोकमान्यांचे निश्चित मत होते. राष्ट्रसभेला चळवळ करणाऱ्या संस्थेचें स्वरूप द्यावयाचे हें त्याचें प्रथमपासूनचे धोरण असले, तरी ते काम एकाएकीं ती आपल्या हातीं घेणार नाहीं म्हणून त्यांनीं एक 'होमरूल लीग' ऊर्फ 'स्वराज्यसंघ' या नांवाची स्वतंत्र संस्था काढिली होती राष्ट्रसभेनें केलेल्या मागणीसाठीं वर्षभर अखंड चळवळ चालू ठेवणे हे ह्या संघाचें कार्य होते. डॉ बेझंट ह्यांनीं असाच स्वराज्यसंघ मद्रासमध्यें काढिला होता; पण हे दोन संघ एक करण्यास त्यांची तयारी नव्हती. तथापि राष्ट्रसभेचे कार्य करणारे हे संघ लवकरच एक होऊन राष्ट्रसभेखालीं कार्य करू लागतील, अशी लो. टिळकाची कल्पना होती ह्यासबधीं ते म्हणतात: "कित्येक राजकीय शास्त्र्यांनीं हे स्वराज्यसंघ कॉंग्रेससभेस विरोधी होतील, अशी शका काढली आहे. पण आमच्या मते ही शका निर्मूल आहे होमरूल किंवा स्वराज्याचे तत्त्व १९०६ सालीच कॉंग्रेसला मान्य झालें आहे पण कॉंग्रेस ही वर्षातून एकदां भरणारी असल्यामुळे ह्या राष्ट्रीय ध्येयास व्यवस्थित रूप देऊन तत्प्रीत्यर्थ जे प्रयत्न करावयास पाहिजेत, त्यासाठीं कॉंग्रेससभेने अद्याप कांहीं तजवीज केलेली नाहीं ही तजवीज करणे हें होमरूल लीग किंवा हिंदी स्वराज्यसघ याचें मुख्य काम होय. यात कॉंग्रेसशीं विरोध नाहीं; इतकेच नव्हे, तर हिंदुस्थानातील निरनिराळया प्रांतात निरनिराळे स्वराज्यसंघ निघाले, तरी त्याच्यामध्यें परस्पर विरोध येणे शक्य नाहीं .. पण होमरूल लीग नाहीं तर लीगसारखी दुसरी कांहीं व्यवस्था कॉंग्रेससभेस लवकरच करावी लागेल यांत कांहीं शंका नाहीं आणि मग प्रांतोप्रांतींच्या स्वराज्यसघाचा अर्थातच त्यात समावेश होऊन तो एक भारतवर्षीय मोठा स्वराज्यसघ बनेल"*

## दडपशाहीस सुरुवात

राष्ट्रसभेला चळवळ करणाऱ्या संस्थेचे स्वरूप द्यावयाचे हे लोकमान्यांचे धोरण जितकें जुने होते, तितकेंच राष्ट्रसभेला विरोध केला नाहीं तरी तिच्या ठरावाचा प्रचार लोकांत करून चळवळीची लोकशक्ति निर्माण करणाऱ्यांवर दडपशाही करावयाची हे सरकारचेंहि धोरण तितकेच जुने होते लोकमान्यांनीं आता स्वराज्य शब्दाचे इंग्रजी भाषांतर 'होमरूल' शब्दानें केलें असलें आणि बादशहाबद्दलच्या आपल्या राजनिष्ठेची घोषणा ते आपल्या प्रत्येक भाषणांत करीत असले, तरी त्यांच्या चळवळींतून निर्माण होणारी लोकशक्ति हीच आपणांस खरी मारक आहे व म्हणून या नव्या वेषांत होणाऱ्या जुन्याच शक्तीच्या नव्या अवतारास चुरडून टाकण्यासाठीं सरकारनें लोकमान्यांच्यावर १९१६ सालींच राजद्रोहाचा तिसरा खटला भरला आणि डॉ. बेझंट यांना मुंबई प्रांतांत येण्याची त्याच सुमारास मुंबईसरकारनें बंदी केली अशा प्रकारे स्वराज्याची चळवळ सुरू होतांच दडपशाहीचाहि अवतार होऊं लागला. पण या खटल्यांत अखेरीस

* लो. टिळकाचे केसरींतील लेख, भाग ३, पृ. ३३६-३७.

मुंबई हायकोर्टानें लोकमान्यास निर्दोषी ठरविलें यामुळें ते लखनौस जाऊन राष्ट्र-सभेत स्वराज्याच्या ठरावावर एकमत करू शकले पण लखनौनंतर लो टिळक व डॉ बेझंट यांनी सुरू केलेली चळवळ दडपून टाकण्याचा प्रयत्न मद्रास इलाख्यांत डॉ बेझंट व मि अरुंडेल यांना डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टाखालीं अटक करून सरकारने पुनः सुरू केला अर्थात् आता पुनः १९०८ चा काळ प्राप्त होणार, असा इषारा लोकमान्यांनीं केसरींतून सर्व जनतेस दिला.

"लखनौ-कॉंग्रेसमध्ये आणि मुस्लिम लीगमध्ये एकमतानें स्वराज्याचा ठराव गेल्या सालीं डिसेंबरात मंजूर होऊन तत्सिद्ध्यर्थ हिंदुस्थानातील आणि विलायतेंतील लोकमत जागृत करण्याचें ठरल्यास आज सुमारें सहा महिने होऊन गेले या मुदतींत कॉंग्रेसच्या कमिट्यांनीं नाहीं तरी स्वराज्यसघानीं कॉंग्रेसनें त्यांजकडे सोंपविलेले काम बऱ्याच जोराने चालविल्यामुळे आता अखेर अशी वेळ येऊन ठेपली होती, कीं हिंदुस्थानसरकारास त्याबद्दल काही तरी बोलणे अगर व्यवस्था करणे भाग होते, व सरकार त्याप्रमाणे काय व्यवस्था करते याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते.....
पण अखेर १९०८ सालच्या दडपशाहीनेच पुनः डोकें वर काढिलें, असें म्हणणें भाग आहे......स्वराज्याची चळवळ आणि सरकार यांच्या दरम्यान चालू झालेल्या या युद्धाची पहिली सलामी म्हटली म्हणजे, ह्या झगड्यातून एका झटक्याबरोबर तरुण विद्यार्थ्यांना बाहेर काढणें ही होय .... ह्या मोहिमेतील सरकारचा दुसरा उपक्रम तर ह्याहूनहि भयंकर आहे हा उपक्रम म्हटला म्हणजे मद्रास येथील स्वराज्यसंघाच्या प्रमुख पुरस्कर्त्यांवर व त्यातूनहि बेझंटबाईवर झडप हा होय!..... गेल्या शनिवारीं मद्रासेस मिसेस बेझंटबाई, मि अरुडेल आणि 'कामन वील' पत्राचे सपादक मि वाडिया या तिघांसहि डिफेन्स ॲक्टाखालीं अटकेंत ठेवण्याचे हुकूम त्यावर बजावण्यात आले" ही गोष्ट १९१७ च्या जूनमधील आहे हे दडपशाहीचे शस्त्र उगारण्याच्या वेळींच मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड पेटलंड यांनीं भेदनीतीचाहि अवलंब करण्यास सुरुवात केली होती दमननीति व भेदनीति हीं साम्राज्यशाहीचीं नित्याचींच हत्यारे आहेत लॉर्ड पेटलंड याच्या या भेदनीतीसंबंधीं लोकमान्य टिळक लिहितातः "लॉर्ड पेटलंड यानीं एके ठिकाणीं असें म्हटलेले जाहीर झालेलें आहे, कीं सरकार कॉंग्रेसच्याविरुद्ध नाहीं, पण प्रस्तुतच्या स्वराज्यसघाच्या मताविरुद्ध आहे आम्हाला हे सर्व गौडबंगाल आहे असे वाटते. १९०८ साली हिंदुस्थानात राष्ट्रीय व मवाळ असे दोन पक्ष होते. पैकीं 'मवाळांना हातीं धरा आणि राष्ट्रीय पक्षाला मारा' हे त्या वेळचें धोरण असल्याचे मोर्लेसाहेबानीं स्वमुखाने जाहीर केलें होतें तशाच मासल्याचा उपक्रम सध्या होत आहे असें आम्हांस वाटतें. स्वराज्यसंघानें जे धोरण किंवा ध्येय पत्करलें आहे त्यांत व कॉंग्रेसच्या धोरणांत किंवा ध्येयात वस्तुतः काहींच फरक नाहीं दोन्हीहि एकच आहेत आणि जर काहीं भेदच करावयाचा असेल, तर कॉंग्रेसकमिट्यानीं उद्योग सुरू करण्यापूर्वीच स्वराज्यसघानें ते काम नेटाने चालविले हा होय पण हा भेद न करतां

कॉंग्रेसशीं आपला विरोध नाहीं, स्वराज्यसंघवाले पूर्ण स्वराज्यासाठीं खटपट करतात म्हणून त्यांना दाबलें पाहिजे, अशा प्रकारचा युक्तिवाद पुढे करणें–विशेषतः लखनौस झालेल्या राष्ट्रीय सभेनतर पुढे करणे–म्हणजे सत्याचा अपलाप करण्यासारखें होय व आमची अशी पूर्ण उमेद आहे, कीं कॉंग्रेसमधील कोणत्याहि पक्षाचे लोक असल्या भ्रामक युक्तिवादांनीं आता फसून जाणार नाहींत प्रस्तुतची वेळ आणिबाणीची आहे.. या वेळीं 'वय पचोत्तर शतम्' हाच न्याय आपणास स्वीकारिला पाहिजे. न स्वीकारील तर भावी इतिहासात तो देशद्रोही गणला जाईल, हे पक्के लक्षांत ठेवा. उद्योगाला लागा आणि यश मिळेपर्यंत आपली चिकाटी न सोडतां, दडपशाहीने व अन्यायाने सत्पक्षाचा नाश न होता तोडलेल्या झाडाप्रमाणें तो पुनः अधिकच बळावतो, असे जगाच्या प्रत्ययास आणून द्या सरकारचे रूप कितीहि उग्र असो, ही भिण्याची वेळ नाहीं, चिकाटी व धैर्य कसोटीस लावण्याची वेळ आहे, हे पुरे लक्षांत असूं द्या "*

लोकमान्यानीं केसरींतून अशा प्रकारची गर्जना केल्याबरोबर बेझटबाईच्या अटकेच्या निषेधाची एकच लाट सर्व देशभर उसळली आणि पुनः स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण, कौन्सिलातील राजीनामे, किंबहुना सत्याग्रह या गोष्टींची वावटळ हिंदी राजकारणांत उठू लागली ता २६ जून १९१७ च्या केसरींत लोकमान्य लिहितात : " लॉर्ड पेटलड यास अशी उमेद होती, कीं हिंदुस्थानांत पुनः मवाळ–जहालांत फूट पाडून सरकारची बाजू समर्थन करणारे कांहीं तरी कायदेकौन्सिलचे—त्याच्या मते समजस—सभासद त्यास येऊन मिळतील पण होमरूलचें दैव असे काही विचित्र आहे, कीं त्यामुळे बेझटबाईवर झडप घातल्यानें अधिकारीवर्गाला इष्ट तो परिणाम न होता, उलट होमरूलच्या चळवळींत किती जोर आहे हे त्यामुळे अधिकाधिकच व्यक्त होत चाललें आहे. गेल्या आठवड्यात हजारों लोकांच्या तोंडून पेटलंडच्या कृतीचा आणि समजुतीचा जोराने तीव्र निषेध झाला आणि आजपर्यंत स्वराज्यसंघात उदासीनतेने सामील न झालेले शेकडो नामांकित गृहस्थ स्वराज्यसघाचे भराभर सभासद झाले व होत आहेत. मवाळ आणि जहाल हा भेद नाहीसा झाला कलकत्त्यास सर्व बंगाल प्रांतभर स्वराज्याची चळवळ करण्याचे ठरले. लखनौ येथील मुसलमान लोकांच्या सभेने पेंटलडसाहेबांच्या कृत्याचा पूर्ण निषेध करून बेझटबाईशी आपली सहानुभूति व्यक्त केली. कायदेकौन्सिलचे सभासद, बॅरिस्टर, वकील, वगैरे दरएक प्रातात अनेक गृहस्थ होमरूल लीगचे सभासद होऊं लागले. सरकार विरुद्ध झालें तरी हरकत नाहीं, आम्ही स्वराज्याच्या प्राप्तीकरितां पूर्ण निश्चयाने खटपट करणार, मागे घेणार नाहीं, असा आपला कृतसंकल्प शेंकडों, हजारो लोकांनीं जाहीर केला स्वदेशी व बहिष्कार यांच्या शपथेचा पुनरुच्चार होऊं लागला सरकारच्या कृत्याबद्दल नाखुषी दाखविण्याकरितां कायदेकौन्सिलातील लोकांनीं आपल्या जागा सोडाव्या अशा सूचना 'ट्रिब्यून'सारख्या प्रतिष्ठित वर्तमान-

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ. २६०–६७.

पत्रांत येऊं लागल्या. भारत-संरक्षक सैन्यात भरती करण्यासाठीं जे लोक खटपट करणार होते, त्यानीं उघडपणे ती बद करण्याचे ठरविले पेटलडसाहेबांना घरीं परत बोलवा म्हणून विलायतेस तारा झाल्या आणि मि बमनजी या एकट्या गृहस्थानेच स्वराज्याची चळवळ नेटानें चालविण्यास लाख रुपये देण्याचें अभिवचन दिलें "*

या वेळीं डॉ बेझट यांना सोडविण्यासाठीं एक सत्याग्रहाची मोहीम सुरू करावी, अशीहि कल्पना निघाली होती या सत्याग्रहाचा विचार ऑल इडिया कॉंग्रेस कमिटी, मुस्लीम लीग, वगैरे सस्था करीत होत्या होमरूल लीगमध्येंहि ही चर्चा सुरू होती त्या वेळीं अलाहाबाद येथें प. मालवीय यांचे अध्यक्षतेखालीं लो. टिळक याचे स्वराज्या-वर भाषण झाले त्या भाषणात सत्याग्रहासबधीं किंवा निःशस्त्र प्रतिकारासबधीं लो. टिळकांनीं पुढीलप्रमाणे उद्‌गार काढिले आहेत: "जोपर्यंत कायदे करण्याची सत्ता आमच्या हातीं नाहीं, तोपर्यंत न्याय आणि नीति यांना विरोधी असे कायदे केव्हा केव्हा करण्यात येणार हे कायदे आपण पाळू शकत नाहीं. निःशस्त्र प्रतिकार ह एक साधन आहे, ते साध्य नव्हे विशिष्ट हुकूम पाळण्यापासून आणि मोडण्यापासून आपले हिताहित तोलून वागणे म्हणजे निःशस्त्र प्रतिकार होय जर आपल्या समताल बुद्धीनें असा निर्णय दिला, कीं विशिष्ट परिस्थितींत हुकूम मोडणें हेच आपल्या हिताचें आहे, तर या निर्णयानुसार वागणें नैतिक दृष्ट्या समर्थनीय ठरेल हा प्रश्न फार सकीर्ण आहे व त्याची चर्चा अशा मोठ्या सभेंत करतां येण्याजोगी नाहीं. **त्याचा निर्णय तुम्हीं आपल्या पुढाऱ्यांवरच सोपविला पाहिजे.** नि.शस्त्र प्रतिकार म्हणजे काय, हे तुम्हीं बरोबर समजून घेतले पाहिजे आपल्या ध्येयप्राप्तीचा दृढनिश्चय करणें आणि तिच्याआड काहीं कृत्रिम अन्यायी कायदे येत असले किंवा आपल्या मार्गात काहीं अन्याय्य परिस्थितीचा अडथळा उत्पन्न झाला तर त्याच्याशीं झगडणे, असा त्याचा अर्थ आहे तुम्हीं हे समजून घ्यावे अशी होमरूल लीगची इच्छा आहे तुम्हांस नि.शस्त्र प्रतिकार हा शब्द योजावयाचा नसेल, तर वाटेल तो स्वार्थत्याग करून असा शब्द योजा पण मी दोन्ही शब्दप्रयोग एकाच अर्थानें योजीन दांडगाईचा किंवा बेकायदेशीरपणाचा मी उपदेश करीत नाहीं, तर वाटेल तो स्वार्थत्याग करून आपलें ध्येय गाठण्याचा निश्चय करा, असे मी सागतो. निःशस्त्र प्रतिकार हा पूर्णपणे सनद-शीर आहे. कायदेशीर आणि सनदशीर हे शब्द एकाच अर्थाचे नाहींत, हे इतिहासानें सिद्ध केलें आहे. जोपर्यंत कोणताहि कायदा न्यायाला अगर नीतीला धरून नसेल, आणि १९व्या व २०व्या शतकांतील नीतीस अनुसरून लोकमताला धरून नसेल, जोंपर्यंत तो या सर्व तत्त्वास धरून नसेल, तोपर्यंत तो कायदेशीर असला तरी सनद-शीर नव्हे, हा भेद तुम्हीं अगदीं स्पष्टपणे समजून घेतला पाहिजे असे माझे म्हणणे आहे 'कायदेशीरपणाने' आणि 'सनदशीरपणाने' ह्या शब्दाचा घोटाळा होऊं देऊं नका. तुम्हीं कडक रीतीनें सनदशीर मार्गाचाच अवलंब करावा असे मी सागतो व त्याच वेळीं

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ. ३९८-९९.

हेंहि सांगतों, कीं प्रत्येक कायदा हा शास्त्रीय अर्थानें सनदशीर असतोच असे नाहीं."* अशा रीतीनें १९१६ सालीं प्रागतिकांच्या ब्रीदावर सही करून राष्ट्रसभेंत शिरल्यानतर एक वर्षाच्या आंतच लो टिळक त्या वेळचे प्रागतिक पुढारी पं मालवीय यांच्याच अध्यक्षतेखालीं अलाहाबादेस जाऊन निःशस्त्र प्रतिकाराचा व कायदेभंगाचा उघड उपदेश करूं लागले देशात स्वराज्याची चळवळ सर्वत्र फोफावली. स्वदेशी, बहिष्कार, कायदेमंडळातील जागांचे राजीनामे, सरकारशीं असहकार, अथवा अडवणूक या सर्व गोष्टी भारतीय राजकारणाच्या वातावरणात सचार करू लागल्या

या वेळीं म गांधी हे हिंदुस्थानात येऊन आपलें दोन वर्षांचे प्राथमिक निरीक्षण संपवून चपारण्यांत सत्याग्रहाचा पहिला प्रयोग करीत होते. या वर्षाच्या एप्रिलमध्येंच त्यांनीं त्या जिल्ह्यांत न जाण्याचा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचा हुकूम उघडपणे मोडला होता आणि त्यांच्यावर केलेला खटला अखेरीस त्यांनीं गुन्हा कबूल केला असताहि वरिष्ठ सरकारच्या आज्ञेनुसार काढून घेण्यांत आला पण म गांधींच्या कार्याचे वर्णन आम्ही पुढील प्रकरणात करणार आहो येथें एवढे सांगितले असतां बस आहे, कीं आतां भारतीय राजकारण हळूहळू सत्याग्रहाच्या मार्गावर जाण्याचा काळ समीप आला होता. डॉ. बेझट यांच्या अटकेनें तापलेल्या वातावरणात लो टिळक य तत्त्वाचा उघड पुरस्कार करूं लागले होते. इतक्यात डॉ बेझंट यांची सुटका झाली व आम्ही हिंदुस्थानला स्वराज्य देणार, ते हप्त्याहप्त्यानें देणार, पहिला हप्ता महायुद्धानंतर देण्यात येईल, पुढील हप्ते केव्हा द्यावयाचे ते ब्रिटिश पार्लमेंट वेळोवेळीं ठरवील, पहिल्या हप्त्याची योजना मुक्रर करण्यासाठीं व हिंदुस्थानांतील लोकमत अजमावण्यासाठीं भारतमत्री मि मॉटेग्यू येथें येणार, असे ब्रिटिश सरकारनें जाहीर केलें. अर्थात् या वेळचे हे तापलेलें वातावरण तात्पुरतें शांत झालें आणि मॉटेग्यूच्या सुधारणा प्रत्यक्ष काय येतात, ते कळेपर्यंत तरी स्वराज्यासाठीं सत्याग्रहाचा अगर प्रत्यक्ष प्रतिकाराचा प्रश्न पुढे येण्याचे कारण उरले नाहीं

## मॉटेग्यू-सुधारणा व टिळक

१९१७ च्या डिसेंबरमधील राष्ट्रसभेचें अधिवेशन कलकत्त्यास भरावयाचे होतें त्याच्या अध्यक्षपदाचा वाद सुरू झाला राष्ट्रीय पक्षानें अर्थातच डॉ बेझट यांचें नांव सुचविलें होतें. हा सर्व रग पाहून बगालमधील सुरेन्द्रनाथ बानर्जीप्रभृति प्रागतिक पुढाऱ्यांना १९०७ सालच्या चळवळीचें स्मरण झालें असल्यास मुळींच नवल नाहीं. त्या वेळीं सरकारी दडपशाहीला बळी पडलेले लाला लजपतराय यांना अध्यक्ष करण्याचा प्रश्न होता आज त्यांच्याप्रमाणें सरकारी रोषास बळी पडलेल्या डॉ बेझंट यांना अध्यक्ष करण्याचा प्रश्न होता. व्यक्ती भिन्न असल्या, तरी तत्त्व तेंच होतें एकीकडे दडपशाही तर दुसरीकडे सत्याग्रह किंवा निःशस्त्र प्रतिकार! अशा

* Tilak's Speeches, P. 243-244.

परिस्थितींत राष्ट्रसभेनें कोणतें धोरण स्वीकारावें हा प्रश्न होता पण आतां राष्ट्रसभा लो टिळकांनीं पूर्णपणें काबीज केली होती देशबधु दासांच्यासारखे नवे राष्ट्रीय पुढारी बंगालमध्ये पुढे येऊन तेथील स्वागतमंडळांतहि जुन्या पक्षाचे बहुमत उरलेले नव्हते अशा परिस्थितींत डॉ बेझट यांची निवड कायम झाली आणि मागील इतिहासाची आठवण होऊन प्रागतिक पक्षाचे पुढारी बाबू सुरेन्द्रनाथ बानर्जी यांनीं आपला सवता सुभा निर्माण करण्याचें ठरविलें मात्र या वेळीं प्रागतिकाची म्हणून प्रसिद्ध असलेली राष्ट्रसभाच राष्ट्रीय पक्षानें काबीज केली व पुढील सालीं प्रागतिकाना आपली स्वतत्र प्रागतिक परिषद् काढणे भाग पडले

कलकत्त्यास १९१७ सालीं भरलेल्या राष्ट्रसभेपुढे मुख्य प्रश्न स्वराज्याचा होता त्यासंबधीं गेल्या सालीं राष्ट्रसभा आणि मुस्लीम लीग यानीं मागण्यांची एक योजना तयार केलीच होती तिलाच पुन: पाठिंबा देणे हे तर कार्य करावयाचे होतेंच पण त्याचबरोबर मि मॉटेग्यू यांनीं हिंदुस्थानला स्वराज्य देण्यासबधीं जी घोषणा केली होती, तिच्यावर आपले मत जाहीर करणे हाहि महत्त्वाचा विषय राष्ट्रसभेपुढें यावयाचा होता मि. मॉटेग्यू यानीं २० ऑगस्ट, १९१७ रोजीं जी घोषणा केली, तिचे लो टिळकप्रभृति त्या वेळच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं तीन भाग केले होते : (१) हिंदुस्थानला स्वराज्य द्यावयाचे, (२) हे स्वराज्य हप्त्याहप्त्यानीं द्यावयाचें, (३) या हप्त्यांचें स्वरूप आणि काळ ब्रिटिश पार्लमेंटने ठरवावयाचें. यांपैकीं पहिले दोन भाग राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं मान्य केले; पण तिसरा भाग मात्र पूर्णपणे अमान्य केला कारण त्यामुळें पूर्ण स्वराज्य आपणाला केव्हां मिळणार याला काहींच कालमर्यादा उरणार नसून ते ब्रिटिश पार्लमेंटच्या इच्छेवर सर्वस्वीं सोपवून ठेवणें, म्हणजे स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाला संपूर्णपणे हरताळ फासण्यासारखेच होतें म्हणून राष्ट्रसभेनें आपल्या ठरावांत हिंदुस्थानला पूर्ण स्वराज्य देण्याचा एकच कायदा तावडतोब करावा आणि त्यात पूर्ण स्वराज्य विशिष्ट कालमर्यादेत लवकर देण्यात येईल, असे एकदांच ठरवून टाकावे असे म्हटले होतें असा कायदा एकदां पास झाला म्हणजे त्यात नमूद केलेली कालमर्यादा सपतांच हिंदुस्थानास आपोआप स्वराज्य मिळाले पाहिजे पुनः ब्रिटिश पार्लमेंटकडे जाण्याची किंवा ब्रिटिश राष्ट्राशीं स्वराज्यासाठीं झगडा करण्याची हिंदुस्थानला आवश्यकता पडू नये, अशी मागणी या ठरावाने केलेली होती या ठरावाचे तीन भाग होते. पहिल्या भागांत हिंदुस्थानला स्वराज्य देण्याचें मान्य केल्याबद्दल कृतज्ञतापूर्वक समाधान व्यक्त केलें होते, दुसऱ्या भागांत विशिष्ट कालमर्यादेत पूर्ण स्वराज्य देणारा पार्लमेंटचा कायदा तावडतोब करावा, असें म्हटले होते; आणि तिसऱ्या भागात कॉंग्रेस व मुस्लीम लीग यांनीं तयार केलेली सुधारणांची योजना हा स्वराज्याचा पहिला हप्ता म्हणून तावडतोब देण्यांत यावा, असें म्हटले होतें. यावर भाषण करतांना लो. टिळक म्हणाले : “या जाहीर घोषणेकडे मला तुमचें लक्ष वेधिलें पाहिजे ही घोषणा काय

आहे ? ती अशी आहे, तुम्हाला १०-१५ वर्षांत जबाबदारीचें पूर्ण स्वराज्य किंवा नुसते, कोणतेंहि विशेषण न लाविलेलें, जबाबदारीचें स्वराज्य देण्यांत येईल मि मॉटेग्यू यांनी हे जें उत्तर दिले आहे, त्याबद्दल मी आतां सांगितलेल्या अर्थानें आम्ही कृतज्ञतापूर्वक समाधान मानीत आहो यानतर दुसऱ्या कांहीं शर्ती आहेत हे स्वराज्य तुम्हाला हप्तेबंदीने देण्यात येईल असें म्हटले आहे, हेंहि आम्ही मान्य करतो घोषणेच्या तिसऱ्या भागांत म्हटले आहे, कीं हे हप्ते ब्रिटिश सरकारनें ठरवावेत ; हे आम्हाला मान्य नाही हे हप्ते आम्हींच ठरविले पाहिजेत ते सरकारच्या लहरीवर अवलंबून असता उपयोगी नाहीं. या बाबतींत आम्हाला कोणतीहि तडजोड नको आहे. हे हप्ते आताच निश्चित करा, आणि त्याची कालमर्यादा याच कायद्यात ठरवून टाका, अशा रीतीनें, की त्याचा आपोआप विकास व्हावा आमच्या आकांक्षा तृप्त करण्यासाठीं कॉंग्रेस-लीग-योजना ताबडतोब दिली पाहिजे, ही किमान मागणी आहे म्हणजे हिंदुस्थानांत स्वराज्य-संस्थापनेची मुहूर्तमेढ रोवली गेली असे म्हणता येईल " अशा प्रकारे लो. टिळकांनीं संपूर्ण स्वराज्याच्या मागणीचा ठराव राष्ट्रसभे-कडून या वर्षीं मंजूर करून घेतला. या बाबतींत साम्राज्यशाहीशीं जी तडजोड करावयाची ती कोणत्या तत्त्वावर करतां येईल, यासंबधीं याच भाषणात ते म्हणतात. " सर्व घर ताब्यांत घेण्याचा आम्हांला हक्क आहे, आणि या घरात तुम्हाला सत्तेचा कांहीं भाग उपभोगू दिला तर तुम्ही लवकरच या घरांतून चालते व्हाल या आशेनें दिलेली ती एक सवलत आहे तुम्ही इतके दिवस या घराची व्यवस्था केली आहे, तुम्ही या घरात राहिला आहां, आणखी थोडा वेळ आम्ही तुम्हाला येथें राहू देऊं, पण काहीं झाले तरी आम्ही आजपासून घराचे मालक झालों हे तुम्हीं मान्य केलें पाहिजे. तसे होईल तरच काहीं तडजोड होऊं शकेल, नाहीं तर कोणतीहि तडजोड नाहीं " यानतर स्वराज्याचा पहिला हप्ता म्हणून राष्ट्रसभेची जी मागणी होती तिचे वैशिष्ट्य सागताना ते म्हणतात. " राष्ट्रसभेच्या योजनेचा पहिला गुण हा आहे, की तींत लोकनियुक्त सभेला मध्यवर्ती सरकारवर नियत्रण मागण्यांत आले आहे. या मध्यवर्ती सरकारात भागीदारी–समान भागीदारी–मिळाल्याखेरीज राज्यातील म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डें, वगैरेसारख्या छोट्या सस्थातदेखील स्वराज्याच्या भावनेनें कारभार करता येणार नाहीं खालपासून वर स्वराज्याच्या इमारतीची बांधणी करण्याची कल्पना तुम्हीं डोक्यांतून काढून टाकिली पाहिजे हा दृष्टांत येथे लागू पडत नाहीं कॉंग्रेस-लीग–योजनेहून कोणतेहि कमी हक्क आम्ही मान्य करणार नाहीं. आम्हांला मध्यवर्ती सरकारवर नियत्रण चालविता आले पाहिजे सिमल्यांतील देवतांपासून तों खेड्यातील खालच्या दर्जाच्या पोलीस शिपायापर्यंत हिंदुस्थान सरकार हे एक शरीर आहे. जर तुम्हांला आमचा हक्क द्यावयाचा असेल, आमचे मागणे न्याय्य आहे असे तुम्हांस वाटत असेल, तर मध्यवर्ती सरकारात आम्हास भाग दिला पाहिजे."*

* Tilak's Speeches Appendix

लो. टिळकांचें हें भाषण भावी राजकारणाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. स्वराज्याची देणगी एकाच कायद्यानें मिळाली पाहिजे, आजपासून (हा कायदा पास झाल्यापासून) हिंदी लोक हिंदुस्थानचे मालक झाले या तत्त्वावरच कोणतीहि तडजोड झाली पाहिजे, स्वराज्याच्या पहिल्या हप्त्यांत मध्यवर्ती सरकारात समान भागीदारी मिळाली पाहिजे, आणि संपूर्ण स्वराज्यप्राप्तीची कालमर्यादा याच कायद्यानें निश्चित झाली पाहिजे, हीं या भाषणांतील मूलभूत तत्त्वे आहेत यांपैकी एकहि तत्त्व मॉटेग्यू-सुधारणा-कायद्यानें मान्य केलेले नव्हतें, मग संपूर्ण स्वराज्य देण्याचा प्रश्न तर दूरच एका अर्थाने असे म्हणता येईल, कीं या ठरावानें लो टिळकांनीं संपूर्ण स्वराज्याचा जो झगडा जाहीर केला, तोच १९४७ पर्यंत चालू राहिला. मॉटेग्यू-सुधारणाची योजना प्रसिद्ध झाल्यानतर त्यांनी वरील तत्त्वाची कसोटी लावूनच त्या टाकाऊ ठरविल्या मॉटेग्यू-चेल्म्स्फर्ड याचा चौकशीचा वृत्तान्त प्रसिद्ध झाल्याबरोबर, त्यांनीं केसरींत 'जनाब, देहली तो बहोत दूर है!' या मथळ्याचा मार्मिक लेख लिहिला आहे. त्यात ते म्हणतात. "हिंदुस्थानसरकार आणि विलायतसरकार हे आमच्या सर्व राज्यकारभाराचे डोके होत अर्थातच 'सर्वेषु गात्रेषु शिरः प्रधानम्' या न्यायाने हेच आमचें मुख्य सरकार होय. हिंदुस्थानचें राज्य म्हणजे म्युनिसिपालिट्या नव्हत, आणि प्रातिक सरकारेहि नव्हत, यास्तव हिंदुस्थानांतील नोकरशाही मोडून स्वराज्य झाले पाहिजे असे जेव्हां आम्ही म्हणतों, तेव्हा आमच्या डोळ्यांपुढे म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्डे, किंवा प्रांतिक सरकार या संस्था नसून सर्व हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचे धोरण ज्या वरिष्ठ संस्थेत ठरविले जाते, त्या ठिकाणीं नोकरशाहीवर लोकमताचा पगडा असला पाहिजे असें आमचे मागणे असते, हे प्रथम लक्षांत ठेविले पाहिजे सर्व राज्यकारभाराचे हें केंद्रस्थान लोकाच्या ताब्यात असले, म्हणजे इतर अवयव आपोआपच लोकांच्या ताब्यात येतातच त्यासाठीं निराळा इलाज करावा लागत नाहीं... .. नाहीं म्हणावयास सेक्रेटरी ऑफ स्टेट याचा पगार आणि त्यांच्या ऑफिसखर्चापैकीं कांहीं भाग याचा बोजा हिंदुस्थानवर न पडता इग्लंडने सोसावा अशी त्यांनी शिफारस केली आहे. ही शिफारस कॉंग्रेस-लीगच्या योजनेनुरूप आहे पण स्टेट सेक्रेटरीला केवळ हिंदुस्थान सरकारचे विलायतेतील एजट बनवावें व त्याचे सर्व अधिकार हिंदुस्थान सरकारला देऊन ह्या हिंदुस्थान सरकारचे कारभारांत स्वराज्याचे अधिकार लोकांस असावेत असें जें कॉंग्रेस-लीग योजनेचें मुख्य मागणे, तें मॉटेग्यूसाहेबांनी सर्वस्वीं झुगारून दिलें आहे ह्या व्यवस्थेस 'स्वराज्याची योजना' असें जर कोणी म्हणत असेल, तर तो हिंदुस्थान सरकारचा तुताऱ्या असला पाहिजे 'चादोबा मी तुम्हांस देऊ शकत नाही' असें जें मोर्लेसाहेबानी म्हटले होते, त्यांत आणि मॉटेग्यूच्या वरील उत्तरांत फरक कोणता? यापेक्षां हे हक्क आम्हांला नसलेले चालतील. आज मिळत नसले तर उद्यां भांडून घेऊं पण वरील प्रकारची पोंचट व्यवस्था स्वीकारून

आपला दुबळेपणा व मूर्खपणा जगाच्या निदर्शनास आणून देणें व आपलें हंसे करून घेणें योग्य नाही. असो ...हे स्वराज्य नव्हे, आणि त्याचा पायाहि नव्हे."*

## प्रागतिकांनीं कॉंग्रेस सोडली

मॉटेग्यू-चेल्म्सफर्ड याचा अहवाल वाचल्याबरोबर लोकमान्यांनीं लिहिलेले एकदोन लेख हे त्याच्या राजकारणाचें स्वरूप समजून घेण्याच्या दृष्टीने अत्यत महत्त्वाचे आहेत पण हा अहवाल प्रसिद्ध झाल्याबरोबर प्रागतिक पक्षाला राष्ट्रसभेतून फुटून निघण्यास आणखी एक नवें कारण निर्माण झाले. १९१७ सालीं कलकत्त्यास झालेल्या ठरावाने सपूर्ण स्वराज्याच्या कायद्याखेरीज आमचें समाधान होणार नाहीं व तोंपर्यंत आम्ही सारखे झगडत राहणार, हे जाहीर झाले होते. त्या वर्षीं सरकारने दडपशाहीचें उग्र धोरण स्वीकारताच सर्व देशांत स्वदेशी, बहिष्कार आणि सत्याग्रह या कल्पनाचा सचार जारीने सुरू झाला आणि लो टिळकाचें जें वर्णन ना. गोखले यांनी १९१४ सालीं भूपेन्द्रनाथ बसू यांना लिहिलेल्या पत्रात केले होते ते खरे आहे, अशी खात्री प्रागतिक पक्षांतील सुरेन्द्रबाबू प्रभृतीची झाली टिळकांच्या हातीं गेलेली राष्ट्रसभा आतां मॉटेग्यू देणार असणाऱ्या सुधारणा नादवून घेण्यास तयार होणार नाहीं, याची स्पष्ट कल्पना त्या वेळच्या प्रागतिक पुढाऱ्यास आली लो टिळकाचे केसरींतील वरील मत जाहीर होताच राष्ट्रीय सभेकडून मॉटेग्यू देतील त्या सुधारणा चालवून दाखविण्याचे कार्य होणें शक्य नाहीं, म्हणून इतक्या वर्षांनीं आपणांस मिळणाऱ्या या सुधारणा असमाधानकारक असल्या तरी त्याचा स्वीकार करून त्या चालवून दाखविण्यासाठीं आपणास आता राष्ट्रसभेतून फुटून निघून स्वतत्र प्रागतिक परिषद् काढली पाहिजे, असा त्याच्या अध्वर्यूनी निर्धार केला ही गोष्ट बाबू सुरेन्द्रनाथ बानर्जी यांनी प्रथम ताडिली कारण त्यांच्याच प्रातात देशबन्धु दास हे आपण कायदेमडळात गेलो तरी या सुधारणाशी झगण्यासाठीच जाऊ व त्या मोडून पाडून संपूर्ण स्वराज्याचा कायदा देण्यास ब्रिटिश पार्लमेंटास भाग पाडू, असे उघडपणें प्रतिपादीत असत लोकमान्याच्या अडवणुकीच्या राजकारणाचा बगाली पुढाऱ्यांनी अधिक सडेतोड आणि स्पष्ट शब्दात पुरस्कार करावा ही परपरा पूर्वीचीच होती आणि लोकमान्यांची भाषा अधिक सावधगिरीची अथवा अधिक मुत्सद्देगिरीची असली, तरी त्याचें अतःकरण बंगाली पुढाऱ्यांइतकेच क्रांतिकारक आहे व त्यांची बुद्धि आणि धृति अधिक स्थिर आहेत, ही गोष्ट सुरेन्द्रबाबूंना अनुभवानें माहीत होती. या वेळीं पूर्वींच्या प्रागतिक पक्षातील दुसरे महत्त्वाचे पुढारी म्हणजे पं मदनमोहन मालवीय हे होत. हे सुरेन्द्रबाबूंच्या इतकेच नेमस्त व प्रागतिक होते. परतु सुरतेस काय झालें असेल तें असो, आतां तरी टिळकाच्या राष्ट्रीय पक्षानें पूर्ण सनदशीर रीतीनें राष्ट्रीय सभा काबीज केली आहे व देशातील बहुमत आपल्या बाजूस करून घेतले आहे; या

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ. ४१८–४२२.

बहुमतास मान देणें, प्रसगीं त्यास धोक्याचा इषारा देऊनहि अखेरीस मान देणें, पण त्याच्यापुढे मान लवविणे हेंच आपलें कर्तव्य आहे, हे त्यानीं ओळखिलें. देशाचे राजकारण परिस्थित्यनुरूप वाढत जाणें आणि त्या वाढीबरोबर त्याचे स्वरूपहि पालटत जाणे हे अपरिहार्य आहे हे स्वरूप एकदा पालटूं लागल्यानतर त्याला पूर्वीच्या स्वरूपाच्याच आकृतींत दडपून राखण्याचा प्रयत्न करणे ही एक तमोगुणी आग्रह-बुद्धि आहे. या आग्रहाने राष्ट्राचें कसे नुकसान होते, ते पडितजींनीं सुरतेनंतरच्या काळांत बरोबर अवलोकन केलें होते व म्हणून सर्व प्रागतिक पक्षास राष्ट्रसभा न सोडण्याचा त्यानीं आग्रह केला पण हा आग्रह त्या पक्षास पटला नाही राष्ट्रसभेचा निर्णय कांहीहि झाला, लोकमताचे वारे कसेहि वाहूं लागले, तरी आम्ही मॉंटेग्यू देतील त्या सुधारणा नांदवून घेणारच, असा आग्रह या पक्षाने धरिला देशबधु दास म्हणत, 'आम्ही या सुधारणा मोडून टाकणार' सुरेन्द्रबाबू म्हणत, 'आम्ही त्या चालवून दाखविणार' लोकमान्य म्हणत, 'मोडून टाकणारे किंवा चालवून दाखविणारे तुम्ही कोण ? हे कार्य एकानें करावयाचे नाहीं व ते एकाच्या हातून होणेंहि शक्य नाहीं दोघानींहि एकाच राष्ट्रसभेत रहावे आणि तिच्या शिस्तीखालीं तिची आज्ञा शिरसावद्य मानून ती सांगेल त्याप्रमाणें सर्वानीं वागावे' लोकमान्याचे हे सूत्र, ही भाषा, पूर्वीचीच होती आणि त्याचे अंतःकरणहि पूर्वीचेच होते याचें पर्य-वसान अखेरीस सुधारणा चालविण्यात होणार नसून ते त्या मोडण्यांत होणार आहे, हे सुरेन्द्रबाबूंना पटले होतें टिळकांचे-आमचे कधीच जुळणार नाही असा आग्रह फेरोजशहा मेथा हे पूर्वी धरीत असत तो का हे त्यांना आतां समजूं लागले व त्यांनीं प्रागतिक परिषद् निर्माण केली यासबधीं लोकमान्यानीं 'मवाळांचा रुसवा व फूट' या लेखांत पुढीलप्रमाणें आपले मत माडिलें आहे :

"सर्व संस्था बहुमतानें चालतात, किंबहुना सर्व प्रजासत्ताक किंवा पार्लमेंटरी राज्येहि बहुमतानें चालतात आणि हे बहुमत जर कोणास कबूल नसेल, तर त्याने संस्था न सोडतां त्यातच राहून बहुमत आपल्या बाजूला पुढेंमागे वळवून घेतले पाहिजे सन १९१५ सालीं ज्या वेळेस राष्ट्रीय पक्ष समेटानें कॉंग्रेस सभेस जाऊं पहात होता, त्या वेळेस कॉंग्रेसचे त्या वेळचे मवाळ सेक्रेटरी मि सुब्बाराव समेटाचीं कलमे ठरविण्यासाठीं पुण्यास आले होते मि सुब्बाराव त्या वेळीं सर्व्हंट ऑफ इडियाच्या इमारतींत उतरले असून तेथे त्यांचें व ना गोखल्यांचे खलबतहि झाले होते त्या-नंतर मि. सुब्बाराव यांचें टिळकाशीं जें बोलणें झालें त्यात असें ठरलें की, 'राष्ट्रीय पक्ष कॉंग्रेसमध्ये आल्यावर बहुमताच्या ठरावाप्रमाणे वागेल आणि जेव्हां बहुमत त्यास अनुकूल नसेल, तेव्हां कॉंग्रेसमध्ये राहूनच पुढेंमागे आपणांकडे बहुमत मिळ-विण्याचा प्रयत्न करील. पण बहुमतांशीं तटा करून तो कॉंग्रेस सोडून जाणार नाही राष्ट्रीय पक्षानें कॉंग्रेस सभेत जो प्रवेश केला तो याच शर्तीवर केला. पुढें होमरूलच्या चळवळीमुळें म्हणा अगर दुसऱ्या कारणानें म्हणा, राष्ट्रीय पक्षाच्या सामान्य मताप्रमाणे

देशांतील बहुमत आज बनले गेलें आहे आतां कुरकुर करून काय उपयोग? मवाळ पक्षाने राष्ट्रीय पक्षास जी शर्त घातली होती, तीच मवाळांनींहि आतां पाळणें जरूर आहे लोकमत आमच्या बाजूचे नाहीं म्हणून आम्ही सोडून जातों, ही रडकथा चालावयाची नाहीं. . .. .. संसाराचा गाडा म्हटला म्हणजे दोन दिवस सासूचे तर दोन दिवस सुनेचे असावयाचेच . . विहिणीसारखे रुसूफुगू नका, अगर दुसऱ्या कोणत्याहि अभिमानाला गुतून आजच्यासारख्या अत्यत महत्त्वाच्या प्रसंगीं विनाकारण फूट पाडून नोकरशाहीचे पुरस्कर्ते बनू नका या वेळीं कॉंग्रेस सोडून गेल्यानें तुमचेंच अधिक नुकसान होणार आहे.''*

यानंतर थोड्याच दिवसानीं मुबईस मॉटेग्यू-अहवालासबधीं आपले धोरण जाहीर करणारी खास राष्ट्रसभा झाली व तींत डॉ बेझट, लो टिळक व काहीं प्रागतिक पुढारी या सर्वांच्या एकमतानें स्वराज्याच्या मागणीचा एक ठराव होऊन राष्ट्रसभेचें शिष्टमडळ विलायतेस गेलें लो टिळकहि या वेळीं विलायतेस गेले होते ही सर्व मडळी विलायतेत असता मागे प मालवीय याच्या अध्यक्षतेखालीं दिल्लींत डिसेंबर १९१८ त राष्ट्रसभेचे वार्षिक अधिवेशन भरले व त्यात खास अधिवेशनात स्वराज्याच्या मागणीसबधींचा ठराव बगाली पुढाऱ्यानीं बदलून घेऊन पूर्ण प्रातिक स्वराज्य आणि मध्यवर्ती राज्यात समान भागीदारी ही स्वराज्याच्या पहिल्या हप्त्याची किमान मागणी म्हणून मागावी असा ठराव केला या वेळीं राष्ट्रसभेचे शिष्टमंडळ विलायतेस होतें आणि डॉ बेझट व लो टिळक याच्यांत आपण राष्ट्रीय मागणी म्हणून ब्रिटिश मुत्सद्द्यापुढे कोणती मागणी पुढे ठेवावी, याबद्दल तीव्र मतभेद उत्पन्न झाला डॉ बेझट मुबईच्या जादा अधिवेशनाच्या ठरावास चिकटून राहिल्या आणि लो. टिळक राष्ट्रसभेच्या आज्ञेस म्हणजे अर्थात् दिल्ली-अधिवेशनातील ठरावास, आपल्या आजन्म आचरिलेल्या राजकीय तत्त्वास अनुसरून, चिकटून राहिले यावरून पुढे लोकमान्य टिळक व डॉ बेझट याच्यात फार तीव्र स्वरूपाचें भाडण झाले लोकमान्य राष्ट्रसभेच्याबरोबर पुढे सरकले व डॉ. बेझट मागे राहिल्या त्या यानतर कायमच्याच मागें राहिल्या. राष्ट्रीय पक्षावर आपद्धर्म आचरण्याचा जो काळ आला होता, त्या काळांत त्यांच्या सहकार्याचा आपणास उपयोग झाला, पण आता ती परिस्थिति पालटली व डॉ बेझंटची व आपली ताटातूट होण्याची वेळ आली हें लोकमान्यानीं ओळखिले व त्याना सोडून दिलें विलायतेतून परत आल्यानंतर त्यांच्या-आपल्या ताटातुटीसंबधीं लिहिताना 'यथा काष्ठं च काष्ठं च समेयाता महोदधौ। समेत्य च व्यपेयाता तद्वद्भूतसमागमः॥' हे तत्त्व लोकांपुढें मांडून राष्ट्राच्या बहुमतापुढें प्रत्येक पुढाऱ्यानें मान लवविलीच पाहिजे, जोंपर्यंत त्याच्या पाठीमागें राष्ट्राचें बहुमत आहे तोंपर्यंतच तो राष्ट्राचे राजकारण करूं शकेल, आणि तो पुढारी कितीहि मोठा असला व विशिष्ट परिस्थितींत त्यानें केवढेंहि कार्य केलेलें

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ. ४२७–२८.

असलें, तरी राष्ट्राच्यापुढे उभें राहून त्याचें नेतृत्व करण्याची त्याची तयारी नसेल तर राष्ट्रानें त्यास बाजूस सारून पुढे गेलें पाहिजे, ही विचारसरणी त्यांनीं लोकांस समाजावून दिली.

## प्रतियोगी सहकारितेचा जन्म व अर्थ

विलायतेतून राष्ट्रसभेचें शिष्टमंडळ परत आल्यानतर १९१९च्या डिसेबरमध्यें अमृतसर येथें भरणारी राष्ट्रसभा हीच महत्त्वाची गोष्ट लोकमान्यांच्यापुढे होती ते विलायतेत असतां हिंदुस्थानांत महात्मा गाधींनीं रौलट ॲक्टाविरुद्ध एक प्रचंड राष्ट्रव्यापी सत्याग्रहाची चळवळ १९१९च्या ता ६ एप्रिलपासून ता. १३ एप्रिल-पर्यंत हिंदुस्थानांत केली होती याच वेळीं जालियनवाला बागेंतील अमानुष कत्तल करून ब्रिटिश साम्राज्यशाहीनें आपलें सैतानी स्वरूप महात्मा गांधींना दाखवून दिले होतें. परतु जनरल डायर यानें केलेली ही अमानुष कत्तल साम्राज्यशाहीला पसत नाहीं व ते तिचे नित्यस्वरूप नसून तो एक विशिष्ट लष्करी अधिकाऱ्याच्या अमानुषतेचा पुरावा आहे, ब्रिटिश साम्राज्याचें अतरंग व्यक्त करणारा तो पुरावा नव्हे, असे सिद्ध करण्याची आणखी एक सधि पजाबमधील लष्करी कायद्याची चौकशी करण्याकरिता नेमलेल्या हटर-कमिटीस द्यावी आणि तोंपर्यंत आपण म्हणजे राष्ट्रसभेनें पूर्वीचे सहकाराचे धोरण सोडून असहकाराचें उघड युद्ध पुकारू नये अशी या वेळीं म गाधींची वृत्ति होती हंटर-कमिटीचा रिपोर्ट होऊन तिच्यासबधींचा ब्रिटिश साम्राज्याचा निर्णय पाहिल्यानंतर तो असमाधानकारक असला, तर आपण असहकाराचें उघड युद्ध पुकारावें, असेंहि त्याच्या मनात होते. मात्र तोंपर्यंत सह-कारितेचें धोरण चालू ठेवावे असाहि त्याचा आग्रह होता देशबधु दासप्रभृति बंगाली पुढारी नव्या कायद्याने आपण मागितलेल्या हक्कांपैकी कोणताहि महत्त्वाचा हक्क दिलेला नाहीं, म्हणून आतांपासूनच अडवणुकीच्या धोरणानें त्या कायद्याचा अत करावा असें उघडपणे प्रतिपादीत होते इतक्यांत नवीन कायदा चालू करण्याच्या प्रसंगाने बादशहाचा लोकानीं सहकारिता करण्यासबधीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला; आणि त्याचबरोबर राजबद्यांच्या मुक्ततेचेंहि धोरण जाहीर झालें; हा जाहीरनामा लो. टिळक व त्यांच्या स्वराज्यसघाचे बॅप्टिस्टाप्रभृति इतर पुढारी अमृतसरला जात असतां त्यांना वाटेत मिळाला. त्याबरोबर आम्ही सुधारणा-कायद्याशीं प्रतियोगी सहकारिता करण्यास तयार आहो, अशी तार त्या गाडींतील लोकमान्यप्रभृति पुढाऱ्यांनीं बादशहास पाठविली प्रतियोगी सहकारिता हा शब्द या वेळेपासूनच हिंदी राजकारणात आला. त्याचा अर्थ पुष्कळांस त्या वेळीं समजला नाहीं व लोकमान्यांच्या मृत्यूनंतर सरकारनें कांहींहि वृत्ति धारण केली, तरी मत्रिमडळांना व कायदेमंडळाना चिकटून राहणें व बिनशर्त सहकारिता करणे असा त्याचा अर्थ लोकमान्यांचे शिष्य म्हणवून घेणाऱ्या कांहीं पुढाऱ्यांनीं रूढ केला. यामुळें प्रतियोगी सहकारिता हा शब्दप्रयोग पुढें हास्यास्पद

होऊन बसला. पण लोकमान्यांचा या शब्दप्रयोगाचा अर्थ नेमस्तांच्या बिनशर्त सहकारितेच्या धोरणाहून फार भिन्न होता तो अर्थ न समजल्यामुळें टिळक नेमस्त झाले असा त्यांच्यावर आरोप होऊं लागला. तेव्हां त्यांनीं त्याला उत्तर म्हणून प्रतियोगी सहकारितेचा आपला अर्थ काय आहे, तें पुढीलप्रमाणे विशद केले :

"Responsive (प्रतियोगी) हा शब्द सहकारितेला प्रायः लावीत नाहीत हे खरे, पण त्याच कारणामुळे प्रस्तुतच्या तारेतील या शब्दाकडे टीकाकारांचें विशेष लक्ष जावयास पाहिजे होतें. बादशहांच्या जाहीरनाम्यांत सहकारित्वाचा उपदेश नोकरशाही आणि प्रजा या दोघांसहि केलेला होता टिळकांच्या मते प्रजेस हा उपदेश करणें जरूर नव्हते. कारण प्रजेच्या कल्याणाच्या गोष्टींत प्रजेने आपण होऊन कधी अडथळा आणला नाहीं किंबहुना, आणणेंहि शक्य नाही आजपर्यंत जो अडथळा आणि विरोध झाला, तो सर्व नोकरशाहीचा ही नोकरशाही जर सहकारिता करावयास कबूल असेल व करील, तर तिला प्रातियोगित्वाच्या नात्याने म्हणजे जबाबाला प्रतिजबाब म्हणून लोकहि सहकारिता दाखविण्यास तयार आहेत असे बादशहास आश्वासन द्या, असा टिळकांच्या तारेचा अर्थ होता सहकारिता नेहमीच दोहों बाजूंकडून सापेक्ष असते त्यातून जी गोष्ट प्रजेच्या कल्याणाची तींत सहकारिता करा हें प्रजेस सांगावयासच नको, स्वत:च्या कल्याणास आडकाठी घालणारा मनुष्य पशु समजला पाहिजे म्हणून सहकारितेचा उपदेश प्रजेस करणे योग्य नव्हते या कामात जर कोणीं आडकाठी घातलेली असली, तर ती नोकरशाहीने. यासाठी बादशहांच्या आज्ञेबरहुकूम सहकारिता करण्याची नोकरशाहीची तयारी असल्यास लोकहि आपल्या बाजूनें सहकारिता करण्यास तयार आहेतच नसल्यास मात्र विरोध करावा लागेल, असा टिळकांच्या तारेचा खरा मथितार्थ आहे"*

प्रतिपक्षाने सहकार केल्यास सहकार व त्याने असहकार केल्यास असहकार, हाच या प्रतियोगी सहकारितेचा खरा अर्थ आहे आणि लोकानी केव्हा सहकारिता करावी व केव्हां असहकारिता करावी याचा निर्णय अखेरीस राष्ट्रसभेनेंच दिला पाहिजे, असें लोकमान्यांचें धोरण होतें अमृतसर येथें राष्ट्रसभेपुढे हटरकमिटीचा रिपोर्ट जाहीर होईपर्यंत सहकारिता करण्याचें म. गाधी याचे धोरण, देशबधु दास यांचें अडवणुकीचे उघड धोरण, आणि लोकमान्याचे प्रतियोगी सहकारितेचें धोरण, अशीं तीन धोरणे होतीं. तीनहि धोरणांत नव्या कायद्यानुसार होणाऱ्या निवडणुकींत भाग घेण्याचे धोरण सर्वसामान्य होते अशा परिस्थितीत तिघांसहि समाधानकारक अशी ठरावातील शब्दाची योजना करण्यात आलेली होती हा ठराव पुढीलप्रमाणें होता :

(1) That this Congress reiterates its declaration of last year that India is fit for full responsible Government, and repudiates all assumptions and assertions to the contrary.

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ. ४४०.

(ii) That this Congress adheres to the resolution passed at the Delhi Congress regarding Constitutional Reforms; and is of opinion that the Reforms Act is inadequate, unsatisfactory and disappointing.

(iii) That this Congress further urges that Parliament should take early steps to establish full responsible Government in India in accordance with the principle of Self-determination.

(iv) Pending such introduction, this Congrerss trusts that, so far as may be possible, the people will so work the reforms as to secure an early estabishment of full responsible Government, and this Congress offers its thanks to the Rt. Hon. E. S Montague for his labours in connection with the Reforms.

या ठरावास दे दास, लो. टिळक व म. गांधी यांनीं पाठिंबा दिला; तथापि प्रागतिक पक्षाला तो मान्य नव्हता व हा ठराव वरून सुधारणा चालवाव्यात (Work the Reforms) असे म्हणत असला, तरी ज्याच्या योगानें पूर्ण स्वराज्याची लवकर स्थापना होईल अशा धोरणानें काम करावें असें त्यात म्हटले असल्यामुळें खरोखर प्रस्तुत सुधारणाकायदा शक्य तितक्या लवकर मोडावा अशा धोरणाचाच तो ठराव आहे, असे प्रागतिकांचे मत होतें या वेळीं स्वतंत्र प्रागतिक परिषद् अस्तित्वात आली असली, तरी ना शास्त्रीप्रभृति काहीं प्रागतिक या राष्ट्रसभेस हजर होते आणि डॉ बेझंट यानीं प्रागतिकातर्फे सुधारणापासून होईल तितके लोकहित करून घ्यावे व त्या गुण्यागोविंदानें चालवाव्या, अशा अर्थाचा ठराव याविरुद्ध मांडिला होता पण तो बहुमतानें नामंजूर झाला

## सोलापूरची प्रांतिक परिषद्

अमृतसरहून परत आल्यानतर सोलापूर येथे मुबई इलाख्याची प्रांतिक परिषद् १९२०च्या एप्रिल महिन्यात भरली या परिषदेंत प्रागतिक पक्ष आणि नुकताच अस्तित्वांत आलेला ब्राह्मणेतर पक्ष हे हजर असून प्रागतिक पक्षाचें नेतृत्व डॉ परांजपे यानीं स्वीकारिले होते व ब्राह्मणेतराचें नेतृत्व श्री. वालचद कोठारी यांनीं स्वीकारिलें होतें या दोघांनाहि अमृतसरचा ठराव मान्य नसून तो ठराव मान्य असणारांसच व राष्ट्रसभेची शिस्त पाळणारांसच पुढील निवडणुकींत लोकांनी मतें द्यावींत हे लोकमान्यांचें धोरण हाणून पाडण्यासाठीं हे दोन पक्ष या परिषदेत एक होऊन लोकमान्यांशीं लढत होते. त्यांनीं आपल्या या कार्यात साहाय्य करण्यासाठीं अखिल भारतीय पुढारी म्हणून डॉ ॲनी बेझंट यांनाहि बोलावून आणिले होते. या प्रसगानुरोधानें लोकमान्यानीं अमृतसरच्या ठरावाचें पुढील शब्दांत स्पष्टीकरण केले आहे :

"राष्ट्रीय सभा हातात पडलेल्याचा उपयोग करा म्हणून सांगत आहे. पण जें हातात पडलें आहे तें समाधानकारक नसून निराशाजनक असल्यामुळे पार्लमेंटसभेकडून पूर्ण स्वराज्याचे हक्क मिळेपर्यंत चळवळ करा, अशी दिशा राष्ट्रीय सभेने दाखविली आहे. या दिशेने जात असताना सर्व हिंदी राष्ट्राचें कल्याण व्हावें म्हणून नोकरशाहीशीं काही वेळा सहकारितेने तर काहीं वेळां बिनसहकारितेनें वागावें लागेल. राष्ट्रीय सभेच्या या सहकारितेच्या व बिनसहकारितेच्या दोन्ही मार्गांनीं प्रसंगानुसार जाणारे तेच राष्ट्रीय सभेचे खरे भक्त होत. इतर राष्ट्रीय सभेचे भक्त नव्हत जे भक्त नाहींत त्याना निवडून देऊं नका." पुढें २० एप्रिलच्या अंकात कौन्सिलात गेल्यानतर आपला राष्ट्रसभेंतील लोकशाही पक्ष कसा वागेल त्याची कल्पना लोकांस देताना लोकमान्य लिहितात :

"गोडीगुलाबीने वागून नव्हे, तर कायदेशीर रीतीनें भांडून शक्य तितक्या लवकर सरकारवर आम्हास कुरघोडी कर्तव्य आहे .... काल पालटला, मनु पालटला, नोकरशाही दुभंगली; आता पुढे ज्या तोफा व जे गोळे सोडून पुढील कार्यभाग साधून घ्यावयाचा आहे, ते त्या कार्याला समर्थ असतील असेच घेतले पाहिजेत हें निर्विवाद आहे. कोणी म्हणतील, कीं अशा रीतीने तुम्ही वागल्यास हल्लींच्या कायद्याची धूळदाण करण्याचे पाप तुम्ही आपल्या कपाळीं घ्याल. पण या मूर्खांस असे कळत नाहीं, कीं या कायद्यातून जर पुढे पूर्ण स्वराज्याचा कायदा उत्पन्न करावयाचा आहे, तर याचें आयुष्य जितक्या लवकर संपेल तितकें आम्हांस इष्टच आहे ज्याला पतंग व्हावयाचें आहे, तो फार दिवस सुरवटाच्या स्थितींत कसा राहणार?" हा लेख लो. टिळकानीं कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्ष स्थापन केला त्या वेळीं त्याच्या जाहीरनाम्याचा खुलासा करण्यासाठीं लिहिलेला आहे यावरून कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहीरनाम्यात जें धोरण आखिलें होतें, त्याचे स्वरूप काय होते ते स्पष्टपणे दिसून येते. आपल्या धोरणाने सुधारणाकायद्याची धूळदाण होणार हे लोकमान्य कबूल करीत होते पण या कायद्याची अशी धूळदाण केल्याखेरीज आपणांस संपूर्ण स्वराज्याचा कायदा प्राप्त होणार नाहीं, असे त्याचे स्पष्ट मत या लेखांत त्यानीं माडिले आहे लोकमान्याच्या प्रसिद्ध लेखातील हा शेवटचा लेख आहे व तोच त्यांचा आपल्या शिष्यास अखेरचा संदेश आहे असें समजण्यास हरकत नाहीं. हा सदेश पुढे कोणीं किती आचरिला हे पुढील हकिकतीवरून वाचकाच्या ध्यानात येईल. ज्या कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहीरनाम्यावर त्यांनी हा लेख लिहिला होता, त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें देऊन हें प्रकरण आटोपतें घेतों.

## कॉंग्रेसमधील लोकशाही पक्षाचें धोरण

"कॉंग्रेसच्या डेमोक्रॅटिक पक्षाचें धोरण त्याच्या नांवावरूनच व्यक्त होत असून कॉंग्रेसविषयीं अढळानिष्ठा आणि डेमॉक्रसी (लोकशाही) वर दृढ विश्वास हे

त्यांतील बीज होय. हिंदी राष्ट्रापुढील प्रश्नांचा निकाल लावण्याचे सामर्थ्य लोकशाही-च्या तत्त्वांत आहे व ते कार्य साधण्याला शिक्षणप्रसार व मतदारांच्या संख्येची वाढ हीं दोन अमोघ शस्त्रें आहेत, असें या पक्षाचे मत आहे जातिभेद अथवा रूढि यांमुळें नागरिक, व्यावहारिक वा सामाजिक बाबतींत जी कोणाची नालायकी समजली जात असेल ती नालायकी दूर करण्यांत यावी, असें हा पक्ष प्रतिपादन करील. धार्मिक बाबतींत सहिष्णुता असावी आणि स्वतःपुरता ज्याचा त्याचा धर्म ज्याला त्याला पवित्र असून इतरांनीं त्यात बिघाड करण्याचा प्रयत्न केल्यास त्यापासून त्या धर्मांचे रक्षण करणे हे सरकारचें न्याय्य कर्तव्य आहे असें या पक्षाचें मत आहे. तसेच मुसलमानांच्या धार्मिक भावना व कुराणांतील वचनें यास अनुसरून खिलाफतीचा प्रश्न सोडविला जावा अशी जी मुसलमानाची मागणी आहे, तिला या पक्षाचा पाठिंबा आहे.

"सर्व मानवजातींत बंधुभाव वाढून एकंदर मनुष्यमात्राची उन्नति होण्या-साठीं ब्रिटिश साम्राज्यमंडळात हिंदुस्थान सामील असावा आणि तो त्याचा एक घटक असावा हे या पक्षास मान्य आहे, परंतु खुद्द ग्रेटब्रिटन धरून या साम्राज्याचे जे भागी-दार आहेत त्याच्या बरोबरीनें हिंदुस्थानचा दर्जा रहावा व त्याचा कारभार पूर्णपणे त्याच्या ताब्यात असावा अशी या पक्षाची मागणी आहे ब्रिटिश साम्राज्याच्या कोठ-ल्याहि भागांत हिंदी लोकांस इतर नागरिकांच्या बरोबरीनें हक्क मिळाले पाहिजेत व जेथें तसे हक्क न मिळतील तेथे 'जशास तसें' या न्यायानें प्रतिकार करण्याचा हिंदु-स्थानास अधिकार पाहिजे जगात शांतता प्रस्थापित करणें, आज अस्तित्वांत अस-लेल्या व येणाऱ्या राष्ट्रांचा कोणालाहि लचका तोडूं न देता तीं अभंग राखणें, राष्ट्रांचें स्वातंत्र्य व अब्रू रक्षण करणे आणि एका देशाकडून दुसऱ्या देशाची होणारी व्यापारी लुबाडणूक बंद पाडणें, या गोष्टी घडवून आणण्यासाठीं निर्माण झालेल्या राष्ट्रसंघ-संस्थेचे हा पक्ष आनंदानें अभिनंदन करीत आहे.

"जबाबदार प्रातिनिधिक राज्यशासनपद्धतीने राज्य चालविण्यास या देशांतील लोक पूर्णपणें लायक आहेत असे या पक्षाचें ठाम मत असून **येथील राज्यपद्धति कशी असावी आणि कायदेकानू कसे असावे हे ठरविण्याचा हक्क स्वयं-निर्णयाच्या तत्त्वानें केवळ हिंदी लोकांसच असला पाहिजे**, अशी या पक्षाची मागणी आहे मॉटेग्यूसाहेबाचा 'रिफॉर्म ॲक्ट' हा अपुरा, असमाधानकारक व निराशाजनक आहे असे या पक्षाचे मत असून इंग्लंडांतील मजूरपक्ष व पार्लमेंटां-तील सहानुभूति बाळगणारे इतर सभासद याच्या साहाय्यानें या 'रिफॉर्म ॲक्टां'-तील दोष काढून दुरुस्ती-बिल शक्य तितक्या लवकर पार्लमेंटात आणण्याचा या पक्षाकडून प्रयत्न करण्यात येणार आहे या दुरुस्ती-बिलात **हिंदुस्थानच्या लोकांस संपूर्ण स्वराज्याचे हक्क मिळावे, अर्थातच हिंदी लष्करावर त्यांचा पूर्ण ताबा चालावा, आर्थिक स्वातंत्र्य मिळावें आणि प्रजेच्या संपूर्ण नैसर्गिक हक्कांची प्रजेस कायदेशीर हमी देण्यांत यावी**, अशी योजना

करण्यांत येणार आहे. हा हेतु साध्य करण्याकरितां हिंदुस्थानांत वा राष्ट्रसघांतील बाहेरच्या इतर देशांत नेटानें व निश्चयाने चळवळ करण्याचा या पक्षाचा उद्देश असून त्या पक्षाची इतरांसहि तशी शिफारस आहे. थोडक्यांत म्हटले म्हणजे या बाबतींत 'शिक्षण, चळवळ व संघटना' हेच या पक्षाचें मंत्रवाक्य राहील

"मॉटेग्यूसाहेबांच्या रिफॉर्म ॲक्टाने जे कांहीं मिळेल ते पदरांत घेऊन, पूर्ण स्वराज्य आपल्या आटोक्यात जलदीने आणण्याच्या कामीं त्याचा उपयोग करण्याचा या पक्षाचा इरादा असून त्यासाठी लोकमतानुसार इष्ट दिसेल त्याप्रमाणे शक्य तेथे सहकारिता व जरूर तेथें सनदशीर विरोध करण्यात येईल"*

अशा रीतीने लो. टिळकांनी कॉंग्रेसवर अढळ निष्ठा आणि 'डेमॉक्रसी-(लोकशाही) वर दृढ विश्वास' या मजबूत पायावर कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाची स्थापना केली आणि नेमस्तपणाचा व बिनशर्त सहकारितेचा काळ सपून आता दुभंगलेल्या नोकरशाहीवर पल्लेदार तोफांतून गोळे फेकून चढाईचा हल्ला करण्याची वेळ आली आहे असे जाहीर केले राष्ट्रसभा प्रागतिकांच्या हातून राष्ट्रीय पक्षाच्या हातीं आणून दिली आणि मॉटफोर्ड-सुधारणांना मोहून न जाता लष्कर व तिजोरी याच्या-वर ताबा देणारें—सपूर्ण ताबा देणारे—पूर्ण स्वराज्य मिळेपर्यंत झगडण्यासाठीं राष्ट्र-सभेची कायदेमंडळात नोकरशाहीशीं सनदशीर विरोधाने लढणारी एक तुकडी तयार केली. राष्ट्राला स्वयनिर्णय व सपूर्ण स्वराज्य प्राप्त होण्यासाठीं कायदेमडळाबाहेर व हिंदुस्थानबाहेरहि प्रचंड चळवळ करण्याची आखणी केली आतां राष्ट्रीय आपद्धर्माच्या आचरणाचा काळ सपला होता अमृतसर येथील जानियनवाला बागेंतील अमानुष कत्तलीवर सफेती फांसणारा सरकारी रिपोर्ट थोड्याच दिवसात बाहेर पडला हा रिपोर्ट बाहेर पडताच आतां हिंदुस्थानातील सनदशीर राजकारणाचे युग सपलें, असे महात्मा गांधींच्या मनानें घेतलें आणि त्यांनीं निःशस्त्र क्रांतीची दीक्षा हिंदुस्थानास देण्याचा आपला दृढनिश्चय जाहीर केला लोकमान्यांनीं म. गांधीना सागितलें कीं, "लोक तुमच्या शस्त्राचा अवलब करीत असतील तर मी तुमचाच आहे" (If the people follow your method, I am yours.) कारण हटर-कमिटीचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर साम्राज्यशाही सहकारिता करण्यास तयार नाही असे उघड झालें होतें आता प्रतियोगी सहकारितेला असहकारितेचें स्वरूप येणे अपरिहार्यच होतें. कारण निःशस्त्र क्राति किंवा सशस्त्र क्रांति याखेरीज तिसरा मार्ग हिंदी राष्ट्रीय सभेला उरला नव्हता यांपैकीं निःशस्त्र क्रातिवाद हाच मार्ग आपल्या परिस्थितीस अनुरूप आहे हे लोकमान्य जन्मभर सागत आलेच होते आतां म. गाधीसारखा लोकोत्तर पुढारी लाभला, तेव्हा लोक तुमच्या मार्गाने येत असतील तर मी तुमचाच आहे, असे आश्वासन त्यांनीं गांधीजींना दिले तर त्यांत कांहीच आश्चर्य नव्हतें. आपत्कालांतील सनदशीर व कायदेशीर चळवळींचीं बधने तोडून टाकून

* लो. टिळकाचे केसरीतील लेख, भाग ३ रा, पृ. ४७९.

आतां निःशस्त्र क्रांतीचा उघड पुकारा करण्याचा काळ आला होता दुर्दैवाने या असहकारयुद्धाचा सोहळा प्रत्यक्ष पाहण्यास लोकमान्य जिवत राहिले नाहींत ता १ ऑगस्ट १९२० रोजीं त्यांचें मुबईस देहावसान झालें आणि त्यानी आपल्या अतःकरणांत आजन्म सगोपन करून ठेविलेली आणि स्वार्थाचे हवन करून सवर्धित केलेली क्रांतीची ज्योत त्यांच्या देहाच्या बंधनातून मुक्त होऊन सर्व भरतखंडभर फैलावली ! लोकमान्याच्या देहावसानाचा दिवस तोच हिंदी राष्ट्राच्या स्वातन्त्र्ययज्ञांतील असहकारदीक्षेचा दिवस ठरला. लोकमान्याचा देह पचत्वात विलीन झाला आणि त्याचा क्रांतिकारक आत्मा सर्व भरतखडास व्यापून राहिला !

## ११

# भारतीय सत्याग्रह-संग्राम

" May I also suggest that in hondering over and concentrating our attention upon Passive Resistance, such as has been described above, we would perchance find out that, for the many ills we suffer from in India, Passive Resistance is an infalliable panacea It is worthy of careful study, and I am sure it will be found that it is the only weapon that is suited to the genius of our people and land, which is the nursery of the most ancient Religions and has very little to learn from modern civilization — a civilization based on violence of the blackest type, largely a negation of the Divine in Man, and which is rushing headlong to its own ruin

— *Mahatma Gandhi's message to the Congress in 1909*

" नीतीचा मार्ग सुखाचा, समाधानाचा आणि शांततेचा असतो आणि त्या मार्गाने जाण्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीत जर स्वार्थामुळे थोडी चलबिचल होण्याचा सभव असला, तर हे कायद्याचें शासन ती चलबिचल काढून मनुष्याची सन्मार्गाकडे असलेली स्वाभाविक निष्ठा दृढ करण्यास कारणीभूत होते पण त्याच्या उलट स्थितीत म्हणजे जेव्हा कायद्याने ठरविलेली मर्यादा धर्ममूलक अगर न्यायमूलक नसून केवळ कायद्यात सागितलेल्या शासनामुळेच ती अमलात यावी असा प्रचलित कायद्याचा परिणाम होऊ लागतो, तेव्हा कायद्याने दिलेले शासन भोगून धर्मतत्त्वावरची किंवा न्यायतत्त्वावरची आपली सत्यनिष्ठा कसोटीला लावावी अथवा कृत्रिम कायद्यातील शासनाच्या भीतीने ईश्वरनिर्मित न्यायतत्त्वाचा अव्हेर करण्यास प्रवृत्त व्हावे, असा शहाण्यासुर्त्या मनुष्याच्या डोळ्यापुढेहि एक महत्त्वाचा प्रश्न उभा राहतो. सत्यनिष्ठ आणि न्यायनिष्ठ माणसे कायद्याचा कृत्रिम निर्बंध अशा वेळी पाळणें युक्त नाही असे सागतात पण हें सागणे अमलात येण्यास सत्यावरील व न्यायावरील निष्ठा इतकी तीव्र असावी लागते, की स्वतःच्या किंवा आपल्या बायकामुलाच्या सुखासुखाचा, बलाबलतेचा विचारहि मनात न आणता मनुष्य आपलें कर्तव्य करण्यास झटदिशी प्रवृत्त होईल. ज्याला मानसिक धैर्य, खरी

सत्यनिष्ठा किंवा सात्त्विक शील आणि दानत म्हणतात, ते हेंच होय. हा गुण केवळ विद्वत्तेनें येत नाहीं आणि केवळ बुद्धिमत्तेनेहि येत नाहीं, आणि उपनिषदांतील ' नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन।' हे तत्त्व नीट लक्षात ठेवले पाहिजे.... "

" देशात शांतता राखण्यासाठी जे कायदे केलेले असतात, त्यांत राज्यकर्त्या अमलदाराशीं दाडगाई करणें अथवा त्याचा हुकूम तोडून बंड करणें, ह्या गोष्टी कितीहि सद्‍बुद्धीने केलेल्या असल्या तरी स्वभावत च बेकायदेशीर मानल्या जातात. अशा वेळी ज्या देशभक्तास आपली इच्छित सुधारणा कायदेशीर रीतीनें अमलात आणावयाची असेल, त्याच्या मार्गात अनेक अडचणी उत्पन्न होतात. मन जळत असते, सुधारणा करण्याची उत्कट इच्छा असते, कायद्याच्या मर्यादेचें उल्लघन करणे गैरशिस्त होय अशी खात्री असते, पण उपाय सुचत नाही गांधी यानी स्वीकारलेला नि शस्त्र प्रतिकाराचा, अडवणुकीचा किंवा त्याच्या भाषेत बोलावयाचे तर सत्याग्रहाचा मार्ग अशा प्रकारच्या अडचणीतच त्यांस सुचलेला असून त्यानी अडचणी सोसून त्या मार्गाचा अवलंब केल्यामुळे तो आता शास्त्रपूत झाला आहे."

—लो. टिळक यांची म. गांधींच्या चरित्रास प्रस्तावना.

मागील प्रकरणाच्या अखेरीस सांगितल्याप्रमाणें १९२० सालच्या १ ऑगस्ट या तारखेस हिंदुस्थाननें म. गांधींच्या नेतृत्वाखालीं ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध सत्याग्रह-सग्राम पुकारला. हा सत्याग्रह-सग्राम हिंदुस्थानला संपूर्ण स्वराज्य प्राप्त होई-पर्यंत निरनिराळया रूपानें चालू राहिला याचा अर्थ हिंदुस्थानला ब्रिटिशाच्या हातांतील राज्यसत्ता पूर्णपणे प्राप्त झाली, यामुळे आता हिंदुस्थानास सत्याग्रहाची आवश्यकता नाही, असा नव्हे. या म्हणण्याचा अर्थ इतकाच आहे, कीं १९२० साली राष्ट्रसभेनें असहकारयुद्धाच्या रूपाने जो सत्याग्रह-सग्राम सुरू केला, तो त्या कार्यात यशस्वी ठरला. यानतर ब्रिटिशांच्या हातांतील सत्ता हिंदी राष्ट्राच्या हाती आल्या-नंतर त्या सत्तेचा उपभोग कसा घ्यावा, तिचा उपयोग कोणत्या कार्यासाठीं करावा, आणि कोणत्या प्रकारच्या समाजधारणेस या राजसत्तेचा पाठिंबा मिळावा, इत्यादि यापुढील अत्यत महत्त्वाच्या प्रश्नांकडे हिंदुस्थानास या सत्याग्रह-शस्त्राचा उपयोग करावा लागेल. लोकमान्याच्या निधनानंतर ताबडतोब हिंदी राजकारणाचीं आणि राष्ट्रसभेचीं सूत्रें म गांधींच्या हाती कशीं आलीं, आणि हिंदुस्थानांत त्या वेळीं जे निरनिराळे राजकीय पुढारी कार्य करीत होते, त्या सर्वांहून हिंदुस्थानातील जनतेचा पाठिंबा आणि विश्वास म गांधींना अधिक मोठ्या प्रमाणावर एकाएकीं कसा संपादन करतां आला, हा आधुनिक भारताच्या इतिहासातील एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळाल्याखेरीज आधुनिक भारताचें स्वरूप कोणासहि योग्य प्रकारें कळणे शक्य नाहीं. यासाठीं १९२०च्या पूर्वी म. गांधी हिंदु-स्थानांत काय करीत होते, हिंदुस्थानांतील जनता व राष्ट्रीय पुढारी यांची त्यांच्याकडे पाहण्याची कोणती दृष्टि होती आणि ब्रिटिश राज्यकर्ते म. गांधींच्याकडे कोणत्या दृष्टीनें पहात होते, या प्रश्नांचा थोडा विचार करणें येथें अवश्य आहे.

# १९१५ ते १९२० मधील गांधी

सन १९१५च्या जानेवारींत म. गांधी हिंदुस्थानांत आले त्या वेळीं हिंदी राजकारणांत ना. गोखले व लो टिळक यांचे दोन पक्ष होते या दोन पक्षांशिवाय एक सशस्त्र क्रांतिवादी पक्ष होता. गोखल्याचें सनदशीर राजकारण, लोकमान्याचा अडवणुकीचा बहिष्कारयोग आणि सशस्त्र क्रातिवाद्याचा गुप्तमार्ग, हे सर्वच एका दृष्टीने या वेळीं अयशस्वी झाले होते अशा वेळीं म. गाधी हे आपल्या सत्याग्रहाच्या शस्त्रानें दाक्षिण आफ्रिकेत यश संपादून हिदुस्थानांत एक यशस्वी पुढारी म्हणून आलेले होते. या प्रकरणाच्या प्रारंभीं दिलेल्या उताऱ्यांत लोकमान्य टिळकांनीं म्हटल्याप्रमाणें या वेळी म गांधींचा सत्याग्रहाचा मार्ग हा राज्यकर्त्यांच्या दृष्टीनेंहि एक प्रकारें शास्त्रपूत झालेला होता व म गांधी हिंदुस्थानात आल्यानंतर आता पुढें कोणतें धोरण स्वीकारणार, याबद्दल जहाल, मवाळ आणि सरकार या सर्वानाच एक प्रकारें कुतूहल वाटत होतें. त्या वेळीं महायुद्ध नुकतेंच सुरू झालें असल्यामुळें आणि या महायुद्धात आपण ब्रिटिश साम्राज्यास साहाय्य करणार असें धोरण महात्मा गांधींनी हिंदुस्थानात येण्यापूर्वी इंग्लडांतच जाहीर केले असल्यामुळें आपणांस या वेळीं म. गांधी यांच्या सहकार्याचा लाभ होईल अशी त्यांच्याकडे पाहाण्याची सरकारची वृत्ति होती हिंदुस्थानात येतांच लॉर्ड विलिंग्डन–मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर–यांची व त्याची मुंबईस पहिलीच भेट झाली. त्या वेळी आपण ना. गोखले यांचे शिष्य आहोत असें त्यांनीं त्यास सागितले. यावरून सरकारचा त्यांच्यावरील विश्वास अधिकच दृढ झाला. ना गोखले यांनीं सर फेरोजशहा मेथा यांची व म गाधींची मुलाखत घडविली, त्या वेळीं सर फेरोजशहा यांनीं ‘ हिंदुस्थान म्हणजे दक्षिण आफ्रिका नव्हे, हें लक्षांत ठेवून पुढील कार्यक्रम आंखा ’ असा थोड्या विनोदी भाषेत पण गभीर स्वरूपाचा सल्ला अथवा इषारा त्यास दिला म गाधींनीं १९०९ सालीच राष्ट्रसभेला एक सदेश पाठविला होता त्या सदेशात हिंदुस्थानच्या सर्व आपत्तीच निवारण करण्याचा रामबाण उपाय म्हणजे सत्याग्रह हाच होय आणि हे साधन आधुनिक भौतिक सुधारणेमुळे विनाशाकडे धावत जाणाऱ्या मानवतेच्या उद्धारासहि उपयोगी पडेल असे लिहिलें होते नि.शस्त्र प्रतिकाराच्या मार्गाचा पुरस्कार करणाऱ्या जहाल पक्षास आपल्यातून नुकतेच काढून टाकल्यामुळे ती कटकट आतां मिटली, असें मानणाऱ्या राष्ट्रसभेच्या प्रागतिक पुढाऱ्यांना हा संदेश वाचून त्या वेळीं काय वाटलें असेल, हे सांगणें थोडें कठिणच आहे दाक्षिण आफ्रिकेत राजसत्तेशीं आत्म-बलाचा झगडा देण्यामुळें ज्या कर्मवीराची कीर्ति सर्वत्र पसरत होती, त्याचाहि पाठिंबा आपल्या सनदशीर व नेमस्त राष्ट्रसभेस आहे हे जगाला दाखविण्यास हा औपचारिक सदेश पुरेसा आहे, या दृष्टीनेच त्यांनीं तो वाचला असेल ! तथापि ना. गोखले याना म. गांधी हे हिंदुस्थानांत आल्यावर कोणत्या ना कोणत्या तरी

स्वरूपांत हिंदी राजकारणांत सत्याग्रही वृत्ति निर्माण करणार, अशी अपेक्षा असणें अशक्य नव्हतें आधुनिक युरोपीय संस्कृतीसंबंधीं गांधींची तुच्छताबुद्धि आणि प्राचीन भारतीय सस्कृतीसंबधीं त्यांचा विलक्षण आदर व आत्मश्रद्धा हे पाहून ह्या आत्मश्रद्धेच्या जोरावर हिंदुस्थानांतील वस्तुस्थिति लक्षात न घेता ते एकादी उतावीळपणाची चळवळ करतील अशी भीति ना गोखले याना वाटत होती, आणि म्हणून त्यांनी त्यांना असा इषारा दिला, की निदान एक वर्षभर हिंदुस्थानांतील परिस्थितीचे पूर्ण निरीक्षण केल्याखेरीज तुम्ही आपल्या कार्याचे धोरण आखू नका गांधींजींनीं त्याना तावडतोब तसें आश्वासन दिले या वर्षात त्यानी सर्व हिंदुस्थानभर दौरा काढिला आणि निरनिराळया राजकीय पुढाऱ्याशीं चर्चा व वाटाघाटी केल्या या वेळीं काही दिवस म गाधी व लो टिळक हे सिंहगडावर एकत्र राहिले होते, व त्यानीं परस्पराचे तत्त्वज्ञान व राजकारण यासबधीं चर्चा करून एकमेकांचीं अतःकरणे समजावून घेतलीं होतीं या वेळेपासून लोकमान्यांचे व महात्माजींचें परस्परांवरील प्रेम व आकर्षण हीं वाढतच गेली.

लोकमान्यानीं म गाधीच्या सत्याग्रहासंबधी स्वत.चे मत या प्रकरणाच्या प्रारभीं दिलेल्या उताऱ्यात व्यक्त केलेलें आहे चिरोल केसमध्ये त्याना विचारण्यात आलेल्या काही प्रश्नास त्यानी दिलेली उत्तरे वाचल्यास लो टिळक पूर्वी ज्या निःशस्त्र प्रतिकाराचा उपदेश करीत असत, त्याचें समर्थन अखेरीस धार्मिक भावनेच्या आधारेच करावे लागते हे त्यानी जाणले होतें असे दिसून येते तीं प्रश्नोत्तरें अशी

"प्रश्न :— सभा व विनत्या याना तुम्ही पोरखेळ म्हटले आहेना ?

उत्तर :— होय, जेव्हा त्याचा उपयोग नाही, तेव्हा त पोरखेळच.

प्रश्न :— पण यापलीकडे काय करावयाला हवें होतें ?

उत्तर :— निःशस्त्र प्रतिकार.

प्रश्न :— म्हणजे काय ?

उत्तर .— स्वतः दुःख सोसून प्रतिकार करणे

प्रश्न .— स्वतः दुःख सोसल्याने प्रतिकार कसा होतो ?

उत्तर :— धार्मिक भावनेने आपण दु.ख सोसले म्हणजे इतरावरहि त्याचा परिणाम होतो, असें धर्मग्रथात सागितले आहे"

लो टिळकानीं दिलेली हीं उत्तरे कायद्याच्या कोर्टातील असलीं, तरी नि.शस्त्र प्रतिकाराचे तत्त्वज्ञान त्यात गोविलें आहे. प्राचीन उपनिषदांतील आत्मबलाच्या आधारावर या तत्त्वज्ञानाची उभारणी झालेली आहे व म. गांधीनी हा मार्ग स्वतःच्या आचरणानें शास्त्रपूत ठरवून घेतला आहे, असे त्यांनी गाधीजीच्या चरित्रास लिहिलेल्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे. तेथे त्या मार्गासंबधीं ते म्हणतात : "हा मार्ग सर्व प्रसंगीं, सर्व कालीं अवलबिण्यासारखा असला, तरी हरएक प्रसंगी उपयोगांत आणावाच की नाही, अगर सर्व प्रसगीं तितकाच फलद्रूप होईल किंवा नाही, हें निश्चयानें

सांगणे कठिण आहे तथापि त्या मार्गाची योग्यता मोठी आहे, हें सर्वांस कबूल करावें लागेल."* १९१८ च्या मार्च महिन्यात लो टिळकांनीं हे उद्गार काढिलेले आहेत यावरून त्यांची सत्याग्रहमार्गाच्या श्रेष्ठतेसबधीची भावना व्यक्त होते अशा प्रकारे म गांधी व त्याचा सत्याग्रहमार्ग याच्याकडे हिंदुस्थानातील मोठमोठे पुढारी आदराने पहात होते व गांधींनी १९१५ पासून १९२० सालापर्यंतच्या कालात जी भाषणें व ज्या चळवळी केल्या, त्यामुळे सामान्य जनतेची चित्ते त्यानी आपणाकडे आकर्षित करून घेतली होती या कालात त्यानी कोणकोणत्या चळवळी केल्या, त्याचें आता थोडक्यात सिंहावलोकन करू.

## बनारस विद्यापीठांतील भाषण

म गांधीच्या ज्या एका भाषणानें हिंदुस्थानातील सामान्य जनतेचे लक्ष विलक्षण रीतीनें त्याच्याकडे वेधून घेतले, तें भाषण म्हणजे १९१६च्या फेब्रुवारीत बनारस येथील हिंदु विश्वविद्यालयाच्या उद्घाटनसमारभाच्या वेळी त्यांनी केलेलें भाषण होय या उद्घाटनसमारभास हिंदुस्थानांतील सर्व प्रसिद्ध पुढारी आणि राजे-महाराजे यांना प मालवीय यांनीं निमत्रण दिलेले होतें. आणि या समारभाच्या स्वरूपास साजेल अशा प्रकारे तेथें जमलेल्या मोठमोठ्या लोकाची भाषणे करण्याचे एक मोठे ज्ञानसत्र तेथे सुरू होते लॉर्ड हार्डिजप्रभृति मोठमोठे अधिकारी या समा-रभास भेट देऊन जात होते, आणि हिंदुस्थानातील उत्साही अन्तःकरणाचे शेकडो विद्यार्थी या ज्ञानसत्रात श्रवणभक्तीच्या रूपाने आपल्या कर्तव्याचे धडे घेत होते ता. ४ फेब्रुवारी रोजीं अशा या समारभात शेकडो विद्यार्थ्यांच्या, अनेक राजेरजवाड्याच्या आणि डॉ बेझटप्रभृति अनेक राष्ट्रीय पुढाऱ्याच्या समाजापुढें म गाधींचे हे सुप्रसिद्ध भाषण झाले या भाषणातील काही भाग अत्यत ओजस्वी असून त्यातील विचार स्पष्टपणे बोलून दाखविणे हे राजकीय दृष्टया धोक्याचें आहे असे वाटून डॉ. बेझट यानी या भाषणात मध्येच अडथळा केला , पण ते भाषण तसेंच पुढें चालू झाल्याचें पाहून त्या मध्येच सभागृहातून उठून गेल्या. त्याच्याबरोबर तेथे जमलेले राजेमहाराजेहि उठून गेले व त्या दिवशीचें तें ज्ञानसत्र तसेंच अर्धवट राहिले. या भाषणातील पुढील भाग महत्त्वाचा आहे :

"राष्ट्रसभेनें स्वराज्याचा ठराव केलेला आहे आणि ऑल इडिया कॉंग्रेस कमिटी व मुस्लिम लीग या संस्था लवकरच एकादा कार्यक्रम लोकापुढे ठेवतील, याबद्दल मला शका नाहीं पण माझ्याविषयी बोलावयाचें तर मी स्पष्टपणे तुम्हास सागू शकतो, की हे पुढारी काय करतील इकडे माझे फारसे लक्ष नसून देशातील विद्यार्थी आणि देशांतील सामान्य जनता काय करणार आहेत, इकडे माझे लक्ष आहे ...... ... काल ज्या महाराजानी अध्यक्षपद स्वीकारिले होते, ते हिंदुस्थानच्या दारिद्र्यासंबंधीं

* लोकमान्य टिळक याचे चरित्र, खड ३ रा, भाग ४ था, पृ. ५२.

बोलले. इतरहि वक्त्यांनीं ह्या मुद्द्यावर फार जोर दिला. पण ज्या मंडपांत व्हाइसरॉयनीं उद्घाटनसमारंभ साजरा केला, त्या भव्य मंडपांत आपणांस कोणते दृश्य दिसले? ते एक भपकेबाज दृश्य होतें! एकाद्या पॅरिसहून आलेल्या जवाहिऱ्याच्या नेत्राना सतुष्ट करणारें असें ते एक जडजवाहिराचे प्रदर्शन होतें! बहुमोल रत्नानी नटलेले हे सरदार-लोक आणि देशांतील लक्षावधि दरिद्री जनता याच्या परिस्थितीची मीं तुलना केली. मला असे वाटूं लागले, कीं जोंपर्यंत तुम्ही या जवाहिराचा त्याग करून आपले हे धन राष्ट्राचा निधि म्हणून धारण करण्यास तयार नाही, तोंपर्यंत हिंदुस्थानला मुक्तता मिळणार नाही, असे या सरदारास सांगावे... .... आमच्या देशांतील शेकडा ७५ लोक शेतकरी आहेत, आणि मि हिगिन् बोथहॅम यानी काल रात्रीं सागितल्या-प्रमाणे शेतात धान्याच्या एका ताटाऐवजीं दोन ताटे पिकविण्याचे सामर्थ्य याच शेतकरीलोकात आहे, पण त्याच्या श्रमानें निर्माण केलेले सर्व फल जर आम्हीं त्यांच्या-पासून लुबाडून घेतलें किंवा दुसऱ्यास लुबाडूं दिलें, तर आमच्यात स्वराज्याची वृत्ति फारशी जागृत आहे असे म्हणतां येणार नाहीं. आमची मुक्तता या शेतकऱ्यांमार्फतच होऊं शकेल वकील, डॉक्टर किंवा सधन सरदार हे ती आम्हास देऊ शकणार नाहींत.

"गेल्या दोनतीन दिवसात ज्या गोष्टीमुळे माझ्या अतःकरणात खळबळ उडून गेली आहे, त्या गोष्टींसंबधीं अखेरीस बोलणे माझे अवश्य कर्तव्य आहे. या विषयाचा मी शेवटीं उल्लेख करतो म्हणून तो कमी महत्त्वाचा आहे असे समजू नका बनारस-मधील रस्त्यातून व्हाइसरॉय जात असता आमच्या सर्वांच्या अतःकरणात वारंवार काळजीचे विचार येत होते. ठिकठिकाणीं गुप्त पोलिस उभे होते. हें पाहून आम्हांला धक्का बसला आम्ही मनात म्हणालो, हा अविश्वास का? असे जिवत मृत्यूच्या सान्नि-ध्यात जगण्यापेक्षा लॉर्ड हार्डिंज हे मले तरी अधिक सुखी होणार नाहींत काय? पण एका प्रबल बादशहाच्या प्रतिनिधीला कदाचित् तसें वाटणार नाहीं त्यांना जिवंत मृत्यूच्या सान्निध्यात जगणे हेहि आवश्यक वाटेल. पण हे गुप्त पोलिस आमच्यावर लादण्याची आवश्यकता का पडली? आम्हास त्याबद्दल राग येईल, चीड येईल, तिरस्कार येईल, पण आपण हे विसरता कामा नये, की हिंदुस्थान आज उतावीळ झाल्यामुळें त्यांत एक अराजकाची सेना निर्माण झालेली आहे मीहि एक अराजकच आहे. पण तो दुसऱ्या प्रकारचा अराजक आहे पण आमच्यामध्ये अराजकाचा एक वर्ग आहे; आणि मी जर या अराजकवर्गाशी बोलू शकलों तर मी त्याना सागेन, कीं तुमच्या अराजकपणास हिंदुस्थानांत अवकाश नाहीं जर हिंदुस्थानला आपल्या जेत्यावर विजय मिळवावयाचा असेल, तर हे एक भितीचें लक्षण आहे आमचा जर परमेश्वरावर विश्वास अगर श्रद्धा असेल, तर आम्ही कोणासहि भिणार नाहीं; महाराजांना भिणार नाहीं व्हाइसरॉयना भिणार नाहीं, गुप्त पोलिसाना भिणार नाहीं, खुद्द जॉर्ज बादशहांना भिणार नाहीं. अराजकांच्या देशप्रेमाबद्दल मी त्यांना मान देतों आपल्या देशाकरिता प्राणत्याग करण्यास तयार होण्याच्या शौर्याबद्दल मी त्यांना मान देतों. पण मी त्यांना विचारतो, हत्या कर-

ण्यात मोठेपणा आहे काय? खून करण्याचा सुरा हें मानाच्या मृत्यूचें योग्य चिह्न आहे काय? मी तें नाहीं म्हणतों अशा मार्गास कोणत्याहि धर्माचा आधार नाहीं. जर मला असें अवश्य वाटलें, कीं हिंदुस्थानच्या मुक्ततेसाठीं इंग्लिश लोक येथून गेले पाहिजेत, त्याना हाकलून दिलें पाहिजे, तर मी तसे जाहीर करीन आणि मला आशा आहे, कीं त्या श्रद्धेच्या सरक्षणासाठीं मी माझे प्राणहि अर्पण करण्यास तयार होईन. माझ्या मतें हा मानाचा मृत्यु आहे. बॉम्ब टाकणारे गुप्त कट करतात, प्रकट होण्यास भितात, आणि सापडले म्हणजे आपल्या चुकलेल्या मार्गातील उत्साहाचें शासन भोगतात मला कांहीं लोक म्हणतात, आम्हीं जर असें केलें नसते, काहीं लोकानीं जर बॉम्ब टाकले नसते, तर वंग-भगाच्या चळवळीमुळें आम्हास जें मिळालें, तें मिळालें नसतें (डॉ. बेझट—कृपा करून हा विषय थाबवा.) बगालमध्यें मि. लिऑन याच्या अध्यक्षतेखालच्या सभेत मी हेंच बोललों होतों. मी जें म्हणत आहें तें अवश्य आहे, असे मला वाटतें. मला थाबण्याची आज्ञा होईल तर मी थाबेन. (अध्यक्षाकडे वळून) मी आपल्या आज्ञेची वाट पहात आहें जर आपणांस वाटत असेल, की माझ्या भाषणाने मी राष्ट्राची व साम्राज्याची सेवा करीत नाहीं, तर मी खात्रीने थाबेन. (चालू द्या, चालू द्या, अशी ओरड अध्यक्ष—आपला हेतु स्पष्ट करून सागा) मी माझा हेतूच विशद करीत आहे. मी फक्त...... (पुन्हा अडथळा होतो) मित्र हो, कृपा करून या अडथळयाबद्दल तिरस्कार व्यक्त करूं नका. डॉ. बेझंट याना मीं थाबावें असे वाटत असेल, तर त्याचे हिंदुस्थानावर अत्यंत प्रेम आहे आणि माझे विचार मी तुमच्यासारख्या तरुणापुढे बोलून दाखवीत आहें यात चूक करतों असे त्याना वाटतें, म्हणून त्या अडथळा करीत आहेत. पण तसें असलें तरी मी फक्त हेच सागतों, कीं हिंदुस्थानातील दोन्ही पक्षात जे हे संशयाचें वातावरण पसरलेलें आहे, तें हिंदुस्थानांतून काढून टाकण्याची माझी इच्छा आहे. ज्या साम्राज्याला परस्पर प्रेमाचा आणि परस्पर विश्वासाचा आधार आहे, असे साम्राज्य आम्हास हवें आहे.. .. जे आम्हास आमच्या राज्यकर्त्यांस सागावयाचें आहे ते आपण उघडपणें, निर्भीडपणे सांगूं या, व तें जर त्यास पसंत नसेल, तर त्याचे परिणाम भोगावयास तयार होऊ या. पण अपशब्द वापरूं नयेत. होय, अधिकारीवर्गातील पुष्कळ लोक अत्यंत अरेरावीने वागतात. ते जुलमी आहेत व कित्येक वेळीं अविवेकीहि होतात. त्यांना अशीं अनेक विशेषणें लावतां येतील; आणि मी हेंहि कबूल करतों, कीं कांहीं वर्षें हिंदुस्थानांत राहिल्यावर त्यांचा कांहींसा अधःपात होतो पण यावरून काय दिसून येते? ते हिंदस्थानांत येण्यापूर्वी सभ्य होते; त्यांचा हा नैतिक गुण येथे आल्यावर नष्ट झाला, तर त्याचा दोष आमच्याकडेच आहे जर काल चागला असलेला मनुष्य माझ्या सहवासांत आल्याबरोबर आज वाईट होईल, तर त्याच्या अधःपाताची जबाबदारी त्याच्यावर आहे कीं माझ्यावर आहे? हिंदुस्थानांत आल्यावर त्यांच्या-सभोंवतीं जें तोंडपुजेपणाचे आणि कृत्रिमतेचें वातावरण असते, त्यामुळे त्यांचा नैतिक अधःपात होतो. अशा स्थितींत आमच्यापैकींहि पुष्कळांचा अधःपात होईल. आपणांकडे

दोष घेणें, याचाहि कांही वेळां सदुपयोग होत असतो. आपणास जर स्वराज्य प्राप्त व्हावयाचें असेल, तर आपणांसच तें घ्यावें लागेल आम्हास देणगी म्हणून स्वराज्य कधींहि मिळणार नाहीं ब्रिटिश साम्राज्याचा आणि ब्रिटिश राष्ट्राचा इतिहास पहा ते स्वातंत्र्याचे भोक्ते असले, तरी जे लोक स्वतः स्वातंत्र्य संपादन करणार नाहींत, त्यांना ते तें देणार नाहींत वाटल्यास बोअर-युद्धापासून तुम्ही बोध घ्या जे या साम्राज्याचे थोड्या दिवसांपूर्वी शत्रू होते, तेच त्याचे आज मित्र बनले आहेत " ( या वेळी डॉ बेझंट व व्यासपीठावरील राजेरजवाडे उठून निघाले व सभा बरखास्त झाली )*

या प्रकरणामुळे वर्तमानपत्रांतून जो वादविवाद सुरू झाला, त्यामुळे वर्तमान-पत्रवाचकांचें चित्त म गांधींच्याकडे वेधले गेलें हे काही तरी एक नवें राजकीय तत्त्वज्ञान हिंदुस्थानात येत आहे, अशी चर्चा सामान्य सुशिक्षित लोकात या वेळीं सुरू झाली डॉ. बेझट यांनीं जाहीर केले, की म गांधी संतदृष्टीनें कितीहि मोठे असले, तरी राजकारणाच्या दृष्टीने ते एक अर्भक आहेत. जहाल वृत्तीचे लोक म्हणू लागले, कीं यांचा निःशस्त्र प्रतिकार म्हणजे पूर्वीचा बहिष्कारयोगच आहे नेमस्त म्हणूं लागले, कीं यांची अहिंसा आणि साम्राज्यनिष्ठा सशयातीत असल्याने ते आमच्यांतीलच आहेत सुधारक म्हणू लागले, कीं आमच्या पारतन्त्र्याचें कारण आम्हीच आहो व आमची सुधारणा झाल्याखेरीज स्वराज्य मिळणार नाहीं असे म. गाधी म्हणतात, तेव्हा ते सुधारकच आहेत. धर्मसुधारक म्हणू लागले, म गांधी हे भागवतधर्मी संत असल्याने आमच्या धर्मसुधारणेचें तत्त्व त्यांना पटले आहे सनातनी म्हणाले, कीं हे चातुर्वर्ण्य पाळणारे सनातनी हिंदू असून याच्याच हातून झाली तर धर्मराज्याची अगर रामराज्याची स्थापना हिंदुस्थानात होऊ शकेल नास्तिक म्हणू लागले 'सत्या-परता नाहीं धर्म । सत्य तेंचि परब्रह्म ' असे मानणारे म. गांधी एका अर्थी नास्तिकच आहेत, कारण सत्याखेरीज दुसरा कोणताच देव ते मानीत नाहींत राजकीय सुधारणा आधीं हवी असें म्हणणारे लोक म. गाधींच्या चरित्राकडे बोट दाखवून म्हणू लागले, कीं आधीं राजकारण हाच धडा त्यानीं घालून दिला आहे. क्रांतिकारक म्हणत, हे एक क्रांतिकारकच आहेत, पण मुत्सद्दीपणानें शांततेचा व अहिंसेचा उपदेश करीत आहेत. तर याच्या उलट, कांहीं जहाल म्हणविणारे व पुढारी गणलेले असेंहि बोलत, कीं सरकारचा हा एक गुप्त पोलीसच असून देशांतील जहाल राजकारण व क्रांतिकारक पक्ष मारून टाकण्यासाठीं ब्रिटिश मुत्सद्दी याचा उपयोग महायुद्धाच्या आपत्तीत आपल्या साम्राज्यासाठीं करीत आहेत ; व हा आमच्यापैकीं नव्हे असे कोणी कांही, कोणी काही, आपापल्या बुद्धीप्रमाणे व वृत्तीप्रमाणें १९१६ व १९१७ सालीं बोलत असत कांहीं असले तरी या वेळी म. गांधी हा सुशिक्षिततातील चर्चेचा एक विषय होता व त्या चर्चेस वरील प्रकरणापासून बरीच चालना मिळाली होती एवढें खरे

* Speeches and Writings of M. K. Gandhi by Netesan and Co, P 252

## प्राथमिक सत्याग्रह-प्रकरणें

इ स. १९१६ च्या अखेरीस म गांधींचें लक्ष हिंदुस्थानांतून फिजी बेटांत जाणाऱ्या मुदतबंदीच्या मजुराच्या स्थितीकडे वळलें ही मुदतबंदीच्या मजुरांची पद्धति म्हणजे गोऱ्या मळेवाल्याना हिंदुस्थानातून गुलाम पुरविण्याची कायदेशीर पद्धतीच होती. ही पद्धति नष्ट करण्याचें तत्त्व लॉर्ड हार्डिंज यानीं १९१५ साली प मालवीय यांनीं मध्यवर्ती कायदेमंडळात मांडलेला ठराव मान्य करून कबूल केलें होतें परंतु त्याच सुमारास आणखी निदान पांच वर्षें तरी ती पद्धति चालू राहील अशा तऱ्हेचें आश्वासन लॉर्ड हार्डिंज यांनी फिजी बेटातील मळेवाल्यांना दिल्याची बातमी या वेळीं सर्वत्र पसरली होती १९१६ अखेर या विषयावर बरीच खळबळ सर्वत्र दिसून येत होती. अर्थात् महात्मा गांधींचे लक्ष तिकडे वेधले गेले असल्यास नवल नाहीं लॉर्ड हार्डिंज याच्या अभिवचनाचें रहस्य बाहेर फुटताच, म गांधींनीं हा प्रश्न आपल्या हातीं घेतला आणि १९१७ च्या ३१ मे पूर्वी जर ही पद्धति बंद करण्यात आली नाही, तर आपण तिच्या विरुद्ध सत्याग्रहाची मोहीम सुरू करू असे जाहीर केले या वेळी लॉर्ड चेल्म्सफर्ड हे व्हाइसरॉय होते त्यानी एप्रिल महिन्याच्या १२ तारखेस ही पद्धति डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टाखाली महायुद्ध चालू असेपर्यंत बंद केल्याचें जाहीर केलें. पुढे महायुद्ध संपल्यानंतरहि ती पद्धति बंद करण्यात आली. १९१७ सालीं म गांधींना मिळालेला हा छोटासा विजय त्याच्याकडे लोकांचें लक्ष वेधण्यास पुनः कारण झाला

यानंतर याच वेळची दुसरी गोष्ट म्हणजे त्यांनी चंपारण्यांतील निळीच्या मळेवाल्यांकडून तेथील शेतकऱ्यावर होत असलेला जुल्म नष्ट करण्यासाठी तेथे जाऊन केलेली चळवळ ही होय लखनौ-कॉंग्रेसच्या वेळीं बिहारमधील कांहीं प्रतिनिधींनीं म गांधींचे लक्ष या प्रश्नाकडे वेधिलें त्यानंतर १९१७ च्या एप्रिल महिन्यांत चंपारण्यांतील मोतीहारी या गावीं तेथील शेतकऱ्याची चौकशी करण्यासाठी म गांधी जाऊन पोहोचले. त्याबरोबर तेथील मॅजिस्ट्रेटने क्रि प्रो. कोडच्या १४४ कलमाखाली तुमच्या वास्तव्यामुळें शांततेला धोका येण्याचा संभव असल्यामुळें तुम्हीं हा जिल्हा सोडून जावे असा हुकूम फर्माविला म. गांधींनी तो हुकूम मोडला आणि त्याचबरोबर सरकारनें त्यांस दिलेले केसर-इ-हिंदचे सुवर्णपदकहि सरकारकडे रवाना केले मॅजिस्ट्रेटपुढे उभें करतांच आपण गुन्हा केला असल्याचे त्यांनी कबूल केलें व शिक्षा भोगण्यास तयार असल्याचेहि सांगितलें पण अखेरीस सरकारच्या हुकुमावरून हा खटला काढून घेण्यात आला आणि म. गांधींना व त्यांच्या अनुयायांना त्या जिल्ह्यांत राहून शेतकऱ्यांची सेवा व त्यांच्या परिस्थितीचें निरीक्षण करण्याची परवानगी मिळाली. बाबू राजेंद्रप्रसाद, प्रो. कृपलानी आणि सर्व्हंट ऑफ इंडियांतील डॉ. देव हे या वेळीं गांधीजींच्या नेतृत्वाखाली हें कार्य करीत होते. महाराष्ट्रांतील

असहकारपक्षाचे पुढारी दे. शंकरराव देव हे याच वेळीं म. गांधींच्या ह्या कार्यांत स्वयंसेवक म्हणून दाखल झाले. पुढे सरकारनें या प्रश्नाची चौकशी करण्यासाठीं एक कमिशन नेमिले व त्यांत म. गांधींचीहि नेमणूक करण्यात आली. या कमिशनच्या रिपोर्टास अनुसरून सरकारनें एक कायदा केला व अशा प्रकारें शेतकऱ्यांचीं जीं गाऱ्हाणीं शंभर वर्षेपर्यंत कोणत्याहि उपायांनीं दूर झालीं नव्हतीं, तीं गांधीजींच्या सत्याग्रही वृत्तीनें व लोकसेवेच्या धोरणाने दूर झालीं या वेळेपासून म. गांधी यांच्या-बद्दल बिहार प्रांतांत व तेथील शेतकरीवर्गात फारच मोठा आदर उत्पन्न झाला.

१९१८च्या जानेवारीत कलकत्त्याच्या राष्ट्रसभेहून परत आल्यानंतर खेडा जिल्ह्यांतील दुष्काळाकडे त्यांचें लक्ष वेधलें. लोकाचीं पिकें बुडालीं असतां व दुष्काळी कायद्याप्रमाणे त्याना साऱ्याची सूट अगर तहकुबी मिळणें अवश्य असता, अधि-काऱ्याच्या चुकीच्या वृत्तान्ताच्या आधारावर शेतकऱ्यांवर सारावसुलीचा जुलूम होत आहे, हें पाहून त्यानी तेथे साराबंदीची चळवळ सुरू केली आणि लवकरच या कार्यां-तहि त्याना यश आलें. यामुळे म. गांधी ही आपल्यावर सत्ता गाजविणाऱ्या ब्रिटिश अधिकाऱ्याना आपल्यापुढें नमविणारी एक शक्ति आहे, असा प्रत्यय हिंदुस्थानातील शेतकरीवर्गाला येऊ लागला चंपारण्य आणि खेडा या प्रकरणात म. गांधींनीं सत्या-ग्रहाचे जे यशस्वी प्रयोग केले, त्यांवरून हिंदुस्थानच्या भूमींत रुजणारें आणि यशस्वी होणारें असें हें लोकाच्या आत्मोद्धाराचे साधन आहे, असा विश्वास सुशिक्षित लोकांतहि वाटूं लागला व म. गांधींनाहि आपल्या कार्याचा आत्मविश्वास अधिक वाटूं लागला.

१९१८ साली महायुद्ध जोरात होते आणि रशियात झालेल्या बोल्शेव्हिक क्रान्तीचे वारे इराण, अफगाणिस्तान, चीन वगैरे देशांतहि वाहूं लागले यामुळें सरकारला लोकाच्या सहकार्याची आवश्यकता अत्यंत तीव्रतेने भासू लागली. या वेळीं दिल्लीस एक दरबार भरवून लोकाच्या पुढाऱ्याकडे सरकारने पैशांची व सैनिकांची मागणी केली या दरबारला डॉ. बेझंट व लो. टिळक याना निमंत्रण नसल्यामुळें म. गांधींनी त्या दरबारास जाण्याचें प्रथम नाकारिले होते, पण व्हाइस-रॉयनीं पुनः निमंत्रण पाठविल्यामुळें ते गेले. त्याच्या या दरबारातील भाषणासंबंधीं लो. टिळक लिहितात :

“ लोकाचें काय म्हणणें आहे हे बाहेरूनच नव्हे, तर दिल्ली-कॉन्फरन्समध्यें व्हाइसरॉयसाहेबांच्या नजरेस आणलें गेलें, ही त्यांतल्या त्यांत समाधानकारक गोष्ट झाली असे आम्ही समजतो. नाहीपेक्षां या अपूर्व दरबारांतल्या—व्हाइसरॉयांच्या छत्राखालीं राजा आणि रंक एकत्र होऊन भरलेल्या दरबाराच्या—दिमाखाने गांगरून लोकांची इच्छा या दरबारांत व्यक्त करण्यासहि आमचे पुढारी दिपून जातात कीं काय अशी शंका कित्येकांस पडली होती हिंदुस्थानचे भाग्य म्हणावयाचे, कीं म. गांधी किंवा ना. खापर्डे यांसारखे लोक या दरबारात होते आणि त्यांनीं लोकाचा अभिप्राय स्पष्टपणें दरबारपुढे मांडिला. त्याचें आज कोणीं ऐकिलें नाहीं हें खरें; पण

आम्हांस अशी बळकट आशा आहे, कीं हिंदुस्थानचें द्रव्यबल आणि मनुष्यबल साम्राज्याच्या रक्षणार्थ एकवटण्याच्या कामीं लोकांचीं मनें प्रसन्न न ठेवता केलेल्या भाडोत्री प्रयत्नास जरूर तितके यश जेव्हा येणार नाहीं–आणि तें न आल्यास त्यांत काहीं मनुष्यस्वभावाच्या विरुद्ध नाही–तेव्हा याच प्रश्नाचा पुनः विचार होऊन हिंदुस्थानच्या लोकांचीं मनें जेणेंकरून सतुष्ट होतील, अशा प्रकारचे स्वराज्य या नोकरशाहीच्या समतीनेच विलायत-सरकारास आम्हास द्यावें लागेल "*

म गाधी दिल्ली-परिषदेहून परत आल्यानतर त्यानीं व्हाइसरॉयांना एक पत्र लिहिलें त्यांत ते म्हणतात : " ही परिषद् म्हणजे माझ्या मतें व आमच्यापैकी पुष्कळाच्या मते एका सामान्य कार्यास आपलीं जीवितें वाहून घेण्याची पहिली पायरी आहे पण आमची स्थिति थोडी विशेष प्रकारची आहे. साम्राज्याच्या भागी दारींत आमचा अद्यापि प्रवेश व्हावयाचा आहे भविष्यकालीन आशेवर विसबून आम्ही आमचीं जीवितें वहात आहोंत ..... ही आशा सफल करण्याचा सवदा मी मांडीत नाही पण हें जाणणे योग्य आहे, कीं ही आशा भग्न होणें म्हणजे आमची भ्रमनिरास होण्यासारखेंच आहे आम्हीं जर साम्राज्याच्या रक्षणासाठीं सेवा केली, तर त्याच कृतीमुळें आम्हास स्वराज्य मिळाले आहे असे आम्हास दिसूं लागलें पाहिजे आपलीं घरगुती भाडणें मिटविण्याची आपण विनति केली आहे, पण या विनतीचा अर्थ जर अधिकाऱ्याचे अन्याय व जुल्म आम्हीं सहन करावेत असा असेल, तर ती मान्य करणे माझ्या शक्तीबाहेरचे आहे संघटित जुलुमाचा प्रतिकार माझें सर्व बळ खर्ची घालून मी करीत राहीन. अधिकाऱ्यानीं एकाहि जीवावर अन्याय करू नये आणि पूर्वी कधींहि दिला नव्हता इतका मान लोकमताला देऊन राज्यकारभार करू लागावें, अशी विनति अधिकारीवर्गास आपण केली पाहिजे चपारण्यात वर्षानुवर्षे चालू असलेल्या जुलुमांचा प्रतिकार करून मीं ब्रिटिश न्यायदेवतेचे श्रेष्ठत्व व्यक्त करून दाखविलें आहे खेडा जिल्ह्यात जी जनता सरकारला शाप देत होती, तिलाच आज असे वाटू लागलें आहे, की जर आपणास पटलेल्या सत्यासाठीं कष्ट सोसण्यास आपण तयार होऊ, तर खरे सत्ताधारी सरकार नसून आपणच आहो. म्हणून तिच्या मनातील तेढ आज नाहींशी होत आहे व ती म्हणत आहे, कीं हे सरकार लोकांच्या हिताचेच असलें पाहिजे. कारण जेथे अन्याय दिसेल तेथें शाततेनें सविनय कायदेभग केला, तर तें सहन करतें. अशा प्रकारें चपारण्य व खेडा या दोन प्रकरणात मीं साम्राज्याची निश्चित आणि विशेष स्वरूपाची सेवा केलेली आहे ह्या स्वरूपाचें माझे काम तहकूब करण्यास तुम्हीं मला सांगणें म्हणजे माझें जीवन तहकूब करण्यास सागण्यासारखेंच आहे."

## गांधींची राजकीय दृष्टि

वरील पत्र वाचल्यास आणि जनतेला आपल्या हक्कांसाठीं सत्याग्रहाचा अवलंब

* लो टिळकाचे केसरीतील लेख, भाग १ रा, पृ. १८१.

करण्याचें शिक्षण महायुद्धाच्या बिकट परिस्थितींतहि म गांधी देत होते हें लक्षात घेतल्यास, या वेळीं ते स्वराज्याच्या चालू चळवळींत विशेष भाग कां घेत नव्हते, याचा बराच उलगडा होऊं शकतो. स्वराज्याची प्राप्ति त्या वेळीं ज्या प्रकारची चळवळ चालू होती तिच्यांतून होणार नसून जनतेच्या सत्याग्रहबलांतून ती होणार आहे अशी त्यांची श्रद्धा असल्यामुळें, ते या चळवळींत अगर विलायतेंत शिष्टमंडळ घेऊन जाण्याच्या कार्यांत पडले नाहीत. सत्याग्रहाचें बल पाठीशीं असल्याखेरीज स्वराज्याची शिष्टाई करण्यापासून तादृश फायदा होऊं शकत नाहीं असे त्यांचें मत होतें, व म्हणून ज्या वेळीं इंग्लंडांत स्वराज्याची शिष्टाई करण्यासाठीं राष्ट्रसभेचें शिष्टमंडळ गेलें होतें, त्या वेळीं त्याबरोबर न जातां हिंदुस्थानात सत्याग्रहशक्तीची आळवणी करण्याचें कार्य ते आपल्या तत्त्वास व श्रद्धेस अनुसरून करीत होते. १९१९ सालीं म गांधींनीं एक राष्ट्रव्यापी सत्याग्रहाचा प्रयोग सुरू केला. त्या सालच्या जानेवारींत रौलट कायदे ऊर्फ काळे कायदे या नावानें प्रसिद्ध असलेले दोन कायदे हिंदुस्थान-सरकारने केले महायुद्ध संपल्यानंतर 'डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्ट' हा कायदा आपोआप रद्द होणार होता. तेव्हां देशातील गुप्त कटाच्या क्रांतिकारक चळवळीचा निःपात करतां यावा म्हणून हे कायदे सरकारनें केलेले होते. या कायद्यामुळें कोणत्याहि आरोपीस त्याच्या-वरील आरोपाची शाबिती सामान्य न्यायासनापुढे उघड चौकशीअंतीं झाल्याखेरीज शिक्षा होऊ नये, या मूलभूत नागरिक हक्कावर गदा येऊन हिंदी नागरिकांचें जीवित व वित्त यांच्या सुरक्षिततेस धोका येणार होता या काळ्या कायद्याचा निषेध कायदे-मंडळातील लोकप्रतिनिधींनीं अत्यंत कडक आणि निःसंदिग्ध अशा भाषेत केला होता. इतकेंच नाहीं, तर लोकमताला लाथाडून असे कायदे राष्ट्रावर लादले तर त्याचे दुष्परि-णामहि सरकारास भोगावे लागतील अशी धमकीहि त्यानीं आपल्या भाषणांतून दिली होती. पण या धमक्या पोकळ असतात हें जाणून सरकारनें ते कायदे पास केले आणि आपल्या हातीं सुलतानी सत्ता घेतली सर्व प्रकारचा सनदशीर विरोध विफल झाला होता आणि लोकांवरील जुलूम असह्य आणि निर्विवाद स्वरूपाचा होता या वेळीं म गांधींनीं अखिल भारतीय स्वरूपाची सत्याग्रहाची पहिली मोहीम २८ फेब्रुवारी रोजीं जाहीर केली

## पहिला अखिल भारतीय सत्याग्रह

या मोहिमेची सुरुवात प्रथमतः ३० मार्च रोजीं हरताळ पाळून व उपवास करून व्हावयाची होती पण पुढें हा दिवस बदलून ता ६ एप्रिल हा दिवस मुक्रर करण्यांत आला. तथापि काहीं चुकीच्या समजुतीमुळे दिल्लीस ता. ३० मार्च रोजींच हा दिवस पाळण्यात आला. या दिवशींच लोकांची मिरवणूक चालू असतां दिल्लींत पहिला गोळीबार झाला. याच दिवशीं स्वामी श्रद्धानंद यांनीं गुरख्याच्या रोखलेल्या संगिनींपुढें आपली छाती करून तींत आपल्या संगिनी भोसकण्यास आव्हान दिलें आणि स्वामीजींचा हा अंतिम स्वरूपाचा सत्याग्रह यशस्वी होऊन गुरख्यांच्या

अंतःकरणांतील सत्यरूपी परमेश्वर जागृत झाला! प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत, किंबहुना प्रत्येक भूतमात्राच्या अंतःकरणात सत्यरूपी परमेश्वर अधिष्ठित आहे व तो अनासक्तबुद्धीनें वाहिलेल्या आत्माहुतीने प्रकट होऊं शकतो, हें सत्याग्रहाचें अधिष्ठान या वेळीं सामान्य जनतेच्या प्रत्ययास आधुनिक भारताच्या इतिहासात प्रथमच आलें ब्रिटिशाची सेवा करणारे गुरखे सैनिक हेहि 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति।' या धर्मशास्त्रातील अगर अध्यात्मशास्त्रातील सिद्धान्तास अपवाद नाहींत, हें पाहून विचारी मनुष्याचा त्या सिद्धातावरील विश्वास अधिकच दृढ झाला दिल्लींतील गोळीबारामुळें म गांधींनीं स्वत. तिकडे जाण्याचें ठरविलें होतें. त्यापूर्वी ठरल्याप्रमाणें रविवार, ता ६ एप्रिल रोजीं हिंदुस्थानातील सर्व मोठमोठ्या गावीं हरताळ, उपवास, प्रार्थना, मिरवणुकी आणि सभा झाल्या. ठिकठिकाणीं सत्याग्रहमडळें स्थापण्यात आलीं बेकायदा ठरवलेलें वाङ्मय व न नोंदलेलीं वर्तमानपत्रे प्रसिद्ध करण्याचे महात्मा गांधींनीं आपल्या नेतृत्वाखालीं ता ७ एप्रिल रोजीं जाहीर केले व त्याच दिवशीं 'सत्याग्रही' नावाचें वृत्तपत्र व महात्मा गांधींचे राजद्रोही ठरलेले काहीं जुने लेख प्रसिद्ध करून वाटण्यात आले यानतर म गांधी दिल्लीकडे जात असता 'कोशी' या स्टेशनवर त्याना पजाब व दिल्ली या प्रातात जाण्यास मनाई करणारा हुकूम त्याच्यावर बजावण्यात आला अर्थात् गांधीजींनीं तो हुकूम पाळण्याचे नाकारले. लगेच त्याना अटक करण्यात आली ही बातमी सर्वत्र पसरताच ठिकठिकाणीं दगे झाले आणि काहीं ठिकाणीं गोऱ्या लोकाचे खून, लुटालूट, आगी, आगगाड्याचे रूळ उखडून टाकणे, तारा तोडणें, वगैरे अनेक प्रकारच्या अत्याचाराची लाट ठिकठिकाणीं उसळली म गांधींना तारीख ११ एप्रिल रोजीं मुबईत आणून सोडण्यात आलें त्या वेळीं मुबईसहि दगा चालू होता. तो त्यानीं तेथे जाऊन थाबविला त्याच्यावर मुबई प्राताच्या बाहेर न जाण्याचा दुसरा हुकूम बजावण्यात आला प्रथम पुनः दिल्लीकडे जाऊन अटक करून घेण्याचा त्यांचा विचार होता परतु देशातील अनेक ठिकाणीं घडलेल्या अत्याचाराच्या बातम्या ऐकून त्यानीं तो विचार तहकूब केला आणि अत्याचार थाबविण्यासाठीं एक तीन दिवसाचें उपोषण जाहीर केलें अखेरीस तारीख १८ एप्रिल रोजीं त्यानीं ही अखिल भारतीय स्वरूपाची पहिलीच पण हिंदुस्थानच्या इतिहासातील अपूर्व अशी सत्याग्रहाची मोहीम शाततेच्या वातावरणाच्या अभावीं बिनमुदत तहकूब केली

याच काळात पंजाबमध्यें ठिकठिकाणीं दगे झाले व लष्करी कायदा अमलांत आला ता १३ एप्रिल रोजीं अमृतसर येथील जालियनवाला बागेंत कोंडलेल्या वीस हजार लोकांच्या जमावावर केवळ बदी घेतलेली सभा भरविल्याबद्दल यात्रिक तोफांतून गोळीबार करण्यात आला आणि तेथील लष्करी कायद्याच्या अमदानींत लोकाचा अनन्वित छळ व उपमर्द करण्यांत आला सरकारी हिशेबाप्रमाणें जालियनवाला बागेंत चारशें लोक मृत्युमुखीं पडले आणि १००२ लोक घायाळ झाले. यांत

हिंदु-मुसलमान, स्त्री-पुरुष, बाल-वृद्ध सर्वच होते आणि घायाळ झालेले लोक कोणत्याहि प्रकारचें औषधपाणी किंवा शुश्रूषा न मिळता शेजारीं पडलेल्या मुडद्यांच्या सहवासात रात्रभर पडून होते ! हा राक्षसी प्रकार जेव्हां उघडकीस आला आणि या प्रकाराची चौकशी करण्याकरितां सरकारनें नेमिलेल्या हंटर-कमिटीचा रिपोर्ट बाहेर आला, तेव्हां म गांधींनी ब्रिटिश साम्राज्याशीं असहकारयुद्ध पुकारिलें हिंदुस्थानांत सुरू झालेली सत्याग्रहाची ही प्रचड व अपूर्व चळवळ आणि त्यानंतर ब्रिटिश अधिकाऱ्यांनी केलेले अत्याचार चालू असता लो टिळकप्रभृति राष्ट्रसभेचे पुढारी विलायतेंत स्वराज्यशिष्टाई करीत होते. विलायतेत या बातम्या पोहोंचल्या, तेव्हां जिकडे तिकडे खळबळ उडून गेली लवकरच लो टिळक हिंदुस्थानांत परत आले व त्यांनीं, त्याच्या स्वागतार्थ मुबईस भरलेल्या पहिल्या सभेंत पुढील उद्गार काढिले:

"इकडील हकिकती मला सर्व कळल्या. रौलट बिलाविरुद्ध गांधींनीं सत्याग्रह सुरू केला तेव्हा त्यात भाग घेण्याला मी हजर नव्हतों, एवढेंच मला वाईट वाटतें." विलायतेतील आपल्या कार्यासबंधीं ते म्हणाले, कीं जो सुधारणा-कायदा येणार आहे तो कुचकामाचा असून आपण निराश न होता सपूर्ण स्वराज्याचा दुसरा कायदा करून घेण्याची चळवळ नेटानें केली पाहिजे. विलायतेंतल्या मजूर पक्षातील कांहीं लोकांनीं असे बिल आणण्याचें कबूल केलें आहे या भाषणाचा स्पष्ट अर्थ विलायतेंतील या शिष्टमडळाचे कार्य अयशस्वी झालें असून हिंदुस्थानांत स्वराज्यप्राप्तीसाठीं पुनः प्रचड चळवळी झाल्या पाहिजेत असा होतो 'म गांधींनीं सत्याग्रहाची चळवळ सुरू केली त्या वेळीं तींत भाग घेण्यास मी नव्हतों, एवढेंच मला वाईट वाटतें' ह्या म्हणण्याचा अर्थ येथील माझ्या अनुयायांनीं तींत भाग घ्यावयास हवा होता असा केला, तर तो फारसा चुकीचा होणार नाहीं अशा प्रकारें एका अर्थी, हिंदुस्थानला मिळणारे स्वराज्य विलायतेतील शिष्टमडळांतून मिळणार नसून या देशातील सत्याग्रहसंग्रामासारख्या प्रचड चळवळीतूनच मिळणार आहे, असें लोकमान्यांनीं विलायतेंतून परत येताच जाहीर केलें, असें आम्हांस वाटतें.

## अमृतसरची कॉंग्रेस

यानंतर अमृतसरची राष्ट्रीय सभा भरली त्या वेळीं पजाबांतील हत्याकांडासंबंधीं नेमिलेली हटर-कमिटी रिपोर्ट लिहीत होती हा रिपोर्ट बाहेर पडेपर्यंत सहकारितेचें धोरण सोडू नका, असा हट्ट गांधीजींनीं धरला व तो राष्ट्रीय सभेनें मान्य केला; पण गाधीजींच्या तत्त्वाच्या दृष्टीनें यापेक्षांहि महत्त्वाचा असा ठराव म्हणजे पंजाबमध्ये व इतरत्र लोकांनीं केलेल्या अत्याचारांच्या निषेधाचा ठराव होय हा ठराव प्रथम विषयनियामक मंडळांत नापास झाला होता; पण गांधीजींच्या आग्रहामुळें तो पुनः मंजूर करण्यांत आला. या ठरावावर भाषण करताना महात्माजी म्हणाले, "या ठरावापेक्षां दुसरा कोणताहि महत्त्वाचा ठराव या कॉंग्रेसपुढें नाहीं.

या ठरावाच्या बुडाशीं असलेल्या सत्याला अंतःकरणापासून मान्यता देणें व त्याप्रमाणें वर्तन करणें, यांतच आपल्या भावी यशाची किल्ली आहे याच्या बुडाशीं असणाऱ्या शाश्वत सत्याची जाणीव होणार नाहीं, तर खात्रीनें आपणास अपयश आल्यावांचून राहणार नाहीं आपल्या हातून अत्याचार झाला नसता तर बरें झालें असतें; पण या बाबतींत माझ्यापाशीं भरपूर पुरावा आहे. सरकार त्या वेळीं वेडेंपिसें झालें व लोकहि त्याबरोबर वेडेपिसे बनले! वेडेपणाला वेडेपणानें उत्तर देऊ नका, तर वेडेपणाला शहाणपणानें उत्तर द्या, म्हणजे सर्व परिस्थिति तुमच्या आटोक्यांत येईल" गाधीजींचा हा ठराव मान्य करणें म्हणजे सत्याग्रहाची त्यांची भूमिका आणि त्यांचें तत्त्वज्ञान याना मान्यता देण्यासारखें होतें आपणास पूर्णपणें पटला नसतांहि गांधीजींच्या आग्रहानें हा ठराव अमृतसरला जमलेल्या पुढाऱ्यानीं मजूर केला, यावरून त्यांनीं राष्ट्रीय सभेंत बुवाशाहीची स्थापना करण्यास साहाय्य केलें असा कोणासहि निष्कर्ष काढतां येणार नाहीं आपल्या राजकारणास यापुढें सत्याग्रहाशिवाय दुसरे अधिष्ठान देणें शक्य नाहीं व ते अधिष्ठान द्यावयाचें, तर 'जशास तसें' असें तत्त्वज्ञान अवलंबून चालता येणार नाहीं, तर वेडेपणास शहाणपणानेंच उत्तर दिलें पाहिजे, या तत्त्वानुसार चालणें भाग आहे, हें त्यानीं विचारांतीं मान्य केलें असेंच म्हणणे अधिक सयुक्तिक होईल

अमृतसर येथील राष्ट्रसभेच्यापूर्वी कांहीं दिवस म्हणजे १९१९ च्या नोव्हेंबर महिन्यांत दिल्ली येथें अखिल भारतीय खिलाफत कमिटीची सभा भरली होती या सभेत ब्रिटिश मुत्सद्यानीं तुर्की साम्राज्याच्या बाबतींत मुसलमानाचें म्हणणें मान्य न केल्यास ब्रिटिश राज्याशीं मुसलमानांनीं असहकार करावा, असा ठराव म गाधी याच्या सल्ल्यावरून करण्यात आला होता अर्थात् अमृतसर येथील राष्ट्रसभेच्या अधिवेशनापूर्वीच म. गांधी आपल्या असहकारयुद्धाची आखणी व सघटना करीत होते असे दिसून येतें. मात्र पंजाबमधील लष्करी कायद्याच्या अमलात घडलेल्या अत्याचारासंबधी ब्रिटिश सरकार काय करते व मुसलमानाच्या खिलाफतीसबधींच्या मागण्याना काय उत्तर देतें, याचा स्पष्ट निर्णय लागेपर्यंत हें असहकारयुद्ध पुकारण्याचे धोरण त्यास पसंत नव्हतें हे लक्षात घेतल्यास अमृतसर येथें गाधीजी सहकारवादी असे वरून दिसले, तरी ते बिनशर्त सहकारवादी नसून सशर्त सहकारवादी म्हणजे एका अर्थी प्रतियोगी सहकारवादी होते असेंच म्हणावे लागेल ते काहीं असो· पुढें जेव्हां खिलाफत आणि पंजाब या दोन्ही प्रकरणांत ब्रिटिश मुत्सद्यानीं त्याची पूर्ण निराशा केली, तेव्हां त्यांनीं उघडपणें असहकारयुद्ध पुकारिले

## खिलाफत-प्रकरण

खिलाफत-प्रकरणासंबंधीं येथें दोन शब्द लिहिणे अवश्य आहे महायुद्धाच्या वेळीं तुर्कस्तान जर्मनीच्या बाजूनें ब्रिटिश साम्राज्याशी लढत होते हिंदुस्थानांतील

मुसलमान लोकांना या वेळीं ब्रिटिश साम्राज्याच्या बाजूनें तुर्कस्तानविरुद्ध लढण्याचा प्रसंग आला. या वेळीं आम्ही हें युद्ध तुर्कस्तानचें आशियांतील साम्राज्य हिरावून घेण्यासाठी करीत नाही आणि मुसलमानाच्या धर्मक्षेत्रावरील खलिफाची म्हणजे तुर्की सुलतानाची सत्ता नष्ट करणार नाहीं, अशीं आश्वासनें ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं दिलेलीं होतीं हीं आश्वासनें खरीं करावयाचीं तर मेसापोटेमिया, अरबस्तान, सीरिया, पॅले-स्टाइन या सर्वांवर असलेली खलिफाची धर्मसत्ता व राजसत्ता याना धक्का लावतां आला नसता पण महायुद्धानंतर ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्द्यांनीं पॅलेस्टाइन, सीरिया, मेसापोटेमिया, अरबस्तान वगैरे सर्व देशावरील तुर्कस्तानचें साम्राज्य नष्ट केलें आणि मॅंडेटच्या नावाखालीं त्यातील भाग आपणा उभयतांत वाटूनहि घेतले ही वाटणी करण्याकरिता राष्ट्रसंघाच्या नेतृत्वाखाली एक कमिशनहि नेमण्यांत आले होते. अशा रीतीने हिंदी मुसलमानांना दिलेली सर्व आश्वासनें खोटीं ठरवून ब्रिटिश साम्राज्य-शाहीने त्यांचा विश्वासघात केला होता आणि त्यांच्या धर्मभावनावर आघात केला होता मुसलमान लोक ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध बंड करण्यास प्रवृत्त झाले होते अशा वेळीं हिंदुस्थानांतील हिंदूंचे कर्तव्य काय होते? त्याच्याबरोबर ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध लढून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य परत मिळवावे, की हे स्वातंत्र्य प्राप्त झाल्यास कदाचित् मुसलमान लोक शिरजोर होऊन आमच्यावर राज्य करतील या भीतीनें ब्रिटिश साम्राज्याचे गुलाम होऊन रहावे? आमच्या मतें या वेळीं मुसलमानाच्या खांद्यास खांदा लावून ब्रिटिश साम्राज्याशीं युद्ध पुकारणे हेंच प्रत्येक हिंदु राजकारणी मुत्सद्द्याचें आणि राष्ट्रभक्ताचे पवित्र कर्तव्य होते, आणि तेंच उत्तर लो टिळक आणि म गांधी या दोघांनीं दिलेले आहे लो टिळकांनीं आपल्या कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाच्या जाहीर-नाम्यात 'मुसलमानाच्या धार्मिक भावना व कुराणातील वचनें यास अनुसरून खिलाफतीचा प्रश्न सोडविला जावा अशी जी मुसलमानाची मागणी आहे, तिला या पक्षाचा पाठिंबा आहे' असे स्पष्टपणे नमूद केलेले आहे त्या वेळचे तिसरे हिंदु मुत्सद्दी व पुढारी लाला लजपतराय यांनीहि आपल्या कलकत्ता येथील राष्ट्रसभेच्या अध्यक्षीय भाषणात याच मताला पुष्टि दिली असून केवळ राजकीय व राष्ट्रीय या दृष्टीनेहि या वेळीं मुसलमानांना साहाय्य करणे हेंच आपले कर्तव्य कसें आहे, ते उत्कृष्ट-पणे दाखवून दिले आहे या भाषणात ते आपल्या धर्मबांधवास व राष्ट्रबांधवास असें स्पष्टपणे सांगतात कीं "हिंदुस्थानवर मुसलमानाचें राज्य स्थापन करावे असे हिंदी मुसलमानांपैकीं कोणास वाटत असेल, यावर माझा विश्वास बसत नाहीं पण असे काहीं लोक असले, तरी आपण त्यांचे भय बाळगता कामा नये. तशीच परिस्थिति उत्पन्न झाल्यास ब्रिटिश असोत किंवा नसोत, आमच्या स्वातंत्र्याचे संरक्षण कसें करावें हे आम्हास माहीत आहे सुलतानी अमलाच्या समर्थनासाठीं आमच्यापुढें उभ्या केलेल्या या काल्पनिक बागुलबोवास आम्ही किती दिवस भिऊन वागणार?"*

* The Agony of the Punjab, by Lala Lajapatrai, Page 119.

या आपल्या भाषणात लालाजींनीं पश्चिम आशियांतील सर्व मुसलमानी राज्यें आपल्या साम्राज्यशाहींत आणण्याचा ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्द्याचा डाव कसा आहे, हा डाव सिद्धीस गेल्यास इराण, अरबस्तान, मेसापोटेमिया, किंबहुना अफगाणिस्तान या सर्व देशांतून मुसलमानी पलटणी आणून आमचें पारतंत्र्य चिरतन करणें ब्रिटिश मुत्सद्द्यांना कसें शक्य आहे, आणि म्हणून ब्रिटिश मुत्सद्द्याच्या विश्वासघातानें आपल्या धर्मभावना दुखविल्या आहेत या निमित्तानें त्यांच्याशीं झगडणाऱ्या मुसलमान देशबांधवास साहाय्य करणें हेंच आपलें राष्ट्रीय कर्तव्य कसें आहे, तें उत्कृष्टपणें दाखवून दिलें आहे. लालाजी, लोकमान्य व महात्माजी या हिंदु राष्ट्रीय पुढाऱ्यानी या वेळीं जे धोरण स्वीकारिलें, तें राष्ट्रधर्म आणि राजकारण या दोन्ही दृष्टींनीं यथायोग्यच होते व तसें त्यांनीं केले नसतें, तरच ते राष्ट्रद्रोही व व्यवहारशून्य राजकीय पुढारी ठरले असते असें आम्हास वाटतें. भावी इतिहासकारहि अशीच साक्ष देतील अशी आम्हास आशा आहे. म गांधींनीं या वेळीं स्पष्टपणे असे सांगितले, की मी जरी मुसलमानाप्रमाणे ब्रिटिशांचाहि मित्र आहे, तथापि मुसलमानाची मैत्री का ब्रिटिशांची मैत्री असाच प्रश्न उभा राहिला, तर मी ब्रिटिशाची मैत्री तोडून राष्ट्रबांधव या दृष्टीने मुसलमानांशींच सख्य राखीन व त्यांच्या वतीनें ब्रिटिशाशीं लढेन. अर्थात् त्याचा लढ्याचा मार्ग अहिंसात्मक आहे हें जगप्रसिद्ध आहे. म गांधींनी याच भावनेनें ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध लढा पुकारण्यास सज्ज झालेल्या मुसलमानांस साथ दिली व त्याच्याकडून आपल्या अहिंसेस तत्त्व म्हणून नसली, तरी व्यवहार म्हणून मान्यता मिळविली

## असहकाराचा जाहीरनामा

ता १० मार्च १९२० रोजीं गांधींनीं असहकाराचा पहिला जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यात ते म्हणतात :

“ जर आमच्या मागण्या मान्य करण्यात आल्या नाहींत, तर काय करावे यासंबंधीं दोन शब्द लिहितो. उघड किंवा गुप्त सशस्त्र युद्ध करणें हा एक रानटी मार्ग आहे तो निदान अव्यवहार्य या दृष्टीने तरी सोडून देणे भाग आहे हा मार्ग सर्व परिस्थितींत अनिष्टच आहे अशी मी जर सर्वांची खात्री पटवूं शकेन, तर आमच्या सर्व न्याय्य मागण्या आम्हास फार अल्पावधींत मिळू शकतील अत्याचाराचा त्याग करणाऱ्या व्यक्तीस अथवा राष्ट्रास जी शक्ति निर्माण करतां येते, ती अप्रतिकार्य असते; पण अत्याचाराविरुद्ध आजचा माझा युक्तिवाद पूर्णपणें तो अव्यवहार्य व निष्फळ आहे, या आधारावर उभारलेला आहे; म्हणून असहकार हा एकच मार्ग आपणांस उपलब्ध आहे. तो अगदीं स्पष्ट मार्ग आहे. अत्याचारापासून पूर्ण अलिप्त राहिल्यास तो तितकाच परिणामकारकहि होईल. जेव्हां सहकारानें अधःपात व अपमान होत असतो किंवा आपण धारण केलेल्या धार्मिक भावनांस धक्का बसत असतो, तेव्हां असहकार हें कर्तव्य बनतें. जे हक्क मुसलमानांना आपल्या प्राणांइतके

त्यार आहेत त्यांचा अन्यायानें अपहार झाला असतां, तें आम्हीं मुकाट्यानें सहन करावें अशी इंग्लडला अपेक्षा करता येणार नाहीं. म्हणून आम्हांस असहकाराचा पूर्ण अवलंब करतां येईल. ज्याना सन्मानाच्या पदव्या अगर अधिकार प्राप्त झाले असतील, त्याचा त्यांनीं त्याग करावा. सरकारच्या खालच्या दर्जाच्या नोकऱ्या जे करीत असतील, त्यांचाहि त्यांनी त्याग करावा. असहकारांत खाजगी नोकऱ्यांचा त्याग अतर्भूत होत नाहीं. जे असहकार करणार नाहीत, त्यांना सामाजिक बहिष्काराची भीति घालणें मला पसत नाही. स्वयप्रेरित असहकार हीच जनतेच्या भावनेची व असंतोषाची कसोटी आहे. सैनिकांना नोकरी सोडण्यास सांगणे हें अकालीं आहे. ही पहिली पायरी नसून ती अखेरची पायरी आहे जेव्हा व्हाइसरॉय, भारतमत्री आणि मुख्य प्रधान हे आम्हाला दगा देतील, तेव्हाच त्या पायरीवर पाऊल टाकण्याचा हक्क आम्हांस प्राप्त होईल. शिवाय, असहकाराच्या मार्गावरील प्रत्येक पाऊल अत्यत विचारपूर्वक टाकीत गेले पाहिजे अत्यत प्रखर वातावरणांतहि आपला आत्मसयम कायम रहावा, यासाठीं आपण सावकाश प्रगति केली पाहिजे ”*

या जाहीर पत्रकात म गांधीच्या असहकारयुद्धातील समग्र कार्यक्रम बीजरूपानें ग्रथित झालेला आहे कोणतेहि सरकार त्यास प्रजेने मुलकी व लष्करी कारभारात साहाय्य केल्याखेरीज चालू शकत नाहीं; आणि प्रजेने सरकारशी केलेल्या असहकारात मुलकी व लष्करी अधिकारी आणि नोकर येऊन सामील झाले, की प्रजेला नको असलेलें राज्य नाहीसे होऊन हवें असलेलें नवें राज्य संस्थापित होतें, ही निःशस्त्र राज्यक्रांतीची तात्त्विक उपपत्ति आहे ती या उताऱ्यांत माडण्यात आलेली आहे. जोपर्यंत देशातील प्रजेला आपणातील सघशक्तीनें स्वतःचे राज्य चालविता येईल व देशात अदाधुंदी न होऊ देता सर्वत्र शातता प्रस्थापित करिता येईल असा आत्मविश्वास व शक्यता वाटू लागली नाही, तोपर्यंत प्रस्थापित राजसत्तेच्या पोलिस व लष्कर या खात्यातील लोकास असहकार करण्यास सागावयाचें नाहीं, कारण तसे झाल्यास देशांत सर्वत्र यादवी व अंदाधुदी माजून लोकशाहीच्या शाततेच्या अमलाऐवजीं लष्करशाहीची झोटिगशाही किंवा पेढारशाही माजते व त्याचा फायदा ब्रिटिशासारख्या परकीय राज्यकर्त्यांस मिळून शाततेची राज्यक्रान्ति सफल होत नाहीं; म्हणून लष्कराचा असहकार ही अगदीं अखेरची पायरी आहे, असे म गाधी या पत्रकात म्हणतात.

हें पत्रक ता. १० मार्च १९२० रोजीं निघालेलें आहे. यानतर खिलाफतमंडळाचे शिष्टमडळ विलायतेस जाऊन अयशस्वी होऊन परत आले व याच सुमारास हंटर-कमिटीचा रिपोर्टहि प्रसिद्ध झाला सुधारणा-कायद्याचें भ्रामकत्व तर आधींच सिद्ध झालें होतें. अशा प्रकारें पजाब, खिलाफत व स्वराज्य या तीन प्रकरणात आता असहकारयुद्धाखेरीज अन्यायनिवारणाचा कोणताहि मार्ग उरलेला नाहीं हें पाहून म. गांधींनीं ता. १ ऑगस्ट १९२० पासून त्या युद्धाचा पुकारा केला; व त्यास कल-

* History of the Congress by Pattabhi Sitaramayya, Page 323.

कश्याच्या जादा अधिवेशनात राष्ट्रसभेची संमति मिळवून घेतली. हें अधिवेशन सप्टें-बरमध्यें लाला लजपतराय यांच्या अध्यक्षतेखालीं झालें. या अधिवेशनांत राष्ट्रसभेनें असहकाराचा पुढील कार्यक्रम मान्य केला:

(१) सन्मानदर्शक पदव्या व अधिकार यांचा त्याग
(२) सरकारी दरबार, उत्सव वगैरे समारभांशीं असहकार
(३) सरकारी व निमसरकारी शाळातून मुलांना काढून त्याच्या शिक्षणा-साठी राष्ट्रीय शिक्षणसंस्थांची स्थापना
(४) वकील व अशील यांनीं ब्रिटिश न्यायासनावर बहिष्कार घालून खाजगी पचायती स्थापन करणे
(५) मेसापोटेमियांत पाठविण्यासाठीं भरती करण्यांत येणाऱ्या लष्करी व मुलकी नोकऱ्यांवर बहिष्कार
(६) सुधारणा-कायद्याखालच्या कायदेमडळांवर व मतदानावर बहिष्कार
(७) परकीय मालावर बहिष्कार

यांपैकीं कायदेमडळावरील बहिष्कारास देशबधु दासप्रभृतीचा तत्त्वतःच विरोध होता. ही बाब वगळल्यास त्याना अनत्याचारी असहकारिता मान्य होती. तथापि तिचा अवलब करण्यापूर्वी एकदां विलायतेस शिष्टमंडळ पाठवावे व त्या काळांत असहकारितेच्या तपशिलाचें स्वरूप मुक्रर करण्यासाठीं एक कमिटी नेमावी, अशी सूचना बाबू बिपिनचंद्र पाल व देशबधु दास यांनी राष्ट्रसभेपुढे मांडली पण ती सूचना नापास होऊन म गांधींचा ठराव प्रचड बहुमतानें पास झाला. या वेळेपासून राष्ट्रसभेने म गांधींच्या सत्याग्रहाची दीक्षा घेतली व ती अखेरपर्यंत त्यांच्याच नेतृत्वा-खाली स्वराज्याचा लढा चालवीत राहिली.

१९२० सालच्या अखेरीस मॉटेग्यू-सुधारणा-कायद्याखालील कायदेमडळाच्या पहिल्या निवडणुकी झाल्या या निवडणुकींवर बहिष्कार ही असहकारयुद्धातील पहिली मोहीम होती देशबंधु दासप्रभृति बरेच राष्ट्रीय पुढारी जरी प्रथमतः कायदेमंडळाच्या बहिष्काराच्या विरुद्ध होते, तथापि एकदा राष्ट्रसभेचा निर्णय झाल्यानंतर त्यांनीं तो मान्य केला व म. गांधींचें नेतृत्व स्वीकारून त्या युद्धात ते पडले त्यांनीं व पं मोतीलाल नेहरू यांनीं आपला वकिलीचा धंदा सोडून कोर्टावरील बहिष्कार हाहि अमलांत आणिला आणि निवडणुकीच्या बहिष्काराच्या रूपानें सुरू झालेले हें युद्ध १९२०च्या डिसेंबरमधील नागपूर येथें भरलेल्या राष्ट्रसभेने मान्य केल्यानतर १९२२ मध्ये म गाधींना राजद्रोहाच्या आरोपावरून सहा वर्षांची शिक्षा होईपर्यंत महाराष्ट्रा-तील केळकरपक्ष वगळल्यास कोणत्याच राष्ट्रीय पुढाऱ्याने या कार्यांत बदसूर काढला नाहीं किंवा विघ्न उपस्थित केलें नाहीं.

१९२०च्या राष्ट्रसभेंत घडलेली दुसरी अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे तिनें आपलें पूर्वीचें, वसाहतीचें स्वराज्य हें ध्येय आणि सनदशीर चळवळ हे साधन,

अशा अर्थाचें सुरतेस प्रागतिकानीं लादलेलें जुनें ब्रीद बदलून 'शांततेच्या व न्याय्य मार्गाने स्वराज्याची प्राप्ति' हें नवे ब्रीद धारण केलें ही होय. पूर्वीच्या बहिष्कार-योगाची तुटलेली सांखळी असहकारयोगाच्या रूपाने या अधिवेशनांत जोडण्यांत आली त्याचप्रमाणें स्वातंत्र्यवादी पक्षास राष्ट्रसभेंत मानानें प्रवेश करतां यावा हा त्या वेळच्या लोकमान्यप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्याचा आग्रह या वेळीं म गांधींनीं पुरा केला आणि राष्ट्रसभेत स्वातन्त्र्यवादी अनत्याचारी वीरांची शक्ति अंतर्भूत करून घेतली. लो. टिळकांनीं ज्या हेतूने सुरतेस प्रागतिकांशीं झगडा केला, तो हेतु अशा रीतीनें १९२० सालीं नागपूर येथे तडीस गेला

## असहकाराचें आंदोलन

१९२०च्या नोव्हेंबरमध्यें सरकारने या चळवळीसंबधीं आपलें धोरण जाहीर केले त्यात या चळवळीच्या मूळ संघटकानीं तिला ज्या मर्यादा घातल्या आहेत त्यांचें उल्लघन करून जे लोक अत्याचाराला भाषणानें अगर लेखनाने उघड प्रोत्साहन देतील किंवा पोलिस व लष्कर यांची राजनिष्ठा ढळविण्याचा प्रयत्न करतील, त्याच लोकांवर कायदेशीर इलाज करावेत असे आम्हीं प्रांतिक सरकाराना कळविले आहे, असें जाहीर केले अर्थात् त्या वेळी सरकारची अपेक्षा अशी होती, कीं राष्ट्रसभेचा व तिच्या पुढाऱ्याचा अनत्याचारी असहकारितेचा उपदेश लोक आपण होऊनच धिःकारतील. परतु या चळवळीची शक्ति जसजशी अधिकाधिक वाढू लागली, त्या मानानें सरकार हें धोरण सोडून दडपशाहीचा अवलंब करणार अशीं चिन्हें दिसू लागलीं. या वेळीं लॉर्ड चेल्म्सफर्ड हे जाऊन लॉर्ड रीडिंग हे नुकतेच अधिकारारूढ झाले होते.

३१ मार्च व १ एप्रिल १९२१ रोजीं बेझवाडा येथें वर्किंग कमिटी व ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी याच्या सभा झाल्या त्यात एक कोटी रुपयांचा टिळक-स्वराज्य-फंड जमवावा, वीस लाख चरखे राष्ट्रात सुरू करावेत, आणि मद्यपानबदी व पचायतीं-ची स्थापना करावी हा कार्यक्रम राष्ट्रापुढें ठेवण्यांत आला या सुमारास सरकारनें क्रि. प्रो कोडच्या १४४ व १०८ कलमांप्रमाणें भाषणबदी, सभाबदी, मिरवणूकबदी, जामीन मागणे वगैरे नागरिक हक्कावर गदा घालणारे दडपशाहीचें धोरण स्वीकार-ण्यास सुरुवात केली होती. तथापि अद्यापि कायदेभगाचा काळ आलेला नाहीं म्हणून हे दडपशाहीचे हुकूमहि लोकानीं पाळावेत असे धोरण वर्किंग कमिटीनें घालून दिले.

१९२१च्या मे महिन्यांत प मालवीय याच्या मध्यस्थीनें लॉर्ड रीडिग व महात्मा गांधी यांची एक मुलाखत झाली. या मुलाखतींत काय घडले हे जरी बाहेर आलें नाहीं, तथापि जोपर्यंत ही चळवळ अनत्याचारानें चालू आहे तोपर्यंत नागरिक-त्वाच्या मूलभूत हक्कांवर गदा घालून दडपशाहीचे धोरण आपण स्वीकारणार नाहीं, असें लॉर्ड रीडिंग यांनीं म. गांधींच्याजवळ कबूल केले आणि म गांधींनीं आपण अनत्याचारी धोरणासबंधीं किती दक्ष आहों हे सिद्ध करण्यासाठीं अलीबधूंच्या

भाषणांतील अत्याचारास प्रोत्साहन देणाऱ्या अशा कांहीं वाक्यांबद्दल त्यास दिलगिरी प्रदर्शित करण्यास लाजू असे बोलून दाखविले असावे, असें पुढील हाकिकतीवरून दिसते. कारण या मुलाखतीनतर लवकरच अलीबधूनीं एक जाहीर पत्रक काढून आपल्या भाषणांतील चुकीच्या विधानांबद्दल दिलगिरी प्रदर्शित केली व अनत्याचारावरील आपला विश्वास पुन्हां जाहीर केला अर्थात् हे दिलगिरीप्रदर्शनाचे पत्रक काढण्यास म. गांधींनींच सल्ला दिला होता. यानतर सप्टेंबरपर्यंत सरकारनें दडपशाहीचे शस्त्र फारसें उगारिले नव्हते; पण सप्टेंबर महिन्यांत अलीबधूच्यावर राजद्रोहाचे खटले भरून दडपशाहीस सुरुवात झाली. या वेळेपर्यंत टिळक-स्वराज्यफड जमविण्याचा सकल्प पुरा झाला होता आणि वीस लाख चरखे सुरू करण्याचा सकल्पहि पुरा होऊन खादीची चळवळ जोरात सुरू झाली होती १९२१ च्या जुलै महिन्याच्या अखेरीस मुबईस भरलेल्या ऑ इ कॉ कमिटींत असा ठराव झाला, कीं ज्या सरकारनें बहुसख्य हिंदी प्रजेचा पाठिंबा व विश्वास गमावला आहे, त्या सरकारच्या मुलकी किंवा लष्करी नोकरास नोकरी सोडण्याचा म्हणजे असहकाराचा उपदेश करणें हा प्रत्येक नागरिकाचा मूलभूत हक्क आहे तसेच 'आगोरा' येथील तुर्की राज्याविरुद्ध ब्रिटिश सरकार युद्ध पुकारील अशी भीति असल्यामुळे या कामीं हिंदी सैनिकांनीं सरकारशीं सहकार करू नये, असाहि एक ठराव या बैठकींत झाला यानतर लवकरच सार्वत्रिक दडपशाहीस जोरांत सुरुवात झाली, आणि तिचे पहिले मोठे बळी अलीबधू हेच घेण्यांत आले.

८ जुलै रोजीं मौलाना महमदअली यांनीं कराचीस भरलेल्या अखिल भारतीय खिलाफत परिषदेत वर दिलेल्या ठरावातील धोरणास अनुसरून भाषण केले होते व त्यात हिंदुस्थानांत कायदेभंगाची मोहीम सुरू करून अहमदाबाद-राष्ट्रसभेच्या वेळीं आम्ही स्वातंत्र्याचे निशाण उभारू असे सांगितले होते या भाषणाबद्दल व शौकतअली याच्या अशाच अर्थाच्या भाषणाबद्दल हे खटले भरण्यात आले होते. अशा प्रकारें सप्टेंबरपासून सरकार व राष्ट्रसभा याच्यात उघड सामना सुरू झाला नोव्हेंबर महिन्याच्या १७ तारखेस इंग्लडचे युवराज मुबईत येऊन दाखल झाले त्या वेळेपासून ते जातील त्या गावी हरताळ, निषेधप्रदर्शक सभा व मिरवणुकी आणि विलायती कापडाच्या होळ्या हे कार्यक्रम होऊ लागले मुबईस युवराज आले त्या वेळीं सर्व हिंदुस्थानात हरताळ पडला होता. पण मुबईस या वेळीं दगे व रक्तपात झाले तेव्हा म. गांधींनीं पांच दिवसाचा उपवास जाहीर करून १-२ दिवसात पुनः शांतता प्रस्थापित केली यानंतर ज्या ज्या गांवीं युवराज गेले, तेथें तेथें हरताळ वगैरे कार्यक्रम चालूच राहिले. या कामासाठीं राष्ट्रसभेने व खिलाफत-कमिट्यानीं स्वयंसेवक-पथके निर्माण केली.

डिसेंबरच्या २५ तारखेस युवराज कलकत्त्यास जाणार होते व्हाइसरॉयांचाहि मुक्काम तेथेंच होता. यामुळें या शहरांतील हरताळास फार महत्त्व आलेले होतें, आणि शक्य तें करून हा हरताळ पाडू देऊ नये व कलकत्त्यातील युवराजाच्या

स्वागताचा समारंभ साजरा करावा, अशी लॉर्ड रीडिंग याना उत्कंठा होती. या वेळीं राष्ट्रसभेची व खिलाफत-मंडळाचीं स्वयंसेवकपथकें बेकायदा ठरवून त्यांनीं दडपशाहीचें हत्यार उग्रपणानें चालू ठेविलें होतें. उलट, हे दडपशाहीचे हुकूम मोडून स्वयंसेवकपथकांत लोकांनीं सामील व्हावें अशा स्वरूपाचा सत्याग्रह राष्ट्रसभेनें जोरांत सुरू ठेवला होता या सत्याग्रहांत देशबंधु दास, पं. मोतीलाल नेहरू, लाला लजपतराय वगैरे बहुतेक राष्ट्रीय पुढारी तुरुंगांत जाऊन सत्याग्रही बंदिवानाची संख्या सुमारें २०-२५ हजारापर्यंत चढत गेली, तरीहि सत्याग्रहास आलेली ही भरती हटण्याचा मुळीच संभव लॉर्ड रीडिंग यास दिसेना. हिंदुस्थानांतील लोक असे एकामागून एक हजारोंनीं तुरुंगांत कसे व कां जात आहेत याचा आपणांस उलगडाच होत नाही व ही चळवळ कशी थांबवावी यासंबधीं आपले मन गोंधळून किंवा भांबावून गेलें आहे, असे उद्गार त्यांनीं या सुमारास काढिले. हेच दृश्य पाहून १९२२ सालीं म गांधीनीं आपण होऊन सत्याग्रहाची चळवळ बंद केली नसती, तर हिंदुस्थान या चळवळींत यशस्वी होण्याच्या अगदीं सन्निध पोहोंचला होता, असे उद्गार त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर जॉर्ज लॉइड यांनीं खाजगी रीतीनें काढल्याचें पुढें प्रसिद्ध झालें. यावरून या वेळच्या चळवळीचें स्वरूप किती तेजस्वी व दुर्धर्ष झालें होतें, याची कल्पना येऊ शकते आपल्या दडपशाहीनें आणि नागरिक हक्कावर गदा घालण्याच्या अत्याचारी धोरणानें ही चळवळ थांबत नाहीं, हे पाहून लॉर्ड रीडिंग यांनीं २५ डिसेंबर रोजी कलकत्त्यास होणाऱ्या युवराजांच्या आगमनापूर्वी म. गांधींशीं काहीं तडजोड होते कीं काय हें पहावें म्हणून प्रयत्न सुरू केला.

## तडजोडीचा प्रयत्न व अपयश

१९२१ अखेर अहमदाबादची राष्ट्रसभा भरली, त्या सुमारास ही तडजोडीची बोलणीं सुरू होती या तडजोडीचे स्वरूप सत्याग्रह बंद करावा, सत्याग्रही राजबंदी सोडावेत आणि सर्वपक्षीय पुढाऱ्याची एक परिषद् भरवून स्वराज्याच्या प्रश्नाचा विचार करावा अशा प्रकारचे होतें पण कराचीच्या परिषदेनंतर खिलाफत-चळवळींतील ज्या पुढाऱ्यांना तुरुंगात ठेविले होते त्याना न सोडण्याचा आग्रह लॉर्ड रीडिंग यांनीं धरिला व अखेरीस त्या बाबतींत त्यांनीं जी तडजोड मान्य केली होती तिच्यासंबंधीं म. गांधीनीं पाठविलेल्या उत्तराची तार उशीरां मिळाल्यानें ही तडजोड मोडली असे म्हणतात पण या तडजोडीचा हेतु जणु काय कसें तरी करून कलकत्त्यांतील युवराजांच्या आगमनावरील बहिष्कार उठवावा एवढाच असल्याप्रमाणे लॉर्ड रीडिंग यांनीं हा मोका गेल्यानंतर तशाच प्रकारच्या शर्तींवर पुनः तडजोड करण्याचें स्पष्ट नाकारलें तेव्हां म. गांधीनीं ता १ फेब्रुवारी १९२२ रोजीं व्हाइसरॉय यांना निर्वाणीचें पत्र पाठवून दडपशाही बंद करून अद्यापीहि नागरिक हक्कांच्या शाश्वतीची हमी द्या, नाहीं तर आपण बार्डोली तालुक्यांत सारांबंदीची

मोहीम सुरू करूं असें कळविलें. व्हाइसरॉयांचा नकार लगेच आला. या वेळीं म गांधींना अहमदाबादच्या अधिवेशनांतील ठरावानें राष्ट्रसभेचे सर्वाधिकारीपद प्राप्त झालें होतें व सर्व हिंदुस्थानचे डोळे व अंतःकरणें त्यानीं आपल्या बार्डोलींतील अपूर्व शांतिसग्रामाकडे आकर्षून घेतलीं होतीं. पण इतक्यात ता ५ फेब्रुवारीस सयुक्त प्रांतांतील चौरीचौरा या गांवीं राष्ट्रसभेच्या मिरवणुकीतील लोकांनीं एकवीस पोलीस व एक फौजदार यांचा पाठलाग करून त्यांना चौकींत आश्रय घ्यावयास लाविलें व तेथें चौकीला आग लावून त्यांना जाळिलें या अत्याचाराची बातमी म. गांधींच्या कानांवर तारेने येऊन धडकली यापूर्वी मुंबई, मालेगांव वगैरे गांवीं लहान-मोठे दगे झाले होते आणि मलबारात तर मोपल्याचे एक बंडच उठलें होतें. पण त्या त्या अत्याचाराचा निषेध करून म गाधी स्वस्थ बसले होते अथवा उपवासाचें प्रायश्चित्त करून चढाऊ चळवळ त्यानीं चालू ठेविली होती. पण आतांचा हा अत्याचार ऐकून आपलें अनत्याचाराचें तत्त्व आपल्या अनुयायांस व राष्ट्रसभेस पटलेलें नाहीं व याच वेळीं आपण साराबंदीची निर्वाणीची चळवळ केल्यास जिकडे तिकडे अत्याचार व लष्करी अंमल होऊन आपला प्रयोग अयशस्वी होईल असे वाटून बार्डोलीची मोहीम बिनमुदत तहकूब केल्याचें त्यानीं जाहीर केलें. ता. १२ फेब्रुवारी रोजीं वर्किंग कमिटीची बैठक बार्डोलीस भरून तिने कायदेभग व हुकूमभग हे तहकूब करण्याचें ठरविलें आणि राष्ट्रसभेचे सभासद वाढविणे, चरख्यांचा प्रसार करणें, राष्ट्रीय शिक्षण-संस्था व पंचायती स्थापणें, मद्यपानबदी करणें, अस्पृश्यतानिवारण व हिंदु-मुसलमान-ऐक्य यांबद्दल खटपट करणें असा विधायक कार्यक्रम आंखण्यांत आला. यानंतर ता २४-२५ फेब्रुवारीस दिल्ली येथें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचे अधिवेशन भरून म. गांधींनीं या धोरणास तिची संमति मिळविली. मात्र या बैठकींत विशिष्ट स्थळीं, विशिष्ट कार्यासाठीं, वैयक्तिक सत्याग्रह करण्यास परवानगी देण्याचा अधिकार प्रांतिक समित्यांना देण्यांत आला. अशा प्रकारें १९२०च्या सप्टेंबरपासून सुरू झालेली नि.शस्त्र क्रांतीची पहिली सत्याग्रही मोहीम सुमारे एक वर्ष व पांच महिन्यांनीं अथवा १ ऑगस्ट-पासून तिचा प्रारंभ धरल्यास दीड वर्षानें बिनमुदत तहकूब झाली. तथापि राष्ट्रसभेचें असहकारितेचें धोरण त्यामुळें सुटलें नाहीं उलट, अनत्याचारी असहकार व सत्याग्रह ऊर्फ निःशस्त्र क्रांति हीच आपल्या राजकारणामागची खरी शक्ति आहे, हा तिचा विश्वास व हें तिचें धोरण कायम राहिलें.

## युद्ध-तहकुबी व बंदिवास

म. गांधींनीं असहकारितेचा लढाऊ कार्यक्रम बंद करून केवळ विधायक व संघटनात्मक लोकसेवेचा कार्यक्रम राष्ट्रसभेपुढें ठेविल्यापासून देशांत अनेक मतभेद माजण्यास सुरुवात झाली आणि म गांधींच्यावर राष्ट्रसभेतील अनेक पुढाऱ्यांकडून टीकेची झोड उठविण्यास प्रारंभ झाला देशांतील सरकाराविरुद्ध बड करण्याची वृत्ति

काहीं काळ शांत झाली व तीच शक्ति जणुं काय आपापसांतील भांडणाच्या रूपानें प्रकट होत आहे असें वाटू लागलें इतक्यात म गांधींच्या अटकेची बातमी ऐकू येऊं लागली ता ९ मार्चच्या 'यंग इंडिया'च्या अंकांत गांधीजींनीं "मी जर पकडलो गेलों तर" या मथळयाचा लेख लिहिला व राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांना खादी, राष्ट्रीय शिक्षण, हिंदु मुसलमानाचें ऐक्य, अस्पृश्यतानिवारण वगैरे विधायक कार्य करीत रहा व अनत्याचाराचे व्रत पाळा असा उपदेश केला १३ मार्च रोजीं म गांधींना राजद्रोहाच्या आरोपावरून पकडण्यात आलें व त्याच्यावरील खटला अहमदाबादचे सेशन जज्ज् मि ब्रूमफील्ड याच्यापुढे १८ मार्च रोजीं चालू झाला. म गांधींनीं न्यायाधीशास एक लेखी जबानी सादर केली. १८९३ मध्ये दक्षिण आफ्रिकेंत गेल्यापासून आपल्या सार्वजनिक जीवनास आरंभ कसा झाला, तेथें आपण सत्याग्रह केला तरी आपण साम्राज्यनिष्ठ कसे होतों, पुढें रौलट कायदे, जालियनवाला बाग, खिलाफत वगैरे प्रकरणानीं आपल्या साम्राज्यनिष्ठेस कसा धक्का बसला, हिंदुस्थानांतील कायद्यानें प्रस्थापित झालेले राज्य जनतेची पिळणूक करण्याच्या धोरणावर कसे चालले आहे, या देशांत देशभक्ति हाच गुन्हा कसा झाला आहे, लोकांवर दडपशाहीची दहशत राज्य करीत असल्यानें लोक पौरुषहीन कसे झाले आहेत व या दडपशाहीच्या कायद्यांचा मुकुटमणि १२४ अ हे कलम कसें आहे, याचें सविस्तर विवेचन म गांधींनीं आपल्या जबानींत केले आहे पुढे ते म्हणतात : "नागरिकांच्या स्वातंत्र्याची गळचेपी करणारे जे कायदे आहेत त्याचा मुकुटमणि असे जें १२४ अ कलम, त्याखालीं मजवर आरोप ठेविला आहे त्याबद्दल मला आनंद होत आहे प्रेम हें कायद्याने निर्माण होऊं शकत नाहीं किंवा त्याचें नियमनहि कायद्यानें होऊं शकत नाहीं कोणासहि एकाद्या व्यक्ती-बद्दल किंवा संस्थेबद्दल प्रेम नसेल तर जोंपर्यंत तो अत्याचारास प्रोत्साहन देत नसेल किंवा तसा त्याचा विचार नसेल, तोपर्यंत त्याला आपला असंतोष व्यक्त करण्यास मुभा असावी. पण श्री बँकर याच्यावर व माझ्यावर जें कलम लागू केलें आहे, त्या कलमाप्रमाणें केवळ असंतोषाचा प्रचार करणें हाहि गुन्हा आहे या कलमाखालीं जे खटले झालेले आहेत त्यापैकीं कांहींचा मीं अभ्यास केलेला आहे व मला हें माहीत आहे, कीं हिंदुस्थानांतील अत्यंत लोकप्रिय अशा कांहीं देशभक्तांना या कलमाखालीं शिक्षा देण्यात आलेली आहे म्हणून या कलमाखालीं माझ्यावर आरोप ठेवणें हा मी माझा सन्मानच समजतों. माझ्या असंतोषाचीं कारणे अत्यंत संक्षिप्तपणें मीं दिलेलीं आहेत. कोणाहि अधिकाऱ्यासंबंधीं किंवा व्यक्तिशः राजासंबंधीं माझ्या मनात वैयक्तिक द्वेष नाहीं, पण पूर्वीच्या कोणत्याहि राज्यपद्धतीपेक्षां ज्या राज्यपद्धतीनें लोकांचे अधिक अनहित केलेले आहे त्या पद्धतीसंबंधीं असंतोष धारण करणें हा मी एक सद्गुण समजतों माझा असा विश्वास असल्यामुळें या पद्धतीसंबंधीं प्रेम असणें हें मी पाप मानतों.. ...... . .. माझ्या नम्र मताप्रमाणें 'सतां'शीं सहकार करणे हें जितकें कर्तव्य आहे, तितकेंच 'असतां'शीं असहकार करणें हेंहि कर्तव्य आहे; पण

आजपर्यंत असद्वर्तन करणाराशीं अवलंबिण्यांत येणारा असहकार बुद्धयाच अत्याचारी स्वरूपाचा करण्यांत येत असे मी माझ्या देशबांधवाना हे शिकवीत आहे, कीं अत्याचारी असहकारामुळें अधिकच अनर्थ ओढवतात आणि पूर्ण अनत्याचारानेंच 'असता'-शीं असहकार करतां येईल. म्हणून कायद्याच्या दृष्टीनें जो बुद्धिपुरस्सर केलेला गुन्हा दिसतो आहे, पण मला जें नागरिकाचें सर्वश्रेष्ठ कर्तव्य भासत आहे, त्याबद्दल जास्तींत जास्त शिक्षा मागण्यास व ती आनंदाने भोगण्यास मी तयार आहे. तुम्हास ज्या कायद्याची बजावणी करण्यास सांगितली आहे तो अन्यायाचा आहे व मी वस्तुतः गुन्हेगार नाहीं असें वाटत असेल तर तुमच्या जागाचे राजीनामे देऊन 'असता'शीं असहकार करणे हा किंवा जी राज्यपद्धति चालविण्यास तुम्ही साहाय्य करीत आहा ती पद्धति किंवा तो कायदा न्यायाचा व लोकहिताचा आहे म्हणून माझे कृत्य लोकहिताला हानिकारक आहे असें वाटत असेल तर मला जास्तींत जास्त शिक्षा देणें हा, यांपैकीं कोणता तरी एकच मार्ग, न्यायाधीश व असेसर्स असलेल्या आपणांस मोकळा आहे." अर्थात् यांपैकीं दुसऱ्याच मार्गाचें अवलंबन करून न्यायाधीशांनीं म गांधींना सहा वर्षांची शिक्षा देऊन लोकमान्यांचीच परंपरा पुढे चालविल्याचें शिफारसपत्र गांधींना दिले त्यानी आपल्या भाषणात गांधीजींचा गौरव केला आणि आपणास शिक्षा देताना मला खेद होत आहे असेहि बोलून दाखविले. त्याचप्रमाणें लोकमान्यांच्या खटल्याचाहि त्यानीं उल्लेख केला. भारतीयांच्या अंतःकरणाला ती गोष्ट सहजच पटली आणि लोकमान्याच्या निधनाने रिकाम्या झालेल्या आपल्या हृदयसिंहासनावर ज्या विभूतीची आपण स्थापना केली, तिच्या माहात्म्यासंबंधींची त्यांची श्रद्धा अधिकच दृढ झाली

## असहकाराचें समालोचन

म गांधींनीं १९२०च्या सप्टेंबरमध्यें राष्ट्रसभेपुढें आपली असहकारयुद्धाची योजना मांडिली, तेव्हा हा कार्यक्रम अमलांत आणिल्यास एक वर्षात आपणांस स्वराज्य मिळूं शकेल असें त्यानीं बोलून दाखविलें होते व त्यानंतर सुमारें दीड वर्षपर्यंत तो कार्यक्रम अमलांत आणण्यासाठीं त्यांनीं आपल्या प्रयत्नाची आपलें सर्व बौद्धिक व आत्मिक बल खर्ची घालून शिकस्त केली राष्ट्रानेंहि त्या काळांत जेवढें आत्मिक बळ त्यापाशीं होते किंवा त्या वेळीं निर्माण होऊं शकले तेवढे खर्च केलें; पण हें बल स्वराज्यप्राप्तीस पुरें पडले नाहीं ही गोष्ट खरी असली, तरी राष्ट्रसभेचा या मार्गावर कायमचा विश्वास बसावा आणि जी राष्ट्रसभा पूर्वी केवळ ठराव करणारी एक दुर्बल संस्था होती तिचें संपूर्ण परिवर्तन होऊन तिला वर्षभर अखंड कार्य करणाऱ्या व प्रस्थापित राजसत्तेशीं संघटित लढा करणाऱ्या संस्थेचें क्रान्तिकारक स्वरूप प्राप्त व्हावें, हा चमत्कार कांहीं लहानसान नव्हता. देशबंधु दास, प मोतीलाल नेहरू, बाबू राजेंद्रप्रसाद यांच्यासारख्या कायदेपंडितांनीं आपले बुद्धिसर्वस्व व शक्तिसर्वस्व

राष्ट्रकार्याला वाहून घेण्यासाठीं फकिरी स्वीकारावी आणि शेंकडों सामान्य कायदे-पंडितांनीं व तरुण उत्साही विद्यार्थ्यांनीं देशसेवेचे आजन्म व्रत अंगीकारावे, ही गोष्ट काहीं सामान्य नव्हती. हजारो लोकांनीं उघड कायदेभंग करून देशात निर्माण केलेली प्रतिकाराची लाट दडपशाहीनें थांबवितां न आल्यामुळे राजप्रतिनिधीस राष्ट्रसभेबरोबर तडजोडीचे बोलणें करण्याची आवश्यकता वाटावी, अखेरीस एवढी प्रचंड प्रबळ चळवळ दडपशाहीनें न थांबतां राष्ट्रसभेच्या व तिच्या सर्वाधिकाऱ्याच्या हुकुमाने थाबावी आणि त्या हुकुमानुसार देशातील हजारों तरुणानीं व शेंकडो पुढाऱ्यानीं लोकसंघटनेच्या व लोकसेवेच्या विधायक कार्यास लागावें, या गोष्टी म गांधींनीं राष्ट्रास दिलेली दीक्षा कायम टिकण्यास पुरेशा होत्या १९०६ सालीं बारिसाल येथें 'वन्दे मातरम्' न म्हणण्यासंबधींचा हुकूम मोडून निःशस्त्र प्रतिकाराची जी चळवळ हिंदी राजकारणांत प्रथम जन्मास आली आणि जो बहिष्कारयोग लो टिळक, बाबू अरविंद घोष वगैरे पुढाऱ्यांनीं आपल्या बुद्धिमत्तेने आकलन करून आचरण करण्याचा प्रयोग केला होता, ती चळवळ आणि तो प्रयोग फार मोठ्या प्रमाणावर व अधिक शास्त्रशुद्ध पायावर आतां म गाधींनी प्रत्यक्ष करून दाखविला होता या प्रयोगात एक नावीन्य होतें व ते नावीन्य हेच तो प्रयोग इतका यशस्वी होण्याचें खरें कारण होते. हे नावीन्य म्हणजे म. गांधींनी या बहिष्कारयोगाला जें अहिंसानिष्ठेचें आध्यात्मिक अधिष्ठान दिले तेच होय नि.शस्त्र क्रांति किंवा सत्याग्रह याची उभारणी उपनिषदातील आत्मबलावर झालेली आहे, हें लोकमान्यांनीं मागें लिहिलेच होते नि.शस्त्र क्रांतीचे शास्त्र बनवावयाचें तर त्याचें अधिष्ठान अहिंसा हेच असणार हे उघड आहे या अहिंसाशास्त्राची भूमिका न स्वीकारिल्यामुळें आयर्लंडात जो निःशस्त्र क्रांतिवाद जन्मास आला, त्यास पुढें सशस्त्र क्रांतीचे स्वरूप प्राप्त झाले. हिंदुस्थानात प्रथमतः लो टिळक किंवा अरविंद बाबू यानीं जो प्रयोग केला, तो सरकारने दडपून टाकिला व त्याचे पुनरुज्जीवन त्यांच्या हातून झाले नाहीं. वगभंगाविरुद्ध हिंदुस्थानात चळवळ चालू असता दक्षिण आफ्रिकेंत म गाधींनीं अहिंसेचे अधिष्ठान देऊन निःशस्त्र क्रांतीचा एक प्रयोग यशस्वी केला होता. हिंदुस्थानांत आल्यावर त्यांनीं एकदोन छोट्या कार्यांत तोच प्रयोग यशस्वी करून दाखविला होता; आणि १९२० च्या सप्टेंबरपासून १९२२ च्या फेब्रुवारीपर्यंत हा प्रयोग फार मोठ्या प्रमाणावर करून त्यात पूर्ण नसलें तरी तो प्रयोग पुनः करून पाहाण्याची लोकात श्रद्धा उत्पन्न व्हावी इतके यश, त्यांनीं आणून दाखविलें होतें अर्थात् या श्रद्धेला अंधश्रद्धा असें नांव डोळस मनुष्यास देतां येईल असें वाटत नाहीं

## कम्युनिझमचा प्रवेश

असें असलें तरी हा प्रयोग थांबवावा लागला. यामुळें अनेकांची त्यावरील श्रद्धा उडणें साहजिक होतें. या वेळीं जे उत्साही तरुण या कार्यांत पडले व ज्यांच्या

अंतःकरणात क्रांतीची ज्वाला प्रज्वलित होती पण ज्यांना अहिंसावाद पटत नव्हता, त्यांनी यानंतर रशियांतून इकडे येणाऱ्या कम्युनिझमच्या क्रांतिशास्त्राचा अवलंब करण्यास सुरुवात केली कारण या काळांत तरुण अंतःकरणांना सशस्त्र किंवा निःशस्त्र क्रांतिवाद यापैकीच कोणता तरी एक मार्ग पटणे शक्य होतें प्रागतिकांचे सनदशीर धोरण किंवा देशबंधु दासप्रभृति उपदेशीत असलेलें कौन्सिलातील अडवणुकीचे धोरण यांवर त्यांचा विश्वास आता उरला नव्हता अशाच कांही तरुणानीं भाई डांगे यांच्या नेतृत्वाखालीं १९२२ च्या ऑक्टोबर महिन्यांत 'सोशॅलिस्ट' या नांवाचे एक इंग्रजी साप्ताहिक सुरू केलें. याच सुमारास भाई मानवेंद्रनाथ रॉयप्रभृति युरोपात असणाऱ्या हिंदी कम्युनिस्टांनी बर्लिन येथें 'व्हॅन्गार्ड' नांवाचे एक पत्र सुरू केले १९१९ साली रशियात स्थापन झालेल्या 'थर्ड इंटरनॅशनल' या कम्युनिस्टांच्या जागतिक क्रांतिकारक संस्थेने १९२० सालीं युरोपीय साम्राज्यशाहींतून मुक्त होऊं इच्छिणाऱ्या आशियातील हिंदुस्थान, चीन, इराण, तुर्कस्तान, अफगाणिस्तान, वगैरे सर्व राष्ट्रांस क्रांतिकार्यांत साहाय्य करण्याचें धोरण पुकारिलें व त्याचे धागेदोरे हिंदुस्थानात येऊन पोहोचू लागले १९२०-२२ सालात उत्तर हिंदुस्थानात कम्युनिस्ट विचारांच्या कांही लोकांनी किसानांच्या चळवळींत भाग घेण्यास सुरुवात केली १९२३ साली पेशावर येथें कम्युनिस्टांवर एक खटला झाला १९२४ साली कानपूर येथें एक कटाचा खटला उभारण्यात येऊन त्यात भाई रॉय, मुजफ्फर अहमद, शौकत उस्मानी, गुप्ता, शर्मा, श्रृंगार वेलू व गुलामहुसेन, असे आठ आरोपी गोविण्यांत आले यापैकी रॉय जर्मनीत होते, शर्मा फरारी झाले, श्रृंगार वेलू आजारी पडले व हुसेन यानी माफी मागितली यामुळे राहिलेल्या चार आरोपींस चार चार वर्षांची शिक्षा १९२४ च्या मे महिन्यांत देण्यात आली यानंतर पूर्वीच्या गुप्त कटवाल्या सशस्त्र क्रांतिकारकांचे मार्क्सच्या शास्त्रीय क्रांतिवादाकडे अधिकाधिक लक्ष वेधूं लागलें १९२५ सालीं कानपूरमध्ये कम्युनिस्ट कॉन्फरन्स उघडपणें भरली व हिंदुस्थानात कम्युनिझमचा शास्त्रीय क्रांतिवाद विधिपूर्वक प्रस्थापित झाल्याचें लोकांस जाहीर झालें! याच वेळी चीनमधील राष्ट्रीय पुढारी डॉ. सन्यत्सेन यांच्याशीं ज्या प्रकारचा समेट कम्युनिस्टांनी केला, तशाच प्रकारचा एकादा समेटाचा करार राष्ट्रसभेंतील पुढाऱ्यांशीं करण्याचा प्रयत्न कम्युनिस्ट पक्षाने केला, पण तो राष्ट्रसभेच्या पुढाऱ्यांनी मान्य केला नाही, असे भाई डांगे यानी 'सह्याद्री'च्या जानेवारी १९३८-च्या समाजवादी विशेषांकांत लिहिलें आहे

## फेर-नाफेरवाद

१९२२ पासून राष्ट्रसभेत कौन्सिल-बहिष्कारवादी व कौन्सिल-प्रवेशवादी असे दोन पक्ष पडले. पहिला पक्ष पूर्वीच्या असहकारितेच्या कार्यक्रमास चिकटून राहणारा असल्यामुळे त्याला त्याच्या प्रतिपक्षाने 'नाफेरवादी' किंवा 'सनातनी' असे नांव

दिलें आणि आपणांस 'फेरवादी' किंवा पर्यायानें 'नवमतवादी' असे नाव घेतलें. या वादाचें बीज १९२० साली भरलेल्या राष्ट्रसभेच्या खास अधिवेशनांत पेरलें गेलें होतें. मध्यंतरी दीड वर्षाच्या लढाऊ कार्यक्रमाच्या मोहिमेमुळे त्याला अंकुर फुटला नव्हता. देशबंधु दास यांनीं म गांधींस कौन्सिल-बहिष्कारासबंधी जोराचा विरोध केला असला, तरी ते सहकारवादी म्हणजे मॉटेग्यू-सुधारणा चालवून घ्याव्यात या मताचे पूर्वीपासूनच नव्हते व अखेरपर्यंत त्यांनी आपलें कौन्सिलातील अडवणुकीचें धोरण सोडलें नाहीं कौन्सिलांतील सनदशीर विरोध–सतत विरोध–हे त्यांचें धोरण होतें व यासच ते कौन्सिलांतील असहकारिता असे म्हणत. त्यांनीं जो स्वराज्यपक्ष १९२३ साली स्थापन केला, त्याचें धोरण मॉटेग्यू-सुधारणा-कायदा रद्द करून सपूर्ण स्वराज्याचा कायदा देण्याचे अभिवचन सरकारने दिले नाहीं व निदान प्रांतिक स्वराज्य प्रस्थापित झालें नाहीं, तोपर्यंत अधिकारस्वीकार करून सरकारशीं सहकार न करिता सतत विरोध करावयाचा असें होतें या धोरणांत प. मोतीलाल नेहरू आणि देशबधु दास याना अनत्याचारी असहकारितेच्या तत्त्वाशी विरुद्ध असे काही आहे असे वाटत नसे; व म्हणून ते आपणांस असहकारवादी म्हणवून घेत १९२३ च्या दिल्ली येथील राष्ट्रसभेच्या खास अधिवेशनाने या पक्षास कौन्सिलात जाऊन कार्य करण्यास परवानगी दिली व १९२३ अखेर झालेल्या निवडणुकीत हा पक्ष सर्वत्र यशस्वी होऊन बहुमतानें निवडून आला.

१९२४ च्या जानेवारीत म गाधी 'अपेंडिसाइटिस'च्या रोगानें एकाएकीं आजारी पडले व त्यांचें ताबडतोब ऑपरेशन केल्यामुळे त्याचे प्राण वाचले हे ऑपरेशन कर्नल मॅडॉक यांनी त्यांना येरवडा-तुरुंगांतून ससून हॉस्पिटलमध्यें आणून केले. यानंतर सरकारनें त्यांची बिनशर्त मुक्तता केली आजारांतून उठल्यानतर ते कांहीं दिवस जुहू येथें हवा पालटण्यास गेले नंतर तेथेंच प मोतीलाल नेहरू व देशबधु दास यांनीं त्यांची गांठ घेऊन त्यांच्याशीं कौन्सिलवादासंबधी बरीच चर्चा केली. अखेरीस दोन पक्षाचें एकमत होऊं शकलें नाही तथापि ज्या अर्थी राष्ट्रसभेने त्याना कौन्सिलांत जाण्याची परवानगी दिली आहे, त्या अर्थी त्यांच्या कार्यात कोणींहि अडथळा आणूं नये, उलट त्यांस शक्य तें साहाय्य करावे, असे गाधीजींनीं मान्य केलें; आणि दास, नेहरू यांनीं कौन्सिलांत व बाहेर गांधीजीच्या सर्व विधायक कार्यास आपण शक्य तें साहाय्य करूं असे मान्य केले इतकेच नव्हे, तर आपलें खरे बल बाहेरचें विधायक कार्य हेंच असून ज्या वेळीं आपल्या कौन्सिलांतील कार्याचा उपयोग होत नाहीं असे आपणास दिसून येईल, त्या वेळी आपण कौन्सिले सोडून बाहेर येऊं आणि म. गांधीच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेची शिस्त पाळून शांततेच्या कायदेभंगाची किंवा सत्याग्रहाची चळवळ करण्यास पुढें येऊं, असेंहि त्यांनीं महात्माजींस लेखी आश्वासन दिलें व तें जाहीरहि केलें! या वेळच्या आपल्या जाहीर पत्रकांत ते म्हणतात:

"We are decidedly of opinion that our council-work must necessarily lose much of its strength without the backing of the constructive work outside . Indeed in a matter of constructive work, the mutual support of both inside and outside activities must in our opinion, give strength to the very sanction upon which we rely. In this connection we unhesitatingly accept the suggestion of Mahatma Gandhi regarding Civil Disobedience. We can assure him that the moment we find that it is impossible to meet the selfish obstinacy of the Bureaucracy without Civil Disobedience, we will retire from the legislative bodies and help him to prepare the country for Civil Disobedience, if by that time the country has not already become prepared, and we will then unreservedly place ourselves under his guidance and work through the Congress organisation, in order that we may unitedly work out a substantial programme of Civil Disobedience."*

अशा प्रकारें जोपर्यंत कायदेभंगाचा प्रसंग आला नाहीं व तयारी झालेली नाहीं, तोपर्यंत स्वराज्यपक्षानें कायदे-मंडळांत काम करावें आणि कौन्सिल-बहिष्कारवाल्यांनी बाहेर लोकसंघटनेचें विधायक कार्य करावे, ज्या वेळीं कौन्सिलांतील विरोधानें सरकार नमत नाहीं असें सिद्ध होईल, त्या वेळी स्वराज्यपक्षानें म गांधींस येऊन मिळावें आणि त्याच्या नेतृत्वाखालीं, त्यांच्या निशाणाखालीं, व राष्ट्रसभेच्या शिस्तीखालीं सत्याग्रह-संग्राम सुरू करावा आणि म. गांधी व इतर विधायक कार्यकर्त्यांनीं मध्यंतरींच्या काळांत स्वराज्यपक्षास बाहेरून शक्य ती मदत करावी, अशी तडजोड म. गांधी बाहेर आल्यानंतर ४-६ महिन्यांत ठरली आणि १९२४ च्या अखेर म. गांधी व देशबंधु दास यांच्यामध्यें झालेला हा समेट बेळगांव-अधिवेशनांत राष्ट्रीय सभेनें मान्य केला. म गांधींच्या गैरहजेरींत राष्ट्रीय सभेंत पडलेले दोन तट त्यानीं बाहेर येतांच मोडून टाकिले आणि बाहेरचें विधायक कार्य व कौन्सिलातील सदनशीर विरोधाचें कार्य यांची एक गाठ बांधून सरकारला कौन्सिलांतील विरोध नमवूं शकला नाहीं तर पुनः सर्वांच्या एकीनें सत्याग्रह-संग्राम करण्याचें नवे धोरण आखिलें. १९२४ च्या डिसेंबरमध्यें म. गांधी हेच राष्ट्रसभेचे अध्यक्ष झाले आणि त्यानंतर थोड्याच दिवसांत बंगालमध्यें जाऊन त्यांनीं देशबंधूंच्या साहाय्यानें सत्याग्रहाच्या दुसऱ्या मोहिमेचा डाव रचिला. देशाच्या दुर्दैवानें १९२५ सालींच

* History of the Congress, P 461-462.

देशबंधूंचें देहावसान झालें व म. गांधीनीं बंगालमधील आपल्या दौऱ्यानें केलेली दुसऱ्या सत्याग्रह-मोहिमेची सिद्धता अखेरीस विफल झाली, असें लोकांना भासलें

## स्वराज्य-पक्ष व प्रतियोगी सहकारिता-पक्ष

देशबंधु दास यांच्या निधनानंतर पं. मोतीलाल नेहरू यांच्याकडेच स्वराज्य-पक्षाचें सर्व नेतृत्व आलें मॉटेग्यू-सुधारणाखालील स्वराज्य-पक्षाचें सामान्य धोरण असें सांगता येईल, कीं ब्रिटिश सरकारनें राज्यघटनेसंबंधीं, सुधारणा-कायदा बदलण्या-संबंधीं, कांहीं तरी जाहीर आश्वासन दिल्याखेरीज व प्रांतिक सरकारांतील मंत्रि-मंडळाची सत्ता अबाधित चालू देण्याचें आश्वासन दिल्याखेरीज, थोडक्यांत सांगा-वयाचें म्हणजे राष्ट्रसभेशीं कांहीं तरी तडजोड केल्याखेरीज मंत्रिमंडळें स्वीकारावयाचीं नाहींत १९२६ मधील गौहत्ती येथील राष्ट्रसभेच्या अध्यक्षीय भाषणांत श्रीनिवास आय्यंगार म्हणतात कीं "मंत्रिपदें न स्वीकारण्याचें धोरण सार्वकालिक किंवा बिनशर्त नाहीं देशबंधु दास यांनीं फरीदपूर येथून ज्या शर्ती सुचविल्या होत्या, त्यासारख्या शर्ती मान्य झाल्याखेरीज या धोरणांत बदल होणार नाहीं व तो करणेंहि इष्ट नाहीं" आपल्या मागणीपाठीमागें कौन्सिलांतील अडवणूक, बाहेरची विधायक संघटना आणि अंतिम दृष्टया सत्याग्रह, असें हें राजकारण होतें प्रत्येक मागणीपाठी-मागें कांहीं तरी शक्ति असली पाहिजे व तिचें अंतिम स्वरूप प्रत्यक्ष प्रतिकारापर्यंत वाढत गेलें पाहिजे, यासाठीं राष्ट्रसभेची शिस्त पाळली पाहिजे आणि सत्याग्रह करण्याच्या वेळीं म. गांधींचें नेतृत्व स्वीकारलें पाहिजे हीं तत्त्वें दास-नेहरूप्रणीत स्वराज्यपक्षानें केव्हांहि सोडिलीं नाहींत; व याचमुळें म. गांधी व स्वराज्यपक्ष यांच्यातील सलोखा बेळगांव-अधिवेशनापासून वाढत गेला आणि १९२९ अखेर कायदेमंडळांतील विरोधा-नें ब्रिटिश सरकार आपली स्वराज्याची मागणी मान्य करीत नाहीं असें जेव्हां सिद्ध झालें, तेव्हां लाहोरच्या राष्ट्रसभेत पं. मोतीलाल नेहरू यांनीं १९२४ सालीं देशबंधु दास यांच्यासमवेत म. गांधींना दिलेलें आश्वासन खरें करून कायदेमंडळांवर बहिष्कार घालण्याचा व म. गांधींच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रहांत सामील होण्याचा ठराव राष्ट्रसभे-समोर मांडिला

म. गांधी आणि स्वराज्यपक्ष यांच्यामधील हा वाढता सलोखा महाराष्ट्रांतील केळकरपक्षास १९२५ पासूनच अप्रिय होऊं लागला १९२६-२७ च्या कायदेमंडळाच्या निवडणुकीपूर्वीं त्यांनीं स्वराज्यपक्षांतून फुटून मॉटेग्यू-सुधारणांना विरोध करण्याचें धोरण सोडून दिलें व त्या चालवून होईल तितकें लोकहित करण्याचें नवें धोरण आंखिलें हें धोरण राष्ट्रसभेच्या व स्वराज्यपक्षाच्या धोरणाशीं विरोधी तर होतेंच, पण १९२० सालीं लो. टिळकांनीं कॉंग्रेस-डेमोक्रॅटिक पक्षाचें जें धोरण ठरविलें होतें, त्याहूनहि अत्यंत मवाळ असें तें होतें. कॉंग्रेस-डेमोक्रॅटिक पक्षाच्या धोरणांतील व श्री. केळकरप्रभृति महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं इ. स. १९२६ सालीं स्वराज्यपक्षांतून फुटून

निघून जो प्रतियोगी सहकारिता पक्ष स्थापन केला, त्याच्या धोरणातील फरक लक्षांत येण्याकरिता त्या दोन पक्षांच्या जाहीरनाम्यांतील दोन कलमांची तुलना केली असतां पुरे होईल प्रतियोगी पक्षाच्या जाहीरनाम्यांत पांचवें कलम पुढीलप्रमाणें होतें :

"We beleive that the only course under the present circumstances is that of responsive co-operation, which means working the Reforms—unsatisfactory, disappointing, inadequate as they are—for all they are worth, and using the same for accelerating the grant of full Responsible Government and also for creating in the meanwhile opportunities for the people for advancing their interests and strengthening their power and resistance to injustice and misrule."

या कलमात प्रतियोगी सहकारिता म्हणजे सुधारणा कशाहि असल्या तरी त्या चालवून घेणें, एवढीच व्याख्या केलेली आहे पण कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचे धोरण सागताना लोकमान्याच्या कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा जाहीरनामा म्हणतो .

"This party proposes to work the Montague-Reform Act for all it is worth and for accelerating the grant of full Responsible Government and for this purpose it will, without hesitation, offer co-operation or resort to constitutional opposition, whichever may be expedient and best calculated to give effect to the popular will"

या धोरणाची वरील धोरणाशी तुलना केल्यास, त्यांतून सनदशीर विरोधाचा ( constitutional opposition ) उल्लेख अजीबात वगळण्यांत आलेला आहे, आणि विरोधाचें धोरण स्वीकारावयाचे किंवा सहकारिता करावयाची हे लोकमतानुसार ( best calculated to give effect to the popular will ) ठरवावयाचे, याचाहि वरील प्रतियोगी पक्षाच्या धोरणांत मागमूस ठेविलेला नाही. कारण लोकमताचा कौल पाहून वागावे याचा अर्थ, लोकमान्य तरी राष्ट्रसभेचा हुकूम पाळून वागावे असाच करीत होते आणि म्हणूनच त्यांनी आपल्या पक्षाचे नाव 'कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्ष' असे ठेविलें होते. आता केळकरपक्षाला राष्ट्रसभेविरुद्ध बंड करावयाचें होते; म्हणून 'कॉंग्रेस डेमोक्रॅटिक' हे नांव त्याला घेणें शक्य नव्हते लोकमान्यांचा संबध कोठें तरी ठेविला पाहिजे, म्हणून त्यांचा 'प्रातियोगी सहकारिता' हा शब्द त्यांनी घेतला, पण त्याची व्याख्या बनवितांना त्यांतील प्रतियोगाची म्हणजे सरकारनें सहकारिता न केल्यास विरोध करण्याची भावना व्याख्येंतून वगळून टाकण्यांत आली! लोकमान्यांचा कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा जाहीरनामा पहिल्याच कलमांतील पहिल्या वाक्यात म्हणतो :

"The Congress Democratic Party is a party animated by feelings of unswerving loyalty to the Congress and faith in Democracy."

याच्या उलट, केळकरपक्षाच्या प्रतियोगी सहकारितेचा जाहीरनामा पहिल्याच कलमांत राष्ट्रसभेवर व तिच्यातील स्वराज्यपक्षावर अपशब्दांची पुढीलप्रमाणें वृष्टि करतो :

"We entirely disapprove of the present policy of the Congress, as well as that of the Swaraj party, because it is made up of vague threats, feigned ultimatums, and a programme of council-work which can neither effectively obstruct the administrative machinery of the Government nor advance the interests of the people."

तात्पर्य, ज्या वेळी राष्ट्रसभा आणि स्वराज्यपक्ष हे आपल्या पाठीमागें कांही तरी शक्ति निर्माण करून सरकारला आपल्यापुढे नमविण्याचा प्रयत्न करीत होते आणि शक्य तर राज्यकारभाला खीळ घालण्याचाहि प्रयत्न करीत होते, त्या वेळीं राष्ट्रसभेच्या आणि स्वराज्य पक्षाच्या धमक्या या पोकळ धमक्या आहेत, असें सांगून **हा प्रतियोगी पक्ष लोकांची व सरकारचीहि दिशाभूल करीत होता.** राष्ट्रसभेनें व तिच्यांतील स्वराज्यपक्षानें सरकारला दिलेल्या धमक्या पोकळ नव्हत्या आणि तिने पाठविलेले निर्वाणीचे खलिते हेहि केवळ भ्रामक किंवा कृत्रिम नव्हते, ही गोष्ट १९३० साली महात्मा गांधी आणि पं. मोतीलाल नेहरू यांनीं सरकारच्या, जनतेच्या आणि जगाच्या निदर्शनास आणून दिली पण हे दृश्य प्रत्यक्ष दिसूं लागेपर्यंत शल्यानें कर्णाचा केला त्याप्रमाणें राष्ट्रसभेचा व राष्ट्राचा उत्साहभंग करणें एवढेंच कार्य, या १९२६ साली नवीन जन्मास आलेल्या आणि १९३० सालीं निजधामास गेलेल्या प्रतियोगी पक्षाने केले! स्वराज्यपक्षाची अडवणूक फसली म्हणून आम्ही आतां प्रतियोगी सहकारिता करणार, म्हणजे विधायक लोक-हित करण्यासाठीं सरकारला बिनशर्त शरण जाणार, असे म्हणणाऱ्या या पक्षाने जनतेचें विधायक लोकहित तरी काय केले, हे खुद्द तो पक्षहि सागूं शकणार नाहीं. विधायक लोकहिताच्या नांवानें त्यानें जर काही केलें असेल तर ते एवढेच, कीं जे राष्ट्रसभेच्या शिस्तीचे तत्त्व लोकमान्यांनीं आजन्म आचरिलें व उपदेशिले तें तत्त्व यानें सोडून दिले, आणि आपल्या राजकारणामागें सघटित लोकशक्ति व लढा देण्याचें सामर्थ्य निर्माण केलें तरच ते राजकारण यशस्वी होतें, हे तत्त्व राष्ट्रसभेस शिकविण्यासाठीं लोकमान्यांनीं जे आजन्म प्रयत्न केले, त्या सर्वांवर पाणी ओतून जी राष्ट्रसभा ही लोकशक्ति सघटित करीत होती व तिच्या बळावर सरकारशीं झगडा करण्याचें शिक्षण राष्ट्राला देत होती, त्या राष्ट्रसभेविरुद्ध बंड करण्याचें घातुक उदाहरण या पक्षानें लोकांना घालून दिलें.

## केळकर-पक्षाच्या घसरगुंडीची मीमांसा

श्री. केळकर ह्यांचें नेतृत्व स्वीकारून महाराष्ट्रांतील लोकमान्यांच्या पक्षांतील जे लोक चालले होते त्यांचा, म्हणजे त्यांच्या राजकीय धोरणाचा असा अधःपात कां झाला, याची राजकीय दृष्टया एक तात्त्विक उपपत्ति आहे. ही उपपत्ति अशी, कीं लोकमान्यांच्या हयातींतच त्याच्या पक्षांत दोन उपपक्ष होते. त्यापैकीं एक उपपक्ष क्रान्तिकारक पक्षाशीं अधिक सन्निध व दुसरा उपपक्ष सनदशीर पक्षाशी अधिक निकट, अशी वस्तुस्थिति होती लोकमान्यांच्या पक्षांतील पहिल्या वृत्तीचे लोक म्हटले म्हणजे श्री काकासाहेब खाडिलकर, अण्णासाहेब पराजपे आणि गंगाधरराव देशपांडे हे होत, आणि दुसऱ्या वृत्तीच्या लोकात श्री केळकर व दादासाहेब करदीकर याचा समावेश होत असे. १८९५-९६ सालीं जेव्हां लोकमान्यांनीं आपलें राजकारण प्रथम सुरू केलें, त्या वेळीं ते दुसऱ्या वृत्तीच्या लोकाना झेंपण्यासारखे होते. पण पुढे त्या राजकारणाचा पूर्ण विकास होऊन ज्या ज्या वेळीं त्याला प्रखर क्रान्तिकारक असे स्वरूप प्राप्त होऊ लागलें, त्या त्या वेळीं श्री केळकर व करदीकर याचा लोकमान्यांच्याशी तीव्र मतभेद झाला, व गोखलेपक्षाशीं त्यांचे संबध वाढूं लागले ता. २ एप्रिल १९१० रोजीं मंडालेहून लिहिलेल्या आपल्या एका पत्रांत लोकमान्य टिळक लिहितात, "केळकर व खाडिलकर याचें काम एकोप्याने होत असेल अशी मला आशा आहे. त्यांचा उत्साह, त्याची सावधगिरी पण विशेपतः त्याची एकी यावर माझी सर्व भिस्त आहे" या वाक्यात लोकमान्याना पुष्कळ अर्थ अभिप्रेत आहे असें आम्हास वाटते श्री. केळकर ही राजकारणातील मूर्तिमत सावधगिरी आहे आणि श्री खाडिलकर हा मूर्तिमत उत्साह आहे, असे त्या वेळी लोकमान्यास वाटत असलें व आपल्या वर्धिष्णु क्रातिवादास या दोहोचीहि आवश्यकता आहे अशी त्यांची भावना असली, तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. पण लोकमान्यांच्या निधनानतर त्यांच्या राजकारणांतील 'उत्साह' म गांधींना येऊन मिळाला, आणि 'सावधगिरी' तेवढी उत्साहाचें खोबरे टाकून केळकर-पक्षांत उरली! लोकमान्याच्या राजकारणाच्या विकासांत १९०५ ते १९०८ या काळात क्रातिकारक अवस्था प्राप्त होत होती, इतक्यांत त्यांना बंदिवास प्राप्त झाला यानतर पुनः १९२० सालीं तशी अवस्था प्राप्त होऊ लागली; इतक्यांत त्यांचें देहावसान झाले त्यांच्या हयातींत ज्या उत्साही लोकांनी आपल्या अंतःकरणांत क्रातिवृत्तीची वाढ व जोपासना केली होती, ते लोक महात्मा गांधींच्या निःशस्त्र क्रांतिवादांत सामील झाले, आणि ज्यांनी सावधगिरी जवळ ठेवून आंतील क्रातिवृत्ति गमावली, ते वेळी अवेळी राष्ट्राला व राष्ट्रसभेला सावधगिरीचा मंत्र उपदेशीत देशांत वाढणाऱ्या क्रांतिवादापासून अलग झाले मात्र अशा रीतीने लोकमान्यांच्या तत्त्वास झुगारून देऊन राष्ट्रसभेपासून अलग होण्यास महात्मा गाधीचा अहिंसावाद आम्हांस पटत नाहीं, हें भ्रामक कारण लोकांपुढें मांडून आपण हिंसावृत्तीचे क्रांतिकारक

आहो, असे या पक्षातील कांही लोक सामान्य जनतेस भासवीत असत! हिंदुस्थानातील सशस्त्र क्रांतिवाद हा या काळांत हळूहळू मार्क्सच्या शास्त्रीय क्रांतिवादाचा आश्रय करू लागला होता, हे आम्ही मागे लिहिलेंच आहे या शास्त्रीय क्रांतिवादाशी केळकरपक्षाचा किती विरोध होता, तें लोकांना आतां दिसून आलेंच होते

## १९२२ ते १९३० मधील राजकारण

१९२० सालीं लोकमान्याच्या हयातीतच हिंदी राजकारणाला स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार संपूर्ण स्वराज्यासाठी, म्हणजे लष्कर व तिजोरी यांसहित मध्यवर्ती हिंदुस्थानसरकारांतील सर्व खात्यावर सत्ता मिळवून घेण्यासाठीं, एकसारखे झगडत राहण्याचे स्वरूप प्राप्त झाले होते हा झगडा चालविण्यासाठीच कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्ष स्थापन झालेला होता व तें कार्य राष्ट्रसभेने पुढे स्वराज्यपक्ष व असहकारपक्ष या आपल्यातील दोन पक्षाच्या सहकार्यानें व म गांधींच्या नेतृत्वाखाली चालविलें होतें मॉंटेग्यू-सुधारणा-कायदा रद्द करवून घेण्याचा व संपूर्ण स्वराज्याचा दुसरा कायदा प्राप्त करून घेण्याचा हा झगडा १९२८ पर्यंत कौन्सिलांतील अडवणूक व बाहेरील विधायक लोकसंघटना यांच्या जोरावर चालू होता परंतु १९२२ सालापासून १९२८ सालापर्यंत त्याला प्रक्षोभक किंवा प्रत्यक्ष प्रतिकाराचे स्वरूप आले नाहीं. इ स. १९२७ साली लॉर्ड बर्कनहेड यानी सायमन-कमिशन नेमून मॉंटेग्यू-सुधारणांत सुधारणा करणे आवश्यक आहे किंवा काय या प्रश्नाचा विचार चालविला या कमिशनमध्यें एकहि हिंदी मनुष्य न घेता ब्रिटिश मुत्सद्द्यानी हिंदुस्थानच्या स्वयंनिर्णयाच्या हक्कावर पूर्ण हरताळ फासला होता हे पाहून प्रागतिक पक्षासहित सर्व पक्षात बहिष्काराची लाट उसळली आणि याच वर्षी डिसेंबर महिन्यात भरलेल्या मद्रास येथील अधिवेशनात राष्ट्रसभेने प जवाहरलाल नेहरू यानी मांडिलेल्या स्वातंत्र्याच्या ध्येयाचा ठराव मान्य केला त्याचबरोबर सायमन-कमिशनवरील बहिष्काराची चळवळ करणें व राष्ट्रांतील सर्व पक्षांस मान्य अशी एक स्वराज्ययोजना तयार करणे, असे दोन महत्त्वाचे ठराव या अधिवेशनांत झाले पं. जवाहरलाल नेहरू यांनीं स्वातंत्र्याच्या ध्येयाचा ठराव पास करून घेतला, त्याचबरोबर आगामी महायुद्धात ब्रिटिश साम्राज्याशीं सहकार करू नये असाहि ठराव या अधिवेशनांत त्यानी करून घेतला यापूर्वी प जवाहरलाल नेहरू हे युरोपांत जाऊन आलेले असून ते समाजवादी बनलेले होते समाजवादाच्या धोरणानुसार राष्ट्रसभेच्या राजकारणाला सार्वत्रिक क्रांतिवादी स्वरूप देण्याचा प्रयत्न त्यांनी या वेळेपासून सुरू केला १९२८ व १९२९ या सालांत त्यांनी ठिकठिकाणीं हिंडून ‘ युवकसंघ ’ व ‘ स्वातंत्र्यसंघ ’ अशा संस्था स्थापिल्या व भरतखंडांतील युवकांत समाजवादी सर्वांगीण क्रांतीची वृत्ति त्यांनीं निर्माण केली पुढें १९३० सालीं म गांधींच्या नेतृत्वाखालीं जेव्हां हिंदुस्थानात संपूर्ण स्वातंत्र्याचे सत्याग्रहयुद्ध झालें, तेव्हां जे भारतीय तरुण या युद्धांत सामील झाले, त्यांच्यांतूनच पुढें

राष्ट्रसभेतील समाजवादी पक्ष निर्माण झाला. याखेरीज भाई डांगेप्रभृति लोकांनीं १९२२ सालापासून हिंदुस्थानांत जो कम्युनिस्ट पक्ष संघटित करण्याचे कार्य सुरू केलें होतें, त्या कार्यास १९२४ च्या कानपूरच्या खटल्यांतील लोक सुटून आल्यानंतर पुनः जोर चढूं लागला १९२७-१९२८ व १९२९ या सालांत हिंदुस्थानांत कामगार-वर्गाच्या संपांची व कम्युनिस्ट पक्षाच्या संघटनेची चळवळ बरीच जोरात चालू होती पण हा पक्ष १९३० सालच्या प्रचंड सत्याग्रह-संग्रामापासून प्रायः अलिप्त राहिला याच्यापूर्वी या पक्षांतील पुढाऱ्यांवर १९२९ सालींच मीरत-कटाचा खटला भरून सरकारनें त्यांना तुरुगांत डांबून टाकिलें होतें.

प जवाहरलाल नेहरू हे या वेळीं भारतीय तरुणात समाजवादी क्रान्तीचे विचार फैलावीत असता प मोतीलाल नेहरू हे एक सर्वपक्षीय परिषद् भरवून वसाहतीच्या स्वराज्याची निश्चित योजना आखण्याचें कार्य करीत होते, आणि सरदार वल्लभभाई पटेल हे म गाधीच्या विधायक कार्यक्रमांतून सत्याग्रहाची प्रचंड शक्ति शेतकरीवर्गात कशी निर्माण होऊं शकते, हे दाखविण्यासाठींच जणुं काय बारडोली तालुक्यात १९२८ साली फेरआकारणीत वाढविलेला सारा कमी करून घेण्यासाठीं शेतकऱ्यांचा सत्याग्रह सघटित करीत होते प मोतीलाल नेहरू स्वराज्याची योजना घडवीत असतांना त्यांनी अलाहाबादेस येण्यासाठी म गाधीना तार केली होती तिला उत्तर पाठवितांना तुम्ही योजना तयार करा, ती योजना अमलात आणण्यास लागणारी शक्ति निर्माण करण्याचे कार्य मी करीत आहे, असे गांधीजींनी म्हटले होतें. यावरून म गांधींची राजकारणाकडे पाहण्याची दृष्टि बरोबर व्यक्त होते १९२८ साली सरदार वल्लभभाई यांनीं बारडोली तालुक्यांत साराबंदीची जी चळवळ केली, ती पूर्णपणें यशस्वी झाली अर्थात् या वेळेपासून राष्ट्राचे लक्ष पुनः सत्याग्रह व प्रत्यक्ष प्रतिकार यांकडे वेधले १९२८ अखेर प मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखाली कलकत्त्यास राष्ट्रसभेचें अधिवेशन भरले आणि या अधिवेशनात 'नेहरू-रिपोर्ट' या नावाने प्रसिद्ध असलेली, सर्वपक्षीय परिषदेत मजूर झालेली, वसाहतीच्या स्वराज्याची योजना ब्रिटिश सरकारने एक वर्षाच्या आत मान्य न केल्यास पुनः करबदी व कायदेभंग यासुद्धा असहकारयुद्ध आम्ही सुरू करू, असा ठराव म. गांधींनी मांडिला व त्याचबरोबर हे असहकारयुद्ध नेहरू-रिपोर्टानें आंखलेल्या वसाहतीच्या स्वराज्या-साठी न करता स्वातंत्र्य किंवा सपूर्ण स्वराज्य यासाठी पुकारिलें जाईल, असेंहि राष्ट्र-सभेने उद्घोषित केलें.

पं. मोतीलाल नेहरू यानी मध्यवर्ती असेंब्लीत अशाच प्रकारचा ठराव माडिला व पुढील साली आम्ही प्रचंड सत्याग्रह-सग्राम करूं असेंहि सरकारला बजावलें. या वेळी महाराष्ट्रांतील प्रतियोगी सहकारितापक्ष प नेहरूच्या या धमक्या पोकळ आहेत आणि बॅ जयकर यांच्यासारखा असेंब्लींत दुसरा कोणीच नेता नाहीं, हे शिक्षण केसरीच्या महाराष्ट्रीय वाचकांस देत होता! पण लॉर्ड आयर्विन् यांना ही गोष्ट केसरी-

कारांइतकी उपेक्षणीय वाटली नाहीं व म्हणून ते विलायतेस जाऊन राष्ट्रसभेनें सुरू केलेल्या सायमन-कमिशनच्या बहिष्काराच्या चळवळीस काय उत्तर द्यावयाचें, याचा ब्रिटिश प्रधानमंडळाशी विचारविनिमय करून आले. या वेळीं देशांत क्रांतिकारक चळवळीच्या लाटा उठू लागलेल्या असून त्यांना कांहीं ठिकाणीं अत्याचाराचेंहि स्वरूप येऊं लागलें होते सायमन-बहिष्काराची मिरवणूक लाहोर येथें निघाली असतां, तेथील जमावावर जो लाठीहल्ला झाला, त्यांत लाला लजपतराय यांच्यावरहि लाठीहल्ला झाला व त्यात त्याची प्रकृति जी बिघडली, त्यांतच त्याचा १९२८ सालीं अंत झाला त्यांच्या आजन्म राष्ट्रसेवेस अनुरूप असे वीरोचित मरण त्यांना आलें. साम्राज्यशाहीच्या हातून घडलेल्या या कृत्याचा सूड म्हणूनच पुढे लाहोर येथें सॉण्डर्स यांचा खून झाला हे सर्वप्रसिद्ध आहे अशा रीतीनें हिंदी राजकारणांत या वेळीं प्रचंड खळबळ उडून राहिली होती जित राष्ट्रांतील राजकारणाचे **क्रांतिकारक वृत्ति हे नित्य अधिष्ठान आहे.** या वृत्तीतून निर्माण होणाऱ्या प्रत्येक लाटेकडे पाहिल्यास ती क्षणभर वर येते व पुनः खालीं जाते असे दिसते; व यावरूनच ज्याच्या अंतःकरणात ही क्रांतिकारक वृत्ति नाहीं त्याना बहिष्कारयोग, असहकारयोग, सत्याग्रह, निःशस्त्र क्रांतिवाद किंवा शास्त्रीय क्रांतिवाद् या क्षणिक लाटा भासतात; व **त्यांना आपल्या राजकारणाचे तें नैमित्तिक स्वरूप भासते.** परतु पारतंत्र्यांतील दडपल्या गेलेल्या जनतेच्या आकांक्षांशीं ज्यांचे अंतःकरण समरस झालेलें आहे, त्यांना या वारवार उठणाऱ्या लाटा म्हणजे परतंत्र जनतेच्या अंतःकरणातील स्वातंत्र्याची पवित्र आत्मप्रेरणाच होय हे समजते पारतंत्र्यातून स्वातंत्र्याकडे जाण्याची मानवी मनाची जी नित्य आत्मप्रेरणा, तींतूनच या क्रांतिकारक वृत्तींच्या लाटा उगम पावत असल्यामुळें, खरे लोकनायक अथवा लोकांवर सत्ता गाजवू इच्छिणारे खरे मुत्सद्दी तिकडे दुर्लक्ष करूं शकत नाहीत परतु परकीयावर सत्ता गाजविणाऱ्या आपल्या देशांत येणाऱ्या ब्रिटिश मुत्सद्द्यांची दिशाभूल, येथील स्वतःला व्यवहारदक्ष समजणारे प्रागतिक मुत्सद्दी अथवा त्याच वृत्तीचे इतर राजकीय पुढारी करीत असत व या क्रांतिकारक राजकारणाला फारसें महत्त्व देऊं नका, ती एक अज्ञानी जनतेला भुरळ पाडणाऱ्या पुढाऱ्यांनीं उठविलेली वेडाची क्षणिक लहर आहे, व ती लवकरच नष्ट होईल, असे ते लोकांनाहि सांगत असत **लोकांचे व ब्रिटिश साम्राज्याचेहि खरे शत्रू हे अंध लोकनायकच होते.** पण तो त्यांचा एक प्रकृतिधर्मच होता. ज्यांच्या अंतःकरणात ही स्वातंत्र्याची आत्मप्रेरणा कमी, त्यांच्या बुद्धीला नेहमीं असेंच वाटणार लोकांतील ही आत्मप्रेरणा जागृत करणारे पुढारी सामान्य जनतेकडून क्रांतिकारक चळवळीच्या प्रचड लाटा कशा उठवतात, यांचें त्यांच्या बुद्धीला एक मोठे कोडेच पडे; तें सोडविण्यास त्यांची बुद्धि समर्थ नसल्यामुळें ही एक सामान्य जनतेंत उठलेली वेडाची लहर आहे व ही लाट ओसरली म्हणजे पुनः लोक ताळ्यावर येतील व आपला बुद्धिवाद ऐकू लागतील, अशी

त्यांना आशा वाटूं लागे. पण एक लाट ओसरल्यानंतर पुनः दुसरी लाट उसळते, हे पाहिल्यानतरहि ते या लाटांच्या पाठीमागें कांहीं नित्याची आत्मप्रेरणा आहे असें न समजतां सर्व लोक वेडे आहेत असे मानून आपल्या बुद्धीचे समाधान करून घेत!

लॉर्ड आयर्विन् हिंदुस्थानांत परत आल्यानतर ता १ नोव्हेंबर १९२९ रोजीं त्यांनीं एक जाहीर पत्रक काढिलें. त्यात १९१९ सालीं जो सुधारणांचा कायदा करण्यांत आलेला आहे त्याचें अतिम पर्यवसान वसाहतीचे स्वराज्य हेच होय सायमन-कमिशनचा रिपोर्ट झाल्यानतर त्याचा व सुधारणाच्या इतर योजनाचा विचार करण्यासाठीं ब्रिटिश मुत्सद्दी, ब्रिटिश हिंदुस्थानांतील हिंदी पुढारी आणि सस्थानिकाचे प्रतिनिधी, याची एक 'गोलमेज परिषद्' भरविण्याचा ब्रिटिश मंत्रिमंडळाचा विचार आहे, असें जाहीर करण्यांत आले देशांतील प्रागतिक पुढाऱ्यांचें या जाहीर पत्रकानें समाधान झालें आणि सायमन-कमिशनच्या वेळीं ज्यांनीं काहीं काल असहकाराचे धोरण स्वीकारिलें होते ते प्रागतिक पुढारी, या जाहीर पत्रकानतर पुनः सहकारवादी झाले. पण म. गांधी व राष्ट्रसभा हे मात्र या गोलमेज परिषदेशी सहकार करण्यास त्या वेळी तयार नव्हते. म. गाधी, सर तेजबहादूर सप्रू, पं मोतीलाल नेहरू, बॅ. जिना वगैरे पुढाऱ्यांनी या वेळीं लॉर्ड आयर्विन् यांची मुलाखत घेतली या मुलाखतींत मुख्य प्रश्न हिंदुस्थानला एका कायद्याने वसाहतीचें स्वराज्य देण्यास ब्रिटिश मुत्सद्दी तयार आहेत किंवा नाहीत, अथवा वसाहतीचें स्वराज्य हे केवळ अतिम ध्येय म्हणून त्याचा फक्त मॉटेग्यू-सुधारणासारखा आणखी एकादा पोंचट हप्ता आपल्या पदरात बांधण्याचा त्याचा विचार आहे, हे अजमावून पाहण्याचा म गाधीचा विचार होता या कामीं जेव्हां ब्रिटिश मुत्सद्दी आपणास कोणतेच आश्वासन देण्यास तयार नाहीत असे त्यांना दिसून आले, तेव्हा या गोलमेज परिषदेशी असहकार करण्याचें व कलकत्त्याच्या अधिवेशनात ठरल्याप्रमाणे स्वातंत्र्याचा ठराव करून सत्याग्रहयुद्ध पुकारण्याचें धोरण मनाशी निश्चित करून लाहोर येथें भरणाऱ्या राष्ट्रसभेच्या १९२९ च्या अधिवेशनास म. गांधी उपस्थित झाले.

## राष्ट्रसभेचें लाहोर-अधिवेशन

१९२९ मध्ये डिसेंबरअखेर लाहोर येथे भरलेली राष्ट्रसभा हिंदी राजकारणाच्या इतिहासात फार महत्त्वाची आहे तिचे अध्यक्षपद प. जवाहरलाल नेहरू यांना देण्यात आलें होते. त्यांच्या भाषणांत समाजसत्ताक लोकशाही (Socialist Republic) हे आपले अंतिम ध्येय आहे, असे त्यांनी जाहीर केले. राष्ट्रसभेचे पहिले समाजवादी अध्यक्ष या दृष्टीनें त्यांचे हे भाषण आधुनिक भारताच्या इतिहासांत नमूद होईल. हिंदुस्थानला जर आपल्या देशांतील दारिद्य व विषमता यांचा अंत करावयाचा असेल, तर समाजवादी मार्गानेच त्यास जावे लागेल, असे त्यांनीं या भाषणांत स्पष्टपणें राष्ट्रसभाभक्तांस सांगितले आहे. हे ध्येय गांठतांना त्याचे स्वरूप आपल्या राष्ट्राच्या

मूळ प्रकृतीस अनुरूप असे बनवावें लागेल व ते गाठण्याचा मार्ग व साधनें हींहि आपल्या परिस्थितीस व परपरेस अनुसरून स्वतंत्र शोधून काढावीं लागतील, असेहि त्यांनी म्हटले आहे. तसेच राष्ट्रसभेची आजची वृत्ति, भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्याची आजची अवस्था व हा लढा चालविणारे आजचे पुढारी, या सर्वांचा विचार करतां, राष्ट्रसभा एकदम समाजवादी बनणें शक्य नाहीं व समाजवादाचा पूर्ण कार्य-क्रम ती अंगीकारणार नाहीं, या गोष्टीची आपणांस जाणीव असल्याचेंहि त्यांनी या वेळी बोलून दाखविले. तथापि आपल्या आदर्श भारतांत मध्ययुगीन राजेरजवाड्यांना किंवा भांडवलशाही युगांतील आधुनिक औद्योगिक राजांना स्थान नाही, हेहि त्यानी निर्भीडपणे राष्ट्रापुढें मांडिले त्यांच्या भाषणांतील हा भाग ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचा असल्याने तो पुढें दिला आहे .

"I must frankly confess that I am a Socialist and a Republican and no believer in kings and princes, or in the order which produces the modern kings of Industry who have greater power over the lives and fortunes of men than even kings of old, and whose methods are predatory as those of feudal aristocracy. I recognise, however, that it may not be possible for a body constituted as is this National Congress and in the present circumstances of the Country, to adopt the full socialistic programme, but we must realize that the philosophy of Socialism has gradually permeated entire structure of society the world over and almost the only point in dispute is the pace and methods of advance to its full realization. India will have to go that way too if she seeks to end her poverty and inequality, though she may evolve her own medhods and may adopt the ideal to the genius of her race."

या उताऱ्यांतील प्रत्येक शब्द आणि वाक्य समजावून घेतल्यास हिंदुस्थानात जो समाजवाद फैलावणार तो कोणत्या मार्गानें फैलावेल याचा बोध होऊ शकेल, असें आम्हांस वाटते. हिंदुस्थानांत लोकशाहीचें ध्येय फैलावून राष्ट्रीय वृत्तीची जोपासना करण्याचे कार्य लो. टिळक आणि म. गांधी यानीं त्याच्या मूळ प्रकृतीस आणि विशिष्ट राजकीय परिस्थितीस अनुरूप अशा मार्गांनी केलें. या प्रयत्नाचें फल म्हणजेच हिंदुस्थानांतील आजचा राष्ट्रवाद होय या राष्ट्रवादाला युरोपीय राष्ट्रवादा-प्रमाणें भांडवलशाही व लष्करशाही राष्ट्रवादांतून निर्माण होणाऱ्या साम्राज्यशाहीचें स्वरूप येणार नसून त्याचा स्वाभाविक विकास समाजवादांतच झाला पाहिजे, हें

ओळखणारे व तदनुरूप आपले धोरण आंखणारे पहिले समाजवादी पुढारी पंडित जवाहरलाल नेहरू हेच होत. १९२२ सालापासून हिंदुस्थानांत कम्युनिझमच्या स्वरूपानें समाजवाद आला, पण त्यांत राष्ट्रीय लढ्याच्या स्वरूपाचे महत्त्व व वैशिष्ट्य याची बरोबर जाणीव नसून रशियन क्रांतीच्या अनुकरणाची वृत्ति होती. पंडित जवाहरलाल नेहरू याचा समाजवाद हे पूर्वीपासून चालत आलेल्या राष्ट्रीय लढ्याच्या परिणत वृक्षाचे एक पक्व फल आहे या दृष्टीनें हिंदुस्थानात समाजवाद प्रस्थापित करण्याचा मार्ग या धोरणाचे अवलंबन केल्यानेच जनतेस सांपडू शकेल, असे आम्हांस वाटते

## १९३०चा स्वातंत्र्य-संग्राम

लाहोरच्या राष्ट्रसभेनें स्वातंत्र्याचे ध्येय जाहीर केलें आणि कायदेमंडळांवर बहिष्कार टाकून पुनः सत्याग्रहाचें व असहकाराचे युद्ध करण्यांत सर्व राष्ट्रानें सामील व्हावें असा ठराव केला या ठरावास विरोध करणारे जे एकदोन लोक होते, त्यात श्री केळकर व पं. मालवीय हे प्रमुख होते, तथापि लाहोर-कॉंग्रेसनंतर जे प्रचंड सत्याग्रहयुद्ध झालें व जें मध्यंतरीं एक वर्ष थांबून १९३४ सालापर्यंत चालू होतें, त्या युद्धात वृद्ध पं मालवीय हे अखेरपर्यंत टिकून राहिले व श्री केळकर यानी प्रथमतः या युद्धाची अपूर्व लाट पाहून तिला साहाय्य करण्याचा थोडासा देखावा केला, तरी लवकरच त्यांनी त्यांतून आपले अंग काढून घेतलें व ‘आतां ही चळवळ पुरे झाली’ असे लोकास सांगून तिच्यावर व तिच्या पुढाऱ्यांवर टीका करण्याचा आपला नित्यधर्म आचरण्यास सुरुवात केली! पण त्याच्या या नित्य किंवा नैमित्तिक वृत्तीचा खुद्द महाराष्ट्रावरहि मुळीच परिणाम झाला नाही या प्रचंड लढ्यात पूर्वीचे ब्राह्मण-ब्राह्मणेतर हे पक्ष मोडून गेले. सर्व महाराष्ट्र एकमुखाने राष्ट्रसभेच्या निशाणाखाली एकत्र होऊन ब्रिटिश साम्राज्याशीं लढू लागला लोकमान्याच्या निधनानंतर महाराष्ट्रात सुरू झालेलें अंधारयुग नष्ट झालें आणि महाराष्ट्राच्या बुद्धीवर चढलेली राख नाहीशी होऊन त्याच्या अंतःकरणांत पेटलेल्या स्वातंत्र्यभावनेच्या धगधगीत प्रकाशांत त्याला आपले राष्ट्रीय कर्तव्य स्पष्टपणें दिसू लागलें हीच स्थिति कमीअधिक प्रमाणांत सर्व प्रांतांत निर्माण झाली, आणि म. गांधीनी जगप्रसिद्ध ‘दांडीकूच’ करून मिठाचा कायदा मोडून जें कायदेभंगाचें शांततायुद्ध केले, त्यांत आपल्या दडुकेशाही सुलतानी सत्तेचा सर्व उपयोग करूनहि लॉर्ड आयर्विन् याना राष्ट्राचा पराभव करितां आला नाही मिठाचा सत्याग्रह पावसाळ्यामुळें बंद होण्याचा काळ आला, तोंच जंगल-सत्याग्रह सुरू झाला सत्याग्रहाचा हा वणवा विझविण्यासाठी म. गांधीप्रभृति पुढाऱ्याना दडपशाही कायद्याखाली राजबंदी करण्यांत आलें, पण त्यामुळे ह्या वणव्याचा फैलाव अधिकच होऊं लागला. प्रत्येक नवा दडपशाहीचा हुकूम ही एक कायदेभंगाची नवीच संधि लाभली, अशा वृत्तीनें देशांतील हजारों तरुण शांततेनें तुरुगांत जाऊं लागले; शेतकरी लोक

करबंदीची चळवळ करूं लागले; व्यापारी लोक ब्रिटिश मालाचा बहिष्कार संघटित करू लागले; स्वयसेविका परदेशी मालाच्या दुकानावर निरोधन करण्यासाठीं लाठीमार सहन करूं लागल्या; राष्ट्रसभेच्या झेंड्याच्या मिरवणुकीसाठीं हजारों लोक खेड्यापाड्यांतून सुद्धा जमूं लागले आणि ब्रिटिश सत्तेचे हुकूम पाळणार नाहीं, राष्ट्रसभेचेच हुकूम पाळूं, असे कृतीनेच सिद्ध करू लागले हिंदुस्थानचे सर्व स्वरूप ४-५ महिन्यात अगदीं पालटून गेले आणि या युद्धांतून निर्माण झालेल्या आत्मतेजाचा प्रकाश सर्व जगभर पसरला ! जगातील सर्व विचारी लोक हिंदुस्थानात चालू असलेल्या या अपूर्व राष्ट्रीय क्रान्तीकडे आश्चर्यानें थक्क होऊन पाहू लागले. सरकारी शिपायाच्या लाठीमाराला, किंबहुना गोळीबारालाहि लोक तुच्छ लेखूं लागले, आणि म गांधींनीं दुसऱ्या गोलमेज परिषदेंत बोलून दाखविल्याप्रमाणें हिंदुस्थानातील मुलें साम्राज्यशाहीचा गोळीबार चालू असतां फटाक्ड्यांचे आवाज ऐकून आनदाने नाचतात त्याप्रमाणें उत्साहानें नाचूं बागडू लागलीं ! राष्ट्रसभा ही एक ब्रिटिश राज्याशीं प्रतिस्पर्धी अशी हिंदुस्थानांतील दुसरी राज्यसस्था आहे आणि हिंदी जनतेवर ब्रिटिश राज्याचें प्रभुत्व चालू नसून राष्ट्रसभेची अप्रहित सत्ता चालू आहे, असा देखावा दिसू लागला ! पेशावरांत निःशस्त्र जनतेवर गोळया घालण्यास आपल्या वरिष्ठ लष्करी अधिकाऱ्यानी फर्मावलेला हुकूम मोडून ' गढवाली ' पलटणीने आपल्या बंदुका खालीं ठेविल्या ! अशा प्रकारे हिंदुस्थानांत उठलेली ही निःशस्त्र क्रातीची प्रचड लाट ब्रिटिश सत्तेला आपल्या पोटांत गडप करते कीं काय, असा भास झाला. या वेळी, म्हणजे १९३१च्या २६ जानेवारीस अथवा राष्ट्रसभेने पहिला स्वातन्त्र्यदिन १९३० साली साजरा केल्यानंतर बरोबर एक वर्षानें, म. गांधीप्रभृति राष्ट्रसभेच्या मत्रिमंडळास तुरुंगांतून मुक्त करून लॉर्ड आयर्विन यानी त्याच्याशीं समेटाचें बोलणें सुरू केलें आणि राष्ट्रसभेशीं युद्धतहकुबीचा समेट ऊर्फ ' गाधी-आयर्विन्-करार ' केला

१९३०च्या हिंवाळ्यात इंग्लंडांत पहिली गोलमेज परिषद् भरली होती या गोलमेज परिषदेत एका कायद्याने सपूर्ण स्वराज्य देण्यांत येईल, असें आश्वासन देण्यास लॉर्ड आयर्विन् किंवा ब्रिटिश प्रधानमंडळ तयार नसल्यामुळे, म गांधींनीं व राष्ट्रसभेनें त्या परिषदेवर बहिष्कार घातला होता व त्यास अनुसरून इंग्लडच्या बोटींत न बसतां राष्ट्रसभेचे पुढारी तुरुगात जाऊन बसले होते या वेळीं राष्ट्रसभेनें चळवळ बद करून गोलमेज परिषदेस जावें या उद्देशानें लॉर्ड आयर्विन् व म गांधी यांच्या दरम्यान तडजोड घडवून आणण्याचे प्रयत्न सर तेजबहादूर सप्रू आणि बॅ. जयकर यांनीं केले होते व त्यासाठीं पं जवाहरलाल नेहरू व पं मोतीलाल नेहरू यांना अलाहाबादेहून येरवड्यास म. गांधी यांच्याकडे आणण्यांतहि आलें होतें तथापि राष्ट्रसभेच्या पुढाऱ्यांना ज्या प्रकारचें आश्वासन हवे होतें, तसें देण्यास सरकार तयार नसल्यानें ही तडजोड फिसकटली; आणि डॉ. सर तेजबहादूर सप्रू व बॅ. जयकर हे इतर प्रागतिक पुढाऱ्यांबरोबर व जातीय पुढाऱ्यांच्या समवेत विलायतेस गेले. या

वेळीं महाराष्ट्रांतील प्रतियोगी सहकारितापक्षाचे चार पुढारी चार दिशास तोंडें करून आपापला मार्ग सुधारू लागले बॅ जयकर हे गोलमेज परिषदेला 'हिंदु लिबरल' म्हणून गेले. डॉ. मुजे 'हिंदु' म्हणून गेले श्री. केळकर, महात्मा गांधींनी व जवाहरलाल नेहरू यांच्या नादीं लागून तडजोड मोडली म्हणून राष्ट्रसभेवर केसरीतून टीका करीत, पण गोलमेज परिषदेचें आलेले निमत्रण न स्वीकारता हिंदुस्थानांतच राहिले; आणि लोकनायक अणे म गांधींच्या निशाणाखालीं सत्याग्रहांत सामील होऊन तुरुंगांत गेले! अशा रीतीनें प्रतियोगी सहकारिता पक्ष नामशेष झाला पुढे लोकशाही स्वराज्य पक्षाच्या नावानें श्री. केळकर यांनी बॅ जम्नादास मेहता यांच्या नेतृत्वाखाली पुनः त्यास जन्म दिला.

तिकडे विलायतेंत जे लोक गेले होते, त्यांनीं व येथील लॉर्ड आयर्विन्प्रभृति बादशहाच्या प्रतिनिधींनी, हिंदुस्थानांतील परिस्थितीसबंधीं ब्रिटिश प्रधानमडळास ज्या हकिकती सांगितल्या व कळविल्या त्यावरून ब्रिटिश प्रधानमडळावर जो परिणाम घडला, त्याचे फल म्हणजे पहिल्या गोलमेज परिषदेच्या अखेरीस ब्रिटिश मुख्य प्रधान मि रॅम्से मॅक्डोनाल्ड यानीं हिंदुस्थानला डोमिनियन स्टेटस म्हणजे वसाहतीचे स्वराज्य देण्याचे अभिवचन दिलें हेच होय हे अभिवचन त्यानीं या परिषदेच्या अखेरीस केलेल्या भाषणात पुढीलप्रमाणे व्यक्त झाले आहे :

"Finally I hope and I trust and I pray that by our labours together India will come to possess the only thing which she now lacks to give her the status of a Dominion amongst the British Commonwealth of Nations—what she now lacks for that—the responsibilities and the cares, the burdens and the difficulties, but the pride and the honour of Responsible Government."

हें त्यांचे वैयक्तिक भाषण होते त्यानी आपल्या प्रधानमडळातर्फे जो जाहीरनामा काढिला, त्यांत हिंदुस्थानच्या राज्यकारभाराची जबाबदारी मध्यवर्ती आणि प्रांतिक कायदेमडळांवर सोंपवावी आणि संक्रमणकाळांत विशिष्ट परिस्थितीला तोंड देण्यासाठीं व अल्पसख्याकांच्या हक्कांचें रक्षण करण्यासाठीं कांही तरतुदी कराव्यात, असे ब्रिटिश सरकारचें मत आहे असे म्हटलें होते. तसेंच संक्रमणकाळांत जे अधिकार राखून ठेवण्यात येतील ते अशा रीतीने बनाविले जातील व उपभोगिले जातील, कीं त्या योगें नव्या घटनेंतून हिंदुस्थानला पूर्ण जबाबदार राज्यपद्धति प्राप्त होण्याच्या मार्गांत त्यांचा अडथळा होणार नाहीं, असेंहि स्पष्ट करण्यांत आले होतें. यानंतर असें नमूद करण्यांत आले होतें, कीं मध्यवर्ती हिंदुस्थान सरकार सयुक्त स्वरूपाचे असावें; त्यांत ब्रिटिश हिंदुस्थान व सस्थानी हिंदुस्थान या दोघांचा समावेश व्हावा; या सरकारकडे कोणते अधिकार द्यावयाचे याची चर्चा पुढे आणखी करण्यांत यावी;

कारण संस्थानिकांवर या सरकारची जी सत्ता चालावयाची, ती संस्थानिक मान्यता देतील तितकीच चालावयाची आहे; अशा प्रकारे मध्यवर्ती कायदेमंडळ बनल्यानंतर मध्यवर्ती सरकारचें मंत्रिमंडळ त्यास जबाबदार बनविण्याचें तत्त्व ब्रिटिश सरकार मान्य करील मात्र सध्याच्या परिस्थितीत संरक्षण व परराष्ट्रीय राजकारण हे विषय गव्हर्नर जनरलच्या हाती राखून ठेवण्यात येतील. याशिवाय, शांततारक्षणासाठी त्याला जादा अधिकार ठेवण्यांत येतील तसेंच हिंदुस्थानची पत व आर्थिक स्थैर्य या बाबतींत कांहीं संरक्षक बधनें ठेवून मध्यवर्ती सरकारची तिजोरीहि मत्रिमडळाच्या ताब्यात देण्यांत येईल

## गांधी-आयर्विन्-करारांचें स्वरूप

या योजनेंत संयुक्त घटना, मध्यवर्ती सरकारात जबाबदार राज्यपद्धति आणि सक्रमणकाळांतील काही तरतुदी किंवा सरक्षक बंधने, ही तीन तत्त्वें मुख्य आहेत. पुढे म. गांधी व लॉर्ड आयर्विन् यांच्यांत युद्धतहकुबीचा जो समेट झाला, त्यांत **ही संरक्षक बंधनें हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनेंच ठरविण्यांत येतील** असे म गांधींनी मान्य करून घेतलें गाधी-आयर्विन-करारातील राज्यघटनेसबंधीचें दुसरें कलम पुढीलप्रमाणें आहे:

"As regards constitutional question, the scope of future discussion is stated, with the assent of His Majesty's Government, to be with the object of considering further the scheme for the constitutional Government of India discussed at the Round Table Conference. Of the scheme there outlined, Federation is an essential part. So also are Indian Responsibility and reservations or safeguards in the interest of India, for such matters as, for instance, Defence, External affairs, the position of Minorities, the financial credit of India, and the discharge of obligations."

अर्थात् यातील शब्दरचना पुष्कळच सदिग्ध किंवा द्व्यर्थी आहे तथापि हिंदुस्थानात कॉन्स्टिटयूशनल गव्हर्नमेंट स्थापन करण्याची ही योजना आहे व तिची संयुक्त राज्य, जबाबदार राज्यपद्धति आणि सक्रमणकाळांतील हिंदुस्थानच्या हिताची कांही बंधने, हीं तीन मुख्य अंगें आहेत एवढें निश्चित होतें जबाबदार मंत्रिमंडळाच्या हातीं आज सत्ता किती येणार, हें या संरक्षणबंधनांचा तपशील व स्वरूप ठरल्यावरच कळणार होतें. मात्र हीं बधनें या घटनेचा संपूर्ण स्वराज्यांत विकास होण्याच्या आड येणार नाहीत अशाच प्रकारें बनविली जातील, असें गोलमेज परिषदेच्या अखेरीस ब्रिटिश सरकारतर्फे जाहीर करण्यांत आलें होते. गांधी-आयर्विन-करारांत

हीं बंधनें हिंदुस्थानच्या हितासाठींच घालण्यांत येतील असें ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या संमतीनें स्पष्ट करण्यांत आलें होतें आणि मि. मॅक्डोनाल्ड यांच्या भाषणांत "ज्या जबाबदार राज्यपद्धतीच्या अभावीं हिंदुस्थानला आज वसाहतीचा दर्जा मिळत नाहीं, ती जबाबदार राज्यपद्धति त्यास आता मिळेल व हिंदुस्थानास वसाहतींच्या बरोबरीचा दर्जा प्राप्त होईल" असे स्पष्टपणें सागण्यांत आलें होतें या सर्व परिस्थितीचा विचार करतां आतां हिंदुस्थानास संपूर्ण स्वराज्य देण्याच्या कायद्याचा मसुदा या परिषदेंत बनविण्यात येईल, अशी आशा करण्यास पुष्कळ पुरावा होता. गाधी-आयर्विन् करारावर असा एक आक्षेप घेण्यात येत असे, कीं लाहोरास स्वातंत्र्याचा ठराव झाल्यानतर म. गांधी गोलमेज परिषदेस कसे जाणार? यावर म गाधींचें असें उत्तर होतें, कीं तिजोरी, सरक्षण आणि परराष्ट्रीय राजकारण, हा स्वातंत्र्याचा गाभा असून हा आपल्या ताब्यात येऊन जर वाटेल तेव्हा ब्रिटिशाची भागीदारी सोडून बाहेर पडण्याचा हक्क आपणास प्राप्त होईल, तर ब्रिटिश राष्ट्राशीं समान दर्जाची भागीदारी करणें यात स्वातंत्र्याच्या ठरावाशीं अगर ध्येयाशीं विसगत असें काहीं नाहीं आपली ही स्वातंत्र्याची मागणी आपण गोलमेज परिषदेंत ब्रिटिश मुत्सद्द्यांपुढें ठेवणार व त्या पायावरच झाली तर ब्रिटिशाशीं तडजोड घडवून आणणार, असें त्यानीं खुद्द लॉर्ड आयर्विन याना बजाविलें होतें, व लोकांसहि तसेंच जाहीर केलें होतें. म. गाधी यांनीं ६ मार्च १९३१ रोजीं दिल्ली येथें गाधी-आयर्विन् करार झाल्याबरोबर एक महत्त्वाची मुलाखत हिंदी व परराष्ट्रीय वृत्तपत्रप्रतिनिधींना दिली. त्यातील कांहीं महत्त्वाचीं प्रश्नोत्तरे पुढें दिलीं आहेतः

प्रश्न :— करारांतील दुसरें कलम लक्षांत घेतां मद्रास, कलकत्ता व लाहोर या अधिवेशनांत पास झालेला स्वातंत्र्याचा ठराव पुनः राष्ट्रसभेनें पास करणें हें सुसंगत होईल काय?

उत्तर :— निश्चित होईल कारण तसा ठराव कराचीच्या राष्ट्रीय सभेंत पास करण्याच्या आड हे कलम येऊं शकत नाहीं इतकेंच काय, तर या बाबतींत मीं आपली खात्री करून घेतली असून आगामी गोलमेज परिषदेपुढे स्वातंत्र्याची मागणी मांडण्यासहि कांहीं प्रत्यवाय नाहीं. या बाबतींत करार मान्य करण्यापूर्वी मीं माझी भूमिका स्पष्ट करून घेतलेली आहे.

प्रश्न :— आज जीं सरक्षक बंधनें व राखीव सत्ता यांची योजना प्रसिद्ध झाली आहे, ती आपण मान्य कराल काय?

उत्तर :— आज सुचविलेलीं संरक्षक बंधनें व राखीव सत्ता मी मान्य करणार नाहीं. या बाबतींत राष्ट्रसभेची भूमिका काय आहे तें सर्व जगाला विदित करण्यांत आलेलें आहे, आणि राष्ट्रसभेला जे आज परिषदेस बोलवीत आहेत, त्यांना राष्ट्रसभेचें मागणें काय आहे तें माहीत असलेंच पाहिजे, अशी अपेक्षा आहे. राष्ट्रसभेची भूमिका शक्य तितकी स्पष्ट करण्याचा मीं माझ्याकडून प्रयत्न केलेला आहे; आणि हें समजल्या-

नतर राष्ट्रसभेला परिषदेला न बोलावण्याचें स्वातंत्र्य अद्यापीहि ब्रिटिश सरकारला आहे राष्ट्रसभेने परिषदेस गेलेंच पाहिजे, असेंहि या करारांत कांहीं नाहीं.

प्रश्न :— नव्या घटनेवर काही बधने मान्य करण्यास आपण मान्यता द्याल काय ?

उत्तर :— हो, जी समजसपणाची व शहाणपणाचीं असतील त्यांना मान्यता देईन. उदाहरणार्थ, अल्पसंख्याकांचाच प्रश्न घ्या. अल्पसंख्याकांचें हित हा एक आपल्या ताब्यातील पवित्र निधि आहे असे आपण मानिले नाही, तर या मोठ्या राष्ट्राचें ध्येय आपणास सफल करता येणार नाहीं हे एक आपणांवरील न्याय्य असे बंधनच आहे, असे मी समजतो.

प्रश्न .— लष्कर आणि तिजोरी यांसंबधीं काय ?

उत्तर :— तिजोरीसबधी बोलावयाचे, तर आमच्या सरकारास कांही कर्ज असले— व ते तसे आहेहि—तर त्याबद्दल कांही तारण द्यावें लागणार इतक्या मर्यादेपुरती राष्ट्राच्या पतीवर व त्याच्या वाढीवर बधनें मान्य करणे माझें कर्तव्यच आहे. लष्करासंबधी बोलावयाचे, तर माझ्या बुद्धीप्रमाणे मला एकच बधन दिसते ते म्हणजे हिंदुस्थानच्या रक्षणाकरिता जे ब्रिटिश सैनिक आम्हांस लागतील त्यांच्या पगाराची हमी देणें व त्यासाठीं अशाच प्रकारची आणखी काही हमी देणे, हे मला समजू शकतें.

प्रश्न :— पूर्ण स्वराज्याची आपली कल्पना काय आहे ?

उत्तर :— मी एक ध्येयवादी मनुष्य आहे व माझ्या मनांत पूर्ण स्वराज्याची अनेक कल्पनाचित्रें वावरत असतात पण त्यांचा या वास्तविक जगाशी कांही सबध नाहीं पूर्ण स्वराज्य पूर्ण समानतेच्या पायावर उभारलेलें असेल, ते समानतेशी विसगत असणार नाहीं. सामान्य जनतेला या समानतेची कल्पना करता येत नाहीं समानतेचा माझा अर्थ असा आहे, की साम्राज्याच्या राजकारणाचे केद्र आज जे लडन आहे, ते दिल्ली बनावें काही मित्र म्हणतात की इग्लड ही गोष्ट मान्य करणार नाही ब्रिटिश लोक हे व्यवहारज्ञ आहेत व त्याचे जसे आपल्या स्वातंत्र्यावर प्रेम आहे तसे त्यानी दुसऱ्यास स्वातंत्र्य द्यावे, ही त्याच स्वातंत्र्यप्रेमाची पुढची पायरी आहे हिंदुस्थानला जी समानता मिळावी असे मी म्हणतों, ती देण्याची वेळ आली म्हणजे 'ती द्यावी ही आमची पूर्वीपासूनच इच्छा होती' असें इग्रज म्हणतील माझ्या मतें, समानता म्हणजे एकमेकाचे सबंध तोडण्याचा हक्क *

अशा प्रकारे तिजोरी, सरक्षण, परराष्ट्रीय राजकारण आणि वाटेल तेव्हां भागीदारी सोडण्याचा हक्क, हा स्वातंत्र्याचा अथवा संपूर्ण स्वराज्याचा गाभा होय असे म गांधींचें व राष्ट्रसभेचे या वेळी मत होते स्वातंत्र्याचा हा गाभा हस्तगत करण्यासाठीच राष्ट्रसभेचा लढा चालू होता व तो प्राप्त झाला तेव्हांच तो सपला. या मुलाखतीनतर थोड्याच दिवसात कराचीस राष्ट्रीय सभेचें अधिवेशन झालें. या अधिवेशनांत वरील अर्थाचाच राष्ट्रीय मागणीचा ठराव होऊन म. गांधीनीं राष्ट्राचे प्रातिनिधि म्हणून

* History of the Congress, P 756-761.

दुसऱ्या गोलमेज परिषदेस जावें असें ठरलें, व त्याप्रमाणें ते १९३१ च्या अखेरीस इंग्लंडांत गेले. जाण्यापूर्वी गांधी-आयर्विन्-करारान्वयें युद्धतहकुबी झालेली असून सर्व सत्याग्रही राजबंदी मुक्त करण्यांत आले. तसेच सत्याग्रह-चळवळीच्या प्रतिबंधासाठी काढलेले दडपशाहीचे वटहुकूम रद्द करण्यात आले, या चळवळीबद्दल भरलेले खटले काढून घेण्यात आले, जे दंड वसूल झाले नव्हते ते माफ करण्यांत आले, जी जप्त केलेली जंगम मालमत्ता सरकारजवळ होती ती ज्याची त्यास परत करण्यांत आली, जप्त झालेल्या जमिनी परत करण्यात आल्या मिठाच्या बाबतींत जेथे मीठ होत असेल तेथील आसपासच्या गावातील लोकास वापरण्यासाठीं कर न देता मीठ तयार करून वापरण्याचा हक्क मिळाला स्वदेशीच्या उत्तेजनार्थ निरोधनाची चळवळ चालू ठेवावी, पण केवळ ब्रिटिश मालाच्या बहिष्काराची चळवळ बंद करावी असे ठरले. या कामासाठीं व दारूबंदीसाठी निरोधन करावे, पण ते पूर्ण शांततेनें असावें असे ठरले गांधी-आयर्विन्-करारातील या सर्व शर्ती अमलात आल्यानंतरच म. गांधी दुसऱ्या गोलमेज परिषदेसाठीं विलायतेस गेले

गांधी-आयर्विन कराराचे राष्ट्रसभेच्या आणि तिनें सुरू केलेल्या निःशस्त्र क्रांतीच्या इतिहासात एक फार महत्त्वाचें स्थान आहे राष्ट्रसभेची चळवळ थांबविण्यासाठी साम्राज्यशाहीला तिच्या पुढाऱ्यांशीं बरोबरीच्या नात्याने समेट करावा लागला, ही आधुनिक भारताच्या इतिहासांत एक अपूर्व गोष्ट होती. याच एका गोष्टीवरून हिंदुस्थानातील प्रजेची प्रतिनिधीभूत अशी ही एकच संस्था आहे व अखेरीस स्वराज्याच्या प्रश्नासंबंधी ब्रिटिश मुत्सद्द्यांना तिच्याशींच तह करावा लागेल हेहि अप्रत्यक्ष रीतीनें ब्रिटिश मुत्सद्द्यानीं या करारानें मान्य केलें म गांधी हे राष्ट्रसभेचे एकटेच प्रतिनिधि दुसऱ्या गोलमेज परिषदेस उपस्थित असले, तरी अखिल भारतीय प्रजाजनाच्या वतीनें परकीय राज्यकर्त्यांशी तडजोडीचें बोलणे करण्याचा अधिकार ज्या एका संस्थेनें आपल्या पराक्रमाने शाबीत करून घेतला होता, त्या थोर संस्थेचा एकच एक प्रतिनिधि असा मी आहे व म्हणून तुम्हास जर हिंदुस्थानशीं तडजोड करावयाची असेल तर ती माझ्यामार्फतच केली पाहिजे, असे महात्मा गांधींनी त्या परिषदेतील पहिल्याच भाषणांत सांगितले. यानंतर त्यांनी संरक्षण आणि परराष्ट्रीय राजकारण हा स्वातंत्र्याचा गाभा हस्तगत करण्यावरच आपल्या शक्तीचे सर्व केंद्रीकरण केले. हा गाभा हिंदुस्थानच्या हाती देण्याचे कबूल केल्याखेरीज आपण कोणतीहि तडजोड मान्य करू शकत नाही, असें गांधीजींनीं ब्रिटिश प्रधानांस बजावून सांगितलें *

---

* 'I am here very respectfully to claim, on behalf of Congress complete control over the Army, over the Defence Forces and over External affairs the very reasons that I have given to you to-day for demanding the complete control over the army are also reasons for pleading for and for demanding control over external affairs. ......It may be that I am taking out

ब्रिटिशांशीं तडजोड करण्यासंबंधींचें हें त्यांचें धोरण मागें लोकमान्य टिळकांनीं मॉंटेग्यू-सुधारणांच्या वेळीं जें धोरण स्वीकारलें होतें, त्याचेंच परिणत रूप आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं आम्ही आजपासून आमच्या घराचे मालक बनलों हें मान्य करून नंतर तुम्हास या घरांत किती दिवस आणि कशा रीतीनें वागू द्यावयाचें यासंबंधींच्या तडजोडीच्या योजना तुम्हीं सुचवा व त्या आमच्या हिताच्या दृष्टीनें मान्य करणें शक्य आहे किंवा नाहीं हे आम्ही पाहतों, असें थोडक्यांत म गांधींचें या तडजोडीसंबधीं धोरण होतें पण हिंदुस्थान हें आजपासून इतर राष्ट्रांच्या बरोबरीचे स्वतंत्र राष्ट्र बनलें व यापुढें ग्रेटब्रिटनशीं त्याचा संबध हा समान भागीदारीचा संबध बनला, या भूमिकेवर उभे राहून तडजोडीची भाषा करण्यास ब्रिटिश मुत्सद्दी तयार नव्हते; आणि ही भूमिका सोडून आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्याचा सवग सवदा करण्यास म. गाधी तयार नव्हते यामुळे दुसरी गोलमेज परिषद् अयशस्वी झाली आणि आपणांस हिदुस्थानांत गेल्यानंतर पुनः एकादें सत्याग्रहयुद्ध करण्याखेरीज गत्यंतर नाहीं हें त्यांनीं तेथेंच ओळखिलें. मात्र येथें आल्यानतर गाधी-आयर्विन्-करार नोकरशाहीनें मोडला आहे असे त्याच्या निदर्शनास आलें नसतें व तो मोडलेला करारहि फिरून जोडण्यासंबंधीं तुमच्याशीं बोलणे करण्यासहि आम्ही तयार नाहीं, असे त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यानीं उर्मटपणानें म गांधींना कळविलें नसतें, तर त्यांनीं आल्यानतर सत्याग्रहयुद्ध ताबडतोब सुरू केले नसतें व काहीं काल विधायक सघटनेंतच घालविला असता परंतु म गांधी दुसऱ्या गोलमेज परिषदेहून १९३२ च्या जानेवारींत परत येतात तोच बंगाल, सयुक्त प्रात आणि वायव्य सरहद्द प्रात इकडे दडपशाहीचे कायदे जारी होऊन बाबू सुभाषचद्र बोस, पं. जवाहरलाल नेहरू, खान अबदुल गफारखान, वगैरे राष्ट्रसभेचे नेते सरकारनें गिरफदार केले होते अशा परिस्थितींतहि म गाधीनीं लॉर्ड विलिंग्डन याना तार करून तडजोड करण्यासाठीं मुलाखत मागितली, पण ती वर सागितल्याप्रमाणें धिक्कारण्यांत आली. याचें कारण या वेळीं येथील नोकरशाहीला गांधी-आयर्विन् करारानें राष्ट्रसभेला जी एक प्रकारची प्रतिस्पर्धी राज्यसंस्थेची परिस्थिति प्राप्त झाली होती, ती बदलून घेण्यासाठीं राष्ट्रसभेवर व तिच्या पुढाऱ्यावर दडपशाहीचा वरवटा फिरविण्याची इच्छा झाली होती आणि ही तिची इच्छा सफल करण्यास इग्लडातील नवे ब्रिटिश मंत्रिमंडळ व नवे भारतमंत्री सर सॅम्युअल होअर तयार होते. राष्ट्रसभेला महिना दोन महिन्यांत नामशेष करून दाखवितों आणि म गांधींच्या आत्मबलाचा पोकळ फुगा थोड्याच काळांत फोडून दाखवितों, असें येथील अधिकारीवर्ग सर सॅम्युअल होअर यांना सांगत होता,

---

of folly, but you should understand that the Congress has thousands and tens of thousands, of foolish men and women like me, it is on behalf of these that I respectfully register this claim, again saying that with the safe-guards, we have conceived, we shall litterally fulfil our obligations."

— *Mahatma Gandhi at the 2nd R. T C. 1931.*

आणि त्याच जोरावर १९३२ च्या जानेवारींत लॉर्ड विलिंग्डन याच्या सरकारनें राष्ट्र-सभेवर हल्ला चढविला. पण राष्ट्रसभा त्यांच्या अपेक्षेप्रमाणें दोन महिन्यांत पराभूत झाली नाहीं. सहा महिन्यांची वटहुकुमांची मर्यादा संपून गेली, तरीहि ती पराभूत झाली नाहीं. तिच्या सर्व संस्था बेकायदा ठरविल्या, तरीहि तिचें कार्य थांबलें नाहीं, आणि तिनें आपलें बेकायदा ठरविलेलें अधिवेशन खुद्द दिल्ली शहरांत यशस्वी रीतीनें पार पाडिलें. अर्थात् ब्रिटिश सरकारची अमर्याद दडपशाहीची शक्तीहि जें कार्य करू शकली नाही, तें कार्य भेदनीतीनें घडवून आणण्यास यापुढें हळूहळू सुरुवात झाली.

## भेदनीतीचें बीजारोपण

गांधी-आयर्विन-करार झाल्यापासून हिंदुस्थानच्या प्रजेच्या वतीनें कोणत्याहि राज्यघटनेस मान्यता द्यावयाची तर ती राष्ट्रसभेनेच दिली पाहिजे, असें जवळजवळ सिद्ध झालें होतें पण ही परिस्थिति मान्य करण्यास ज्याप्रमाणें ब्रिटिश मुत्सद्दी तयार नव्हते, त्याचप्रमाणे आमच्या देशांतीलहि राष्ट्रसभेच्या बाहेर असणारे पक्ष तयार नव्हते ते म्हणत, 'राष्ट्रसभा हा जसा हिंदुस्थानांतील एक पक्ष आहे, तसे आमचेहि पक्ष आहेत; मग आम्हीं तरी राष्ट्रसभा सरकारशीं तडजोड करण्यास तयार नसली म्हणून त्याच्याशीं तडजोड कां करूं नये ? गांधीजी विलायतेस जातात तसें आम्हांस-हि जातां येतें, त्यांना राज्यघटनेचें जे शास्त्र कळतें तें त्यांच्यापेक्षां आम्हास अधिकहि कळूं शकेल व ते जशीं भाषणें करतात तशीं आम्हीहि करूं शकूं. मग आम्ही आमच्या मनोदेवतेस पटेल अशी एक राज्यघटना इंग्लडातून आणून हिंदुस्थानावर का लादू नये ?' या विचारसरणींत दोन दोष आहेत एक जी राज्यघटना हिंदुस्थानांत प्रस्थापित करावयाची ती काहीं थोड्या व्यक्तींच्या मनोदेवतेला पटणारी असूनच काम भागणारें नाहीं. ती राष्ट्राच्या मनोदेवतेला मान्य झाली पाहिजे आणि राष्ट्राच्या मनोदेवतेला ती पटवून देण्याची शक्ति म गाधी यांच्यापाशीं जितकी होती, तितकी तिसऱ्या गोलमेज परिषदेला गेलेल्या कोणाहि एका पुढाऱ्यांत तर नव्हतीच, पण ती त्या सर्व पुढाऱ्यांच्या सघासहि नव्हती त्या वेळीं एका वक्त्यानें जाहीर सभेत सांगितल्याप्रमाणें तिसऱ्या गोलमेज परिषदेंत राष्ट्रसभा व म गांधी यांना तुरुंगांत ठेवून गेलेल्या प्रत्येक पुढाऱ्याची राष्ट्रीय प्रतिनिधि या दृष्टीनें शून्याहून अधिक किंमत नव्हती ! म. गांधी या अंकावर ही शून्यें बसविलीं असतीं तर कदाचित् त्यांना किंमत आली असती; पण तो अंकच काढून घेतल्यामुळे त्या सर्वांची मिळून किंमत एकाच शून्याइतकी होती. शिवाय म. गांधी यांची सुद्धां किंमत त्यांच्या एकट्याच्या व्यक्तिमाहात्म्यावर अवलंबून नसून त्यांनीं आपल्या पाठीमागें उभे केलेलें राष्ट्राचे संघटित आत्मबल, म्हणजेच सत्याग्रही राष्ट्रसभा, हिच्यावर त्यांची किंमत अवलंबून होती राष्ट्रीय राज-कारणांतील हा धडा जोंपर्यंत आम्ही शिकलों नव्हतों, तोंपर्यंत ब्रिटिश साम्राज्याकडून संपूर्ण स्वराज्याचे हक्क आम्ही मागून किंवा हिसकावून घेऊ शकलों नाहीं तथापि

राष्ट्रसभेला तशीच तुरुंगांत ठेवून हिंदुस्थानातील व्यवहारदक्ष म्हणवून घेणारे पाच-पन्नास मुत्सद्दी १९३२ अखेर तिसऱ्या गोलमेज परिषदेस गेले जाताना त्यांपैकीं प्रत्येकानें मी कोणाचाहि प्रतिनिधि म्हणून जात नसून, वैयक्तिक नात्याने जात आहे असें जाहीर केलें ! जणु काय बाल्डविन् आणि मॅकडोनाल्ड यांच्या घरांतील एकादा लग्नसोहळाच साजरा करण्यास यांना निमंत्रणें आली होतीं ! अर्थात् निमंत्रित भिक्षु-कांना जेवण घालून बोळवण करण्याखेरीज घरचा मालक अधिक कांहीच देत नाही, त्याप्रमाणे सर सॅम्युअलप्रभृति ब्रिटिश मुत्सद्द्यानी स्वराज्याची दक्षिणा मिळविण्याच्या आशेने वैयक्तिक नात्यानें गेलेल्या या भिक्षुकाना हात हालवीत परत पाठवून दिले, हे जगांतील व्यवहारास अनुसरूनच झाले ! मात्र राष्ट्रसभेला सोडून आपल्या निमंत्रणा-वरून इतके मुत्सद्दी इग्लंडास येऊ शकतात, यावरून आपण कोणतीहि राज्यघटना दिली तरी ती नादवून घेण्याच्या कामीं वाटेल तितके पक्ष व पुढारी आपणांस उप-योगी पडतील, किंवा निर्माण करतां येतील, असा भ्रम सर सॅम्युअलप्रभृति ब्रिटिश मुत्सद्द्याना झाला व हा भ्रमनिरास झाल्याखेरीज राष्ट्रसभेस म्हणजे हिंदी राष्ट्रास सपूर्ण स्वराज्य मिळणें शक्य नाहीं, असे या देखाव्यानें सिद्ध झाले ब्रिटिश लोक हे परकीय आहेत आणि त्यांच्याशीं सधि-विग्रह करण्याचा हक्क एकाच सस्थेला असल्याखेरीज आपणास त्यांच्यापासून स्वराज्याची प्राप्ति होणार नाही हा धडा आमचे प्रागतिक पुढारी किंवा लोकमान्यांच्या नावावर चालणारा लोकशाही पक्ष यांनीं या वेळीं घेतला नव्हता.

## १९३५ चा सुधारणा-कायदा

तिसऱ्या गोलमेज परिषदेनतर पार्लमेंटची ' सिलेक्ट कमिटी ' झाली व तिनें सुचविलेला सुधारणांचा खर्डा १९३५ सालीं ' गव्हर्नमेंट ऑफ इंडिया अॅक्ट ' या नावानें कायदा झाला. मध्यंतरीच्या काळात म गाधींनीं प्रथम सामुदायिक सत्या-ग्रह बंद केला व नंतर काहीं महिन्यानीं वैयक्तिक सत्याग्रहहि बद केला १९३४ सालीं वैयक्तिक सत्याग्रह बद केल्यानतर कौन्सिलावरील बहिष्कार उठविण्यांत आला आणि पूर्वी स्वराज्यपक्ष ज्या प्रकारें कायदेमडळांत कार्य करीत होता, तसे कार्य करण्याचे धोरण राष्ट्रसभेनें आता त्या कार्यासाठीं आपल्या नियंत्रणाखालीं एक खाते उघडून अमलात आणण्याचें ठरविलें १९२४ सालीं म गाधी व देशबंधु दास यांच्यामध्ये झालेल्या करारापासून कौन्सिलांतील कार्य व बाहेरचे विधायक कार्य हीं कामें करणारे दोनहि पक्ष भावी लढ्याच्या पूर्वतयारीस उपयोगी पडतात असें राष्ट्र-सभेच्या अनुभवास आले होते, व या दोघानी परस्परांशीं विरोध न करता सह-कार्यानें वागून राष्ट्राच्या भावी लढ्याची तयारी करावी, असे धोरण म. गांधींनीं त्या वेळेपासूनच दोन्ही पक्षांस लावून दिले होते. तथापि या दोन पक्षांचीं अंतःकरणें १९३० चा लढा सुरू होईपर्यंत पूर्णपणें तादात्म्य पावलीं नव्हतीं १९३० आणि १९३२ या दोन सालीं झालेल्या सत्याग्रह-संग्रामात या दोन्ही पक्षाचीं अंतःकरणें एक

झालीं, आणि राष्ट्रसभेचेच आपण दोन हात आहोंत याची पूर्ण जाणीव त्याना होऊन म. गांधींच्या नेतृत्वाखालीं ते सलोख्यानें व शिस्तीने कार्य करू लागले. याच वेळीं प जवाहरलाल नेहरू यांनीं १९३० सालीं ज्या समाजवादी वृत्तीचें बीज राष्ट्रसभेंत पेरिलें होतें, त्याला अंकुर फुटून राष्ट्रसभेंत 'कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्ष' या नावाचा तिसराहि एक पक्ष अस्तित्वात आला पण त्यालाहि राष्ट्रसभेंतील इतर पक्षाशी सलोख्याने व शिस्तीने वागण्याचे हे धोरण मान्य असल्यामुळें आणि राष्ट्रसभेपुढील त्या वेळचा निकटवर्ती प्रश्न समाजवादाची प्रस्थापना हा नसून संपूर्ण स्वराज्याची प्राप्ति हाच होता हे त्याने ओळखिले असल्यामुळें, राष्ट्रसभेत राहून त्याला आपली वाढ करतां येऊ लागली व तिच्या भावी विकासास या पक्षाच्या वाढीमुळे साहाय्यच झाले

१९३४-३५ सालीं मध्यवर्ती असेंब्लीच्या नव्या निवडणुकी होणार होत्या त्या निवडणुकीत भाग घेऊन होअर यांनीं ज्या सुधारणा देऊ केल्या होत्या, त्या राष्ट्रास संमत नसल्यामुळे त्या फेटाळून द्याव्यात हेच राष्ट्रसभेचें धोरण मध्यवर्ती असेंब्लींतून जाहीर करणे हा त्या वेळी राष्ट्रसभेपुढे मुख्य कार्यक्रम होता होअर याची सुधारणा-योजना प्रागतिक पक्षासहि पसत नव्हती, पण ती फेटाळून देण्याचे धोरण उघडपणे स्वीकारण्यास तो पक्ष तयार नव्हता. त्याचप्रमाणें नवा स्थापन झालेला लोकशाही पक्षहि सुधारणा फेटाळण्याच्या धोरणास अनुकूल नव्हता १९३२ सालीं जी सत्याग्रहाची मोहीम राष्ट्रसभेने सुरू केली तीत राष्ट्रसभेचा पराभव झाल्यामुळें आतां राष्ट्रसभेच्या मागे राष्ट्र जाणार नाही व असेंब्लीच्या निवडणुकींत राष्ट्रसभेस यश मिळणार नाहीं, अशी या इतर पक्षाची कल्पना होती राष्ट्रसभेने आगामी सुधारणा फेटाळून संपूर्ण स्वराज्याची प्राप्ति होईपर्यंत आपला लढा चालू राहील असें जाहीर केले आणि सपूर्ण स्वराज्याची योजना सार्वत्रिक मताधिकाराने निवडलेल्या घटना-परिषदेतच बनविली गेली पाहिजे, अशी आपली राष्ट्रीय मागणी मुबईच्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनात मुक्रर केली. अर्थात् आगामी राज्यघटना फेटाळून देणें आणि स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर घटना-परिषदेची व संपूर्ण स्वराज्याची प्राप्ति करून घेणें, या मुद्द्यावरच असेंब्लीच्या निवडणुकी १९३४ अखेर राष्ट्रसभेनें लढविल्या होअर यानीं ज्या सुधारणा देऊ केल्या होत्या त्या प्रागतिकाच्या नेमस्त मागणीहूनहि फार कमी असून प्रतिगामी स्वरूपाच्या होत्या, हें खुद्द सिलेक्ट कमिटीच्या रिपोर्टावरूनहि दिसून येत होतें त्या रिपोर्टांत तसें स्पष्ट म्हटलेहि आहे * हिंदुस्थानातील नेमस्त-

* Indeed, we recognize that even moderate opinion in India has advocated and hoped for a simpler and more sweeping transfer of power than we have felt able to recommend Moreover, it must not be forgotten that there is a section of opinion in India with whom the prospect of agreement appears to be remote But from the discussion and personal contacts of recent years, there has emerged in each country what may be fairly described as a body of central opinion which has at least reached a juster appreciation both of the difficulies which impress and the motives which inspire

पक्षासहि अमान्य असणाऱ्या या सुधारणा हिंदुस्थानांतील लोक चालवून घेतील व त्यांच्या पायावर बहुत काळ टिकणारी राज्यघटना हिदुस्थानांत स्थापन करतां येईल, अशी आशा मात्र हा रिपोर्ट लिहिणारांनीं व्यक्त केलेली आहे. या आशेचा आधार सांगतांना ते म्हणतात, कीं अलीकडे दोन-चार वर्षें दोन्ही देशातील मुत्सद्द्याच्या ज्या गांठीभेटी झाल्या, त्यामुळें दोन्ही देशांतले परस्परांचे दृष्टिकोण व अडचणी समजून घेणारे असे बरेंच मोठें मध्यस्थ लोकमत निर्माण झाले आहे आणि हिंदुस्थानांत दुराराध्य मताचे काहीं लोक असले, तरी या समजस मध्यस्थ लोकमताच्या आधारावर आपणांस ही घटना स्थापन करितां येईल. हे मध्यस्थ लोकमत म्हणजे कोणतें ? अर्थात् हिदुस्थानांतील संस्थानिक, बडे भांडवलवाले, बडे जमीनदार आणि हिंदु-मुसलमानातील जातिनिष्ठ वृत्तीचे पुढारी यांचे! यांच्या आधारावर अगर आश्वासनावर आणि राष्ट्रसभेने राज्यघटना फेटाळण्याची भाषा सुरू केली असली तरी ती खोटी भाषा आहे, ती पोकळ धमकी आहे आणि एकदां नवी संयुक्त घटना स्थापन झाली म्हणजे ती चालविण्यास वाटेल तितके लोक पुढे येतील, अशा गोलमेज परिषदेस जमलेल्या लोकानीं दाखविलेल्या आशेवर इ स १९३५ सालीं ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं त्या वेळचा राज्यघटनेचा कायदा हिंदुस्थानवर लादण्याचा निश्चय केला होता. ही राज्यघटना फेटाळून लावून स्वयनिर्णित सपूर्ण स्वराज्याची घटना प्राप्त करून घेणें हा राष्ट्रसभेपुढील त्या वेळीं प्रमुख प्रश्न होता. हा घटना-कायदा पार्लमेंटात पास झाला, त्याच्या अगोदर १९३५ सालीं राष्ट्रसभापक्ष मध्यवर्ती असेंब्लींत मोठ्या संख्येनें निवडून येऊन त्याने व बॅ. जिना याच्या मुसलमानपक्षानें एक होऊन आगामी संयुक्त राज्यघटना फेटाळून देण्याचा ठराव पास केला त्यानतर असा ठराव मध्यवर्ती असेंब्लींत पास झाला असला, तरी प्रांतिक कायदेमंडळांतील हिंदी पुढाऱ्यानीं नवी घटना फेटाळण्याचें धोरण स्वीकारलेलें नसून प्रातिक पुढारी ती चालवून घेण्यास तयार आहेत आणि आपल्या सुधारणा-कायद्याची मुख्य मदार प्रांतिक कायदेमंडळांवरच असल्यामुळें ही राज्यघटना चालाविण्यास अडचण पडणार नाहीं, असें सर सॅम्युअल होअर यांनीं पार्लमेंटात जाहीरपणें बोलून दाखविले ते म्हणाले:

"Secondly, outside the Assembly I note the fact that most of the Provincial Councils have now held discussions upon the proposals of the Committee, and I have been told that they have been very reasonable discussions on the whole. They have made one thing quite clear, namely, that provin-

---

a similar body of opinion in the other country .. on the common ground thus marked out we believe that the foundations of a firm and enduring structure can be laid.

— *Joint Committee's Report on Indian Constitutional Reform*, P 25.

cial politicians are prepared to work the bill. Let us remember how great will be the part of the provinces and the provincial politicians in an all India Federation. It is a very hopeful feature of the situation, that the very men upon whom will depend so much the working of the future Federation, are the men who seem to make it clear that the proposals are workable."*

सर सॅम्युअल होअर यांच्या भाषणांतील वरील उताऱ्यात असें म्हटले आहे, कीं पुढील सयुक्त घटना नांदवून घ्यावयाची किंवा नाहीं हें प्रांतिक कायदेमंडळां-तील पुढाऱ्यांवरच अवलंबून आहे आणि ते प्रांतिक पुढारी नवी घटना चालवून घेण्यास तयार आहेत. या वेळीं प्रांतिक कायदेमंडळें राष्ट्रसभाविरोधी अराष्ट्रीय लोकांनीं भरलेलीं होतीं आणि नवा कायदा झाल्यानंतर तो कायदा फेटाळून देण्याचें धोरण स्वीकारणारा राष्ट्रसभापक्ष या प्रांतिक कायदेमंडळांत बहुमताने निवडून येणार नाहीं किंवा हिंदुस्थानांतील आपली नोकरशाही अनेक हिकमती लढवून त्यास प्रांतिक कायदेमंडळात बहुमत मिळवू देणार नाहीं, या अपेक्षेवर वरील युक्तिवाद करण्यात आलेला होता हें उघड आहे आमच्या देशांतील राष्ट्रसभाविरोधी पक्ष ब्रिटिश मुत्सद्द्यां-ची नेहमीं दोन प्रकारें दिशाभूल करीत असत. ते प्रथम असें सांगत असत, कीं राष्ट्रसभेचें लढाऊ धोरण लोकाना प्रिय होणार नाहीं व लोक तिच्यामागून जाणार नाहींत. अनेक वेळां या बाबतींत या विरोधी पक्षांचा कयास चुकलेला असला, तथापि ते हा युक्तिवाद पुन. पुनः करीतच असत यानंतर ब्रिटिश मुत्सद्द्याची दिशाभूल करणारा त्यांचा दुसरा युक्तिवाद म्हणजे राष्ट्रसभा चढाईचें धोरण आंखून जी लढाऊ भाषा बोलत असते, त्या केवळ पोकळ धमक्या असतात, राष्ट्रसभेचे पुढारी लोकाना झुलविण्यासाठीं अशा तऱ्हेची भाषा ढोंगीपणाने वापरीत असतात हा होय. हा युक्तिवाद जुनाच असला तरी १९२६ सालापासून महाराष्ट्रांतील प्रतियोगी पक्षानें तो एकसारखा जनतेपुढें व लोकापुढे मांडण्याचा उपक्रम सतत चालू ठेवला होता. स्वराज्यपक्षाच्या धमक्या पोकळ आहेत असें आपण म्हणत होतों, तरीहि अखेरीस १९३० सालीं ब्रिटिश सरकारला पराभूत करून तडजोड करण्यास भाग पाडणारी प्रचंड चळवळ राष्ट्रसभेने केली, ह्याचे स्मरण राष्ट्रसभेच्या या विरोधकानीं अवश्य ठेवावयास हवें होतें.

पुढें नव्या घटनेपैकीं प्रांतिक स्वराज्याचा भाग प्रस्थापित झाल्यानंतर हिंदु-स्थानांतील अकरांपैकीं सात प्रांतात राष्ट्रसभेचीं मंत्रिमंडळे जनतेच्या बहुमताच्या पाठिंब्यावर प्रत्यक्ष राज्यकारभार करूं लागलीं आणि राष्ट्रसभा संयुक्त घटना फेटाळून देण्याची व स्वयंनिर्णित संपूर्ण स्वराज्यघटना प्राप्त करून घेण्याची भाषा दृढनिश्चयानें

* Speeches of Sir Samuel Hoare, P. 131.

व पूर्वीइतक्याच निर्धाराने बोलत राहिली प्रांतिक स्वराज्य राष्ट्रसभेनें हस्तगत केले होते व त्याचा उपयोग ती विधायक कार्यासाठीं व भावी लढ्याच्या पूर्वतयारीसाठीं करीत होती, तरी सर्व पक्षांनीं प्रतिगामी ठरविलेली आणि संरक्षण व परराष्ट्रीय राजकारण पूर्णपणे गव्हर्नर जनरलच्या हातीं राखून ठेवून तिजोरीवरील सत्ता नामधारी बनविणारी, सरक्षक बंधनें घालणारी मध्य राज्यघटना फेटाळून देण्याच्या लढ्यावरच राष्ट्रसभेची भावी इभ्रत व कर्तबगारी अवलंबून होती. हा लढा जर तिने केला नसता अगर करून त्यात ती स्वातन्त्र्याचा गाभा हस्तगत करू शकली नसती, तर तिला जनतेचें खरे व भरीव हित करतां आलें नसतें, इतकेच नाही, तर तिनें १९२० पासून जे निःशस्त्र क्रांतीचे विशिष्ट तत्र, शास्त्र व तत्त्वज्ञान राष्ट्रापुढे माडिलेलें होते, तेहि यशस्वी झाले असे राष्ट्रास वाटले नसतें मग कदाचित् त्याला आपल्या स्वातन्त्र्यासाठीं दुसऱ्या तत्राचा, दुसऱ्या शास्त्राचा अगर दुसऱ्या तत्त्वज्ञानाचा अवलब करावा लागला असता त्या वेळीं राष्ट्रापुढे असे दुसरें तंत्र, शास्त्र व तत्त्वज्ञान कम्युनिझमच्या शास्त्रीय क्रांतीच्या रूपाने येऊं लागले असून ज्याचा अनत्याचारी क्रांतिशास्त्रावर विश्वास नव्हता, ते बहुतेक लोक त्याचाच हळूहळू अवलब करू लागले होते कम्युनिझमचें क्रांतिशास्त्र हे म गांधींच्या अनत्याचारी क्रांतिशास्त्राहून कसें भिन्न आहे, आणि या दोन क्रातिशास्त्राच्या गुणदोषांचे स्वरूप काय आहे, या विषयाची चर्चा या प्रकरणात करावयाची नसून त्यासबधीची आमची मतें आम्ही थोडक्यांत पुढील एका प्रकरणात वाचकांपुढें मांडणार आहोत. पण हा इतिहासाचा भाग नसून तो भावी राजकारणाचा प्रश्न आहे.

# १२

# प्रांतिक स्वराज्य आणि द्विराष्ट्रवाद

आतांपर्यंत आम्ही आधुनिक भारताचा शभर वर्षांचा इतिहास निवेदन केला आणि या काळांत हें राष्ट्र कोणत्या मोठ्या लढ्यांत गुतलेलें होते व त्याच्यापुढील महत्त्वाचा प्रश्न कोणता होता, त्याचे विवेचन केलें. ते ज्या लढ्यात गुंतले होतें त्याचें स्वरूप राष्ट्रीय होतें हा राष्ट्रीय लढा १९१९च्या सुधारणा-कायद्यानंतर लगेच सुरू झाला आणि तो एका विशिष्ट तत्त्वज्ञानानुसार व क्रान्तिशास्त्रानुसार एका अलौकिक, असामान्य विभूतीच्या नेतृत्वाखालीं चालत आलेला होता. आजपर्यंत ज्यांनीं हा लढा चालविला त्या पुढाऱ्यांत, ज्या राष्ट्रसभेमार्फत तो चालला त्या राष्ट्रसभेंत, आणि ज्या जनतेच्या बलावर तो चालला त्या जनतेंत, १९२० सालीं राष्ट्रसभेनें अगीकारिलेल्या निःशस्त्र क्रांतिवादी तत्त्वावरील निष्ठा अद्यापि कायम होती इतकेंच नव्हे, तर ती

वाढत असून या सर्वांना म्हणजेच आधुनिक भारताला, याच मार्गानें आपण संपूर्ण स्वराज्याचें शिखर गाठूं आणि अठरा वर्षें चालविलेले हे शांततेचें स्वराज्ययुद्ध यशस्वी करून जगाच्या संस्कृतींत आणि आपल्या राष्ट्राच्या कीर्तींत अपूर्व भर टाकू, असा आत्मविश्वास या वेळीं वाटत होता.

हा आत्मविश्वास हिंदुस्थानास का वाटत होता आणि केवळ निःशस्त्र क्रांतीच्या मार्गाने आपण आपलें गेलेले स्वातंत्र्य परत मिळवू ही भावना हिंदुस्थानातील जनतेंत इतकी बद्धमूल कां होत गेली, याचा विचार करू लागल्यास त्याचे बीज आधुनिक भारताच्या इतिहासाचा अंकुर दिसू लागण्यापूर्वीच भारतीयाच्या अतःकरणात रुजलेलें आपणास आढळेल आधुनिक भारताचा इतिहास इ स १८१८ सालीच म्हणजे ज्या दिवशी किंवा ज्या वर्षी मराठेशाहीची राजधानी पुणे ही ब्रिटिशांनीं जिंकिली आणि भारतमातेचा तिलक पुसून टाकला, त्याच वेळीं बंगालमधील सर्वांगीण सुधारक राजा राममोहन रॉय यांच्या चळवळीच्या रूपाने सुरू झाला हिंदुस्थान हे प्रचड राष्ट्र एकदा सुधारलें व जगातील आधुनिक राष्ट्रांच्या मानाने मानवसंस्कृतींत आपण आज मागे आहो याची जाणीव ठेवून आपल्या संस्कृतीची आपण सुधारणा केली, म्हणजे हिंदुस्थानला दास्यांत ठेवण्याची शक्ति ब्रिटिश लोकांपाशीं नाहीं, हें राममोहन रॉय यांनीं ओळखिले होते आपल्या संस्कृतीची ही सुधारणा आपण सुमारे शभर वर्षांत करू व नंतर आपल्या राष्ट्राची एकीकृत शक्ति इतकी वाढेल, कीं त्यानें आपण समानता प्राप्त करून घेण्यासाठीं केलेली कोणतीहि मागणी ब्रिटिशास नाकारता येणार नाहीं, असे राममोहन रॉय याना वाटत होते तसेंच हिंदुस्थान ब्रिटिशाकडून पूर्णपणे जिंकिला गेला त्या वेळीं ज्या ब्रिटिश मुत्सद्द्यानीं व सेनापतीनी तो जिंकिला त्यानाहि हें माहीत होतें, कीं आपण हिंदुस्थानला जिंकीत नसून हिंदुस्थानच हिंदुस्थानला जिंकीत आहे अर्थात् हिंदुस्थान हें जित राष्ट्र आहे व आम्ही त्याचे जेते आहो, ही वस्तुस्थिति नसून आपण होऊन अज्ञानाने व मोहाने हिंदुस्थान आमचा गुलाम होत आहे, या सत्याचें ज्ञान जेव्हा हिंदी लोकांस होईल त्या वेळी तो क्षणभरहि आपल्या दास्यात राहणार नाहीं आपण लाख दीड लाख लोक वीस कोटी लोकाच्या या खडतुल्य प्रचड राष्ट्रास कायमचे दास्यात ठेवूं शकत नाहीं ही गोष्ट हिंदी लोकाना माहीत नसली, तरी अठराव्या शतकाच्या अखेरीस व एकोणिसाव्या शतकाच्या प्रारभीं ज्या ब्रिटिशांनीं हिंदुस्थान जिंकिला, त्यांना बरोबर माहीत होती

अठराव्या शतकाच्या अखेरीस हिंदुस्थानात जी हिंदु-मुसलमान राज्ये नांदत होती, त्यांत मराठेशाही, निजामशाही आणि हैदर-टिपूचें म्हैसूर हीं तीन स्वदेशी राज्ये बलाढ्य असून या तिघांच्या एकीकृत सामर्थ्याचा पराभव करण्याचें सामर्थ्य इंग्रजांत नव्हतें. इतकेच नाही, तर त्यांपैकी कोणाहि एकाला दुसऱ्याच्या सहकार्याखेरीज जिंकणे त्याना शक्य नव्हतें. पण हीं राज्यें एकमेकांविरुद्ध परकीयाना साहाय्य करीत होतीं. इतकेच नाही, तर या राज्यांतील प्रत्येक विभाग दुसऱ्याला जिंकण्यास परकी-

यांना साहाय्य करण्यास उत्सुक होता! मराठेशाही हें केवळ नावाचें एक राज्य असून शिंदे, होळकर, पेशवे, भोसले, पटवर्धन, गायकवाड हे त्याचे पांच-सहा विभाग एक करण्याचीहि शक्ति मराठ्यांत नव्हती थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हिंदुस्थानांत एकराष्ट्रीयत्व नव्हतें आणि त्याच्यांतील हिंदु-मुसलमान राष्ट्रें सरजामशाहीनें पोखरलेलीं होतीं राष्ट्रीयत्व आणि लोकशाही यांचा उदय झाला असता, तरच हिंदुस्थान या वेळीं स्वतंत्र झाला असता, किंवा स्वतंत्र राहिला असता गेल्या शंभर वर्षांत हिंदुस्थानला पारतंत्र्याच्या घोर नरकाचा जो अनुभव आला होता आणि या पारतंत्र्याच्या प्रतापामुळे निर्माण झालेल्या दारिद्र्याच्या महानरकातील अनंत यातनांचा जो त्याला असह्य अनुभव नित्य येत होता, त्यामुळे दादाभाई नौरोजी, लो टिळक आणि म. गांधी यांनीं हिंदुस्थानला राष्ट्रीयत्वाचें आणि लोकशाहीचें शिक्षण देण्यासाठीं जी राष्ट्रसभा स्थापन केली, तिच्या झेंड्याखालीं तो एक होत होता आणि तो निःशस्त्र असला, तरी ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध क्रांति करून स्वातंत्र्यसस्थापनेस सज्ज झाला होता. जगाच्या राजकारणांत ब्रिटिश साम्राज्य खचत होते आणि हिंदी राष्ट्राची शक्ति वाढत होती. ब्रिटिश राष्ट्रांतील संस्कृति हीच मानवसंस्कृतीला पुढें ओढणारी शक्ति होय, ही एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीची परिस्थिति या वेळीं उरलेली नसून ब्रिटिश व युरोपीय संस्कृति हीच जगांतील प्रतिगामी शक्ति आहे, असें आतां दिसूं लागले होतें. हिंदुस्थानला लोकशाही व राष्ट्रीयत्व शिकविण्यासाठींच आमचा हिंदुस्थानांत अवतार झाला आहे असे जे ब्रिटिश लोक समजत होते व जें आम्ही खरें मानीत होतों, त्याच ब्रिटिश लोकांना लोकशाही कशी टिकवावी आणि देशांतील भांडवलशाहीनें माजविलेलें वर्गयुद्ध टाळून आपलें राष्ट्रीयत्व कसे कायम ठेवावें, हें हिंदुस्थानाकडून शिकण्याचा प्रसंग आज प्राप्त झालेला आहे. हिंदुस्थानातील वाढती राष्ट्रीय भावना फोडून तिचे प्रांतिक स्वराज्याच्या देणगीनें अनेक तुकडे करावयाचे, आणि संयुक्त राज्याच्या स्थापनेने येथें निर्माण होणाऱ्या लोकशाहीला सरजामशाहीच्या आणि भांडवलशाहीच्या सहकार्यानें वा साहाय्यानें नामोहरम करावयाचें, असे कुटिल कारस्थान ब्रिटिश मुत्सद्यांनीं गोलमेज परिषदेंत रचिलें होतें पण राष्ट्रसभेने बहुतेक सर्व प्रांतिक राज्यांना आपल्या राष्ट्रीय भावनेच्या एकाच सूत्रांत गोवून हाच डाव ब्रिटिशांवर उलटविण्याचा प्रयत्न सुरू केला. प्रांतिक स्वराज्यांतहि लोकशाहीच्या नावानें धनिकशाही स्थापन करण्याचा ब्रिटिश मुत्सद्याचा डाव राष्ट्रसभेनें उधळून लावून खरी लोकशाही चालू राहण्यास लागणारें अहिंसेचें वातावरण निर्माण केलें आणि हा अहिंसावाद क्रांतिकारक असल्यानें राष्ट्रसभेच्या प्रांतिक स्वराज्यांत निःशस्त्र क्रांतीची शक्ति वाढत गेली अशा प्रकारें राष्ट्रीयत्व, लोकशाही आणि त्या दोहोंच्या परिपोषास व परिणतीस आवश्यक असा अनत्याचारी अहिंसात्मक क्रांतिवाद सर्व हिंदुस्थानांत फैलावत चालला. या क्रांतिवादाची शक्ति ब्रिटिश हिंदुस्थानच्या सीमा ओलांडून संस्थानी हिंदुस्थानांतहि संचार करूं लागली. हिंदुस्थानचें सयुक्त स्वराज्य

ब्रिटिश मुत्सद्द्याच्या कुटिल कारस्थानातून विलायतेंत भरलेल्या गोलमेज परिषदेंत जन्मास आलेले नसून हीं कुटिल कारस्थानें उलथून पाडण्यासाठीं हिंदुस्थानांत जी ही सत्याग्रही क्रांतिशक्ति निर्माण झाली होती, तिच्या प्रभावानेंच भारतीय प्रजासत्ताक गणराज्य जन्मास आलें आहे व हेंच आधुनिक भारत होय या आधुनिक भारतानें १९२० पासून ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध जो सत्याग्रहसग्राम चालविला होता, त्यांतील अखेरच्या लढ्याचें वर्णन या व पुढील प्रकरणात थोडक्यांत करावयाचें आहे.

इ. स. १९३७ सालापासून १९४७ सालापर्यंतचा आधुनिक भारताचा इतिहास अत्यंत महत्त्वाचा आहे. १९३५ सालीं ब्रिटिश पार्लमेंटनें हिंदुस्थानात एक सयुक्त राज्य स्थापन करण्याचा कायदा मजूर केला या कायद्यान्वये हिंदुस्थानात प्रातिक स्वराज्याची संस्थापना १९३७ सालीं झाली. यानतर दोन-अडीच वर्षांत शक्य तर सयुक्त राज्यपद्धतींचें मध्य सरकार स्थापन करण्याचा ब्रिटिशाचा मानस होता. परंतु १९३५ सालीं केलेला संयुक्त राज्याचा हा कायदा हिंदुस्थानातील राष्ट्रीय पुढाऱ्यांना मुळींच पसंत नसून तो फेटाळून द्यावयाचा आणि संपूर्ण स्वातंत्र्य-संस्थापन करण्यासाठीं घटनापरिषद् भरवून आपल्या राष्ट्राची राज्यघटना स्वयनिर्णयाच्या तत्त्वानुसार स्वतः बनवावयाची असा निर्धार हिंदी राष्ट्रसभेनें केला होता. ब्रिटिश साम्राज्यापासून आपले राष्ट्र सपूर्णत. स्वतत्र बनवावयाचें आणि त्याची राज्यघटना लोकशाहीच्या व स्वयनिर्णयाच्या तत्त्वानुसार स्वत. बनवावयाची, ब्रिटिश राष्ट्रानें बनविलेली हिंदी राज्यघटना मोडून टाकावयाची आणि हें कार्य निःशस्त्र क्रांतीच्या मार्गानें तडीस न्यावयाचें, असे हिंदी राष्ट्रसभेचे धोरण या वेळीं निश्चित झालेलें होतें. या धोरणाला हिंदी जनतेचा पाठिंबा आहे हे सिद्ध करण्याचा पुरावा प्रांतिक स्वराज्याच्या ज्या निवडणुकी झाल्या त्यावरून जगाला व ब्रिटिशांना मिळण्यासारखा होता प्रांतिक स्वराज्याच्या निवडणुकीनतर हिंदुस्थानातील अकरा प्रांतापैकीं आठ प्रांत राष्ट्रसभेच्या पक्षानें हस्तगत करून तेथें आपल्या पक्षाचीं मंत्रिमंडळे स्थापन केलीं होतीं उरलेले तीन प्रात म्हणजे पजाब, बंगाल आणि सिंध या प्राताताहि हळूहळू आपल्या पक्षाचीं मंत्रिमडळें बनवितां येतील आणि अशा रीतीनें ब्रिटिश हिंदुस्थानांतील सर्व प्रातिक स्वराज्ये थोड्याच अवधींत आपल्या पक्षाच्या हातीं घेऊन संपूर्ण स्वातंत्र्य, स्वयनिर्णय आणि स्वतःची राज्यघटना बनविणारी घटना परिषद् हे हक्क ब्रिटिशांपासून आणखी एकादा सत्याग्रहाचा सग्राम करून आपणास प्राप्त करून घेतां येतील, असा आशावाद हिंदी जनतेच्या अंतःकरणांत राष्ट्रसभेच्या नेत्यांनीं निर्माण केला होता हा आशावाद केवळ ब्रिटिश मुलुखांतील जनतेच्या अतःकरणांतच निर्माण झाला होता असें नसून हिंदी संस्थानांतील प्रजाजनांतहि ज्या सत्याग्रहाच्या चळवळी राष्ट्रसभेच्या नेत्यांनीं सुरू केल्या होत्या अथवा त्यांच्या सल्ल्यानें निरनिराळ्या संस्थानांतील प्रजापरिषदांनीं जे निःशस्त्र प्रतिकाराचे लढे सुरू केले होते, त्यांच्यामुळें सस्थानी प्रजेंतहि असाच आशावाद निर्माण झाला होता. या

स्वातंत्र्यनिष्ठेच्या आणि निःशस्त्र प्रतिकाराच्या राष्ट्रव्यापी भावनेमुळें राष्ट्रसभेनें आंखलेलें राजकारण आज ना उद्या यशस्वी होणार, अशी दूरदर्शी ब्रिटिश मुत्सद्द्यांची खात्री झाली होती तथापि हिंदी जनतेला हवा असणारा हा स्वातंत्र्याचा व स्वयंनिर्णयाचा हक्क आणखी एकाद्या लढ्यावांचून हिंदी जनतेच्या पदरांत पडेल असा संभव राष्ट्रसभेच्या नेत्यांना वाटत नव्हता. यामुळें जरी राष्ट्रसभेने १९३५ च्या कायद्यानुसार स्थापन झालेल्या प्रांतिक स्वराज्याचा कारभार आठ प्रांतांत आपल्या हाती घेतला होता आणि उरलेल्या तीन प्रांतातहि तो आपल्या हाती घेण्याची राष्ट्रसभेला आशा होती, तरीहि संपूर्ण स्वातंत्र्य आणि स्वयंनिर्णय याच्या प्राप्तीसाठीं आपणास आणखी एकादा प्रत्यक्ष प्रतिकाराचा लढा करावा लागणार आहे, याची जाणीव तिला होती. याच्या उलट, जर अशा प्रकारचें ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध उघड बंड हिंदुस्थानांत निर्माण झाले, तर त्या वेळीं आपल्या पक्षास हिंदी संस्थानिक आणि मुसलमानादि अल्पसंख्याक जमाती याचा पाठिंबा मिळवून ही हिंदी स्वातंत्र्याची क्रांतिकारक उठावणी दडपून टाकता यावी असा व्यूह ब्रिटनमधील प्रतिगामी मुत्सद्दी रचीत होते जर हिंदी जनतेनें आपल्या स्वातंत्र्याचा लढा उभारला, तर निदान हिंदुस्थानातील कांहीं भाग तरी आपल्या साम्राज्याशीं एकनिष्ठ राहील आणि त्याच्या साम्राज्यनिष्ठेच्या आधारे आपणास हिंदी जनतेचे हे बंड मोडून टाकता येईल, अशी या ब्रिटिश प्रतिगामी मुत्सद्द्यांची अपेक्षा होती या दृष्टीने त्यांचे डावपेच १९३० सालापासूनच सुरू झालेले असून कांहीं झाले तरी अखंड हिंदुस्थान संपूर्णपणे हिंदी राष्ट्रवादाची प्रतिनिधीभूत अशी जी राष्ट्रसभा तिच्या हाती जाऊ नये, अशी कारस्थाने ब्रिटिशांनीं अनेक वर्षे सुरू केलेली होतीं. या कारस्थानापैकीच हिंदी संस्थाने ही स्वतंत्र राज्ये आहेत, त्यांचें सार्वभौमत्व तेथील संस्थानिकाच्याच हातीं द्यावें लागेल, संस्थानिकाची इच्छा असेल तरच ते आपल्या शर्तींवर हिंदुस्थानच्या संयुक्त राज्यात सामील होतील आणि त्यांच्या शर्ती मान्य नसल्यास ते आपलीं राज्ये स्वतंत्र ठेवू शकतील अथवा ब्रिटिश साम्राज्याचे आश्रित होऊन राहू शकतील, अशा तऱ्हेचे एक कारस्थान १९३० च्या पूर्वीपासून या प्रतिगामी ब्रिटिश मुत्सद्द्यानी रचून ठेविले होते.

## पाकिस्तानचें कारस्थान

ह्याच प्रकारचा दुसरा एक विचार १९३० पासून हिंदी राजकारणात पुढे येऊ लागला होता. हा विचार म्हणजे पाकिस्तानचे ध्येय होय ज्या प्रांतात मुसलमान जनता बहुसंख्य आहे त्या प्रांताचें एक स्वतंत्र राज्य बनवावें आणि ते आपल्या साम्राज्याशीं सदैव एकनिष्ठ राहील अशी व्यवस्था करावी, असा हा विचार होता. हिंदुस्थान हें एक राष्ट्र नसून त्यांत हिंदु व मुसलमान अशीं दोन राष्ट्रे नांदत आहेत, या विचारसरणीस हिंदी राजकारणात द्विराष्ट्रवाद असें नाव प्राप्त झालेलें आहे या द्विराष्ट्रवादाच्या भावनेचा फैलाव मुसलमान जमातींत करून हिंदुस्थानांतील कांहीं

प्रांत तरी हिंदी स्वातंत्र्याच्या अखेरच्या लढ्याच्या वेळीं आपल्या पक्षास ओढून घेता येतील, अशी या विचारास प्रोत्साहन देणाऱ्या ब्रिटिश मुत्सद्द्यांची अपेक्षा होती. तात्पर्य, हिंदी संस्थानिकांचे हक्क आणि मुसलमान जमातींतील पृथक् राष्ट्रीयत्वाची भावना या दोन प्रतिगामी शक्तींचा आधार घेऊन हिंदी राष्ट्रवादाविरुद्ध लढण्याचें राजकारण ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं रचून ठेविलें होतें

## प्रांतिक स्वराज्य व पाकिस्तान

१९३७ सालीं राष्ट्रसभेनें आठ प्रांतातील राज्ये निवडणुकीच्या मार्गानें आपल्या पक्षाच्या हातीं घेतल्यापासून या कारस्थानांना विशेष जोर चढत चालला. एका बाजूने हिंदी राष्ट्रसभेंतील पुरोगामी शक्ति ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध अखेरचा स्वातन्त्र्य-सग्राम करण्यास अधिकाधिक उत्सुक व उतावीळ होत होती, तर दुसऱ्या बाजूने ब्रिटिश मुत्सद्दी हिंदी संस्थानिकाचे स्वातन्त्र्य आणि मुसलमान जमातीतील पृथक् राष्ट्रभावना याना चालना देऊन त्याचा पाठिंबा आपल्या साम्राज्यास मिळविण्याचा जोराचा व निकराचा प्रयत्न करीत होते.

अखेरीस १९४७ च्या १५ ऑगस्टला अखिल हिंदुस्थान ब्रिटिश साम्राज्याच्या प्रभुत्वांतून मुक्त झाला, म्हणजे हिंदुस्थानातील सर्व प्रांतांतून व सर्व संस्थानांतून ब्रिटिशांनी आपले सार्वभौमत्व नष्ट झाल्याचे मान्य केले व तसे जाहीर केले तथापि आपल्या हातची सार्वभौम सत्ता हिंदी राष्ट्रसभा आणि मुस्लीम लीग या दोन पक्षाच्या हातीं त्यानीं विभागून दिली हिंदुस्थानातील पजाब व बगाल या प्रातातील मुसलमानप्रधान जिल्ह्यांचे भाग आणि सरहद्दप्रात व सिंध, तसेंच आसाममधील काही थोडा भाग, एवढ्या भागात पाकिस्तान नावाचें स्वतंत्र राज्य स्थापन करावे आणि उरलेल्या भागात भारत या नावाचे दुसरे राज्य निर्माण करावे, ही दोनहि राज्ये स्वतंत्र व सार्वभौम असावीत व त्यानीं ब्रिटिश साम्राज्याशी स्वेच्छेनें वाटतील तसे सबंध ठेवावेत अगर ठेवूं नयेत, हिंदी संस्थानिकानी या दोहोपैकीं कोणत्या तरी एका राज्यांत सामील व्हावें, त्यांच्यावर आतां ब्रिटिशाचा कोणताहि अधिकार राहणार नाहीं व ब्रिटिशावर त्यांची कोणतीहि जबाबदारी राहणार नाहीं, अशी घोषणा करून ब्रिटिशानी हिंदुस्थानच्या सर्व विभागांतून आपली सत्ता व सार्वभौमत्व नष्ट केले १९३७ पासून १९४७ पर्यंत या ज्या घटना घडून आल्या, त्यांचा विचार आपणास या व पुढील प्रकरणात करावयाचा आहे हा विचार करीत असता प्रथम हे लक्षात घेतले पाहिजे, कीं हिंदी संस्थानिकांचे स्वातंत्र्य आणि मुसलमानांचे पृथक् स्वतत्र राष्ट्रीयत्व हे विचार ज्या ब्रिटिश मुत्सद्द्यांनी प्रथम पुरस्कारिले, त्याना वस्तुतः पाकिस्तान व हिंदुस्थान अशी दोन स्वतंत्र राज्ये निर्माण करून किंवा हिंदुस्थानातील प्रत्येक संस्थानिकास आपल्या राज्यापुरते वाटेल ते करण्याचे स्वातन्त्र्य देऊन आपल्या देशास निघून जावयाची इच्छा होती, असा याचा अर्थ नाहीं. त्यांनी या विचाराना

जी चालना दिली तिचा उद्देश एवढाच होता, कीं हिंदुस्थान हें एकराष्ट्र नाहीं आणि आम्ही त्याचें सार्वभौमत्व सोडून देऊन निघून गेलो, तर या देशांत अनेक राज्यें निर्माण होऊन तीं एकमेकांशीं सतत भांडत राहतील असें सिद्ध करावें आणि आपण या देशांत जें सार्वभौमत्व उपभोगीत आहो त्याचें समर्थन करावें तसेंच हिंदी राष्ट्र-सभा जी राष्ट्रीय शक्ति संघटित करीत होती, ती राष्ट्रशक्ति दुभगण्यास आणि तिचीं अनेक छकलें पाडण्यास या विचारांचा फैलाव उपयोगी पडावा, हा त्यांचा हेतु होता. ही राष्ट्रशक्ति अशा रीतीनें छिन्नभिन्न झाली अथवा तिचें संघटित एकीकरण घडूं शकलें नाहीं, तर आपलें सार्वभौमत्व हिंदुस्थान देशातून केव्हांच नष्ट होणार नाहीं, असें जरी त्यांना वाटले नाहीं, तरी आपल्या साम्राज्याचा अंतकाल बराच पुढें लोटला जाईल एवढी तरी त्याना आशा वाटत होती. पण ही त्यांची आशा सफल होऊं शकली नाहीं. १९४७ सालीं–म्हणजे प्रांतिक स्वराज्य स्थापन झाल्यानंतर दहा वर्षांनीं–ब्रिटिशाना हिंदुस्थानवरील आपलें सार्वभौमत्व त्याच्या सर्व कोनाकोपऱ्यांतून काढून घ्यावें लागलें आणि त्यानंतर जरी या देशांत आज पाकिस्तान आणि भारत अशीं दोन सार्वभौम राज्यें निर्माण झालेलीं असलीं, तरी या देशातील सर्व संस्थाने यापैकीं कोणत्या तरी एका राज्यात सामील झालीं असून त्यातील बहुतेक संस्थानें भारतांतच सामील झालेलीं आहेत. पाकिस्तानची योजना प्रथम आंखणाऱ्या लोकांना काश्मीरचें राज्य हा एक पाकिस्तानचा महत्त्वाचा घटक बनवावयाचा होता; पण काश्मीर संस्थान निदान आज तरी भारतामध्येंच सामील झालेलें असून तें पाकिस्तानात जाण्याचा संभव फारसा दिसत नाहीं. तथापि या प्रश्नाचा अखेरचा निर्णय काश्मीरच्या प्रजेनें स्वयं-निर्णयानें सोडविण्याचे तत्त्व आज भारताप्रमाणें पाकिस्तानलाहि मान्य करणें भाग पडलें आहे त्याचप्रमाणें हिंदी संस्थानांपैकीं सर्वात श्रेष्ठ दर्जाचें असे गणलें गेलेलें व ब्रिटिश साम्राज्याचें अखेरचे आश्रयस्थान असे मानलें जाणारें निजामचें राज्य, हें तर भारतांतच समाविष्ट झालेलें आहे. अशा रीतीने पाकिस्तान आणि हिंदी संस्थानें यांना स्वातंत्र्य व स्वयनिर्णय देऊं करण्यांत प्रतिगामी ब्रिटिश मुत्सद्दयाचें जें साम्राज्यवादी कारस्थान होतें, तें आज पूर्णपणें उलथून पडले आहे, हें कोणासहि दिसून येईल. हिंदु-स्थानांतील सर्व विभागातून ब्रिटिश साम्राज्याचें राजकीय प्रभुत्व नष्ट झालें असून सर्व विभागांत लोकशाही आणि राष्ट्रीयत्व व स्वयनिर्णय या तत्त्वांवर पुनर्घटना करण्याचें स्वातंत्र्य प्रजाजनांना मिळालेलें आहे. जागतिक राजकारणांतील ही एक अत्यंत महत्त्वाची अशी क्रांतिकारक घटना असून तिच्यांतून निर्माण झालेलें आधुनिक भारत हें जगातील पहिल्या प्रतीच्या राष्ट्रांच्या बरोबरीचें असें पुरोगामी राष्ट्र बनलेलें आहे. या क्रांतिकारक घटनेचें श्रेय जसें हिंदी राष्ट्रसभेला व तिच्या नेत्यांना आहे, तसेंच तें श्रेय ब्रिटनमधील पुरोगामी विचारांच्या व उदार धोरणांच्या मुत्सद्दयांनाहि आहे. ब्रिटिश राष्ट्रानें या कामीं दूरदृष्टीची पुरोगामी मुत्सद्देगिरी स्वीकारली आणि त्याला तसें करण्यास भाग पाडणारें राजनैतिक व नैतिक नेतृत्व भारतांत निर्माण झालें.

भारतानें आपला संग्राम समजंस बुद्धीनें व शुद्ध तत्त्वनिष्ठेनें चालविला, यामुळेंच या घटना घडून आलेल्या आहेत.

## पाकिस्तान कां झालें ?

पण हिंदुस्थानांत एकच एक अविभक्त राष्ट्रीय राज्य निर्माण करावे हा हेतु मात्र तडीस गेला नाहीं. हा हेतु केवळ हिंदी राष्ट्रवाद्यांच्याच मनांत होता असें नाहीं, तर तो ब्रिटनमधीलहि पुरोगामी मुत्सद्द्यांच्या दृष्टीपुढें होता. परतु प्रतिगामी वृत्तीच्या ब्रिटिश सत्ताधाऱ्यानीं जीं कारस्थानें रचिलीं होतीं आणि जे अत्यत हीन प्रकारचे डावपेच आपलें साम्राज्य चिरतन करण्याच्या बुद्धीनें त्यानीं लढविले होते, त्यामुळें ही घटना अपरिहार्य झाली त्याचबरोबर हेंहि खरे आहे, की हिंदुस्थानातील हिंदु-मुसलमान जमातींतील लोकांची मागासलेली संस्कृति, धर्म, राष्ट्र आणि राज्य यासंबधीचे त्याचे परपरागत मध्ययुगीन विचार, आणि आधुनिक राष्ट्रीयत्व व लोकशाही यांना विरोधी असे या दोन्ही समाजांच्या अगांत मुरलेले अनेक आचार-विचार, या सर्व प्रतिकूल शक्तींविरुद्ध लढण्याचें हिंदी राष्ट्रीय नेत्याचें सामर्थ्यहि या कामीं पुरे पडलें नाहीं विशेषतः देशांत प्रस्थापित झालेल्या प्रबल राजसत्तेविरुद्ध कोणत्याहि प्रकारचीं भौतिक साधनें नसताना सतत झगडत राहूनच आपल्या राष्ट्रातील जनतेच्या अंतःकरणातील परपरागत प्रतिकूल वृत्तींशीं हा झगडा त्याना चालवावयाचा होता राष्ट्रातील राजसत्ता हातांत आल्यानंतर तिच्या आश्रयानें जनतेंत एकराष्ट्रीयत्व निर्माण करणें ही गोष्ट फार सोपी असते. परतु हातात कोणत्याहि प्रकारची सत्ता नसताना आणि सत्ताधारी राज्यकर्ते राष्ट्रीय संघटनेला छिन्नभिन्न बनविण्याचे अनेक प्रयत्न करीत असताना अज्ञानी व दरिद्री जनतेंत एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण करून त्यांना आपल्यांतील धर्मभेद व जातिभेद विसरावयास लावून परकीय सत्तेविरुद्ध राजकीय हक्कासाठी झगडण्यास प्रवृत्त करणें, ही गोष्ट फार कठिण असते. हिंदी राष्ट्रीय पुढाऱ्यांना अशा प्रकारच्या परिस्थितीत आपले कार्य करावयाचें होतें तें करून त्यांनी जेवढें यश सपादन केले, त्याचे फल म्हणजे आजचा स्वतत्र आधुनिक भारत आणि स्वतत्र पाकिस्तान हेंच होय. १९३७ सालीं प्रांतिक स्वराज्य स्थापन झालें त्या वेळीं पाकिस्तानचा प्रश्न फारसा पुढे आलेला नव्हता असे असतां त्यानतर तीन-चार वर्षांतच हा प्रश्न इतक्या जोरानें कसा पुढें आला आणि त्यामुळे पाकिस्तान नावाचें राज्य हिदुस्थानातील कांहीं भागात स्थापण्यास समति देणें हिदी राष्ट्रीय पुढाऱ्यांना कसे व कां भाग पडलें, हाच विचार या प्रकरणांत करावयाचा आहे

## पाकिस्तानच्या ध्येयाचा इतिहास

मागें सांगितल्याप्रमाणें पाकिस्तानच्या ध्येयाचा पहिला उगम १९३० सालीं झाला. या वर्षी मुस्लीम लीगचें अधिवेशन अलाहाबाद येथें भरलें होतें व तिचे अध्यक्षपद सर महंमद इक्बाल यांनीं स्वीकारलें होतें. आपल्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनीं पंजाब,

सरहद्द प्रांत, सिंध आणि बलुचिस्तान यांचे एकराज्य बनवावें आणि त्याला स्वराज्य द्यावें असें आपले स्वतःचें मत असल्याचे बोलून दाखविलें. परंतु हें हिंदुस्थानच्या वायव्येकडील मुसलमानराज्य हिंदी संयुक्त राज्याशीं संलग्न असेच एक पोटराज्य बनवावे, एवढाच त्यांच्या या उद्गारांचा त्या वेळीं अर्थ समजला जात असे यांत बंगालच्या बाजूच्या पूर्व पाकिस्तानचा मुळींच उल्लेख आलेला नसून काश्मीरचाहि यांत उल्लेख नव्हता हे लक्षात घेण्याजोगे आहे यानंतर तिसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळी इंग्लंडातील केंब्रिज विद्यापीठांतील कांहीं विद्यार्थ्यांनीं पाकिस्तानची कल्पना १९३३ च्या जानेवारींत एक पुस्तिका काढून जाहीर केली या योजनेंत पाकिस्तान म्हणजे पंजाब, अफगाण प्रांत ( सरहद्द प्रांत ), काश्मीर, सिंध आणि बलुचिस्तान या सर्वांचे एकराज्य असा अर्थ करण्यात आला होता. या प्रांताच्या नांवांतील आद्य अक्षरें जुळवूनच पाकिस्तान हे नांव बनविल्याचें दिग्दर्शित केले होतें शिवाय पाकिस्तान म्हणजे 'शुद्ध राष्ट्र' असाहि अर्थ अभिप्रेत होता या योजनेचे पुरस्कर्ते आपणास तीन कोटी मुसलमानांचे प्रतिनिधी असे म्हणवून घेतात. पण त्या वेळीहि या योजनेला कोणीं कांहीं महत्त्व दिले नाहीं. १९३३ च्या ऑगस्ट महिन्यांत मुस्लीम लीगचें प्रतिनिधिमंडळ इंग्लंडांत पार्लमेंटच्या जॉइंट सिलेक्ट कमिटीपुढे साक्ष देण्यास गेलें असता त्याच्या प्रमुखास विचारण्यात आलें: "कांहीं प्रांताचे संयुक्त राज्य बनविण्याच्या कामी पाकिस्तान नांवाची एक योजना पुढे आलेली आहे काय?" यावर मुस्लीम लीगचे प्रतिनिधि म्हणाले, "माझ्या माहितीप्रमाणें ती एक फक्त विद्यार्थ्यांनीं बनविलेली योजना आहे आम्हीं जो तिचा विचार केला तेवढ्यावरून ती आम्हांस विक्षिप्त आणि अव्यवहार्य अशी वाटली" मुस्लीम लीगच्या प्रतिनिधींचे पाकिस्तानच्या योजनेसंबंधींचे १९३३ च्या ऑगस्ट महिन्यातील हे उद्गार लक्षात घेतल्यास तिला मुसलमान समाजाचे प्रतिनिधी म्हणवणारे लोकहि किती उपेक्षणीय समजत होते याची कल्पना येते. पण १९३३ नंतर पांच वर्षांच्या आंत सर्व मुस्लीम लीगचें राजकारण पाकिस्तानच्या दिशेनें मोठ्या वेगानें वाहवत चाललें आणि कायदेआझम जीनांच्यासारखे एके काळचे राष्ट्रसभेनें राष्ट्रीय गणलेले पुढारी या पाकिस्तानच्या ध्येयाचा मोठ्या हिरीरीनें प्रचार करूं लागले ही घटना इतक्या थोड्या अवधींत कशी व कां घडून आली? इ. स १८८५ पासून ज्या राष्ट्रसभेने सुमारें तीन पिढया खपून एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण करण्याचे प्रयत्न केले, त्या राष्ट्रसभेच्या नेत्यांना अखेरीस पाकिस्तानला संमति देणें कां भाग पडलें आणि हिंदुस्थानातील मुसलमान समाजांत या ध्येयाचें वेड इतक्या थोड्या अवधींत कसें फैलावलें?

हिंदुस्थानात ब्रिटिश सत्ता सार्वभौम बनली त्या वेळीं येथील लोकांत जातिधर्मभेदातीत आधुनिक राष्ट्रीय भावना आणि लोकशाही हीं ध्येयें निर्माण झालेलीं नव्हतीं यानंतर म्हणजे ब्रिटिशाचे राज्य स्थापन झाल्यानंतर हे आधुनिक विचार आपल्या राष्ट्रांत फैलावण्याचें कार्य राजा राममोहन रॉयप्रभृति धार्मिक व सामाजिक

सुधारकांनीं एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून सुरू केलें. त्यांत सर्व धर्मासंबंधीं समत्वाची व सहिष्णुतेची भावना आणि जातिभेद व धर्मभेद विसरून राष्ट्रभक्ति करण्याचें ध्येय यांना प्राधान्य देण्यांत आलें होतें. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभापासून सामाजिक व धार्मिक सुधारणाची ही जी चळवळ सुरू झाली, तिला पांच-पन्नास वर्षांत बरेचसे यश इंग्रजी शिक्षण घेतलेल्या लोकांत येऊं लागले अशा इंग्रजी शिक्षण घेतलेल्या लोकांनींच इ. स. १८८५ सालीं हिंदी जनतेच्या राजकीय आकांक्षा प्रकट करण्यासाठीं व त्या सफल करण्यासाठीं राष्ट्रसभेची सस्थापना केली. या राष्ट्रसभेंत हिंदुस्थानांतील सर्व धर्मांचे व जातींचे लोक यावेत आणि त्यांनीं आधुनिक राष्ट्रीयत्वाच्या ध्येयास अनुसरून जातिधर्मभेदातीत लोकशाही राजकारण आपल्या राष्ट्रात निर्माण करावे, असे या सभेच्या संस्थापकांचे ध्येय व धोरण होतें. अर्थात् ही राष्ट्रीय चळवळ इंग्रजी शिक्षण घेतलेल्या आधुनिक विचारवतानीं व हिंदुस्थानात येऊन राहिलेल्या उदार अतःकरणाच्या व पुरोगामी मताच्या कांहीं इंग्रजानीं सुरू केली होती. हिंदुस्थानांतील लोक अनेक धर्मांच्या व अनेक जातींच्या जमातींत विभागलेले असल्यानें व या अनेक जमातींपैकीं फारच थोड्या जमातींत इग्रजी शिक्षणाचा प्रसार प्रथम झाल्यामुळे ज्या जमातींत तो प्रसार अधिक झाला होता, त्या जमातींचे लोक साहजिकपणें या राष्ट्रीय चळवळीत संख्येनें आधिक आले. मुसलमानी धर्माचे लोक इग्रजी शिक्षणात या वेळीं मागासलेले होते, तरीहि राष्ट्रसभेच्या चळवळीत दोन-तीन वर्षांत बरेच सुशिक्षित मुसलमान भाग घेऊ लागले आणि राष्ट्रसभेच्या तिसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष न्या बद्रुद्दीन तय्यबजी हे मुसलमान पुढारी झाले. राष्ट्रसभा हळूहळू सुशिक्षित वर्गाकडून सामान्य जनतेकडे तोंड फिरवून आपल्या चळवळीला सामान्य जनतेचा पाठिंबा मिळवूं लागली या चळवळीचा प्रभाव ब्रिटनमधील लोकांवर व पार्लमेंटावर होऊ लागला आणि १८९२ सालीं या चळवळीचा प्रभाव पडून कायदेमडळात लोकनियुक्त प्रतिनिधी अप्रत्यक्ष निवडणुकींनीं थोड्या प्रमाणात का होईना, पण घेण्यांत यावेत असा कायदा ब्रिटिश पार्लमेंटनें मंजूर केला

हिंदुस्थानात आधुनिक राष्ट्रीय भावना आणि लोकशाही राजकारण यांची होणारी ही वाढ या देशातील ब्रिटिश राज्यकर्त्यांना पसत पडली नाहीं आणि त्यांनीं सर सय्यद अहंमद यांच्यासारख्या मुसलमान पुढाऱ्यास जवळ करून ही राष्ट्रीय चळवळ केवळ हिंदूंची आहे, ती यशस्वी झाल्यास या देशांत हिंदूचे राज्य होईल आणि मुसलमानाची संस्कृति रसातळास जाईल, असा दुहीचा कानमंत्र देण्यास सुरुवात केली. त्यानाहि तो पटूं लागला आणि त्यांनीं राष्ट्रसभेमध्यें मुसलमानानीं भाग घेऊं नये, ती फक्त हिंदूंची चळवळ आहे आणि ती चळवळ यशस्वी झाल्यास हिंदुस्थानांत हिंदूचे वर्चस्वहि होईल, असा उपदेश करण्यास प्रारंभ केला. यानतर लवकरच हिंदुस्थानांत मुबई-पुण्यासारख्या ठिकाणीं हिंदु-मुसलमानांचे दंगे होण्यासहि सुरुवात झाली. पुढें ज्या ज्या वेळीं राष्ट्रसभेनें ब्रिटिशाविरुद्ध जोराच्या प्रतिकाराच्या

चळवळी केल्या, त्या त्या वेळीं हिंदु-मुसलमानांच्या दगली व मारामाऱ्या एक-सारख्या वाढत गेल्या १९०५ नंतर बगालच्या फाळणीविरुद्ध जी चळवळ स्वदेशी व बहिष्काराच्या रूपानें सुरू झाली, त्या वेळींहि असेच दगे बगालकडे झाले अशा रीतीनें मुसलमान समाजास राष्ट्रसभेपासून फोडून घेण्याचें राजकारण हिंदुस्थानांतील प्रतिगामी ब्रिटिश अधिकारी करू लागले

## विभक्त मतदार-संघ व मुस्लीम-राष्ट्रवाद

पण एवढ्यानें मुसलमानांची पृथक् राष्ट्रीयत्वाची भावना सुदृढ बनली नाहीं १९०९ सालीं मोर्ले-मिंटो-सुधारणा-कायदा करण्यांत आला, तेव्हां मुसलमानाना राखीव जागा आणि विभक्त मतदार-सघ देण्यात आले मुसलमानाना विभक्त मत-दार-संघ देण्यांत आल्यापासून त्यांच्या समाजात निर्माण झालेली अथवा निर्माण केलेली पृथक् राष्ट्रीयत्वाची ही भावना तिला कायदेशीर आधार मिळाल्यानें दृढमूल बनूं लागली अखेरीस १९१६ सालीं लखनौ-करार या नावाचा एक करार राष्ट्रसभेने मुस्लीम लीगशीं केला आणि पहिल्या महायुद्धाच्या अखेरीस जे स्वराज्याचे हक्क हिंदुस्थानला देण्यात यावेत अशी चळवळ राष्ट्रसभा करीत होती, त्या चळवळीस मुसलमान पुढाऱ्यांचा पाठिंबा मिळविला हा करार घडवून आणण्यात राष्ट्रसभेचे त्या वेळचे पुढारी लो टिळक आणि मुसलमान पुढारी बॅ. महमदअली जीना हे प्रमुख होते या लखनौ-करारानें मुसलमानाना दिलेल्या विभक्त मतदार-सघांचे तत्त्व मान्य केले पुढे पहिल्या महायुद्धानतर मॉटेग्यू-चेल्म्स्फर्ड-सुधारणा या नावाने प्रसिद्ध असलेली राज्यघटना येथें स्थापन करण्यांत आली. त्या वेळीं हें विभक्त मतदारीचें तत्त्व लोकशाहीच्या व एकराष्ट्रीयत्वाच्या वाढीस विघातक आहे, असें त्या सुधारणा सुचविणाऱ्या रिपोर्टात स्पष्टपणे नमूद करण्यांत आले होते तरीहि ते तत्त्व राष्ट्रसभा व मुस्लीम लीग या दोघानीं मान्य केले आहे या सबबीवर तें कायम करण्यात आलें परतु या दोन पक्षांनीं एकत्र येऊन हिंदी लोकांच्या हातीं जी सत्ता मागितली होती, ती मात्र या कायद्यानें दिली नाहीं ही सत्ता मिळावी म्हणून राष्ट्रसभेनें मुसल-मानांना ब्रिटिशांनीं आगाऊच दिलेलें विभक्त मतदारीचे तत्त्व निरुपाय म्हणून मान्य केलें होतें पण ब्रिटिशानीं ते तत्त्व राष्ट्रसभेनें मान्य केलें म्हणून आता ते बदलतां येत नाहीं अशी सबब पुढे केली, पण राष्ट्रसभेने स्वराज्याची जी सत्ता मागितली होती ती मात्र राष्ट्राला दिली नाहीं ! अशा रीतीनें विभक्त मतदारीचा हक्क मुसलमान समाजाला ब्रिटिशांनीं बनविलेल्या राज्यघटनेनें दिला. तरीहि त्याचे भावी परिणाम १९३७ सालीं प्रांतिक स्वराज्य स्थापन होईपर्यंत कोणाच्याहि बरोबर लक्षात आले नव्हते. नंतर मात्र प्रांतांत जी जबाबदार मंत्रिमंडळांची लोकशाही राजवट सुरू झाली, तिला विभक्त मतदारीचा कायदा आणि त्या कायद्यामुळें अस्तित्वांत आलेलें जमातवादी राजकारण हीं कशीं विघातक होतात, त्याचा पूर्ण अनुभव येऊ

लागला. जर मुसलमान समाजाला हे विभक्त मतदारीचें तत्त्व राज्यघटनेने दिलें नसतें, तर मुस्लीम लीगचे जमातवादी राजकारण इतके बेफामपणें भडकूं शकले नसतें

## जबाबदार राज्यपद्धति व विभक्त मतदार-संघ

१९३७ सालीं राष्ट्रसभापक्षानें ब्रिटिश हिंदुस्थानांतील अकरा प्रांतांपैकीं आठ प्रांतांत आपले निर्विवाद बहुमत स्थापन करून आपल्या पक्षाचीं मंत्रिमडळे बनविलीं या आठ प्रातापैकी फक्त एका ओरिसा प्रांताखेरीज इतर सर्व प्रातात मुसलमान मत्री घेण्यांत आलेले होते मात्र हे मुसलमान मत्री राष्ट्रसभापक्षाचे होते जबाबदार मत्रिमंडळाची लोकशाही राज्यपद्धति ही यशस्वी होण्यास एकाच पक्षाचीं मत्रिमडळें असणें हे इष्ट असते कारण मत्रिमंडळांतील सर्व सभासद हे सामुदायिक रीतीनें लोकसभेला जबाबदार असतात अशा सामुदायिक जबाबदारीने चालविलेलें राजकीय धोरण एकाच पक्षाचे मत्रिमडळ असेल, तर यशस्वी होऊ शकते जेव्हा लोकसभेत कोणत्याहि एका पक्षाचे निर्विवाद बहुमत होऊ शकत नाहीं, तेव्हा दोन किंवा अधिक पक्षाचें सयुक्त मत्रिमडळ करावें लागतें. पण अशी सयुक्त मत्रिमडळें आपला कारभार एकाच धोरणानें चालविण्यांत फारसें यश सपादन करू शकत नाहींत त्यातून राष्ट्रसभेने जेव्हा प्रातिक स्वराज्याचा कारभार आपल्या हातीं घेतला, तेव्हा त्या प्रांतिक स्वराज्यावर देखरेख करणारा ब्रिटिश गव्हर्नर आणि त्याच्या संरक्षणाखालीं काम करणारा एक कायमचा अधिकारीवर्ग हे मंत्रिमडळाना अडथळा करणारे होते ब्रिटिश पार्लमेंटनें नेमलेला हा गव्हर्नर आणि त्याच्या पाठिंब्यानें सुरक्षित बनलेला अधिकारीवर्ग याचा आपल्या धारणात अडथळा होऊ न देता राष्ट्रसभेला आपले राजकारण यशस्वी करावयाचे होते इतकेंच नाही, तर हे प्रातिक स्वराज्याचे राजकारण यशस्वी करीत असता ब्रिटिशाच्या हातातील मध्य सरकारची सार्वभौम सत्ता हस्तगत करण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या भावी लढ्याची पूर्वतयारी तिला करावयाची होती. अर्थात् जे इतर पक्ष या भावी लढ्यात आपल्याबरोबर येण्याचा सभव नव्हता, त्यांना आपल्या मत्रिमडळात अधिकाराचे स्थान देऊन त्याचे पक्षीय राजकारण वाढू द्यावयाचें आणि आपला सघटित राष्ट्रीय पक्ष खिळखिळा करावयास इतर पक्षांना सधि द्यावयाची, हे धोरण राष्ट्रीय सभेच्या क्रातिकारक नेत्यांना पटणारे नव्हतें त्याना अल्पसख्य मुसलमान जमातीवर अन्याय करण्याची इच्छा नव्हती आणि म्हणूनच त्यांनीं आपल्या मत्रिमडळात मुसलमान मत्री नेमिले होते परतु जो मुस्लीम लीगपक्ष ब्रिटिशाविरुद्ध लढा करण्याच्या कामीं उपयोगी पडण्याचा संभव नव्हता, अशा पक्षाचे मंत्री आपल्या पक्षाचें निःसशय बहुमत लोकसभेंत असतांना आपल्या मंत्रिमंडळात समाविष्ट करून घेण्यास राष्ट्रसभापक्ष तयार नव्हता. यामुळें विभक्त मतदारीच्या कायद्याचा फायदा घेऊन राखीव मुसलमान जागांपैकीं बहुसख्य जागा ज्या मुस्लीम लीगपक्षाने कांहीं प्रातांत मिळविल्या होत्या, त्या मुस्लीम लीगपक्षाला राष्ट्रसभापक्ष आपल्या मंत्रि-

मंडळांत घेण्यास मुळींच तयार झाला नाहीं. यामुळें मुस्लीम लीगपक्ष राष्ट्रसभापक्षावर चिडला आणि त्याने राष्ट्रसभापक्ष मुसलमान जमातीवर, इस्लाम धर्मावर व इस्लामी संस्कृतीवर जुलूम करीत आहे व त्याला हिंदुराज्य स्थापन करावयाचे आहे, अशी हाकाटी करण्यास सुरुवात केली ज्या ब्रिटिशाना राष्ट्रसभापक्षाचे वाढते बळ पाहून मत्सर वाटूं लागला होता आणि ज्यांना राष्ट्रसभेने आंखलेल्या भावी क्रांतिकारक आंदोलनांत आपल्या पक्षास मुसलमान जमात मिळावी अशी इच्छा होती, त्यांनाहि राष्ट्रसभेचें हें धोरण पसत पडलें नाहीं. परंतु ब्रिटिश गव्हर्नर या बाबतींत राष्ट्रसभेच्या धोरणास कायदेशीर विरोध करू शकत नव्हते. अल्पसंख्याकांचे हितरक्षण करण्याची कायदेशीर जबाबदारी त्यांच्यावर होती. इतकेंच नाही, तर ही जबाबदारी पार पाडण्यासाठीं आपल्या जादा अधिकारांचा उपयोग करून अल्पसंख्याकांचे हितरक्षण करण्यास अवश्य असणारे धोरण मंत्रिमंडळांस स्वीकारण्यास भाग पाडणे त्याना शक्य होतें पण मुस्लीम लीगपक्षाच्या सभासदाना मंत्रिमंडळात घेतले पाहिजे, अशी सक्ती मात्र कॉंग्रेसपक्षावर ते करू शकत नव्हते मुस्लीम लीगपक्षाचे सभासद मंत्रिमंडळांत न घेणें हा अल्पसंख्याक जमातीवर जुलूम आहे, असे कोणासहि म्हणणें शक्य नव्हते जर मुसलमान समाजावर खरोखर राष्ट्रसभेच्या मंत्रिमंडळाने जुलूम केला असता अथवा त्यांच्या योग्य हितसंबंधांस धक्का लाविला असता तर ब्रिटिश गव्हर्नरांनीं मंत्रिमंडळांच्या कारभारांत हात घातला असता. या कारणासाठीं आमच्या कारभारांत हात घातला तरी आम्ही त्याबद्दल कुरकुर करणार नाही, असेंहि आश्वासन राष्ट्रसभेच्या नेत्यानीं गव्हर्नराना दिलेलें होते यामुळे मुस्लीम लीगपक्षाने कितीहि ओरड केली, तरी जोपर्यंत मुसलमान समाजावर खरोखर अन्याय झालेला नव्हता, तोपर्यंत ब्रिटिश गव्हर्नर कांहीं करू शकत नव्हते. पुढे १९३९ साली राष्ट्रसभेच्या मंत्रिमंडळानीं दुसरे महायुद्ध सुरू झाल्यानंतर युद्धाशी असहकार करण्यासाठी ज्या वेळी राजीनामे दिले, त्या वेळेपर्यंत कोणत्याहि प्रांतिक गव्हर्नराने राष्ट्रसभेच्या प्रांतिक कारभारात मुस्लीम लीगपक्षाच्या तक्रारी ऐकून हात घातला नव्हता हाच राष्ट्रसभापक्षाच्या धर्मभेदातीत राष्ट्रीय वृत्तीचा आणि लोकशाही पद्धतीनें राज्य चालविल्याचा भक्कम पुरावा होता राष्ट्रसभापक्षानें राजीनामे दिल्यानंतर जेव्हां मुस्लीम लीग पक्षाने राष्ट्रसभेविरुद्ध मोहीम सुरू केली, तेव्हांहि राष्ट्रसभेच्या पुढाऱ्यांनीं आपल्या निःपक्षपाती राज्यकारभाराविरुद्ध कांहीं बोलावयाचें असल्यास ब्रिटिश गव्हर्नरांनीं तसा पुरावा देऊन बोलावे, असे उघड आव्हान दिलें; पण तें आव्हान कोणीहि स्वीकारू शकले नाहीं आणि राष्ट्रसभेला हिंदुराज्य स्थापन करून इस्लामी संस्कृति नष्ट करावयाची आहे, हा खोटा आरोप कोणासहि केव्हांहि सिद्ध करतां आला नाही.

## राष्ट्रीय सभा व मुस्लीम लीग यांचें बलाबल

अशा रीतीनें आपला आठ प्रांतांतील प्रांतिक स्वराज्याचा राज्यकारभार अल्प-

संख्याकांना जुलुमाचा झाला नाहीं आणि सामान्यतः लोकशाही पद्धतीला वरूनच तो झाला, हे हिंदी राष्ट्रसभेनें दाखवून दिलें होते हिंदी राजकारणांत मुस्लीम लीग हा एक विभक्त मतदार-संघाच्या आश्रयानें वाढलेला जमातवादी राजकीय पक्ष होता. मुसलमानांना विभक्त मतदारसंघ दिल्यामुळे आणि राखीव जागा असल्यामुळें त्यांच्या तर्फे कायदेमंडळात जे प्रतिनिधी निवडून येत, त्यांना निवडून येण्यासाठीं इतर जमातींच्या मतांची व सहानुभूतीची कधीं आवश्यकता भासली नाहीं यामुळें हिंदु-मुसलमान हा भेदभाव विसरून एकराष्ट्रीयत्व स्वीकारणाऱ्या राष्ट्रीय मुसलमानांना मुसलमान मतदारसंघांतून निवडून येणें जवळजवळ अशक्य झाले होते शिवाय सत्ताधारी ब्रिटिश अधिकारी आणि सरकारी धोरण हीं राष्ट्रीय मुसलमानांना नेहमींच विरोधी असत त्यातून मुसलमान समाजात आधुनिक शिक्षणाचा प्रसार फार कमी असून त्यांच्यांतील धर्मनिष्ठा राजकारणाशीं एकरूप मानण्याची मध्ययुगीन प्रवृत्ति नष्ट झालेली नव्हती मध्ययुगीन कालातील धर्मनिष्ठा व राष्ट्रीय भावना याना एकरूप समजण्याची प्रवृत्ति हिंदु समाजातहि होती व तिचे अवशेष अद्यापि अनेक हिंदूंच्या अंतःकरणात टिकून आहेत तथापि हिंदु समाजात अनेक जातींच्या जमाती असल्यामुळें ही त्यांची धर्मनिष्ठा राष्ट्रीयत्वाच्या वाढीस फारशी उपयोगी पडत नाहीं, हे ओळखून हिंदु राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं जातिभेदातीत व धर्मभेदातीत आधुनिक राष्ट्रीय वृत्ति निर्माण करण्याचे जाणूनबुजून पुष्कळच प्रयत्न गेल्या शें-दीडशे वर्षांत केले. तसे प्रयत्न तितक्या प्रमाणांत मुसलमान पुढाऱ्यांनीं केले नाहीत. याशिवाय, शुद्ध धर्मसुधारणेच्या व सामाजिक सुधारणेच्या अनेक चळवळी एकोणिसाव्या व विसाव्या शतकात हिंदु समाजात झाल्या, तशा आधुनिक वृत्तीचे राष्ट्रीयत्व निर्माण करणाऱ्या सुधारणेच्या चळवळी मुसलमान समाजात फारशा झाल्या नाहींत त्याच्यांत जी जागृति झाली ती सामान्यतः आपण अल्पसंख्य जमात आहोत आणि आपली संस्कृति बहुसंख्य हिंदूंच्या आक्रमणामुळे धोक्यात येण्याचा संभव आहे, अशी जाणीव असणाऱ्या लोकांनींच केली किंवा आम्हीं एके काळी हिंदुस्थानवर सार्वभौम सत्ता गाजविली आहे, हा त्यांचा अहंकार जागृत करून ती जागृति करण्यांत आली यामुळे धर्मभेदातीत राष्ट्रीयत्वाची वृत्ति त्या समाजांत व्यापकत्वानें फैलावली नाही त्यात त्याना विभक्त मतदार-संघ देऊन इतर धर्मांच्या लोकांपासून अलग केल्यामुळें अशा राष्ट्रीय वृत्तीच्या त्यांच्यातील पुढाऱ्याना त्या मतदारसंघातून निवडून येणे जवळजवळ अशक्य होते. म्हणून मुसलमान मतदार-संघांतून निवडून येणारे सभासद नेहमीं राष्ट्रीय सभेच्या राष्ट्रीय पक्षाला विरोधक असेच असत पण याचा परिणाम असा झाला, कीं ज्या प्रांतामध्यें मुसलमान हे अल्पसंख्य होते अशा कोणत्याहि प्रांतांत त्याना आपला पक्ष लोकसभेत बहुसंख्येनें निवडून देणें शक्य झाले नाहीं आणि हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांत मुसलमान धर्माचे लोक अल्पसंख्यच आहेत त्यांच्या बहुसंख्येचें फार मोठें प्रमाण फक्त सरहद्द प्रांत व सिंध या दोनच प्रांतांत होतें. त्यां-

पैकीं सरहद्द प्रांत राष्ट्रसभेनें आपल्या राष्ट्रीय मुसलमान पक्षाच्या ताब्यांत आणिला होताच. सिंध प्रांतांतहि दुसऱ्या पक्षाशीं सहकार्य करून अल्लाबक्ष यांच्या नेतृत्वाखालीं आपणांस अनुकूल असें मंत्रिमंडळ राष्ट्रसभेने स्थापन केले होतें. राहतां राहिले फक्त पंजाब व बंगाल हे दोन प्रांत. त्यांत हिंदू व मुसलमान जवळजवळ सारख्याच संख्येचे होते. या प्रांतांत राष्ट्रसभापक्षाला बहुमत मिळवितां आलें नाहीं, पण त्या प्रांतात जे मुसलमान पक्ष सत्ताधारी बनले, तेसुद्धां मुस्लीम लीगपक्षाचे नव्हते अशा रीतीनें हिंदुस्थानांतील कोणत्याहि प्रांतात मुस्लीम लीगपक्षाला स्वतःचें मंत्रिमंडळ बनवितां येईना. त्याची सर्व भिस्त विभक्त मतदारसंघ आणि मुसलमान समाजातील पृथक् राष्ट्रभावना यांच्यावरच होती. अशा जमातवादी राजकीय पक्षाला हिंदुस्थानांतील कोणत्याहि प्रांतांत लोकशाही पद्धतीनें आपलें पक्षीय मंत्रिमंडळ स्थापन करणे अशक्यच होतें. जेथें मुसलमान अल्पसंख्य त्या प्रांतांत मुसलमानांना राखून ठेवलेल्या सर्व जागा त्या पक्षानें काबीज केल्या, तरी लोकसभेंत त्याला अल्पसंख्य पक्ष म्हणूनच नांदावे लागणार. आणि ज्या एक-दोन प्रांतांत मुसलमान प्रचंड बहुसंख्य होते, तेथें त्यांना या जमातवादी राजकारणाच्या पक्षाची गरजहि वाटत नव्हती. कारण त्यांना इतरांचें आपल्यावर आक्रमण होईल अशी भीति वाटण्याची कांहीच गरज नव्हती. यामुळें विभक्त मतदार-संघ आणि जमातवादी राजकारण यांच्या आधारावर उभारलेला मुस्लीम लीगपक्ष हिंदुस्थानातील कोणत्याहि प्रांतात सत्ताधारी बनूं शकेना. राष्ट्रीय सभेने मात्र अकरापैकीं आठ प्रांत आपल्या पक्षाच्या ताब्यात घेऊन इतर उरलेल्या तीन प्रांतांतहि आपल्या राष्ट्रीय राजकारणाचा प्रचार करण्यास सुरुवात केली.

वस्तुतः एकदां प्रांतिक स्वराज्य स्थापन होऊन जबाबदार मंत्रिमंडळाची पद्धति अस्तित्वांत आल्यानंतर मुसलमान पुढाऱ्यांनीं जमातनिष्ठेवर उभारलेला आपला राजकीय पक्ष विसर्जन करून तत्त्वनिष्ठ राजकीय पक्ष निर्माण करण्याचे धोरण स्वीकारणें आवश्यक होते. असे केल्यावांचून कोणत्याहि प्रांतात मंत्रिमंडळ बनविणे त्यांना शक्य नव्हतें. पण असा बोध न घेता त्यांनीं आपले जमातवादी राजकारण जिवंत ठेवण्यासाठीं हिंदुस्थानचे दोन खंड पाडून त्यांपैकीं एका खंडाचें राज्य मुसलमानांना मिळवून देण्याचे ध्येय स्वीकारण्याचा निर्णय घेतला.

हिंदुस्थानांत आधुनिक राष्ट्रीय भावना निर्माण करून लोकशाही राज्यपद्धति प्राप्त करून घेण्याचा निर्णय ज्या राष्ट्रसभेनें एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस घेतला, तिच्या पुढाऱ्यांनीं भारतीय राष्ट्रीयत्व धर्मभेदाच्या भावनेवर उभारतां येणार नाहीं, असा विचारपूर्वक निर्णय केला होता. हिंदुस्थानांत हिंदु व मुसलमान या दोन धर्मांचे लोक बहुसंख्य असले, तरी त्यांत इतरहि धर्मांचे लोक नांदत आहेत. शिवाय हिंदुस्थानांतील कोणताहि भाग केवळ हिंदूंच्या किंवा केवळ मुसलमानांच्या संख्येने भरलेला नाहीं. यामुळें या देशाचे दोन विभाग कसेहि केले, तरी त्यांपैकीं प्रत्येक

विभागात दोनहि धर्मांचे लोक कमी-अधिक प्रमाणात राहणारच अर्थात् अशा दोनहि राज्यांपुढे अल्पसंख्याकांच्या सरक्षणाचा प्रश्न व हें राज्य आपलें आहे अशी भावना अल्पसख्याकांत निर्माण करण्याचा प्रश्न त्यांच्यापुढें येऊन उभा राहणारच असें असल्यानें हिंदु आणि मुसलमान हीं दोन स्वतंत्र राष्ट्रें आहेत, या सिद्धांताच्या आधारे या देशांतील कोणताहि प्रश्न सुटू शकत नाहीं हा देश केवळ हिंदूंचा आहे अशी परपरागत भावना हिंदू लोकांत बद्धमूल झालेली होती, त्याचप्रमाणे या देशावर शेंकडों वर्षें मुसलमानी धर्माच्या बादशहांनीं सार्वभौम सत्ता उपभोगिलेली होती. अर्थात् कोणत्याहि काळात सर्व हिंदुस्थानावर मुसलमान धर्माच्या बादशहाचें अप्रतिहत सार्वभौमत्व फार काळ टिकलेलें नाहीं किंबहुना, हें ध्येय केव्हाहि प्रत्यक्ष सृष्टींत अवतरलेलेंहि नाहीं. पण या भावना या देशांतील मुसलमान समाजाच्या अंतःकरणात रुजलेल्या होत्या त्याचप्रमाणें येथे हिंदूंचें सार्वभौमत्व स्थापन करण्यासाठीं हिंदू राजांनीं एकसारखे मुसलमानाविरुद्ध लढे चालू ठेविल्याचा इतिहासहि ब्रिटिशांची सत्ता या देशात सार्वभौम बनेपर्यंतच्या काळात घडून आला आहे अखेरीस हे तंटे शेंकडो वर्षें चालून त्याचा कोणत्याहि एका पक्षाच्या वतीनें निर्णय लागला नाहीं व हिंदुस्थानांतील या दोनहि धर्मांचे लोक ब्रिटिशाचे गुलाम बनले. या इतिहासाचा बोध लक्षांत घेऊन राष्ट्रसभेची संस्थापना करणाऱ्यानीं आधुनिक भारताचे राष्ट्रीयत्व हें कोणत्याहि एका धर्माच्या आधारावर उभारावयाचें नाहीं, असा दूरदर्शी निर्णय घेतलेला होता.

## धर्मभेदातीत राष्ट्रीयत्व

राष्ट्रसभेच्या संस्थापकांनीं घेतलेला हा निर्णय आजहि योग्यच वाटतो याच्या उलट, ज्यांनी आपल्या राष्ट्रीयत्वास मुसलमानी धर्माचा अथवा केवळ हिंदु धर्माचा आश्रय घेण्याचा विचार केला, त्याचा तो विचार हिंदु व मुसलमान या दोनहि धर्माच्या लोकाचें अहित करणारा आणि जे त्या वृत्तीच्या अधीन होतील, त्याचा व त्याच्या अनुयायाचा घात करणारा असाच ठरलेला आहे व ठरणार आहे राष्ट्रसभेच्या पुढाऱ्यानीं आपली ही निष्ठा कोणत्याहि परिस्थितींत ढळू दिली नाहीं हिंदुस्थानातील काही विभागात मुस्लीम लीगच्या अविवेकी व अत्याचारी वृत्तीनें व ब्रिटिश सत्ताधाऱ्यांच्या पक्षपाती राजकारणाने आज पाकिस्तान या नांवाचे एक राज्य निर्माण झालेलें आहे. तरी त्यापासून तेथील मुसलमान जनतेचे सुद्धा खरे हित होणार नाहीं तेथील हिंदुधर्मीयाना तर अनन्वित छळ भोगावा लागलेलाच आहे या सर्व घटना घडून आलेल्या असल्या, तरी भारतानें आपले जातिधर्मभेदातीत राष्ट्रीयत्व कायम ठेविलें आणि लोकशाही राज्य एवढ्या मोठ्या प्रदेशावर स्थापन केले, ही घटना त्याला व त्याच्या पुढाऱ्यांना निःसशय अभिमानाची अशीच आहे आपल्या दीर्घकालीन इतिहासापासून आधुनिक भारताच्या निर्मात्यांनी हा जो बोध घेतला आणि या उच्च

ध्येयापासून विचलित होण्याचे अनेक प्रसंग आले असता कोणत्याहि मोहाला, लोभाला अथवा भीतीला वश न होता या बाबतीत त्यांनीं आपली तत्त्वशुद्ध ध्येय-निष्ठा अखड प्रज्वलित ठेविली, याबद्दल भारतांत जन्मास येणाऱ्या भावी पिढ्या त्यांना सतत दुवा देत राहतील जर मुस्लीम लीगपक्षाने म्हणजे त्याच्या पुढाऱ्यांनीं हीच धर्मभेदातीत राष्ट्रीय वृत्ति स्वीकारिली असती अथवा मुसलमान समाजात निर्माण झालेल्या थोर राष्ट्रीय पुढाऱ्यांचे नेतृत्व त्या समाजांत अधिक प्रभावी ठरलें असते, तर आधुनिक भारताचा इतिहास झाला त्याहूनहि अधिक अभिमानास्पद व उज्ज्वल झाला असता. परतु हिंदु आणि मुसलमान या दोन धर्मातील भेदभाव जागृत करून परकीय सत्तेच्या आधारे आपले पाकिस्तानचे राजकारण यशस्वी करण्याचा अविवेकी मार्ग मुस्लीम लीगपक्षानें १९४० सालापासून अधिकृत रीतीनें स्वीकारिला याला कारण म्हणून सांगतांना राष्ट्रसभापक्षानें प्रांतिक स्वराज्य चालवितांना आपल्या पक्षाचे प्रतिनिधी मन्त्रिमडळात घेतले नाहींत, एवढेच काय ते त्याना सागता येण्याजोगें होतें

ज्या ब्रिटिशांना राष्ट्रसभापक्षानें या बाबतींत धरलेला आग्रह एकदर राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं कराव्या लागणाऱ्या भावी लढ्याच्या दृष्टीने स्वीकारलेला होता हे समजत नाहीं, अथवा हे समजले तरी ते त्याना पटत नाहीं, ते ब्रिटिश या बाबतीत राष्ट्रसभेनें मुस्लीम लीगपक्षाशीं तडजोड करणें इष्ट होते असे म्हणत असतात. हिंदु-स्थानातीलहि कांहीं लोकाना हे म्हणणे योग्य वाटतें आणि प्रांतिक स्वराज्य मिळाल्या-नंतर जीं मंत्रिमंडळे राष्ट्रसभेने बनविलीं, त्यांत मुस्लीम लीगपक्षाचे कांहीं सभासद घेऊन तडजोड केली असती, तर पाकिस्तानची निर्मिती आणि त्या निर्मितीमुळें घडून आलेल्या दुर्दैवी घटना घडल्या नसत्या, असेंहि काहीं लोक म्हणतात पण असे म्हणणाऱ्याची संख्या फारच अल्प आहे कारण प्रातिक स्वराज्य दोन-अडीच वर्षें चालविल्यानतर राष्ट्रसभेनें महायुद्ध सुरू होताच आपल्या हातची ही सत्ता सोडून दिली आणि संपूर्ण स्वातन्त्र्याच्या प्राप्तीसाठीं १९४० पासून १९४७ पर्यंत निरानिराळ्या क्रांतिकारक चळवळी केल्या तसेच सत्ताधारी ब्रिटिश सरकारशीं निरनिराळ्या वेळी तिने राष्ट्राच्या वतीनें शिष्टाई करण्याचे अनेक प्रयत्न केले. या सर्व क्रांतिकारक चळवळींत राष्ट्रसभा एकसूत्रता ठेवू शकली आणि आपल्या सर्व शिष्टाईत तिला एक-मुखीपणा ठेवता आला यामुळेंच सपूर्ण स्वातंत्र्य मिळविणें तिला शक्य झाले याच्या उलट, जर तिनें आपल्या मन्त्रिमडळात मुस्लीम लीगपक्षाचे सभासद घेतले असते, तर तिला आपल्या चळवळींत एकसूत्रता ठेवता आली नसती व आपल्या शिष्टाईत एकमुखीपणा राखता आला नसता अशा परिस्थितीत या सर्व देशातील ब्रिटिशांचें सार्वभौमत्व बिनशर्त नष्ट करण्यात राष्ट्रसभापक्ष यशस्वीहि होऊं शकला नसता. अर्थात् त्याला जर हे करतां आलें नसते, तर आज जो आधुनिक भारत स्वतंत्र राष्ट्र म्हणून निर्माण झाला आहे, तोहि निर्माण होऊ शकला नसता

राष्ट्रसभा ही सर्व धर्मांच्या व सर्व जातींच्या लोकांची राजकीय संस्था आहे हें ब्रीद

सोडून देऊन तिला आपण केवळ हिंदूंचे प्रतिनिधी आहोत असे मान्य करण्यास भाग पाडावें हा जसा मुस्लीम लीगपक्षाचा प्रयत्न होता, तसाच तो सत्ताधारी ब्रिटिश मुत्सद्द्याचाहि डाव होता. जर राष्ट्रसभेनें मुस्लीम लीगपक्षाशीं या बाबतींत तडजोड केली असती, तर तिने निर्माण करून सगोपन केलेलें धर्मभेदातीत आधुनिक राष्ट्रीयत्व नष्ट झाले असते मुसलमानांप्रमाणें हिंदूंचेंहि राष्ट्रीयत्व धर्मविशिष्ट बनवावे, असे म्हणणारा हिंदुराष्ट्रवाद हिंदुमहासभापक्षानें निर्माण करण्याचा प्रयत्न चालविला होता जर हिंदुसमाज या हिंदुराष्ट्रवादाच्या भोवऱ्यांत गुरफटून गेला असता, तर हिंदु व मुसलमान या दोन धर्मांच्या आधारे दोन राष्ट्रीय भावना निर्माण होऊन त्या एकमेकांशीं लढू लागल्या असत्या या लढ्यापासून या दोघांचेहि किंवा या दोघांपैकीं कोणाहि एकाचे हित न होता सत्ताधारी ब्रिटिशांचेच हित झाले असते, आणि जर बाह्य घटनांमुळे व जागतिक महायुद्धामुळे हिंदुस्थानांतून ब्रिटिश सत्ता नष्ट झाली असती, तर हे दोन धर्मवेडे राष्ट्रीय पथ एकमेकाची कत्तल करीत तिसऱ्याच कोणाचे तरी पुन्हां गुलाम झाले असते! म्हणून यांपैकीं कोणचाहि अविवेकी मार्ग न स्वीकारिता राष्ट्रसभेनें विवेकपूर्वक स्वीकारलेली आपली धर्मभेदातीत राष्ट्रीयत्वाची भावना अखेरपर्यंत प्रज्वलित ठेविली आणि ब्रिटिश सत्तेचें सार्वभौमत्व नष्ट करून त्या ठिकाणी भारतीय जनतेचे सार्वभौमत्व स्थापन केलें याच आपल्या अखिल भारतीय धर्मभेदातीत राष्ट्रीय संघटनेच्या जोरावर भारताची घटनापरिषद् यशस्वी करून त्या पक्षाने या देशात एक लोकशाही संयुक्त राज्य अथवा सघराज्य आज निर्माण केले आहे या सर्व भावी घटना घडविण्याची शक्ति राष्ट्रसभेने मुस्लीम लीगशी तड-जोड करण्याच्या मोहाला बळी न पडून सुरक्षित ठेविली. याच्या उलट, मुस्लीम लीगच्या अविवेकी राजकारणानें स्वतःचा तोल सोडून देऊन तिच्या प्रतिकाराच्या मिषाने स्वतः हिंदुराष्ट्रवादाचाहि स्वीकार करण्याचा मोह तिनें कधीहि धरला नाहीं कारण हिंदु व मुसलमान ही दोन राष्ट्रें आहेत हा सिद्धात असत्यावर आधारलेला असून त्या दोघांचें व सर्व धर्मांचें एकराष्ट्र बनविण्यानेंच भारताला उज्ज्वल काल प्राप्त होईल आणि आधुनिक जगांत सुसंस्कृत राष्ट्र म्हणून मिरवितां येईल, ही राष्ट्रसभेची निष्ठा आधुनिक भारताच्या सर्व भवितव्याचें खबीर अधिष्ठान आहे जरी आज भारत आणि पाकिस्तान अशी दोन राज्ये या देशात निर्माण झाली आहेत, तरी भारताने आपल्या राष्ट्रवादाचें हे अधिष्ठान सोडलेले नाही पाकिस्तानलाहि आपल्या धर्मविशिष्ट राष्ट्र-भावनेचा आज ना उद्यां त्याग केल्यावांचून आधुनिक जगात सुसंस्कृत व पुरोगामी राज्य म्हणून स्थान मिळणार नाहीं आणि तेथील मुसलमान जनतेचेहि खरे हित होणार नाहीं, अशीच भारताची निष्ठा आहे

## राष्ट्रभावना आणि सर्वसंग्राहक वृत्ति

राष्ट्रभावनेचें स्वरूप एक प्रकारच्या शेजारधर्माचें असतें. एका गावांत, एका

देशांत अथवा एका राष्ट्रांत राहणारे सर्व लोक एकमेकांसंबधींची आत्मीयत्वाची जाणीव बाळगीत असतात ही आत्मीयत्वाची अथवा आपुलकीची जाणीव नेहमींच जाग्रत स्वरूपांत नसली, तरी ती मानवांच्या व्यवहारांवर कळत अगर नकळत आपला प्रभाव पाडीत असते एकाच गांवांत राहणारे लोक कितीहि जातिभेदांनीं व धर्मभेदांनी विभागलेले असले, तरी त्याना परस्परांशीं व्यवहार करतांना एक भाषा वापरावी लागते, अनेक प्रकाराचे व्यवहार एकमेकाशीं करावे लागतात आणि त्या व्यवहारांतून एक-मेकासबंधीची आपुलकीची जाणीव निर्माण होत असते एक भाषा बोलणारे व एका देशात राहणारे लोक दूरदेशी एकमेकास भेटले, म्हणजे त्याची ही आपुलकीची जाणीव साहजिकपणेच प्रकट होते. अशा प्रकारें ज्याच्यामध्ये हजारो वर्षे शेजारीपणा निर्माण झालेला आहे, त्यांच्यांत एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण होऊ शकली, तर त्यात आश्चर्य नाही शेजारधर्मांतून निर्माण होणाऱ्या आपुलकीच्या जाणिवेला धर्माचें, इति-हासाचे आणि भाषेचें अधिष्ठान लाभून ही राष्ट्रीयत्वाची भावना प्रबल बनत जाते धर्म, इतिहास आणि भाषा यासंबधीच्या अभिमानाचा राष्ट्राभिमानाशी मिलाफ झाल्यानें राष्ट्रीय भावना अधिक प्रखर व प्रभावी बनते परतु हिंदुस्थानामध्ये अनेक धर्मांचे व अनेक भाषाचे लोक एकत्र नांदत असल्यामुळे त्यांच्या इतिहासात धर्म-भेदातीत राजकारण शेकडो वर्षे चालत आलेलें आहे असे असले तरी धर्म, इतिहास आणि भाषा याचा आधार घेऊन हिदू आणि मुसलमान याच्या अतःकरणांत द्विराष्ट्र-वाद निर्माण करणें व त्याना एकमेकाविरुद्ध लढण्यास प्रवृत्त करणे, ही गोष्टहि फारशी अवघड नव्हती. पण अशा अनेक धर्मांच्या व अनेक भाषाच्या लोकाचा शेंकडो किंवा हजारों वर्षांचा इतिहास म्हणजे त्यानीं केलेल्या घनघोर लढायाचाच किंवा त्यांच्या राज्यकर्त्यांनीं एकमेकाविरुद्ध केलेल्या कारस्थानाचाच तेवढा इतिहास, असा संकुचित अर्थ करतां येणार नाहीं. ज्या देशांत शेंकडो वर्षे दोन धर्मांचे कोट्यवधि लोक एकत्र नादत आलेले आहेत आणि ज्या देशांतील लक्षावधि खेड्यापैकी प्रत्येक खेड्यात या दोन धर्मांचीं अनेक कुटुबे शतकानुशतके आपापले व्यवहार करीत आहेत, त्या देशाचा इतिहास म्हणजे त्यांतील खेड्यापाड्यात पसरलेल्या सामान्य जनतेच्या दैनंदिन व्यवहाराचाच इतिहास होय. इतका व्यापक अर्थ लक्षात घेऊन इतिहासाची कल्पना आकलन केली पाहिजे या खडतुल्य प्रचड राष्ट्रात धर्मभावनेला सर्वसंग्राहक व सर्वसहिष्णु अशा विश्वात्मक प्रेमभावनेचे स्वरूप प्राप्त झालेलें आहे या राष्ट्रांत होऊन गेलेल्या अनेक धर्मात्म्यांनीं व साधुसतानी सर्व धर्माच्या एकत्वाचा संदेश आपल्या चारित्र्याच्या उज्ज्वल उदाहरणाने जनतेच्या अतःकरणावर ठसविलेला आहे या देशांत निर्माण झालेलें धार्मिक व आध्यात्मिक तत्त्वज्ञान सर्व प्रकारच्या विचारस्वातंत्र्याला अवकाश देणारे आहे. तसेच शुद्ध तत्त्वनिष्ठेनें सत्यसंशोधन करणाऱ्या तत्त्वज्ञांनीं शोधून काढलेल्या प्रत्येक मताबद्दल व संप्रदायाबद्दल योग्य तो आदर ठेवून त्यांतील सत्यांश आत्मसात् करण्याचा उपदेश करणारें असे ते आहे.

हजारो वर्षांच्या सुसंस्कृत जीवनाचा इतिहास या राष्ट्राला आठवत असल्यामुळें त्याला अनेक प्रकारच्या आचार-विचाराचा व जीवनप्रयोगांचा परिचय झालेला आहे. जीवनांतील सत्य हे कोणत्याहि एका वैचारिक सिद्धांतांत किंवा संप्रदायात सामावलेलें नसतें, ही वृत्ति दीर्घकालीन इतिहासाच्या आठवणीमुळे येथील लोकांच्या अंतःकरणात मुरलेली आहे अनेक प्रकारचे धर्मविचार या देशांत निर्माण होऊन ते परिस्थित्यनुसार बदलत आलेले आहेत व त्यांचे रूपांतर झाले आहे किंवा ते नष्टहि झालेले आहेत अशा प्रकारच्या दीर्घकालीन इतिहासाच्या या राष्ट्रात विशिष्ट धार्मिक संप्रदायाच्या आग्रहावर राष्ट्रभावना निर्माण करणे अथवा तसा प्रयत्न करणें ही एक त्याच्या इतिहासाकडे पाहण्याची संकुचित दृष्टीच होय. आधुनिक भारतांत निर्माण झालेलें राष्ट्रीयत्व अशा प्रकारच्या संकुचित धर्माभिमानावर किंवा इतिहासाच्या संकुचित कल्पनेवर किंवा भाषेच्या संकुचित अभिमानावर उभारलेलें नाहीं विशिष्ट धर्म किंवा विशिष्ट भाषा हीच श्रेष्ठ अथवा परमेश्वराला अधिक प्रिय आहे, किंवा त्यांचा स्वीकार केल्यावाचून मानवाला आपलें जीवन सफल करतां येणार नाहीं, किंवा मुक्ति अथवा आत्मिक शांति लाभण्यासाठीं विशिष्ट धर्माचा किंवा भाषेचा स्वीकार करणें अवश्य आहे, असल्या संकुचित धर्मविचाराच्या पलीकडे गेलेले संतमहात्मे या देशांत झालेले आहेत त्याच्या अंतःकरणांतील विश्वात्मक प्रेमभावनेच्या धर्माचा आधार घेऊनच आधुनिक भारताची निर्मिती त्याच्या पुढाऱ्यांनीं केली आहे

या सहिष्णु व सर्वव्यापक मानवधर्माच्या अथवा सर्वधर्मसमत्वाच्या आधारावर राजकारण करणारे श्रेष्ठ राज्यकर्तेहि या देशांत होऊन गेलेले आहेत. अशोक, अकबर किंवा शिवाजी यांचे राजकारण, हेच भारतीय इतिहासांतील भावी पिढ्यांना मार्गदर्शक असे राजकारण होणार आहे औरंगजेबासारख्या संकुचित धर्मनिष्ठार्चे माथेफिरू राजकारण हा भारतीय इतिहासांतील अनुकरणीय भाग समजला जाणार नाहीं इतिहासांत चांगल्याप्रमाणे वाईटहि गोष्टी झालेल्या आहेत त्यांपैकीं चांगल्याचा अभिमान धरून आणि वाईटांचा त्याग करून आपल्या स्वतंत्र बुद्धीनें आपले कर्तव्य ठरविणें आणि आपल्या परिस्थितीस अनुरूप असा पुढील पिढ्यांना प्रेरणा देणारा नवा इतिहास घडविणें, हा इतिहासाच्या अध्ययनाचा खरा उपयोग आहे मानवाचा इतिहास प्रत्येक पिढीने नवा घडवावयाचा असतो आणि तो घडवीत असता पूर्वीं होऊन गेलेल्या श्रेष्ठ पुरुषाच्या चारित्र्यापासून स्फूर्ति घ्यावयाची असते, आणि त्यांनीं केलेल्या चुका टाळून त्यांनीं केलेल्या सत्कृत्यांचें अनुकरण करावयाचे असते त्यांचीं अपुरीं राहिलेलीं ध्येयें पुरी करावयाचीं आणि त्यांच्या दृष्टिपथांत न आलेलीं अशीं नवनवीं ध्येये आकलन करून त्यांना मूर्त स्वरूप देण्यासाठी झटावयाचे. या दृष्टीनें पूर्वीच्या इतिहासाचा उपयोग करूनच आधुनिक भारतीयांनीं आपल्या व्यापक राष्ट्रीयत्वाचा विकास केलेला आहे, ही गोष्ट कोणाहि विचारवंतास सहज दिसून येईल.

## द्विराष्ट्रवादी भ्रामक दृष्टि

परतु एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीने पाहणाऱ्यांची ही वृत्ति ज्यांना पटत नाहीं, त्यांना हिंदु व मुसलमान हीं दोन राष्ट्रे दिसतात. या दोन राष्ट्रांचा लढा हा त्यांपैकीं कोणाचा तरी एकाचा पूर्ण पाडाव झाल्यावांचून मिटणे शक्य नाहीं किंवा त्यांना एका देशांत नांदावयाचें तर त्यापैकीं कोणाचे तरी एकाचें प्रभुत्व दुसऱ्याने मान्य केल्यावाचून अथवा तसें करण्यास दुसऱ्याला भाग पाडल्यावाचून त्या दोन धर्मांच्या लोकांना एकत्र नांदता येणार नाही. अशी दृष्टि हे द्विराष्ट्रवादी लोक स्वीकारीत असतात या भेददृष्टीने विचार केल्यामुळे त्यांना हिंदू व मुसलमान धर्म या दोघांनाहि समान मान देऊन वागणाऱ्याची वृत्ति आकलनहि करता येत नाहीं मुस्लीम लीगनें जेव्हां या भेददृष्टीचा आश्रय केला आणि द्विराष्ट्रवादाचा स्वीकार करून ती राष्ट्रसभेच्या धोरणावर टीका करू लागली, तेव्हा तिला राष्ट्रसभेच्या प्रत्येक धोरणात हिंदूंचें वर्चस्व स्थापन करण्याचा हेतु दिसू लागला अशाच भेददृष्टीने हिंदुराष्ट्रवादीहि जेव्हा राष्ट्रसभेच्या राजकीय, सामाजिक व सास्कृतिक व्यवहाराचे निरीक्षण करू लागले, तेव्हा त्यांना राष्ट्रसभेच्या सर्व व्यवहारात मुसलमानधार्जिणेपणा दिसू लागला हिंदी किंवा हिंदुस्थानी ही राष्ट्रभाषा बनविण्याचा प्रश्न निघाला कीं ती सस्कृतप्रचुर असावी किंवा तिच्यांत अरबी व फारशी शब्दाचे मिश्रण असावे, याबद्दल तटे होऊ लागले राष्ट्रभाषा देवनागरीत लिहावी कीं उर्दू लिपींत लिहावी असा वाद सुरू झाला हिंदूचे धर्मग्रथ सस्कृतात आहेत आणि मुसलमानाचे धर्मग्रथ अरबी भाषेत आहेत एकाचीं धर्मस्थानें व यात्रेचीं ठिकाणे हिंदुस्थानात आहेत, तर दुसऱ्याचीं अरबस्तानात आहेत हिंदुधर्मांच्या लोकानींच या देशात हजारों वर्षे राज्ये व साम्राज्यें केलीं आहेत असे हिंदूनीं म्हटले, तर इग्रज येण्यापूर्वी सातशें वर्षे दिल्लीचें राज्य मुसलमान सुलतानाच्या किंवा बादशहांच्याच हाती होते, असें मुसलमानानी म्हणावे ! लोकशाही राज्यपद्धति आणि प्रजेचा स्वयनिर्णय यांचा पुरस्कार करण्यात हिंदूचे सार्वभौमत्व स्थापन करणे असाच राष्ट्रसभेचा कावा आहे, असा आरोप मुस्लीम लीग करीत असे, आणि मुसलमान हिंदूचें सार्वभौमत्व स्वीकारून केव्हाहि राहणार नाहींत, असा प्रचार करून लोकशाहीला व स्वयंनिर्णयाला विरोध करी. अशा प्रकारें राजकीय सत्तेच्या विभागणीसाठीं निर्माण झालेला हा वाद धर्म, भाषा, इतिहास आणि संस्कृति या सर्व क्षेत्रात पसरत चालला. एका बाजूनें मुसलमानाचा मुस्लीम-राष्ट्रवाद आणि दुसऱ्या बाजूने हिंदुसभेचा हिंदुराष्ट्रवाद हे दोघेहि राष्ट्रसभेच्या राजकारणाविरुद्ध जनतेला चेतविण्याचा प्रयत्न करू लागले. परतु ब्रिटिश सत्ताधारी आपलें धोरण जितकें मुस्लीम-राष्ट्रवादाला अनुकूल ठेवीत असत, तितके तें हिंदुराष्ट्रवादाला अनुकूल ठेवीत नसत यामुळे हिंदुराष्ट्रवाद केव्हांच फारसा फैलावू शकला नाहीं. परंतु मुसलमान राष्ट्रवाद मात्र मुसलमानांच्या अज्ञानी जनतेंत जोरानें फैलावू लागला. हिंदुस्थानचें एकराज्य झालें तर

त्याची घटना कशाहि प्रकारची बनविली तरी आणि प्रांतिक राज्यांना व अल्पसंख्याक मुसल्मानांना कांहीहि संरक्षक सवलती दिल्या तरी येथील मध्य सरकार बहुसंख्य हिंदु समाजालाच जबाबदार राहणार व तसें होणें आपणांस अहितावह आहे, अशी भीति या समाजांत पसरविणें सोपें होतें. तसेंच त्या समाजाचा धार्मिक व ऐतिहासिक अहंकार जागृत करून पाकिस्तान स्थापन झाल्यावांचून आपण स्वस्थ बसणार नाहीं, ही वृत्ति निर्माण करणेंहि कठिण नव्हतें. त्यांतून या भेदमूलक वृत्तीचा प्रसार बंद करण्यास राजसत्ता केव्हांच पुढे आली नाहीं, तर उलट तिनें त्या वृत्तीस अप्रत्यक्ष व प्रत्यक्ष प्रोत्साहनच दिलें.

## युद्धकालीन राजकारणें

इ. स. १९३९ च्या सप्टेंबर महिन्यात दुसरें महायुद्ध सुरू झालें आणि व्हाइसरॉय लॉर्ड लिन्लिथगो यांनीं कोणत्याहि हिंदी पुढाऱ्यांना अथवा अकरा प्रांतांत राज्य करीत असणाऱ्या हिंदी मंत्रिमंडळांपैकीं कोणालाहि न विचारतां हिंदुस्थान महायुद्धांत ब्रिटिशांच्या बाजूनें सामील झाला असें जाहीर केलें. ही गोष्ट हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या व स्वयनिर्णयाच्या हक्कांना हरताळ फांसणारी होती. हे ओळखून राष्ट्रसभेनें ब्रिटिशांनीं स्वतःचे युद्धहेतू जाहीर करावेत अशी मागणी केली. लोकशाही आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य याचें संरक्षण असेच युद्धाचे हेतू असतील, तर हिंदुस्थानचें स्वातंत्र्य ताबडतोब मान्य करावें आणि युद्ध चालू असेपर्यंतच्या काळांत नवी राज्यघटना अस्तित्वात आणणें शक्य नसलें तरी मध्य सरकारांत हिंदी पुढाऱ्यांचें मंत्रिमंडळ स्थापन करून त्याच्या सल्ल्यानें राज्य चालवूं लागावें, अशा मागण्या केल्या. या मागण्या मान्य करून हिंदुस्थानला स्वातंत्र्य व स्वयनिर्णय हे हक्क देण्याची ब्रिटिश मुत्सद्द्यांची या वेळीं तयारी नव्हती. त्यांनीं यापैकीं कोणतीहि मागणी मान्य केली नाहीं. तेव्हां राष्ट्रसभेच्या मंत्रिमंडळांनीं १९३९ च्या नोव्हेंबर महिन्यात आठहि प्रांतांतून राजीनामे दिले आणि या महायुद्धात आपण भाग घेणार नाहीं आणि हिंदी जनतेनेंहि भाग घेऊं नये असा प्रचार सुरू केला. या वेळेपासून ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं मुस्लीम लीगपक्षाला जवळ करावयाचें, मुसलमान समाजाच्या संमतीवांचून कोणतीहि राज्यघटना हिंदुस्थानांत स्थापन करण्यास मान्यता द्यावयाची नाहीं, आणि हिंदी संस्थानिकांनीं आपल्या बाजूस रहावें म्हणून त्यांना न दुखवितां चुचकारावयाचें, असें धोरण उघडपणें स्वीकारलें. याचा परिणाम मुसलमान समाजांतील निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांवर असा झाला, कीं आपण जर आपापसांतले मतभेद मिटवून एका मुस्लीम लीगपक्षांत दाखल झालों, तर आपण मागूं ती घटना ब्रिटिशांकडून आपणांस मिळूं शकेल असें त्यांना वाटूं लागलें. यामुळें पंजाब प्रांतांतील सर सिकंदर हयातखान, बंगाल प्रांतांतील फजलुल हक आणि आसाम प्रांतांतील सादुल्ला या पंतप्रधानांचे पक्ष मुस्लीम लीगपक्षांत सामील झाले. १९४० च्या फेब्रुवारींत कायदेआझम जीना यांनीं

पाकिस्तानचें ध्येय उघडपणें मान्य केलें आणि त्याच्या पुढील महिन्यांत कराची येथें मुस्लीम लीग अधिवेशनांत त्याला पक्षाची अधिकृत मान्यता मिळवून दिली. अशा रीतीनें ज्या पंजाब व बंगाल प्रांतात मुस्लीम लीगपक्षाला फारसें स्थान नव्हते, त्या प्रांतांतील मुसलमान पुढारी पाकिस्तानचे प्रचारक बनले तरीहि पंजाब व बगाल या प्रांतांत जवळजवळ निम्मी लोकसख्या व लोकसभेतील निम्मे सभासद मुसलमानेतर असल्यामुळे त्याना आपल्या प्रांतिक मंत्रिमंडळांवर हे पाकिस्तानचें ध्येय लादतां येणें शक्य झाले नाहीं. असें असले तरी याहि प्रांतात मुसलमानी समाजांत ते ध्येय फैलावूं लागलें. पण पाकिस्तान स्थापन करावयाचे झाल्यास त्यात कोणता भाग जाईल, त्याच्या सीमा कशा ठरविल्या जातील, अथवा त्या सीमांच्या बाहेर जो हिंदुस्थान राहील त्यांत मुसलमानाची केवढी सख्या राहील आणि तिचे भवितव्य काय होईल, यांसबधीं कोणताहि स्पष्ट खुलासा करण्यास हे मुसलमान पुढारी तयार नव्हते असा स्पष्ट खुलासा त्यानीं केला असता, तर हिंदुस्थानातील फारच थोडा भाग पाकिस्तानात समाविष्ट करता येईल आणि त्या पाकिस्तानी भागात जितके मुसलमान जातील, जवळजवळ तितकेच मुसलमान हिंदुस्थानच्या इतर भागात राहतील, हे त्याना मान्य करावें लागलें असते तसेच पजाब व बगाल हे दोन प्रांत संपूर्णतः पाकिस्तानात जाणें केव्हाहि शक्य नाहीं हेहि त्याना कळून आले असते शिवाय, हे पाकिस्तान सलग एकराज्य बनणारे नसून त्याचा निम्मा भाग हिंदुस्थानच्या वायव्य कोपऱ्यांत आणि निम्मा भाग हिंदुस्थानच्या पूर्वेस अशा दोन विभागात हे पाकिस्तानचे राज्य विभागलें जाणार आहे, याहि गोष्टीचा खुलासा त्यांना जनतेपुढे करावा लागला असता. अशा मूर्त स्वरूपांत पाकिस्तानची योजना लोकांपुढे मांडण्यांत आली असती व त्यावर मुसलमान समाजाचें खरे मत अजमावण्यात आले असते, तरी त्या समाजांतील विचारी पुढाऱ्यांनीं व जनतेने ती योजना धिक्कारलीच असती पाकिस्तानच्या ध्येयाचा प्रसार करणारे जीनाप्रभृति पुढारी ही गोष्ट जाणून होते आणि ते आपली पाकिस्तानची योजना अखेरपर्यंत जनतेपुढें किंवा जगापुढे मूर्त स्वरूपात ठेवण्यास धजावले नाहींत. पुढे १९४७ च्या जून महिन्यांत जेव्हां जीनानीं आज स्थापन झालेल्या पाकिस्तानच्या राज्याला मान्यता दिली, त्याच्यापूर्वी फारच थोडे दिवसपर्यंत ते पाकिस्तानांत सबंध पंजाब, सबंध बगाल आणि सबध आसाम याचा समावेश झालाच पाहिजे, इतकेच नाहीं, तर वायव्येकडील पाकिस्तानी भाग आणि पूर्वेकडील पाकिस्तानी भाग या दोहोना जोडणारा एक भूप्रदेशाचा पट्टा हिंदुस्थानांतून जाण्यायेण्यासाठीं म्हणून आपणांस मोकळा असला पाहिजे, अशीहि मागणी ते करीत होते. त्याचप्रमाणे इतर अनेक मुसलमान पुढारी पाकिस्तानच्या व इस्लामी राज्याच्या अनेक योजना मुसलमान जनतेपुढें आकर्षक स्वरूपांत मांडीत होते. वायव्य भागात पंजाब, सरहद्द, सिंध, बलुचिस्तान, काश्मीर एवढें एक मोठे पाकिस्तानी राज्य, पूर्व भागांत बगाल आणि आसाम या दोन प्रांतांचें बगस्तान आणि त्याशिवाय दक्षिणेंत

निजामच्या राज्याच्या मर्यादा वाढवून पूर्व समुद्र व पश्चिम समुद्र यांच्या किनाऱ्यां- पर्यंत पसरलेले एक उस्मानीस्तान ( निजामच्या आद्य पूर्वजाचें नांव उस्मान, या- वरून उस्मानीस्तान ) अशीं तीन इस्लामी राज्ये हिंदुस्थानांत स्थापन करतां येतील, अशी योजना कांहींनीं लोकांपुढे मांडली होती. कांहीं झालें तरी संस्थानिकांना स्वातंत्र्य व स्वयनिर्णय हे हक्क ब्रिटिशांनीं देण्याचे मान्य केल्यामुळे दक्षिणेंतील निजामचे राज्य हे नेहमींच मुसलमानी राज्य म्हणून ठेवतां येईल, अशी बहुतेक मुसलमान पुढाऱ्यांची शेवटपर्यंत खात्री होती अशा रीतीनें हिंदुस्थानच्या तीन विभागांत तीन मोठीं मुसलमानी राज्ये स्थापन करून त्याचे ऐक्य साधिल्यास सर्व हिंदुस्थान हे एक इस्लामी संस्कृतीचें प्रचंड राष्ट्र पुढेंमागें बनविता येईल, अशीहि भावना मुसलमान समाजांत पाकिस्तानच्या ध्येयामुळे फैलावूं लागली होती या सर्व केवळ अवास्तव कल्पना आहेत, त्यांना मूर्त स्वरूप देणें शक्य नाहीं, याचे स्पष्टीकरण ब्रिटिशांची इच्छा असती तर ताबडतोब अधिकृत रीतीने त्यांना करता आलें असतें. पण असे स्पष्टीकरण करण्याची त्यांची इच्छा नव्हती आणि पाकिस्तानच्या ध्येयाचा प्रचार करून आपला राजकीय पक्ष प्रबळ बनवू पाहणाऱ्या मुसलमान पुढाऱ्यांचीहि तशी इच्छा नव्हती यामुळे मुस्लीम लीगपक्षानें पाकिस्तानची प्रत्यक्ष स्थापना होई- पर्यंतच्या अवधींत आपल्या ध्येयाचें मूर्त स्वरूप मुसलमानी जनतेपुढें किंवा जगापुढें केव्हाहि अधिकृतपणे मांडिलें नाहीं. तें मूर्त स्वरूप न दिसल्यानें पाकिस्तानचें ध्येय आणि घोषणा यांच्या नादाने मुसलमान जनता हळूहळू पछाडली जाऊन भारून जाऊ लागली

१९४० सालच्या ऑगस्ट महिन्यांत लॉर्ड लिन्लिथगो यांनीं ज्या राज्यघटने- ला हिंदुस्थानांतील अल्पसंख्याक जमातींचा विरोध आहे, आणि ज्या राज्यघटनेंत संस्थानिकांशीं ब्रिटिशांनी केलेले तह व त्यांतून निर्माण होणारे हक्क हे सुरक्षित राहणार नाहीत, अशा कोणत्याहि राज्यघटनेस ब्रिटन मान्यता देणार नाहीं, अशी स्पष्ट घोषणा केली. या वेळेपासून १९४२ च्या प्रारंभीं सर स्टॅफर्ड क्रिप्स् यांच्या- बरोबर हिंदुस्थानला युद्धोत्तरकाळांत स्वातंत्र्य व स्वयनिर्णय हीं तत्त्वे लागू करण्याची योजना ब्रिटिश सरकारने पाठविली तोंपर्यंत गेलेल्या सुमारे दीड वर्षाच्या काळांत, ब्रिटिश सरकार खरोखर पाकिस्तानचे ध्येय मान्य करील किंवा न करील याबद्दल, आणि ते मान्य केले तरी ते कोणत्या स्वरूपांत व कोणत्या तत्त्वाखालीं मान्य करील याबद्दल, हिंदी जनतेत साशंकता नांदत होती

## क्रिप्स्-योजना

१९४२ च्या मार्च महिन्यांत सर स्टॅफर्ड क्रिप्स् हे ब्रिटिश मंत्रिमंडळाच्या वतीनें हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची व स्वयंनिर्णयाची एक योजना घेऊन ता २३ रोजीं दिल्लीस दाखल झाले. मध्यंतरीच्या काळांत हिंदी राष्ट्रसभेने इ. स. १९४० च्या अखेरीपासून तों

१९४१ च्या अखेरीपर्यंत युद्धविरोधी प्रचार करण्यासाठीं वैयक्तिक सत्याग्रहाची मोहीम सुरू केली होती, ती यापूर्वी राष्ट्रसभेने स्थगित केली होती. या मोहिमेंत सुमारें पचवीस हजार सत्याग्रही युद्धविरोधी प्रचाराचा सत्याग्रह करून तुरुंगांत जाऊन आलेले होते यामुळें हिंदी जनता युद्धकालांत येथील सरकारला पाठिंबा देण्यास मनापासून उत्सुक नाहीं, ही गोष्ट ब्रिटिश लोकांच्या दोस्त राष्ट्रांना व विशेषतः अमेरिका व चीन यांना पटू लागली होती. याच वेळीं जपानने महायुद्धांत जर्मनीच्या बाजूनें प्रवेश करून पूर्व आशियांतील डच साम्राज्यावर हल्ला चढविला होता सिंगापूर घेऊन ब्रह्मदेशाच्या रोखानें जपानी सेना चाल करू लागली होती. अशा वेळीं हिंदुस्थानला सतुष्ट करून महायुद्धांत हिंदी जनतेचें साहाय्य मिळवावे, अशी चीन व अमेरिका येथील सरकारांची ब्रिटिशांना सल्ला होती. या सर्व अतर्गत व बाह्य दडपणामुळें ब्रिटिशांनीं क्रिप्स्-योजना हिंदुस्थानकडे पाठविली होती. या योजनेत हिंदुस्थानला स्वातंत्र्य आणि स्वयंनिर्णय हीं तत्त्वें आपण कशीं लागू करूं, याचे स्पष्टीकरण ब्रिटिशांनीं केलें होते. तें स्पष्टीकरण करतांना त्यांनीं हिंदी राष्ट्रसभा, मुस्लीम लीग आणि हिंदी संस्थानिक यांपैकीं कोणासहि न दुखवितां सर्वांनाच सतुष्ट करण्याचा प्रयत्न केल्याचा निदान देखावा तरी केला होता. मात्र तसे करताना युद्ध चालू असेपर्यंत हिंदुस्थान सरकारची सर्व सत्ता ब्रिटिश सरकारच्याच हाती राहील, अशीहि तरतूद केली होती

या क्रिप्स्-योजनेचे सामान्य स्वरूप असे सागता येईल, कीं तिनें हिंदुस्थानातील प्रत्येक प्रांताला व प्रत्येक संस्थानिकाला स्वातंत्र्याचें व स्वयंनिर्णयाचें तत्त्व लावण्याचा प्रयत्न केला होता यामुळे हिंदुस्थानातील प्रत्येक प्रात स्वतत्र होऊन हिंदुस्थानांत अनेक सयुक्त राज्यें स्थापन करण्याचे अथवा ब्रिटिश साम्राज्यांतच कायम राहाण्याचें स्वातंत्र्य प्रत्येक प्रांताला उपभोगता आलें असतें ! अर्थात् हिंदुस्थानचे दोनच नव्हे, तर अनेक तुकडे या प्रांतिक व संस्थानी स्वयनिर्णयाच्या तत्त्वानुसार होण्याचा धोका होता शिवाय, संस्थानाना स्वयनिर्णयाचे तत्त्व लागू करतांना तेथील प्रजाजनांना तो हक्क दिलेला नसून तो स्वयनिर्णयाचा हक्क संस्थानांतील अनियत्रित राजांना किंवा सुलतानानाच दिलेला होता स्वयनिर्णयाच्या व लोकशाहीच्या तत्त्वाचें तें एक विडंबनच होतें. पण वास्तववादी कायदेशीर दृष्टीच्या युक्तिवादानें त्याचेंहि समर्थन ब्रिटिश मुत्सद्दी करीत होते. पण या स्वातंत्र्याच्या व स्वयनिर्णयाच्या हक्कांची बजावणी महायुद्ध संपून गेल्यानतरच व्हावयाची होती. एवढ्या भावी आश्वासनावर हिंदी जनतेनें, तिच्यांतील सर्व पक्षांनीं आणि संस्थानिकांसुद्धां सर्व हितसबधीयांनीं महायुद्धांत ब्रिटिशांना साहाय्य करावे आणि ब्रिटिश व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळांत सामील व्हावें, अशी ब्रिटिशांची अपेक्षा होती पण या कार्यकारी मंडळांत सामील होणाऱ्या लोकनायकांना मंत्रिमंडळाचा दर्जा व सत्ता देण्यास ब्रिटिश मुत्सद्दी तयार नव्हते. जर या मुद्द्यावर ब्रिटिशांनीं राष्ट्रसभेचें म्हणणें मान्य केलें असते, तर हिंदुस्थान सरकार आपल्या हाती घेऊन युद्ध चालविण्याची जबाबदारी घेण्यास

राष्ट्रसभा त्या वेळींहि तयार झाली असती. जर आपल्या पक्षाच्या हातीं राज्यकारभार देण्यास मुस्लीम लीगपक्षाचा विरोध असेल, तर मुस्लीम लीगपक्षानें आपलें मंत्रि-मंडळ बनवावें, पण ते मत्रिमडळ येथील प्रजेच्या प्रतिनिधिसभेला ( असेब्लींतील लोकनियुक्त सभासदांना ) जबाबदार असावें, अशी राष्ट्रसभेच्या नेत्यानीं मागणी केली होती ही मागणी मान्य करण्यास सर स्टॅफर्ड क्रिप्स् किंवा ब्रिटिश सरकार तयार नव्हतें. याच मुद्द्यावर अखेरीस ही योजना राष्ट्रसभेनें फेटाळून लाविली यानंतर मुस्लीम लीग, हिंदुमहासभा इत्यादि इतर पक्षांनींहि ही योजना आपापल्या दृष्टीनें विचार करून अमान्य केली. अशा रीतीनें जी योजना हिंदुस्थानांतील सर्व पक्षांना पसत पडेल अशा अपेक्षेनें घाडण्यात आली होती, ती हिंदुस्थानातील कोणत्याहि पक्षाला पसंत न पडल्याने ही शिष्टाई अयशस्वी झाल्याचें जाहीर करून सर स्टॅफर्ड क्रिप्स् हे परत गेले.

क्रिप्स्-शिष्टाई अयशस्वी झाली तरी तिच्यामुळें दोन-तीन गोष्टी स्पष्ट झाल्या पहिली गोष्ट म्हणजे हिंदुस्थानच्या संपूर्ण स्वातंत्र्याचा व स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य करणें ब्रिटिशाना भाग आहे, हें त्यानीं ही योजना सर्व पक्षांच्या वतीने हिदुस्थानला सादर केल्यामुळें जगजाहीर झालें हिंदुस्थानांतील जे पक्ष सपूर्ण स्वातंत्र्य आणि स्वयनिर्णय व घटनापरिषद् या हक्कांच्या प्राप्तीसाठीं राष्ट्रसभेने सुरू केलेलें राजकारण अव्यवहार्य अथवा अवास्तव आहे, या तत्त्वाना ब्रिटिश लोक केव्हाहि मान्यता देणार नाहींत असे म्हणत होते, त्या पक्षाना आपली चूक दिसून आली यानंतर हिंदुस्थाना-तील सर्वच पक्षानीं स्वातंत्र्य, स्वयनिर्णय व घटनापरिषद् या तत्त्वांना आपल्या राजकारणांत स्थान दिलें त्याचप्रमाणें ब्रिटिश लोक या देशांतून आपली सत्ता काढून घेतांना कांहीं झालें तरी हिंदुस्थानांत एकराज्य निर्माण झालेंच पाहिजे असा आग्रह धरतील व त्याचे तुकडे पाडू इच्छिणाऱ्या शक्तींना आपला पाठिंबा देणार नाहींत अशी ज्याची श्रद्धा होती, त्याच्या त्या श्रद्धेला क्रिप्स्-योजनेने चांगलाच धक्का दिला. कारण या योजनेमुळें हिदुस्थानचे दोनच खंड नव्हे, तर अनेक खड पडणे शक्य होतें. त्यानंतर ब्रिटिश लोक हे लोकशाहीचे पुरस्कर्ते असल्यानें व स्वयंनिर्णयाचे तत्त्व त्यांनीं मान्य केलें असल्यामुळे हिंदी संस्थानाना हीं तत्त्वें लागू करताना हा स्वयं-निर्णयाचा हक्क संस्थानी प्रजेला ते देतील व या प्रजाजनांचें भवितव्य केवळ तेथें राज्य करणाऱ्या सस्थानिकाच्या हातीं देणार नाहीत अशी जी कल्पना होती, तीहि चुकीची ठरली प्रातांना स्वयनिर्णयाचें तत्त्व लागू करून त्यानी मुसलमान जमातीला खूष करण्याचे धोरण स्वीकारलें, तरी त्यांत लोकशाहीचें तत्त्व झुगारून दिलेलें नव्हतें परंतु सस्थानिकांच्या बाबतींत त्यांनीं जें धोरण स्वीकारलें होते, त्यास कोणताहि नैतिक आधार मिळण्याजोगा नव्हता. शिवाय, या योजनेमुळें आणखी एक गोष्ट स्पष्ट झाली, कीं युद्ध चालू असेपर्यंत हिंदुस्थानांतील मध्य सरकारांत कोणताहि महत्त्वाचा बदल करण्यास ब्रिटिश लोक तयार नव्हते. व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळांत सर्व हिंदी

लोकांची नेमणूक करण्यास ते तयार होते, परंतु या हिंदी लोकांना जबाबदार मंत्रि-मंडळाची सत्ता देण्यास त्यांची तयारी नव्हती अर्थात् तसें करण्यास आपला सत्ता-भिलाष हा आड येत नसून मुस्लीम लीगचा विरोध हा आड येत आहे, असा युक्तिवाद ते करीत असत यावर राष्ट्रसभापक्षानें अशी तोड सुचविली होती, कीं मुस्लीम लीगपक्षानें स्वतः मंत्रिमंडळ बनविण्यास पुढें यावें, पण तसेंहि करण्यास मुस्लीम लीग किंवा ब्रिटिश मुत्सद्दी तयार नव्हते अशा रीतीनें हिंदी राजकारणाला येथून पुढें एक नवें स्वरूप प्राप्त होऊं लागले

क्रिप्स्-योजना फेटाळून लाविली, तरी स्वातंत्र्य आणि स्वयंनिर्णय या हक्कांसाठीं भांडणाऱ्या राष्ट्रसभेला या वेळीं एक गोष्ट स्पष्ट करावी लागली ती म्हणजे हिंदुस्थान अखंड रहावा हेंच आपले ध्येय व धोरण असले, तरी या राष्ट्रांपैकी जर एकाद्या विभागातील लोकानीं आपली या राज्यात राहण्याची इच्छा नाहीं असे अधिकृत रीतीने सिद्ध केलें, तर त्याना त्यात राहण्याची सक्ती करावी असे आपले धोरण नाही हे तत्त्व राजकीय स्वयंनिर्णयाच्या दृष्टीनें मान्य करणे व ते जाहीर करणे राष्ट्रसभेला या वेळी योग्य वाटले व तिच्या कार्यकारी मंडळानें तसें आपले मत सर स्टॅफर्ड क्रिप्स् यांना कळविलें. पण त्याचा त्या वेळी कोणताच उपयोग झाला नाही स्वातंत्र्यप्राप्तीच्या दृष्टीनें शिष्टाईचा मार्ग अशा प्रकारें खुटला गेल्यामुळे राष्ट्रसभेला आता पुन्हा स्वातंत्र्याचा सत्याग्रहसंग्राम सुरू करण्यावाचून गत्यंतर उरलें नाहीं

## १९४२चा लढा व नंतर

१९४२ च्या ऑगस्ट महिन्यात आठ तारखेस म गांधींच्या नेतृत्वाखाली संपूर्ण स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठी अखेरचा सत्याग्रहसंग्राम करण्याची मोहीम राष्ट्रसभेनें जाहीर केली त्याच रात्रीं म गांधीप्रभृति राष्ट्रसभेचे सर्व नेते आणि हजारो अनुयायी व कार्यकर्ते यांना ब्रिटिश सरकारनें एकदम गिरफदार केले, आणि ही स्वातंत्र्याची चळवळ आपल्या सर्व सामर्थ्यानें दडपून टाकण्यास वाटेल ती साधने उपयोगांत आणण्यास सुरुवात केली ब्रिटिशांच्या या अनन्वित अत्याचारी धोरणामुळें सर्व देशभर प्रचंड आंदोलन निर्माण झाले, आणि हिंदुस्थानच्या खेड्यापाड्यातून, कोनाकोपऱ्यांतून 'चले जाव'ची घोषणा दुमदुमू लागली

यानंतर १९४४ च्या मे महिन्यात म गांधी सुटून येईपर्यंत हिंदुस्थानात निरनिराळ्या प्रकारें आंदोलनाच्या अनेक लाटा उठतच होत्या त्यांचा विचार पुढील प्रकरणांत करण्यांत येईल १९४४ साली म. गांधी यांची प्रकृति बिघडल्यामुळें ब्रिटिश सरकारनें त्यांना सोडलें आणि ते सुटल्यानंतर त्यांना थोडे बरे वाटू लागतांच त्यांनीं पुन्हां ब्रिटिश सरकार व मुस्लीम लीग यांच्याशीं बोलणीं करून स्वातंत्र्याचा प्रश्न शिष्टाईनें सोडवितां येईल काय, हे पाहण्याचा प्रयत्न सुरू केला १९४४ च्या सप्टेंबर महिन्यात त्यांनीं कायदेआझम जीना यांची गांठ घेतली व सुमारें पधरा दिवस

त्यांच्याशीं तडजोडीचें बोलणे करून पाहिले पण जीना हे कोणत्याहि प्रकारची तड-जोड करण्यास तयारच नव्हते हिंदु व मुसलमान हीं दोन राष्ट्रें आहेत हा सिद्धांत मान्य केल्यावांचून कोणतीहि तडजोड करण्यास आपण तयार नाहीं, हाच त्याचा पहिला आग्रह होता याच्या उलट, हा सिद्धांत मान्य करण्यास आपण केव्हाच तयार होणार नाहीं, कारण हिंदुस्थानात दोन राज्ये केलीं, तरी त्यांपैकीं प्रत्येक राज्यांत हिंदू व मुसलमान लोक राहणारच व म्हणून हिंदू व मुसलमान यांचें एकराष्ट्र बनविण्याचें ध्येय मान्य केल्यावाचून कोणताहि प्रश्न सुटणार नाही, असा गाधीजीचा आग्रह होता यानतर दुसरा प्रश्न हिंदुस्थानांत दोन राज्ये निर्माण केलीं तरी परराष्ट्रीय राजकारण, सरक्षण आणि दळणवळण अशा काही बाबतीत त्या दोघानीं संयुक्त योजना केली पाहिजे आणि परस्परानीं आपल्या राज्यातील अल्पसख्याकाना त्याच्या हक्करक्षणाची हमी मिळावी अशीहि काही बधनकारक योजना आखून घेतली पाहिजे, असा गांधीजींचा आग्रह होता, तर असे कोणतेहि बंधन स्वीकारण्यास जीना तयार नव्हते हिंदुस्थानची दोन राज्यात विभागणी करण्याचा प्रश्न ब्रिटिश सरकारने आपली सत्ता या देशातून काढून घेतल्यानंतर दोघानीं घटनापरिषद् भरवून सोडवावा असे गाधीजी म्हणत होते, तर एकदा ब्रिटिश सत्ता गेल्यावर मुसलमानाना स्वातत्र्य मिळणार नाहीं म्हणून ब्रिटिशानी जाण्यापूर्वीच ही विभागणी केली पाहिजे, असा जीनांचा आग्रह होता हिंदुस्थानांतील सहा प्रात, आहेत तसे, सर्वच्या सर्व पाकिस्तानात सामील झाले पाहिजेत असा जीनाचा आग्रह होता, तर पजाब, बंगाल व आसाम या प्रातांतील सर्व विभाग पाकिस्तानला केव्हाहि मिळणें शक्य नाहीं असें गाधीजी प्रतिपादीत होते ही विभागणी करतांना जे विभाग अलग करावयाचे तेथील सर्व धर्माच्या लोकाचें मत घेण्यात आले पाहिजे असे गाधीजींचें मत होतें, तर असे सार्वमत घेण्याचेच कारण नाही व घेतले तरी ते केवळ मुसलमानाचेच घ्यावे असा जीनाचा आग्रह होता दोघाच्या भूमिकेत इतके अतर असल्यामुळे या बोलण्यातून कोणतीहि तडजोड निघाली नाहीं व निघणे शक्य नव्हतें. परतु या बोलण्याचा एक फायदा असा झाला, कीं दोघानाहि आपापले म्हणणें एकमेकापुढे लेखनिविष्ट करून मांडावे लागलें व त्यामुळें पाकिस्तानची मागणी म्हणजे काय आहे, याची स्पष्ट कल्पना जीनांच्या तोंडून अधिकृतपणे जगापुढें येऊं शकली हिंदुस्थानांतील पजाब, बगाल व आसाम हे तीन प्रात मुस्लीम लीगला जसेच्या तसे हवे होते ही मागणी अगदीं असमंजसपणाची आहे, हे सर्वांनाच दिसून आले. पुढे जेव्हां ब्रिटिशानी आपल्या हातची सत्ता सोडून देण्याचे ठरविलें, तेव्हां त्यानी या बाबतींत मुस्लीम लीगचा दुराग्रह आपण चालू देणार नाहीं असें जेव्हां त्यांना स्पष्ट बजावलें, तेव्हांच हा दुराग्रह सोडून देणें मुस्लीम लीगला भाग पडले ! आणि निम्मा पजाब, निम्मा बंगाल आणि एक जिल्हा वगळून सर्व आसाम हे भाग भारताला देण्यास मुस्लीम लीग तयार झाली. पण हे भाग द्यावे लागल्यामुळें पाकिस्तान मोडकेतोडके व लुळेंपांगळे झालें,

असें त्यांना म्हणावे लागलें आणि पाकिस्तानच्या ध्येयानें वेडावलेल्या मुसलमान जनतेचे डोळे फार उशीरां का होईना, पण खाडकन् उघडले! पाकिस्तानच्या सरहद्दीं-संबधींचा हा निर्णय जर ब्रिटिश लोकांनीं ती चळवळ सुरू झाली त्याच वेळीं दिला असता, तर मुसलमान जनतेने त्या ध्येयाचा स्वीकार केलाच नसता, आणि पाकिस्तानचा जन्महि झाला नसता त्यामुळे लक्षावधि हिंदु-मुसलमान कुटुबावर आपल्या घरादारातून निर्वासित होऊन देशांतर करण्याचा व सर्वस्वाची राखरागोळी करून घेण्याचा जो दुर्धर प्रसग ओढवला, तोहि ओढवला नसता. पण ब्रिटिशांना जोपर्यंत या देशांत आपली सत्ता टिकवून ठेवावयाची होती, तोपर्यंत असा न्याय-निर्णय देणें त्यांच्या हिताचें नव्हते जेव्हा त्यानीं येथून निघून जाण्याचें निश्चितपणें ठरविलें आणि त्या जाण्याची तारीखहि ठरवून दिली, तेव्हाच त्यांनी हा निर्णय दिला व तो निर्णय दिल्यानतर दीड महिन्याच्या आंत त्याची अम्मलबजावणी करून ते आपल्या देशास चालते झाले.

## लॉर्ड वेव्हेल यांची शिष्टाई

१९४४ च्या अखेरीस जीना-गांधी यांची मुलाखत अयशस्वी झाल्यानतर १९४५ सालीं व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल यांनी राष्ट्रसभेचे कार्यकारी मडळ बंदिवासांतून मुक्त केलें आणि मुस्लीम लीग आणि राष्ट्रसभा या दोघाच्या सहकार्याने हगामी मध्य सरकार स्थापन करता येतें की काय, ते पाहण्यासाठीं प्रयत्न सुरू केले त्यासाठीं दोनहि पक्षाच्या पुढाऱ्याना सिमला येथें एकत्र बोलावून हगामी राष्ट्रीय सरकार स्थापन करण्याची आपली योजना त्यांच्यापुढे माडिली या योजनेचें स्थूल स्वरूप असें होते, कीं व्हाइसरॉयच्या कार्यकारी मडळात दोनहि पक्षाच्या सभासदानीं समाविष्ट व्हावें याला व्हाइसरॉयचें कार्यकारी मडळ असे नांव असले, तरी सामान्यतः व्हाइसरॉय त्याच्या सल्ल्याविरुद्ध आपला नकारहक्क (Power of Veto) वापरणार नाहीं आणि त्याना जबाबदार मंत्रिमंडळाप्रमाणें आपले कार्य चालवू देईल. यांत हिदू आणि मुसलमान सभासद संख्येनें सारखेच राहतील व इतर दोन-तीन लोक त्यांच्या-विरहित घेतले जातील ही तडजोडीची योजना हंगामी राष्ट्रीय सरकार म्हणून मान्य करण्यास राष्ट्रसभापक्ष तयार होता. परतु आपल्या पक्षातर्फे मन्त्र्यांचीं जी नांवे सुचविण्यांत येतील त्यात हिंदूप्रमाणे मुसलमानहि मंत्री नेमण्याचा हक्क आपणांस असला पाहिजे, असा राष्ट्रसभापक्षाचा आग्रह होता. कारण राष्ट्रसभापक्ष किंवा ती संस्था ही केवळ हिंदूंची सस्था नसून तिच्यामध्ये सर्व जातींचे व धर्मांचे लोक आहेत व तिचे त्या वेळचे अध्यक्षहि मौलाना आझाद हे मुसलमान पुढारीच होते. जीना यांना ही गोष्ट मान्य करावयाची नव्हती. सर्व मुसलमान मंत्री आपल्याच पक्षाने नेमले पाहिजेत व राष्ट्रसभापक्षाच्या सभासदात एकहि मुसलमान असतां कामा नये, असा हट्ट त्यांनीं धरला. हा त्यांचा दुराग्रह आहे असें सांगण्यास ब्रिटिश सरकार तयार

नव्हते. राष्ट्रसभा आपला मुसलमान मंत्री नेमण्याचा हक्क सोडून देऊन मुसलमानांचें प्रतिनिधित्व आपल्या पक्षास करतां येणार नाहीं, ही गोष्ट मान्य करण्यास तयार नव्हती त्यामुळे अखेरीस ही योजना अयशस्वी झाली

यानतर १९४५ च्या अखेरीस मध्यवर्ती असेंब्लीची निवडणूक झाली ही असेंब्ली १९१९ च्या कायद्यानें बनविलेल्या नियमानुसारच बनलेली होती. हिच्यांत एकदर लोकनियुक्त सभासद १०२ होते त्याशिवाय सरकारनियुक्त ४० होते लोकनियुक्त सभासदापैकीं ५७ जागा सर्वसामान्य मतदारानीं निवडल्या होत्या. त्या सर्व राष्ट्रसभापक्षानें हस्तगत केल्या. ३० जागा मुसलमानानीं विभक्त मतदारसघातर्फे निवडावयाच्या होत्या, त्या सर्व मुस्लीम लीगपक्षानें काबीज केल्या प्रातिक लोकसभांच्या निवडणुकी १९४६ च्या प्रारभी झाल्या त्यात सरहद्द प्रांतांतील सर्वसामान्य मतदारांच्या सर्व जागांप्रमाणे मुसलमान मतदाराच्या राखीव जागातहि राष्ट्रसभापक्षानें बहुमत मिळविलें पजाबमध्येहि मुस्लीम लीगपक्षाला आपले मत्रिमडळ बनविता येईल, इतके बहुमत मिळू शकले नाहीं बंगाल व सिंधमध्ये युरोपियन सभासदांच्या पाठिंब्यामुळेच मुस्लीम लीगपक्षाला कसे तरी आपले मत्रिमडळ बनवितां आलें. यानतर पुन्हां तडजोड करण्याचे प्रयत्न ब्रिटिश सरकारने हिंदुस्थानात आपले तीन मंत्री शिष्टाई करण्यासाठीं पाठवून सुरू केले

## त्रिमंत्री-योजना व नवी शिष्टाई

ता २४ मार्च १९४६ रोजी सर स्टॅफर्ड क्रिप्स्, आल्बर्ट अलेक्झँडर, लॉर्ड पॅथिक लॉरेन्स असे तीन ब्रिटिश मत्री हिदुस्थानात येऊन दाखल झाले मध्यतरीच्या काळांत ब्रिटिश पार्लमेंटच्या नव्या निवडणुकी होऊन त्यांत चर्चिलच्या टोरी पक्षाचा पूर्ण पाडाव झाला होता इंग्लडांत ॲटली यांचे मत्रिमडळ अधिकारावर आलेलें होते या समाजवादी पक्षाचे ब्रिटिश पार्लमेंटात दोन-तृतीयाश बहुमत झालेले होते यामुळे समाजवादी पक्षाच्या मंत्रिमडळाला हिदुस्थानचा प्रश्न आपल्या इच्छेप्रमाणें सोडविणे शक्य झालें होतें. जे तीन ब्रिटिश मंत्री हिंदुस्थानात आले, त्यानीं मुस्लीम लीग व राष्ट्रसभा या दोनहि पक्षाच्या पुढाऱ्यांच्या मुलाखती घेऊन त्यांच्यांत काहीं समेट घडविता येतो काय ते पाहिलें. पण असा समेट घडणें अशक्य आहे हें दिसून आल्यावर त्यांनीं स्वतःची म्हणून एक योजना दोघांपुढे माडिली व ती जाहीर केली

या योजनेचें स्वरूप थोडक्यांत पुढीलप्रमाणें होते : हिंदुस्थानची राज्यघटना बनवितांना तिचे तीन मजले बनविण्यांत यावे यापैकी हिदुस्थान सरकार हा तिसरा मजला. त्याच्याकडे संरक्षण, परराष्ट्रीय राजकारण आणि दळणवळण एवढींच कामें असावींत. प्रांतिक राज्ये व सस्थानी राज्यें याचा तळमजला त्यांनीं वरिष्ठ सरकारला आपल्या इच्छेनें दिलेल्या अधिकाराव्यतिरिक्त सर्व अवशिष्ट अधिकार त्यांच्याकडे राहावेत. या प्रांतिक राज्यांचे तीन गट अ, ब आणि क असे करावेत. ब गटांत

सरहद्द, पंजाब आणि सिंध हे तीन प्रांत आणि क गटात बंगाल आणि आसाम असे दोन प्रांत आणि अ गटांत इतर प्रांत असे तीन गट कल्पून घटनापरिषद् भरवावी घटनापरिषदेत प्रत्येक प्रांतातून लोकसंख्येच्या प्रमाणांत प्रतिनिधी यावेत, पण या प्रतिनिधींचे अ, ब आणि क असे तीन विभाग पाडून त्यांनीं आपापल्या प्रांतांचें एक संयुक्त राज्य (प्रांतिक राज्य व मध्य सरकार याच्या दरम्यान) निर्माण करावयाचे किंवा नाहीं याचा निर्णय घ्यावा अशी तीन संयुक्त गटराज्यें निर्माण करण्याचें ठरल्यास तो गटराज्यांचा मजला, हा मधला मजला समजावा. अशा प्रकारें सर्वांच्या तळाशीं प्रांतिक व संस्थानी राज्याचा तळमजला, त्याच्यावर गटराज्यांचा दुसरा मजला आणि सर्वांत वर हिंदुस्थान सरकारचा तिसरा मजला, अशी राज्यघटनेची तीन मजली इमारत उभारल्यास मुस्लीम लीगला हवे असणारे पाकिस्तान ब आणि क गटात निर्माण होईल, पण त्याच्यावर हिंदुस्थान सरकार संरक्षण, परराष्ट्रीय राजकारण आणि दळणवळण एवढीं तरी कामे करण्यासाठीं एक राहील यामुळे ज्याचें ध्येय अखंड हिंदुस्थान हे होतें त्याचेंहि समाधान होईल, अशी ही योजना मांडणाऱ्याची कल्पना होती व काहीं दिवस राष्ट्रसभापक्ष व मुस्लीम लीग या दोघानीं या योजनेला मान्यताहि दिली होती. पण तिच्या तपशिलात शिरल्यावर पुन्हा तीव्र मतभेद झाले

या मतभेदांचे मुख्य कारण असे होते, की आसाम प्रांत हा बंगाल प्रांताबरोबर एक गटराज्य निर्माण करून राहण्यास तयार नव्हता कारण आसामांतील बहुसंख्या हिंदूंची असून आसाम व बंगाल या दोघांचें गटराज्य निर्माण झाल्यास त्यात मुसलमानाची बहुसंख्या होणार होती. बंगाल प्रांत हा आसामपेक्षा लोकसंख्येनें पुष्कळ मोठा असल्याने त्याचे प्रतिनिधी आसामपेक्षा घटनापरिषदेत अधिक संख्येने येणार व त्या संख्याबलाच्या जोरावर आसाम प्रांतावर गटराज्यात सामील होण्याची सक्ती होणार, अशी आसामी प्रतिनिधींना भीति वाटत होती त्याचप्रमाणें पंजाबातील शीख लोक ब गटात जाण्यास केव्हाहि तयार नव्हते या आसामी प्रतिनिधींना व शीख प्रतिनिधींना गटराज्ये मुळींच नको होतीं त्याच्यावर होणारी ही सक्ती स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाविरुद्ध आहे, या दृष्टीने म. गांधींनी त्यांना गटात अथवा घटनापरिषदेच्या विभागांत भाग न घेण्याचा सल्ला दिला. शिवाय, घटनापरिषदेचे तीन विभाग केले तरी त्या प्रत्येक विभागाचे मत प्रांतवारीने न घेता संकलित रूपानेंच घेतलें पाहिजे, असा मुस्लीम लीगचा आग्रह होता. प्रांतवारीनें मत घेतल्यास आसाम प्रांत गटांत जाणार नाहीं व पंजाब प्रांतहि गट बनविण्याच्या विरुद्ध जाऊन गटराज्यें निर्माण होणें कठिण होतें. उलट, संकलित मत घेतल्यास गटराज्यें निर्माण होणार व त्यांत पंजाबी शीख आणि आसाम यांना सक्तीनें लोटले जाणार या पेंचाच्या खडकावर अखेरीस ही त्रिमंत्री-योजनाहि फुटून गेली या योजनेप्रमाणे घटनापरिषद् १९४६ च्या डिसेंबर महिन्यांत ९ तारखेस भरली होती पण तिच्यावर मुस्लीम लीगनें बहिष्कार घातला होता. या परिषदेसाठीं निरनिराळ्या प्रांतांतून राष्ट्रसभापक्षाने

२०५ प्रतिनिधी निवडलेले असून मुस्लीम लीगने ७३ प्रतिनिधी निवडले होते राष्ट्र-सभापक्षानें आपल्या पक्षाबाहेरचेहि लोक घटनापरिषदेंत निवडले होते त्यांत हिंदु-महासभेचे अध्यक्ष, डिप्रेस्ड क्लासचे अध्यक्ष, ॲंग्लो-इंडियन असोसिएशनचे अध्यक्ष, अखिल भारतीय महिला परिषदेचे अध्यक्ष व इतरहि काही आपल्या पक्षाबाहेरचे सभासद निवडले होते पण मुस्लीम लीग पक्षाने या घटनापरिषदेशीं पूर्णतः असहकार सुरू केला.

## हंगामी राष्ट्रीय सरकार व मुस्लीम लीगचे अत्याचार

मध्यतरींच्या काळात व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल यांनीं एक हंगामी राष्ट्रीय सर-कारहि स्थापन केले होते. या हगामी राष्ट्रीय सरकारात आपापले मत्री नेमण्याची विनति त्यानी प नेहरू व जीना या दोघांना केली होती मात्र त्यांच्यावर अशी शर्त घातली होती, की कोणत्याहि पक्षाने दुसऱ्या पक्षाने मन्यांची जी नावें सुचविली असतील त्यांना हरकत घेता कामा नये याचा उघड अर्थ असा होता, की जर राष्ट्र-सभापक्षाने आपल्या पक्षाच्या मन्यात मुसलमान मन्याचे नांव सुचविले, तर त्याला मुस्लीम लीगपक्ष हरकत घेऊ शकणार नाही ही शर्त जीनाना पसत नव्हती व त्यानीं या हगामी राष्ट्रीय मत्रिमंडळात जाण्याचें नाकारले तरीहि व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल यानीं ता २ सप्टेंबर रोजी पडित नेहरू यांना बोलावून त्यांनी सुचविलेल्या मन्याचीं नावे स्वीकारून हगामी राष्ट्रीय मंत्रिमडळ स्थापन केलें या राष्ट्रीय मत्रि-मडळाचे पतप्रधान पडित नेहरू हे स्वतः बनले आणि आपण स्वतत्र राष्ट्राचे प्रति-निधि म्हणून राज्य करू आणि आंतरराष्ट्रीय परिषदातहि स्वतत्र राष्ट्र म्हणूनच भाग घेत जाऊ, असें हिंदुस्थान सरकारच्या रेडिओवरून त्यांनी जगजाहीर केलें त्याच वेळी आपले परराष्ट्रीय धोरण हेहि स्वतत्र बुद्धीनेच आपण चालवूं, असेहि त्यानी जाहीर केले अशा रीतीने हिंदुस्थानांतील पहिले राष्ट्रीय मत्रिमंडळ पहिले राष्ट्रीय पतप्रधान पडित नेहरू याच्या नेतृत्वाखाली २ सप्टेंबर १९४६ पासूनच सुरू झाले तथापि घटना-परिषदेचे भवितव्य मात्र अद्यापि ठरावयाचेंच होते

२ सप्टेंबर १९४६ रोजी ब्रिटिश सरकारने राष्ट्रसभेच्या हाती मध्य मत्रिमडळ देऊन त्याला हगामी सरकारचे अधिकार दिले हे पाहून मुस्लीम लीगपक्षाचा क्रोध आणि मत्सर याना सीमाच राहिली नाहीं ! त्या दिवशीं त्यांनीं आपली प्रत्यक्ष प्रति-काराची चळवळ सुरू केली ही प्रत्यक्ष प्रतिकाराची चळवळ म्हणजे रानटीपणाची कमाल होती ! बगाल प्रातांत मुस्लीम लीगपक्षाचे मत्रिमडळ अधिकारावर होते. या मंत्रिमडळाच्या आश्रयाखालीं मुसलमान गुंडानी शस्त्रे घेऊन त्या प्रातात हिंदूंच्या कत्तली सुरू केल्या कलकत्यात या कत्तलींचा वणवा प्रथम पेटला आणि नतर तो पूर्व बंगालांत नौखाली वगैरे विभागांत जेथे हिंदू लोक अत्यंत अल्पसख्य होते तेथे पसरला. हिंदूवर सशस्त्र गुडांचे हल्ले आणि जाळपोळी सुरू झाल्या पूर्व बंगालांतील

हे असहाय झालेले हिंदू तेथून धांवत कलकत्त्याकडे, पश्चिम बंगालकडे आणि बिहार-कडे लोढ्यालोंढ्यांनीं येऊं लागले. त्यांच्या त्या करुण कहाण्यानी बेभान झालेले बिहारांतील हिंदू लोकहि आपल्या विभागांतील मुसलमानाच्या कत्तली करूं लागले ! अशा रीतीनें बंगाल आणि बिहार या प्रांतांत अमानुष कत्तलींचा वणवा मुस्लीम लीगच्या या प्रत्यक्ष प्रतिकाराच्या चळवळीनें पेटला गेला

ही अमानुष कत्तलीची आग शात करण्याचा प्रयत्न म गाधी करूं लागले. आपल्या अमर्याद अहिंसानिष्ठेने शांतता स्थापन करण्यासाठीं पूर्व बगालातील खेड्यापाड्यांतून ते एकसारखे पायी भटकूं लागले पंडित जवाहरलाल नेहरू व त्यांचें हंगामी राष्ट्रीय सरकार प्रातात लष्कर पाठवून त्याच्या जोरावर शाततारक्षण करण्याची भाषा बोलूं लागले पण या वेळीं या हगामी राष्ट्रीय सरकारात मुस्लीम लीगनें आपले पांच मंत्री पाठविलेले होते आणि सैन्याचा सर्व ताबा लॉर्ड वेव्हेल याच्याच हातीं होता यामुळे आपल्या इच्छेप्रमाणें लष्करी हालचाली करण्याचे स्वातंत्र्य राष्ट्रीय मंत्रिमडळास नव्हतें मुस्लीम लीगचें कारस्थान हिंदुस्थानातील कांहीं लष्करी व मुलकी युरोपियन अधिकारी आणि काहीं प्रतिगामी सस्थानिक याच्या पाठिंब्यानें फार भयंकर स्वरूप घेऊं लागले होते. अशा रीतीनें हा वणवा एकसारखा पेटत जाऊन देशाची राखरांगोळी होण्याचा धोका दिसूं लागला तो धोका टाळ-ण्याच्या बुद्धीनें हिंदुस्थानची विभागणी करण्यास मान्यता द्यावी, मात्र अशी विभागणी झाली तरी पाकिस्तानात पूर्व पजाब व पश्चिम बंगाल आणि आसाम हे जाणार नाहींत एवढी खबरदारी घ्यावी, असा विचार राष्ट्रसभेच्या नेत्यानीं केला मात्र या विभागणीला मान्यता देण्यापूर्वी ब्रिटिशानीं आपण या देशांतील सर्व विभागातून आपली सत्ता काढून घेऊ असे जाहीर करून आपली जाण्याची तारीख नक्की ठरविली पाहिजे, असा राष्ट्रसभेच्या नेत्यांचा आग्रह होता

## ब्रिटिश-प्रयाणाचा मुहूर्त ठरला !

अखेरीस २० फेब्रुवारी १९४७ रोजीं ब्रिटिश सरकारने असे जाहीर केलें, कीं काहीं झाले तरी आम्ही जून इ स १९४८ च्या पूर्वी या देशातील सर्व भागातून आपले सार्वभौमत्व निश्चित काढून घेणार यानंतर आपल्या साम्राज्याची ही शेवटची आवराआवर करण्यासाठीं त्यानीं लॉर्ड वेव्हेल याना परत बोलावून त्याच्या जागीं लॉर्ड मौंट बॅटन याची व्हाइसरॉय म्हणून नेमणूक केली याप्रमाणे लॉर्ड मौंट बॅटन येथें येऊन दाखल झाले त्या वेळेपासून ब्रिटिश साम्राज्याच्या हिंदुस्थानातील आवराआवरीची सुरुवात झाली देशाची विभागणी करण्याचे तत्त्व मान्य केलें, तरी त्याबरोबर बंगाल व पंजाब या प्रातांचीहि विभागणी झालीच पाहिजे, या प्रश्नावर आतां सर्व भर पडूं लागला

३० एप्रिल १९४७ रोजीं जीनांनीं एक जाहीर पत्रक काढून कांहीं झाले तरी

आपण पंजाब व बंगाल यांची फाळणी होऊं देणार नाहीं, कारण ते सांस्कृतिक दृष्टीनें अविभाज्य आहेत असें आपले मत जाहीर केले. पण हा त्यांचा आग्रह त्याना सोडावा लागला. कारण त्यांच्या आग्रहामागचें सर्व बळ ब्रिटिशांचा पाठिंबा हेंच होतें. ब्रिटिशांनीं आतां हा देश सोडून जाण्याचें नक्की ठरविले होतें. त्याची अखेरची तारीखहि त्यांनीं जाहीर केली होती. पण लॉर्ड मौंट बॅटन हे हिंदुस्थानांत आल्यानतर येथील जी भीषण परिस्थिति त्यानीं अवलोकन केली, त्यावरून यापुढे एक वर्षसुद्धा या देशांत आपलें राज्य टिकवून ठेवणें इष्ट नाहीं असा त्यांनीं निर्णय घेतला १९४८ च्या जूनपर्यंत सत्तासंक्रमणाचा काळ न लांबवितां १९४७ च्या ऑगस्टमध्येच आपली सत्ता सोडून देण्यास आपली तयारी असल्याचे त्यानी हिंदी पुढाऱ्यांना सांगितलें, आणि हिंदी पुढाऱ्यांनीं ३ जून १९४७ रोजीं पाकिस्तान व भारत अशीं दोन राज्ये हिंदुस्थानांत स्थापन करण्याची योजना मान्य केली मात्र मागें सांगितल्याप्रमाणें मुस्लीम लीगला निम्मा पजाब, निम्मा बंगाल आणि आसाम या प्रातावरील पाकिस्तानच्या हक्काची मागणी सोडून देणें भाग पडले यानंतर १५ ऑगस्ट १९४७ रोजीं लॉर्ड मौंट बॅटन यानीं हिंदुस्थानात पाकिस्तान आणि भारत अशीं दोन स्वतत्र राज्ये स्थापन केलीं व त्याना सर्व सत्ता देऊन त्यानीं आपापल्या घटनापरिषदांमार्फत आपापली राज्यघटना वाटेल तशी बनवावी आणि वाटल्यास ब्रिटिशांच्या राष्ट्रकुलांत रहावे अगर राहूं नये, हा त्याचा हक्क आहे, असे जाहीर केले यापूर्वी थोडे दिवस ब्रिटिश पार्लमेंटने 'हिंदी स्वातंत्र्याचा कायदा' (इंडियन इंडिपेंडन्स ॲक्ट) या नावाचा कायदा करून हिंदुस्थानवरील ब्रिटिश पार्लमेंटचे सार्वभौमत्व नष्ट झालें, असे जाहीर केलें

## ब्रिटिश-घोषणा व मुस्लीम-राजकारण

२० फेब्रुवारी १९४७ रोजीं ब्रिटिश सरकारने असे जाहीर केलें होते, की जून १९४८ अखेरच्या आंत आम्ही या देशावरील आपली सत्ता सोडून देऊ पण ही सत्ता आपण कोणाच्या हाती देणार यासंबधीं त्यांनीं या वेळी कांहीहि निश्चित असें जाहीर केलेलें नव्हतें. त्यानीं एवढेच म्हटलें होते कीं (१) या देशांतील मध्य सरकारची सत्ता ब्रिटिश हिंदुस्थानांतील कोणत्या तरी स्वरूपाच्या मध्य सरकारच्या हातीं आम्ही देऊ, किंवा (२) काही विभागांतील सार्वभौम सत्ता आम्ही त्या विभागांत असणाऱ्या आजच्या प्रांतिक सरकारानाहि देऊं, अथवा (३) त्या वेळीं जी व्यवस्था करणें जास्तींत जास्त लोकहिताचे आहे असे त्या वेळच्या परिस्थितीत वाटेल तशी व्यवस्था करू आणि आम्ही आमच्या हातची सत्ता सोडून देऊं या जाहीरनाम्याचा परिणाम मुसलमानप्रधान प्रांतांत असा झाला, कीं आपण जर आपली शक्ति सघटित करून आपले प्रांत मध्य सरकारच्या हुकमतीखाली जाऊ द्यावयाचे नाहींत असा निर्धार केला, तर ब्रिटिश सरकार आपल्या प्रांतांना मध्य सरकारच्या हवाली न करतां त्यांचे प्रभुत्व आपल्या हातीं देईल. अशा रीतीनें आपण आपणांस हवे असलेलें

पाकिस्तान मिळवूं शकू या बुद्धीनें पंजाब प्रांतांतील हिंदू आणि शीख यांच्या हातांत असलेलें युनियनिस्ट पक्षाचें मंत्रिमंडळ आणि सरहद्द प्रांतांतील कॉंग्रेस पक्षाचें मंत्रि-मंडळ यांना हुसकून लावण्यासाठीं त्या प्रांतांत पाकिस्तानवाल्यांनीं दंगे करण्यास प्रारंभ केला. हे दंगे मंत्रिमंडळांस शमन करतां येत नाहींत या सबबीवर तेथील गव्हर्नरांनीं मंत्रिमंडळें बरखास्त करून तेथें आपली राजवट सुरू केली. या दंगलीला आणि गव्हर्नरांच्या या सुलतानशाहीला प्रेरणा ब्रिटिश सरकारच्या वरील जाहीरनाम्यापासूनच मिळालेली होती. मध्य सरकारच्या व्यवस्थेसंबंधीं अशा प्रकारची संदिग्ध घोषणा करणें म्हणजे त्या वेळच्या परिस्थितींत देशांत अदाधुंदी माजविण्यास मुस्लीम लीगला प्रोत्साहन देण्यासारखेंच होतें. याच्या उलट, ब्रिटिश सरकारनें असें निःसंदिग्धपणें जाहीर करावयास हवें होतें, कीं जर हिंदुस्थानांत सर्व पक्षांच्या एकमतानें मध्य सरकारची घटना बनविण्याचा प्रश्न सुटूं शकला नाहीं, तर हिंदुस्थानांत जो राजकीय पक्ष अधिकांत अधिक संघटित आणि बहुमतवाला आहे, त्या राष्ट्रसभापक्षाच्या हातीं आम्ही मध्य सरकार देऊं. म्हणजे त्या पक्षाचें मंत्रिमंडळ बनवून सैन्यासुद्धां सर्व खात्यांची जबाबदारी आम्ही त्याच्या हातीं देऊन आमचें सार्वभौमत्व विसर्जन करूं. जर ब्रिटिशांनीं असें जाहीर केलें असतें, तर इतर पक्षांनीं राष्ट्रसभापक्षाशीं ऐक्य करून मध्य सरकारची घटना एकमतानें बनविण्यास साहाय्य केलें असतें. पण असें करण्याची त्यांची इच्छा नव्हती आणि त्यांची इच्छा नसतांना त्यांना तसें करण्यास भाग पाडणेंहि त्या परिस्थितींत कोणास शक्य नव्हतें.*

*या बाबतींत इंग्लंडांतील सुप्रसिद्ध समाजवादी ग्रंथकार श्री G. D. H. Cole यांचे पुढील विचार वाचनीय आहेत :

"Fifthly, I think the announcement of the intention to evacuate India should have been coupled with the further declaration that, failing agreement between the main parties, the British Government would place a Congress Ministry, as representing the majority element, in full power, and would give it complete authority over the Indian Army. I do not say that this action would ensure a settlement, but that it woud offer the best chance of one, by making it plainly necessary for the Moslem League to come to terms with the Congress, instead of relying on the British, as their final imperial act, to divide the country at its behest. As against this the continuance of the existing uncertainty involves the likelyhood of a further drift towords a civil war which will be as disastrous for Great Britain as for India, if its advent finds the British still in occupation."

— *Intelligent man's Guide to the Post War World, Page 846-47.*

श्री कोल यांनीं वरील उताऱ्यांत म्हटल्याप्रमाणें ब्रिटिश सरकारनें जर असें जाहीर केलें असतें, कीं जर मुस्लीम लीगनें आम्ही जाण्यापूर्वीं कांग्रेसपक्षाशीं तडजोड केली नाहीं, तर बहु-संख्यपक्ष या नात्यानें त्याच्या हातीं मध्य सरकार देऊन आम्ही निघून जाऊं, तर हिंदुस्थानांत फाळणीमुळें जी यादवी माजली ती माजली नसती, हें खरें आहे. तथापि ब्रिटिश सरकारनें आपल्या स्वार्थासाठीं मुस्लीम लीगला दिलेलीं अभिवचनें मोडण्यास तें सरकार तयार नव्हतें म्हणून त्यानें तसें करण्याचें नाकारिलें आणि हिंदी पुढाऱ्यांना फाळणी मान्य करणें भाग पाडिलें, असा हा इतिहास आहे.

## अल्पसंख्याकांचें हितरक्षण

यावर ब्रिटिशांच्या वतीनें असे एक सांगण्यांत येते, की आम्ही असें करणें म्हणजे अल्पसंख्य मुसलमानाना बहुसंख्य पक्षाच्या हातीं देऊन त्याच्या हितास दगा देण्यासारखें झालें असतें पण आज जें भारत राष्ट्र त्यानीं निर्माण केलें आहे, त्यांतील मुसलमानाना तरी ब्रिटिशांनी राष्ट्रसभापक्षाच्या हवालींच केलें ना? मुसलमानांशिवाय इतर जे अल्पसंख्य या देशात आहेत, त्यांच्या हिताची ब्रिटिशानीं कोणती हमी घेतली आहे? जर येथील बहुसंख्याकानी त्याचा छळ केला, तर ब्रिटिश लोक काय करतील? मग एका राज्याचे दोन तुकडे करून त्यांनीं काय साधिलें? पाकिस्तानांत जे अल्पसंख्य हिंदू किंवा शीख होते किंवा आहेत, त्यांच्या हक्करक्षणाची तरी त्यांनीं कोणती हमी घेतली व काय तरतूद केली? या प्रश्नाना ब्रिटिश लोक कोणतेंहि समाधानकारक उत्तर देऊ शकणार नाहीत तात्पर्य, देशाचे दोन खंड केल्यानें अल्पसंख्याकाच्या हितरक्षणाचा प्रश्न सुटू शकेल ही कल्पना भ्रामक ठरली असून राष्ट्रसभापक्ष ज्या धर्मभेदातीत व जातिभेदातीत राष्ट्रीय वृत्तीवर आपले राजकारण रचण्याचा प्रयत्न करीत आहे, तशा प्रकारच्या प्रयत्नाने व तशा प्रकारच्या राजकीय पक्षांच्या निर्मितीनेंच हा अल्पसंख्याकांचा प्रश्न सुटणें शक्य आहे. प्रत्येक जातवार किंवा धर्मवार पृथक् राष्ट्रभावना निर्माण करण्यानें हा प्रश्न सुटू शकत नाहीं, हेच मत अखेरीस अनुभवाने खरे ठरलें आहे

ब्रिटिशांच्या वतीनें आणखी एक युक्तिवाद करण्यात येतो तो म्हणजे मुसलमानांना ब्रिटिश सराकारनें वारंवार दिलेली अभिवचने पाळण्यासाठीं त्यांना तसें करणे भाग पडले या युक्तिवादातहि फारसा अर्थ नाही जशी त्यांनीं निरनिराळया वेळी मुसलमानांना निरनिराळया प्रकारचीं अभिवचने दिलीं, तशी त्यांनी हिंदी संस्थानिकानाहि निरनिराळया वेळीं निरनिराळया प्रकारची अभिवचनें दिली होती. पण अखेरीस हा देश सोडून जातांना ही सर्व अभिवचने गुडाळून ठेवून तुम्ही भारत किंवा पाकिस्तान या दोहोंपैकीं कोणत्या तरी एका राज्यात सामील व्हा, तेच तुमचें यापुढे हितरक्षण करतील, असे सांगूनच ब्रिटिशांना येथून जावे लागले तीच गोष्ट मुसलमानाना दिलेल्या अभिवचनांच्या बाबतीत, त्यांच्या मनांत असते तर ते करूं शकले असते हें त्यांचें करणे योग्यच झाले असते कारण हिंदुस्थानांत संयुक्त स्वरूपाचे का होईना, पण एकराज्य निर्माण करावयाचे ही भावना १९३५ चा कायदा होईपर्यंत, इतकेच नव्हे, तर १९३९ चें दुसरे महायुद्ध सुरू होईपर्यंत हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पक्ष आणि ब्रिटिश सरकार यांनी जोपासली होती व वाढवीत आणली होती पण या दुसऱ्या महायुद्धात बिनशर्त सहकार्य देण्याचें राष्ट्रसभेनें नाकारले आणि राष्ट्रीय स्वातन्त्र्याची व स्वयंनिर्णयाची ताबडतोबीची मागणी केली यानंतरच मुस्लीम लीगनें १९४० साली पाकिस्तानचें ध्येय स्वीकारले आणि त्यानंतर वर्ष दीड वर्षाच्या आत ब्रिटिशांनीं

क्रिप्स्-योजनेंत त्याला अप्रत्यक्ष मान्यता दिली. हें राजकारण हिंदी स्वातंत्र्याचा हक्क दूर लोटून साम्राज्यसत्ता चिरजीव करण्याच्या दृष्टीनें त्यांनीं रचिलें होतें. मुस्लीम लीगला दिलेलीं अभिवचनेंहि अशाच राजकारणाच्या सदरांत पडणारीं होतीं. त्याना कोणत्याहि तात्त्विक राजनीतीचें अधिष्ठान नव्हतें संस्थानिकांना दिलेल्या भरमसाट अभिवचनांप्रमाणेच हीं अभिवचनें साम्राज्यरक्षणाच्या हेतूनें दिलेलीं होतीं साम्राज्यविसर्जनाच्या वेळीं संस्थानिकांना दिलेल्या अभिवचनांप्रमाणे हीहि अभिवचनें गुंडाळून ठेवून जातांना हिंदुस्थानचे एकराष्ट्र निर्माण करण्याचे श्रेय घेऊन जाणे त्यांना शक्य होतें तसे करण्याचा मार्ग वर सांगितला तो एकच होता. पण त्याची इच्छा नसताना त्याना तसे करण्यास भाग पाडणे कोणासहि शक्य नव्हते, हे ओळखून देशात माजणारे अराजक थाबावें आणि जास्तीत जास्त प्रदेशावर लोकशाहीचे जातिधर्मभेदातीत राष्ट्रीय राज्य ताबडतोब स्थापन करतां यावे, या हेतूनें राष्ट्रसभा-पक्षाच्या पुढाऱ्यांनी निरुपाय होऊन पाकिस्तानच्या सस्थापनेस मान्यता दिली

## आधीच मान्यता कां दिली नाहीं ?

आणखी एक शंका याबाबत निर्माण होऊ शकते ती अशी, की जर पाकिस्तानला मान्यता अखेरीस द्यावयाचीच, तर ती आधीच दिली असती तर अधिक बरें झालें नसतें का ? या शकेचे खरे उत्तर असे आहे, कीं पाकिस्तानच्या ज्या सरहद्दी आज त्याला आखून दिलेल्या आहेत, त्याहून फारच मोठा भाग पाकिस्तान-वाल्यांना हवा होता तो भाग सोडून देऊन आजच्या सरहद्दींत त्यांना खेचून ठेवणें ही गोष्ट ब्रिटिश सत्ताच करू शकली असती तसे करण्याचें ब्रिटिश सत्तेनें मान्य करीपर्यंत पाकिस्तानला मोघम मान्यता देणे ही गोष्ट अनर्थावह झाली असती शिवाय, आज ज्या पाकिस्तानच्या मर्यादा ठरल्या आहेत, त्या भागातूनहि ब्रिटिश सत्तेचें उच्चाटन व्हावें आणि हिंदी सस्थानिक प्रदेशांतूनहि त्या सत्तेचें उच्चाटन व्हावे आणि आपल्या राज्यांतहि त्यांचा कोणताहि राजकीय हक्क शिल्लक राहू नये, इतकी हमी मिळेपर्यंत व या सर्व गोष्टींची ताबडतोब बजावणी एक-दोन महिन्यांच्या आंत होणार अशी खात्री होईपर्यंत राष्ट्रसभेनें पाकिस्तानला मान्यता दिली नाहीं, हेच योग्य झालें. तसें केलें नसतें तर पाकिस्तानच्या सरक्षणाच्या निमित्तानें किंवा कांहीं संस्थानांच्या रक्षणाच्या निमित्ताने ब्रिटिशांनीं आपले साम्राज्य या देशांत कायम ठेवण्याचा प्रयत्न केला असता. ही भीति नष्ट झाल्यानंतरच राष्ट्रसभेनें पाकिस्तानला मान्यता दिली हे भारतीय स्वातंत्र्याच्या दृष्टीनें योग्यच झालें, असें म्हणावें लागतें

*

# १३

# अखेरचा स्वातंत्र्य-संग्राम

१९३७ च्या जुलै महिन्यांत राष्ट्रसभेनें प्रांतिक मत्रिमंडळे स्वीकारून सनदशीर राजकारणास सुरुवात केली १९३५ सालचा राज्यघटनेचा कायदा फेटाळून देऊन हिंदुस्थानला सपूर्ण स्वातंत्र्य आणि स्वयंनिर्णय हे हक्क प्राप्त करून घेण्याची राष्ट्रसभेची प्रतिज्ञा होती असे असलें तरी १९३५ च्या राज्यघटनेपैकी प्रांतिक स्वराज्याचें राज्ययंत्र आपल्या हातात घेऊन भावी लढ्याची पूर्वतयारी करण्याचे धोरण राष्ट्रसभेने स्वीकारल्यापासून हा भावी लढा होणार किंवा नाही आणि झाला तरी त्याचें स्वरूप कसे राहील यासबंधीं देशातील इतर पक्षातच नव्हे, तर प्रत्यक्ष राष्ट्रसभापक्षातहि अनेक मतांचे प्रवाह सुरू झाले होते म गाधींनी राष्ट्रसभेचे नेतृत्व १९२० सालीं लो टिळकांच्या निधनानतर आपल्या हातीं घेतलें या वेळीं सुरू झालेली अनत्याचारी असहकाराची पहिली मोहीम १९२४ सालीं स्थगित करण्यात आली. यानतर १९३० सालीं स्वातत्र्याचा सत्याग्रह-संग्राम सुरू होईपर्यंत राष्ट्रसभेच्या राजकारणाचे नेतृत्व पं. मोतीलाल नेहरूप्रभृति स्वराज्यपक्षाच्या नेत्याकडे म गाधींनींच सोपविले होतें. पुन्हां १९३० सालीं सत्याग्रह-सग्राम सुरू करतांना ते नेतृत्व त्यांनी आपल्या हातीं घेतलें. पुढे १९३० ची सत्याग्रहसग्रामाची मोहीम, त्यानतर १९३१ सालीं दुसऱ्या गोलमेज परिषदेतील राष्ट्रसभेच्या वतीने ब्रिटनशीं केलेली शिष्टाई, आणि ही शिष्टाई अपेशी झाल्यानंतर १९३२-३३ साली पुन्हा झालेला सत्याग्रहाचा लढा, या सर्व गोष्टी म. गाधींच्या प्रत्यक्ष नेतृत्वाखालीं झाल्या. १९३२ सालीं सुरू झालेली सत्याग्रहसग्रामातील दुसरी मोहीम प्रथम सामुदायिक व नतर वैयक्तिक सत्याग्रहाच्या रूपाने १९३४ पर्यंत कशी तरी चालली. यानंतर म. गांधींनीं हा सत्याग्रह पुन्हां स्थगित केला आणि राष्ट्रसभेची राजकीय सूत्रे सरदार वल्लभभाई पटेल, मौलाना आझाद, बाबू राजेंद्रप्रसाद आणि चक्रवर्ती राजगोपालाचारियर या जुन्या पिढीच्या नेत्याच्या हातीं आणि प. जवाहरलाल नेहरू, बाबू सुभाषचद्र बोस आणि जयप्रकाश नारायण या तरुण पुढाऱ्यांच्या हातीं देऊन ते स्वतः राष्ट्रसभेंतून निवृत्त झाले परतु राष्ट्रसभेला पुन्हा स्वातत्र्यप्राप्तीसाठीं जेव्हां सत्याग्रहसंग्राम करावा लागेल, तेव्हा तो आपल्या नेतृत्वाखालीं करावा अशी त्यांची सूचना होती व ती सूचना राष्ट्रसभेंतील पुढाऱ्यांनीं मान्य केली होती. यानंतर राष्ट्रसभेनें जेव्हां प्रांतिक स्वराज्य चालविण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली, तेव्हां तिच्या सर्व प्रांतांतील मत्रिमंडळांच्यावर देखरेख ठेवून त्यांचें एकमुखी नेतृत्व करण्यासाठीं सरदार वल्लभभाई पटेल, बाबू राजेद्रप्रसाद आणि मौलाना आझाद अशा तिघांचें एक पार्लमेंटरी बोर्ड नेमण्यात आलें. देशांतील सर्व प्रांतांची या तीन पुढाऱ्यांत विभागणी करून देण्यांत आली

आणि राष्ट्रसभेच्या मंत्रिमंडळाचा राज्यकारभार या तिघाच्या देखरेखीखालीं व म. गांधींच्या सल्लयास अनुसरून १९३७ च्या जुलै महिन्यापासून १९३९ च्या नोव्हेंबर महिन्यापर्यंत चालत होता म गांधी पुन्हा स्वातंत्र्यासाठीं सत्याग्रहसंग्राम करतील किंवा नाहीं, केला तर तो केव्हां सुरू करतील आणि त्याचें स्वरूप कोणत्या प्रकारचे राहील, यासबधीं या वेळीं राष्ट्रसभेच्या नेत्यांमध्येंसुद्धा एकवाक्यता दिसून येत नव्हती

## राष्ट्रसभेंतील पक्षभेद

१९३८ साली देशभक्त बाबू सुभाषचद्र बोस हे राष्ट्रसभेचे अध्यक्ष होते. या वेळी राष्ट्रसभेच्या नेत्यांमध्ये जुने-नवे असे पक्षभेद निर्माण झाले होते श्री जयप्रकाश नारायण, आचार्य नरेंद्र देव आणि श्री अच्युतराव पटवर्धन इत्यादि तरुण पुढाऱ्यानी समाजवादी पक्ष स्थापन केलेला होता पडित जवाहरलाल नेहरू आणि सुभाषचंद्र बोस हे दोघेहि या पक्षाचे सभासद नव्हते याशिवाय, मानवेंद्रनाथ रॉय हेहि एक नवे क्रातिकारक पुढारी या वेळी बंधमुक्त होऊन राष्ट्रसभेला येऊन मिळाले होते. हे सर्व पुढारी सामान्यत. नव्या पिढीचे व समाजवादी धोरणाचे क्रातिकारक पुढारी असे समजले जात याच्या विरुद्ध सरदार वल्लभभाई पटेल, राजगोपालाचार्य, बाबू राजेद्रप्रसाद व मौलाना आझाद हे जुन्या पिढीचे पुढारी असे मानले जात या जुन्या पुढाऱ्याचा म गांधीच्या नेतृत्वावर पूर्ण विश्वास होता नव्या पिढीपैकीं पंडित जवाहरलाल नेहरू हे म गांधीचे नेतृत्व पूर्णपणे मान्य करणारे असले, तरी त्यांची मते म गांधीच्या सांप्रदायिक अनुयायांना पसत नव्हती आणि त्यांच्याकडे जुन्या पिढीचे गाधीवादी म्हणविणारे पुढारी समाजवाद्याचे नेते या दृष्टीनेच पहात असत समाजवादी पक्षाचे धोरण या वेळी अगदी निश्चित असे झालेले.नव्हते. तथापि म गाधी हे पुन्हा एकादा स्वातंत्र्यसग्राम करतील, तर त्याचे नेतृत्व मान्य करून आपण त्यात भाग घ्यावा आणि त्यानी तसा लढा करावा यासाठीं आपण राष्ट्रसभेला पुढें रेटीत न्यावें, असे थोडक्यात त्यांचे धोरण सांगतां येईल त्याची गाधीजींच्या नेतृत्वास हरकत नव्हती. इतकेच नाहीं, तर त्याच्या पाठिंब्यावांचून दुसऱ्या कोणास हिंदी स्वातंत्र्याचा लढा बराच काळपर्यंत तरी सुरू करता येणार नाही, अशी त्याची सामान्यतः निष्ठा होती यामुळे गांधीजींच्या अतिम नेतृत्वास त्यांचा विरोध नव्हता तरीहि गाधीजीची सर्व मते त्याना मान्य नव्हती. त्याच्या अहिंसेचें क्रांतिकारक स्वरूप त्यांना पटलेलें नव्हते. तरीहि गांधीजीचे नेतृत्व चालू परिस्थितीत राष्ट्रसभेच्या राजकारणाला आवश्यक आणि उपयुक्त आहे, असेच त्यांचे एकदर धोरण असे असें असले तरी राष्ट्रसभेतील गाधीवादी जुन्या नेत्याच्या धोरणाला त्यांचा विरोध होता व हे जुने पुढारी पुन्हां स्वातंत्र्यसग्राम करण्याचा लढा पुकारतील अशीहि त्यांना आशा वाटत नसे राष्ट्रसभेचे एकदर राजकारण हळूहळू क्रांतिपराङ्मुख बनत चाललें आणि तिच्यांत अधिकारवादी धोरण शिरल्यामुळे ती शुद्ध सनदशीर राजकारण करणारी

मवाळ संस्था बनली, असें ते म्हणत असत. निरनिराळ्या प्रांतांत जे मंत्री होते त्यांच्याविरुद्ध टीका करणें व लोकांचीं निदर्शनें घडवून आणणें, असें त्यांचें धोरण होते राष्ट्रसभेंतील जुन्या पुढाऱ्यांना नव्या पिढीच्या नेत्यांचे समाजवादी विचार आणि प्रतिकारवादी धोरण हीं पटत नसत यामुळें राष्ट्रसभेंत जुन्या-नव्यांचा एक अतर्गत संघर्ष या प्रातिक स्वराज्याच्या काळांत निर्माण झाला होता. तरीहि या दोघांना म. गांधींचे अंतिम नेतृत्व मान्य असून म. गांधींना स्वतःला जुने व नवे या दोघाचीहि आपल्या राजकारणाला उपयुक्तता आहे असेच वाटत होतें. नव्या पिढीच्या आग्रहानें आपल्या इच्छेविरुद्ध घाईने अधिकारत्याग करून प्रत्यक्ष प्रतिकाराचा लढा सुरू करावा, अशी त्याची इच्छा नव्हती तरीहि जुन्या पिढीच्या पुढाऱ्यांना नव्या पुढाऱ्यांची जशी अडचण वाटत होती, तशी ती म. गांधींना केव्हांच वाटली नाहीं; किंवा या समाजवादी तरुण पुढाऱ्यांना आपल्या ध्येयांचा प्रसार करण्यास अडथळा करावा किंवा शिस्तभंगाचा उपाय योजून राष्ट्रसभेच्या बाहेर जाण्यास त्यांना भाग पाडावें, असें प्रतिगामी धोरण गांधींनी केव्हाहि स्वीकारले नाहीं. राष्ट्रसभेच्या कार्याला आणि तिच्या शक्तीची वाढ होण्याला या नव्या पुढाऱ्यांची आवश्यकता आहे, याची जाणीव त्यांना नेहमीं असे हेंच त्याच्या क्रांतिकारक प्रकृतीचें वैशिष्ट्य आणि श्रेष्ठत्व होतें ते राष्ट्राच्या परिस्थितीस अनुसरून कधीं नेमस्त सनदशीर धोरण स्वीकारीत, तर कधीं क्रांतिकारक परिस्थिति निर्माण झाली असतां जहाल क्रांतिकारक धोरण स्वीकारीत. दोनहि धोरणांची व दोनहि पिढ्यांच्या पुढाऱ्याची त्यांना सारखीच उपयुक्तता वाटत असे कारण, आज प्रातिक स्वराज्य चालविण्याचे सनदशीर राजकारण करणारी राष्ट्रसभा उद्यां संपूर्ण स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठीं सत्याग्रही क्रांति करण्यास समर्थ व अधिकारी अशी बनली पाहिजे, असे त्यांना सतत वाटत असे. या त्याच्या दूरदर्शी, सावध पण क्रांतिकारक वृत्तीमुळे त्यांनीं आपल्या हयातींत जुन्या व नव्या दोनहि पिढ्यांच्या पुढाऱ्यांपैकीं कोणासहि राष्ट्रसभेच्या बाहेर जाऊं दिलें नाहीं आणि दोघांच्या सहकार्यानें राष्ट्रसभेच्या हातून राष्ट्राचें स्वातंत्र्य संपादन करून दाखविलें.

## गांधी-नेतृत्वास विरोध

बाबू सुभाषचंद्र बोस आणि श्रीयुत मानवेंद्रनाथ रॉय या दोघांच्या धोरणाशीं मात्र म. गांधींचा लौकरच तात्त्विक विरोध निर्माण झाला. श्रीयुत मानवेंद्रनाथ रॉय यांच्या अनुयायांनीं प्रथम कांहीं दिवस राष्ट्रसभेमध्यें पोटपक्ष असूंच नयेत अशी भूमिका घेतली होती, पण थोड्याच दिवसांत त्याना म. गांधींच्या धोरणाशीं आपला तात्त्विक मतभेद असल्याचें दिसूं लागलें. हळूहळू त्यांच्या अनुयायांनीं राष्ट्रसभेचें नेतृत्व बदलून घेतलें पाहिजे, म्हणजे गांधीवाद्यांच्या हातून तें काढून घेतलें पाहिजे, अशीच भूमिका स्वीकारली. पुढें महायुद्ध सुरू झाल्यानंतर त्यांनीं आपलें धोरण

राष्ट्रसभेनें स्वीकारलेल्या धोरणाशीं जुळण्याचा संभव नाहीं हे पाहून राष्ट्रसभा सोडण्याचा निर्णय घेतला. अशा रीतीने रॉयवादी नावाचा त्याच्या अनुयायांचा जो एक लहानसा गट निर्माण झाला होता, तो राष्ट्रसभेतून बाहेर पडला महायुद्ध सुरू झाल्यानंतर त्यांनीं राष्ट्रसभेचें युद्धाशीं असहकार करण्याचे धोरण चुकीचें आहे, अशी उघड भूमिका स्वीकारल्यामुळे त्यांना राष्ट्रसभेत राहणे अशक्यच झाले दुसरे महायुद्ध हे साम्राज्य-वादी युद्ध नव्हे, आणि म्हणून हिंदुस्थानने त्याच्याशी असहकार न करतां ब्रिटनशीं सहकार्य करावें, युद्धानंतर साम्राज्यशाही नष्ट होणार असून हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळेलच, अशा तऱ्हेची त्यांची भूमिका होती. ही भूमिका म्हणजेच युद्धकालात ब्रिटिश सरकारशीं हिंदी जनतेनें बिनशर्त सहकार्य करावें अशी असून हे धोरण राष्ट्रसभेला किंवा एकदर हिंदी जनतेला मान्य होण्याजोगे नव्हते. म्हणून रॉय आणि त्यांचे अनुयायी यानी राष्ट्रसभेचा त्याग केला.

बाबू सुभाषचंद्र बोस याचें धोरण रॉय याच्या धोरणाशीं पूर्णपणे विरोधी असेच होते. लवकरच युद्ध सुरू होणार अशी चिन्हें दिसू लागताच त्याना वाटले, की हिंदी राष्ट्रसभेने ब्रिटिशाना वर्ष सहा महिन्याची मुदत देऊन एक जाहीर नोटीस द्यावी, कीं या मुदतीच्या आत जर त्यांनीं हिंदुस्थानला संपूर्ण स्वातंत्र्य दिलें नाहीं, तर हिंदुस्थान पुन्हां असहकार आणि प्रत्यक्ष प्रतिकार याचा लढा सुरू करील आणि प्रत्यक्ष प्रति-काराच्या मार्गानें देशात प्रतिस्पर्धी राज्ययंत्र निर्माण करून आपल्या स्वातंत्र्याची संस्थापना करील. महात्मा गांधींना हा प्रत्यक्ष प्रतिकाराचा लढा आपल्या नेतृत्वाखालीं केव्हां तरी करावा लागेल असे वाटत असले, तरी तो काळ अद्यापि प्राप्त झालेला नाहीं आणि देशात असा लढा सुरू झाल्यास तो शांततेने चालण्याचे लक्षण दिसत नाही, असे वाटत होते राष्ट्रसभेचे बहुतेक पुढारी म गांधींच्या नेतृत्वाला मान देणारे असे असल्याने व प्रत्यक्ष प्रतिकाराचा लढा त्याच्या नेतृत्वाखालीं चालावा असेच मान-णारे असल्यानें बाबू सुभाषचंद्र याच्याशी त्याचे सहमत नव्हते. तरीहि सुभाषचंद्र याची अध्यक्षपदाची मुदत भरल्यानंतर पुन्हा १९३९ सालीं ते निवडणुकीसाठीं उभे राहिले आणि त्याच्या विरुद्ध डॉ पट्टाभि सीतारामय्या हे जुन्या पुढाऱ्यांच्या वतीनें उभे राहिले डॉ पट्टाभि याना म. गांधींचा पाठिंबा होता आणि सुभाषचंद्रांना विरोध होता, तरीहि सुभाषचंद्र निवडून आले. यानंतर राष्ट्रसभेत एक पेचप्रसंग निर्माण झाला सुभाषचंद्र अध्यक्ष म्हणून निवडून आले, तरी अखिल भारतीय राष्ट्रसभा-समितींत त्यांचें बहुमत नव्हतें आणि म्हणून जुन्या पक्षाच्या सहकार्यावाचून त्याना आपली कार्यकारिणी बनविणें शक्य नव्हतें जुन्या पक्षाने आपलें म्हणजे आपल्या पक्षाचे पूर्ण बहुमत असेल तरच आपण कार्यकारिणीत जाऊ, नाहीं तर बाबू सुभाषचंद्र यानीं आपल्या मतानुसार नवी कार्यकारिणी बनवावी असा आग्रह धरला यामुळें सुभाषचंद्र याना कार्यकारिणी बनवितां येईना आणि म्हणून त्यानी अध्यक्षपदाचा राजीनामा दिला यानंतर बाबू राजेंद्रप्रसाद हे राष्ट्रसभेचे अध्यक्ष

बनले आणि सुभाषचंद्र यांनीं पुरोगामी गट (फॉरवर्ड ब्लॉक) या नांवाचा राष्ट्र-सभेंतच एक पोटपक्ष स्थापन केला. मात्र या वेळी समाजवादी पक्षानें सुभाषचंद्रांचें नेतृत्व स्वीकारले नाही अशा रीतीनें राष्ट्रसभेच्या अंतर्गत असे दोन पोटपक्ष या वेळीं निर्माण झाले होते

## आझाद हिंद-सरकार व नेताजी सुभाषचंद्र

पुढें महायुद्ध प्रत्यक्ष सुरू झाल्यानतर थोड्याच दिवसात बाबू सुभाषचंद्र बोस हे हिंदुस्थानांतून बाहेर निघून गेले आणि पुढें जपाननें महायुद्धात प्रवेश केल्यावर पूर्व आशियात एक आझाद हिंदसरकार स्थापन करून त्याच्या हुकुमती-खालीं त्यानीं लक्षावधि हिंदी सैनिकांचे आझाद हिद फौज या नावाचे एक राष्ट्रीय सैन्य निर्माण करून ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध उघड युद्ध पुकारले आझाद हिंद सरकारची स्थापना करताना व ब्रिटिशाविरुद्ध युद्ध पुकारतांना त्यानी जपानशीं तह करून त्याचें सहकार्य सपादन केले होते. याच्यापूर्वी ते बर्लिनलाहि जाऊन आलेले होते

दुसरे महायुद्ध सुरू झाल्यापासून त्यांच्या मनाची अशी खात्री झाली होती, की या वेळीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य प्राप्त करून देण्यासाठीं शक्य ते उपाय योजिले पाहिजेत, केवळ अहिंसेच्या शस्त्राने आपणास स्वातंत्र्याची प्राप्ति होणार नाहीं, म्हणून देशाच्या बाहेर जाऊन ब्रिटिशाविरुद्ध लढणाऱ्या राष्ट्रांचें सहकार्य मिळवून जर आपणास ब्रिटिशाशी सशस्त्र लढा देतां आला, तर तसा प्रयत्न करून आपण पहावा. हे त्याचे विचार म गांधींच्या विचाराशीं केव्हाहि जुळणारे नव्हते या विचारानें आपले राजकारण चालविणें हिंदी राष्ट्रसभेला शक्यहि नव्हतें, ही सर्व परिस्थिति लक्षात घेऊन जगात दुसरे महायुद्ध सुरू झालेलें पाहून त्यांनीं हिंदुस्थानच्या बाहेर जाण्याचा निर्धार केला अशा रीतीने महायुद्धाच्या प्रसगी ब्रिटिशाशीं बिनशर्त सह-कार्य करावें असे मानणारे रॉयवादी आणि त्यांच्याशीं सशस्त्र सामना द्यावा असे विचार असणारे सुभाषचद्र बोस, हे दोघेहि राष्ट्रसभेंतून बाहेर पडले व त्यानीं आपा-पल्या विचारांनुसार आपापले मार्ग अनुसरण्यास सुरुवात केली.

## हिंदी जनतेची सर्वसामान्य वृत्ति

एकंदर हिदी जनता आणि राष्ट्रसभा या दोघाची मनोवृत्ति सामान्यतः वरील दोनहि एकातिक मार्ग सोडून ब्रिटिशांनीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य व स्वयनिर्णय हे हक्क तावडतोब दिल्यास जगातील फॅसिस्ट राष्ट्राच्या विरुद्ध ब्रिटिशांच्या बाजूने लढण्यास आपण तयार असावे, नाहीं तर त्याच्याशीं अनत्याचारी असहकार पुकारावा अशीच होती भाई रॉय यांचे बिनशर्त युद्धसहकार्याचें धोरण अथवा बाबू सुभाषचद्र यांचें सशस्त्र लढ्याचें धोरण हीं आपणांस हितप्रद होतील अथवा त्यांपासून आपल्या देशास स्वातंत्र्य प्राप्त करून घेतां येईल अशी त्या वेळीं एकंदर हिंदी जनतेची अथवा राष्ट्रीय

पुढाऱ्यांपैकी बहुतेकांची कल्पना नव्हती पहिल्या महायुद्धाच्या वेळी ब्रिटिशाना बिनशर्त सहकार्य देण्यापासून आपला कांही फायदा झाला नाहीं हे लक्षांत घेऊन आता तसें बिनशर्त सहकार्य देणें योग्य नाही, अशीच जनतेची सर्वसामान्य वृत्ति बनलेली होती. ब्रिटिशांसबंधीं कोणत्याहि प्रकारचा विश्वास लोकांना वाटत नव्हता यामुळें त्यांच्याशीं बिनशर्त सहकार्य करणे हे कोणासच पसत नव्हते. तथापि आपण जर या वेळीं संपूर्ण स्वराज्याची शर्त घालून आपलें सहकार्य देऊ केलें, तर ब्रिटिश मुत्सद्दी आपले सहकार्य मिळविण्यासाठीं आपल्याशी सन्मान्य समेट करण्यास तयार होतील, अशी राष्ट्रसभेच्या बऱ्याच नेत्याची मनोवृत्ति होती. पण त्याचबरोबर एकदां महायुद्ध सुरू झाल्यानतर त्याच्याशीं उघड असहकार पुकारावयाचा आणि हातांत असलेली सात-आठ प्रांतांतील सत्ता सोडून देऊन तुरुंगांतील वनवासाचा मार्ग स्वीकारावयाचा, हे एक धाडस आहे आणि म्हणून त्यांतून निश्चितपणें यशच मिळेल किंवा नाहीं, यासंबधीं राष्ट्रसभेंतील अधिकारवादी गटांत बरीच साशंकता वसत होती. कांहीं झाले तरी राष्ट्रसभेने महायुद्धाच्या काळांत सत्तात्याग करून असहकाराचा उघड लढा पुकारणे धोक्याचे होतें. याच्या उलट, जर तिने या वेळी ब्रिटिशाशीं बिनशर्त सहकार्य करण्याचें धोरण स्वीकारलें आणि स्वातत्र्य मिळाले नसतांना त्यांच्या बाजूनें लढाईस जाण्यास लोकाना आवाहन केलें, तर तेहि तितकेंच अयशस्वी ठरण्याचा संभव होता शिवाय, या महायुद्धाच्या काळात देशातील क्रांतिकारक शक्ती आतून व देशाच्या बाहेरून स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं सशस्त्र लढे उभे केल्याशिवाय राहिल्या नसत्या जर राष्ट्रसभेनें महायुद्धकाळात ब्रिटिशाशीं बिनशर्त सहकार्य करण्याचें धोरण स्वीकारले असते, तर तिला स्वतःला आपल्या स्वातंत्र्याच्या ध्येयापासून भ्रष्ट व्हावे लागले असतेच, पण ज्या क्रांतिकारक शक्ती राष्ट्रीय स्वातत्र्यासाठीं लढा पुकारतील, त्यांना दडपून टाकण्याचे पापकर्महि राष्ट्रसभेला करावे लागले असतें. अशा परिस्थितींत आपले धोरण कसे ठरवावे हा राष्ट्रीय नेत्यांच्यापुढे एक अत्यंत जबाबदारीचा प्रश्न येऊन उभा राहिला होता.

हातांतील राजसत्ता झुगारून देऊन निःशस्त्र प्रजेला साम्राज्यसत्तेशीं असहकारानें लढा देण्यास आवाहन करणे आणि ती प्रजा बडास प्रवृत्त झाली असतां तिला ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध चालू असलेल्या स्वातत्र्यसग्रामांतहि विजय मिळवून देणें ही गोष्ट सोपी नव्हती, तें फार मोठे साहस होते. जर या साहसात यश संपादन करतां आले नाहीं, तर सुमारे तीन पिढ्या खपून जी राष्ट्रसभा या देशातील थोर पुढाऱ्यांनीं नावारूपास आणिली होती, ती नामशेष होऊन सर्व जनतेचा स्वातंत्र्याचा उत्साह आणि आशा यांची कायमची इतिश्री होण्याचाहि धोका होता. अर्थात् जर या लढ्यात यश प्राप्त झालें, तर राष्ट्रसभेचे जीवितकार्य सफल होऊन हिंदी स्वातत्र्याचा प्रश्न सोडविल्याचें श्रेयहि या राष्ट्रसभेच्या पुढाऱ्यांना मिळणारे होतें. पण यासंबंधींचा निर्णय करणें एकदां महायुद्ध सुरू झाल्यानंतर फार कठिण झालें होतें.

३ सप्टेंबर १९३९ रोजीं व्हाइसरॉयने आपल्या एकट्याच्या अधिकारांत म्हणजे ब्रिटिश सरकारच्या हुकुमानें हिंदी राष्ट्राला ब्रिटिशांच्या बाजूनें युद्धांत गोंविल्याचें जाहीर केलें या वेळेपासून १४ सप्टेंबरपर्यंतच्या काळात राष्ट्रसभेच्या नेत्यांकडून राष्ट्राला कोणते मार्गदर्शन केलें जातें, ते राष्ट्रांतील जनता उत्कंठेनें पहात होती. १४ सप्टेंबर रोजी राष्ट्रसभेच्या सर्व पुढाऱ्यांनीं एकत्र जमून आणि म गांधीशीं विचारविनिमय करून महायुद्धासंबधींची आणि राष्ट्रीय स्वातंत्र्यासंबधीची आपली भूमिका एका जाहीरनाम्याच्या रूपानें हिंदी जनतेला व जगाला सादर केली

## हिंदी स्वातंत्र्याचा जाहीरनामा

हिंदी राष्ट्राच्या वतीनें दुसरे महायुद्ध सुरू झाल्यानंतर राष्ट्रसभेनें आपला युद्ध-विषयक दृष्टिकोण कोणता आहे, ते जगाला सादर करण्याचे कार्य हा जाहीरनामा काढून राष्ट्रसभेच्या नेत्यांनीं फार उत्कृष्टपणे पार पाडिलें. दुसरें महायुद्ध ही जगांतील एक अत्यंत क्रांतिकारक आणि जगड्व्याळ अशा प्रकारची घटना होती या घटने-कडे जगातील कोणत्याहि राष्ट्राने केवळ आपल्याच एका राष्ट्राच्या स्वार्थदृष्टीने पाहणें उचित नव्हतें ब्रिटिश लोकांनीं या महायुद्धाकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोण जगा-पुढें मांडिला होता जगांतील लोकशाही सुरक्षित करावी आणि सर्व राष्ट्रांचें जीवित सुरक्षित रहावे या उद्देशाने आपण जर्मनीविरुद्ध हा लढा पुकारला आहे, असें ब्रिटिश लोक जगाला सागत होते जर्मनींत उदय पावलेला नाझीवाद हा लोकशाहीला मारक आहे आणि जर्मनीच्या आसपास नादणाऱ्या दुर्बल राष्ट्राना चुरडून टाकणारा आहे, म्हणून या नाझीवादाविरुद्ध आपण लढत आहों आणि लोकशाहीच्या भक्तांनीं व राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या उपासकांनी आपल्या पक्षास मिळावे आणि मानवी सस्कृती-वर ओढवलेलें नाझीवादाचे किंवा फॅसिझम्‌चे संकट दूर करावे, असें ब्रिटिश मुत्सद्दी एकमुखाने जगाला भासवीत होते. या वेळीं कोणत्याहि राष्ट्राने आपल्या स्वार्थाचा विचार करून मानवसस्कृतीवर ओढवलेल्या सकटाविरुद्ध लढण्यास साहाय्य न करणें, म्हणजे मानवजातीसंबधींच्या आपल्या कर्तव्याची जबाबदारी पार न पाडण्या-सारखेंच आहे, असे ते प्रतिपादन करीत असत. अशा वेळीं केवळ आपल्या राष्ट्राच्या स्वातत्र्याचाच प्रश्न लक्षात घेऊन एकाद्या सौदागराच्या वृत्तीनें आपल्या कर्तव्याचा निर्णय करणे बरोबर झालें नसतें. उदाहरणार्थ, आम्हास जर तुम्हीं ताबडतोब स्वातत्र्य देत असाल तर आम्ही तुमच्या वतीने जर्मनीविरुद्ध लढण्यास तयार होऊं, अशी भूमिका स्वीकारणें राष्ट्रसभेला शक्य होते. पण ही भूमिका म्हणजे आपल्या स्वातत्र्याचा सौदा करण्यासारखी आहे असे म गांधी व पडित जवाहरलाल नेहरू या दोघांचेंहि मत होतें. कारण ब्रिटिशानीं तुम्हांला स्वातत्र्य दिलें, तरी तेवढ्यासाठीं तुम्ही ते सांगतील त्या राष्ट्राविरुद्ध लढण्यास तयार व्हावे काय? जर आपणांस स्वातंत्र्य मिळत आहे एवढ्यासाठी वाटेल त्या राष्ट्राचें पक्षपाती होऊन आपण

वाटेल त्या राष्ट्राविरुद्ध लढण्यास तयार झालों, तर आपले हें करणे कदाचित् राष्ट्रीय स्वार्थाचे ठरेल; पण ते कृत्य मानवसंस्कृतीच्या उद्धाराचें ठरणार नाहीं. आपल्या राष्ट्राच्या उच्च संस्कृतीला सुद्धा ते साजणार नाहीं. समजा, जो नाझीवाद जगावर एक अरिष्ट आहे असे आपणांस वाटतें, त्या नाझी जर्मनीने जर आपणांस स्वातंत्र्य दिलें असतें, तर जर्मनी सांगेल त्याच्याविरुद्ध आपण लढणे हे योग्य झालें असते का? अशा रीतीनें मिळालेलें अथवा मिळविलेलें स्वातंत्र्य हें तरी टिकाऊ अथवा स्पृहणीय म्हणतां येईल का? या प्रश्नांचा आपण जर विचार केला तर दिसून येईल, की जरी ब्रिटिशांनी आपणास स्वातंत्र्य दिले असतें, तरी तेवढ्याच कारणासाठीं आपण ब्रिटिश सांगतील त्या इतर राष्ट्रांविरुद्ध लढण्यास तयार होणें ही गोष्ट आपल्या राष्ट्रास साजण्यासारखी नव्हती. म्हणून या महायुद्धामध्ये ब्रिटिशांच्या बाजूनें साहाय्य करावे किंवा न करावें याचा निर्णय करण्यापूर्वी त्या युद्धाचे हेतू काय आहेत, हे निःसंदिग्धपणे समजून घेणे हे आपले पहिलें कर्तव्य होय, असा निर्णय आमच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं प्रथम घेतला म्हणून ब्रिटिशांनी आपले युद्धहेतू निःसंदिग्ध शब्दांत आणि अधिकृत रीतीने प्रथम जाहीर करावेत व ते युद्धहेतू जाहीर झाल्यानंतर महायुद्धात ब्रिटिशांना साहाय्य करावयाचे किंवा नाहीं याचा विचार आपण करू, असे या जाहीरनाम्यात प्रारंभींच स्पष्ट करण्यांत आलें होते जर लोकशाहीचें संरक्षण आणि लोकशाहीवर ओढवलेल्या संकटाचे निवारण हा या युद्धाचा एक प्रधान हेतु असेल, तर ज्याप्रमाणें नाझीवाद किंवा फॅसिझम् याचा नाश करणे हा युद्धाचा हेतु म्हणून सांगण्यांत येतो, त्याचप्रमाणें साम्राज्यशाहीचा अंत करणे हाहि या युद्धाचा तितकाच प्रमुख दुसरा हेतु असला पाहिजे कारण नाझीवाद किंवा फॅसिझम् हे लोकशाहीवर संकट आहे हे जितकें खरें आहे तितकेंच हेहि खरें आहे, कीं साम्राज्यशाही ही लोकशाहीला मारक असून फॅसिझम्चे मूळहि या साम्राज्यशाहीतूनच उगम पावलेले आहे. म्हणून फॅसिझम्-प्रमाणें साम्राज्यशाहीचा अंत करणे हाहि या युद्धाचा हेतु म्हणून जाहीर करण्यांत आला पाहिजे, असा या जाहीरनाम्यातील पहिला मुद्दा होता जर साम्राज्यशाहीचा अंत हा युद्धातील एक हेतु नसेल, तर आम्हास या युद्धाशी कांहींहि कर्तव्य नाहीं. कारण मग हे युद्ध म्हणजे फॅसिझम्च्या संकटापासून आपल्या साम्राज्यशाहीचा बचाव करणे एवढ्याच हेतूने चालेविले आहे असे म्हणावे लागेल. हिंदुस्थानला साम्राज्यशाहीचा अंत प्रथम करावयाचा आहे आणि तसे केल्यावाचून ब्रिटिश साम्राज्याचा गुलाम बनलेला हिंदुस्थान कोणतेंहि युद्ध स्वतंत्र राष्ट्र या नात्यानें लढूच शकत नाहीं आपल्या राष्ट्रावर साम्राज्यसत्ता गाजविणाऱ्या ब्रिटिशांनीं आपणांस न विचारता त्यात लोटले म्हणून या युद्धांत सामील होणें व साहाय्य करणे, हे आमच्या राष्ट्रास शोभणारे नाही.

या जाहीरनाम्यांतील दुसरा मुद्दा असा होता, कीं जर साम्राज्यशाहीचा अंत आणि फॅसिझम्चा अंत हे दोनहि हेतू पुढें ठेवून ब्रिटिश राष्ट्र हे युद्ध करीत असेल, तर

त्याने हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा व स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य करून तसें जाहीर करावे; आणि म्हणून लोकशाही आणि साम्राज्यशाही यासबंधींचे आपले धोरण ब्रिटिशांनीं स्पष्ट करावें, इतकेच नाहीं, तर हीं तत्त्वे हिंदुस्थानच्या बाबतीत आपण कशीं लागू करणार याचेंहि स्पष्टीकरण करावें

या दुसऱ्या मुद्द्यानंतर तिसरा तितकाच, किंबहुना त्याहूनहि अधिक महत्त्वाचा असा एक मुद्दा या जाहीरनाम्याने उपस्थित केला होता तो म्हणजे साम्राज्यशाहीचा अंत आणि लोकशाहीची संस्थापना हे दोन हेतू भविष्यकालासंबधी जाहीर केल्यानेच केवळ आजचा कार्यभाग होऊं शकत नाहीं. हीं तत्त्वे तावडतोब म्हणजे हे युद्ध चालू असतांनाच हिंदुस्थानला लागू करण्यासाठीं आजच्या हिंदुस्थान-सरकारांत कोणते फेरबदल अथवा क्रांतिकारक सुधारणा तावडतोब अमलात आणण्याचा ब्रिटिश सरकारचा मानस आहे, तेहि याचबरोबर ब्रिटिशानीं जाहीर केले पाहिजे, व तशा सुधारणा तावडतोब अमलात आणल्या पाहिजेत या तिसऱ्या मुद्द्याचा आशय थोडक्यांत असा होता, की हिंदुस्थानांत तावडतोब एक हंगामी राष्ट्रीय सरकार अथवा राष्ट्रीय मंत्रिमंडळ स्थापन करून त्याच्या सल्ल्याने हिंदुस्थानचा राज्यकारभार आणि त्याचें युद्धविषयक राजकारण चालू लागलें पाहिजे. केवळ युद्धोत्तर स्वातंत्र्य व स्वयंनिर्णय हे हक्क हिंदुस्थानला देण्यांत येतील, असे भावी आश्वासन देण्यानें युद्ध-सहकार्य करण्यास आम्ही तयार नसून आम्हांस आजपासूनच स्वतंत्र राष्ट्राचा दर्जा प्राप्त झाला आहे असे जनतेला वाटू लागेल आणि आपल्या पुढाऱ्यानीं चालविलेल्या राज्यासच हे युद्ध करून आपण साहाय्य करीत आहो ही भावना जनतेत जागृत व्हावी, असा या मागणीमागचा मुख्य हेतु होता तात्पर्य, आम्ही आता ब्रिटिशाचे गुलाम राहिलो नाही, केवळ ते सागतात म्हणून किंवा ते पैसे देतात म्हणून त्याच्या बाजूनं लढणारें गुलाम राष्ट्र आम्ही नसून एकदर मानवसमाजाच्या संस्कृतीवर ओढवलेल्या संकटाविरुद्ध कर्तव्यबुद्धीनें लढण्यासाठी वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार असणारे आम्ही जगातील स्वातंत्र्यवीर आहो, ही ईर्षा आणि हा उत्साह जनते-मध्ये निर्माण करावा आणि मगच आपण तिला युद्धकार्याला साहाय्य करण्यास अथवा त्या कार्याला आपला नैतिक पाठिंबा देण्यास सागावे, अशी उच्च भूमिका या १४ सप्टेंबर १९३९ च्या राष्ट्रसभेच्या जाहीरनाम्यामध्यें प्रकट करण्यांत आलेली होती

हिंदी राष्ट्राच्या वतीने दुसऱ्या महायुद्धाच्या प्रसंगी राष्ट्रसभेनें हा जो जाहीर-नामा काढला, त्याला केवळ आधुनिक भारताच्या इतिहासांतच नव्हे, तर आधुनिक जगाच्या इतिहासांत एक फार मोठें स्थान प्राप्त झालेले आहे व होणार आहे पहिल्या महायुद्धाच्या वेळीं रशियाने बोल्शेविक क्रांति करून जशी जगाच्या इतिहासाला एक नवी दिशा लावली, त्याचप्रमाणें हिंदी राष्ट्रसभेने १४ सप्टेंबर १९३९ रोजी हिंदी राष्ट्राच्या वतीनें जगातील महायुद्धाकडे पाहण्याचा साम्राज्यशाहीविरोधी जो एक विशिष्ट दृष्टिकोण जाहीर केला, त्यामुळे व त्या जाहीरनाम्यास अनुसरून हिंदी

राष्ट्रसभेच्या नेत्यांनीं पुढें जें तत्त्वनिष्ठेचें वर्तन केलें त्यामुळें जगाच्या इतिहासाला एक नवें वळण लागू लागले आहे. सुमारें सव्वाशें वर्षे ब्रिटिशाच्या गुलामगिरीत खितपत पडलेले हिंदी राष्ट्र आपली मानसिक गुलामगिरी झुगारून देऊन स्वतंत्र बनलें आहे, आणि जगांतील घडामोडींकडे पाहण्याचा एक नवा स्वतंत्र दृष्टिकोण त्याला लाभलेला आहे, अशी हा जाहीरनामा वाचून हिंदी जनतेची व जगांतील विचारवताची खात्री झाली. हा जाहीरनामा पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं तयार केला होता आणि त्यांतील कांहीं मुद्दे जरी म गाधींना नापसत होते अथवा त्यांतील काहीं मुद्द्यांसबधीं महात्मा गांधी व पंडित नेहरू यांच्यामध्यें जरी सूक्ष्म मतभेद होता, तरी त्या जाहीर-नाम्याच्या एकदर तात्त्विक बैठकीस म. गाधीनीं आपला पाठिंबा दिलेला होता. त्यांतील शब्दरचना म. गांधींच्या उच्चतम ध्येयनिष्ठेस बाधक होऊं नये, अशा रीतीनें करण्यांत आलेली होती

म. गांधी हे त्यांच्या समकालीन जगातील सर्वश्रेष्ठ विभूति म्हणून गणले जात होते आणि अशा या सर्वश्रेष्ठ विभूतीच्या समतीवांचून आपल्या जाहीरनाम्यास जगांत मान्यता मिळणार नाहीं हें राष्ट्रसभा जाणत होती तिच्या या जाहीरनाम्याला महात्मा गांधींची सर्वसाधारण समति होती आणि एकंदर राष्ट्राच्या वतीनें या जाहीर-नाम्यात जी तात्त्विक भूमिका स्वीकारण्यांत आली होती, तिच्याहून अधिक अहिंसक अशी भूमिका स्वीकारण्यास एकंदर राष्ट्र आज तयार नाहीं हे ओळखून त्यांनीं राष्ट्राच्या वतीनें हा जाहीरनामा प्रसिद्ध करण्यास आपली समति दिली होती. मात्र त्यांची वैयक्तिक भूमिका याहूनहि अधिक उच्चतर आणि त्यांच्या अहिंसानिष्ठेला अधिक शोभणारी अशी होती. म. गाधी हे आता अशा निश्चित निर्णयाला आले होते, कीं युद्धसस्थेपासून जगाचें कोणतेंहि हित होणें यापुढें शक्य नाहीं, हें जाणून आपल्या राष्ट्राचें संरक्षण करण्यासाठीं सुद्धां आपण शस्त्रबलाचा उपयोग करणार नाहीं आणि केवळ सत्याग्रहानें आपल्या राष्ट्राचें संरक्षण करूं असे मानणाऱ्या लोकाची एक संघटना निर्माण करावी आणि राष्ट्रसभेने सुद्धां शक्य तर युद्धसंन्यासाचे हेंच धोरण स्वीकारावें असें धोरण स्वीकारले तरी जगांत जे दोन पक्ष लढत होते, त्यापैकीं कोणत्या पक्षास आपला नैतिक पाठिंबा आहे व कोणत्या पक्षास तो नाहीं, हे अशा सत्याग्रही संघटनेनें सुद्धां जाहीर केले पाहिजे या दृष्टीनें राष्ट्रसभेने आपला नैतिक पाठिंबा ब्रिटनला आहे किंवा नाहीं ते जाहीर करावें, परतु स्वतः सत्याग्रही भूमिका घेऊन आपण कोणत्याहि परिस्थितींत युद्ध करणार नाही अथवा युद्धाला भौतिक साहाय्य करणार नाहीं, अशी शुद्ध अहिंसेची भूमिका घ्यावी ही भूमिका घेण्यास राष्ट्र-सभा व तिचे पुढारी तयार नव्हते. कारण कोणत्याहि परिस्थितींत आम्ही युद्ध करणार नाहीं असें अहिंसेचें तत्त्व स्वीकारल्यास देशाचें संरक्षणहि केवळ सत्याग्रहानेच करूं, त्यासाठीं सैन्याचा उपयोग करणार नाहीं, असें राष्ट्रसभेला म्हणावें लागलें असतें. तसें करण्याची आपली तयारी नाहीं, हें पंडित जवाहरलाल नेहरूप्रभृति राष्ट्रसभेच्या

नेत्यांनीं गांधीजींना स्पष्टपणें सांगितलें. राष्ट्रसभेच्या नेत्याची ही भूमिका लक्षांत घेऊन गांधीजींनीं वरील जाहीरनाम्यास आपली संमति दिलेली होती आणि त्या जाहीर-नाम्यांत केलेल्या मागण्या ब्रिटननें मान्य कराव्यात, असेंहि आपलें स्वतःचे मत त्यांनीं त्या जाहीरनाम्याबरोबरच प्रसिद्ध केलें होते.

## काँग्रेस-मंत्रिमंडळांचे राजीनामे व असहकार

पण ब्रिटिश मुत्सद्द्यांना यांपैकीं कोणतीहि मागणी मान्य करावयाची नव्हती, ही गोष्ट स्पष्ट झाल्याबरोबर १ नोव्हेंबर १९३९ पासून राष्ट्रसभेने आठ प्रांतातील आपल्या जागाचे राजीनामे देण्यास मत्रिमंडळांना सागितले या आठहि प्रातात राष्ट्र-सभेने केलेल्या मागण्याना प्रातिक लोकसभानी पाठिंबा दिलेला होता. या मागण्या मान्य होईपर्यंत आपण युद्धकालात राज्यकारभार करू शकत नाहीं, कारण हें युद्ध साम्राज्यशाही युद्ध आहे, व अशा कोणत्याहि साम्राज्यशाही युद्धाला हिंदी जनतेचा पाठिंबा नाहीं, असें राष्ट्रसभेच्या मत्रिमडळांनीं राजीनामे देऊन जाहीर केलें युद्ध चाल-विण्याच्या कामीं हिंदी जनतेचा पाठिंबा ब्रिटिशाना नाहीं, हे सनदशीर व कायदेशीर रीतीने दाखवून देण्याचा हा एक मार्ग होता जर राष्ट्रसभेच्या मत्रिमडळाचे हें धोरण हिंदी जनतेला मान्य नाहीं असे ब्रिटिश सरकारचे मत असेल, आणि हिंदी जनता राष्ट्रसभेच्या मागून जाण्यास तयार नसून युद्धाला सहकार्य देण्यास मनापासून इच्छीत असेल, तर ब्रिटिशांनी म्हणजे त्यांच्या प्रातिक गव्हर्नरानीं प्रातातील कायदेमंडळें अथवा लोकसभा बरखास्त कराव्यात आणि युद्धसहकारवादी पक्षांना आपले मत जनतेपुढें माडून बहुमताने पुनः निवडून येण्यास सागावें, असे राष्ट्रसभेचें ब्रिटिश गव्हर्नराना व आपल्या देशातील युद्धसहकारवादी इतर राजकीय पक्षाना आह्वान होते. जर हे आह्वान स्वीकारून युद्धसहकारवादी पक्ष निवडणुकीच्या आखाड्यात उभे राहिले असते आणि बहुमतानें निवडणुकी जिंकून बहुसख्येने निवडून येऊं शकले असते, तरच हिंदी जनतेचा कायदेशीर पाठिंबा मिळवून आम्ही युद्ध चालवीत आहों असें ब्रिटिशांना म्हणतां आले असते. पण या लोकशाहीच्या मार्गाने जाऊन आपले मत जनतेला पटवितां येईल अशी आशा ब्रिटिशांना किंवा युद्धसहकारवादी हिंदी राजकीय पक्षांना वाटत नव्हती हे युद्धसहकारवादी राजकीय पक्ष जनतेंत अप्रिय होते व आपणांस बहुसख्य जनतेचा पाठिंबा नाहीं किंवा तो मिळवितां येणार नाहीं, याची त्यांना जाणीव होती तरीहि गव्हर्नरांनीं अल्पसंख्य पक्षांचीं मंत्रिमंडळे बनविलीं असतीं, तर मत्रिपदे स्वीकारण्यास ते पक्ष तयार होते ! पण ज्या मन्त्र्याना बहुसंख्य प्रतिनिधींचा पाठिंबा मिळवितां येत नाहीं, त्याना मंत्री नेमण्यास ब्रिटिश सरकारहि या युद्धकाळांत तयार नव्हते कारण असे मंत्री नेमले तरी त्यांना लोकांचा पाठिंबा नसल्यामुळें 'मंत्री' हें नावहि त्यांना देतां येणार नाहीं लोकांत अप्रिय असलेल्या पक्षांचीं मंत्रिमंडळें नेमण्यापासून कोणताहि फायदा होण्याजोगा नव्हता हे जाणून त्यांनीं

आठ प्रांतांतील प्रांतिक स्वराज्याची घटना बरखास्त केली आणि सरळ गव्हर्नरांची सत्ता अनियंत्रित स्वरूपात जारी केली अशा रीतीने जो लोकशाहीचा बुरखा १९३७ सालापासून ब्रिटिश साम्राज्यशाहीने आपल्या तोंडावर घेतला होता, तो तिने महायुद्ध सुरू होतांच व त्या महायुद्धास हिंदुस्थान स्वातंत्र्य मिळाल्याशिवाय पाठिंबा देण्यास तयार नाही हे दिसून येताच लागलीच फेकून दिला. आठ प्रांतांत गव्हर्नराच्या अनियंत्रित सत्तेची सुलतानशाही उघडपणे सुरू झाली आणि या महायुद्धाला हिंदी राष्ट्राचा नैतिक पाठिंबा नाहीं, ही गोष्ट जगजाहीर झाली राष्ट्रसभेने आपल्या हातातील आठ प्रांतातील राजसत्तेचा त्याग करून ही गोष्ट निःसंशय सिद्ध केली आणि जनतेला महायुद्धाचे खरे स्वरूप समजावून देऊन आपल्या स्वातंत्र्यासाठीं अनत्याचारी मार्गाने लढत राहणें हेच परतंत्र देशाचे पहिले कर्तव्य आहे आणि हे कर्तव्य पार पाडल्यानेच जगांतील लोकशाही आणि राष्ट्रीय स्वयनिर्णय या तत्त्वांना पाठिंबा देण्याचें व मानवसंस्कृतीच्या प्रगतींत भर टाकण्याचें आपले कर्तव्य आपणास पार पाडतां येईल, असा संदेश हिंदी जनतेला राष्ट्रसभेच्या नेत्यांनी दिला.

यानंतर राष्ट्रांतील स्वातंत्र्यवीर राष्ट्रसभेच्या झेंड्याभोंवती जमा होऊ लागले आणि यापुढील सविनय कायदेभंगाचा लढा केव्हां सुरू होणार, अशी उत्कंठेनें राष्ट्रसभेच्या नेत्यांकडे पृच्छा करू लागले म. गांधींनीं या वेळीं संयमानें व शिस्तीनें वागण्याचा आणि उतावीळपणानें किंवा अविवेकाने एकदम कोणत्याहि लढ्यास प्रवृत्त न होण्याचा आदेश राष्ट्राला दिला होता हातातील राजसत्ता सोडून देऊन, युद्धाशीं असहकार पुकारून, ब्रिटिश सत्तेला युद्धकालात आह्वान देणारी व त्याच्या साम्राज्यशाहीविरुद्ध उघड बंड पुकारणारी ही संस्था जर या वेळीं अविवेकी किंवा अत्याचारी बनली असती अथवा तिचे नेतृत्व महात्मा गांधींच्यासारख्या जगप्रसिद्ध विभूतीच्या हातीं नसते, तर तिला आपल्या शस्त्रबलानें नेस्तनाबूद करण्यास ब्रिटिश सत्तेला या वेळीं फारसे कठिण गेलें असतें असे नाहीं राष्ट्रसभा ही संस्था खरोखर लोकशाही किंवा राष्ट्रीय स्वातंत्र्य यासाठीं लढत नसून ती आपल्या पक्षाची हुकूमशाही देशांत स्थापन करण्यासाठीं धडपडत आहे, तिला हिंदूंचे राज्य सर्वांवर स्थापन करावयाचें आहे, मुसलमानांना दडपून टाकावयाचे आहे, इतर अल्पसंख्याकावर जुलूम करावयाचा आहे, इत्यादि अनेक आरोप या वेळी तिच्यावर ब्रिटिश सरकार करीत होतें आणि हिंदुस्थानातील मुस्लीम लीगप्रभृति जमातवादी अनेक पक्ष तिच्यावर तसाच हुकूमशाहीचा आरोप करून राष्ट्रसभा ही एक आमच्या देशात फॅसिस्ट संस्था बनत आहे, तिचे पुढारी हे हिंदुस्थानातील हिटलरच आहेत, अशा प्रकारचे आरोप हे हिंदी पक्ष तिच्यावर करीत होते. मुस्लीम लीगच्या अविवेकी प्रचारामुळे देशांत हिंदु-मुसलमानांचे दंगे सुरू होण्यास अत्याचारी वातावरण निर्माण झाले होते या अत्याचारी वातावरणांत हिंदुसभापक्षहि आपल्यापरी भर घालीत होता आणि राष्ट्रसभापक्षाला हिंदूंनीं आपले प्रतिनिधि समजूं नये, असा प्रचार त्यानें चालविला होता. अशा

वातावरणांत जर आपण एकदम सत्याग्रह सुरू केला, तर सरकार तेवढेच निमित्त करून सर्व जबाबदार पुढाऱ्याना तुरुंगात डांबील आणि सर्वत्र जातीय दंगे उसळूं लागतील, अशा जातीय दंग्यांच्या वातावरणात स्वातंत्र्याचा लढा बाजूस पडेल, हे ओळखून म गांधींनी सत्याग्रहाचा लढा लवकर सुरू करावयाचा नाही आणि केला तरी शक्य तो आपण तुरुगाबाहेर राहून शिस्तीने व शांततेने तो चालविण्याचे प्रयत्न करावयाचे, असेंच धोरण मनाशीं ठरविलें असावें मत्रिमडळाचे राजीनामे देऊन हिंदी राष्ट्राचा महायुद्धाशी असहकार आहे हे जगजाहीर केल्यानतर पुढील कायदेभंगाचा किंवा सत्याग्रहाचा लढा सुरू करण्यापूर्वी देशात विधायक लोकसेवेच्या रूपाने बरेचसें शाततेचे वातावरण निर्माण केले पाहिजे, खेड्यापाड्यात राष्ट्रसभेचे सेवक जाऊन तेथील जनतेंत आपल्या अनत्याचारी लढयाचे तत्र त्यानीं फैलावले पाहिजे आणि जेव्हा लढा सुरू होईल तेव्हा तो शाततेनें चालविण्याची पूर्वतयारी व व्यापक सघटना आधीं निर्माण केली पाहिजे, असे म गाधींचे धोरण होतें तथापि युद्धाशी असहकार करण्याच्या आपल्या धोरणातून आज ना उद्या केव्हा तरी राष्ट्रसभेला सत्याग्रह पुकारावा लागणार हेहि त्यानीं ओळखिले होते हा सत्याग्रह म गाधींच्या नेतृत्वाखालीं व त्याच्या तत्त्वानुसार चालावा अशी राष्ट्रसभेच्या नेत्याची इच्छा होती. पण या सर्व गोष्टीस अद्यापि राष्ट्रसभेच्या अधिवेशनाची संमति मिळावयाची होती हे कार्य १९४० च्या मार्च महिन्यांत रामगड येथे मौलाना आझाद याच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनात करावयाचे होते

हिंदी जनतेच्या वतीने जो स्वातंत्र्याचा सत्याग्रहसंग्राम सुरू करावयाचा तो म गाधीच्या नेतृत्वाखालीच सुरू करणे इष्ट व त्या परिस्थितींत अपरिहार्य होते, याची पूर्ण जाणीव जयप्रकाशप्रभृति समाजवादी नेत्यांनीं या वेळीं आपल्या पक्षास करून दिलेली होती हें त्याचे धोरण असल्यामुळे या वेळीं म. गाधींच्या नेतृत्वास विरोध करण्याचा प्रयत्न जे करीत होते, त्याना त्याचा विरोध होता १९४० साली जयप्रकाश नारायण यांनी आपल्या पक्षाच्या वतीने गांधींच्या नेतृत्वासबधींचे धोरण म्हणून जें जाहीर केलें आहे त्यात ते म्हणतात, "आजच्या नेत्याच्या विरुद्ध आज झगडा निर्माण करणे हे केवळ बदसल्ल्याचे आहे असेंच नव्हे, तर ते उघडपणे विघातक आहे जर एकाद्या विभागातर्फे नव्हे, तर सर्व राष्ट्राच्या वतीनें आज लढा करावयाचा आहे, तर तो म गांधीच सुरू करूं शकतील अशी जर वस्तुस्थिति आहे, तर त्यांच्या नेतृत्वास विरोध करणे हे आत्मघातकी आहे त्यांना आपले पूर्ण सहकार्य देणे आणि लढ्याच्या पूर्व तयारीसाठीं जे जे करणें अवश्य आहे, त्याबाबत त्याना आपली निष्ठा देणें तितकेच अवश्य आहे, ही वस्तुस्थिति आपण मान्य केलीच पाहिजे. जर यानतर त्यानीं लढा केलाच नाहीं, तरच आपण त्यांच्यापासून अलग होऊन आपल्यापाशीं सामर्थ्य असेल, तर लढ्याची जबाबदारी आपण घेऊं शकतों" (Towards struggle By Jayaprakash Narayan, Page 141).

## कॅंग्रेसचें रामगड-अधिवेशन

रामगड-कॉंग्रेसचे अधिवेशन भरण्यापूर्वीच जयप्रकाश नारायण यांना युद्धविरोधी भाषण केल्याबद्दल ब्रिटिश सरकारनें तुरुगात ठेविलें होते तथापि त्यांनीं तुरुगातून रामगड-कॉंग्रेसपुढें ठेवण्यासाठीं म्हणून एक ठराव म. गांधींच्याकडे पाठविला होता हा ठराव जरी त्या वेळीं राष्ट्रसभेने मान्य केला नाहीं, तरी म गांधींनीं तो ' हरिजनां 'त प्रसिद्ध करून त्याला आपली स्वतःची वैयक्तिक मान्यता आहे असे पुढे जाहीर केलें. म. गाधीनी राष्ट्रसभेतील समाजवादी पक्षाला व त्या पक्षाच्या नेत्यांच्या या कार्यक्रमाला आपुलकीने पाठिंबा देऊन राष्ट्रसभेच्या स्वातंत्र्यसंग्रामात त्याच्या शक्तीचा शक्य तो उपयोग करून घ्यावयाचा असे धोरण ठेविले होते. इतकेच नाहीं, तर हिंदुस्थानला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानतर त्याच्यापुढें समाजवादाच्या प्रस्थापनेचा जो लढा अपरिहार्यपणे उभा राहणार होता, त्या लढ्यासहि अनत्याचारी स्वरूप प्राप्त व्हावें यासाठी देशातील समाजवादी पक्षाची निष्ठा आपल्या अहिंसेकडे खेचून घेण्याचे कार्य त्यांनीं या वेळेपासूनच दूरदृष्टीने सुरू केलें होते या ठरावासबधीच्या त्याच्या या वृत्तीवरून हेच उघड होते. पण त्याची ही दूरदृष्टि व अहिंसेनें समाजवादाची संस्थापना करता येईल, ती आपण करून दाखवू, अशा तऱ्हेचा त्यांच्या अतःकरणांतील आत्मविश्वास राष्ट्रसभेत गाधीवादी म्हणविणारे जे इतर राजकीय पुढारी होते. त्यांच्यापाशीं नव्हता. जयप्रकाश नारायण यानी जो ठराव रामगड-कॉंग्रेसपुढे मांडण्यासाठीं दिला होता, त्याचा गोषवारा देण्यापूर्वीं रामगड-अधिवेशनाने स्वातंत्र्यसंग्रामासंबंधीं जो ठराव केला त्याची माहिती दिली पाहिजे.

रामगड-अधिवेशनांत राष्ट्रसभेनें जो ठराव मंजूर केला, त्याचा आशय पुढील प्रमाणे होता :

"( १ ) ब्रिटिश सरकारच्या वतीनें अलीकडे हिंदुस्थानसंबधीं ज्या ज्या घोषणा करण्यांत आल्या आहेत त्यावरून हें सिद्ध होत आहे, कीं ग्रेट ब्रिटन हे युद्ध मूलतः साम्राज्यासाठीं चालवीत आहे आणि हिंदुस्थान, अशियांतील इतर देश व आफ्रिका खडांतील देश यांच्या पिळवणुकीवर उभारलेलें आपलें साम्राज्य सुरक्षित ठेवून तें सुदृढ बनविणें, हाच त्याचा हेतु आहे अशा परिस्थितींत राष्ट्रसभा प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षपणें या युद्धात सहकारी होऊ शकत नाहीं कारण तसें करणें म्हणजे ही पिळवणूक कायम ठेवून ती चिरतंन करणेच होय.

( २ ) राष्ट्रसभा पुन्हा असे जाहीर करते, कीं सपूर्ण स्वातंत्र्यावांचून इतर कोणतीहि देणगी हिंदी जनतेला मान्य होणार नाहीं...स्वातंत्र्य, लोकशाही आणि राष्ट्रीय ऐक्य यांच्या आधारावरच हिंदी राज्यघटना स्थापन झाली पाहिजे हिंदुस्थानचे खड पाडण्याचे किंवा त्याचें राष्ट्रत्व दुभगण्याचे जे प्रयत्न होत आहेत, त्यांना राष्ट्रसभा अमान्यता दर्शवीत आहे. राष्ट्रसभा ही जातीय ऐक्य साधण्याचे प्रयत्न करीत

आहे. तशी ती यापुढेंहि तसे प्रयत्न करीत राहील तथापि या प्रश्नाचा अखेरचा निर्णय घटनापरिषदेवांचून लागूं शकणार नाहीं अशा परिषदेवर बहुसख्य गट व सर्व अल्पसंख्य गट यांच्या लोकनियुक्त प्रतिनिधींमध्ये तडजोडीने हा प्रश्न सुटूं शकेल, अथवा तसा तो सुटला नाहीं तर लवादामार्फत सोडवितां येईल.

(३) हिंदी संस्थानिक किंवा परकीय हितसंबंध यांना हिंदी स्वातंत्र्याच्या मार्गात आड येण्याचा हक्क आहे, हें ब्रिटिशांचे धोरण राष्ट्रसभा मान्य करू शकत नाहीं. हिंदुस्थानचें सार्वभौमत्व हिंदी जनतेच्या ठायींच राहिलें पाहिजे, मग ती संस्थानी प्रजा असो की प्रांतिक प्रजा असो ; आणि इतर सर्वांचे हितसंबंध या जनतेच्या हितसंबंधाहून गौण गणिले पाहिजेत.

(४) युद्धाशीं सहकार्य करू नये व परकीय अमलातून हिंदुस्थानला मुक्त करण्याचा निर्धार अमलांत आणिता यावा, म्हणून ज्या प्रांतांत राष्ट्रसभेचें बहुमत होतें तेथें तिच्या मंत्रिमंडळानीं राजीनामे दिले. हे पहिलें पाऊल टाकल्यानंतर कायदे-भंगाचें पाऊल टाकणे स्वाभाविक व अवश्यच आहे राष्ट्रसभेची संघटना या कृतीला पुरेशी पात्र आहे असें दिसून येताच अथवा परिस्थितीमुळें अवेळींच आणिबाणीचा काळ प्राप्त झाला, तर हे कायदेभंगाचें पाऊल टाकण्यास राष्ट्रसभा न कचरतां पुढें येईल.

यानंतर राष्ट्रसभेचे कार्यकर्ते कडक शिस्त पाळीत आहेत व विधायक कार्याला वाहून घेत आहेत असे दिसून आलें, तरच आपण कायदेभंगाच्या मोहिमेची जबाब-दारी अंगीकारू, या महात्मा गांधींच्या म्हणण्याची स्मृति कार्यकर्त्यांना करून देऊन ही मोहीम सुरू करण्याचा अधिकार अ भा. समितीला अथवा गरज पडेल तर तिच्या कार्यकारी-मंडळाला असावा असें ठरावात म्हटलें होते. रामगडच्या अधिवेशनानंतर राष्ट्रसभेच्या सर्व प्रांतिक व जिल्हा समित्यांनीं सत्याग्रही स्वयंसैनिकांची नोंदणी करून शिबिरें उघडण्यासहि सुरुवात केली

या अधिवेशनापुढें ठेवण्यासाठीं म्हणून जयप्रकाश नारायण यानीं पाठविलेला ठराव व त्यासंबंधीं म. गांधींनीं प्रकट केलेलें आपले मत पुढे दिलें आहे:

"एक प्रचंड राष्ट्रीय आंदोलन होण्याच्या कालांत हें राष्ट्र व राष्ट्रसभा आज गुतलेलीं आहेत. स्वातंत्र्याचा अंतिम संग्राम लवकरच लढला जाणार आहे सर्व जगांत परिवर्तन घडवून आणणाऱ्या प्रचंड शक्ती संचार करीत असतांना हें घडून येणार आहे युरोपीय महायुद्धाच्या महान् आपत्तींतून एका नव्या जगाची निर्मिती करण्याचा विचार विवेकी मनांत उद्भूत होत आहे. राष्ट्रा-राष्ट्रांतील आणि मनुष्या-मनुष्यांतील सहकार्य व प्रेम या भावनावर अधिष्ठित झालेलें नवे जग निर्माण केलें पाहिजे. अशा प्रसंगी ज्या स्वातंत्र्याच्या ध्येयासाठीं आपण लढत आहोंत आणि ज्यासाठीं हिंदी जनतेला आत्यंतिक क्लेश सहन करण्यास आपण आवाहन करीत आहोंत, त्या ध्येयाची निश्चित कल्पना जनतेला देणें राष्ट्रसभेला अवश्य वाटतें.

"राष्ट्रा-राष्ट्रांत शांतता स्थापन व्हावी आणि संपूर्ण शस्त्रसंन्यास अमलांत यावा,

यासाठीं स्वतंत्र हिंदुस्थान प्रयत्न करीत राहील. तसेच राष्ट्रा-राष्ट्रातील तटे एकाद्या आंतरराष्ट्रीय अधिकारी राजकीय संस्थेमार्फत शांततेनें मिटविले जावेत व ही राजकीय संस्था स्वतंत्रतेनें निर्माण व्हावी, असाहि प्रयत्न राष्ट्रसभा करील विशेषतः लहान-थोर शेजारी राष्ट्रांनीं अत्यंत स्नेहभावनेने रहावे आणि कोणत्याहि परराष्ट्रीय भूमीवर कोणीहि लोभी नजर ठेवूं नये, असें धोरण अमलात आणण्याचा प्रयत्न राष्ट्रसभा करील.

"राष्ट्रांतील कायदे जनतेनें स्वतंत्रपणें व्यक्त केलेल्या मतावर अधिष्ठित झालेले असावेत. राष्ट्रांतील सुव्यवस्थेचा अंतिम आधार लोकमताचें ऐक्य व त्याची शक्ति हाच असेल

"भारतीय स्वतंत्र स्वराज्य प्रत्येक राष्ट्रिकास संपूर्ण राष्ट्रिक स्वातंत्र्य, सांस्कृतिक व धार्मिक स्वातंत्र्य यांची हमी देईल. मात्र हिंदी जनतेनें घटनापरिषदेमार्फत बनविलेली राज्यघटना अत्याचारानें उलथून पाडण्याचें स्वातंत्र्य कोणासहि मिळणार नाहीं.

"राष्ट्रिका-राष्ट्रिकांमध्यें सरकार कोणताहि भेद करणार नाहीं. प्रत्येक राष्ट्रिकास समान हक्काची शाश्वती देण्यांत येईल जन्मजात भेदाभेद व सवलती सर्व नष्ट करण्यात येतील वंशपरंपरेनें मिळणाऱ्या किंवा सरकारनें दिलेल्या कोणत्याहि पदव्या कोणास मिळणार नाहींत

"सामाजिक न्याय व आर्थिक समता यांच्या आधारावर स्वराज्याची आर्थिक व राजकीय घटना बनविण्यांत येईल. ही घटना समाजातील सर्व व्यक्तींच्या गरजा भागविण्याचा शक्य तो प्रयत्न करील, तरीहि भौतिक सुख हेच एक तिचें ध्येय असणार नाहीं. आरोग्यदायक राहणी आणि व्यक्तीची बौद्धिक व नैतिक उन्नति हेंहि तिचे साध्य राहील. यासाठीं सामाजिक न्यायसंस्थापना करावी म्हणून लहान प्रमाणावर चालणाऱ्या वैयक्तिक उत्पादनाला व सर्वांच्या समान हितासाठी चाललेल्या सहकारी उत्पादनाला सरकार साहाय्य करील. मोठ्या प्रमाणावर चाललेलें सर्व सामुदायिक उत्पादन अंतीं सामाजिक मालकीखालीं व नियंत्रणाखालीं आणण्यात येईल. याचा उपक्रम करताना दळणवळणाचीं प्रचंड साधनें, जहाजे, खाणी आणि जड धातूंचे कारखाने यांचें राष्ट्रीकरण प्रथम करण्यांत येईल. कापडाच्या धंद्याचें क्रमाक्रमानें विकेंद्रीकरण करण्यांत येईल.

"ग्रामजीवनाची पुनर्घटना करण्यात येऊन ग्रामीण स्वराज्य स्थापन केलें जाईल खेडीं शक्य तितकीं स्वयंपूर्ण करण्यात येतील. देशातील जमिनीसंबंधींच्या कायद्यांत आमूलाग्र सुधारणा करण्यांत येऊन प्रत्यक्ष शेत कसणाऱ्यांचीच मालकी शेतजमिनीवर असावी, हें धोरण स्वीकारण्यांत येईल तसेंच आपल्या कुटुंबाचा निर्वाह बऱ्या प्रकारें चालेल इतक्याहून अधिक जमीन कोणाहि शेतकऱ्याला मिळणार नाहीं. या धोरणामुळें जमीनदारीच्या निरनिराळ्या पद्धती व भूदास्याचे निरनिराळे प्रकार नष्ट करण्यांत येतील.

" समाजातील निरनिराळ्या वर्गांचें हितसंरक्षण सरकार करील. परंतु जेव्हां दरिद्री व दलितवर्गाच्या हितार्शी वरिष्ठवर्गाच्या हिताचा विरोध येईल, तेव्हां दलितवर्गाचें हितरक्षण करून सामाजिक न्यायदानाचा ताजवा समतोल बनविण्यांत येईल

" सरकारी मालकीखालीं व व्यवस्थेखालीं चालणाऱ्या सर्व उद्योगधंद्यांतील व्यवस्थाकार्यांत कामगाराना प्रतिनिधित्व देण्यांत येईल, आणि सरकारनियुक्त प्रतिनिधींच्या बरोबरीची सत्ता कामगारनियुक्त प्रतिनिधींनाहि राहील

" हिंदी संस्थानात पूर्ण लोकसत्ताक राज्यपद्धति अस्तित्वांत येईल. सामाजिक भेदाभेद नष्ट करून राष्ट्रिकांत समता स्थापन करण्याच्या दृष्टीनें राजे, नबाब वगैरे कोणीहि राज्याधीश राहणार नाहींत.

"असे ध्येय राष्ट्रसभेच्या मनश्चक्षूपुढे आहे व त्याची स्थापना करण्यासाठीं ती प्रयत्न करीत राहील या जगात सर्व वंशाच्या, जातींच्या व धर्मांच्या लोकाना सुख, संपत्ति व स्वातंत्र्य यांची प्राप्ति होईल व या सर्वांच्या प्रयत्नांनीं या पायावर एक प्रचंड वैभवशाली राष्ट्र निर्माण होईल, असा राष्ट्रसभेचा विश्वास आहे "

या ठरावाला आपला पाठिंबा देतांना म. गाधी लिहितात :

"(या ठरावासंबधीं) मी केलेल्या प्रयत्नांचें काय झाले ते मी श्री जयप्रकाश यांना कळविलें तेव्हां त्यानीं उत्तर धाडलें, कीं आपण त्या ठरावाला पूर्ण किंवा शक्य तितका पाठिंबा देऊन तो प्रसिद्ध केला तरी माझें समाधान होईल.

"श्री. जयप्रकाश याच्या इच्छेला मान देण्यात मला कोणतीहि अडचण वाटत नाहीं हिंदुस्थान स्वतत्र होताच शक्य तितक्या लवकर अमलात आणण्याचें ध्येय या दृष्टीनें श्री जयप्रकाश यानीं प्रतिपादिलेल्या सिद्धातापैकीं फक्त एक वगळून मीं सर्वांना सर्वसामान्य मान्यता देतों

" आज हिंदुस्थानात जे समाजवादी आहेत त्यानीं आपले ध्येय जाहीर करण्या-पूर्वीच मी समाजवादी झालों होतो, असा माझा दावा आहे पण माझा हा समाज-वाद कोणत्याहि पुस्तकांतून मीं घेतलेला नसून तो माझ्या नैसर्गिक वृत्तींतूनच निर्माण झालेला आहे. अहिंसेवरील माझ्या अचल निष्ठेतून त्याचा उगम झाला आहे. जो मनुष्य कोणत्याहि सामाजिक अन्यायाविरुद्ध–मग तो अन्याय केंठेहि असो–बंड करून उठू शकत नाहीं, तो सक्रिय अहिंसावादी होऊंच शकत नाहीं माझ्या माहिती-प्रमाणे समाजवादी सिद्धाताची स्थापना करण्यासाठीं अत्याचाराची आवश्यकता आहे, असा पाश्चात्य समाजवाद्याचा विश्वास आहे; पण हें दुर्दैव होय

" माझा असा नित्य विश्वास आहे, कीं अत्यत अवनत व हीन गणलेल्यानाहि सामाजिक न्याय मिळवायचा असेल, तर तो शस्त्रबलानें मिळूंच शकणार नाही. तसाच माझा असाहि विश्वास आहे, कीं अत्यत अवनत लोकानाहि अनत्याचारी मार्गाचें शिक्षण दिल्यास आपणावर होणाऱ्या अन्यायांचें निवारण त्यांना करतां येईल. याचेंच नांव अनत्याचारी असहकार. सहकार हा जसा एक धर्म आहे, तसाच असहकार हाहि

विशिष्ट परिस्थितींत धर्म बनत असतो. आपल्या नाशाशीं अगर गुलामगिरीशीं सह-कार्य करावें, असें बंधन कोणावरहि असूं शकत नाहीं.

"म्हणून त्यांच्या ठरावावरून आपणांस अभिप्रेत असणारें जग अनत्याचारी मार्गानें निर्माण होईल याला त्यांनीं मान्यता दिली आहे, असें मला दिसतें. हें पाहून माझ्या अतःकरणास आनद होत आहे माझी अशी खात्री आहे, कीं अनत्याचारी असहकारानें जे प्राप्त होऊ शकते, ते अत्याचाराने कधींहि प्राप्त होणार नाहीं व तेंहि अन्याय करणारांचे हृदयपरिवर्तन होऊन घडून येतें. अनत्याचाराला द्यावी तितकी संधिच आपण अद्यापि हिंदुस्थानात दिलेली नाहीं इतकें असूनहि त्यापासून आपला इतका लाभ झाला आहे हे आश्चर्य आहे

"श्री जयप्रकाश याचे जमिनीसबधींचे सिद्धात कांहींना भयकर भासूं शकतील, पण वस्तुतः ते तसे नाहींत.

"कोणत्याहि मनुष्यापाशीं त्याच्या प्रतिष्ठित निर्वाहास आवश्यक असणाऱ्या जमिनीहून अधिक जमीन असतां कामा नये. आपली स्वतःची अशी जमीन नसल्या-मुळेंच जनतेला दीनदारिद्य भोगावें लागत आहे, ही वस्तुस्थिति कोण नाकारू शकेल?

"म्हणून श्री. जयप्रकाश याच्या सिद्धातांना अनत्याचारी दृष्टीने सर्वसामान्य पाठिंबा देण्यास मला अडचण वाटत नाहीं तरी संस्थानिकांसंबंधीं त्यांच्या सिद्धांताला मी पाठिंबा देऊं शकत नाहीं अनत्याचारी मार्गानीं आम्हांस स्वातत्र्य मिळालें—व श्री. जयप्रकाश याच्या योजनेंत तसेच गृहीत धरले आहे—तर ज्या योजनेतून सस्था-निक स्वेच्छेनें नाहींसे झाले आहेत अशी योजना माझ्या अपेक्षित येऊं शकत नाहीं त्याच्याशीं काहीहि समेट झाला, तरी तो राष्ट्राला पूर्णपणे पाळावा लागेल म्हणून अशीच तडजोड माझ्या विचारात येऊं शकते, कीं जींत मोठ्या संस्थानिकांना आपला दर्जा कायम ठेवतां येईल एका दृष्टीनें हा दर्जा आजच्यापेक्षांहि श्रेष्ठ असेल, पण दुसऱ्या दृष्टीनें तो मर्यादित झालेला असेल. कारण हिंदुस्थानातील इतर प्रातातील लोकाना जे स्वराज्याचे हक्क उपभोगतां येतील, ते सर्व हक्क त्यांना आपल्या प्रजेलाहि द्यावे लागतील.. .... कदाचित् श्री जयप्रकाश यांना असा विश्वास नसेल, कीं हे संस्थानिक आपण होऊन आपली अनियंत्रित सत्ता सोडण्यास तयार होतील. पण माझा तसा विश्वास आहे"

राष्ट्रसभेनें स्वातत्र्याचा सत्याग्रहसंग्राम सुरू करण्यास संमति देतांना मंजूर केलेला ठराव आणि तिच्यापुढें माडण्यासाठीं म्हणून म गांधींच्याकडे श्री जयप्रकाश यानीं पाठविलेला वरील ठराव, या दोहोंची तुलना केल्यास राष्ट्रसभेंतील राष्ट्रवादी व समाज-वादी अशा दोन विचारसरणींच्या नेत्यांतील मतभेद कोठें व कितपत होता, त्याची कल्पना येऊं शकते. राष्ट्रवादी विचाराच्या जुन्या पिढीच्या लोकांना स्वातंत्र्यप्राप्ती-नंतर समाजवादाची स्थापना केली पाहिजे अथवा ती स्थापना आपण करू अशा प्रकारचें आश्वासन जनतेला द्यावें, असे वाटत नव्हतें. याच्या उलट, आपली स्वातंत्र्याची

कल्पना ही केवळ भाडवलदार लोकशाहीची नसून ती समाजवादी लोकशाहीची आहे, असे स्पष्ट आश्वासन देऊन जनतेला स्वातंत्र्याच्या लढ्यास प्रवृत्त करावें, अशी समाजवादी तरुण पुढाऱ्यांची दृष्टि होती. महात्मा गांधी हे या दोन पुढाऱ्यांमधील दुव्या-सारखे होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा प्रथम लढून तो यशस्वी होताच त्या स्वातंत्र्याचें समाजवादी लोकशाहींत रूपांतर करण्यांत यावें, असें त्याचे स्वतःचें मत होतें. या दृष्टीनेंच त्यांनी रामगड-अधिवेशनाच्या वेळी राष्ट्रवादी नेत्यांनीं श्री जयप्रकाश यांचा ठराव मजूर केला नाहीं याबद्दल जरी त्यांना दोष दिला नाहीं, तरी स्वातंत्र्य प्राप्त होतांच राष्ट्राचें निकटवर्ती ध्येय म्हणून समाजवादी लोकशाही हेंच मान्य करण्यांत यावे व मी स्वतः समाजवादीच आहे, हा माझा समाजवाद माझ्या अहिंसावृत्तीतून निर्माण झालेला आहे, असे सागून आपला स्वतःचा पाठिंबा म. गांधींनीं वरील ठरावाला दिला व तसें 'हरिजन' मधून जाहीर केले या त्यांच्या कृतीपासून योग्य तो बोध पुढें समाजवादी पक्षानेंहि घेतला तो म्हणजे स्वातंत्र्याचा लढा चालू असता त्याला वर्गविग्रहाचे स्वरूप देऊ नये, असा निर्णय त्यानें केला आणि म गांधींच्या आश्वासनावर सतोष मानून त्यानीं राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत जनतेला मार्गदर्शन करण्याचे आपल्या बुद्धीप्रमाणे शक्य ते प्रयत्न केले

## तडजोडीचे विफल प्रयत्न

रामगड-अधिवेशनानें युद्धाशीं असहकार जाहीर करून कायदेभंगाच्या लढ्याचें धोरण मान्य केलें असलें, तरी कायदेभगाचा लढा उतावीळपणाने सुरू करावयाचा नाही असा महात्मा गांधींचा पूर्ण निर्धार होता हें अधिवेशन मार्चमध्यें झाल्यानंतर राष्ट्रसभेंतील अधिकारवादी सनदशीर वृत्तीच्या नेत्यानीं पुन्हा एकदां ब्रिटिश सर-कारशीं तडजोड होते किंवा काय ते पाहण्याचा प्रयत्न केला. असा प्रयत्न करताना त्यानीं पुणें येथें अखिल भारतीय राष्ट्रसभा-समितीची बैठक भरवून जर ब्रिटिश सरकारने सपूर्ण स्वातंत्र्य व स्वयनिर्णय हे हक्क मान्य करून ताबडतोब हगामी राष्ट्रीय सरकार स्थापन केलें, तर राष्ट्रसभा ब्रिटिशांनी चालविलेल्या महायुद्धाशीं सहकार्य करण्यास तयार आहे असा ठराव केला. या बैठकीस महात्मा गांधी स्वतः हजर राहिले नाहींत कारण त्यांना हें धोरण तत्त्वतःच मान्य नव्हते पुढे लवकरच या मागण्या मान्य करता येणें शक्य नाहीं असे ब्रिटिशांनीं जाहीर केलें आणि राष्ट्रसभेच्या मागण्या फेटाळून लावतांना व्हाइसरॉयनें मुस्लीम लीगपक्षास मात्र संतुष्ट करण्यासाठीं ज्या घटनेला अल्पसख्याकांचा विरोध असेल, अशा घटनेस आपण केव्हाहि मान्यता देणार नाहीं, असे स्पष्ट आश्वासन दिले. यानतर समेट करू पाहणाऱ्या अधिकारवादी पुढाऱ्यांचा मार्ग कुंठितच झाला आणि सर्व पुढारी पुन्हां महात्मा गांधीच्याकडे गेले व त्यांनीं आता सत्याग्रहास सुरुवात करावी अशी विनंती केली यानंतर सप्टेंबरच्या १६ तारखेस मुंबईस अ. भा. राष्ट्रसभा-समितीची बैठक झाली, आणि तिने महात्मा

गांधींना वैयक्तिक सत्याग्रहाची मोहीम सुरू करण्याचा अधिकार दिला. ही वैयक्तिक सत्याग्रहाची मोहीम युद्धविरोधी प्रचार करण्याच्या स्वरूपाने नोव्हेंबर १९४० च्या प्रारंभापासून सुरू झाली

## युद्धविरोधी प्रचार-स्वातंत्र्य

या युद्धविरोधी सत्याग्रहाचे स्वरूप प्रातिनिधिक ठेवावयाचे असा म गांधींचा विचार होता प्रातिनिधिक सत्याग्रह म्हणजे सर्वसामान्य जनतेला कायदेभंग करण्यास प्रवृत्त न करतां तिला मान्य अशा काही प्रतिनिधिभूत प्रतिष्ठित लोकनायकांनींच जनतेच्या वतीनें कायदेभंग करून तुरुंगांत जावयाचें, किंवा सरकार देईल ती दुसरी शिक्षा सोसावयाची. अशा रीतीने प्रातिनिधिक सत्याग्रह करण्यांत लोकांचे मत प्रकट व्हावे आणि या मताच्या सिद्धीसाठी भोगावे लागणारे क्लेश सहन करण्यास लोकांचे पुढारी तयार आहेत, हे जनतेला व सरकारला दाखवून द्यावें असा द्विविध हेतु होता. हिंदुस्थानातील जनतेचा महायुद्धाशीं सहकार्य करण्यास किती तीव्र विरोध आहे तें प्रकट करावे आणि त्या विरोधासाठीं शांततेने क्लेश भोगण्यास तयार होण्याचा मार्ग जनतेला दाखवून द्यावा, या दृष्टीने ही प्रातिनिधिक सत्याग्रहाची मोहीम सुरू करण्यांत आली होती हा प्रातिनिधिक सत्याग्रह कोणीं, कोठे व कसा करावयाचा यासबंधींचा निर्णय स्वतः महात्मा गांधी हेच देत होते ही मोहीम चालू असतांना त्यांना स्वतः तुरुगात जाण्याची इच्छा नव्हती व तसे त्यांनीं जाहीरहि केलें होते. या मोहिमेचे सुरुवातीस पहिले दोन सत्याग्रही प्रतिनिधी म्हणून, आचार्य विनोबा भावे आणि पडित जवाहरलाल नेहरू, असे दोन पुढारी त्यांनीं योजिले होते म गाधींची निरपेक्ष अहिसा, जीवननिष्ठा या दृष्टीने मान्य करणारे म्हणून आचार्य विनोबा याची निवड करण्यात आली होती. ज्याना कोणत्याहि परिस्थितींत युद्ध करणे मान्य नाही अशा सत्याग्रहींचे ते प्रतिनिधी होते. पंडित जवाहरलाल नेहरू हे असे निरपेक्ष अहिसा-वादी सत्याग्रही नव्हेत कोणत्याच परिस्थितींत आपण युद्ध करणार नाहीं, या भूमिकेनें ते महायुद्धाला विरोध करीत नव्हते. हे महायुद्ध साम्राज्यशाही युद्ध आहे आणि साम्राज्यशाही युद्धाशीं आपण सहकार्य करणार नाही व आपल्या राष्ट्राने अशा साम्राज्यशाही युद्धाशीं सहकार्य करूं नये, एवढेच त्यांचें मत होते. त्यांचा हा सत्याग्रह आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं व स्वयंनिर्णयाच्या हक्कासाठीं होता राष्ट्रसभेंत बहुतेक सर्व लोक याच वृत्तीचे होते आणि त्यांचे प्रतिनिधि म्हणून पडित जवाहरलाल नेहरू यांची निवड करण्यांत आली होती. अशा दोन प्रतिनिधिभूत लोकनायकांच्या पुरस्कारानें सुरू झालेली ही वैयक्तिक सत्याग्रहाची युद्धविरोधी प्रचारमोहीम सुमारे एक वर्षभर चालू होती व तींत सुमारें पचवीस हजार सत्या-ग्रहींनीं तुरुगवास पत्करून हिंदुस्थानचा या युद्धाला पाठिंबा नाहीं, हें जनतेच्या मनावर बिंबविलें व जगाला जाहीर केलें. १९४१ च्या नोव्हेंबर अखेरपर्यंत ही सत्या-

ग्रहाची मोहीम चालू होती व पुढे ती बद करण्यांत आली. यानंतर सरकारनें बंदिवान् केलेले राष्ट्रसभेचे प्रमुख पुढारी सोडण्यास प्रारंभ केला

## जपानचा युद्धप्रवेश आणि क्रिप्स्-शिष्टाई

७ डिसेंबर १९४१ रोजीं जपानने पर्ल हार्बरवर हल्ला चढवून व बॉबफेक करून अमेरिकन आरमाराचा धुव्वा उडविला आणि अमेरिका व इंग्लड यांच्याविरुद्ध युद्ध पुकारलें. त्याचे चीनबरोबर युद्ध चालूच होते आतां अमेरिका व इंग्लंड यांच्याविरुद्धहि युद्ध पुकारून त्यानें आशिया खडांतील ब्रिटिश, फ्रेच व डच यांच्या साम्राज्यावर स्वारी करण्यास प्रारभ केला या अचानक हल्लयामुळे अमेरिकन आरमाराची दाणादाण झाली, ब्रिटनची दोन सुप्रसिद्ध लढाऊ जहाजे जपानने बुडविलीं आणि इंडोचायना व सयाम घेऊन सिगापूरच्या रोखाने जपानी सैन्य चालू लागलें. ही सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन हिंदुस्थानचा प्रश्न सोडविण्याच्या कामीं आपण मध्यस्थी करावी अशी इच्छा से चँग कै शेक या चिनी राष्ट्राध्यक्षाना झाली व १९४२ फेब्रुवारीमध्ये ते हिंदुस्थानांत येऊन अचानकपणे दाखल झाले. हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न हा आतां ब्रिटनचा घरगुती प्रश्न उरला नसून तो आतरराष्ट्रीय महत्त्वाचा आणि आक्रमक राष्ट्राच्या पाडावासाठीं चालू असलेल्या महायुद्धांतील विजयास आवश्यक असा एक प्रश्न बनला आहे, याचें तें स्पष्ट द्योतक होतें यापुढे हिंदुस्थान ही आमची मालमत्ता आहे व ती आम्ही वाटेल तशी वापरू, असे मि. चर्चिल यानीं कितीहि घोषित केलें तरी जग तसें मानण्यास तयार नाहीं, हे से. चॅग कै शेक यांच्या या भेटीनें व जातांना त्यांनीं ब्रिटनला केलेल्या उपदेशानें सिद्ध झालें

से चॅग कै शेक हे हिंदुस्थानांत येऊन गेल्यानतर ब्रिटिश मुत्सद्द्यानीं हिंदुस्थानशी समेट करण्यासाठीं सर स्टॅफर्ड क्रिप्स् यांना एक योजना घेऊन हिंदुस्थानात पाठविले या क्रिप्स्-योजनेचें स्वरूप कशा प्रकारचे होते आणि सस्थाने आणि प्रांत याना स्वयंनिर्णयाचा हक्क देऊ केल्यामुळे त्या योजनेने हिंदुस्थानचे अनेक तुकडे होण्याचा धोका कसा होता, ते मागील प्रकरणात सागण्यांत आलेंच आहे क्रिप्स्-शिष्टाई अयशस्वी झाल्यानतर आता पुढे काय करावयाचे हा प्रश्न राष्ट्रसभेच्या नेत्यांपुढें पुन्हां येऊन उभा राहिला या वेळी हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्यावर पूर्व आणि पश्चिम या दोनहि दिशानी आक्रमण होण्याचा धोका निर्माण झाला होता. हिटलरनें रशियावर स्वारी करून रशियांतून कॉकेशस पर्वत ओलांडून इराणमार्गें हिंदुस्थानच्या पश्चिमेस यावें आणि जपानने मलाया व ब्रह्मदेश घेऊन हिंदुस्थानच्या पूर्व सरहद्दीवर चालून यावे, असा व्यूह जर्मनी व जपान यांनीं रचिला होता ही गोष्ट अशक्य नव्हती अशा वेळीं हिंदुस्थानचें परकीय आक्रमणापासून सरक्षण करण्यास ब्रिटिश सत्ता समर्थ दिसत नव्हती. जपानने ब्रह्मदेश घेऊन चीनकडे मोर्चा वळविला, तर हिंदुस्थाननें त्याला थोपवून धरावें अशी चीनची इच्छा होती. आणि म्हणूनच चँग कै शेक यांनीं हिंदु-

स्थानला स्वराज्य देण्याच्या कामीं ब्रिटिशांना सल्ला दिला होता. परंतु क्रिप्स्-शिष्टाई अपेशी झाल्यानतर हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न समाधानकारकपणें सोडविण्यास ब्रिटिश लोक तयार नाहींत हे सिद्ध झाले इतकेंच नाहीं, तर क्रिप्स् परत गेल्यानंतर ब्रिटिशानीं राष्ट्रसभेविरुद्ध एक प्रचाराची मोहीमच उभारली राष्ट्रसभापक्षाला स्वतःची हुकूमशाही देशांत स्थापन करावयाची आहे, अल्पसख्याकांना सतुष्ट करण्यास तो पक्ष तयार नाहीं, म्हणूनच हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न सुटत नाहीं, असा प्रचार त्यांनीं सुरू केला.

## स्वातंत्र्याच्या अंतिम संग्रामास आवाहन

अशा वेळी हिंदी जनतेला स्वातंत्र्याचा संग्राम करण्यास आवाहन करून ब्रिटिशांना हा देश सोडून जाण्यास भाग पाडणारी सार्वत्रिक सत्याग्रहाची प्रचड मोहीम सुरू करण्याचे म गांधींनी आपल्या मनाशीं ठरविलें तसे त्यांनीं राष्ट्रसभेच्या नेत्याना कळविले आणि एक-दोन महिने राष्ट्रसभेच्या नेत्याशीं विचारविनिमय करून ता. १४ जुलै १९४२ रोजी वर्ध्यास भरलेल्या राष्ट्रसभेच्या अ भा कार्यकारी-मंडळाकडून सार्वत्रिक सत्याग्रहाच्या रूपाने सुरू करावयाच्या स्वातंत्र्य-संग्रामास मजुरी मिळविली. यानतर सुमारे तीन आठवड्यांनीं मुबईस अ. भा. राष्ट्रसभा-समितीची बैठक बोलावून या कार्यकरिणीच्या ठरावास तिची मान्यता मिळवावयाची होती त्याप्रमाणे ता ८ ऑगस्ट रोजी मुबईस अखिल भारतीय राष्ट्रसभा-समितीची बैठक झाली आणि तिनें म. गांधींच्या नेतृत्वाखाली ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध ताबडतोब स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्यासाठीं सत्याग्रह-सग्राम करण्याचा क्रातिकारक ठराव त्याच रात्रीं प्रचंड बहुमताने मंजूर केला. ता १४ जुलै १९४२ रोजी वर्ध्याच्या कार्यकारिणीनें मंजूर केलेला ठराव आणि त्या ठरावास पाठिंबा देऊन ८ ऑगस्ट रोजी मुबईस अ भा. राष्ट्रसभा-समितीनें मजूर केलेला ठराव यातील विचारसरणी राष्ट्रसभेच्या नेत्यांचें त्या वेळचें धोरण समजून घेण्याच्या दृष्टीने फार महत्त्वाची आहे त्या दोनहि ठरावाचा गोषवारा किंवा त्यांतील महत्त्वाचे मुद्दे येथें थोडक्यांत देण्यांत येत आहेत

## १४ जुलै १९४२ चा ठराव

१४ जुलैच्या ठरावांत प्रारभी असें म्हटले आहे, की हिंदुस्थानला ताबडतोब-स्वातंत्र्य देण्याची जी निकड आज निर्माण झाली आहे, ती केवळ पारतंत्र्यांत राहणे हे पाप आहे एवढ्या सर्वसामान्य दृष्टीनेंच झालेली आहे असें नाहीं आज जें महायुद्ध सर्व मानवतेला भस्मसात् करीत आहे, त्या महायुद्धाचे भवितव्य ठरविण्याच्या दृष्टीनें व आपलें स्वतःचें रक्षण करण्याच्या दृष्टीनें पाहिलें, तरी हिंदुस्थानची गुलामगिरी आज त्याच्या आड येत आहे यामुळे हिंदुस्थानचे स्वातंत्र्य हें आतां केवळ हिंदी राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनेंच आवश्यक बनलेलें नसून जगाचें सरक्षण करणें आणि नाझीवाद, फॅसिझम्, लष्करशाही अथवा साम्राज्यशाहीचे इतर प्रकार यांचा अंत

करणे किंवा एका राष्ट्राचें दुसऱ्या राष्ट्रावरील आक्रमण थांबविणे, या दृष्टीनेंहि हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची आवश्यकता आज निर्माण झाली आहे यानंतर क्रिप्स्-शिष्टाई अयशस्वी झाल्यामुळें हिंदी जनतेमध्यें ब्रिटनसंबंधीं द्वेषभावना आणि जपानच्या लष्करी विजयासंबंधीं एक प्रकारचें समाधान अशी वृत्ति वाढू लागली आहे, असें या ठरावांत म्हटले आहे ही वृत्ति जर अशीच वाढत जाईल, तर हिंदी जनता परकीयाचे आक्रमण मुकाट्याने स्वीकारून त्यांची गुलाम होईल असें होणें हे हिंदी जनतेच्या अधःपाताला आणि तिच्या गुलामगिरीला अधिकच कारण होणार आहे जो अनुभव मलाया, सिंगापूर आणि ब्रह्मदेश या देशांत येत आहे, तो टाळून जपानकडून किंवा इतर कोणत्याहि राष्ट्राकडून हिंदुस्थानवर होणाऱ्या आक्रमणाविरुद्ध लढण्यास हिंदी जनतेला तयार करावें, अशी राष्ट्रसभेची इच्छा आहे ब्रिटिशांविषयींची हिंदी जनतेची द्वेष-भावना नाहीशी होऊन जगातील सर्व राष्ट्रांच्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्याच्या कामीं हिंदुस्थान व ब्रिटन यांचें सहकार्य व्हावें, अशीच राष्ट्रसभेची इच्छा आहे पण स्वातंत्र्य-संस्थापनेचा प्रकाश हिंदी जनतेच्या दृष्टीला अनुभवितां येईल तेव्हांच ही गोष्ट शक्य होईल. अल्पसंख्याकांच्या प्रश्नांचा समाधानकारक निकाल लावण्याचे शक्य ते प्रयत्न राष्ट्रसभेनें केलेले आहेत परंतु देशात परकीय सत्तेचे अस्तित्व असल्यामुळेच हे सर्व प्रयत्न विफल झाले आहेत आज या देशात जे राजकीय पक्ष अस्तित्वांत आहेत, ते हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर नष्ट होतील हे पक्ष ब्रिटिश सरकारचे लक्ष आपणांकडे वेधून घ्यावें व त्याच्या धोरणावर आपला प्रभाव पाडावा, याच दृष्टीनें निर्माण झालेले आहेत. ब्रिटिश सत्ता नष्ट होताच हिंदी इतिहासात कधींहि झाली नव्हती अशी एकतेची जाणीव हिंदी राष्ट्राला होईल. जे राजे, जहागिरदार, जमीनदार आणि धनिकवर्ग या देशात आहेत, त्याचें धन आणि मालमत्ता यांचा उगम शेतात व कारखान्यात खपणाऱ्या किंवा इतरत्र काम करणाऱ्या कामगाराच्या श्रमांतूनच होत असतो आणि म्हणून सत्ता आणि अधिकार हे त्यांच्याच हातीं असले पाहिजेत ब्रिटिश सत्ता गेल्यानंतर देशांतील सर्व जबाबदार स्त्रीपुरुष एकत्र येऊन एक हंगामी राष्ट्रीय सरकार निर्माण करतील. अशा राष्ट्रीय स्थापनेनंतर त्याच्या योजनेनुसार घटना-परिषद् भरविण्यात येईल व सर्वांना समाधानकारक अशी राज्यघटना त्या परिषदेंत बनविण्यांत येईल जनतेच्या संघटित आणि एकीकृत शक्तीनें आपणावरील आक्रमणाचा प्रतिकार करण्यास हिंदुस्थानला समर्थ करावें, हीच राष्ट्रसभेची मनापासूनची इच्छा आहे. हिंदुस्थानांतून ब्रिटिशांनीं आपली सत्ता काढून घ्यावी अशी मागणी करण्यांत ब्रिटन किंवा दोस्त राष्ट्रें यांना युद्धकार्यांत अडथळा निर्माण करावा किंवा हिंदुस्थानावर आक्रमण करणाऱ्यांना प्रोत्साहन द्यावें अथवा चीनवर जपानचें दडपण किंवा त्याच्या दोस्ताचें दडपण वाढू द्यावें, असा राष्ट्रसभेचा मुळींच हेतु नाहीं. म्हणून दोस्तांनीं त्यांची इच्छा असल्यास जपानचा प्रतिकार करण्यासाठीं किंवा चीनचें संरक्षण करून त्याला साहाय्य करण्यासाठीं हिंदुस्थानांत आपल्या फौजा ठेविल्या, तर

त्याला राष्ट्रसभेची हरकत नाहीं. हिंदुस्थानांतील ब्रिटिशांची सत्ता काढून घ्यावी ही मागणी करण्यांत सर्व ब्रिटिश लोकांनीं एकदम येथून चालतें व्हावे किंवा ज्यांना या देशांत आपले घर करून नागरिक या नात्यानें इतराशीं समानतेनें राहण्याची इच्छा असेल त्यांना बाहेर घालवावे, असा हेतु केव्हांहि नाहीं जर सद्‌बुद्धीने ब्रिटिश सरकार आपली सत्ता काढून घेईल, तर हिंदुस्थानांत एक सुस्थिर हंगामी राष्ट्रीय सरकार स्थापन होईल आणि दोस्त राष्ट्रें व हें सरकार याच्या सहकार्यानें आक्रमणाचा प्रतिकार करून चीनला साहाय्य करता येईल. असे करण्यांत कदाचित् धोका उत्पन्न होण्याचा संभव कोणास दिसेल, पण स्वातंत्र्य सपादन करूं इच्छिणाऱ्या कोणत्याहि राष्ट्रानें आणि विशेषतः आजच्यासारख्या आणिबाणीच्या प्रसगीं आपल्या देशाचे सरक्षण करूं इच्छिणाऱ्या राष्ट्रानें अशा प्रकारच्या धोक्यास तोंड देण्यास सज्ज असलेंच पाहिजे कारण असें करण्यानेच एकदर जगाचे स्वातंत्र्य सुरक्षित होऊन अधिक मोठे धोके टाळतां येणार आहेत जर ब्रिटिशांनीं केवळ हिंदुस्थानच्याच हिताच्या दृष्टीने नव्हे, तर ब्रिटिश हिताच्या आणि संयुक्त राष्ट्रें ज्या स्वातंत्र्याचा पुरस्कार करीत आहेत त्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनेंहि ही मागणी मान्य केली, तर राष्ट्रसभेला आनद होईल. जर ती मान्य करण्यांत आली नाहीं, तर मात्र १९२० सालापासून जें अहिंसक बल तिनें संपादन केलेलें आहे ते सर्व खर्चीं घालून राजकीय हक्कासाठी व स्वातंत्र्यासाठीं लढण्यास राष्ट्राला तयार व्हावे लागेल अशा प्रकारच्या राष्ट्रव्यापी लढ्याचें नेतृत्व म. गांधींच्याकडे देणें हे अपरिहार्यच आहे अशा अर्थाचा ठराव करून ७ ऑगस्ट १९४२ रोजीं मुंबईस भरणाऱ्या अ. भा. राष्ट्रसभा-समितीकडून त्याला संमति मिळवावी, असा निर्णय वर्ध्यास भरलेल्या १४ जुलैच्या अधिवेशनांत राष्ट्रसभेच्या कार्यकारिणीने केला.

## ८ ऑगस्टचा ठराव

यानतर मुबईत वरील ठरावास मान्यता मिळवून घेतली व तेंच म्हणणें विशद करणारा दुसरा मोठा ठराव ८ ऑगस्ट रोजीं राष्ट्रसभेच्या कार्यकारिणीनें अ भा राष्ट्रसभा-समितीत मांडला व तो तिने मजूर केला या ठरावांत वरील प्रकारचीच विचारसरणी अधिक स्पष्टपणे मांडण्यांत आली आहे साम्राज्याचा भार वाहणें हे ब्रिटिशांनाहि धोक्याचें झाले असून हिंदुस्थानातील सत्ता सोडून देण्याने युद्धाचे भवितव्य आणि स्वातंत्र्य व लोकशाही याचे यश सुरक्षित होईल, असे या ठरावांत प्रतिपादन करण्यात आलें होतें. आलेल्या सकटाचें निवारण करण्यासाठींच हिंदुस्थान स्वतंत्र झाला पाहिजे आणि ब्रिटिशांची त्याच्यावरील सार्वभौम सत्ता सपुष्टांत आली पाहिजे, असा युक्तिवाद त्यांत केलेला होता केवळ भावी आश्वासनानें या संकटाचे निवारण होणार नाहीं. स्वातंत्र्याचा प्रकाश जनतेला स्पष्ट दिसूं लागल्यावांचून तिच्यांतील चैतन्य आणि उत्साह जागृत होणार नाहींत व हा प्रकाश दिसू लागताच तें चैतन्य जनतेंत जागृत होऊन या युद्धाचें सर्व स्वरूपच बदलून जाईल, अशी

आशा प्रकट करण्यांत आली होती. यानतर हिंदी स्वातत्र्याचा जाहीरनामा ब्रिटिशांनीं काढावा व हंगामी सरकार स्थापन करावे अशी योजना माडण्यात आलेली होती. या हंगामी सरकारचे मुख्य कर्तव्य हिंदुस्थानचें सरक्षण करणे, त्याच्यावर होणाऱ्या आक्रमणाचा त्याजपाशीं असलेल्या शस्त्रबलाने व आत्मबलाने प्रतिकार करणे, संयुक्त राष्ट्रांचें साहाय्य घेऊन हा प्रतिकार अखेरपर्यंत चालविणे आणि शेतांत, कारखान्यात व इतरत्र खपणाऱ्या कामगारांचे हित आणि उन्नति करणे हेंच राहील, तसेंच या हगामी सरकारची सर्व सत्ता आणि अधिकार शेतात व कारखान्यात खपणाऱ्या जनतेच्या हातीच राहतील, अशी हमी देशांतील कष्टजीवी जनतेला देण्यात आली होती यानतर हगामी सरकारच्या अमदानीत घटना-परिषद् बनवून नवी घटना तयार करण्यांत येईल व तींत सयुक्त स्वरूपाची राज्यघटना बनवून घटक राज्यांना शेष अधिकार देण्यात येतील, असेंहि आश्वासन दिलें होते

यापुढे हिंदुस्थानचें स्वातत्र्य हे आशियातील सर्व राष्ट्रांच्या स्वातंत्र्याचें आगामी प्रतीक असे मानण्यांत यावें आणि ब्रह्मदेश, मलाया, इडोचायना, डच ईंडीज, इराण आणि इराक यानाहि पूर्ण स्वातत्र्य मिळावे, असे स्पष्ट करण्यांत आलें होते जपाननें जे देश जिंकलेले आहेत ते त्याच्या हातातून काढून घेतल्यानतर कोणत्याहि साम्राज्यसत्तेच्या ताब्यांत दिले जाणार नाहींत, असे धोरण आंखण्यास सुचविले होतें राष्ट्रसभेचें मुख्य कार्य हिंदी स्वातंत्र्य आणि हिंदुस्थानचें सरक्षण एवढेंच असलें, तरी जगाची भावी शातता, शाश्वती आणि जगाची सुव्यवस्थित प्रगति व्हावयाची, तर सर्व स्वतत्र राष्ट्राचे एक सयुक्त जागतिक राज्य ( ए वर्ल्ड फेडरेशन ऑफ फ्री नेशन्स ) स्थापन झाले पाहिजे, असा आपला विश्वास असल्याचें त्यांत जाहीर केले होते असें जागातिक सयुक्त राज्य स्थापन होण्यानें त्यातील घटक राज्याच्या स्वातंत्र्याचें रक्षण आणि एका राष्ट्राकडून दुसऱ्या राष्ट्रावर होणाऱ्या आक्रमणाचा प्रतिबध या गोष्टी साधता येतील तसेच सर्व मागासलेल्या देशांची व लोकांची प्रगति करून जगांतील निसर्गसंपत्तीचा सर्वांच्या हितासाठी उपयोग करणे हीं ध्येयें याच उपायाने सिद्धीस जातील अशा जागतिक सयुक्त राज्याच्या स्थापनेनें सर्व देशांना शस्त्रसन्यास अवलबिणे शक्य होईल राष्ट्रीय सैन्ये, आरमारे आणि विमानदलें ठेवण्याची आवश्यकता उरणार नाहीं आणि या जागतिक राज्याच्या संरक्षकदलाकडून जगांत शांतता टिकविता येऊन आक्रमणास प्रतिबध करतां येईल. अशा सयुक्त जागतिक राज्यांत हिंदुस्थान आनदाने सहकारी होईल. जी राष्ट्रें या तत्त्वांना मान्यता देतील, त्या सर्वांना त्यांत समाविष्ट होण्याचा दरवाजा मोकळा ठेवण्यात यावा. तथापि आजची युद्धपरिस्थिति लक्षात घेता हे जागतिक संयुक्त राज्य आज केवळ दोस्त राष्ट्रांचेच बनूं शकेल. आजच अशी संस्था स्थापन झाल्यास त्याचा परिणाम युद्धावर होईल, विरोधी देशांतील लोकांवर होईल, आणि जगांतील भावी शांततेवरहि त्याचा प्रभाव पडेल. यानतर चीन आणि रशिया याना साहाय्य करावें

आणि हिंदुस्थानचें संरक्षण करावें या हेतूच्या सिद्धीसाठींच हिंदुस्थान ताबडतोब स्वतंत्र होणे अवश्य आहे म्हणून तशी मागणी ब्रिटन व संयुक्त राष्ट्रें यांच्याकडे आपण करीत आहो, असे पुन्हां एकदां म्हटलें होतें पण जर ही मागणी मान्य करण्यांत आली नाहीं, तर म गांधींच्या नेतृत्वाखालीं शांततेचा स्वातंत्र्य-संग्राम करणे अपरिहार्य आहे असें म्हणून या लढ्याचे नेतृत्व करण्यास म गांधीना विनति करण्यात आली होती अखेरीस महात्मा गांधींच्या तत्त्वास अनुसरून व त्यांच्या वेळोवेळीं होणाऱ्या आज्ञेस अनुसरून हा स्वातंत्र्याचा संग्राम अहिंसेने चालवावा व त्या कामीं राष्ट्राने आपलें सर्व बल खर्ची घालावे, अशी सर्व जनतेला विनति करण्यात आली होती. ज्या वेळीं महात्मा गांधी व इतर नेते पकडले जातील आणि त्याच्यापासून मार्गदर्शन होणें अशक्य होईल, त्या वेळीं जनतेंतील प्रत्येक व्यक्तीने स्वतःच आपल्या अंतरात्म्यास साक्षी ठेवून अखेरपर्यंत हा स्वातंत्र्याचा संग्राम शांततेने चालवावा असा आदेश देण्यात आला होता सर्वांत शेवटीं हे स्पष्ट करण्यात आले होते, की हा लढा करण्यात स्वतः-च्या हातीं सत्ता मिळवावी असा राष्ट्रसभेचा हेतु नसून जेव्हा सत्ता प्राप्त होईल, तेव्हा ती सर्व जनतेच्या हातीं जावी, असाच तिचा हेतु आहे

## ९ ऑगस्टपासूनचें क्रांतिकारक आंदोलन

वरील ठराव ८ ऑगस्टच्या रात्रीं अ भा राष्ट्रसभा-समितीनें मंजूर केला हा ठराव केल्यानंतर म गांधी व्हाइसरॉयकडे जाऊन लढ्यावांचून स्वातंत्र्याची मागणी मान्य करण्यास ब्रिटिश सरकार तयार आहे किंवा नाही, यासंबंधीं चर्चा करणार होते. वरील ठरावाने जनतेला ताबडतोब लढा सुरू करण्याचा आदेश दिलेला नव्हता; तर हा लढा सुरू करण्याचा अधिकार मात्र म. गांधींना देण्यांत आला होता जर लढ्या-वांचून स्वातंत्र्याची मागणी मान्य होत नाहीं असें दिसून आलें, तरच लढा करण्याचा आदेश आपण देऊं असे म गांधींनीं या ठरावावरील भाषणात बोलून दाखविले होते. त्याचप्रमाणें त्यांनीं तशी एक वार्ताहरांना मुलाखतहि दिली होती

परंतु हा ठराव पास होतांच दुसरा दिवस उजाडण्याच्या आंत ब्रिटिश सरकारनें म. गांधींच्यासह राष्ट्रसभेचे सर्व प्रमुख पुढारी आणि जिल्ह्याजिल्ह्यांतून पसरलेले तिचे कार्यकर्ते असे सुमारे वीस हजार लोक कोणताहि विशिष्ट आरोप न ठेवतां किंवा कोण-तीहि चौकशी न करता एकदम पकडून तुरुंगात नेऊन ठेविले यामुळें जनता गोंधळून जाईल आणि तिला मार्गदर्शन करण्याला कोणीहि न उरल्यामुळें चार-आठ दिवसांत जनतेच्या अंतःकरणांत निर्माण झालेला क्षोभ आपणास दडपशाहीच्या जोरावर शांत करता येईल, अशी ब्रिटिश सरकारची अपेक्षा होती परंतु ही अपेक्षा सफल होणे शक्य नव्हतें. म गांधी हे सुमारे पंचवीस वर्षें जनतेला निरनिराळ्या रूपांनीं सरकारविरुद्ध निःशस्त्र प्रतिकार करण्याचा धडा देत होते. अशा प्रकारचे निःशस्त्र प्रतिकाराचे राष्ट्र-व्यापी लढे यापूर्वी तीन-चार वेळां तरी जनतेनें केलेले होते दुसरें महायुद्ध सुरू

झाल्यानंतरहि सुमारें एक वर्षभर युद्धविरोधी प्रचाराचा प्रातिनिधिक सत्याग्रह म. गांधींच्या नेतृत्वाखालीं चाललेला जनतेनें नुकताच पाहिला होता त्याखेरीज १९३० आणि १९३२ सालीं झालेल्या सार्वत्रिक सत्याग्रहाच्या प्रचड मोहिमा लोकांना स्मरत होत्या आणि त्या मोहिमांत जनतेला मार्गदर्शन करण्याचें शिक्षण घेतलेले हजारो कार्यकर्ते देशभर पसरलेले होते राष्ट्रसभेचें तालुका व जिल्हा समित्यांचें जाळें सर्व देशांत पसरलेलें असून म गांधीचे सत्याग्रहासबधीचे विचार आणि त्यांनीं निर्माण केलेली स्वातन्त्र्यनिष्ठेची व स्वार्थत्यागाची भावना देशाच्या कोनाकोपऱ्यात फैलावलेली होती महायुद्ध सुरू झाल्यापासून सर्व जगांत प्रचड घडामोडी सुरू झालेल्या आहेत, जुनीं साम्राज्ये भूकपाच्या हादऱ्यानें गडगडून कोसळणाऱ्या इमारतीप्रमाणें धुळीस मिळू लागली आहेत, आणि ब्रिटिशाचें साम्राज्यहि पूर्व आशियांतील आपल्या प्रदेशांचें सरक्षण करूं शकत नाहीं, असे दृश्य सामान्य जनतेला दिसू लागलें होते. या वेळी शेकडो वर्षांनी प्राप्त होणारी अशी एक सुवर्णसंधि आपल्या राष्ट्राचें स्वातन्त्र्य प्रस्थापित करण्यास आपणास आज लाभत आहे, ही भावना सर्वत्र फैलावत होती. म गांधीनी आणि राष्ट्रसभेच्या नेत्यांनीं या भावनेला सत्याग्रहाचा, प्रत्यक्ष प्रतिकाराचा आणि उघड क्रातीचा मार्ग दाखवून दिलेला होता. अशा अवस्थेत ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं जनतेला अत्यत प्रिय असणाऱ्या अशा हजारों लोकनायकाना एकाएकीं गिरफदार करून अज्ञात स्थळीं नेऊन जनतेच्या दृष्टीआड केलें, तर जनतेचा क्षोभ केवढ्या प्रचंड प्रमाणावर उसळून येईल, आणि त्या क्षोभांतून निर्माण होणाऱ्या गगनचुंबी लाटा आपल्या साम्राज्यसत्तेला केवढा धोका निर्माण करतील, याची राज्यकर्त्यांना बरोबर कल्पना आलेली नव्हती.

ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं युद्धविरोधी वैयक्तिक सत्याग्रह चालू असतांना पांच-सहा महिन्यात वीस-पचवीस हजार निवडक सत्याग्रही व राष्ट्रसभेचे कार्यकर्ते नुकतेच बदिवान करून पुन्हा सोडून दिलेले होते. या वेळीं जनता प्रक्षुब्ध न होता अगदी शांत राहिली होती तिने दगेधोपे, मोडतोड अशा तऱ्हेची कोणतीहि अत्याचारी कृत्ये केलेली नव्हतीं यामुळें कदाचित् राज्यकर्त्यांना आपल्या दडपशाहीच्या सामर्थ्याचा फाजील अहकार झालेला असणें अगदी संभवनीय आहे. पण या वैयक्तिक सत्याग्रहाच्या वेळीं जनतेने जी शातता धारण केली होती, ती शातता ढळू नये आणि वैयक्तिक सत्याग्रहाचें रूपातर सार्वत्रिक सत्याग्रहात होऊन राज्यकर्त्यांच्या युद्धप्रयत्नात अडथळा होऊं नये, या महात्मा गांधींच्या आदेशामुळे निर्माण झालेली होती. त्या वेळीं जनतेला मार्गदर्शन करण्यास म. गांधी तुरुंगाबाहेर राहिलेले होते आतां ब्रिटिशांनीं आपल्या दडपशाहीचा पहिलाच घाला म. गांधींच्यावर घातलेला होता. त्याचें नेतृत्व न लाभल्यामुळें व राष्ट्रसभेचे सर्व प्रमुख नेते एकदम दृष्टीआड झाल्यामुळें प्रक्षुब्ध झालेली जनता चार आठ दिवसांत आपणांस केवळ दंडुकेशाहीनें आटोक्यांत आणतां येईल व सर्व देशभर सुव्यवस्था निर्माण करतां येईल अशी

जर त्यांची कल्पना असली, तर ती वेडेपणाचीच समजावी लागेल शिवाय, लढ्याची प्रत्यक्ष सुरुवात झालेली नव्हती, त्याचा कार्यक्रम जाहीर करण्यांत आलेला नव्हता, किंवा तो आखण्यांतहि आलेला नव्हता म गांधी आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे एकवार व्हाइसरॉयशी चर्चा करण्यास जातील अशी अपेक्षा होती अशा वेळीं एवढी मोठी दडपशाही करून ब्रिटिशांनीं जनतेला प्रक्षुब्ध केलें आणि या प्रक्षोभामुळे पुढे जनतेने केलेल्या अत्याचाराची जबाबदारीहि त्यांनी आपल्या शिरावर ओढवून घेतली ज्या दिवशी म गांधींना व इतर पुढाऱ्यांना पकडण्यात आलें, त्यानतर एक-दोन दिवसात सरकारनें ठिकठिकाणीं केलेल्या राजबंदींच्या धरपकडीमुळे आणि त्याच्या निषेधार्थ जनतेनें जी शांततेचीं निदर्शने केली, त्या शांततेच्या निदर्शनांवर केलेल्या गोळीबारामुळें ही बातमी देशांतील सर्व कोनाकोपऱ्यात जाऊन पोहोचली अर्थात् सर्व देशांतील जनता एकदम खडबडून जागी झाली आणि ब्रिटिश राज्यकर्त्या-विरुद्ध खवळून तिने उघड बडच पुकारले

जनतेनें ता ९ ऑगस्ट १९४२ रोजी सुरू केलेल्या या उघड बंडाची अथवा क्रांतीची अवस्था देशांत यापुढे सुमारे तीन वर्षे टिकून होती व ती निरनिराळ्या स्वरूपाने प्रकट होत होती. ही प्रचड क्रातीची लाट अखेरीस राष्ट्रसभेचे नेते बध-मुक्त होऊन त्याच्याशीं ब्रिटिश राज्यकर्त्यांनी स्वातंत्र्याच्या शिष्टाईचीं बोलणीं पुन्हा सुरू करीपर्यंत व त्या नेत्यांनीं कायदेभगाचे कार्य स्थगित करण्याची आज्ञा देईपर्यंत चालू होती १९४४ च्या मे महिन्याच्या सहा तारखेस महात्मा गांधींची मुक्तता ते आजारी पडल्यामुळे करण्यांत आली यानंतर १९४५ च्या जूनमध्ये राष्ट्रसभेचें कार्य-कारी-मडळ बधमुक्त करण्यात आलें आणि लॉर्ड वेव्हल यांनीं त्याच्याशीं शिष्टाईचें बोलणें सुरू केलें या वेळीं या नेत्यानी कायदेभग बंद करण्याचा आदेश दिला या-पुढील दोन वर्षे निरनिराळ्या प्रकारच्या शिष्टाईत जाऊन अखेरीस १९४७ च्या ऑगस्ट १५ तारखेस हिंदुस्थानला स्वातंत्र्याची प्राप्ति झाली

## ऑगस्ट-क्रांतीचें स्वरूप

आतां ऑगस्ट १९४२ पासून ऑगस्ट १९४७ पर्यंत या देशांत जीं निरनिराळी क्रांतिकारक आंदोलने झालीं, त्यांचें थोडक्यात समालोचन करून त्यांची स्वरूपें येथे विशद करावयाचीं आहेत. एवढें झालें म्हणजे या प्रकरणाचा विषय सपेल.

९ ऑगस्ट १९४२ रोजीं म गांधी व राष्ट्रसभेचे प्रमुख नेते यांना बंदिखान्यांत नेऊन ठेवल्यानंतर मुंबईत अ भा राष्ट्रसभा-समितीच्या कांही सभासदांनी ताबडतोब एक गुप्त बैठक भरविली आणि देशांतील जनतेला शांततेच्या क्रांतीचा एक बारा कलमी कार्यक्रम आंखून देऊन तो ताबडतोब खेडोपाडी पोहोचेल अशी व्यवस्था केली. हा कार्यक्रम पुढीलप्रमाणें होता : ( १ ) सर्व देशभर एक सार्वत्रिक हरताळ शांततेनें पाळण्यांत यावा. सायकाळी सभा भरवून ‘ चले जाव ’चा राष्ट्रसभेचा संदेश

जनतेला कळविण्यांत यावा. जरी या सभांवर बंदी घालण्यांत आली, तरी ती बंदी मोडून सभा घाव्यात. (२) ज्या ज्या ठिकाणी मीठ तयार करणे शक्य असेल, त्या त्या ठिकाणी मिठासंबंधींचे कायदे मोडून मीठ तयार करण्यांत यावे (३) खेड्यांतील सर्व जनतेनें सरकारी अधिकाऱ्यांशी व राज्ययंत्राशीं पूर्ण असहकार करावा सर्व प्रकारची करबंदी अमलांत आणावी. जीं खेडीं जमीनदारांचीं असतील तेथील जमीनदारांनीं जर सरकारशी असहकार केला व ते लोकांच्या लढ्यांत सामील झाले, तर जमीनदाराचे देणे त्यांस देऊन टाकावें (४) सोळा वर्षांवरील सर्व विद्यार्थ्यांनीं आपल्या शिक्षणसंस्था सोडून या क्रांतीच्या कार्यांत सामील व्हावे (५) सर्व सरकारी अधिकाऱ्यांनीं आपल्या नोकऱ्या सोडाव्यात ज्याना तसें करण्याची ताकद नसेल, त्यांनीं निदान ही क्रांति दडपून टाकण्यासाठीं जे दडपशाहीचे हुकूम त्यांना देण्यांत येतील ते हुकूम आम्ही अमलांत आणणार नाहीं, असे स्पष्टपणे सांगावे जर याबद्दल त्यांना बडतर्फ करण्यात आलें, तर त्यासाठीं त्यांनीं आपली तयारी ठेवावी. (६) देशांतील सैनिकांनी लोकांवर लाठीहल्ला करणे, अश्रुवायु सोडणें किंवा शांततेच्या सभा व मिरवणुकी याच्यावर गोळीबार करणे अशा प्रकारचे हुकूम त्यांना देण्यांत आले, तर त्यानी ते हुकूम पाळूं नयेत इतर देशातील सैनिकानी क्रांति-काळांत अशा प्रकारें वागून क्रांतीला आपलें सहकार्य दिलेले आहे, त्यांचेच अनुकरण येथील सैनिकांनी करावें. (७) जे संस्थानिक या लढ्यांत जनतेच्या बाजूने सामील होतील त्याना सामील करून घ्यावे, आणि जे जनतेविरुद्ध परकीय सरकारशीं सहकार्य करतील त्याच्याविरुद्ध तेथील प्रजेने क्रांति पुकारावी (८) प्रत्येक लढ्याच्या वेळीं म गांधींनी स्त्रियांना त्यांत भाग घेण्यास आवाहन केलेलें आहे त्यास अनुसरून याहि लढ्यांत स्त्रियानी आपलें कर्तव्य करण्यास पुढें यावे (९) देशातील सर्व स्त्री-पुरुषांनीं 'करेंगे या मरेंगे' या वृत्तीने या लढ्यात स्वातंत्र्य तरी मिळवू किंवा नष्ट होऊ असे म्हणून सामील व्हावे (१०) हा लढा हिंदु, मुसलमान, शीख, पारशी आणि ख्रिस्ती अशा सर्व धर्मीयाचा आहे त्यात सर्वांनीं जातिधर्मभेद विसरून आपापलें कर्तव्य करण्यास पुढे यावे. (११) म गांधींना पकडल्यामुळें हिंदुस्थानातील प्रत्येक स्त्री व पुरुष आता या लढ्याचे नेते बनले आहेत. जय किंवा मृत्यु हेच आमचे ब्रीद आतां बनले पाहिजे जोपर्यंत गांधीजी तुरुंगात आहेत, तोपर्यंत कोणीहि विश्रांति घेता कामा नये. प्रत्येक मनुष्य हाच स्वतःचा नेता बनला पाहिजे. प्रत्येक प्राताने अहिंसा पाळून आपल्या परिस्थितीस अनुरूप असा कार्यक्रम आंखून घ्यावा आणि स्वतंत्रपणें तो अमलांत आणावा. (१२) अखेरीस, म. गांधींना प्रिय असलेलें सूत कांतण्याचें कर्तव्य करण्यास विसरूं नये

हा कार्यक्रम आणि संदेश खेडोपाडीं पोहोंचतांच ठिकठिकाणीं प्रचंड मोर्चें आणि निदर्शनें निघू लागलीं पोलीसचौक्यावर, सरकारी कचेऱ्यावर आणि खजिन्या-वर हल्ले होऊं लागले. सरकारी कचेऱ्या कांहीं ठिकाणीं जाळण्यात आल्या, रूळ

उखडण्यांत आले आणि दळणवळणाचीं साधने तोडून दळणवळण बंद करण्याचे प्रयत्न सुरू झाले २३ ऑगस्टच्या 'हरिजनां'त श्री किशोरलाल मश्रुवाला यांनीं अहिंसक क्रांतींत यांपैकीं कोणत्या गोष्टी बसू शकतील व कोणत्या बसू शकणार नाहींत, यासंबधी आपले मत पुढीलप्रमाणें जाहीर केलें ते म्हणतात, "सरकारी कचेऱ्या, बँका, धान्यकोठारे इत्यादींची लूट अथवा जाळपोळ या गोष्टी करू देता कामा नयेत दळणवळणाचीं साधनें जीविताला धोका न येईल अशा प्रकारे अनत्याचारी मार्गानें तोडणे शक्य आहे सप करणे हा सर्वात श्रेष्ठ मार्ग आहे तो जर करता येईल, तर तो पुरेसा प्रभावी होईल त्यांत अनत्याचाराच्या दृष्टीने मुळीच दोष राहणार नाही. आजच्यासारख्या लढ्यांत तारा तोडणें, रूळ उखडणें, लहान-लहान पूल पाडून टाकणे या गोष्टी करताना जीविताला धोका येणार नाही याबद्दल जर पूर्ण सावधगिरी घेण्यात आली, तर त्या करण्यास हरकत नाही"* श्री किशोर-लाल मश्रुवाला यानी दळणवळणाच्या साधनांची मोडतोड करण्यास अशा रीतीने मान्यता दिल्यामुळे हाहि कार्यक्रम अनत्याचारी क्रांतीचा एक भाग म्हणून लवकरच मान्य करण्यात आला. अशा तऱ्हेने हें अनत्याचारी क्रांतीचे बंड फार मोठ्या प्रमाणावर सुमारे तीन महिने तरी चालले यानंतर ते हळूहळू मदावत चाललें, तरी पहिल्या सहा महिन्यांत त्याला बरीच तीव्रता होती सहा महिने होऊन गेल्या-नतर म गांधींनीं एकवीस दिवसाचा एक उपवास तुरुगांतून जाहीर केल्याचे वृत्त एकदम अचानकपणे जनतेच्या कानावर येऊन आदळलें!

## गांधीजींचें प्रायोपवेशन

ब्रिटिश सरकारने राष्ट्रसभेच्या नेत्याना गिरफदार केल्यानतर त्याच्यावर, जाणून-बुजून अत्याचारी क्रांतीची पूर्वतयारी केली आणि ब्रिटिशाचे युद्धप्रयत्न विफल करून फॅसिस्ट राष्ट्रांच्या आक्रमणास साहाय्य केलें, अशा अर्थाचे जे अश्लाघ्य आरोप केले होते त्या आरोपाचे निराकरण करावे आणि आपली बाजू जगापुढे मांडावी हा या उपवासामागील प्रमुख हेतु होता ब्रिटिशांनीं हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याचें नाकारल्यामुळे आणि स्वातंत्र्याकरिता अनत्याचाराने प्रयत्न करणाऱ्या पुढाऱ्याना त्यांनीं कोणतेहि बेकायदेशीर कृत्य न करतां एकाएकीं विनाचौकशी बंदिवान् केल्या-मुळें जनता आणि सरकार याच्यांत झगडा निर्माण झाला या झगड्यात झालेल्या सर्व कृत्यांना ब्रिटिश सरकारच पूर्णपणें जबाबदार आहे, असें महात्मा गांधींचे म्हणणे होतें. आपलें हें मत खोडून काढावें, नाहीं तर आपणावर केलेले आरोप परत घ्यावेत अशी महात्मा गांधींची व्हाइसरॉयकडे मागणी होती. ही मागणी मान्य न झाली तर आपण एक उपवास एकवीस दिवस करूं आणि परमेश्वरापुढें आपलें गाऱ्हाणें मांडू

* या मुद्द्यासबधी आपण दिलेला हा अभिप्राय चुकीचा व अविवेकाचा होता, असें श्री. मश्रुवाला यानीं पुढे आपलें मत जाहीर केलें व तसे त्यानी सरकारलाहि कळविले

असें त्यांनीं कळविलें होतें. हा उपवास ता. १० फेब्रुवारी १९४३ पासून सुरू झाला आणि तो ता ३ मार्च रोजीं संपला या काळांत महात्मा गांधींच्यावरचीं कांहीं बंधनें ढिलीं करण्यांत येऊन त्यांच्या आप्तेष्टांना व स्नेह्यासोबत्यांना त्यांची गाठ घेण्यास सरकारनें मुभा दिली होती या वेळीं सर्व देशभर गांधीजींच्या मुक्ततेबद्दल सर्वपक्षीय पुढाऱ्यानीं मागणी करण्यास सुरुवात केली होती व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळातील तीन सभासदानीं हा उपवास सुरू होताच आपले राजीनामे दिले सर तेजबहादूर सप्रू याच्या अध्यक्षतेखालीं दिल्लीस एक सर्व पक्षीय पुढाऱ्याची सभा या काळात भरविण्यात आली या सभेत म गाधीना मुक्त करण्यात यावें आणि त्यांच्याशीं सन्मान्य समेट करण्यात यावा, अशी मागणी करण्यात आली. या परिषदेचे अध्यक्ष सर तेजबहादूर सप्रू यानी या वेळीं केलेल्या आपल्या भाषणात भावी घटनाची पूर्वसूचना देणारे असे पुढील आशयाचे उद्गार काढिले आहेत ते म्हणाले, "मीं ब्रिटिशाच्या इतिहासाचा चागला अभ्यास केलेला आहे त्याच्या इतिहासांतील अनेक घटनाचा मी पूर्ण चहाता आहे त्याच्या इतिहासाच्या अभ्यासामुळे त्यांच्या स्वभावासबंधीं माझ्या मनावर जो एक धडा बिंबलेला आहे तो असा, कीं ते लोक आमच्यासारख्या राजनिष्ठाबरोबर केव्हाहि तडजोड करीत नाहींत तर जे लोक आयर्लंडातील डी व्हॅलेराप्रमाणें किंवा दक्षिण आफ्रिकेतील जनरल स्मट्स यांच्याप्रमाणें त्यांच्याविरुद्ध बंड करून उठतील, त्याच्याशींच ते तडजोड करतात म. गाधी हे असेच एक क्रांतिकारक आहेत आणि मला अशी आशा आहे, कीं जेव्हां या लढ्यात तडजोड करण्याचा प्रसग येईल, तेव्हा ब्रिटिश लोक येथें जमलेल्या आमच्यासारख्या सदनशीर वृत्तीच्या लोकाना बाजूस ठेवून अखेरीस म. गाधींसारख्या क्रातिकारकाशींच ते तडजोड करतील" सर तेजबहादूर सप्रू याचे हे शब्द जरी तात्काल खरे ठरले नाहीत, तरी त्यानतर तीन-चार वर्षांच्या आत खरे ठरले असें आज आपणास दिसून येत आहे.

## लढ्याचा दुसरा खंड

म गांधींना पकडल्यानतर हा उपवास सुरू होईपर्यंत जो सहा महिन्यांचा अवधि गेला, तो या लढ्यातील पाहिला खड असें म्हणण्यास हरकत नाहीं यानतर या लढ्यांत नव्या विचारांचे निरनिराळे प्रवाह येऊन मिसळू लागले म गांधीच्या उपवासकालांत कांहीं लोक त्यांना भेटून आल्यानंतर बाहेर चालू असलेल्या लढ्याच्या कार्यक्रमांतील काहीं भाग महात्मा गांधींना पसत नाहींत, असे म्हणून ते लोक या लढ्यांतून आपलें अंग काढून घेऊ लागले; अथवा त्यांनीं त्याला दिलेली पूर्वीची संमति पुढे ते देईनासे झाले कांहींनी या लढ्याचें स्वरूप बदलून तो शुद्ध सत्याग्रही स्वरूपाचा करावा म्हणून प्रयत्न चालविले कांहींनीं हा सर्वच लढा एकदम थाबवावा, राष्ट्रसभेनें आपला ८ ऑगस्टचा ठराव परत घ्यावा आणि ब्रिटिश सरकारशीं

व मुस्लीम लीगशीं तडजोड घडवून आणावी असे प्रयत्न सुरू केले या तडजोडीच्या प्रयत्नांचें नेतृत्व चक्रवर्ती राजगोपालाचार्य, श्री भुलाभाई देसाई वगैरेंच्याकडे होतें. याच्या उलट, अशा प्रकारचे तडजोडीचे प्रयत्न करणे हें देशविघातक आहे आणि कांहीहि झाले तरी आपण ९ ऑगस्ट रोजीं सुरू केलेलें क्रांतीचें कार्य त्याच पद्धतीनें म. गांधी व राष्ट्रसभेचे पुढारी सुटून येईपर्यंत सतत चालू ठेवूं, असेंच मत ही चळवळ करणाऱ्या बहुतेकांचें होते. तथापि आता जनतेचा मोठा उठाव थांबलेला होता. हा उठाव पुन्हा लवकरच होऊ शकेल आणि या क्रातिकारक आदोलनाला भरती येईल, अशी ही चळवळ करणाऱ्याची काहीं काल अपेक्षा होती.

## जयप्रकाश यांचें क्रांतिकारक नेतृत्व

१९४२ च्या ऑक्टोबरमध्ये जयप्रकाश नाराण हे हजारीबाग तुरुगांतून पळून बाहेर पडले. त्यांनी १९४३ च्या प्रारंभी एकदर परिस्थितीचे निरीक्षण करून या आंदोलनासबधीं एक गुप्त जाहीर पत्रक काढिले या पत्रकात त्या वेळच्या एकदर परिस्थितीचे निरीक्षण त्यानी केलें असून त्यात पुन्हा ज्या वेळीं जनतेचा क्रांतिकारक उठाव होईल, त्या वेळीं आपण कोणते धोरण स्वीकारावें आणि गेल्या सहा महिन्यात जें क्रातिकारक आदोलन होऊन दडपले गेले, त्यापासून आपण कोणता धडा घ्यावा यासबधी सविस्तर विवेचन केले होते. या त्यांच्या पत्रकात म. गाधींची अहिंसेसबधीची वृत्ति आणि राष्ट्रसभेची त्या तत्त्वासबधींची वृत्ति यांतील सूक्ष्म भेद त्यानीं लोकापुढे विशद करून माडिला होता

प्रथमत. जनतेने व राष्ट्रसभेच्या कार्यकर्त्यांनीं जो भव्य लढा ब्रिटिश सरकारविरुद्ध केला, त्याबद्दल त्यांचें अतःकरणपूर्वक अभिनदन करून ते म्हणतात, "आमच्या या दडपून गेलेल्या व दीर्घकाल क्लेश भोगीत पडलेल्या राष्ट्रांत यापूर्वी केव्हांहि अशी घटना घडलेली नव्हती, अथवा ती घडेल अशी कोणास अपेक्षाहि नव्हती आमचे अतुलनीय नेते म गाधी याच्या मनःचक्षूपुढे असणारे उघड बड असेच ते होते हे बड आज क्षणभर दडपल्यासारखे भासत आहे यांत शंका नाहीं परतु मला आशा आहे, की ते केवळ क्षणभरच दडपलें गेलें आहे याबद्दल आपण माझ्याशीं सहमत व्हाल, यात आश्चर्य मानण्याजोगे कांहीच नाहीं. वस्तुतः जर हा पहिलाच आघात यशस्वी झाला असता आणि त्यामुळे साम्राज्यसत्ता पूर्णपणे नष्ट झाली असती, तर तेंच एक आश्चर्य झाले असते आमच्या शत्रूनेहि मान्य केले आहे, कीं या बंडामुळें आपली सत्ता जवळजवळ नष्ट झाली होती यावरूनच आमच्या राष्ट्रीय क्रांतीची ही पहिली लाट किती यशस्वी झाली ते दिसून येईल ही पहिली लाट कशी दडपली गेली ? आमच्या शत्रूची लष्करी सत्ता, त्यानें माजविलेली गुडगिरी, लुटालूट, जाळपोळ अथवा खून यांमुळें ही लाट थोपविली गेली काय ? नाहीं, हे बड कायमचे दडपले गेलें असें मानणे बरोबर नाहीं सर्व क्रांत्यांचा इतिहास असे दाख-

वितो, कीं क्रांति ही एकच घटना नसते. तें एक सामाजिक आंदोलन असून ते अनेक अवस्थातून जात असते. क्रांतीचा विकास होत असतां तिला भरती-ओहोटी येणे हे स्वाभाविक असतें. आमच्या क्रांतीला इतक्या लवकर जी ओहोटी आलेली आहे, ती साम्राज्यशाही आक्रमकांच्या शक्तीच्या प्रभावामुळे आलेली नसून या ओहोटीची मुख्य दोन कारणे आहेत. पहिले कारण असें, कीं तिच्या मागे प्रभावी अशी संघटना नव्हती " या सघटनेच्या अभावाची थोडीफार चिकित्सा केल्यानंतर जयप्रकाश लिहितात, " या बडाची पहिली अवस्था संपल्यानतर पुढे काय करावयाचे यासंबधीं कोणताहि कार्यक्रम लोकांपुढे ठेवण्यांत आला नव्हता. आपापल्या प्रदेशांतील ब्रिटिश राज्य नष्ट केल्यानंतर लोक आपले कार्य संपलें असें मानून आपापल्या घरीं निघून गेले हा त्यांचा दोष नव्हता, हा आमचा दोष होता. पहिल्या अवस्थेनतरच्या दुसऱ्या अवस्थेचा कार्यक्रम लोकांपुढें आम्ही मांडावयास पाहिजे होता. तसे न केल्यामुळें हे बंड स्थगित झालें आणि तेथून त्याच्या ओहोटीस सुरुवात झाली. दुसऱ्या अवस्थेंत कोणता कार्यक्रम लोकापुढे ठेवावयास हवा होता? क्रांतीच्या स्वरूपावरूनच त्याचे उत्तर मिळू शकते क्राति ही केवळ विध्वसक घटना नाहीं ती एक प्रचंड विधायक घटना आहे. कोणतीहि क्रांति केवळ विध्वंसक कार्य केल्याने यशस्वी होऊ शकणार नाहीं जर क्रातीचे कार्य टिकून रहावयाचे असेल, तर तिने जें राज्ययत्र उलथून पाडलें, त्या राज्ययंत्राचें स्थान घेणारी नवी राज्यसस्था निर्माण करावयास हवी आपल्या देशांतील बऱ्याच मोठ्या प्रदेशांत प्रस्थापित राज्य मोडून टाकण्याचे कार्य सपल्यानतर पुढे काय करावे याचा कार्यक्रम आमच्या क्रातीलाहि आवश्यक होता. परकीय सत्तेचा राज्यकारभार आणि त्याचीं साधने याचा विनाश केल्यानंतर आपापल्या प्रदेशांत क्रांतिकारक सरकारचे घटक निर्माण करून त्या ठिकाणीं आपले पोलीस व लष्कर तयार करावयास हवें होतें. जर आपण असे केले असतें, तर क्रातीच्या लाटा अधिकाधिक उच्च उसळत जाऊन साम्राज्यसत्ता कोसळून पडली असती, आणि सर्व देशभर लोकानीं आपलें सार्वभौमत्व स्थापन केलें असते. म्हणून सघटनेचा अभाव आणि राष्ट्रीय क्रांतीतील नव्या राज्यसस्थापनेच्या कार्यक्रमाचा अभाव हीं दोन या क्रांतीच्या ओहोटीचीं प्रमुख कारणे आहेत " यानतर तडजोड करण्याचे प्रयत्न ज्यांनीं चालविले होते, त्यांचे ते प्रयत्न कसे चुकीचे आहेत हे या पत्रकांत दाखवून दिले होते तसेंच पुन्हां क्रातीचा उठाव निदान पाच-सहा वर्षे तरी होणार नाही असें मानणाऱ्यांना उद्देशून ते म्हणतात की " हे मत शाततेच्या काळी लागू पडू शकेल. परतु आज सर्व जग ज्या वादळाच्या अवस्थेंत आहे आणि त्यांतील घडामोडी ज्या वेगानें घडत आहेत तिकडे लक्ष दिल्यास हे मत बरोबर दिसत नाहीं. लोकांना तीव्र असतोष वाटत आहे, त्यांच्यांत क्षोभ निर्माण झालेला आहे, सूड घेण्याची बुद्धि वसत आहे, त्यांना शिस्तीने, सघटनेनें बांधून नव्या उठावास आवाहन करण्याचीच आवश्यकता आहे आपण प्रचंड प्रयत्न

करीत आहोंत याची जाणीव जनतेला झाली पाहिजे. आंतरराष्ट्रीय घटनाहि आम्हांस अनुकूल होण्याचा संभव आहे म. गांधीसुद्धा एकादे प्रायोपवेशन करण्याचा संभव आहे यासाठीं आपण आणि जनतेने नित्य जागृत राहिलें पाहिजे. आपल्या निर्धारापासून ढळता कामा नये, विश्रांति घेता कामा नये अथवा आपले प्रयत्न शिथिल करतां कामा नये. नव्या आक्रमक आंदोलनाचा विचार करताना हिंसा-अहिंसेच्या प्रश्नाचा अखेरपर्यंत विचार केला पाहिजे

"प्रथमतः ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं चालू आंदोलनांत घडलेल्या अत्याचाराबद्दल जी हाकाटी सुरू केली आहे, त्याबद्दल दोन शब्द लिहिले पाहिजेत. जेथे जनतेला अत्यंत क्षुब्ध करण्यांत आले अशा कांहीं ठिकाणीं कांहीं थोडे अत्याचार घडले हे मान्य केलें, तरी या आंदोलनाचा एकदर राष्ट्रभर पसरलेला व्याप लक्षांत घेतल्यास हे अत्याचार अगदींच क्षुल्लक असून व्यक्तींनीं व समुदायानीं अहिंसेचे जे उज्ज्वल स्वरूप या वेळीं प्रकट केले, तें पाहून मन थक्क होऊन जाते याचा विचार करीत असतां ही गोष्ट लक्षांत घेण्यात येत नाहीं, कीं परकीय सरकारचे हजारो ब्रिटिश आणि हिंदी अधिकारी यांचीं जीवितें कांही दिवस अक्षरशः जनतेच्या सदिच्छेवरच अवलंबून होतीं या जनतेने आपल्या या शत्रूवर दया दाखविली, म्हणूनच त्यांचीं जीवितें आणि मालमत्ता हीं टिकू शकली शिवाय, ज्या हजारो वृद्ध-तरुण देशभक्तांनी क्रांतीचें निशाण हातांत घेऊन आणि क्रांति चिरायु होवो असा मंत्र जपीत आपल्या छातीवर शत्रूच्या गोळ्या झेलल्या, त्यांच्या त्या अहिंसक दैवी धैर्याचे वर्णन कसे व कोण करू शकेल? या त्याच्या दैवी धैर्यासंबधीं ब्रिटिश लोक एक तरी स्तुतीचा शब्द उच्चारतात काय? तें कांहींहि असो, जी ब्रिटिश सत्ता हिंसेंत मुरलेली आहे, हिंसा हीच जिचा आधार आहे, अनेक प्रकारच्या अनेक हिंसेचे प्रकार जी सत्ता दररोज करीत आहे, जी सत्ता लक्षावधि लोकांना पिळून काढून त्याचें जीवनरक्त शोषीत आहे, तिनें इतराच्या हिंसेसंबधीं एवढी हाकाटी पिटावी, हे विलक्षण नाहीं काय? आम्ही त्यांच्याशीं कोणत्या शस्त्रानीं लढावें या प्रश्नाशीं ब्रिटिशांचा संबंध कसा पोहोचतो? जर बडखोरानीं अहिंसा पाळली तर आपणहि अहिंसा पाळू, अशी प्रतिज्ञा ब्रिटिशांनी केली आहे काय? आमचे सहस्रावधि अहिंसक सैनिक ब्रिटिशांनीं आतापर्यंत गोळ्या घालून ठार मारिले नाहींत काय? आम्हीं कोणतेहि शस्त्र वापरलें तरी ब्रिटिश आमच्याविरुद्ध गोळ्याच उपयोगांत आणतात, लूट करतात, बलात्कार करतात आणि जाळपोळ करतात, म्हणून आम्हीं त्यांच्याशीं कोणत्या शस्त्राने लढावें याबद्दल त्यानीं स्तब्ध रहावे. या प्रश्नाचा निर्णय करण्याचे कार्य केवळ आमचेंच आहे."

यानंतर आपल्या दृष्टीनें हिंसा-अहिंसेचा विचार करून जयप्रकाश म्हणतात: "प्रथमतः मला आपणांस या मुद्द्याचें स्मरण करून द्यावयाचें आहे, कीं अहिंसेसंबंधींचीं गांधीजींचीं मते आणि अ. भा. राष्ट्रसभा-समितीचीं व तिच्या कार्यकारिणीचीं त्यासंबधींचीं मतें यांच्यांत अंतर आहे. गांधीजी हे कोणत्याहि परिस्थितींत अहिंसेपासून

ढळणारे नाहींत. हा त्यांच्या निष्ठेचा आणि जीवनतत्त्वाचा प्रश्न आहे राष्ट्रसभेची स्थिति तशी नाहीं या युद्धकालात राष्ट्रसभेनें असे अनेकवार जाहीर केलें आहे, कीं जर हिंदुस्थान स्वतंत्र झाला अथवा जरी येथें केवळ राष्ट्रीय सरकार स्थापन केलें, तरी आक्रमकाविरुद्ध शस्त्रबलानें लढण्यास आपण तयार होऊं मग जर आपण जपान आणि जर्मनी यांच्याशीं शस्त्रानें लढण्यास तयार असू, तर त्याच प्रकाराने ब्रिटिशांशीं लढण्यास आम्हास काय हरकत आहे? या प्रश्नास एकच उत्तर देणे शक्य आहे, कीं राष्ट्रसभा सत्ताधारी बनल्यावर तिच्या हातीं लष्कर येईल; पण आज ती सत्ताहीन असल्यामुळें तिच्यापाशीं लष्कर नाहीं पण समजा, एकादे क्रांतिकारक सैन्य निर्माण करण्यात आले किंवा आजचें हिंदी सैन्य अथवा त्यातील काहीं भाग बंड करून आम्हांस मिळाला, तर त्या सैन्यास बड करण्यास सांगितल्यानतर त्याने शस्त्रे खालीं ठेवून ब्रिटिशांच्या गोळया उघड्या छातीवर झेलाव्यात असा उपदेश आम्हीं करणें, त्यांत विसगति नाहीं काय? मी हें मान्य करतों, कीं जिला शूराची अहिंसा असे म्हणतात, ती जर फार मोठ्या व पुरेशा प्रमाणावर आचरणांत आणतां आली, तर हिंसेची आवश्यकताच पडणार नाही. पण जिथें अशा अहिंसेचा अभाव असेल, त्या ठिकाणी हिंसा-अहिंसेच्या शाब्दिक काथ्याकुटाखालीं आपला भेकडपणा लपवून ठेवण्यास आणि क्रांतीची प्रगति थोपवून धरण्यास अथवा क्रांति अयशस्वी करण्यास मी केव्हांहि समति देणार नाहीं आपल्या क्रांतीच्या या अतिम अवस्थेचें सपूर्ण चित्र आपल्या डोळयांपुढे स्पष्टपणें ठेवून आपणांस पुढील तयारी, सघटना आणि आपल्या सैनिकाचें संघटन व शिक्षण करावयास हवे आपण जें जें करू त्यांत नेहमी लक्षांत बाळगले पाहिजे, कीं आम्हांस केवळ गुप्त कटाचे दहशतवादी राजकारण करावयाचें नाहीं जनतेचा सार्वत्रिक उठाव हे आमचें ध्येय आहे म्हणून आपल्या संघटनेचे तांत्रिक कार्य करीत असतां खेड्यांतील शेतकऱ्यामध्यें, कारखान्यातील कामगारामध्ये, खाणींत, आगगाडयांत आणि इतरत्र काम करणाऱ्या लोकांत आपणांस जागृतीचे मोठे कार्य केले पाहिजे याशिवाय सरकारी अधिकारी आणि हिंदी सैनिक यांच्यांतहि आपणांस प्रचार केला पाहिजे. म्हणून लोकांच्या सामर्थ्यावर पूर्ण विश्वास ठेवून व आपल्या ध्येयावर पूर्ण निष्ठा ठेवून आपण पुढें गेलें पाहिजे."

## आझाद हिन्द-सरकार व नेताजी सुभाषचंद्र

१९४३च्या उत्तरार्धापासून पूर्व आशियात नेताजी सुभाषचंद्र बोस यांनी स्थापन केलेल्या स्वतंत्र हिंदुस्थानच्या हगामी सरकारची वार्ता हिंदी जनतेच्या कानावर येऊ लागली. १९४१ सालीं नेताजी सुभाषचद्र बोस हे हिंदुस्थानांतून गुप्तपणे बाहेर पडले होते ते १९४३ च्या जुलै महिन्यांत सिगापूरच्या बाजूस स्वतंत्र हिंदुस्थानचे एक हगामी सरकार स्थापन करून हिंदुस्थानांतील जनतेस नभोवाणीवरून स्वातंत्र्याचा लढा करण्यास आवाहन करू लागले. आपल्या एकंदर हालचालींचे मर्म हिंदी जनतेला

समजून सांगण्यासाठीं अनेक वेळां नभोवाणीवरून ते भाषणें करीत असत. सिंगापूर, मलाया, ब्रह्मदेश इकडे नेताजी सुभाषचंद्र यांनीं स्थापन केलेल्या आझाद हिंद-सरकारचे व आझाद हिंद-फौजेचें वृत्त हिंदुस्थानांत येऊन पोहोंचल्यापासून या देशांत जरासे क्रांतीचे विचार अधिकाधिक फैलावू लागले हिंदुस्थानांत सुरू झालेली निःशस्त्र क्रांतीची चळवळ एकीकडे मंदावू लागली, तर दुसरीकडे हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं लढणारें एक आझाद हिंद-सरकार स्थापन होऊन त्याच्या हुकुमतीखालीं आझाद हिंद सैन्य निर्माण झालें २ ऑक्टोबर १९४३ हा म गांधींचा पंचाहत्तरावा वाढदिवस होता हा वाढदिवस जसा हिंदुस्थानात निःशस्त्र क्रांतिकारकांनीं सत्याग्रहाच्या रूपाने साजरा केला, तसाच तो हिंदुस्थानाबाहेर नेताजी सुभाषचंद्र बोस यांनीं स्थापन केलेल्या आझाद हिंद-सरकारने व त्याच्या वतीनें ब्रिटिश सरकारशीं लढणाऱ्या आझाद हिंद-सेनेनें सशस्त्र क्रांतीच्या घोषणेनें साजरा केला या वेळीं नेताजी सुभाषचंद्र यांनीं म. गांधींच्यासंबधीं एक भाषण करून त्यांचा पुढीलप्रमाणें गौरव केला हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्यात म गांधींचें स्थान कोणते आहे ते वर्णन करतांना नेताजी म्हणाले, "महात्मा गांधींनी हिंदुस्थानची जी सेवा केली आहे आणि हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्यांत जें महान् कार्य केले आहे, ते इतके वैशिष्टयपूर्ण व अतुलनीय आहे, की त्याचे नाव आमच्या राष्ट्रीय इतिहासात सुवर्णाक्षरांनींच लिहिले जाईल जेव्हा पहिले महायुद्ध संपले आणि हिंदी पुढारी स्वातंत्र्याची मागणी करू लागले तेव्हा त्याना असे आढळून आलें, की दगलबाज ब्रिटिश राष्ट्राने आपला विश्वासघात केला आहे इ स. १९१९ मधील रौलट-कायद्याच्या रूपाने हिंदी जनतेच्या स्वातंत्र्याच्या मागणीस उत्तर देण्यात आले, आणि जे कांही स्वातंत्र्य त्यापूर्वी होतें तेंहि काढून घेण्यात आले जेव्हा या काळ्या कायद्याविरुद्ध त्यांनीं निषेध व्यक्त केला, तेव्हा जालियनवाला बागेत लोकांची कत्तल करण्यात आली पहिल्या महायुद्धांत हिंदी जनतेने जो स्वार्थत्याग केला, त्याबद्दल रौटल-कायदा आणि जालियनवाला बागेंतील कत्तल अशी दोन बक्षिसे तिला देण्यांत आली! १९१९ सालांतील या करुण घटनेमुळे हिंदी लोक कांहीं काळ धक्का बसून स्तब्ध राहिले त्यांची हालचाल बंद झाली. स्वातंत्र्यासाठी केलेले सर्व प्रयत्न ब्रिटिशानी व त्यांच्या लष्करांनीं निष्ठुरपणें दडपून टाकिले सनदशीर चळवळ, ब्रिटिश मालाचा बहिष्कार, सशस्त्र क्रांति इत्यादि सर्वच प्रयत्न या वेळी निष्फळ झाले होते आशेचा एकहि किरण दिसत नव्हता आणि हिंदी जनता लढ्याची एकादी नवी पद्धति किंवा एकादे नवें हत्यार सांपडते काय, हे शोधीत अंधारात चांचपडत होती. अशा अवस्थेत गांधीजी पुढें आले आणि त्यांनीं असहकार, सत्याग्रह किंवा सविनय कायदेभंग हा नवा मार्ग जनतेपुढें ठेविला जणु काय स्वातंत्र्याचा मार्ग दाखवून देण्यासाठीं परमेश्वरानेच त्यांना धाडून दिलें होतें! एकदम एका क्षणांत सर्व राष्ट्र त्यांच्या झेंड्याखालीं जमा झाले हिंदुस्थानचा आत्मोद्धार झाला. प्रत्येक हिंदी चेहेऱ्यावर आशा आणि आत्मविश्वास

यांचें तेज चमकू लागलें. वीस वर्षें किंवा त्याहून अधिक काळ महात्मा गांधींनीं हिंदी स्वातन्त्र्यासाठीं सतत लढा चालविला आहे. जर इ. स १९२० सालीं आपलें नवें शस्त्र घेऊन महात्मा गाधी या लढ्यांत पुढे आले नसते, तर हिंदुस्थान आजहि निपचीत पडलेलाच दिसला असता. हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्यांतील त्यांचें कार्य वैशिष्टयपूर्ण व अतुलनीय आहे कोणाहि एका व्यक्तीला अशा परिस्थितींत आपल्या आयुष्यात याहून अधिक कार्य करता येणे शक्य नव्हतें

"१९२० पासून हिंदी जनता महात्मा गांधींच्यापासून दोन गोष्टी शिकली आहे. स्वातन्त्र्यप्राप्तीला अवश्य अशा या दोन गोष्टी आहेत पहिली अशी, कीं हिंदी जनतेला आतां स्वाभिमान आणि आत्मविश्वास याचा प्रत्यय आला असून तिच्या अंतःकरणांत क्रातीची ज्योत प्रज्वलित झालेली आहे. दुसरी गोष्ट म्हणजे हिंदुस्थानच्या सर्व खेड्यापाड्यांत पसरलेली अशी एक राष्ट्रव्यापी संघटना त्यांनीं निर्माण केली आहे. म गांधींनी स्वातन्त्र्याच्या सीध्या रस्त्यावर आणून आम्हास सोडिलें आहे. आज ते तुरुगाच्या गजांच्या आड खितपत पडलेले आहेत. जें कार्य म गाधींनीं सुरू केलें, त्याची पूर्तता देशातील व देशाबाहेरील लोकानीं करावयाची आहे. तुम्हांस एका गोष्टीचें स्मरण मी करून देऊं इच्छितो जेव्हां महात्मा गांधींनीं असहकाराचा कार्यक्रम १९२० सालीं नागपूर येथे भरलेल्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनापुढें माडिला तेव्हां ते म्हणाले, 'आज जर हिंदुस्थानपाशीं तरवार असती तर त्याने ती उपसली असती.' यानतर ते म्हणाले, 'सशस्त्र क्रांतीचा प्रश्न आज उपस्थितच होऊ शकत नाहीं. त्याचा दुसरा पर्याय असहकार अथवा सत्याग्रह हाच आहे'" यापुढे नेताजी म्हणाले, "आज ही परिस्थिति बदललेली आहे आज हिंदी जनतेला तरवार हातात घेणे शक्य झालें आहे. हिंदुस्थानची स्वातंत्र्यसेना अस्तित्वात आली असून तिची सख्या वाढत आहे हे सागण्यास आम्हास आनद व अभिमान वाटत आहे"

## जयप्रकाश आणि नेताजी

नेताजी सुभाषचंद्र बोस यांनीं स्थापन केलेल्या आझाद हिंद-सरकारसंबंधीं व त्यांनीं उभारलेल्या आझाद हिंद-सेनेसंबधी या वेळीं हिंदुस्थानातील क्रांतिकारकांना काय वाटत होते, याचा विचार १९४३ च्या उत्तरार्धांत काढलेल्या आपल्या पत्रकांत जयप्रकाश नारायण यांनीं पुढीलप्रमाणें केला आहे हिंदी क्रांतिकारकांना उद्देशून काढिलेल्या दुसऱ्या पत्रकांत ते म्हणतात, "आपणांस बहुधा माहीतच असेल, कीं श्रीयुत सुभाषचंद्र बोस यानीं शोनान (सिंगापूर) येथें एक स्वतंत्र हिंदुस्थानचें हंगामी सरकार स्थापन केलें आहे. जपानी सरकारने त्याला मान्यता दिली आहे. त्यांनीं एक हिंदी राष्ट्रीय सैन्यहि उभारले असून त्याचे संख्याबल एकसारखें वाढत आहे आमच्या दृष्टीनें या घटनेला काहीं महत्त्व आहे. जातां जाता हीहि गोष्ट मी सांगूं इच्छितो, कीं बंगालमधील उपाशी मरणाऱ्या जनतेला तांदूळ पाठवून

देण्याची तयारी या सुभाषचंद्रांच्या सरकारनें दाखविली होती. पण ती नाकारून ब्रिटिश सरकार हिंदी जनतेला उपाशी मरूं देत आहे. सुभाषचंद्रांना 'फितूर' हा अपशब्द लावणें फार सोपे आहे विशेषतः जे इंग्रजांना 'फितूर' झाले आहेत, तेच त्यांना 'फितूर' म्हणत आहेत! ही गोष्ट फार सोपी आहे. पण हिंदी राष्ट्राला हे माहीत आहे, कीं सुभाषचद्र हे एक तळमळीचे देशभक्त असून स्वातंत्र्याच्या लढ्यांत ते नेहमीं अग्रभागीं राहिलेले आहेत ते आपल्या देशाचा विक्रय करतील अशी कल्पनाहि करवत नाहीं हे खरे आहे, कीं त्यांना द्रव्य व इतर साहाय्य फॅसिस्ट राष्ट्राकडून मिळत आहे, पण त्यांच्या सरकारांत व सैन्यांत जे लोक आहेत, ते सर्व हिंदीच आहेत ते ब्रिटिश सत्तेचे द्वेष्टे आहेत आणि आपली मातृभूमि स्वतंत्र करावी याच इच्छेनें त्यांचीं अंतःकरणे जळत आहेत. दुसरें असे, कीं युरोपांतील अनेक निर्वासित सरकारें आपलीं राष्ट्रें सोडून संयुक्त राष्ट्राच्या मेहेरनजरेखालींहि व आश्रयाखालींहि कार्य करीत आहेत. तिसरे असें, कीं जागतिक रणनीतीच्या दृष्टीने प्रबळ राष्ट्रें दुर्बलांना कोणकोणत्या सवलती देतील हे आज कांहींच सांगता येत नाहीं" श्री सुभाषचंद्र बोस यांनीं जें धोरण स्वीकारलें आहे तें कौटिल्याच्या राजनीतीस अनुरूप अशासारखे आहे. तें यशस्वी होणें किंवा न होणे हें त्याच्या आटोक्याबाहेर किंवा इतर कोणत्याहि राष्ट्रीय पुढाऱ्याच्या आटोक्याबाहेर असणाऱ्या जागतिक घडामोडींवर अवलंबून आहे, असे आपले मत देऊन जयप्रकाश या पत्रकात पुढे म्हणतात, "शोनान येथें स्थापन झालेल्या हिंदी सरकारचे व हिंदी फौजेचे महत्त्व लक्षांत घेऊनहि मला ही गोष्ट जोरदारपणे विशद करावयाची आहे, कीं आमचे स्वातंत्र्य हे बहुतांशीं आमच्या स्वतः-च्याच सामर्थ्यावर व साधनावरच अवलंबून राहणार आहे निष्क्रिय राहून हताश होणे आणि बाहेरून मिळणाऱ्या साहाय्याची आशा करीत राहणें, हें आत्मघातकी राजकारण आहे. बाहेरून मिळणारी कोणतीहि मदत आपणास स्वतंत्र करूं शकणार नाहीं. सुभाषचद्रांचें सैन्य केवढेहि मोठे असले, तरी ते हिंदुस्थानात येऊन हिंदु-स्थानांतील दोस्त सैन्याचा पराभव करू शकेल असे समजणें, म्हणजे चमत्कारावर विश्वास ठेवण्यासारखें आहे जर दोस्त सैन्याचा पराभव कोणी करू शकेल तर ते जपानी सैन्यच करूं शकेल. पण जर जपाननें ब्रिटिशाचा हिंदुस्थानात पराभव केला, तर टोजो आणि सुभाषचद्र याचे कांहींहि करार असले, तरी जपान मुकाट्यानें हिंदुस्थान-वरील आपली सत्ता आमच्या हातीं देईल हे शक्य नाहीं जर दोस्त राष्ट्र व फॅसिस्ट सत्ता यांचा लढा हिंदी भूमीवर सुरू झाला, तर त्या वेळीं आपल्या हातीं सत्ता घेण्याचे प्रयत्न आपणच केले पाहिजेत जर असा प्रयत्न करण्याची आपली तयारी असेल तरच सुभाषचंद्रांच्या सैन्याचा आपणांस कांहीं उपयोग होऊ शकेल आणि हिंदुस्थान आपल्या साम्राज्यांत सामील करण्याचा टोजोचा प्रयत्न आपणांस हाणून पाडतां येईल. सुभाषचंद्राना हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्यांतील या रणनीतीची कितपत स्पष्ट जाणीव आहे, याची कल्पना करणें कठिण आहे. म्हणून जेव्हां हें युद्ध हिंदभूमींत सुरू होईल,

तेव्हां आपण काय करावे या प्रश्नाचा विचार केला पाहिजे ब्रिटिशांच्या धोरणामुळें सर्वसामान्य हिंदी मनुष्य त्यांचा इतका द्वेष्टा झाला आहे, कीं तो जपानचें जरी स्वागत करीत नसला तरी इंग्रज व जपान यांच्या लढ्यासंबधीं तो उदासीन राहूं पहात आहे हें औदासीन्य आमचें मरणच ठरणार आहे. ते औदासीन्य नष्ट करण्याचा प्रयत्न आपणच केला पाहिजे आणि त्यासाठीं विधायक लढ्याचे धोरण आंखिलें पाहिजे ज्या ठिकाणीं युद्ध सुरू होईल किंवा ज्या भागाचा कबजा जपानी लोक घेतील अथवा ज्या भागांत ते आपला प्रवेश करतील, तेथे परकीयांची आजची मुलकी सत्ता कोसळून पडेल अशा ठिकाणीं आपण एक स्वराज्य-सरकार उभारले पाहिजे हिंदी सैन्यातील ज्या तुकड्या पळून जात असतील, त्याना या राष्ट्रीय सरकारच्या नांवानें आपण आवाहन केलें पाहिजे आणि लोकसैन्य उभारलें पाहिजे. या वेळेपासून पूर्वे-कडील प्रांतांत आपणांस असे सरकार निर्माण करावे लागेल व हळूहळू त्याची व्याप्ति सर्व राष्ट्रभर होऊं शकेल. हे कार्य करण्याचा विचार करीत असतां अनेक प्रश्न उप-स्थित होतात, पण त्याची चर्चा येथें करता येणार नाहीं आपलें सर्वसामान्य धोरण व्यक्त करूनच येथे थांबले पाहिजे ”

## बंगालमधील कृत्रिम दुष्काळ व लॉर्ड वेव्हेल यांचें आगमन

वरील पत्रक जयप्रकाश नारायण यांनीं १९४३ च्या सप्टेंबर महिन्यात काढलेले आहे या वेळीं बंगालमध्ये एक भयंकर दुष्काळ पडला होता बंगालमधील धान्य इतर प्रांतात गेलेलें होते, त्याच्या किमती प्रमाणाबाहेर वाढल्या होत्या, आणि कलकत्ता शहर व त्याच्या आसपासच्या प्रदेशांतील लोक भुकेनें मरू लागले होते. १९४३ च्या अखेरीस बंगालमध्ये निर्माण झालेल्या या धान्यटंचाईस अथवा दुर्भिक्षास सरकारी धोरण आणि व्यापाऱ्यांची नफेबाजी हींच प्रमुख कारणे होतीं मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांची गाफिलगिरी या दुर्भिक्षास कारण असल्यामुळे जसजसे भूकबळींचे आकडे प्रसिद्ध होऊं लागले, तसतसें देशांतील एकंदर वातावरण क्रांतिकारक प्रवृत्तीने व विचारानें अतिशय तापूं लागलें या वेळीं बंगालमध्ये जी अन्नान्नदशा झाली होती, तिला कमींत कमी पंधरा लक्ष तरी बळी पडले असावेत अशी कबुली सरकारनें नेम-लेल्या चौकशी-कमिशननेंहि दिली आहे हा दुष्काळाचा आणि भूकबळींचा वणवा १९४३च्या अखेरीस व १९४४च्या प्रारंभीं बंगालमध्यें फार मोठ्या प्रमाणावर पेटलेला होता या वेळीं व्हाइसरॉय लिन्‌लिथगो यांची बदली होऊन लॉर्ड वेव्हेल हे हिंदु-स्थानांत येऊन दाखल झाले. त्यांनीं लष्करी लोकांच्या साहाय्याने बंगालमधील उपासमारीने मरणाऱ्या लोकांना अन्नधान्य वाटण्याचा प्रयोग सुरू केला. यानंतर या दुष्काळाचे भीषण स्वरूप थोडेंथोडे कमी होऊं लागलें.

## वेव्हेल-शिष्टाई

पुढें १९४४ च्या मे महिन्यांत ६ तारखेस लॉर्ड वेव्हेल यांनीं महात्मा गांधींची

आजारी म्हणून तुरुंगांतून मुक्तता केली त्यानंतर हळूहळू देशांतील वातावरण शांत होऊं लागलें पुन्हा शिष्टाईचें राजकारण सुरू झाले आणि १९४५च्या मध्यावर राष्ट्रसभेचें कार्यकारी-मंडळ बंधमुक्त होऊन व्हाइसरॉय लॉर्ड वेव्हेल यांच्याबरोबर राष्ट्रीय सरकार आणि स्वातंत्र्य यासंबंधीं शिष्टाईची बोलणीं सुरू झालीं अखेरीस १९४६ च्या सप्टेंबर महिन्यांत दोन तारखेस एक हंगामी सरकार स्थापन होऊन त्यांत पंडित नेहरू प्रभृति राष्ट्रसभेचे नेते मंत्री म्हणून सामील झाले अशा रीतीने हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्याचा अंत त्याला अनेक अवस्था प्राप्त होऊन अखेरीस ब्रिटिशांशीं तडजोड होऊन झाला

ब्रिटिश सत्तेशीं तडजोड करून स्वातंत्र्य मिळविण्याचें हे जें नवे धोरण १९४५ पासून राष्ट्रसभेनें अवलंबिलें, ते एक प्रकारे या वेळीं अपरिहार्यच झाले होतें. १९४२ पासून १९४५ पर्यंतच्या काळांत राष्ट्रांतील जनतेनें व तिच्या क्रांतिकारक नेत्यांनीं अनेक प्रकारचे प्रयत्न व लढे करून ब्रिटिश सत्ता नष्ट करण्याचे यत्न केले. यांपैकीं कोणताहि प्रयत्न पूर्णपणे यशस्वी झाला नाहीं अशा अवस्थेत तडजोडीचें धोरण स्वीकारून राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळविण्याचा यत्न करण्यावांचून राष्ट्रसभेच्या नेत्याना दुसरा कोणताच व्यवहार्य मार्ग दिसत नव्हता. अर्थात् हा तडजोडीचा मार्ग स्वीकारल्यामुळें मुस्लीम लीगशी तडजोड करणेंहि ब्रिटिशांच्या आग्रहामुळें राष्ट्रसभेच्या नेत्यांना भाग पडले, आणि त्यामुळेंच आज हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या पाकिस्तानलाहि त्यांना मान्यता द्यावी लागली या शिष्टाईचा इतिहास आणि भारत व पाकिस्तान यांची संस्थापना या गोष्टी मागील प्रकरणात दिलेल्याच आहेत. अशा रीतीनें महात्मा गांधींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेच्या नेत्यानीं आपल्या राष्ट्रास ब्रिटिश साम्राज्यसत्तेपासून स्वातंत्र्य आणि स्वयंनिर्णय या हक्काची प्राप्ति करून दिली हिंदी स्वातंत्र्याच्या संस्थापनेसाठीं अनेकांनीं अनेक दिशांनीं व अनेक साधनानीं प्रयत्न केलेले आहेत, या प्रयत्नासाठीं अनेकानीं आपले प्राण खर्चीं घातलेले आहेत, या सर्वांचें फल आजच्या हिंदी जनतेला प्राप्त झालेलें राजकीय स्वातंत्र्य हे आहे पण या अनेक क्रांतिकारकांनीं जे अनेक दिशानीं व अनेक साधनांनीं प्रयत्न केले, त्या सर्वांत राष्ट्रसभेच्या प्रयत्नास आणि म गांधींच्या नेतृत्वास या यशाचें श्रेय अधिकांत अधिक प्रमाणांत देणें अवश्य आहे

## अवसानघातकी क्रांतिशास्त्रज्ञ आणि खरे क्रांतिकारक

इ. स. १९३९ सालीं दुसरे जागतिक महायुद्ध सुरू झाल्यापासून १९४७ सालीं हिंदुस्थानला राष्ट्रीय स्वातंत्र्य प्राप्त होईपर्यंतच्या काळांत म. गांधी, राष्ट्रीय सभा, तिच्यातील समाजवादी पक्षाचे श्री जयप्रकाश नारायण यांच्यासारखे तरुण क्रांतिकारकांचे अग्रणी आणि नेताजी सुभाषचंद्र बोस यांनीं स्थापन केलेल्या आझाद हिंद-सरकार व आझाद हिंद-फौज या निरनिराळ्या शक्तींनीं आपापल्या दृष्टीस अनुसरून भारतीय

स्वातंत्र्याचा सग्राम यशस्वी करण्यासाठीं प्राणपणानें लढून आपले सर्वस्व अर्पण केले. यांपैकीं कोणत्याहि एका शक्तीला भारतीय स्वातंत्र्याच्या प्राप्तीचें सर्व श्रेय मिळणें शक्य नसलें, तरी त्या श्रेयांतील अधिकात अधिक वाटा म गाधी, त्यांचे नेतृत्व स्वीकारून राष्ट्रसभेच्या झेंड्याखाली लढणारे तिचे अनुयायी याना प्रत्यक्षतः आणि नेताजी सुभाषचद्र बोस यानीं स्थापन केलेल्या आझाद हिंद-सरकारच्या प्रयत्नात भागीदार होणारे शूर सैनिक याना अप्रत्यक्षतः देणें भाग आहे पण या क्रातिकालात सर्व भारतीय जनता ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध उघड बड करून उठली असता, जन्मभर ज्यांनीं आपणासच खरे क्रांतिशास्त्र अवगत झाले आहे असा दावा माडिला होता, ते कम्युनिस्ट, ब्रिटिश सरकारच्या युद्ध-प्रयत्नात अडथळा आणू नका असा जनतेला उपदेश करीत स्वस्थ बसले, ही घटना खरोखर आश्चर्यकारक वाटली, तरी ती प्रत्यक्ष घडलेली आहे ! दुसरे महायुद्ध सुरू झाल्यापासून रशियांतील बोल्शेविक सरकार स्वतःच्या राष्ट्राचे रक्षण करण्याच्या निमित्ताने प्रथम हिटलरशीं सख्य करून बसलें त्या वेळीं हिंदी कम्युनिस्टानीं राष्ट्रसभा आणि म. गाधी याना क्रातिविरोधी ठरवून स्वतःला खरे क्रातिकारक असे बिरुद घेतले आणि नतर जेव्हा हिटलरने रशियावर स्वारी केली आणि रशियाला ब्रिटनशीं सख्य करणे भाग पडले, तेव्हा हे आजन्म क्रातिकारक एकदम ब्रिटनचे दोस्त बनले ! या त्याच्या वर्तनावरून त्यांचे क्रातिकारकत्व हे वस्तुनिष्ठ व शास्त्रीय नसून ते रशियाची बौद्धिक गुलामगिरी जगभर फैलावणारे आहे, अशी भारतीय जनतेची खात्री झाली

हिंदी कम्युनिस्टाना हा नवा प्रकाश रशियानें ब्रिटनशीं दोस्ती केल्यानतरच प्राप्त झाला पण ‘ रॉयवादी ’ या नावाने प्रसिद्ध असणाऱ्या क्रांतिकारकांनीं हें दुसरे महायुद्ध सुरू झाल्यापासूनच ते साम्राज्यशाही युद्ध नव्हे अशी घोषणा केली आणि ब्रिटिश सरकारच्या युद्धप्रयत्नाशी सहकार्य करण्याचे धोरण स्वीकारिलें अशा रीतीनें मार्क्सवादाचा आश्रय करून हिंदुस्थानात क्राति करू पाहणारे हे दोन पक्ष या क्राति-काळांत जनतेपासून दूर गेले आणि येथील जनतेने स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं जो अखेरचा संग्राम केला, त्यात त्यानीं भाग घेतला नाहीं

मार्क्सवादातून निर्माण झालेला हिंदुस्थानातील तिसरा पक्ष म्हणजे कॉग्रेस समाजवादी पक्ष होय. या पक्षाने मात्र महात्मा गाधी व राष्ट्रीय सभा यांचें राष्ट्रीय नेतृत्व व त्याचे महत्त्व लक्षात घेऊन हिंदुस्थानातील तरुण क्रातिकारकांना राष्ट्रीय आदोलनात आकर्षून घेतले राष्ट्रसभेंतील खरी क्रातिकारक शक्ति या वेळेपासून या पक्षाच्या मागे सघटित होऊ लागली पुढे या पक्षाच्या नेत्यांनीं म गांधींच्या सत्याग्रही क्रांतितत्राचें महत्त्व ओळखून भारतीय समाजवादात त्या दृष्टीनें नवी भर घातली पाहिजे, अशी भूमिका स्वीकारिली या भूमिकेचा स्वीकार करून आज हा पक्ष हिंदुस्थानांत लोकशाही समाजवादाची सस्थापना करण्यासाठीं झटत आहे; आणि एकदर आशिया खंडांत निर्माण होणारा समाजवाद हा केवळ मार्क्सवादाच्या चाकोरीतून जाणारा असतां

कामा नये, असें स्वतंत्र धोरण व तत्त्वज्ञान तो आशियांतील समाजवाद्यांना दाखवून देत आहे मार्क्स्‌वादांतून हिंदुस्थानांत जे तीन पक्ष निर्माण झाले, त्यांचा हा थोडक्यांत इतिहास आहे. यांपैकीं समाजवादी पक्षानें जी भूमिका स्वीकारलेली आहे, तीच हिंदुस्थानांत जी सामाजिक क्रांति घडवून आणणें आज अवश्य झालें आहे तिच्या निर्मितीस उपयुक्त ठरेल, असे आम्हांस वाटते. या विषयाची अधिक चर्चा पुढील प्रकरणांत केलेली आढळेल

## हिंदी स्वातंत्र्य आणि म. गांधींचें नेतृत्व

म गांधींचें एक चरित्र श्री. पोलक, ब्रेल्स्‌फोर्ड आणि लॉर्ड पेथिक लॉरेन्स या तिघानीं मिळून लिहिलें आहे म. गांधींच्या राजकीय धोरणासबधीं व हिदी स्वातंत्र्याच्या लढ्यांतील त्यांच्या श्रेयासबंधी लॉर्ड पेथिक लॉरेन्स यांनीं जे विचार प्रकट केले आहेत, ते फार मननीय आहेत. भावी इतिहासकारास मार्गदर्शक असेच ते ठरतील असे वाटतें वरील पुस्तकांत अखेरच्या प्रकरणांत पेथिक लॉरेन्स हे लिहितात :

"दोन महायुद्धांच्या दरम्यानच्या काळांत हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीचें नेतृत्व महात्मा गांधींच्याकडे आले होतें त्यानीं जें राजकीय धोरण स्वीकारिलें, त्याचें महत्त्व लक्षांत येण्यास पुढील गोष्टीची जाणीव ठेविली पाहिजे या वेळीं त्यांच्यापुढें केवळ दोनच नव्हे, तर तीन मार्ग होते (अशासारख्या परिस्थितींत नेहमींच असे तीन मार्ग असूं शकतील.) पहिला मार्ग म्हणजे ब्रिटिश लोक जे हक्क देतील ते स्वराज्याचे हप्ते म्हणून कृतज्ञतेने मान्य करावयाचे, त्यांच्याकडून मिळणाऱ्या स्वराज्याच्या कलेंतील या शिक्षणाच्या संधीचा पूर्ण उपयोग करावयाचा आणि अशा रीतीनें आपण स्वराज्याच्या अधिक हक्कास लायक आहों, असे सिद्ध करून दाखवावयाचे. हा मार्ग हिंदी जनतेने अनुसरावा असें बहुतेक ब्रिटिशांचें मत होतें एवढेच नाहीं, तर हिंदुस्थानातीलहि अनेकाना हा मार्ग पसत होता गांधीनीं हा मार्ग पुढील तीन कारणांसाठीं त्याज्य ठराविला : (१) पहिले असे, कीं ब्रिटिशांच्या सद्‌हेतूसबंधीं त्यांना वाढत्या प्रमाणांत अविश्वास वाटू लागला होता. हिंदुस्थानवरील आपली पकड ब्रिटिश लोक आपण होऊन कधीं काळी तरी सोडून देण्यास तयार होतील किंवा नाहीं, याबद्दलच त्यांना शंका वाटूं लागली. (२) दुसरे असे, कीं हिंदुस्थानांत या मार्गानें स्थापन होणाऱ्या स्वराज्याच्या स्वरूपासंबंधी त्यांना केव्हांहि आकर्षण वाटलें नाहीं. अशा मार्गानें मिळणारे स्वराज्य पाश्चात्य पद्धतीचें बनून त्यांत आपल्या जनतेचा जो मूळ स्वभाव त्याच्या विकासास अवकाश मिळणार नाहीं आणि हे स्वराज्य हिंदुस्थानांतील संस्थानिक व धनिकवर्ग याच्या प्रभुत्वाखालीं जाऊन त्यांच्यावर युरोपीय धनिकांचें वर्चस्व झालेलें असेल (३) तिसरें कारण म्हणजे आपल्या देशबांधवांचा दर्जा आणि शील यांची त्याना उन्नति करावयाची होती. ब्रिटिशांनीं उदार बुद्धीनें दिलेल्या देणग्यांची वाट पहात आपल्या देशबांधवांनीं

लाचारीनें निष्क्रिय रहावें हें आपल्या राष्ट्राच्या दर्जास शोभणारें नाहीं, असें गांधींना वाटत होतें.

" याच्या विरुद्ध टोंकाचा दुसरा मार्ग म्हणजे अत्याचारी क्रांतीचा मार्ग होय. याहि मार्गाचे उपासक हिंदुस्थानांत होते आणि ते खून आणि मोडतोड अशा विकृत स्वरूपांत त्या मार्गाचेहि अनुसरण करीत होते. गांधींनीं प्रथमच हा मार्ग त्याज्य ठरविला. तो त्यांना नैतिक दृष्टीनें त्याज्य वाटत होता. एवढेच नाहीं, तर जरी या मार्गानें जाऊन अखेरीस यश संपादन करतां आलें ( ही गोष्ट संशयास्पदच होती ), तरी हा मार्ग रक्तपाताचा असून त्या मार्गानें गेल्यास हिंदुस्थान छिन्नभिन्न, दुर्बल आणि दरिद्री बनलेला व सभोंवार शत्रूंनीं घेरलेला असाच होण्याचा संभव होता म्हणून त्यांनीं हाहि मार्ग सोडून तिसराच मार्ग स्वीकारिला. अनत्याचारी असहकार हाच तो मार्ग प्रजेने आपले सरकारशीं सहकार्य बंद करून राज्यकर्त्यांना आपणावर सत्ता चालविणें अशक्य करणे, असें याचें स्वरूप होतें आयर्लंडातील सिनफेन् पक्षाच्या धोरणाशीं किंवा ब्रिटनमधील मताधिकारवादी स्त्रियांच्या लढाऊ वृत्तीशी या मार्गाचें साम्य होतें. तथापि, तो त्याहून भिन्न होता. या मार्गांत मीठ बनविण्याच्या कायद्या-सारखे कायदे मोडणें, सूत कांतणें, वैयक्तिक आणि सामुदायिक सत्याग्रह, सविनय कायदेभंग करणें याचा अंतर्भाव होत असे. या चळवळीची प्रगति, तिचे यश, तिची भरती-ओहोटी यांचें वर्णन या पुस्तकात मागील प्रकरणात केलें आहे. यासंबंधींचा इतिहासाचा निर्णय अद्यापि झालेला नाही. तथापि, याबाबत हिंदी जनतेने आपला निर्णय दिलेला आहे आणि आपणास स्वातंत्र्य मिळवून देणारी आद्यशक्ति म. गांधींचें वरील धोरण हीच होय, असे तिचें मत आहे व्यक्तिशः मला हें तिचें मत पटतें या धोरणामुळेंच हिंदुस्थानचा आत्मा जागृत झाला त्यामुळेंच ब्रिटिशांची या देशावर सत्ता गाजविण्याची आसक्ति वठून गेली, आणि याच त्याच्या धोरणामुळे रक्तपाती क्रांति टळूं शकली " (पृष्ठ ३०७-३०८)

## १४

# सत्याग्रही क्रांतिशास्त्र

सत्याग्रह हें एक राष्ट्रीय क्रांतिशास्त्र आहे, त्याचप्रमाणें तें सर्वांगीण क्रांतिशास्त्र आणि समाजसंघटनाशास्त्र अगर समाजधारणाशास्त्रहि आहे भारतीय संस्कृतीचें तें एक परिपक्व फल आहे. हिंदुस्थान आजपर्यंत एका राष्ट्रीय क्रांतीच्या कार्यांत मग्न झालेला होता. या क्रांतीचें तात्कालिक ध्येय राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि लोकशाही यांची प्रस्थापना हें होतें. हिंदुस्थानांत राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा म. गांधी त्याचें नेतृत्व करूं

लागण्यापूर्वी सुरू झालेला होता. हिंदुस्थान हे एक परतंत्र राष्ट्र आहे आणि त्यानें स्वातंत्र्याची प्राप्ति करून घेतल्याखेरीज त्याच्या जीवनाचा आणि संस्कृतीचा प्रश्न सुटू शकत नाहीं, तसेंच हे स्वातंत्र्य त्यास प्रागतिकांच्या सनदशीर साधनांनीं प्राप्त होऊं शकत नाहीं म्हणून त्यास क्रांतीच्या साधनाचा अवलंब करणे अवश्य आहे, हे सिद्धांत हिंदुस्थानच्या मनावर म गांधी हिंदुस्थानांत येण्यापूर्वी आणि राष्ट्रसभेचीं सूत्रें त्यांच्या हातीं जाण्यापूर्वीच ठसू लागलेले होते किंबहुना, आपली इच्छा असेल, तर आपल्या प्रयत्नांनी भारतीय क्रांति आपणांस करितां येईल आणि ती आपण निःशस्त्र असतानाहि करिता येईल, याची जाणीवहि भरतखंडाला झालेली होती म. गांधी हिंदुस्थानचे नेतृत्व करू लागण्यापूर्वी हिंदुस्थानात स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार संपूर्ण स्वराज्याची प्रस्थापना झाल्याखेरीज राज्यकर्ते आणि प्रजाजन याच्यामध्ये सलोखा नांदणे शक्य नसून हा संपूर्ण स्वराज्याचा झगडा कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपात त्याची प्राप्ति होईपर्यंत एकसारखा चालू राहणार, अशी परिस्थिति १९२० पूर्वीच निर्माण झालेली होती. पहिल्या महायुद्धांत हिंदी राष्ट्राने ब्रिटिश साम्राज्याशीं सहकार्य केलें ते सहकार्य राष्ट्रसभेची प्रस्थापना झाल्यापासून तिने अवलंबिलेल्या धोरणाचें फल होतें. या सहकार्याचें फल महायुद्धानंतर हिंदुस्थानला संपूर्ण स्वराज्याच्या प्राप्तीच्या रूपानें मिळाले पाहिजे, असे लो. टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्यांचे म्हणणे होतें १९१७ सालीं भारतमंत्री मि मॉटेग्यू यांनीं हिंदुस्थानला हप्त्याहप्त्यानें स्वराज्य देण्याची जी जाहीर घोषणा केली, त्याचबरोबर हिंदुस्थानला हें स्वराज्य हप्त्याहप्त्यानें मिळाले, तरी संरक्षण आणि तिजोरी यासुद्धा मध्यवर्ती हिंदुस्थान-सरकारातील सर्वच सत्ता लोकांच्या हवालीं करणारा एकच कायदा ब्रिटिश पार्लमेंटने करावा आणि त्या कायद्यानुसार विशिष्ट कालमर्यादेत हिंदुस्थानास स्वयनिर्णीत संपूर्ण स्वराज्याची प्राप्ति व्हावी, अशी मागणी राष्ट्रसभेनें १९१७ सालींच मुक्रर केली महायुद्धानतर जेव्हा मॉटेग्यू यानीं वरील राष्ट्रीय मागणीला धुडकावून लाविले, त्याच वेळीं राष्ट्रसभेने आपल्या जन्मापासून अवलंबिलेलें सहकारितेचे धोरण सोडिलें राष्ट्रसभेच्या इतिहासातील सहकारिता-खंड अशा प्रकारें १९२० साली संपून तिच्या असहकारिता-खंडास प्रारंभ झाला इ. स १९१७ पर्यंत तिचीं सूत्रें प्रागतिक पुढाऱ्यांच्या हातीं होतीं तोपर्यंत तिचे धोरण शुद्ध अथवा बिनशर्त सहकारितेचें होतें. त्या सालीं तिचीं सूत्रे लो टिळक यांच्या हाती आली व तेथून तिचे धोरण प्रतियोगी सहकारितेचें किंवा सशर्त सहकारितेचें बनले जेव्हा १९२० सालीं ब्रिटिश साम्राज्य हिंदी राष्ट्रीयत्वाशीं सहकार्य करण्यास तयार नाहीं असे सिद्ध झाले आणि १९१९ च्या जालियनवाला बागेतील हत्याकांडावर सफेती फांसून 'विसरा आणि क्षमा करा' असें मायावी बोलणें ब्रिटिश मुत्सद्द्यांनी सुरू केलें, तेव्हाच प्रतियोगी सहकारितेची स्वाभाविक परिणति असहकारितेत होणें अपरिहार्य ठरले. याच वेळीं हिंदुस्थानातील मुसलमान समाजालाहि ब्रिटिश साम्राज्यशाहीचे कृष्ण अंतरंग, खिलाफतप्रकरणीं

आपला ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं केलेला विश्वासघात पाहून, बरोबर दिसूं लागलें. हिंदी मुसलमानांतील क्रांतिकारक राष्ट्रीय भावना या वेळीं जागृत झाली आणि हिंदु-मुसलमान जनता एक होऊन परकीय ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं सपूर्ण स्वराज्याच्या प्राप्तीसाठीं सत्याग्रही क्रांतिशास्त्राचें अवलंबन करून झगडूं लागली, असें दृश्य १९२० पासून १९२२ पर्यंतच्या काळात दिसले.

यानतर पुनः कांहीं काळ या क्रातीच्या प्रयत्नाची जी प्रतिक्रिया झाली, तींत हिदु-मुसलमानांचें ऐक्य नाहींसें झालें तरीहि यानतर राष्ट्रसभेनें स्वातन्त्र्य-सग्रामांतील ज्या सत्याग्रही मोहिमा केल्या, त्यांत जरी मुसलमानांतील पुढारी म्हणविणारे लोक फारसे सामील झाले नाहींत, तरी मुसलमान जनतेची संख्या बऱ्याच मोठ्या प्रमाणावर सामील झाली होती विशेषतः वायव्य सरहद्द प्रात हा मुसलमानी विभाग आणि त्याचे मुसलमान पुढारी खानबधू हे अखेरपर्यंत राष्ट्रसभेंत एकनिष्ठेनें कार्य करीत होते.

भरतखडात सुमारे तीस वर्षें (१९१७ ते १९४७) चालू असलेल्या या सत्याग्रह-संग्रामातून एका अभिनव मानवसंस्कृतीचा उदय होत आहे इतकेच नाहीं, तर त्या मानवसस्कृतीच्या प्रगतीचे एक अभिनव क्रातिशास्त्रहि निर्माण होत आहे आजपर्यंत ज्या विशिष्ट स्वरूपाच्या लढ्यात या सत्याग्रही क्रातिशास्त्राची वाढ झाली, त्या लढ्याच्या स्वरूपामुळे त्याचें एक विशिष्ट स्वरूप लोकास प्रतीत झालें आहे तथापि, विशिष्ट लढ्याच्या अनुषगानें त्यास प्राप्त होणारे हे विशिष्ट स्वरूप हेच त्याचें अखेरचें किंवा नित्याचे स्वरूप समजणे बरोबर होणार नाहीं तसेंच या विशिष्ट लढ्यांत यशस्वी होऊन त्याने हिदुस्थानांत राष्ट्रीय स्वातन्त्र्याची व लोकशाहीची सस्थापना केली म्हणजे त्याचे कार्य संपलें, असें मानणेहि बरोबर होणार नाहीं किबहुना, विचारी मनुष्यांस असेंच म्हणावे लागेल, कीं हिंदुस्थानांत राष्ट्रीय स्वातंत्र्याची आणि लोकशाहीची सस्थापना झाल्यानतरच त्याच्या मुख्य कार्याची, म्हणजे मानवी सस्कृतींत एक अभिनव क्राति घडवून आणून तिला मंगल स्वरूप प्राप्त करून देण्याच्या कार्याची, सुरुवात होणार आहे. राष्ट्रीय भावना आणि लोकशाही यांना सत्याग्रही दीक्षा दिल्याने त्याचें जें स्वरूप बनणार आहे, ते आजच्या युरोपात दृष्टीस पडणाऱ्या राष्ट्रीय भावनेहून आणि लोकशाहीहून अगदीं भिन्न असें असेल. यामुळेंच आपणास जगाच्या इतिहासांत कांहीं स्वतंत्र स्थान आहे आणि आपल्या इतिहासापासून जगाला कांहीं बोध घेण्याजोगा आहे, असा त्याला विश्वास वाटत आहे. भारतीय स्वातन्त्र्याचा सत्याग्रह-संग्राम हे आधुनिक भारताच्या गेल्या शभर वर्षांतील इतिहासाचे एक परिपक्व फल आहे अथवा या काळांत भारतीय संस्कृतीचें जें तत्त्वमंथन झालें, त्यांत प्राप्त झालेलें ते अमृत आहे या अमृत तत्त्वज्ञानाचे प्राशन केल्यास मानवसस्क्राति खरोखर अमर बनेल आणि या भूलोकास 'अमरभूमि' हे नाव प्राप्त करून देण्याचें व मानव-संस्कृतीची सत्ययुगाच्या दिशेनें प्रगति करण्याचें सामर्थ्य त्यांतून प्राप्त होईल, इतकी

त्याची योग्यता आहे. मात्र या तत्त्वज्ञानाचा स्वीकार करण्याचा अधिकार आपल्या-पाशीं आहे हे प्रत्यक्ष कृतीनें सिद्ध करून देण्याची जबाबदारी आजच्या तरुण भारता-वर आहे. ही जबाबदारी त्याच्या हातून पार पडावी याच दृष्टीनें भारतीय क्रांतीचें आणि सत्याग्रही क्रांतिशास्त्राचें स्वरूप या प्रकरणात विशद करावयाचें आहे ते झाल्या-नंतर पुढील प्रकरणांत राष्ट्रीय क्रांतीतून निर्माण झालेल्या सत्याग्रही तत्त्वज्ञानाचें सर्वांगीण स्वरूप वर्णन करण्यात येईल आता राष्ट्रीय क्रांतिकार्य यशस्वी झाल्यामुळें या तत्त्वज्ञानाच्या आधारें भरतखडास एक सर्वांगीण क्रांति घडवून आणावी लागत असून या सर्वांगीण क्रांतींतून मानवसस्कृतीचा एक नवा आदर्श जगाच्या प्रत्ययास येऊं लागेल. या भावी कार्याचें स्वरूप वर्णन करण्यापूर्वी आपणांस आज या क्रांति-शास्त्रास जें स्वरूप प्राप्त झाले होतें, तें का व कसे प्राप्त झालें हे समजून घेतलें पाहिजे, व तोच या प्रकरणाचा विषय आहे

## प्रागतिक व राष्ट्रीय तत्त्वज्ञानें

सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा स्वीकार करण्यापूर्वी हिंदुस्थानांत राष्ट्रनिर्मितीचे दोन प्रमुख संप्रदाय अस्तित्वांत आले होते, त्यांना प्रागतिक आणि राष्ट्रीय अशीं नांवें प्राप्त झाली होतीं या दोन सप्रदायांखेरीज एक सशस्त्र क्रातिकारक संप्रदायहि अस्तित्वांत आला होता म. गांधींचा सत्याग्रही सप्रदाय हा तात्त्विक दृष्ट्या या तीनहि सप्रदायांहून भिन्न असला, तरी या तिन्ही सप्रदायांतील श्रेष्ठ तत्त्वें त्यांत अंतर्भूत झालेलीं आहेत, आणि आमच्या मतें तो लो टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्याच्या बहिष्कारयोगाचें अथवा निःशस्त्र क्रांतीचे शास्त्रीय आणि परिणत स्वरूप आहे. आतापर्यंत या अखेरच्या दृष्टि-कोणाचें बरेच विवेचन झालेले असून प्रागतिक तत्त्वज्ञान आणि सत्याग्रही तत्त्वज्ञान यांतील साधर्म्य कोणते आहे, याचाहि अधिक खुलासा आम्ही करणार आहोतच. तसेंच सशस्त्र क्रातिवादी मार्गाचा अवलब पूर्वीच्या राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं कां केला नाहीं आणि म गांधींनीं तो कां केला नाहीं, यांतील भेदहि येथें विशद करणें अवश्य आहे म गांधींच्या-पूर्वीचे राष्ट्रीय पुढारी सशस्त्र क्राति तूर्त तरी अशक्य आहे एवढ्याच दृष्टीने निःशस्त्र क्रांतीचा मार्ग अनुसरण्याचा उपदेश करीत. याच्या उलट, म. गांधी हे तो मार्ग शक्य असला, तरीहि इष्ट फलप्राप्तीच्या दृष्टीनें तो गौण आहे असें प्रतिपादीत. तसेंच पूर्वीच्या बहिष्कारयोगाचें असहकारयोगांत रूपांतर करितांना त्यांनीं त्यास अहिंसातत्त्वाचें आध्यात्मिक अधिष्ठान देऊन त्याला एका अभिनव क्रांतिशास्त्राचे परिणामकारक स्वरूप प्राप्त करून दिलेलें आहे आधुनिक भारतानें या क्रांतिशास्त्राचें अवलंबन कां व कसें केलें, याचा विचार करीत असता म. गांधींच्या पूर्वी राष्ट्रनिर्मितीचे जे दोन-तीन विचारसप्रदाय या देशांत अस्तित्वांत आले होते, त्यांचें थोडक्यांत सिंहावलोकन करून त्यांपैकीं कोणत्या संप्रदायांतील कोणतीं तत्त्वे या सत्याग्रही क्रातिशास्त्रांत अंतर्भूत झालेलीं आहेत, याचाहि विचार आतां आपण केला पाहिजे. असें केलें म्हणजेच

आधुनिक भारताच्या गेल्या शंभर वर्षांच्या इतिहासांत जें राष्ट्रीय विचारमंथन झालें, त्यातील आजचें सत्याग्रही तत्त्वज्ञान हे नवनीतच होय असें आम्ही कां म्हणतों, याचा उलगडा वाचकांस होऊं शकेल

या दृष्टीनें आतां आपण प्रागतिक संप्रदायाचा अथवा त्याच्या तत्त्वज्ञानाचा थोडा विचार करूं. मागे अनेक ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें या तत्त्वज्ञानाचा उगम बंगालमध्यें राजा राममोहन रॉय यांच्या सर्वांगीण सुधारणावादांतून झालेला आहे. युरोपीय आणि विशेषतः ब्रिटिश संस्कृति व भारतीय संस्कृति यांची तुलना करून भारतीय संस्कृति ही आधुनिक ब्रिटिश संस्कृतीच्या मानानें मागें राहिलेली आहे आणि तिची आधुनिक युरोपीय संस्कृतीच्या बरोबरीने प्रगति झाल्याखेरीज आपले राष्ट्र इतर राष्ट्रांच्या बरोबरीनें स्वातंत्र्यांत नांदण्यास पात्र होणार नाहीं, हे उघडपणे मान्य करून ब्रिटिश राज्यछत्राच्या छायेंत आपल्या संस्कृतीचा विकास करण्याचें कार्य राजा राममोहन रॉय यांनीं सुरू केलें होतें. साहजिकच त्यांच्या सर्वांगीण सुधारणेचा भर आपल्या धार्मिक आणि सामाजिक सुधारणांवर अधिक असून त्या मानाने राजकीय आणि औद्योगिक उन्नतीवर कमी भर होता ब्रिटिश अमदानीची सुरुवात झाल्यापासून आपल्या संस्कृतीच्या आधुनिक युगाचा प्रारंभ झाला, अशी त्याची भावना होती, आणि आधुनिक युरोपांतील व्यक्तिवादी धार्मिक, सामाजिक व राजकीय तत्त्वांचा पुरस्कार करून त्यांनीं भारतीय संस्कृतीचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न सुरू केला आपल्या औद्योगिक उन्नतीस ब्रिटिश साम्राज्य अडथळा करीत आहे, किंबहुना, तें आपल्या राष्ट्रांतील द्रव्याचा अपहार करण्यासाठींच निर्माण झाले असल्यामुळे त्याच्या छायेखालीं आपल्या संस्कृतीचा विकास होणे शक्य नाही, आणि म्हणून आपली संस्कृति आधुनिक काळांत इतर राष्ट्रांतील संस्कृतीच्या पाठीमागें राहिलेली असली, तरीहि आपणांस प्रथमतः आपल्या देशांतील राजसत्ता आपल्या हातीं घेतल्याखेरीज तिचा विकास करणे, किंबहुना तिचें रक्षण करणेंहि शक्य नाही, फार काय, आपल्या राष्ट्रांतील लोकांचे जीवितरक्षण करणेंहि या ब्रिटिश साम्राज्यात शक्य नाहीं, या सत्याची जाणीव ज्या वेळीं आधुनिक भारतास झाली, त्या वेळीं राजा राममोहन रॉयप्रभृति सर्वांगीण सुधारकांच्या तत्त्वज्ञानांतूनच एक प्रागतिक राजकारण इ. स. १८७५ च्या सुमारास दादाभाई नौरोजी आणि न्या रानडे यांच्यासारख्या पुढाऱ्यांच्या प्रयत्नांनीं जन्मास आलें. ब्रिटिश साम्राज्याचे औद्योगिक स्वरूप लक्षांत घेऊन न्या रानडे यानीं हिंदी अर्थशास्त्राला इंग्लंडांतील व्यक्तिवादी अर्थशास्त्राचा आधार घेतां कामा नये आणि जर्मनी व अमेरिका या औद्योगिक प्रगतींत मागसलेल्या देशांतील राष्ट्रीय अर्थशास्त्राचा आधार त्यास घेतला पाहिजे, असे प्रतिपादण्यास आरंभ केला. अशा प्रकारें आधुनिक भारताच्या निर्मात्यांची दृष्टि व्यक्तिवादांतून राष्ट्रवादाकडे झुकू लागली

न्या रानडे यांनीं आर्थिक राष्ट्रवादाचा पुरस्कार केला असला, तरी ते सांस्कृतिक व राजकीय दृष्ट्या इंग्लंडांतील व्यक्तिवादी नेमस्त प्रागतिक पक्षाचे अथवा त्या

विचारसंप्रदायाचेच अनुयायी होते. ज्या मानानें ब्रिटिश अमदानीखालीं हिंदी जनतेच्या वाढत्या बेकारीचें आणि दारिद्र्याचें भीषण स्वरूप लोकाच्या लक्षांत अधिकाधिक येऊं लागलें, त्या मानानें न्यायमूर्तींच्या नेमस्त प्रागतिक राजकारणाचें धोरण लोकांना अधिकाधिक अपुरे आणि असमाधानकारक भासूं लागलें शिवाय, जर्मनी, अमेरिका अथवा जपान यांसारख्या औद्योगिक प्रगतींत मागसलेल्या परतु राजकीय दृष्ट्या स्वतत्र असलेल्या राष्ट्रांतील राष्ट्रीय अर्थशास्त्र किंवा त्यांचे राजकीय धोरण, हें आपणांस उपयोगी पडण्यासारखे नाहीं, याची जाणीव होऊन हिंदुस्थानांतील राष्ट्रनिर्मात्याची दृष्टि स्वतत्र राष्ट्रांतील अर्थकारण व राजकारण यांच्यावरून निघून, आयर्लंड अथवा इटली यासारख्या परतत्र अवस्थेंतून स्वातंत्र्य प्राप्त करून घेणाऱ्या राष्ट्रांतील विचारसप्रदायाकडे वळू लागली या दृष्टिकोणांतूनच अखेरीस जहाल राष्ट्रीय राजकारण आणि सशस्त्र क्रांतिकारक राजकारण आधुनिक भारतांत निर्माण झालें.

जहाल राष्ट्रीय राजकारणांतून १९०५ च्या सुमारास बहिष्कारयोगाचा निःशस्त्र क्रांतिवाद जन्मास आला आणि क्रांतिकारक राष्ट्रीय राजकारणास त्यानंतर एक-दोन वर्षांत इटालियन देशभक्त मॅझिनी याच्या प्रयत्नाच्या अनुकरणाचे व गुप्त कटाचें स्वरूप प्राप्त झाले. लोकमान्यप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्यांचे निःशस्त्र क्रांतीचे अथवा बहिष्कारयोगाचें राजकारण हे आयर्लंडांतील सिनफेन् पक्षाच्या प्रारभींच्या राजकारणासारखे होते, हे मागे सांगितलेच आहे क्रांतिकारक राष्ट्रीय राजकारणाची सशस्त्र आणि निःशस्त्र अशी दोनहि स्वरूपें प्रथमतः १८९५ नतर १९०५ पर्यंतच्या काळांत महाराष्ट्रात दृग्गोचर झालीं आणि त्या दोघासहि लोकमान्य टिळकांनीं सुरू केलेल्या शिवाजी-उत्सवांतून स्फूर्ति मिळत होती, हें मागें सांगितलेंच आहे निःशस्त्र क्रांतीचें राजकारण आयर्लंडातील पार्नेल व ग्रिफिथ याच्यासारख्याच्या राजकीय धोरणानुसार विकास पावत होते. सशस्त्र क्रांतीचे उपासक मॅझिनी, गॅरिबॉल्डी अथवा कॅव्हूर, यासारख्या इटालियन देशभक्ताच्या कार्याचे व धोरणाचे अनुकरण करीत होते पण लो टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्यांना हें अनुकरण आपल्या परिस्थितीस अननुरूप असे वाटत असल्याने ते राष्ट्रसभेला निःशस्त्र क्रांतीच्या मार्गावर नेण्याचा प्रयत्न करीत असत. हा त्याचा प्रयत्न केवळ आयरिश पुढाऱ्यांच्या प्रयत्नांचें अंधानुकरण नव्हतें; तर आपल्या देशाच्या परिस्थितीस अनुरूप आणि त्या परिस्थितींत फलप्रद होणारें असें हे राजकारण आहे, हें ओळखूनच त्यांनीं तो प्रयत्न चालविला होता. आपल्या देशांत निःशस्त्र क्रांतीचा प्रयत्न करण्याची कल्पना त्याना केवळ आयरिश पुढाऱ्यांच्या धोरणावरूनच सुचलेली नव्हती ब्रिटिश राज्याची आपल्या देशांतील उत्पत्ति, स्थिति आणि विनाश याच्यासबंधीं एल्फिन्स्टन्, मन्रो, मेट्काफ् यांच्यासारख्या साम्राज्यसंस्थापक ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या विचारांचा आणि त्यांनीं त्या विचारानुसार आंखिलेल्या धोरणाचाहि आधार या त्यांच्या राजकारणास होता. तसेंच सर जॉन सीले यांच्यासारख्या राजकीय आणि ऐतिहासिक तत्त्ववेत्त्यांच्या हिंदु-

स्थानांतील ब्रिटिश साम्राज्यसत्तेच्या मीमांसेचाहि आधार त्याना उपलब्ध झाला होता. मन्रो-एल्फिन्स्टन् यांच्यासारखे साम्राज्यसंस्थापक ब्रिटिश मुत्सद्दी आणि सर जॉन सीले व अगदीं अलीकडील उदाहरण हवे असल्यास इंग्लंडांतील हयात राजकीय तत्त्ववेत्त्यात अग्रगण्य असे जे. डी एच् कोल, हे सर्व हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याचा अत येथें एकराष्ट्रीयत्वाची भावना व्यापकत्वाने फैलावली आणि तिचा प्रवेश ब्रिटिश सरकारच्या हिंदी सैनिकात झाला म्हणजे ताबडतोब होऊं शकेल, असें एकमुखाने प्रतिपादितात. या ब्रिटिश मुत्सद्द्यांच्या आणि राजकीय तत्त्ववेत्त्याच्या विवेचनावरून लो. टिळक, बाबू बिपिनचद्र पाल किंवा योगी अरविंद घोष यांसारख्या भारतीय राष्ट्रनिर्मात्यांना निःशस्त्र क्रांतीचें अथवा बहिष्कारयोगाचें राजकारण सुचलें असले, तर त्यात मुळींच आश्चर्य नाहीं एका अर्थानें अशा प्रकारचें राजकारण या देशांत निर्माण होईल आणि त्यातून आपल्या साम्राज्याचा अत होईल, हें ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं शंभर वर्षापूर्वींच ओळखिले होतें असे मन्रो, एल्फिन्स्टन् वगैरे तत्कालीन मुत्सद्द्याच्या उद्गारावरून दिसून येतें.

आधुनिक विद्येचा जो प्रसार आपण हिंदुस्थानात करीत आहोत आणि या आधुनिक सुशिक्षितांच्या मनांत ज्या राजकीय आकांक्षा आपण निर्माण करीत आहोत, त्यातूनच ही राष्ट्रीय ऐक्याची व स्वातन्त्र्याची आकांक्षा हिंदी जनतेत आज ना उद्या, पण निश्चितपणे फैलावणार व ती फैलावल्यानतर हिंदुस्थानांतीलच सैन्याच्या आधारावर हिंदी जनतेला पारतन्त्र्यात ठेवण्याचा आपला प्रयोग यशस्वी रीतीनें शेवटास जाणार, म्हणजे त्याचा अंत होणार, असे भविष्य त्यांनी वर्तविलें आहे यानतर १८५७ साली हिंदु-मुसलमान सैनिकानी एक होऊन ब्रिटिश सरकाराविरुद्ध बंड उभारिले ते आपणास कसे मोडता आले, याचें विवेचन करून सर जॉन सीले यानीं असे म्हटलें आहे की : " हिंदुस्थानांतील एका जातीविरुद्ध दुसरी जात लढवूनच बहुतांशी हे बड मोडण्यात आलें. जोपर्यंत असे करणें शक्य आहे आणि आपल्यावर कोणतेंहि सरकार असले तरी त्यावर टीका करण्याची व त्याविरुद्ध बंड करण्याची संवय हिंदी जनतेला लागलेली नाहीं, तोपर्यंतच इंग्लडांतून हिंदुस्थानचे राज्य करणे शक्य आहे त्यात अलौकिक असे काहीं नाहीं परतु मी मागे म्हटल्याप्रमाणें जर ही परिस्थिति पालटली, आणि जर कोणत्याहि उपायानें हिंदी जनतेत एकराष्ट्रीयत्व निर्माण झालें व त्याच्याशी असणारा आमचा सबध हा ऑस्ट्रियाचा इटलीशीं ज्या प्रकारचा सबध होता त्यासारखा थोड्या प्रमाणातहि बनला, तर आमच्या प्रभुत्वाबद्दल आम्हास भीति बाळगली पाहिजे, इतके म्हणूनच मी थांबत नाहीं, तर त्या क्षणीं या प्रभुत्वाची आशाहि आम्ही सोडूनच दिली पाहिजे, असे मी म्हणतों "§ १८५७-५८ सालांतील हें हिंदु-मुसलमान सैनिकांचे बड गुरखे आणि शीख या जातीच्या सैनिकांच्या तुकड्यांच्या साहाय्याने मोडण्यांत आले हिंदुस्थानांतील शिंदे,

§ The Expansion of England, P 233, by J. R Seelay.

होळकर, किंवा निजाम यासारख्या एकाद्या मोठ्या संस्थानिकानें बंडवाल्यांस साहाय्य केलें असतें आणि त्या वेळचा जमीनदार किंवा सरंजामदारवर्ग ब्रिटिशांशीं राजनिष्ठ राहिला नसता, तर ब्रिटिश-साम्राज्याचा अंत त्याच वेळीं झाला असता, हें आता सर्वमान्य झालेले आहे * त्याचप्रमाणे हेंहि पुढें सर्वमान्य झालें, कीं या संस्थानिक-वर्गाच्या प्रयत्नांतून हिंदुस्थानला स्वातंत्र्याची प्राप्ति होईल ही आशा व्यर्थ होती. १८९५ नंतर १९०५ पर्यंतच्या काळांत हिंदुस्थानांत जें क्रांतिकारक राजकारण जन्मास आलें, त्या संप्रदायांतील कांहीं लोकांना या वर्गांतील एकाद्याच्या साहाय्यानें, अगर अफगाणिस्तान किंवा नेपाळ यांसारख्या लहानशा राज्याच्या साहाय्यानें, इटलीनें ऑस्ट्रियाच्या साम्राज्यांतून आपली मुक्तता करून घेतली, तशी आपणांसहि ब्रिटिश साम्राज्यांतून मुक्तता करून घेतां येईल अशी आशा वाटत होती परंतु ही आशा अनुभवांतीं फोल ठरली. हिंदुस्थानांत जी राज्यक्रांति होणार, ती लोकशाही स्वरूपा-चीच होणार आणि मध्यमवर्गांतील बुद्धिमान् व स्वार्थत्यागी पुढारी व निर्धन शेतकरी-वर्ग यांच्या एकीकृत सामर्थ्यानेंच ती होणार, अशी लोकमान्यप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्यां-ची खात्री झाली होती. याचसाठीं राष्ट्रसभेंत ब्रिटिश साम्राज्यशाहीखालीं चुरडून जाणाऱ्या शेतकरीवर्गाचा प्रवेश मोठ्या प्रमाणात व्हावा आणि तिचें धोरण लोक-शाहीच्या तत्त्वानुसार चालू लागावे, असा त्यांचा कटाक्ष होता हिंदी समाजातील वरिष्ठ जमीनदार व संस्थानिकवर्ग हा संस्थानाच्या व जमीनदारीच्या मोहाने साम्राज्यनिष्ठ बनलेला असल्यामुळें सुशिक्षित मध्यमवर्ग आणि दरिद्री बनलेला शेतकरीवर्ग हाच क्रांतिकारक राजकारणाचे अधिष्ठान होऊ शकतो, हे पाहून या दोघांना सशस्त्र क्रांती-पासून दूर ठेवण्यासाठीं ह्यूम, वेडरबर्न अथवा कॉटन हे ब्रिटिश मुत्सद्दी राष्ट्रसभेची चळवळ करीत होते, आणि याच वर्गांना निःशस्त्र क्रांतीच्या धोरणाने राष्ट्रसभेत

* शिंदे-होळकरप्रभृति संस्थानिक कसे साम्राज्यनिष्ठ होते, त्यासंबंधी पुढील उतारा वाचनीय आहे "The steady devotion of Scindia and Holkar left the Marathas without a leader of skill and influence, and has hitherto rendered harmless that formidable race .... Had either of them openly declared against us, no Englishman probably, would have remained in the Peninsula"

जमीनदारवर्गाला कायमधारापद्धति दिल्यामुळें तो साम्राज्यनिष्ठ राहिला, यासंबंधीं पुढील उतारा पहा "With regard to the fidelity and attachment of the Zemindars, Mr Mangles, the late Chairman of the Court of Directors, has well said that their universal good conduct forms a distinctive feature of this revolution Indeed instances of their firmness and allegiance, are so numerous that many well informed Indian thinkers have come to the opinion, that the best safeguard of the British Government against calamities of this kind, lies in the extension of farseeing and most statesman-like land-settlement system of Lord Cornwallis"

— *The mutinies and the people or statements of native fidelity exhibited during the outbreak of 1857-58 by a Hindu, P. 129 and 130.*

संघटित करून लो. टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढारी ब्रिटिश मुत्सद्द्यांकडून भारतीय स्व-राज्याची प्राप्ति करून घेण्याचा प्रयत्न करीत होते बहिष्कारयोगाच्या निःशस्त्र क्रांती-चा हा प्रयोग यशस्वी होईल आणि हिंदी जनतेच्या साहाय्याने चालू असलेले ब्रिटिश राज्ययंत्र मोडून पडेल, हे ह्यूम-वेडरबर्न यांनाहि दिसत असल्यामुळे, ते आपल्या देशबांधवांना राष्ट्रसभेच्या मागण्या मान्य करण्याचा उपदेश जन्मभर करीत होते. पण हा उपदेश सत्ताधारी ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं मानिला नाहीं त्यामुळे राष्ट्रसभेंतील निःशस्त्र क्रांतीची भावना वाढीस लागली व पहिल्या महायुद्धानंतर हिंदी राष्ट्राची जी वंचना ब्रिटिश मुत्सद्द्यांनी केली, ती पाहून ही निःशस्त्र क्रांति परिणामकारक रीतीने संघटित करण्याचें कार्य महात्मा गांधींनी आरंभिले. प्रागतिक राजकारण महायुद्धानंतर राष्ट्रसभेतून बाहेर पडले आणि राष्ट्रसभा उघडपणे निःशस्त्र क्रांतिवादी संस्था बनली

## गांधी-नेतृत्वाची पार्श्वभूमि

आयर्लंडात आर्थर ग्रिफिथ यांनी सिनफेन् पक्षाच्या स्थापनेच्या रूपाने जें निःशस्त्र क्रांतिवादी राजकारण सुरू केले होते, त्याला महायुद्धानंतर सशस्त्र क्रांतीचे स्वरूप प्राप्त झाले तथापि, तोंपर्यंतच्या काळात आयर्लंडमध्ये चढाऊ राष्ट्रसंघटना करण्यास या पक्षाच्या नि.शस्त्र राजकारणाचा उपयोग झालेला होता आयर्लंडसारखे हिंदुस्थान हे एक छोटेंच राष्ट्र असतें, तर कदाचित् त्याच इतिहासाची पुनरावृत्ति येथेहि झाली असती पण आयर्लंड किंवा इटली या देशांहून हिंदुस्थान हे राष्ट्र किती तरी पट मोठे, त्यात हिंदु, मुसलमान, शीख वगैरे अनेक धर्मभेद, पंथभेद व जातिभेद; एकराष्ट्रीयत्व आणि लोकशाही या भावनांच्या दृष्टीनें बरेच मागसलेले, प्रबल युरोपीय राष्ट्राच्या समूहापासून भौगोलिक दृष्ट्या फार दूर, आणि ब्रिटिश संस्कृतीने व ब्रिटिशाच्या काल्पनिक सामर्थ्याच्या भीतीने भांबावलेले व मेंडसावलेले, असें असल्यामुळे या राष्ट्रांत निःशस्त्र क्रांतिवाद हाच व्यवहार्य व परिणामकारक स्वातंत्र्याचा मार्ग आहे, असे येथील विचारी, बुद्धिमान् व स्वार्थत्यागी राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं म. गांधी हिंदुस्थानात येण्यापूर्वीच ठरविले होते व भारतीय बुद्धीवर तसे संस्कारहि त्यांनी केले होते महात्मा गांधींनी १९२० सालीं जेव्हां असहकारयोगाच्या रूपानें राष्ट्रापुढे निःशस्त्र क्रांतीचा आपला कार्यक्रम ठेविला, तेव्हां राष्ट्रातील बुद्धि-मान् पुढाऱ्यांनीं आणि क्रांतिकारक तरुण अंतःकरणांनीं त्याला जी मोठ्या प्रमाणावर मान्यता दिली, त्याची ही एक सयुक्तिक मीमांसा आहे कोणत्याहि कारणाने ज्यांना ही मीमांसा पटली नाहीं किंवा पटली तरी ती लोकांपुढें मांडवली नाहीं, त्यांनी म. गांधींच्या पाठीमागें सर्व राष्ट्र एकदम का गेलें, याची मीमांसा म. गांधींची बुवाशाही अशीच केलेली आहे. पण ही मीमांसा विचारास व बुद्धीस पटण्याजोगी आहे, असे वाटत नाहीं.

प्रागतिक पक्षाने महात्मा गांधींच्या सत्याग्रही धोरणावर अव्यवहार्यतेचा आपला

सनातन आक्षेप घेतला आणि तो पक्ष लढाऊ राजकारणापासून अलग राहिला, यात आश्चर्यकारक किंवा त्याच्या पूर्वीच्या धोरणाशीं विसगत असे कांहींच नव्हते; परंतु लो टिळकाच्या अनुयायापैकीं श्री केळकर यांचा पक्ष महात्मा गाधींच्या असहकार-योगावर जे आक्षेप घेत असे, त्याचें स्वरूप थोडें भिन्न होते एका बाजूने अव्यवहार्यतेचा आक्षेप तो घेतच होता, तर दुसऱ्या बाजूने म गाधींचे अहिंसातत्त्व हे राजकारणांत घोटाळा करणारे असल्यामुळे, आम्ही त्यात सामील होत नाहीं असाहि बहाणा हा पक्ष करीत असे वस्तुतः लोकमान्यांच्या अनुयायांत जी क्रातिकारक अन्तःकरणे होती, तीं म. गाधीच्या काळात अनत्याचारी असहकारितेत व कायदेभंगांत सामील झाली, हें मागील एका प्रकरणात आम्ही दाखविलेच आहे हीं सर्वच अन्तःकरणें एकदम अहिंसाधर्मी बनलीं असा याचा अर्थ नव्हता ही अन्तःकरणे म. गाधीच्या राजकारणात कशी व कोणत्या वृत्तीने सामील झालीं, याची मीमांसा आ कृपलानी याच्या पुढील उद्गारावरून वाचकास यथार्थतेनें करिता येईल असे वाटतें ते आपल्या ‘ The Gandhian way ’ या पुस्तकात म्हणतात : “ रसायनशास्त्र आणि विमानें याच्या काळातील सहारसाधने हाती असणाऱ्या सरकाराविरुद्ध सशस्त्र युद्ध करणे हे सशस्त्र लोकांसहि अशक्यप्राय वाटत असते, तर मग हिंदुस्थानसारख्या निःशस्त्र राष्ट्राची कथा काय ? शिवाय, लष्करी अर्थाची क्रातिकारक सघटना उघडपणे करणेहि शक्य नाही आमची सघटना आम्हास अनत्याचारी साधनांनींच केली पाहिजे त्याचप्रमाणे स्वार्थत्याग, शौर्य, ऐक्य, शिस्त आणि सघटना या ज्या नैतिक गुणाची अत्यत आवश्यकता सशस्त्र क्रातींतहि लागते, त्याची वाढ सत्याग्रहाने उत्कृष्ट प्रकारे होऊं शकते अखेरचा धक्का देण्याचे कार्य अत्याचाराने होवो, अगर अनत्याचाराने होवो; म गाधीच्या नेतृत्वाखाली ज्या गुणाची वाढ राष्ट्रात अधिकाधिक होत आहे, त्यांची वाढ करणे आणि ती सद्गुणसपत्ति प्राप्त करून घेणे, हे अवश्य आहे या सपत्तीची वाढ शाततेच्या साधनानींच मोठ्या प्रमाणावर होऊ शकते. या सर्व गुणानीं माडित असा एकादा क्रांतिकारकाचा लहानसा गुप्त गट संघटित करणे अगदी शक्य असतें; परतु सर्व राष्ट्रात अथवा त्यांतील बऱ्याच मोठ्या विभागांत गुप्त मार्गानी या गुणाची वाढ करणे शक्य नाहीं म्हणून अतिम सशस्त्र लढ्याच्या दृष्टीनेंहि हिंदुस्थानात सत्याग्रहामुळे वाढत असलेली गुणसपत्ति उपयुक्त आहे कारण लढ्याचे स्वरूप कसेंहि असलें, तरी ही सद्गुणसपत्ति हाच त्याचा आधार असतो. म्हणून कायमचे नसले तरी निदान यापुढे बरीच वर्षे सत्याग्रह किंवा संप हेंच एक साधन आम्हांस उपलब्ध आहे ”[१] अशा प्रकारे महात्मा गांधीनी राष्ट्रसभेला निःशस्त्र

[१] “ In an age of aerial and chemical warfare, the instruments of which are in the hands of Governments, even an armed people would find a physical conflict with the state a hopeless task How much more so an unarmed nation like India ? Moreover, it is not possible to organise openly in a military sense We can only organise ourselves by non-violent methods

क्रांतिकारक संस्थेचे स्वरूप देण्यापूर्वी हिंदुस्थानांतील जी उत्साही अंतःकरणें क्रांतिकारक मार्गाचा अवलंब करीत होती अथवा लो टिळकांच्या पक्षांत राहून त्यांच्या धोरणातूनच अखेरीस भारतीय क्रांति घडून येईल असे मानून काम करीत होतीं, तीं सर्व म. गांधींच्या नेतृत्वाखालीं धर्म म्हणून नसलीं, तरी धोरण म्हणून सत्याग्रह-संग्रामात सामील झाली. प्रथमतः धोरण म्हणून ज्यांनी सत्याग्रहाची दीक्षा घेतली, त्यांच्याचपैकीं कांही आज सत्याग्रहाचें खरे आणि प्रभावी स्वरूप बुद्धीला पटल्यामुळें धर्मदृष्ट्याहि त्याचा स्वीकार करीत आहेत म गांधींनीहि राष्ट्रसभा अथवा खिलाफत-कमिटी यांच्याकडून सत्याग्रहसंग्रामास मान्यता मिळवितांना अहिंसेचा धर्मबुद्धीनें त्यांनीं स्वीकार करावा अशी अपेक्षा धरिली नव्हती सामान्यतः धर्मदृष्ट्या अहिंसा-तत्त्व हा मानवाचा नित्यधर्म आहे, याबद्दल निदान हिंदुस्थानात तरी कोणताहि विचारवंत वाद घालीत नाही. तथापि, सत्य व अहिंसा या नित्यधर्मास व्यवहारांत मानवसमाजाच्या अपूर्णावस्थेंत काही अपवाद करावे लागतात, असे प्रतिपादण्यांत येत असते, पण व्यवहारदृष्ट्याहि ज्या वेळीं अहिंसातत्त्व आचरणें हेच राष्ट्रनिर्मिती-सारख्या कार्यात अवश्य आहे असे सर्वांच्या बुद्धीस पटते, त्या वेळीं धर्मशास्त्रांतील अंतिम सिद्धांतांतील सूक्ष्म मतभेदाचा काथ्याकूट करून लोकांचा बुद्धिभेद करणे आणि आपल्या राष्ट्रात सुरू असलेल्या निःशस्त्र क्रांतीच्या कार्यात निष्कारण विघ्ने उपस्थित करणें हें प्रखर बुद्धिमत्तेचें लक्षण आहे असे ज्यांना क्रांतिकार्याची, तळमळ लागलेली आहे, त्यांना वाटत नाहीं अंतिम तत्त्वज्ञानातील मतभेद क्षणभर विसरून जाऊन विशिष्ट कार्यक्रमावर मतैक्य होणारे पक्ष राजकारणाच्या रणांगणात खांद्यास खांदा लावून झगडत असलेले नेहमीच दिसतात ही व्यवहारबुद्धि म गांधींच्यापाशी होती, व म्हणूनच त्यांचे व्यावहारिक दृष्ट्या अलीबंधूंच्यासारख्या कडव्या मुसलमानांशीहि क्रांतिकार्यात ऐक्य होऊं शकलें याच दृष्टीने ज्यांना आजच शस्त्रग्रहण करून सशस्त्र क्रांतीला उद्युक्त होणें हा अशास्त्रीय मार्ग आहे असे पटले होते, ते सर्व क्रांतिकारक

And after all even in a physical fight the qualities that are of the utmost importance are moral, like organisation, discipline, unity, bravery and sacrifice Satyagraha brings out these qualities pre-eminently Whatever may give the final blow, non-violence or violence, for the time being the qualities that the nation has been progressively acquiring under Gandhi are worth cultivating and worth having They can be cultivated most extensively by peaceful methods It is quite possible to have a small secret revolutionary group having all these moral qualities But the nation as a whole or any extensive portion thereof cannot get these qualities by secret methods Therefore even for a final violent struggle these qualities that Satyagraha has developed in Indian character are good, for they are the basis of all fight, violent or non-violent So if not forever, at least for many years to come, the method of Satyagraha or strike is the only method open to us."

—*The Gandhian Way, P 172.*

म. गांधींचें नेतृत्व स्वीकारून कार्य करण्यास तयार झाले परंतु सशस्त्र अगर निःशस्त्र यापैकीं कोणत्याच क्रांतिकारक वृत्तीची प्रेरणा ज्यांच्या बुद्धींत नव्हती, असे लो टिळकांचे अनुयायी म्हणविणारे काही लोक हिंसा-अहिंसा यांचा वाद माजविण्यात आणि म. गांधींच्या निःशस्त्र क्रांतीच्या कार्यात अडथळे उत्पन्न करण्यांत आपल्या बुद्धीचा सदुपयोग (!) करू लागले आणि ज्यांनीं व्यवहारबुद्धीने म गांधीचे नेतृत्व स्वीकारिलें, त्यांना ढोंगी अगर बुद्धिहीन म्हणू लागले.

## अहिंसेच्या अधिष्ठानाचें महत्त्व

महात्मा गांधींनीं पूर्वीच्या राष्ट्रीय पुढाऱ्याचा बहिष्कारयोग असहकारयुद्धाच्या स्वरूपांत लोकांपुढे मांडिला असला, तरी त्याला अहिंसातत्त्वाचे अधिष्ठान दिल्यामुळे त्याच्यांत एक धर्मनिष्ठेचे अलौकिक तेज चमकूं लागलें. या तेजामुळे त्याचा प्रभाव वाढू लागला आणि त्यामुळेंच ब्रिटिश राज्यकर्त्यांनी लो. टिळक किंवा बाबू अरविंद घोष यांना ज्या सवलती दिल्या नाहीत, अशा कांहीं सवलती म गांधींना देणे त्यानाहि भाग पडलें १९०९ सालीं नागरिकाच्या मूलभूत हक्कावर आपण गदा घालणार नाही अशी हमी राज्यकर्त्यांनी दिल्यास भारतीय राज्यक्रांति निःशस्त्र मार्ग सोडून जाणार नाहीं, अशी हमी राष्ट्रीय पुढारी देऊं शकतील असे उद्गार बाबू अरविंद घोष यानी आपल्या जाहीर भाषणांत काढिले होते. परतु अरविंदबाबू किंवा लो. टिळक हे व्यावहारिक दृष्ट्या निःशस्त्र क्रांतिवादी असले, तरी अंतिम दृष्ट्या ते अहिंसावादी नाहींत असे ब्रिटिश राज्यकर्त्यांना वाटत असल्यामुळे महात्मा गांधींना लॉर्ड चेल्म्स्फर्ड, लॉर्ड रीडिंग किंवा लॉर्ड आयर्विन् अथवा लॉर्ड लिन्लिथगो याच्या काळात चळवळ करण्यास प्रथम तरी काही महिने जी कांहीं सवलत मिळाली, तशा प्रकारची सवलत पूर्वीच्या पुढाऱ्यांना ब्रिटिश राज्यकर्त्यांकडून मिळणें शक्य नव्हते. असे असले तरी महात्मा गांधींच्या प्रयत्नांतून सशस्त्र क्रांतीचा उद्भव होणारच नाही, अशी ब्रिटिश मुत्सद्द्यांची किंवा राजकीय तत्त्वज्ञांची पूर्ण खात्री झालेली होती, असे म्हणतां येत नाहीं. व्यक्तिशः महात्मा गांधींच्या अहिंसानिष्ठेसबधीं मात्र त्यांच्यापैकीं कोणास फारशी शंका असेल असे वाटत नाहीं. निदान म गांधींची याबद्दल सर्व जगभर जी कीर्ति पसरलेली होती, तिच्या तेजामुळें तरी त्यांच्यावर अशा प्रकारचा आरोप करण्यास ब्रिटिश मुत्सद्दी सहसा धजत नव्हते, आणि ब्रिटिश राजकीय तत्त्वज्ञहि तशा प्रकारची कुशंका व्यक्त करीत नसत. तथापि महात्मा गांधींची निःशस्त्र क्रांतीची चळवळ त्यांच्या आटोक्याबाहेर जाऊन तिला सशस्त्र क्रांतीचें स्वरूप प्राप्त होईल, अशी भीति मात्र ते व्यक्त करीत असत या भीतीच्या मिषानेच ते आपल्या अरेरावी व जुलमी फर्मानाचें अथवा फर्मानी कायद्यांचें समर्थन जगापुढें करीत असत. पण अशा अनेक जुलमी फर्मानांनींहि म गांधींनीं सुरू केलेली सत्याग्रहाची मोहीम आपणांस दडपून टाकितां येत नाहीं, असा त्यांस अनुभव आलेला होता. तसेंच या चळवळीला

अत्याचारी स्वरूप प्राप्त होईल व मग ती आपल्या असर्याद लष्करी सामर्थ्याने आपण चुरडून टाकू, या त्यांच्या अपेक्षाहि अनुभवानें खऱ्या ठरल्या नाहींत.

## लष्करी सामर्थ्याबद्दलची शंका

शिवाय, आपलें लष्करी सामर्थ्यहि हिंदी राष्ट्राच्या सहकार्यावरच अवलंबून असल्यामुळें असहकारयुद्धांत त्यावर बिनधोकपणे विसंबून राहणें दूरदर्शीपणाचे नाहीं, याची जाणीव ब्रिटिश मुत्सद्द्यांनाहि होती, आणि जी डी. एच् कोल यांसारख्या ब्रिटिश राजकीय तत्त्ववेत्त्यांनींहि ती प्रदर्शित केलेली होती १९३४ सालीं लिहिलेल्या आपल्या ' A Guide to Modern Politics ' या ग्रंथात म. गांधींच्या व राष्ट्रसभेच्या राष्ट्रीय क्रातीसबधी मि कोल हे पुढीलप्रमाणें लिहितातः " आज हिंदु आणि मुसलमान या दोनहि धर्मातील प्रचड जनतेच्या मुक्या लोकमताला न जुमानता ग्रेट ब्रिटनने हिंदुस्थान आपल्या ताब्यात ठेविला आहे हिंदी संस्थानिक आणि हिदुस्थानातील राष्ट्रीय चळवळ समाजवादी किंवा मालमत्ता जप्त करणारी वृत्ति धारण करील, या भीतीने तेथील जमीनदार आणि इतर सधनवर्ग असे कांही गट राजनिष्ठ राहिले आहेत. प्रचड शेतकरी समाजापैकीं फारच थोडे लोक कोणत्याहि प्रकारच्या राजकीय चळवळीत भाग घेतात तथापि राष्ट्रसभेला सक्रिय साहाय्य करणारे लक्षावधि लोक निश्चित आहेत, आणि राजकीय दृष्ट्या जागृत अशा हिंदी लोकांपैकीं बहुसख्य लोक राष्ट्रसभेच्या अथवा राष्ट्रीय मुसलमानाच्या सस्थाच्या पाठीमागे आहेत. प्रागतिक आणि प्रागतिकाहूनहि नेमस्त अशा पक्षात कांही महत्त्वाच्या व्यक्ती असल्या, तरी त्याना सामान्य जनतेचा व्यापकत्वाने पाठिबा नाहीं . . . . . चीनमधील क्युमिटँग पक्षाप्रमाणे राष्ट्रसभेत सामाजिक व आर्थिक धोरणाबद्दल अनेक दृष्टिकोणाचे लोक आहेत एका टोंकास कोणत्याहि प्रकारच्या समाजवादाला विरोधी असे हिंदी गिरणीवाले अगर पेढीवाले आहेत व दुसऱ्या टोकास कामगार संघटनेचे पुढारी अगर तरुण सुशिक्षित हे असून ते सामान्यतः अर्धे समाजवादी आणि क्वचित् अर्धे कम्युनिस्ट आहेत. जवाहरलाल नेहरू हे या वृत्तीचे नमुनेदार प्रतिनिधि आहेत गांधी हे या दोन टोंकाच्या मध्यावर आहेत त्यांच्या मतात राजकारण, धर्म आणि सन्यस्त वृत्ति याचे बेमालूम संमिश्रण असें कांहीं झाले आहे, कीं त्याचा उलगडा आधुनिक पाश्चात्य मनाला होत नाहीं. तथापि, हिंदुस्थानात कोणत्याहि व्यक्तीपेक्षा त्यांनाच फार अधिक अनुयायी आहेत. राजकीय नेतृत्वाचे आपले स्थान ते पुन्हां कितपत घेतील याबद्दल संशय आहे बहुधा हे त्यानाहि सांगता येणार नाहीं कारण आपली अंतःप्रेरणा जेव्हां जागृत होईल, तेव्हां तिच्या आज्ञेनुसार वागणारे ते गृहस्थ आहेत. आज तरी ते आपले लक्ष अस्पृश्यतानिवारणाच्या मोहिमेवर ठेवून राजकारण दुसऱ्यावर सोंपवीत आहेत परतु जी नवी राज्यघटना हिंदुस्थानला देण्याचें ब्रिटिश सरकार ठरवील, ती चालू करण्याच्या वेळीं निर्माण होणाऱ्या आणिबाणीच्या प्रसंगीं ते पुन्हां

राजकारणांत परत येतील, असा पुष्कळांचा विश्वास आहे आणि त्यांना तसे परत यावयाचें असेल, तर येता येणें शक्य आहे

"आजपर्यंतच्या गांधींच्या धोरणाचे अतरग अनत्याचार हेच आहे केवळ राज्यक्रांतीच नव्हे, तर कोणत्याहि स्वरूपाचा केवढाहि अत्याचार करण्यास त्यानी कसून विरोध केलेला आहे शाततेचा असहकार आणि कायदेभगाचें निर्वाणीचे शस्त्र हाच त्यांच्या धोरणाचा पाया आहे पण या मर्यादेत हिंदी राष्ट्रवादाला ते किती काळ रोखून धरू शकतील ? अत्याचाराचा उद्भव झाल्याच्या कारणावरून त्यानीं कायदे-भंगाच्या मोहिमा अनेक वेळा थाबविल्या आहेत. अशा रीतीने त्या त्याना नेहमीच थाबविता येतील काय ?

"हे विसरता कामा नये, कीं ब्रिटिश अमलाखालील हिंदी प्रजा—सरहद्दी-जवळील काहीं डोंगरी टोळ्या वगळल्यास—बहुधा पूर्णपणे नि:शस्त्र आहे अर्थात् ब्रिटिशाच्या ताब्यातील हिंदी सैन्य हा या सिद्धातास अपवाद आहे .. हिंदी लोकाना शस्त्रें हवी आहेत, परतु राष्ट्रीय चळवळ सशस्त्र बनेल या भीतीनें सरकार त्याना शस्त्रे घेऊ देत नाहीं म्हणून हिंदी सैन्याच्या राजनिष्ठेवरच ग्रेट ब्रिटनचें भवितव्य बरेंच अवलबून आहे आणि राष्ट्रीय मताचा प्रचार सैनिकात कितपत प्रविष्ट झाला आहे हे सांगणें फार कठिण आहे या दृष्टीनें शीखातील असतोषास फार महत्त्व आहे कारण शीख हे मोठे लढवय्ये असून सैन्यांत त्याचा बराच भरणा आहे याच्या उलट, हिंदू आणि विशेषतः बंगाली हे लढवय्ये नाहीत, आणि हिंदी राष्ट्रीय पुढाऱ्या-पैकी बहुतेकाना सशस्त्र क्राति नको आहे ब्रिटिश सरकारचे बल त्याना माहीत आहे व म्हणून त्यांच्याशीं सशस्त्र सामना देण्यापेक्षा ते तडजोड करण्यास लवकर तयार होतील. परतु ही तडजोड राष्ट्रीय स्वाभिमानास अनुरूप असून तिच्यामुळे उभयपक्षीं मान्य अशा अल्प संक्रमणकालात आपणास साम्राज्यातर्गत का होईना, पण पूर्ण स्वराज्य प्राप्त होईल अशी ही तडजोड असेल, तरच ते तिला मान्यता देतील इतक्या मर्यादेपर्यंतची मागणी तरी एकादे ब्रिटिश मन्त्रिमंडळ मान्य करील काय ? जरी ही मागणी मान्य झाली नाहीं, तरीहि काहीं काळ हिंदुस्थान बलात्कारानें आपल्या कब्जात ठेवितां येईल [पण युरोप खडात एकाद्या खऱ्या व गभीर स्वरूपाच्या अडचणीच्या प्रसगात ग्रेट ब्रिटन सापडेल, तेव्हा त्याचें हिंदी साम्राज्य बहुधा नष्ट होईल"*

वरील उताऱ्यावरून ब्रिटिश राजनीतिज्ञाना आपल्या हिंदी साम्राज्यासंबंधीं व राष्ट्रसभेच्या निःशस्त्र चळवळीबद्दल काय वाटत होते, त्याची बरोबर कल्पना येईल. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं १९४२-४३ सालीं नेताजी सुभाषचंद्र बोस यानीं आझाद हिंद सरकार व आझाद हिंद-फौज स्थापन करून ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध जे उघड युद्ध पुकारिलें, त्यावरून वरील उताऱ्यांत श्री. कोल यानीं जी भीति प्रदर्शित केली आहे ती प्रत्यक्ष खरी ठरल्याचा अनुभव ब्रिटिशांना आला व त्यानंतर राष्ट्रीय भावना

* A Guide to Modern Politics, P 308-310, by G D H and Margaret Cole

लष्करांत व आरमारांत फार मोठ्या प्रमाणावर फैलावून पुढे एकदां आरमारी बंडहि घडून आले त्याबरोबर ब्रिटिशांनीं हिंदी स्वातंत्र्याला मान्यता देण्याचा निर्धार केला.

## प्रागतिक सुधारणावाद व सत्याग्रही तत्त्वज्ञान

हिंदुस्थानातील जहाल राष्ट्रीय पक्षापासून आणि क्रांतिकारक वृत्तीपासून महात्मा गांधींच्या राजकारणात कोणते धोरण आललें आहे, याची चर्चा आतापर्यंत आम्ही केली पण या राष्ट्रीय विचारसंप्रदायाहून भिन्न पण आधुनिक भारताच्या इतिहासात अधिक पूर्वीचा असा जो सर्वांगीण सुधारणेचा प्रागतिक विचारसंप्रदाय त्यापासून त्यांच्या राष्ट्रनिर्मितीच्या धोरणात कोणतीं तत्त्वें अंतर्भूत झालेली आहेत, याचाहि आता थोडा विचार करू महात्मा गांधी हे जसे व्यवहारदक्ष मुत्सद्दी आणि असामान्य राजकीय पुढारी आहेत, त्याचप्रमाणे ते एक अलौकिक धर्मसुधारक व तत्त्वनिष्ठ समाजसुधारकहि आहेत धार्मिक व सामाजिक सुधारकाच्या अंगी दिसून येणारी आध्यात्मिक वृत्ति आणि प्रखर सत्यनिष्ठा यांचा राजकारणात प्रवेश करण व समाजाच्या सर्वांगीण व्यवहारास आध्यात्मिक स्वरूप देणे,हेच ते आपले जीवितकार्य मानीत होते गौतम बुद्धाची अहिंसा आणि श्रीकृष्णाचा अन्यायप्रतिकाराचा निष्काम कर्मयोग अथवा अनासक्तियोग यांचा अनुपम समन्वय त्यांच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानात झालेला आहे त्यांची सर्व व्यवहारातील मूळ प्रेरणा अन्यायरूपी अधर्माचा उच्छेद आणि न्यायाची अथवा धर्माची संस्थापना ही होती धार्मिक व सामाजिक सुधारकाप्रमाणें त्यांची वृत्ति अंतर्मुख असून आपल्या पारतंत्र्यास परकीयापेक्षा आपणच अधिक कारण झालो होतों असे ते मानीत आत्मोन्नति आणि आत्मशुद्धि हाच आपल्या स्वातंत्र्यप्राप्तीचा खरा मार्ग आहे, असे ते उपदेशीत. तथापि आधुनिक युरोपीय संस्कृतीचा स्वीकार केल्याने आपली उन्नति न होता आपला अधःपातच होईल, असे त्यांचें स्पष्ट मत होते समाजातील राजकीय आणि आर्थिक व्यवहारावरील धार्मिक बंधनें नष्ट केल्यामुळे, युरोपीय संस्कृतीचा आज विनाश होत आहे, असेहि त्यांचे मत होते. भारतीय व युरोपीय मध्ययुगीन संस्कृतीत समाजाच्या सर्व व्यवहारावर धर्माची व नीतीची बंधने होती तीं सर्व बंधने आधुनिक युरोपीय संस्कृतीनें झुगारून दिली आणि आर्थिक व राजकीय व्यवहाराना केवळ भौतिक सुखाच्या कसोटीवर पारखणारी अनेक सामाजिक शास्त्रे निर्माण केली धर्म आणि मोक्ष या पुरुषार्थांना बाजूस सारून अर्थ आणि काम या पुरुषार्थांच्या प्राप्तीसाठींच सर्व समाजाची प्रवृत्ति असते, या सिद्धांताच्या आधारावर समाजरचना करण्याचा प्रयत्न आधुनिक युरोपने केला व त्यामुळेच तेथे भांडवलशाही, साम्राज्यशाही व लष्करशाही यांची आसुरी संपत्ति आज निर्माण झाली असून, भौतिक विद्येला मानव-संहाराच्या शास्त्रांचें स्वरूप प्राप्त झाले आहे ही आधुनिक युरोपीय आसुरी संस्कृति आंतरराष्ट्रीय महायुद्धाच्या व राष्ट्रांतर्गत वर्गयुद्धाच्या यादवीत लवकरच नष्ट होणार आहे आणि जगाला शांततेचा, न्यायाचा व सत्याचा मार्ग दाखवून देणारी एक नवी

मानवसंस्कृति सत्याग्रही तत्त्वज्ञानांतून निर्माण होत आहे, असा त्यांचा आत्मविश्वास होता. या सत्याग्रही तत्त्वज्ञानांतून कोणत्या स्वरूपाची मानवसंस्कृति निर्माण होऊं शकेल आणि जो राष्ट्रीय लढा भरतखंडांत चालू होता तो यशस्वी झाल्यानंतर आतां सत्याग्रहाचें स्वरूप व कार्य कोणत्या प्रकारचें असेल, याचा विचार आम्ही यापुढील प्रकरणात करणार आहो येथे एवढेच सांगावयाचे आहे, की महात्मा गांधींचें सत्याग्रही तत्त्वज्ञान हे ज्याप्रमाणें एक राष्ट्रीय व राजकीय क्रांतिकारक तत्त्वज्ञान आहे, त्याचप्रमाणे ते एक सर्वांगीण क्रांतिकारक तत्त्वज्ञान आहे आणि महात्मा गांधी हे जसे राजकीय नेते व मुत्सद्दी होते, त्याचप्रमाणे ते धार्मिक व सामाजिक सुधारकहि होते.

## मध्ययुगीन संत व म. गांधी

म गांधी हे एक भागवतधर्मी संत असून मध्ययुगीन भक्तिमार्गी साधुसंतांप्रमाणें त्यांनीं वैदिक धर्माची परंपरा व वर्णाश्रमधर्माची चौकट याचा स्वरूपत त्याग केलेला नव्हता राजकीय क्रांति घडून येण्यापूर्वी समाजाच्या धार्मिक व सामाजिक विचारांतहि एक प्रकारची क्रांति घडून आली पाहिजे, असे मत इतिहासाचार्य राजवाडे यांनीं प्रतिपादिले असल्याचें मागें सातव्या प्रकरणांत आम्हीं सांगितले आहे अशाच प्रकारची धार्मिक व सामाजिक विचारक्रांति शिवशाहीच्या पूर्वी महाराष्ट्रातील तुकाराम-रामदासादि साधुसंतांनीं घडवून आणिली होती असे राजवाड्यांनी म्हटले आहे आणि ही साधुसंतांनीं घडवून आणिलेली सामाजिक विचारांची क्रांति वैदिक परंपरेला व चातुर्वर्ण्याला न झुगारतां घडवून आणिली, असा त्यांचा आधुनिक सुधारकाहून विशेष म्हणून त्यांनीं वर्णिला आहे. म. गांधींच्या सामाजिक व धार्मिक सुधारणेच्या धोरणास हे मध्ययुगीन साधुसंतांच्या कार्याचें राजवाडे यांनीं केलेलें वर्णन बरेच लागू पडतें हे खरे असले, तरी वर्णाश्रमधर्माचे मूळ तत्त्व कायम ठेवूनहि ब्राह्मणा-पासून अतिशूद्रांपर्यंत सर्वांनाच सामाजिक समता उपभोगिता आली पाहिजे आणि चातुर्वर्ण्यातील सामाजिक विषमता पूर्णपणे नष्ट झाली पाहिजे, सामाजिक श्रेष्ठत्वाच्या अहंकारांतून निर्माण झालेलीं रोटी-बेटीव्यवहारांतील कृत्रिम बंधनें गळून पडलीं पाहिजेत; आणि शूद्र व अतिशूद्र या वर्णांना इतरांच्या बरोबरीनें मानवसंस्कृतीत स्थान मिळून आत्मोद्धाराच्या समान संधीचा लाभ त्यांना बिनविरोध मिळू लागला पाहिजे, याबद्दल आपल्या पारतंत्र्याच्या अवस्थेतहि आपण झटून प्रयत्न केले पाहिजेत, अशी त्यांची वृत्ति होती या दिशेनें अस्पृश्यतानिवारण, हरिजनोद्धार आणि जाती-जातींतील विषमतेचें उच्चाटन या कामीं त्यांनीं केलेले कार्य व त्यास हिंदुसमाजा-कडून त्यांनीं मिळविलेली संमति हीं गेल्या शंभर वर्षांत होऊन गेलेल्या कोणत्याहि धार्मिक अथवा सामाजिक सुधारकाहून कमी नाहींत आपलें राष्ट्रीय राज्यक्रांतीचें कार्य व हें कार्य यांत त्यांना कोणताहि विरोध तर दिसत नव्हताच; पण उलट, तीं पर-स्परास पोषक व आवश्यकच आहेत अशीच त्यांची वृत्ति होती. कै. राजवाडे यांनीं

मध्ययुगीन साधुसंतांचा भक्तिमार्ग हा समाजावर होणाऱ्या अन्यायाच्या अगर आक्र-मणाच्या सशस्त्र अगर अशस्त्र प्रतिकाराचाहि मार्ग नव्हे असें म्हटलें आहे, पण महात्मा गांधी यांचा भक्तिमार्ग हा तसा प्रतिकारशून्य नाहीं. तो अहिंसक प्रतिकाराचा तेजस्वी मार्ग आहे. या दृष्टीनें राजवाडे यांनीं तुकारामादि इतर साधुसंत आणि रामराज्याची संस्थापना करूं इच्छिणारे समर्थ रामदास यांच्यामध्ये जो एक भेद कल्पिला आहे, तो महात्मा गांधींनीं आज नष्ट केलेला आहे त्यांनीं भक्तिमार्ग आणि प्रवृत्तिपर कर्मयोग यांचा समन्वय करून रामराज्याची संस्थापना करण्याचा अभिनव सत्याग्रही मार्ग जगाला दाखवून दिला आहे.

इतरहि अनेक दृष्टींनीं महात्मा गांधींचे कार्य मध्ययुगीन साधुसंतांच्या कार्याच्या पुढे गेलेले आहे त्यांची रामराज्याची कल्पना अधिक परिणत आणि आधुनिक काळास अधिक अनुरूप अशा प्रकारची बनलेली आहे रामराज्य हा शब्द ऐकिल्याबरोबर आधुनिक सुशिक्षितांच्या मनात एक राजसत्ताक राज्याची कल्पना उभी राहते आणि मध्ययुगीन साधुसंतांची रामराज्याची कल्पना तशाच प्रकारची होती परंतु महात्मा गांधींची रामराज्याची कल्पना इतकी संकुचित किंवा मर्यादित नाहीं रामराज्य या शब्दानें राजसत्ताक राज्यपद्धति असेच ते मानीत नाहींत राज्य राजसत्ताक असो, लोकसत्ताक असो, अथवा समाजसत्ताक असो, हीं त्याचीं बाह्य स्वरूपें होत, पण राज्याचें अंतरंग हें नेहमीच न्यायस्वरूपी असलें पाहिजे रामाचे राज्य म्हणजे धर्माचें, न्यायाचें राज्य होय. राम ही विशिष्ट व्यक्ति आतां पुन: भूलोकावर येऊं शकत नाहीं, परंतु प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणांत राम आणि रावण अशा दोन वृत्ती आहेत. पहिलींतून धर्मबुद्धि अथवा न्यायबुद्धि यांचा उगम होतो आणि दुसरी स्वार्थबुद्धीच्या रूपानें प्रकट होते. मनुष्यांच्या अंतःकरणातील स्वार्थबुद्धीचा अंत होऊन तेथे न्याय-बुद्धीचें राज्य प्रस्थापित होणे, हेच अंतःकरणातील रामराज्य होय समाजांत स्वार्थ-बुद्धींतून निर्माण होणारे अनेक कलह नष्ट होऊन त्यात न्यायप्रस्थापना होणें म्हणजेच धर्मसंस्थापना होणें किंवा धर्मराज्याची अथवा रामराज्याची स्थापना होणे होय समाजां-तील न्यायबुद्धीचा आधार ज्या राज्याला आहे, ज्या राज्यातील कायदे हे समाजा-तील न्यायबुद्धीला अनुसरून आहेत, न्यायबुद्धीनें प्रेरित होऊन व्यवहार करणाऱ्या मनुष्यास ज्या समाजांत कोणत्याहि कायद्याचा अडथळा होत नाहीं, ज्या समाजातील सर्व व्यवहार मनुष्याच्या अंतःकरणातील न्यायबुद्धीला सहज पटणारे आहेत, अन्यायानें द्रव्यार्जन करणें आणि सत्तेचा उपभोग घेणे, हे ज्या समाजांत अशक्य आहे आणि जेथील राजसत्ता प्रजेंतील संघटित आत्मबलापुढे नमूं शकते, असें राज्य म्हणजे रामराज्य होय. आजच्या समाजशास्त्रीय व राज्यशास्त्रीय विचाराच्या आणि समाजघटनेच्या दृष्टीनें आजचे भारतवर्षीय रामराज्य हे राजशाहीचें न बनतां लोक-शाहीचेंच बनेल व ते तसे बनावे अशीच महात्मा गांधींची कल्पना होती आजची राष्ट्रनिर्मिती लोकशाहीच्या तत्त्वावरच होणार असून आजच्या स्वराज्यांत सामाजिक

समता आणि नागरिक-स्वातंत्र्य यांचा सर्वांस उपभोग मिळाला पाहिजे, हे महात्मा गांधींनीं आपल्या उक्तींनीं आणि कृतीनी निःसंदिग्धपणे लोकास समजावून दिलेले आहे मात्र ही लोकशाही युरोपीय लोकशाहीप्रमाणे भांडवलशाहीची दासी बनू नये आणि लोकसत्तेच्या नांवाने धनिकसत्तेची संस्थापना या देशांत होऊ नये, असेंहि त्यांचें स्पष्ट मत आहे आधुनिक युरोपात जी संस्कृति निर्माण झाली, तिने धर्मांचें अधिष्ठान सोडिल्यामुळें ती भ्रष्ट झाली व तिच्यात भांडवलशाही व साम्राज्यशाही याचा उदय होऊन ती आज रसातळास जाऊ लागली आहे याकरिता आपल्या संस्कृतीने धर्माचे अधिष्ठान सोडू नये आणि आधुनिक युरोपीय संस्कृतीचे अंधानुकरण करू नये, असें त्याचे आग्रहाचे म्हणणे आहे मात्र रामराज्य या त्याच्या शब्दाचा अर्थ आधुनिक सुशिक्षितास भासतो त्याहून भिन्न आहे त्याचप्रमाणें आपल्या राष्ट्रनिर्मितीत अथवा राजकारणात धर्माची वृत्ति बाणविली पाहिजे असे जेव्हा ते म्हणतात, तेव्हा त्याचा धर्म या शब्दाचा अर्थहि आधुनिक सुशिक्षितास भासतो त्याहून भिन्न आहे, हे नेहमी ध्यानांत ठेविले पाहिजे

## धर्म आणि राष्ट्रीयत्व

आपल्या राष्ट्रीयत्वास ज्या धर्मांचे अधिष्ठान हवें असे आपण म्हणतो, तो केवळ हिंदुधर्म नसून त्याहून अधिक व्यापक असा एक सर्वश्रेष्ठ मानवधर्म आहे असे त्यानीं स्पष्टपणे सांगितले आहे १९२१ साली ' यंग इंडिया 'त ' Neither a Saint nor a Politician ' या मथळ्याचा एक लेख त्यानी लिहिला आहे त्यांत ते म्हणतात: "राजकारणाला धर्मांचे अधिष्ठान देण्याचा प्रयोग मी माझ्या व माझ्या मित्राच्या प्रयत्नानें करीत आहे धर्म या शब्दानें मी काय समजतो ते मला विशद करू द्या. इतर सर्व धर्मांहून हिंदुधर्म हा मला अत्यंत प्रिय आहे हे निश्चित. तथापि हा तो धर्म नव्हे हा धर्म हिंदुधर्माहूनहि श्रेष्ठ आहे या धर्मवृत्तीमुळे मनुष्याचा स्वभावच पालटतो त्याच्या अंतःकरणातील सत्याशीं कधीहि न सुटणारी अशी त्याची गाठ बांधली जाते आणि या वृत्तीमुळें त्याची एकसारखी अंतःशुद्धि होत राहते. मानवस्वभावातील ही एक नित्यवृत्ति आहे ती जागृत झाली असता तिला व्यक्त करण्यासाठी आपणास कितीहि क्लेश पडले तरी मनुष्य त्याची फिकीर करीत नाहीं त्याचा आत्मा या वृत्तीमुळें अगदीं बेचैन होतो, आणि परमात्म्याचे ज्ञान होऊन, त्याचा व आपला सत्यसंबंध प्रतीत होईपर्यंत या वृत्तीचे समाधान होत नाही "* सारांश, मनुष्याच्या अंतःकरणांत असत्यातून सत्याकडे, अज्ञानातून ज्ञानाकडे आणि अपूर्णत्वाकडून पूर्णत्वाकडे जाण्याची जी एक सनातन वृत्ति आहे, ज्या वृत्तीनें प्रेरित होऊनच सर्व धार्मिक, सामाजिक किंवा राजकीय सुधारक अथवा क्रांतिकारक लोकनायक, राष्ट्रनिर्माते, साधुसंत अथवा धर्मसंस्थापक आपले व्यवहार करीत असतात, आणि ज्या

* Speeches and Writings of M K Gandhi, by Natesan and Co, P 807, 3rd edition

वृत्तीमुळे मनुष्याची स्वार्थी अहंकारभावना नष्ट होऊन तो परार्थी लोकसेवक बनतो, त्या सनातन मानवी वृत्तीसच महात्मा गांधी हे धर्मवृत्ति अथवा धर्म असें म्हणतात जगांतील सर्व धर्मांचें अंतरंग एकच असून मनुष्याची सतत उन्नति व शुद्धि करणारी ही वृत्ति जागृत व्हावी आणि आपले पारमार्थिक श्रेष्ठ व सत्य स्वरूप त्याने प्रकट करावे, हेंच सर्व धर्मांचें सार आहे अशी महात्मा गांधींची शिकवण आहे सर्वधर्म-सहिष्णुता आणि सर्व धर्मांविषयीं समबुद्धि हे त्यांच्या सत्याग्रहांतील एक अवश्य व्रत आहे, आणि 'सत्यापरता नाही धर्म । सत्य तेंचि परब्रह्म' हे त्यांच्या अध्यात्मज्ञानाचे रहस्य आहे. याच अध्यात्माच्या आणि सर्वव्यापक मानवधर्माच्या अधिष्ठानावर त्यांना आधुनिक भारताची राष्ट्रनिर्मिती करावयाची असल्याने हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती असले क्षुद्र भेदाभेद त्यांच्या अंतःकरणास शिवतहि नव्हते हिंदुस्थानातील राजकीय इतिहासाची परंपरा लक्षात घेऊन आधुनिक भारताच्या निर्मितीस हिंदू व मुसलमान यांच्यातील भेद हाच एक प्रमुख अडथळा आहे, असे त्यांनीं आपल्या बुद्धीनें निश्चित ठरविलें होतें. हिंदुसमाजातील सामाजिक विषमता नष्ट करण्याचें प्रतीक म्हणून त्यांनीं अस्पृश्यतानिवारण व हरिजनोद्धार यास आपल्या राष्ट्रनिर्मितीच्या विधायक कार्यात अग्रस्थान दिलेलें आहे आणि हरिजनांना इतर हिंदूपासून अलग करण्याचा प्रयत्न ब्रिटिश मुत्सद्द्यानीं केला, तेव्हा त्यांनीं आपल्या प्राणाचें मोल देऊ करून ब्रिटिशांची ही भेदनीति हाणून पाडिली आधुनिक भारताच्या इतिहासात राजकारण, समाजकारण आणि धर्मकारण या सर्वच दृष्टींनीं महात्मा गांधींनीं हे जे महत्कार्य केलें त्यास फार महत्त्व आहे व त्याची मधुर फळे भावी पिढ्यास चाखावयास मिळतील त्याचप्रमाणें हिंदु-मुसलमानांचे ऐक्य या विधायक कार्यातील दुसऱ्या महत्त्वाच्या प्रश्नावर महात्मा गांधींच्याइतके राष्ट्रीय पुढाऱ्यापैकी फार थोड्यानीं जनतेचे लक्ष वेधून घेतले असेल, असे म्हटल्यास फारशी अतिशयोक्ति होणार नाही हिंदु-मुसल-मानांचें ऐक्य भारतीय राष्ट्रनिर्मितीच्या व राजकारणाच्या दृष्टीनें आवश्यक आहे, हे अनेक राजकीय पुढाऱ्यानीं ओळखिलेलें होते व आहे विशेषत दादाभाई नौरोजी, न्या रानडे, ना गोखले, लो टिळक या सर्वांनीच राष्ट्रीय दृष्ट्या हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यास पाठिंबा दिलेला आहे, परंतु महात्मा गांधी यांची या प्रश्नाकडे पाहण्याची दृष्टि केवळ राजकीयच नाही राजा राममोहन रॉय यानी हिंदु, मुसलमान व ख्रिस्ती या तीन धर्मांचा समन्वय करण्याची महत्त्वाकांक्षा धरून ब्राह्मसमाजाची स्थापना केली आणि स्वामी रामकृष्ण परमहंस यानी सर्व धर्मांचा समन्वय किंवा सर्व-धर्म-समभाव हाच वेदान्ताचा आधुनिक जगास प्राचीन संदेश आहे असे स्वामी विवेकानंद यांच्या मुखाने जाहीर केले. महात्मा गांधी यांची या प्रश्नाकडे पाहण्याची दृष्टि राजा राममोहन रॉय किंवा स्वामी रामकृष्ण यांच्याप्रमाणे श्रेष्ठ धर्मपर आहे या त्यांच्या वृत्तीस प्राचीन वेदान्ताप्रमाणे मध्ययुगीन साधुसंतांच्या भागवतधर्मानेहि भरपूर आधार आहे व याच आधारावर भारतीय राष्ट्रमंदिराची उभारणी त्यांनी केली.

## व्यक्तिस्वातंत्र्य आणि सत्याग्रही तत्त्वज्ञान

महात्मा गांधी यांच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानांत पूर्वीच्या सर्वांगीण सुधारकांनीं आधुनिक युरोपीय संस्कृतीच्या आधारें प्रतिपादिलेलें आणखी एक तत्त्व थोड्या निराळ्या पण शुद्ध स्वरूपांत अंतर्भूत झालेले आहे हे तत्त्व म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्याचे तत्त्व होय. महात्मा गांधी हे एका अर्थानें आत्यंतिक व्यक्तिवादी आहेत. मात्र ते आपल्या व्यक्तिवादास भौतिक सुखाभिलाषाचे हीन स्वरूप न देतां लोकसेवेंत प्राप्त होणाऱ्या आध्यात्मिक सुखाभिलाषाचें श्रेष्ठ स्वरूप देत असत. धर्मज्ञान, परमात्मप्राप्ति अथवा आत्मज्ञान या बाबतींत ते शब्दप्रामाण्याला किंवा ग्रंथप्रामाण्याला अखेरचें स्थान देत नाहींत ग्रंथप्रचीति आणि गुरुप्रचीति या दोहोंहून आत्मप्रचीति हीच श्रेष्ठ आहे आणि प्रत्येक मनुष्यानें आपल्या अंतरात्म्याच्या आज्ञेंतच सदैव वागले पाहिजे, हा त्यांच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानातील आधारभूत सिद्धान्त आहे. या अंतरात्म्याच्या आज्ञेपुढे ते ग्रंथाची आज्ञा, राजाची आज्ञा अथवा समाजाची आज्ञा या सर्वांसच गौण लेखितात 'निस्त्रैगुण्ये पथि विचरतां को विधिः को निषेधः' हा सिद्धान्त पुढे ठेवून धर्मबंधनें, राजबंधने अथवा समाजबंधने याच्यापलीकडे जाण्याचा आणि केवळ सत्यरूप परमेश्वराचें बंधन पाळून स्वतःला व समाजाला मुक्त करण्याचा अधिकार प्रत्येक मनुष्यास प्राप्त करून घेतां येईल, असे ते मानितात सत्याग्रह हे केवळ राजकीय क्रांतीचें शास्त्र नसून ते एक सर्वांगीण क्रांतीचे शास्त्र आहे आणि त्याचें अनुकरण करण्याचा अधिकार केवळ विशिष्ट कुलांत जन्मल्यानेच प्राप्त होतो, किंवा साधुसंत म्हणून मनुष्याची एक निराळी जात आहे व त्या जातीतील व्यक्तींसच हा अधिकार आहे, असे ते मानीत नाहींत सत्याग्रह हे सर्वांनी अनुसरण्याचे शास्त्र आहे साधुत्व प्राप्त करून घेणें हा प्रत्येकाचा हक्क, अधिकार, किंबहुना धर्म आहे हे साधुत्व प्राप्त करून घेऊन समाजातील रूढ विधिनिषेधाच्या पलीकडे जाऊन नवे विधिनिषेध निर्माण करणे आणि नव्या कालास, नव्या परिस्थितीस आणि समाजांत निर्माण होणाऱ्या नव्या शुभ आकांक्षास अनुरूप अशा प्रकारची नवी धर्मसंस्थापना करणे, हे समाजातील सर्वश्रेष्ठ साधुपुरुषाचे अवश्य कर्तव्य आहे त्यानीं हिंदुस्थानला सर्व बाजूंनीं घेरून टाकणाऱ्या आणि त्याच्या जीवित-वित्ताचा अपहार करणाऱ्या ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध राष्ट्रीय क्रांतीचें निशाण उभारिलें. या क्रांतीतून हिंदुस्थानात लोकशाही म्हणजेच लोकराज्य निर्माण झाले आहे या लोकराज्यात प्रत्येकाचें जीवित आणि वित्त हीं सुरक्षित राहतील. कष्टार्जनानें केलेल्या धनसंचयाचा अपहार कोणाकडूनहि केला जाणार नाही आणि प्रत्येकास सुखाने चरितार्थ करण्याचा मार्ग उपलब्ध होऊन त्याच्या आत्मोन्नतीस शक्य तें साहाय्य समाजाकडून मिळत राहील. पण मागें सांगितल्याप्रमाणें लोकराज्य हेंच त्याच्या स्वराज्याचें अंतिम स्वरूप नव्हे. त्यांच्या स्वराज्याचे अंतिम स्वरूप आत्मराज्य हें आहे. या आत्मराज्यांत कोणालाहि बाह्य

कृत्रिम बधनें पाळावीं लागणार नाहींत दडधारी राज्यसस्थाहि कोणास आवश्यक वाटणार नाहीं हें आत्मराज्य लोकसत्तेच्या व समाजसत्तेच्याहि पलीकडचे आहे आणि त्याची प्राप्ति सत्याग्रही व्यक्तिस्वातंत्र्यातूनच होऊ शकेल असे त्यांचें मत आहे. मात्र आधुनिक युरोप खडांत व्यक्तिस्वातंत्र्याचें जें हीन स्वरूप दृष्टीस पडत आहे व ज्या हीन व्यक्तिस्वातत्र्यवादांतून आधुनिक युरोपीय संस्कृतीचा विनाश आज ओढवत आहे, तशा प्रकारचें हीन व्यक्तिस्वातत्र्य मात्र त्यास नको होतें अमर्याद धनसचयाचें व्यक्तिस्वातत्र्य, निर्धन जनतेला दास बनवून तिचें रक्तशोषण करण्याचे व्यक्ति-स्वातत्र्य आणि सत्तामदानें अथवा सपत्तिमदाने झिंगून जाण्याचे व्यक्तिस्वातंत्र्य त्यांना नको होतें तें व्यक्तिस्वातत्र्य सत्याग्रही तत्त्वज्ञानाशी पूर्णपणे विसगत आहे.

आधुनिक युरोपने जेव्हा अशा प्रकारच्या हीन व्यक्तिस्वातत्र्याचें आणि ते उपभोगीत असणाऱ्या व्यक्तींच्या अमर्याद मालमत्तेचें सरक्षण करणें, हेच राज्य-सस्थेचे आदिकर्तव्य होय असे ठरविले, तेव्हापासून त्याच्या सस्कृतीच्या ऱ्हासकाळास प्रारभ झाला मार्टिन ल्यूथर यानें प्रॉटेस्टट धर्मपथ स्थापन केला किंवा त्यानंतर केल्विन याचा प्युरिटन पथ अस्तित्वांत आला, तेव्हा त्याच्यापुढें हें अमर्याद धनोपभोगाचे आणि सत्ताभिलाषाचे हीन व्यक्तिस्वातत्र्य नव्हतें. धर्माधिकाऱ्यांचीं आणि राजाधिकाऱ्याचीं बधने झुगारून देताना धनिकवर्गाच्या बंधनांचे पाश सामान्य जनतेच्या गळ्याभोंवतीं आवळले जावेत, अशी त्याची अभिलाषा नव्हती पण ज्या व्यापारीवर्गानें त्याच्या या व्यक्तिवादी तत्त्वाचा अवलब केला, त्यानीं लवकरच त्याला सुखाभिलाषी व्यक्तिवादाचें जड स्वरूप प्राप्त करून दिले. ज्या काळात समाजातील कोणत्याहि व्यक्तीला आपल्या जीवितास आवश्यक इतकें वित्त संपादन करण्यास फारसा अडथळा नव्हता, आणि कोणाहि व्यक्तीस आपल्या जीवितास आवश्यक इतक्या वित्ताहून अधिक वित्ताचा संचय करणे जवळजवळ अशक्य होते, अशा प्राथमिक अवस्थेतील समाजात प्रत्येकाच्या कष्टार्जित वित्ताचे संरक्षण करणे आणि प्रत्येकाच्या जीविताचे संरक्षण करणे, या दोनहि गोष्टी सारख्याच होत्या. अशा वेळीं समाजांतील व्यक्तींच्या वित्ताचे सरक्षण करणे हे राज्यसस्थेचे प्रमुख कर्तव्य आहे, असें मानण्यातहि फारसा दोष नव्हता परतु ज्या समाजांत कांहीं थोड्या व्यक्तींना अमर्याद धनसंचय करून समाजांतील इतर सर्वांची जीवितसाधने आपल्या कबजात घेता येतात आणि इतरांच्या असहाय निर्धन परिस्थितीचा फायदा घेऊन त्यांच्या श्रमांतून निर्माण होणाऱ्या संपत्तीचा बिनकष्टानें कायदेशीर अपहार करतां येतो, अशा समाजांत व्यक्तीच्या वित्ताचे सरंक्षण करणे एवढेंच राज्यसस्थेचे कर्तव्य समजणे, हा खरा व्यक्तिवाद नव्हे. अशा आर्थिक विषमतेवर अधिष्ठित झालेल्या समाजांतील व्यक्तिस्वातंत्र्य हे खरे व्यक्तिस्वातत्र्य नव्हे, आणि अशा समाजांतील मालमत्ता ही कष्टार्जित मालमत्ता नव्हे. असा समाज हा स्तेयवृत्तीवर अधिष्ठित झालेला असतो. त्यांत धर्माचें किंवा न्यायाचे राज्य प्रस्थापित होऊं शकत नाही. महात्मा

गांधींना असा व्यक्तिवादी समाज नको होता व ज्या संस्कृतींत अशी आर्थिक विषमता निर्माण होते ती संस्कृतिहि त्यांस नको होती. भौतिक सुखाभिलाष हे सत्याग्रहाचे ध्येय कधींच होऊं शकत नाहीं आणि अमर्याद धनसंचय करणारी व्यक्ति ही सत्याग्रही बनू शकत नाही धनसंचय ही सत्याग्रही दृष्टीनें चोरीच आहे. ख्रिस्तानें म्हटल्याप्रमाणें धनाची उपासना आणि सत्याची उपासना एकालाच करितां येत नाही सुईच्या नेढ्यांतून उंट जाणे हे एक वेळ शक्य होईल, परंतु धनिक व्यक्तीला परमेश्वरी साम्राज्यात म्हणजेच आत्मराज्यात प्रवेश करणे शक्य होणार नाहीं, असे जें ख्रिस्ताने सांगितले, त्याचा अनुभव आपणास दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहाच्या मोहिमेत आला, असे महात्मा गांधींनी आपल्या एका व्याख्यानात सांगितलें आहे तेथेंच धनिक व्यक्तीनें आपल्या धनसंचयाचा त्याग केल्याखेरीज त्यास सत्याग्रही बनता येत नाही व म्हणून सत्याग्रही क्रांतीत निर्धन, दरिद्री लोक जितके उपयोगी पडतात, तितके सधन लोक उपयोगी पडत नाहींत, असाहि त्यांनी आपला अनुभव सांगितला आहे * तात्पर्य, सुखाभिलाषी धनिकांच्या दास्यात गेलेली लोकशाही आणि त्यांच्या स्वैर वासनांतून निर्माण होणारे व्यक्तिस्वातंत्र्य ही सत्याग्रहाची ध्येये नव्हेत धनिकांच्या स्वैराचारातून निर्माण होणारी आर्थिक अराजकता हे त्यांचे समाजाच्या पूर्णावस्थेचें स्वरूप नसून वासनांच्या संयमातून प्राप्त होणारें आत्मराज्य ही त्यांची समाजाच्या पूर्णावस्थेची कल्पना आहे. ही पूर्णावस्था प्राप्त करून घेण्यासाठीं आपल्या जनतेने युरोप खंडातील जनतेप्रमाणें धनिकवर्गाचें नेतृत्व न स्वीकारिता अपरिग्रही सत्याग्रही वर्गाचे नेतृत्व स्वीकारावे, म्हणजे तिला खरें लोकराज्य प्राप्त होईल आणि या लोकराज्यातून आत्मराज्याचाहि मार्ग तिला दिसू लागेल.

## स्वदेशी आणि ग्रामोद्योग

महात्मा गांधींच्या विधायक कार्यक्रमांत ग्रामोद्योगांची संघटना हे एक अत्यंत महत्त्वाचें अंग आहे. राष्ट्रसभेची सूत्रे गांधीजींच्या हातीं गेल्यापासून स्वदेशी चळवळीला ग्रामोद्योगाच्या संघटनेचें स्वरूप प्राप्त झालें. प्रथमत केवळ खादीचीच चळवळ त्यांनीं आपल्या हातीं घेतली व आज त्या चळवळीचा विकास ग्रामोद्योगांच्या संघटनेत झाला आहे. मध्ययुगीन साधुसंत हे राजकारणाकडे लक्ष पुरवीत नसत आणि अर्थकारणहि त्यांच्या कार्यक्षेत्रात येत नसे समर्थ रामदास यांनी राजकारणाचे

* "In South Africa, where I had the privilege of associating with thousands of our countrymen on most intimate terms, I observed almost invariably that the greater the possession of riches, the greater was their moral turpitude Our rich men, to say the least, did not advance the moral struggle of passive resistance as did the poor The rich men's sense of self respect was not so much injured as that of the poorest '

—*Speeches and Writings of M. K. Gandhi, by Natesan and Co, P. 288, 3rd edition.*

व स्वधर्मी राजाचें अथवा स्वराज्याचें महत्त्व ओळखिलें होते आणि स्वधर्मरक्षण व स्वराज्यसस्थापना याचा अन्योन्यसबध त्यांना पटला होता परतु स्वदेशी उद्योगधदे व स्वराज्य यांचा अन्योन्यसबध त्या वेळच्या राजकारणपरिचित असलेल्या साधूंसहि कळण्याचा फारसा सभव नव्हता कारण त्या वेळीं जें परराज्य अथवा परकीय साम्राज्य महाराष्ट्रावर आले होते, त्यात स्वदेशी उद्योगधद्याना नष्ट करून परकीय माल खप-विण्याचे औद्योगिक साम्राज्यशाहीचे धोरण नव्हते त्या वेळच्या परकीय अमदानींत स्वकीय राजा अथवा सरंजामदारवर्ग नष्ट होऊन परकीय राजा येत असे परधर्माची स्वधर्मावर चढाई होत असे तथापि मनुष्यांचे उद्योगधदे कायम टिकल्यामुळे त्यांचीं जीवितसाधने लुबाडिलीं जात नसत. प्रत्येक खेडे हे औद्योगिक दृष्टया स्वयंपूर्णच असे आणि या औद्योगिक पायाच्या आधारावर तेथील परपरागत सस्कृति टिकून असे ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या अमदानीत खेड्यातील उद्योगधद्याचा नाश झाला खेड्या-तील कच्चा माल विलायतेत जाऊ लागला आणि विलायतेतील पक्का माल खेड्यांत घुसू लागला. यामुळे खेड्यांत दुकानदारांचे प्रस्थ वाढले दुकानदार शेतकऱ्याचा माल विकत घेताना आणि त्याला लागणारा माल विकत देताना त्याला लुबाडू लागला. खेड्यातील शेतीखेरीज सर्व स्वतत्र धदे आणि शेतकऱ्याचे जोडधदे हळूहळू नष्ट होऊन खेड्यांत शेतीखेरीज कोणताहि धदा शिल्लक उरला नाही सर्वच लोक-संख्येचा शेतीवर भार पडल्यामुळे शेतजमिनीचे लहान लहान तुकडे झाले, आणि शेतीवर वर्षभर कष्ट करून कोणाचेंच पोट भरेनासे झालें. सरकार-देणे सालोसाल, सक्तीनें, नियमित वेळीं वसूल करण्याची कार्यक्षम राज्यपद्धति ब्रिटिशांनीं स्थापन करून पैशात वसूल करण्याचें सुरू केल्यामुळे सुगींत स्वस्त दराने माल विकणें शेत-कऱ्याला भाग पडू लागले आणि त्याची दुकानदाराकडून अधिकच लुबाडणूक होऊ लागली खेड्यातील जनतेचे सर्व उद्योगधदे ठार करणे, शेतकऱ्याचे जोडधदे नष्ट करणे आणि सुगीत स्वस्त दराने माल विकण्यास त्याला भाग पाडणे व महाग माल त्याच्या पदरात बांधून त्याची दुसऱ्या तोंडानें लुबाडणूक करणे, या सर्व गोष्टी कायद्यानेच करिता येत होत्या. ब्रिटिशांच्या कायद्याच्या राज्यातील ही एक कायदेशीर दरोडेखोरी होती ब्रिटिशानीं जी दरोडेखोरी बद केली आणि जी दरोडेखोरी हजारों वर्षें चालू असताहि खेड्यांतील जनता सुखाने नादत होती, त्या बेकायदेशीर दरोडे-खोरीपेक्षा आणि महमद गझनीसारख्या परकीय व परधर्मी राजकीय लुटारूनी केलेल्या दरोडेखोरीपेक्षां ब्रिटिशांच्या कायद्याच्या राज्यातील वर वर्णन केलेली कायदेशीर दरोडेखोरी खेड्यांतील जनतेस अधिक हानिकारक ठरली, आणि हिंदुस्थानसारख्या सुपीक देशातील तत्कालीन इतर देशातील खेड्यांपेक्षा अधिक संपन्न खेडीं एका अर्ध-शतकाच्या अमदानींतच उध्वस्त झालीं खेड्यांतील दुकानदार हा परकीय भांडवल-शाहीचा दलाल बनला आणि त्यानें खेड्यांतील सर्व उद्योगधंदे नष्ट करून एका शेतकीवरच जगणाऱ्या शेतकऱ्याची दुतोंडी लुबाडणूक चालविली. हळूहळू हा शेतकरी

कर्जबाजारी बनला आणि त्याला लागणारें कर्ज देण्याचा धंदा दुकानदारानें चालविला. दुकानदारी व सावकारी हे दोन नवेच धंदे भरभराटीस येऊन त्यांच्या संकीर्ण व्यवहारांतून निर्माण होणारे कायद्याचे प्रश्न सोडवून पोट भरणारा नवा वकीलवर्गहि प्रत्येक तालुक्यात वाढूं लागला दुकानदारी, सावकारी, वकिली यांच्या जाळ्यांत सांपडलेला शेतकरी हळूहळू आपली जमीन गहाण टाकूं लागला आणि ही गहाणखते कायदेशीर मार्गानें स्वस्त दराची खरेदीखतें बनू लागलीं खेड्यांतील जीवनांत झालेली ही क्रांति, तिच्यामुळें उजाड पडलेलीं खेड्यातील घरे आणि त्यामुळे देशोधडीस लागलेलीं खेड्यातील कुटुंबें, हें दृश्य पाहून महात्मा गांधीना ब्रिटिशांची संस्कृति ही सैतानी संस्कृति आहे आणि तिनें हिंदुस्थानात स्थापन केलेल्या आगगाड्या, तारायंत्रे, टपालखाते हीं सर्व गरीब जनतेला लुबाडण्याचीं सैतानी साधने आहेत, असे दिसून आलें. आपल्या देशात स्वदेशी चळवळ सुरू झाल्यानतर जी स्वदेशी कारखानदारी जन्मास आली, त्या स्वदेशी कारखानदारीमुळे खेड्यातील जनतेत पसरलेलें दारिद्य आणि बेकारी याचा अंत न होता त्याची वाढच होत आहे आणि या कारखानदारीमुळे ज्या अत्यत अल्प लोकसख्येस उद्योगधंदा मिळत आहे, त्यांना आर्थिक दास्य प्राप्त होऊन त्यांचा नैतिक अधःपात होत आहे हें जेव्हा त्यानीं पाहिलें, तेव्हा त्यानीं आपल्या स्वदेशी-चळवळीला ग्रामोद्योगाच्या सघटनेचें स्परूप दिलें ज्या शेतकरीवर्गाचे जोडधदे ब्रिटिश साम्राज्यशाहीने नष्ट केले आणि खेड्यातील ज्या धंदेवाल्याचे स्वतत्र धदे भाडवलशाहीमुळे नाहींसे झाले, त्या शेतकरीवर्गाची आणि त्या छोटे धदेवाल्या वर्गाची उन्नति करणे हे ग्रामोद्योगांचें ध्येय आहे देशांतील केवळ कारखानदार व भांडवलवाले यांचे सरक्षण करून हिंदी जनतेचा उद्धार होऊं शकत नाहीं, हें सत्य समाजवादी पक्ष निर्माण होण्यापूर्वी महात्मा गांधींनीं हिंदी जनतेच्या अंतःकरणावर बिंबविलेलें आहे. त्यांच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानात अशा भाडवलशाही समाजरचनेला स्थान नाही. हिंदुस्थानचे स्वराज्य हेच सामान्य जनतेच्या आर्थिक उन्नतीचे साधन आहे, आणि ही सामान्य जनतेची आर्थिक उन्नति हाच भारतीय संस्कृतीचा पाया आहे, असे हे तत्त्वज्ञान जगाला सागत आहे प्रत्येक समाजाच्या सस्कृतीचा पाया त्याच्या आर्थिक अथवा औद्योगिक घटनेवर अवलबून असतो, हें सत्य महात्मा गाधींना अवगत आहे आणि म्हणूनच भारतीय सस्कृतीचा पाया ग्रामोद्योगाची संघटना हाच असावा, असे ते म्हणतात महात्मा गांधींनीं स्वदेशी-चळवळीला हें जे स्वरूप दिलेले आहे, त्यावरून राष्ट्रसभेचे राजकारण व अर्थकारण हिंदी भांडवलवाल्याच्या हातीं नाहीं हेंच सिद्ध होतें मागें म्हटल्याप्रमाणें महात्मा गाधींनीं राष्ट्रसभेचें नेतृत्व स्वीकारिल्यापासून तिचीं सूत्रे सत्याग्रही वर्गाच्या हातीं गेलेलीं आहेत. हे सत्याग्रही वर्गाचें नेतृत्व म्हणजे धनिकवर्गाचे नेतृत्व नव्हे. युरोपांतील लोकशाहीचे नेतृत्व तेथील धनिकवर्गाकडे गेलें व म्हणूनच तेथील लोकशाहीला आज धनिकशाहीचे व साम्राज्यशाहीचे विकृत स्वरूप प्राप्त झालेलें आहे हिंदी राष्ट्रसभेनें सुरू केलेल्या राष्ट्रीय क्रांतीचे नेतृत्व येथील परकीयाच्या अमदानींत

नुकत्याच उदय पावत असलेल्या भांडवलशाहीकडे गेलेलें नाहीं व तें तसें होईल अशीं चिह्नेंहि आज दिसत नाहींत. यामुळें हिंदी राष्ट्रीयत्वाला युरोपीय राष्ट्रीयत्वा-प्रमाणें भांडवलशाहीचें, साम्राज्यशाहीचें अथवा फॅसिझमचें स्वरूप येईल, ही कांहीं मार्क्सवाद्यांना वाटणारी भीति आणि ब्रिटिश मुत्सद्द्यांना वाटणारी आशा निरर्थक व निराधार आहे, असें आम्हास वाटतें.

## हिंदी राजकारण व भांडवलशाही

हिंदुस्थानांतील राष्ट्रीय चळवळ ही येथील भांडवलशाहीच्या नेतृत्वाखालीं आजपर्यंत गेलेली नाहीं व पुढेंहि जाण्याचा संभव नाहीं असें आम्ही कां म्हणतों, याचा थोडा अधिक खुलासा येथें करणें अवश्य आहे युरोपांत व विशेषतः इंग्लंड व फ्रान्स या देशांत अगोदर भांडवलशाहीची बरीच वाढ झालेली होती व तिच्या प्रयत्नानेंच तेथें लोकशाहीची प्रस्थापना झाली लोकशाहीच्या प्रस्थापनेचे कार्य तेथील मध्यमवर्गातून निर्माण झालेल्या व्यापारी व सावकारवर्गानें केलें. या व्यापारी-सावकारवर्गालाच पुढें कारखानदार व पेढीवाल्या भांडवलशाहीचें स्वरूप प्राप्त झालें या वर्गानें आपल्या देशात लोकशाही स्थापन झाल्यानंतर शेतकरीवर्गाचा व सामान्य जनतेचा विश्वासघात केला; आणि लोकशाहीला धनिकशाहीचें स्वरूप दिलें हें खरें असले, तरी त्याने जगातील मागसलेल्या देशात साम्राज्यशाहीचा विस्तार करून हिंदुस्थानासारख्या संपन्न देशाची लूट केली आणि या लुटींतील कांहीं भाग तरी आपल्या जनतेच्या पदरात टाकून तिची स्थिति आर्थिक दृष्ट्या जगातील इतर देशां-तील सामान्य जनतेपेक्षां अधिक चांगली केली. यामुळें इंग्लंडातील व फ्रान्समधील सामान्य जनता ही एक प्रकारें तेथील धनिकवर्गाची मिंधी बनलेली असून जिंकलेल्या देशातून येणारी ही लूट चालू असण्यात आपलें आर्थिक हित आहे असे तिला वाटतें आणि ती धनिकशाहीविरुद्ध बंड करण्यास प्रवृत्त होत नाहीं कांहीं झालें तरी इतर देशापेक्षा आपली राहणी अधिक संपन्न आहे व हे राहणीचें मान टिकून राहण्यास आपल्या भांडवलशाहीने स्थापन केलेले साम्राज्य कारण आहे, असें तिला वाटल्याखेरीज रहात नाहीं परंतु हिंदुस्थानातील भांडवलशाहीने अद्यापि असा कोणताच पराक्रम केलेला नाहीं व तो करण्याचें सामर्थ्य तिच्या अंगीं येण्याचा कधींहि संभव नाहीं. हिंदुस्थानात ब्रिटिश साम्राज्यानें या भांडवलशाहीची वाढ फारशी होऊं दिलेली नाहीं येथील राष्ट्रीय राजकारणात तिनें कधींच नेतृत्व स्वीकारलेले नाहीं. तसेंच इंग्लंडा-सारख्या चार-पांच कोटी लोकसंख्येच्या राष्ट्राने हिंदुस्थानासारख्या तीस-पस्तीस कोटी लोकसंख्येच्या राष्ट्राची लुबाडणूक केली, तेव्हा कोठें त्याला आपल्या सामान्य जन-तेची स्थिति थोडी तरी संपन्न करितां आली इंग्लंड किंवा फ्रान्स या देशांतील भांडवलशाहीने ज्या मार्गाचें अवलंबन केलें, त्या मार्गाचें अवलंबन करून येथील सामान्य जनतेचे नेतृत्व करणें व तिची स्थिति थोडी तरी सुधारणें ही गोष्ट हिंदी

भांडवलशाहीला अशक्य आहे. कारण इंग्लंडला आपल्या सातपट किंवा आठपट लोकसंख्येचा देश लुबाडावयास सांपडला, त्याप्रमाणे हिंदी भांडवलशाहीला हिंदुस्थानांतील पस्तीस कोटी लोकसंख्येची थोडी तरी उपासमार बंद करण्यास हिंदुस्थानच्या किती पट मोठा देश हस्तगत करावा लागेल व तसे करणे कितपत शक्य आहे याचा थोडासाहि विचार जो करील, त्याला हिंदी जनतेचे नेतृत्व करणे आणि भांडवलशाही पद्धतीने तिची उपासमार थांबविणे, ही गोष्ट किती अशक्य आहे ते दिसून येईल हिंदुस्थानातील शेतकरी आणि त्याच्या लक्षावधि खेड्यांत पसरलेली बेकार व दरिद्री सामान्य जनता, यांच्या दारिद्र्याचा व उपासमारीचा प्रश्न दृष्टीआड करून कोणत्या तरी वर्गाला हिंदी राष्ट्राचें नेतृत्व करतां येणे शक्य आहे काय? तें शक्य नाहीं हे जर खरे असेल—व तें खरें आहे याबद्दल गाधीवाद व समाजवाद या दोघांचेंहि मतैक्य आहे—तर हिंदुस्थानात भांडवलप्रधान लोकशाही, अथवा लोकशाहीचा उघड त्याग करून अनियंत्रित धनिकशाही ऊर्फ फॅसिझम् यांचा उदय होणे अशक्य आहे, असे निर्विवाद सिद्ध होते हिंदी राष्ट्रसभेने जेव्हां महात्मा गांधींच्या सल्ल्यास अनुसरून आपल्या राष्ट्रीय झेंड्यावर चरख्याचे चिह्न धारण केले, त्याच वेळी आपण युरोपीय भांडवलशाहीचें व साम्राज्यशाहीचे अनुकरण करणार नाहीं व तें अनुकरण करून आपल्या देशांतील कोट्यवधि जनतेच्या पोटापाण्याचा प्रश्नहि आपण सोडवू शकणार नाहीं, हेहि तिने मान्य केलेलें आहे.

## गांधीवाद व नाझीवाद

सत्याग्रही तत्त्वज्ञान हें आध्यात्मिक तत्त्वज्ञान असल्यामुळे त्यातून समाजसत्तेचा उद्भव न होता हिंदुस्थानांत निर्माण झालेल्या राष्ट्रवादास ते फॅसिझमचे स्वरूप देईल, असे भाई रॉयप्रभृतींचे व कम्युनिस्टांचे मत होतें याचे कारण ते असे सांगत, कीं जर्मनींतील नाझी पक्ष व इटलींतील फॅसिस्ट पक्ष हे दोन्हीहि पक्ष अध्यात्मवादाचाच आधार घेत असतात जर्मनींतील राष्ट्रवाद हा हेगेलच्या आध्यात्मिक तत्त्वज्ञानांतून निर्माण झालेला असून तो प्रथमपासून क्रांतिविरोधी आहे आणि आज हिटलर हा समाजसत्ताक क्रांतीला विरोध करण्यासाठीं अध्यात्मवादाचाच आश्रय करीत आहे हिटलरचा अध्यात्मवाद म्हणजे आमच्या वर्णाश्रमधर्मातील क्षात्रधर्मच होय या क्षात्रधर्माचेच पुनरुज्जीवन हिटलरने आध्यात्मिक राष्ट्रवादाच्या नावानें आज केलेलें असून पूर्वीचा क्षात्रधर्म ज्याप्रमाणें शूद्रवर्गाला दास्यांत ठेवून लष्करशाही व साम्राज्यशाही यांची प्रस्थापना करीत असे, त्याचप्रमाणें महात्मा गांधींच्या आध्यात्मिक राष्ट्रवादातूनहि आजच्या काळातील शूद्रवर्गाला म्हणजे शेतकरी-कामकरीवर्गाला दास करणारा, भाडवलशाही व लष्करशाही यांच्या आधारावर उभारलेला राष्ट्रवाद किंवा फॅसिझम् अगर नाझीझम् हिंदुस्थानांत निर्माण होऊ शकेल एका बाजूनें भाई रॉयप्रभृति भौतिकवादी व कम्युनिस्ट हे सत्याग्रही राष्ट्रसभेंतून फॅसिझमची

निर्मिती होईल असा इषारा जनतेला देत असत, तर दुसऱ्या बाजूनें श्री. केळकर-प्रभृति लोकशाही पक्षांतील कांहीं पुढारी व डॉ. मुंजेप्रभृति, हिंदुमहासभेचे कांहीं पुढारी राष्ट्रसभा ही लोकमान्य टिळकांच्या निधनानंतर सत्याग्रही तत्त्वज्ञानामुळें अराष्ट्रीय बनली आहे असे म्हणत तिच्यांत समाजवादी तत्त्वज्ञान फैलावत असल्या-मुळें ती लवकरच कम्युनिस्ट बनेल व कम्युनिझम् हे जड भौतिकवादी तत्त्वज्ञान भारतीय राष्ट्रीय संस्कृतीशी विसंगत असल्यामुळे आणि फॅसिझमचे आध्यात्मिक तत्त्वज्ञान हेंच भारतीय संस्कृतीला कम्युनिझमच्या जडवादापेक्षां अधिक सन्निध आहे असे त्यास भासत असल्यामुळे, भारतीय संस्कृतीच्या आधारे प्राचीन क्षात्रधर्माचें पुनरुज्जीवन करून हिंदुस्थानांत फॅसिझमची स्थापना करणे हेंच लो टिळकप्रभृति राष्ट्रीय पुढाऱ्याच्या विचारसरणीस अधिक अनुरूप होईल, असेहि ते प्रतिपादन करीत असत. हिंदुमहासभेच्या झेंड्याखालीं हिंदुस्थानांतील प्राचीन क्षात्रतेज—म्हणजे हिंदी संस्थानिक व जमीनदार—संघटित करून आर्यावर्तात पुनः हिंदुपदपातशाही किंवा आर्यसाम्राज्य प्रस्थापित करून वैदिक धर्माची पताका सर्व जगभर पसरविण्याची आकांक्षा तरुण हिंदु नागरिकाच्या अंतःकरणात जागृत करण्याचा प्रयत्न ते करीत असत.

या मुद्द्याचा विचार करीत असतां प्रथमतः एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे, कीं आधुनिक जर्मन राष्ट्रवाद व आधुनिक भारतीय राष्ट्रवाद या दोहोंची उत्पत्ति आणि अभिवृद्धि अगदीं भिन्न परिस्थितींत झालेली आहे जर्मन राष्ट्रवाद हा नेपोलियननें प्रशियाचा पराभव केल्यानंतर जेव्हा युरोपात नेपोलियनचा पाडाव झाला, त्या वेळीं जें स्वतंत्र जर्मन राज्य निर्माण झाले व ज्याचे १९ व्या शतकाच्या अखेरीस जर्मन साम्राज्य बनलें, त्या स्वतंत्र लष्करशाही राष्ट्रांत जन्मास येऊन वाढलेला आहे. जर्मनींत प्रॉटेस्टट धर्मक्रांति झाल्यापासून तेथें जुन्या कॅथॉलिक पंथाच्या धर्माधिकाऱ्यांचे वर्चस्व नष्ट होऊन सरंजामदारवर्गाकडे त्या राष्ट्राचे नेतृत्व गेले. फ्रेडरिक दि ग्रेटच्या काळापासून त्या राष्ट्रांत लष्करी वृत्ति म्हणजेच क्षात्रवृत्ति अधिक वाढू लागली. नेपोलियनच्या पाडावानतर हीच लष्करी वृत्ति तेथे पुनः वाढीस लागली. जर्मन संस्कृतीला ब्रिटिश संस्कृतीप्रमाणे वैश्य संस्कृतीचे स्वरूप कधीच प्राप्त झाले नाहीं. ती फ्रेडरिक दि ग्रेटच्या काळापासून आजपर्यंत प्रामुख्याने क्षात्रसंस्कृतीच राहिलेली आहे. तेथील लष्करशाहीची परंपरा अशी मोठी असून या लष्करशाहींतूनच पहिल्या महा-युद्धाच्या पूर्वी जर्मन साम्राज्यशाही निर्माण झाली; आणि त्या महायुद्धांत नष्ट झालेलें साम्राज्य पुनः निर्माण करणे हेंच हिटलरशाहीचे ध्येय होते. शे-दीडशे वर्षांतील जर्मन राष्ट्राच्या संस्कृतीचा हा असा थोडक्यात इतिहास आहे जर्मन राष्ट्र व जर्मन साम्राज्य याची निर्मिती करण्यांत लष्करशाहीचा व भांडवलशाहीचा फार मोठा भाग असून तेथील भांडवलशाही ही लष्करशाहीच्या छत्राखालीं वाढलेली आहे. तेथील जनतेला इंग्लिश जनतेचा हेवा करण्याचें शिक्षण जर्मनींतील अर्थशास्त्रज्ञ, राज्यशास्त्रज्ञ आणि

ऐतिहासिक मीमांसक यांनीं गेलीं शे-दीडशें वर्षें एकसारखें दिलेलें आहे आणि ब्रिटिश लोकांनीं साम्राज्य निर्माण करून आपल्या देशातील जनतेची आर्थिक स्थिति जगातील सर्व जनतेपेक्षां अधिक चांगली बनविली, तशी आपली बनविण्यास आपलें साम्राज्य युरोपांत अगर युरोपाबाहेर झालें पाहिजे, ही आकांक्षा जर्मनींतील मध्यम-वर्गाच्या व शेतकरीवर्गाच्या आणि कांहीं अशीं कामगारवर्गाच्याहि अतःकरणात निर्माण करणें हिटलरला शक्य होते

अशा परपरेच्या स्वतंत्र विजिगीषु राष्ट्रात हेगेल हा एक अध्यात्मवादी तत्त्वज्ञ झाला हेगेल हा लो टिळक किंवा महात्मा गांधी अथवा बिपिनचद्र पाल या भारतीय राष्ट्रीय पुढाऱ्याप्रमाणें कर्मयोगी राजकीय पुढारी कधींच नव्हता तो एक तत्त्वज्ञ पंडित होता नवे राष्ट्र निर्माण करण्यास लागणारी कर्मप्रवणता त्याच्या अगीं नसून आपल्या राष्ट्राच्या प्राचीन इतिहासाची मीमांसा करून प्रस्थापित राजसत्तेचे गोडवे गाणारा व फ्रेंच राज्यक्रांतीच्या योगें क्रांतिकारक विचाराचा तिटकारा आलेला तो एक जर्मन विद्यापीठांतील प्रोफेसर अथवा राजसेवक होता त्याचें पांडित्य मोठें होतें, परतु पांडित्यातून क्रांतिकारक तत्त्वज्ञानाची निर्मिती करण्यासारखी त्याची क्रांतिकारक प्रकृति नव्हती शिवाय, आपल्या राष्ट्रांतील प्रस्थापित राजसत्तेपासून जनतेचेंहि हित होईल असे त्याला वाटत होतें. तो वेदान्ती होता, पण त्याचा वेदान्त प्रस्थापित राजसत्तेशीं झगडण्यासाठीं निर्माण झालेला नसून त्या राजसत्तेविरुद्ध क्रांति करणाऱ्या किंवा करूं इच्छिणाऱ्या क्रांतिकारकाना विरोध करून प्रस्थापित राजसत्तेला बद्धमूल करण्यासाठीं त्यानें आपल्या वेदान्ताचा उपयोग अथवा दुरुपयोग केलेला आहे जर्मनींत पुढे जो भौतिकवादी नीत्शे नावाचा पंडित निर्माण झाला, तो भौतिकवादी असला तरी सामाजिक समता, लोकसत्ता अथवा समाजसत्ता या तत्त्वांचा कट्टा विरोधक असून त्याने पूर्णावस्थेस गेलेल्या मानवाचा जो आदर्श लोकापुढे ठेविला, त्या मानवी आदर्शांत न्याय, भूतदया, समता या उच्च सद्‌गुणास मुळींच अवकाश नसून केवळ रजोगुणी सामर्थ्य या एकाच गुणास श्रेष्ठ स्थान दिलेले आहे याचमुळें लो. टिळकांनीं नीत्शेच्या 'सुपर मॅन'ला 'पूर्णावस्था पावलेले मानवी जनावर' असें यथार्थ नाव दिलेलें आहे. चातुर्वर्ण्यातील ब्राह्मतेजाला झुगारून देऊन केवळ क्षात्र-वृत्तीला सर्वश्रेष्ठ स्वरूप दिल्याचें हें फळ आहे युरोपीय संस्कृति आणि हिंदी सस्कृति याची तुलना केल्यास, हिंदु सस्कृतींत ब्राह्मतेजाचें वर्चस्व अधिक आणि युरोपीय संस्कृतींत क्षात्रवृत्तीचें प्राधान्य अधिक असे दिसून येतें अर्वाचीन इतिहासांत ब्रिटिश राष्ट्रांत वैश्यवृत्तीचे प्राधान्य झाले व जर्मनी, ऑस्ट्रिया, इटली या राष्ट्रात वैश्ययुगातहि क्षात्रवृत्तीच प्रबळ राहिली असें दिसतें. या परपरेंतूनच जर्मनी व इटली या देशांत फॅसिझम् निर्माण झालेला होता आणि तेथील राष्ट्रवादाला साम्राज्यशाहीचें विकृत स्वरूप प्राप्त होण्यास अनुकूल अशीं आर्थिक व राजकीय कारणेंहि होतीं. यांपैकीं एकहि राजकीय व आर्थिक कारण हिंदुस्थानातील राष्ट्रवादाची साम्राज्यशाहींत विकृति होण्यास

आज नसल्याचें मागें दिलेंच आहे. आतां ज्या वेदान्त-तत्त्वज्ञानाच्या आधारावर आज-पर्यंतचा आधुनिक भारतीय राष्ट्रवाद पोसला गेला, त्या आधुनिक भारतीय वेदान्ताचें स्वरूप हेगेलप्रभृति जर्मन वेदान्त्यांच्या अध्यात्मवादाहून कसें भिन्न आहे ते विशद करूं.

## हिंदी राष्ट्रवाद व अध्यात्म

आधुनिक भारतीय राष्ट्रवाद हा परतंत्र राष्ट्रांत निर्माण झाला त्याचें ध्येय आपल्या राष्ट्राचें वैभव वाढविण्यासाठीं साम्राज्यप्रस्थापना करणे हें नसून परकीय साम्राज्यांतून त्याची मुक्तता करणें, हे प्रथमपासून आतांपर्यंत होते हिंदुस्थानांत या काळात वेदान्ताचें जें पुनरुज्जीवन झालें तें प्रस्थापित राजसत्तेचे समर्थन करण्याच्या बुद्धींतून झालेलें नसून प्रस्थापित राजसत्ता उलथून पाडून स्वराज्यसंस्थापना कर-ण्याच्या प्रयत्नास चालना देण्याच्या बुद्धीनें झालेले आहे. राजाज्ञा म्हणजेच आपल्या अतरात्म्याची आज्ञा आणि राजसत्तेने दिलेली शिक्षा म्हणजे आपल्या अतरात्म्याच्या प्रेरणेचे अथवा अंतःकरणांतील न्यायबुद्धीचे उल्लंघन केल्यामुळें भोगावें लागणारें शासन, ही हेगेलची राजकीय उपपत्ति आधुनिक भारतांतील वेदान्तांत निर्माण झालेली नाहीं याच्या उलट, आपल्या अंतरात्म्याच्या आज्ञेचें अनुसरण करण्यासाठीं प्रस्थापित राजसत्तेचीं जुलमी बधनें तोडणे हेच आपले आध्यात्मिक कर्तव्य आहे, असें सांगणारी क्रांतिकारक आध्यात्मिक राजकीय उपपत्ति आधुनिक भारताच्या वेदान्तातून निर्माण झाली. या आधुनिक भारतीय वेदान्तांतून सत्याग्रहाचें निःशस्त्र क्रांतिशास्त्र निर्माण झालें, इतकेच नाहीं, तर आधुनिक भारतांत निर्माण झालेलें सशस्त्र क्रांतिशास्त्रहि वेदान्ताच्या आधारावरच आजपर्यंत पोसलेले आहे, हा प्रत्यक्ष इतिहास आहे आधुनिक भारताचा हा इतिहास डोळ्यांआड करून जर्मनींतील हेगेलच्या अध्यात्मवादातून क्रातिप्रतिबधक अथवा क्रांतिविरोधी तत्त्वज्ञान जन्मास आलें म्हणून हिंदुस्थानातहि तसेंच होईल, असे म्हणणे ऐतिहासिक दृष्टया सुसंगत अथवा तर्कशुद्ध दिसत नाहीं. मॅझिनी हा अध्यात्मवादी होता व तो सशस्त्र क्रांतिवादीहि होता मॅझिनीच्या तत्त्व-ज्ञानाचे अनुकरण करून हिंदुस्थानांत प्रथम सशस्त्र क्रांतिवाद जन्मास आला थोड-क्यांत सांगावयाचे म्हणजे भारतीय वेदान्ताचे आजचें स्वरूप तरी निदान क्रांतिवादी आहे व हेगेलच्या क्रांतिविरोधी वेदान्ताहून ते अगदीं भिन्न आहे.

## इटॅलिअन राष्ट्रवाद व महात्मा गांधी

येथपर्यंत जर्मनींतील आधुनिक राष्ट्रवादाचा इतिहास आणि हिंदुस्थानांतील राष्ट्रवादाचें स्वरूप व त्याच्या पाठीमागे असणारें आध्यात्मिक तत्त्वज्ञान यातील भेद दाखवून दिला. आतां इटलींतील आधुनिक राष्ट्रवादाचा इतिहास आधुनिक भारता-च्या इतिहासाहून कसा भिन्न झालेला आहे, त्याचें वर्णन महात्मा गांधींच्याच शब्दांत आम्ही करणार आहो. इटलींत मॅझिनीनें राष्ट्रवाद निर्माण करण्याचा जो प्रयत्न केला,

तो आध्यात्मिक स्वरूपाचा व लोकशाही स्वरूपाचाहि होता पण पुढें लवकरच इटलींतील राष्ट्रवादाला सरजामशाही राष्ट्रवादाचें स्वरूप प्राप्त झाले आणि यानंतर इटली जरी स्वतंत्र झाला, तरीहि मॅझिनीला अभिप्रेत असलेला आध्यात्मिक राष्ट्रवाद तेथे निर्माण झाला नाहीं. व्हिक्टर इमॅन्युएल, कॅव्हूर व गॅरिबॉल्डी याच्या कारस्थानी बुद्धींतून व लष्करशाही वृत्तींतून आधुनिक इटलीचा राष्ट्रवाद जन्मास आला मॅझिनीला अभिप्रेत असलेली खरी लोकशाहीची क्रांति इटलींत झाली नाहीं व महात्मा गांधी म्हणतात त्याप्रमाणे मॅझिनीचा इटली हा अद्यापि गुलामगिरीच्या अवस्थेंतच आहे. 'हिंद स्वराज्य' या १९०९ सालीं लिहिलेल्या आपल्या पुस्तकात इटलीच्या इतिहासासंबंधीं गांधीजी म्हणतात:

"इटलीचें उदाहरण तुम्हीं दिलें हे फार चांगले झाले मॅझिनी हा एक मोठा व चांगला मनुष्य होता गॅरिबॉल्डी हा एक मोठा लढवय्या होता. दोघेहि पूज्य आहेत. त्याच्या चरित्रांपासून आपणास पुष्कळ बोध घेता येईल. पण इटलीची परिस्थिति हिंदुस्थानच्या परिस्थितीहून भिन्न होती प्रथमत. मॅझिनी व गॅरिबॉल्डी यांच्यांतील भेद लक्षांत घेतला पाहिजे मॅझिनीची आकांक्षा इटलीच्या बाबतींत सफल झाली नाहीं व ती अद्यापीहि सफल झालेली नाहीं मानवी कर्तव्यासंबधींच्या आपल्या लेखांत मॅझिनीने प्रत्येक मनुष्यानें स्वतःच्या जीवनात आत्मराज्य स्थापन करण्यास शिकलें पाहिजे असे दाखवून दिले आहे. इटलीमध्यें हे घडून आलेले नाहीं गॅरिबॉल्डीला मॅझिनीचे हे मत मान्य नव्हतें गॅरिबॉल्डीने प्रत्येक इटॅलियनाला शस्त्र दिले व त्याने तें घेतले इटली व ऑस्ट्रिया यांची सस्कृति एकच होती या बाबतींत ते परस्परांचे बांधवच होते जशास तसे अशी ही गोष्ट होती ऑस्ट्रियाचें जोखड इटलीने झुगारून द्यावे एवढीच गॅरिबॉल्डीची इच्छा होती इटलीच्या इतिहासातील या वेळच्या कॅव्हूरच्या कारस्थानामुळे इटलीस कमीपणा आलेला आहे आणि याचा परिणाम काय झाला? इटॅलियन लोक आपल्या राष्ट्रावर राज्य करीत आहेत व ते सुखी आहेत अशी जर तुमची कल्पना असेल, तर तुम्ही अंधारातच चाचपडत आहांत (असे म्हणावे लागेल). मॅझिनीनें असें निर्विवाद सिद्ध केले आहे, की इटली स्वतंत्र झाला नाही. व्हिक्टर इमॅन्युएलचा इटली शब्दाचा अर्थ एक होता व मॅझिनीचा अर्थ दुसरा होता इमॅन्युएल, कॅव्हूर, किंबहुना गॅरिबॉल्डी यांच्या अर्थाप्रमाणें इटली म्हणजे इटलीचा राजा आणि त्याचे शिलेदार होत. मॅझिनीच्या इटलीचा अर्थ इटलींतील सामान्य लोक म्हणजे तेथील शेतकरी असा होता. इमॅन्युएल हा या इटलीचा केवळ सेवक आहे असा त्याचा अर्थ होता मॅझिनीचा इटली अद्यापि दास्यावस्थेतच आहे ... त्या देशांतील कामकरी लोक अद्यापि दुःखांत आहेत. म्हणून ते खून करितात, बंड करितात आणि त्यांच्या बंडाची भीति तेथें नेहमींच असते. इटलींतून ऑस्ट्रियाचें सैन्य गेल्यापासून तेथील जनतेचें कोणते हित झालें? .. ... तेथील जनतेची स्थिति अद्यापि सामान्यतः तशीच आहे. हिंदु-

स्थानांत या स्थितीची पुनरावृत्ति व्हावी ही तुमची इच्छा नसेल, अशी माझी खात्री आहे हिंदुस्थानातील कोट्यवधि जनता सुखी व्हावी ही तुमची इच्छा आहे केवळ सरकारचा लगाम आपल्या हाती यावा एवढीच तुमची इच्छा नाहीं, असा माझा विश्वास आहे. हे जर खरे असेल, तर आपण एकाच गोष्टीचा विचार केला पाहिजे. ती गोष्ट म्हणजे हिंदुस्थानातील कोट्यवधि जनतेला स्वराज्य कसे प्राप्त होईल ? अनेक हिंदी सस्थानिक जनतेला भरडून काढीत आहेत हे तुम्ही मान्य कराल ... त्याचा जुलूम इंग्लिशाहूनहि अधिक आहे जर असा जुलूम हिंदुस्थानात तुम्हाला चालत असेल, तर तुमचे-माझें मतैक्य कधीहि होणार नाहीं. केवळ इंग्लिशानी हिंदुस्थानातून जावें व हिंदी सस्थानिकाच्या पायाखालीं हिंदी जनतेला आपण तुडवू द्यावे, असे माझी देशभक्ति मला शिकवीत नाहीं जर माझ्या अंगी शक्ति येईल तर मी इंग्लिशाच्या जुलुमाचा जितका प्रतिकार करीन, तितकाच हिंदी सस्थानिकाच्या जुलुमाचाहि करीन देशभक्तीचा माझा अर्थ सर्व जनतेचे हित असा आहे .. शिवाय, हिंदुस्थानास जर शस्त्रे लाभतील, तरच हिंदुस्थान इटलीप्रमाणे युद्ध करूं शकेल तुम्हीं या प्रश्नाचा विचारहि केलेला नाहीं इंग्लिशापाशीं भरपूर शस्त्रें आहेत, त्यामुळे मी भितो असें नव्हे परंतु आम्हांला त्याच्याशीं शस्त्रानें लढण्याची पात्रता आणावयाची असल्यास हजारों हिंदी लोकाना शस्त्रे पुरविलीं पाहिजेत ही गोष्ट शक्य असली, तरी तिला किती वर्षें लागतील बरे ? शिवाय, फार मोठ्या प्रमाणावर हिंदुस्थानास शस्त्रग्राही बनविणे म्हणजे त्याला युरोपीय सस्कृतीची दीक्षा देण्यासारखेंच आहे "*

वरील उतारा लक्षपूर्वक वाचिल्यास महात्मा गांधींनी आधुनिक इटलीच्या इतिहासापासून कोणता बोध घेतला आहे ते दिसून येईल त्याना मॅझिनीप्रमाणे शुद्ध लोकशाहीची क्रांति हवी होती मॅझिनीप्रमाणें ते अध्यात्मवादीहि होते. मात्र मॅझिनीप्रमाणें ते सशस्त्र क्रांतिवादी नव्हते गॅरिबॉल्डीप्रमाणे सामान्य लोकांना शस्त्रें पुरवून लोकशाहीची क्रांति घडवून आणिता येईल, असे त्याना वाटत नव्हते. व्हिक्टर इमॅन्युएलसारख्या राजाच्या अथवा सरजामदारांच्या दरबारी कारस्थानांतून किंवा त्याच्या पदरच्या मुत्सद्द्याच्या हातून आधुनिक भारताची निर्मिती झाल्यास येथे लोकशाहीचें राज्य प्रस्थापित न होता सरजामशाही माजेल असे त्याचें मत होते युरोप खंडातील लष्करशाही व भांडवलशाही याचे ते शत्रु आहेत. ही युरोपीय संस्कृति आधुनिक भारताचा उद्धार करू शकेल असे त्याना वाटत नव्हतें. भारतीय लोकशाही हिंदी जनतेला हत्यारे पुरवून निर्माण होणार नसून तिचे आत्मबल सघटित करण्यानें आणि या संघटनेंतून निर्माण होणाऱ्या सर्वव्यापी असहकारयुद्धानें व शांततेच्या कायदेभंगाने आपणास हिंदुस्थानात ब्रिटिश साम्राज्याच्या ऐवजीं भारतीय स्वराज्य संस्थापित करता येईल असा त्याना आत्मविश्वास होता. भारतीय स्वराज्याच्या

* Hind Swaraj by M K Gandhi Published by S Ganeshan and Co. in 1921, P 54-56.

संरक्षणासाठीं ब्रिटिशांच्या साहाय्याचीहि त्याना गरज वाटत नव्हती. हिंदी जनतेचें आत्मबल सघटित झाले व त्यातून येथें लोकशाहीची क्रांति झाली, तर हे राष्ट्रीय लोकशाही स्वराज्य परचक्रापासून आपले संरक्षण करू शकेल आणि आपल्या देशांत लष्करशाही व भांडवलशाही माजविण्याचा प्रयत्न कोणी केल्यास, त्याचाहि ते प्रतिकार करू शकेल. यासाठी महात्मा गांधींनीं सत्याग्रही दीक्षा घेतलेल्या आजन्म क्रांतिकारकांच्या नेतृत्वाखालीं सामान्य जनतेचें आत्मबल म्हणजे शाततेचा प्रत्यक्ष प्रतिकार सघटित करण्याचे कार्य सुमारे तीस वर्षे हिंदुस्थानांत चालू ठेविलें होतें. या कार्याच्या पायावरच ब्रिटिश साम्राज्याशीं अखेरचा स्वातन्त्र्यसंग्राम हिंदी जनतेने केला. एकदर जगाच्या राजकारणांतहि या शांततामय क्रांतीचें महत्त्व वाढू लागलें आहे मानवी संस्कृतीला लष्करशाही व भाडवलशाही याचा वीट आला आहे युरोपीय इतिहासापासून क्षात्रवृत्ति व वैश्यवृत्ति यांच्या अनियत्रित संघटनेतून खरी लोकशाही निर्माण होत नाहीं, हें सिद्ध झाले आहे. आणि जनतेतील ब्राह्मतेज, म्हणजेच आत्मबल संघटित करण्याचा मार्ग सोडून केवळ शस्त्रबल व द्रव्यबल यांच्या आधारावर उभी असलेली युरोपीय सस्कृति या संघटित आत्मबलाच्या अभावीं आज युरोपांत नामशेष होऊ लागली आहे. तेथील जनतेचें आत्मबल संघटित करणे व शांततेच्या प्रत्यक्ष प्रतिकाराने खरी लोकसत्ता व समाजसत्ता प्रस्थापित करणें, हाच एक सर्व युरोपात शातता व सुख याचें साम्राज्य प्रस्थापित करण्याचा मार्ग आहे पण हे साम्राज्य प्रस्थापित करण्यास लागणारें आत्मबल, या मार्गानें जनतेचें नेतृत्व करण्यास लागणारा तपोनिष्ठ पुढारी आणि त्याच्या आज्ञेनुसार सामान्य जनतेची संघटना करून आत्मबलाच्या जोरावर राजकीय व आर्थिक जुलुमाचा प्रतिकार करण्याचें शिक्षण जनतेला देणारा सत्याग्रहीवर्ग, आज युरोपात दृष्टीस पडत नसल्यामुळें आपली सस्कृति रसातळास जाण्याचें सकट युरोपला निवारण करतां येईल, असे वाटत नाही. जगातील युरोपीय नेतृत्वाचा काळ पहिल्या महायुद्धानतरच संपलेला आहे. भारतीय नेतृत्वाचा काळ यापुढे निर्माण होईल अशी आशा भरतखंडांतील सत्याग्रही क्रातिकारकाना वाटत आहे जर्मनीचे किंवा इटलीचें अनुकरण या देशांतील कोणताहि समजस पुढारी आज करीत नाहीं; व येथें सरंजामशाही व धनिकशाही याच्या हातीं कांही राज्यकारभार देऊन आपल्या साम्राज्यशाहीचें व भांडवलशाहीचें संरक्षण करण्याचा ब्रिटिश मुत्सद्द्यांचा प्रयत्न हाणून पाडून हिंदुस्थानांत लोकशाहीचे सपूर्ण स्वराज्य भारताने आज प्रस्थापित केलें आहे.

भरतखंडांतील राष्ट्रवाद हा इटली-जर्मनी येथील राष्ट्रवादाहून कसा भिन्न आहे आणि त्याचें तत्त्वज्ञान, त्याच्यापुढील कार्य आणि त्याचे भावी स्वरूप, हीं सर्वच कशीं भिन्न आहेत ते आतांपर्यंत सागितलें. आधुनिक भारताच्या जन्मापासून आतांपर्यंत त्याच्या राष्ट्रीयत्वाचा आधार क्षात्रवृत्ति किंवा वैश्यवृत्ति हा कधींच नव्हता व आजहि नाहीं. भारतांतील आत्मबल अथवा ब्राह्मतेज संघटित करण्याचें कार्य महात्मा

गांधी यानीं केले असून त्यांचें राजकीय तत्त्वज्ञान हें हेगेलच्या प्रतिगामी राजकीय तत्त्वज्ञानाहून अगदीं भिन्न, किंबहुना, त्याच्याशीं अगदीं विरोधी असे आहे. हेगेल हा राज्यसंस्था ही लोकांच्या न्यायबुद्धीचें मूर्त प्रतीक मानून ती सनातन समजतो व तिच्याविरुद्ध बंड करण्याचा हक्क तो विचारांतहि घेत नाहीं हेगेलच्या दृष्टीन महात्मा गांधींचे सत्याग्रही तत्त्वज्ञान हें क्रातिकारक, किंबहुना, अराजक आहे. कोणतीहि राज्य-संस्था पूर्णपणें न्यायप्रस्थापना करू शकत नाहीं आणि म्हणून दंडहीन समाजरचना अथवा राज्यसंस्थेचा अत्यंत अभाव हीच मानवसमाजाची पूर्णावस्था होय, हे महात्मा गांधींचें आध्यात्मिक, राजकीय व सामाजिक तत्त्वज्ञान आहे ते केवळ अध्यात्मवादी आहे म्हणून त्याची हेगेलच्या तत्त्वज्ञानाशीं तुलना करणें, अथवा हिटलर आणि मुसोलिनी हे तोंडाने अध्यात्मवादाचा जप करीत असत म्हणून हिंदुस्थानात सत्याग्रही तत्त्वज्ञानांतून इटली अगर जर्मनी याच्याप्रमाणे फॅसिझमची निर्मिती होईल, अशी आशा किंवा भीति बाळगणें ही स्थूल मूढ दृष्टि आहे भारतीय संस्कृति आणि युरोपीय संस्कृति यांतील सूक्ष्म भेद लक्षांत न घेतां, आधुनिक जर्मनी, आधुनिक इटली व आधुनिक भारत यांच्या गेल्या शे-सव्वाशे वर्षांतील इतिहासाचा विचार न करितां आणि ज्या परिस्थितींत वरील तीन देशांतील राष्ट्रवादाची उत्पत्ति व अभिवृद्धि झाली आणि ज्या विशिष्ट परिस्थितीमुळे जर्मनी व इटली या देशात राष्ट्रीय व लोकशाही संस्कृतीची विकृति निर्माण झाली, त्या परिस्थितींतील व आधुनिक भारताच्या परिस्थितींतील भेद ध्यानात न घेता काढिलेला तो एक चुकीचा निष्कर्ष आहे.

आजपर्यंत आधुनिक भारत एका राष्ट्रीय स्वरूपाच्या क्रांतींत मग्न झालेलें असल्यामुळे व त्याच्या या अवस्थेंतच आतापर्यंत सत्याग्रही तत्त्वज्ञानाची वाढ होत आल्यामुळे आजपर्यंत या देशांतील सरंजामशाही व भांडवलशाही याच्याविरुद्ध उघड सामना देण्यास सत्याग्रही शक्ति उभी राहिली नाही, यामुळे हे सत्याग्रही तत्त्वज्ञान अथवा सत्याग्रही शक्ति सरंजामशाहीची अथवा भांडवलशाहीची हस्तक आहे किंवा होईल, असा आक्षेप कांहीं लोकाना घेता आला, पण तो आक्षेप निराधार आहे हिंदुस्थान स्वतंत्र असता व येथे युरोप खंडाप्रमाणे स्वदेशी लष्करशाही व भांडवलशाही यांच्या जुलमाखालीं सामान्य जनता चुरडली जात असती, तर सत्याग्रही तत्त्वज्ञान व सत्याग्रही पक्ष हे या लष्करशाही व भांडवलशाहीविरुद्ध उघड बंड करीत असल्याचाच देखावा जगाला दिसला असता व सत्याग्रही तत्त्वज्ञान खऱ्या लोकसत्तेचें व खऱ्या समाजसत्तेचे पुरस्कर्तें आहे, अशी जगाची खात्री झाली असती

## गांधीवाद व समाजवादी स्वराज्य

हिंदुस्थानांत जें स्वराज्य स्थापन व्हावयाचें ते लोकशाही स्वरूपाचें व्हावयाचें आणि त्यात संस्थानिक व भांडवलवाले हे उरले, तरी ते केवळ जनतेचे सेवक व निधिधारक या स्वरूपांतच उरावयाचे; मालकशाहीच्या स्वरूपांत जनतेला आपले

मजूर बनवून त्याच्यावर अनियंत्रित सत्ता गाजविणाऱ्या सरंजामशाही व भांडवल-शाही स्वरूपांत उरावयाचे नाहींत, ही गोष्ट महात्मा गांधींनी अनेकवार स्पष्ट केलेली आहे. शुद्ध बौद्धिकवादाच्या दृष्टीनें सरंजामदार, जमीनदार व कारखानदारवर्ग समाजांत असूच नये असे जें समाजवादी तत्त्वज्ञान, त्याचा अंगीकार महात्मा गांधी करीत नाहींत, तथापि धनिकवर्ग व जमीनदारवर्ग यांनीं समाजाचे सेवक व निधिधारक या नात्यानेंच समाजात वावरावे, असे ते म्हणतात या म्हणण्यांतहि या वर्गाची मालकी नष्ट झालेली असून त्याना निधिधारक या नात्यानेंहि किती काळ वागू द्यावयाचें अथवा समाजानें त्याच्याकडे सोंपविलेला निधि त्याच्यापासून अजि-बात काढून घेऊन त्याची आपण नेमिलेल्या पगारी अधिकाऱ्यामार्फत स्वतंत्र व्यवस्था करावयाची, हा प्रश्न वेळोवेळी तत्कालीन लोकमतानुसार निकालात निघावा, हे लोकशाहीचे तत्त्वहि सत्याग्रही तत्त्वज्ञानात अंतर्भूत होत असते. तथापि, देशांतील सर्व जमिनी, खाणी व कारखाने यांचे राष्ट्रीयीकरण करावे असे महात्मा गांधी म्हणत नसत याची अनेक कारणे आहेत व त्याचा या प्रश्नाकडे पाहण्याचा दृष्टिकोण शुद्ध बुद्धिवादी समाजवाद्याहून भिन्न आहे तरीहि हा मतभेद किंवा दृष्टिभेद लोकाना वाटतो तितका समाजवादाशीं अगदीं विरुद्ध आहे, असे आम्हास वाटत नाही. याची सविस्तर चर्चा आम्हीं पुढील प्रकरणी करणार आहों येथे एवढे सांगितले असता पुरे, की ज्याप्रमाणे त्याच्या राजकीय तत्त्वज्ञानात राजा किंवा दंडधारी राजकीय संस्था याना अंतिम दृष्ट्या स्थान नाही, त्याचप्रमाणे त्याच्या सत्याग्रही तत्त्व-ज्ञानात खाजगी मालमत्तेसहि अंतिम दृष्ट्या स्थान नाही सत्याग्रही नीतिशास्त्राप्रमाणे खाजगी मालमत्ता ही चोरीच आहे, आणि धनिकवर्ग, सरंजामदारवर्ग व संस्था-निकवर्ग हा समाजाचा निधिधारक व सेवक बनवावा या कल्पनेतहि केवळ मालकी-हक्कावर सामाजिक संपत्तीचा उपभोग समाजाची सेवा केल्याखेरीज घेता येणार नाही, हे समाजवादी तत्त्व अंतर्भूत झालेलेंच आहे आज सत्याग्रही व समाजवादी पक्षात जो मतभेद दिसत आहे, तो सारभूत नसून व्यावहारिक आणि बाह्यांगाचाच आहे असे आम्हास वाटतें.

## दोन प्रकारची सुधारणा-वृत्ति

कोणतीहि सामाजिक अथवा राजकीय सुधारणा घडवून आणताना ती घडवून आणूं इच्छिणारात दोन वृत्तींचा प्रादुर्भाव होण्याचा संभव असतो पूर्वीच्या सामा-जिक व राजकीय संस्थांचे बाह्य स्वरूप कायम ठेवून त्यातच नवीन तत्त्वाचा प्रवेश करून द्यावयाचा व त्याच्या अंतरंगात क्रांति घडवून आणावयाची, ही सुधारणा कर-ण्याची एक वृत्ति अथवा पद्धति आहे शुद्ध बुद्धिवादाच्या दृष्टीने ही वृत्ति अथवा पद्धति गौण, किंबहुना, कित्येक प्रसंगी धोक्याचीहि वाटते. तथापि या वृत्तीने सामा-जिक, धार्मिक अथवा राजकीय संस्थाच्या अंतरंगात क्रांति घडवून आणिल्याची अगर

घडून आल्याचीं अनेक उदाहरणे जगाच्या इतिहासात आहेत. ब्रिटिश लोकांनीं आपल्या राजसत्ताक राज्यघटनेचे अतरग याच वृत्तीनें आमूलाग्र पालटून टाकिले आणि तिला लोकसत्ताक स्वरूप दिले. आमच्या वेदान्तानें अज्ञानी जातीत रूढ असलेल्या मूर्तिपूजेला, अनेक देवताच्या नानाविध संप्रदायांना, बाह्यत. धक्का न लाविता सामान्य जनतेंत 'अहं ब्रह्मास्मि' या सर्वश्रेष्ठ तत्त्वज्ञानाचा प्रसार करण्याचा प्रयत्न केला भागवतधर्मी साधुसतांनीं वर्णाश्रमधर्माची पूर्वीची चौकट बाह्यत. कायम ठेवून गौतम बुद्धाच्या भूतदयेचा, सामाजिक समतेचा आणि अहिंसेचा पुरस्कार केला, आणि आज महात्मा गांधींनी हेच कार्य अधिक परिणतीस नेऊन विसाव्या शतकाला साजेल अशा प्रकारची सामाजिक समता व लोकशाही याचा प्रचार वर्णाश्रमधर्म आणि रामराज्य या जुन्या शब्दांच्या आधारे भारतीय जनतेत केलेला आहे तात्पर्य, सामाजिक, धार्मिक व राजकीय संस्थाचें मूळचे बाह्य स्वरूप कायम ठेवून त्याच्या अतरगात क्राति घडवून आणण्याची एक सुधारणावृत्ति व सुधारणापद्धति जगाच्या इतिहासात आढळते व ही वृत्ति ब्रिटिश लोकात व हिंदू लोकातहि अनेक वर्षाच्या परपरेने रुजलेली आहे श्रीकृष्ण, शंकराचार्य आणि भागवतधर्मी साधुसत यांनीं या वृत्तीचाच अवलंब व फैलाव हिंदुसमाजात केला आणि लो टिळक व महात्मा गांधी यानीं याच वृत्तीचा अवलंब सामाजिक, धार्मिक व आर्थिक बाबीत करून परकीय सत्तेविरुद्ध चालू असलेलें राष्ट्रीय क्रातीचे कार्य आधुनिक भारताच्या इतिहासात नेटास लाविले हिंदुस्थान परतत्र असल्यामुळे व आपल्या सस्कृतींत सर्वांगीण क्राति घडून येणें अवश्य असलें, तरी तें कार्य राष्ट्रीय स्वातत्र्य प्राप्त होईपर्यंत अशक्य असल्यामुळे केवळ राजकीय बाब सोडिल्यास इतर सुधारणाच्या कार्यांत ही वृत्ति व ही पद्धति अवलंबिणे त्यांस आवश्यक व इष्ट वाटले लो टिळक व महात्मा गाधी याच्या राजकीय क्रांतिवादाचा आणि सामाजिक, धार्मिक अथवा आर्थिक क्षेत्रांतील नेमस्त वृत्तीचा उलगडा असा होऊ शकतो; व त्याचे खरे समर्थन व कारण हेच आहे राजकीयेतर सुधारणास विरोध हे त्याचें खरे कारण नव्हे, असे आमचे मत आहे.

परंपरागत सामाजिक संस्थाच्या बाह्य स्वरूपांस फारसा धक्का न लाविता अतरगांत पालट करण्याची ही जी सुधारणापद्धति, तींहून भिन्न अशी दुसरी एक शुद्ध बुद्धिवादी क्रांतिकारक वृत्ति आहे प्राचीन भारतात गौतम बुद्धाने याच वृत्तीचा अगीकार केला होता आधुनिक भारतापुढील सर्व प्रश्न या बुद्धिवादी क्रातिकारक वृत्तीचा अवलंब केल्याखेरीज सुटू शकतील, असे आम्हास वाटत नाहीं तथापि, ही बुद्धिवादी क्रांतिकारक वृत्ति सशस्त्र क्रांतिवादी न बनता सत्याग्रही राहू शकेल व ती तशी राहणें यांतच भारताचें खरें हित आणि खरें माहात्म्य आहे अशा क्रांतिकारक बुद्धिवादाच्या पायावर आधुनिक राष्ट्रवादाची उभारणी करण्याचा प्रयत्न महाराष्ट्रांत प्रथमतः कै. आगरकर यांनीं केला; व आज असा प्रयत्न समाजवादी पुढारी करीत आहेत. पूर्वीचा प्रयत्न व्यक्तिवादी व आजचा प्रयत्न समाजवादी असा यांत भेद

दिसला, तरी या दोन्हीहि प्रयत्नांचें अंतरंग एकच आहे. आगरकरांच्या वेळी बुद्धिवादी क्रांतिकारक वृत्ति फैलावल्यास भारतीय संस्कृतीची मूळ प्रकृति नष्ट होईल, अशी भीति लो टिळक यांना वाटली व आज अशाच प्रकारची भीति समाजवादी पक्षासंबंधीं महात्मा गांधींच्या सत्याग्रही पक्षास वाटत आहे याच्या उलट, लोकमान्यांच्या प्रयत्नामुळे भारताच्या इतिहासाचें अधानुकरण होईल आणि आपण अथवा आपली संस्कृति जगाच्या संस्कृतीच्या मागें राहील, अशी भीति पूर्वी आगरकरांना वाटत असे, आणि महात्मा गांधींच्या प्रयत्नासंबधींहि अशीच भीति आज समाजवादी पक्षास वाटत आहे. तथापि, उभयपक्षीं अशी भीति वाटण्याचे कारण आता उरलेलें नाहीं. म्हणून प्राचीन भारताच्या आत्मप्रेरणेचा उद्धार करणारा पक्ष व शुद्ध बुद्धिवादाचा आश्रय करून आपली संस्कृति व जगांतील इतर राष्ट्रांची संस्कृति याचा निर्विकार मनानें तुलनात्मक अभ्यास करून पुढील मार्ग आक्रमिणारा पक्ष, यांच्यात द्वैत माजण्याचा व व्यावहारिक विरोध उत्पन्न होण्याचा काळ आता राहिलेला नाहीं, असें आमचें मत आहे.

लो टिळक, योगी अरविंद घोष आणि महात्मा गांधी याच्या प्रयत्नांनीं भारतीय संस्कृतीचें उज्ज्वल अंग जगापुढें आलेले आहे आणि पाश्चात्य संस्कृतीचें कृष्ण अंगहि जगाला आतां पटलेलें आहे भारतीयांच्या अंतःकरणात आज स्वतंत्र इतिहासनिर्मितीची आत्मप्रेरणा पूर्णपणे जागृत झाली असून त्याच्या राष्ट्रवादाचे अनुकरणात्मक स्वरूप महात्मा गांधींनीं त्याचे नेतृत्व स्वीकारल्यापासूनच नष्ट झालेले आहे आधुनिक भारत आज अथवा यापुढे आपल्या प्राचीन इतिहासाचें अथवा जगांतील कोणत्याहि राष्ट्राच्या आधुनिक इतिहासाचें अधानुकरण करील, ही भीति आतां उरलेली नाहीं. स्वतंत्र इतिहास निर्माण करून जगाला अभिनव संदेश देण्याची त्याची आत्मप्रेरणा आज जागृत झालेली आहे, आणि त्यानें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत सत्याग्रहाचे जें एक अपूर्व क्रांतिशास्त्र निर्माण केलें आहे, त्यामुळें त्याच्याकडे जगाचे लक्ष वेधून गेले असून स्वतंत्र निर्मिती करण्याची आत्मप्रेरणा त्याच्यापाशीं आहे, असा प्रत्यय त्याला व जगालाहि आलेला आहे या त्याच्या आत्मप्रेरणेला शुद्ध बुद्धिवादी दीक्षा घेण्याचा काळ आज प्राप्त होत असून केवळ श्रीकृष्णाचीच परंपरा नव्हे, तर गौतम बुद्धाचीहि परंपरा चालविणें हें आधुनिक भारताचें कर्तव्य आहे, याची जाणीव त्यास होत आहे

## भारतीय समाजवाद

भारत स्वतंत्र झाल्यापासून या राष्ट्रांतील संस्कृतीला समाजवादी आकार प्राप्त करून देण्याचे कार्य कसें व कोण करणार, या प्रश्नाकडे या देशांतील विचारवंतांचें व राजकीय नेत्यांचें लक्ष वेधू लागलें. भारतीय स्वातंत्र्यसंपादनाचे श्रेय महात्मा गांधी व त्याचें सत्याग्रही तत्त्वज्ञान यांना मिळालें यामुळें महात्मा गांधी यांचें स्वतःचें

समाजवादासंबंधीं कोणतें धोरण होतें तें समजून घेणें प्रत्येकास आवश्यक वाटूं लागलें. कारण, ज्या तत्त्वज्ञानाच्या आश्रयानें व ज्या नेत्याच्या नेतृत्वानें भारताला राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झालें, त्याच तत्त्वज्ञानाच्या आश्रयानें व त्या नेत्याच्या मार्गदर्शनानें भारतांतील अपुरे राहिलेले सामाजिक व आर्थिक क्रांतीचें कार्य पुरे करतां येईल अशी आशा भारतातील सामान्य जनतेला व त्याच्या राजकीय नेत्याना वाटू लागली असल्यास त्यांत मुळींच आश्चर्य नाहीं. त्यांतून भारतांत समाजवादी पक्ष निर्माण होऊन त्यानें समाजवादी क्रांतीचे विचार भारतीय जनतेपुढें मांडण्यास सुरुवात केली, तेव्हांपासूनच महात्मा गांधींनीं आपण स्वत. समाजवादीच आहों आणि स्वतंत्र भारतातील राज्य समाजवादी बनविण्यास सत्याग्रही क्रांतिशास्त्राचा उपयोग करतां येईल, अशी आशा भारतातील तरुण समाजवादी क्रातिकारकांच्या अतःकरणांत निर्माण करण्यास प्रारभ केला होता १९४२ सालचा स्वातंत्र्यसग्राम सुरू करण्यापूर्वींच १९४० मधील राष्ट्रसभेच्या रामगड-अधिवेशनात श्री जयप्रकाश नारायण यांनीं स्वतत्र भारतात ज्या समाजवादी राज्याची स्थापना करावयाची त्यासबंधीं जो विस्तृत ठराव पाठविला होता, त्याला महात्मा गांधींनीं आपला वैयक्तिक पाठिंबा दिलेला होता. यानतर १९४२ सालीं जेव्हां त्यांनी ८ ऑगस्ट रोजीं सत्याग्रह-संग्रामाचा ठराव अखिल भारतीय राष्ट्रसभा-समितीपुढे माडिला, तेव्हां आज आपण फ्रेंच व रशियन क्रांतीपेक्षाहि अधिक मूलगामी आणि सर्वांगीण क्राति करण्यास प्रेरणा देत आहो अशी घोषणा केली होती ८ ऑगस्ट रोजीं त्यानीं आपल्या भाषणाचा समारोप पुढील शब्दांनीं केला :

"I believe that in the history of the world there has not been a more genuinely democratic struggle than ours. I read Carlyle's History of the French Revolution while I was in prison, and Pandit Jawaharlal has told me something about the Russian Revolution. But it is my conviction that in as much as these struggles were fought with the weapon of violence, they failed to realise the democratic ideal. In the democracy which I have envisaged, a democracy established by non-violence, there will be equal freedom for all. Everybody will be his own master. It is to join a struggle for such democracy that I invite you to-day."

या उताऱ्यांत महात्मा गांधींनीं असें म्हटलें आहे, की रशिया व फ्रान्स या देशांत झालेल्या क्रांत्या हिंसक साधनांनीं घडून आलेल्या असल्यामुळें तेथें खऱ्या लोकशाहीचा अवतार झालेला नाहीं. आपण या देशांत जी क्राति घडवून आणीत आहो, ती अत्यत शुद्ध अशा साधनांनीं घडवून आणीत असल्यामुळें तिच्यांतून निर्माण होणारी लोकशाही अधिक शुद्ध स्वरूपाची असेल आणि तिच्याखालीं आपण स्वतः आपल्या भाग्याचे विधाते आहों असा अनुभव प्रत्येकास येत राहील. १९४७

साली भारतास स्वातंत्र्याची प्राप्ति होण्याचा मुहूर्त निश्चित झाल्यानंतर स्वतंत्र भारतांत समाजवादी राज्य प्रस्थापित होणे हे अटळ आहे आणि जर या समाजवादाची उभारणी अहिंसेच्या अधिष्ठानावर झाली, तरच समाजवादी संस्कृति या राष्ट्रांत कायमची टिकेल असे आपले विचार त्यांनीं उघडपणे मांडलेले आढळतात १८ मे १९४७ च्या 'हरिजना'तील पुढील उतारा या बाबतींत निर्णायक आहे.

"Replying to a French friend, Gandhiji said, he felt that a Socialist State was bound to come into being in India He hoped that Indian Socialism would not be an arm-chair but a practical Socialism. The goal must be clear and perfect or else they would be sailing on an unchartered sea and might founder. He himself naturally clung to the hope that future society in India would be built on non-violence. And only in that case would Socialism become a permanent way of Life."

भारतांत प्रस्थापित होणारा समाजवाद जर सत्य व अहिंसा या साधनांनीं आणण्याचा प्रयत्न भारतीय समाजवाद्यांनीं अथवा कॉंग्रेसनिष्ठांनीं केला नाहीं, तर एखाद्या पर्वतशिखरावरून खोल दरींत पडणाऱ्या वस्तूचे ती छिन्नभिन्न होऊन तुकडे होतात त्याप्रमाणे तुमच्या समाजवादाचेहि तुकडे होतील आणि या राष्ट्रात कम्युनिस्ट क्रांति होईल, असा इषारा येथील कॉंग्रेसनिष्ठांना देण्याचें कार्य या वेळी महात्मा गांधी करीत होते. यासंबधीं ता ७ मे १९४७ रोजीं गांधीजींनीं काढलेल्या उद्गारांची नोंद मनुबेन गांधी यांच्या रोजनिशींत खालीलप्रमाणें केलेली आहे :

"Your aim should always be clear and perfect, and if in attaining it, you do not observe Truth and Non-Violence in every minutest detail, the Socialism that you desire to bring will dash to pieces and not a trace will be left of your existence, like a body falling from the top of a mountain into the valley below. This applies equally to the Congress. If congressmen or socialists do not follow the high principles which their fine designations connote, there will be a revolution in the country opening the gates to communism. I shall not live to see that tragedy; but I caution you to develop your activities carefully, and guard so that posterity might not pour curses on you."

महात्मा गांधींच्या वरील उद्गारांवरून स्वतंत्र भारतांतील राजकारणाला

कोणते स्वरूप येणार आहे आणि त्या राजकारणांत अहिंसक समाज निर्माण करूं इच्छिणारांनीं कोणते धोरण स्वीकारावे यासंबधींचें त्यांचे विचार आपणांस कळून येतात. राजकीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानतर भारतापुढील मुख्य प्रश्न अहिंसक समाज निर्माण करणे आणि त्यांतील राज्य शक्य तितक्या अहिंसावृत्तीनें चालविणें हाच असून या अहिंसक समाजाची व अहिंसेच्या दिशेने आपली प्रगति करू इच्छिणाऱ्या राज्याची उभारणी आर्थिक समतेच्या पायावर झाली पाहिजे, याबद्दल त्यांना यत्किंचितहि संशय नव्हता जोंपर्यंत समाजाची उभारणी आर्थिक समतेच्या पायावर झालेली नाहीं, तोंपर्यंत अहिंसक समाज आणि अहिंसावादी राज्य या शब्दांना कांहीं अर्थ नाहीं हे त्यांनी विधायक लोकसेवेच्या मार्गानें नवसमाज निर्माण करू इच्छिणाऱ्या आपल्या सत्याग्रही अनुयायांस निःसंदिग्धपणें विशद केले होतें. आजच्या नव्या दिल्लीमध्यें दिसून येणारे राजवाडे आणि त्याच्यापासून जवळच असणाऱ्या गरिबांच्या झोपड्या यांच्यातील विषमता स्वतत्र भारतात एक दिवसभरहि टिकणें शक्य नाही व इष्ट नाही असे ते म्हणत असत. जर या राष्ट्रांतील धनिकांनी आपल्या सपत्तीचा त्याग करून ही विषमता नष्ट केली नाहीं, तर आज ना उद्यां या राष्ट्रांत अत्याचारी व रक्तपाती क्रांति झाल्यावाचून राहणार नाहीं, याबद्दल त्याना संशय नव्हता. ही अत्याचारी व रक्तपाती क्राति टाळून व राष्ट्रातील आजची आर्थिक विषमता ताबडतोब नष्ट करून समतेच्या अधिष्ठानावर अहिसक समाज आणि अहिंसेच्या दिशेने प्रगति करणारे राज्य स्थापन करणे, हेच स्वतत्र भारतातील राजकारणाचे खरे रहस्य होईल असे त्याना स्पष्ट दिसत होते त्यास अनुसरूनच त्यानीं राष्ट्रसभेच्या मंत्रिमंडळाची सूत्रे पडित जवाहरलाल नेहरू याच्या हातीं दिलेलीं होतीं इतकेंच नाहीं, तर पडित नेहरू हे स्वतत्र भारताचे पतप्रधान बनून राष्ट्रसभेंतील जुन्या पिढीचे सर्व नेते राष्ट्रातील राज्ययत्रावर आरूढ झाल्यानतर राष्ट्रसभेचें अध्यक्षपद आचार्य नरेद्र देव किवा श्री जयप्रकाश नारायण याच्यासारख्या समाजवादी पक्षाच्या नेत्यास द्यावे, अशीहि त्याची मनीषा होती. पण १९४७ च्या उत्तरार्धात गांधीजींनीं राष्ट्रसभेच्या नेत्याना दिलेला हा दूरदर्शी सल्ला जुन्या पिढीच्या नेत्यांना पसंत पडला नाहीं आणि त्यामुळें महात्मा गांधींच्या निधनानंतर समाजवादी पक्ष राष्ट्रसभेंतून बाहेर पडला अशा रीतीनें राष्ट्रसभेच्या राजकारणाची समाजवादी दिशेने होणारी प्रगति स्थगित होऊन राष्ट्रसभा ही केवळ राजकीय लोकशाही व राष्ट्रीय स्वातंत्र्य याचें सरक्षण करू पाहणारी राष्ट्रवादी राजकीय संस्था बनली अशा रीतीनें सामान्य जनतेच्या हितासाठी प्रस्थापित राजसत्तेशीं झगडत राहणाऱ्या व जनतेच्या अंतःकरणांतील क्रांतिवृत्तीचें प्रतिनिधित्व करणाऱ्या राष्ट्रीय संस्थेचें रूपातर एका सत्ताधारी राजकीय पक्षांत झाले. अर्थात् यानतर समाजामध्यें सामाजिक क्रांतीची प्रेरणा निर्माण करून तिच्या आधारावर क्रांतिकारक राजकारण करण्याचें कार्य तिच्या हातून घडून येण्याचा संभव उरला नाहीं.

## स्वातंत्र्यांतील राजकीय पक्ष

भारताला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर येथील राजकारणाचें स्वरूप समाजवादी दिशेनें प्रगति करणारें आणि लोकशाहीनिष्ठ असें होणार, याबद्दल फारसा मतभेद नव्हता. तथापि पहिल्या महायुद्धाच्या अंतापासून दुसऱ्या महायुद्धाच्या अतापर्यंतच्या काळांत मानवसमाजाच्या लोकशाही-निष्ठेवर एक महान् संकट ओढवलें होतें. युरोप खडांत समाजवादी ध्येयाला कार्ल मार्क्सनें क्रांतिकारक स्वरूप एकोणिसाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारासच दिलेलें होतें. तथापि विसाव्या शतकांतील पहिलें महायुद्ध सुरू होऊन इ स १९१७ सालीं रशियांत बोल्शेव्हिक क्रांति होण्यापूर्वीपर्यंत-च्या काळांत या क्रांतिकारक समाजवादाला जागतिक राजकारणांत फारसें महत्त्व प्राप्त झालेलें नव्हते पण बोल्शेव्हिक क्राति घडून आल्यानतर मात्र क्रातिकारक समाज-वाद ही शक्ति जगातील प्रत्येक राष्ट्रात उदय पावू लागली हा क्रांतिकारक समाज-वाद मार्क्सप्रणीत शास्त्रीय समाजवादाच्या रूपाने सर्व जगभर सचार करू लागला आणि मार्क्सवादी तत्त्वज्ञान प्रत्येक राष्ट्रांतील सुशिक्षित तरुणाना आकर्षक वाटू लागलें. हा मार्क्सचा शास्त्रीय समाजवाद प्रथमत' लोकशाही क्रातीची नैसर्गिक परिणति व पूर्तता'अशा रूपाने आकर्षू लागला असला, तरी लवकरच त्याचें क्रांति-शास्त्र हें लोकशाहीला विघातक आणि हुकूमशाहीला प्रेरक असें असल्याचा अनुभव येऊं लागला त्यातून मार्क्सवादाला अभिप्रेत असणारी समाजवादी क्राति दडपून टाकण्यासाठीं युरोप खडांत फॅसिझम् व नाझीवाद या नावानें एकपक्षीय हुकूमशाहीचे नवे नमुने निर्माण होऊ लागले. ही हुकूमशाही राष्ट्रीय वृत्ति, धर्मभावना आणि आध्यात्मिक संस्कृति या नांवानीं पुढें येऊन आपला प्रचार करूं लागली. ही फॅसिस्ट हुकूमशाही समाजवाद व लोकशाही या दोनहि पुरोगामी ध्येयाना नामोहरम करू पाहणारी अशी प्रतिगामी शक्ति होती पण सन १९३० नंतरच्या काळात सर्व युरोप खंडात तिचा प्रभाव गाजूं लागला. इतकेंच नाहीं, तर युरोपीय साम्राज्यशाहीच्या कचाटींतून मुक्त होऊं लागलेल्या आशियातील राष्ट्रानाहि या प्रतिगामी राष्ट्रीय हुकूम-शाहीचें आकर्षण वाटूं लागले यामुळे १९३० ते ३९ पर्यंतच्या काळात एका बाजूनें कम्युनिझमची हुकूमशाही आणि दुसऱ्या बाजूनें फॅसिझमची हुकूमशाही या दोहोंच्या रस्सीखेचींत लोकशाही संस्कृतीवरील निष्ठा डळमळीत होऊन ती नष्ट होण्याचा धोका निर्माण झाला.

भारतांतहि १९२० पासून ४० पर्यंतच्या काळांत कम्युनिस्ट-तत्त्वज्ञान प्रविष्ट होऊन त्याची पक्षसंघटनाहि बऱ्याच मोठ्या प्रमाणावर उदय पावली. यानतर १९३३-१९३४ नंतरच्या काळात मुस्लीमलीग पक्षाची प्रतिगामी जमातवादी निष्ठा आणि तिचा प्रतिकार करण्याच्या मिषानें संघटना करू पाहणारी हिंदुराष्ट्रवादी निष्ठा, अशा दोन जमातवादी निष्ठा भारतांतील धर्मभावनेला व राष्ट्रभावनेला विकृत

बनवू लागल्या या काळात युरोप खंडांत निर्माण झालेल्या कम्युनिझम् व फॅसिझम् या दोन शक्तींमधील रस्सीखेचीचें भारतीय राजकारणांत पडलेलें हे प्रतिबिंबच होतें. पण आंतरराष्ट्रीय राजकारणांतील प्रबल शक्तींच्या संघर्षाची भारतीय राजकारणाच्या प्रवाहांत पडलेली हीं प्रतिबिंबे हिंदी राजकारणांत प्रभुत्व गाजविण्याइतकीं कधींच प्रभावी बनूं शकलीं नाहींत कारण १९२० पासून १९४० पर्यंतच्या काळात हिंदी राजकारणाचा प्रवाह हिंदी राष्ट्रसभा आणि महात्मा गांधींनीं तिच्यामध्ये निर्माण केलेली निःशस्त्र क्रांतीची प्रेरणा याच्याचमागून एकसारखा वहात होता

जगांतील लोकशाहीनिष्ठेला खग्रास ग्रहण लागण्याच्या या काळात भारतीय जनतेच्या अंतःकरणांत प्राचीन काळापासून प्रतिष्ठा पावलेल्या आत्मबलास व सत्यनिष्ठ अहिंसावृत्तीस जागृत करून महात्मा गांधींनी जगातील लोकशाहीला व समाजवादाला क्रांतिकारक अहिंसेचे अधिष्ठान मिळवून दिले गांधीजींच्या क्रांतिकारक अहिंसेंतूनच मानव-संस्कृतीतील लोकशाही व समाजवाद या पुरोगामी ध्येयाना सुप्रतिष्ठित व चिरंजीव बनविण्याचा मार्ग सापडणार आहे, हे प्रथम ओळखण्याचें श्रेय पंडित जवाहरलाल नेहरू या भारतीय युवकांच्या नेत्याला आहे महात्मा गांधी व पंडित जवाहरलाल नेहरू या दोघांनीं १९२० ते १९४० पर्यंतच्या काळांत भारतांत निर्माण झालेल्या क्रांतिकारक राजकीय शक्तीला लोकशाही समाजवादाच्या मार्गावर खेचून ठेविलें, किंबहुना ओढून नेलें, असे म्हटल्यास त्यांत फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं

१९३४-३५ नंतर राष्ट्रसभेंत एक राष्ट्रसभानिष्ठ समाजवादी पक्ष ( Congress Socialist Party ) स्थापन झाला. या पक्षाच्या संस्थापनेपासून हिंदी राजकारणांत समाजवादी क्रांतीचे ध्येय बद्धमूल झाले असे जसें म्हणतां येईल, तसेंच असेंहि म्हणावे लागेल, कीं रशियांतून प्रेरणा घेऊन आलेल्या कम्युनिस्ट पक्षाव्यतिरिक्त दुसरा एक समाजवादी क्रांतिकारक पक्ष भरतखंडांत या वेळेपासून संघटित होऊ लागला या पक्षाची निष्ठा मार्क्सवादावरच असली, तरी हिंदी राजकारणातील राष्ट्रसभेनें चालविलेल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याचे महत्त्व आणि महात्मा गांधींचें राष्ट्रीय नेतृत्व यांसबंधीं या पक्षाच्या संस्थापकांची वृत्ति कम्युनिस्ट पक्षाच्या वृत्तीहून प्रथमपासूनच भिन्न होती. इ. स १९३० सालीं महात्मा गांधींनीं जो सत्याग्रहाचा संग्राम राष्ट्रसभेमार्फत केला, त्यांत भाग घेतलेल्या तरुणांतूनच हा नवा पक्ष निर्माण झालेला होता. हिंदी राजकारणातील राष्ट्रसभा व महात्मा गांधींचें नेतृत्व या पुरोगामी शक्ती असून त्यांच्याशीं तादात्म्य पावूनच भारतांतील समाजवादाने आपले कार्य करीत राहिले पाहिजे, असे या वेळेपासूनच या पक्षाचे सामान्य धोरण होते पंडित जवाहरलाल नेहरू हे स्वतः समाजवादी विचाराचे नेते असून महात्मा गांधीहि समाजवादी ध्येयाला अनुकूल होते. इतकेंच नाहीं, तर या नव्या तरुणांच्या पक्षातील कांहीं पुढाऱ्याना राष्ट्रसभेच्या कार्यकारिणींत घेऊन त्यांच्याकडून भारतांतील तरुणांचीं अंतःकरणें समजावून

घ्यावींत व त्यांतील सत्यांश ग्रहण करून आपल्या राजकारणाचा विकास करीत जावें असेंच त्यांचें धोरण होतें मात्र मार्क्सवादांत अभिप्रेत असणारी सशस्त्र क्रांति ही हिंसक असून ती लोकशाहीलाहि मारक आहे हे जाणून ती वृत्ति या नव्या पक्षामार्फत राष्ट्रसभेंत प्रविष्ट होऊ नये एवढी दक्षता ते घेत असत भारतीय क्रांतीचें अनत्याचारी स्वरूप कायम ठेवून समाजवादी ध्येयांचा प्रचार करणाऱ्या पक्षाच्या वाढीस त्यांनीं केव्हांहि विरोध केला नाहीं. किंबहुना त्याला त्यानीं प्रथमपासून साहाय्यच केले पंडित नेहरू आणि महात्मा गांधी या दोघांच्या राजकीय धोरणांमागील वृत्ति अशी समाजवादास अनुकूल असल्यामुळे राष्ट्रसभेंत हा तरुण पक्ष प्रतिष्ठा पावूं लागला आणि स्वातंत्र्यप्राप्तीनंतर राष्ट्रसभेचें ध्येय समाजवादाची संस्थापना करणे हेच होऊ शकेल अशीहि आशा काहींना वाटूं लागली. पण यासंबधीं निश्चित असे कोणतेंहि विधान करणें त्या वेळीं, किंबहुना राष्ट्रीय स्वातंत्र्याची प्राप्ति होईपर्यंत करणे शक्य नव्हतें. जर हे राष्ट्रीय स्वातंत्र्य अनत्याचारी क्रांतीने प्राप्त होऊ शकले, तरच ही अनत्याचारी क्रांतीची वृत्ति राष्ट्रांत कायम टिकूं शकेल, आणि जर त्या स्वातंत्र्याची प्राप्ति करण्यात अनत्याचारी क्रांति यशस्वी होऊ शकली नाही तर अहिंसक क्रांतीचे तात्त्विक ध्येय तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें कितीहि श्रेष्ठ असले, तरी त्याचा अवतार या भूतलावर होण्याचा संभव नाहीं हें ओळखून भारताला तो प्रयत्न सोडून द्यावा लागेल, असे या वेळीं सामान्य विचारवंतांना वाटत होते अशीच काहीशी संदिग्ध वृत्ति सर्वसामान्य राष्ट्रसभानिष्ठ कार्यकर्त्यांची व जनतेची महात्मा गांधींच्या अहिंसक क्रांतीच्या प्रयोगासंबंधीं या वेळीं असली तर त्यात फारसें आश्चर्य नाहीं. समाजवादी पक्षात सामील होणाऱ्या सर्वसामान्य तरुणांची वृत्तीहि या वेळीं अहिंसक क्रांतीसंबधीं मुग्ध वा संदिग्ध असणे साहजिक होते

मात्र महात्मा गांधींची अहिंसक क्रांतीवरील निष्ठा स्वयंभू व अविचल असून तिचा एकसारखा विकासच होत आलेला होता ज्याना महात्मा गांधींच्या या वृत्तीशी जितके तादात्म्य पावता येई, त्यांच्या अंतःकरणांत तितक्या प्रमाणात ही अहिंसक क्रांतीवरील निष्ठा अधिकाधिक दृढ बनत असे महात्मा गांधींचा हिंदी राजकारणांतील वाढता प्रभाव आणि त्यांना मिळत जाणारे यश, यांवरच भारतीय जनतेंतील क्रांतिकारक वृत्तीचें अहिंसक स्वरूप अवलंबून रहावयाचें होते अर्थात् राष्ट्रसभेत जो तरुण समाजवादी पक्ष निर्माण झाला होता, त्याची अहिंसक क्रांतीवरील निष्ठाहि त्या साधनाला राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यात येणाऱ्या यशावर अवलंबून राहणारीच होती. याच दृष्टीनें या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तींत समाजवादी पक्षाच्या अनत्याचारी क्रांतीवरील निष्ठेबद्दल पुढील विधान केलेलें होतें: “अद्यापि या पक्षाची निःशस्त्र क्रांतिशास्त्रावर अव्यभिचारी निष्ठा बसलेली नाहीं. तथापि, शिस्तीच्या व व्यावहारिक धोरणाच्या दृष्टीनें त्याने त्या क्रांतिशास्त्राचा अवलंब केला असून हिंदुस्थानांत संपूर्ण स्वराज्याची स्थापना अनत्याचारी क्रांतीनें झाली असें पाहतांच या पक्षाची या क्रांति-

शास्त्रावरील निष्ठा अधिक दृढ होईल, याबद्दल आम्हांस संशय नाही." (आ. भा. आवृत्ति १ ली, पृष्ठ ६९५ ) पुढे १९४२च्या आंदोलनांत भारतीय जनतेच्या अंतःकरणांतील क्रांतिकारक अहिंसावृत्तीवरील निष्ठा डळमळीत होऊं लागली होती. तथापि, त्याहि अवस्थेत तिचा प्रभाव त्या आंदोलनावर पडलेला होता आणि त्यानंतर ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं त्या आंदोलनाचा प्रभाव पाहून महात्मा गांधींच्याशीं व राष्ट्रसभेशीं सन्मान्य समेट करून भारतीय स्वातंत्र्याचा प्रश्न सोडविला हे दृश्य पाहून अनत्याचारी क्रांतीवरील भारतीय समाजवाद्याची निष्ठा अधिक प्रमाणांत वाढली, तर त्यांत कोणतेच आश्चर्य नाहीं. अशा प्रकारे महात्मा गांधींनीं भारतीय स्वातंत्र्याचा लढा अनत्याचारी धोरणाने यशस्वी करून दाखविला आणि मार्क्सवादावर निष्ठा ठेवून ज्यांनीं समाजवादी पक्षाची उभारणी केली होती, त्यांच्याहि अंतःकरणांत अहिंसक क्रांतिवादाची प्रेरणा त्यांनीं जागृत केली अशा रीतीनें भारतीय जनतेंत सुप्त असलेल्या अहिंसावृत्तीला जागृत करून तिला आधुनिक भारताच्या निर्मितींत क्रांतिकारक प्रतिष्ठा महात्मा गांधींनी मिळवून दिली यामुळें भारतीय स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर जरी राष्ट्रसभेतून हिंदी समाजवादी पक्ष बाहेर पडला, तरी उरलेला राष्ट्रसभा पक्ष आणि बाहेर पडलेला समाजवादी पक्ष या दोघांनींहि भारतीय समाजवादी क्रांति अनत्याचारी मार्गानेंच करावयाची हे तत्त्व स्वीकारलेलें आज दिसत आहे हिंदी समाजवादी पक्षाने हें धोरण निःसंदिग्धपणें मान्य केल्यामुळें पूर्वी समाजवादी व गांधीवादी या निष्ठांच्या आधारावर जे दोन राजकीय पक्ष निर्माण होण्याचा संभव दिसत होता, तो संभव नाहीसा होऊन या दोनहि निष्ठांच्या लोकांचा समावेश करून घेणारा आणि अनत्याचारी क्रांतीच्या मार्गाने लोकशाही समाजवादाचें ध्येय गांठू पाहणारा असा एकच प्रजा-समाजवादी पक्ष हिंदी राजकारणात निर्माण झालेला आज दिसत आहे आजच्या हिंदी राजकारणांत राष्ट्रसभा पक्ष आणि प्रजा-समाजवादी पक्ष हे दोन अखिल भारतीय पक्ष म्हणून नांदत असून त्या दोघांनाहि पूर्वीच्या राष्ट्रसभेचा व महात्मा गांधींनीं निर्माण केलेल्या अनत्याचारी राजकारणाचा वारसा मिळालेला आहे, असेंच म्हणावे लागेल राष्ट्रसभा पक्षाचें नेतृत्व पंडित नेहरू यांच्याकडे आलेले असून जरी त्या पक्षानें समाजवादाचें ध्येय उघडपणें स्वीकारलेले नाहीं, तरी आपल्या राष्ट्राची पुरी प्रगति समाजवादी दिशेनेंच झाली पाहिजे, ती लोकशाही मार्गानें झाली पाहिजे, आणि तिला अत्याचारी स्वरूप येता कामा नये, याबद्दल राष्ट्रसभा पक्षाचें धोरण निश्चित आहे वरकरणीं विचार करितां असें वाटतें, कीं लोकशाही, समाजवाद आणि अनत्याचारी क्रांति किंवा सत्याग्रह हीं तत्त्वे जर दोनहि पक्षास मान्य आहेत, तर राष्ट्रसभा पक्ष व प्रजा-समाजवादी पक्ष असे दोन राजकीय पक्ष निर्माण होण्याचे कांहीं कारण नाहीं. पण अधिक खोल दृष्टीनें पाहूं लागल्यास असे दिसून येते, कीं राष्ट्रसभा पक्षानें पंडित नेहरू यांना आपलें नेतृत्व दिलेलें असले, तरी त्या पक्षाची संस्थापना व वाढ समाजवादी निष्ठेवर झालेली नाहीं. यामुळें त्या पक्षाची समाज-

वादावर अद्यापि खरी निष्ठा बसलेलीच नाहीं. उलट, समाजवादाला विरोधी असे ज्यांचे विचार आहेत त्यांचाच भरणा या पक्षात बहुसंख्येनें झालेला असून समाजवादी दिशेनें कोणतेहि पाऊल टाकतांना या पक्षांतील बहुसंख्य लोक, निदान बरेच प्रतिष्ठित पुढारी, तसें करण्यास विरोध करतात आणि समाजवादाची संस्थापना शक्य तितकी पुढें ढकलण्याचा प्रयत्न करितात याच्या उलट, समाजवादी पक्षाची संस्थापना व वाढ निःसंदिग्धपणे समाजवादाच्या निर्मितीसाठींच झालेली असून त्या पक्षाने अनत्याचारी क्रांतीचे तत्त्व पूर्ण विचारानें आणि अनेक वर्षांच्या प्रत्यक्ष अनुभवानंतर स्वीकारलेलें आहे यामुळे या पक्षाची समाजवादावरील निष्ठा अढळ असून आपल्या राष्ट्राची त्या दिशेने प्रगति कशी करितां येईल, यासंबधीचे त्या पक्षाच्या पुढाऱ्यांचे विचार व योजना निश्चित आहेत अशा पक्षाला राष्ट्रसभा पक्षाचे धोरण पुरेसे प्रगतिकारक वाटू शकत नाहीं किंबहुना, राष्ट्रसभा पक्षापाशी निश्चित दिशेने व निष्ठेने प्रगति करण्याचें कोणतेहि धोरण नाहीं असेंच या पक्षाला वाटते शिवाय, राष्ट्रसभा पक्ष ज्या घटना-परिषदेंत प्रचंड बहुमतानें निवडून आलेला होता, त्या घटना-परिषदेनें बनविलेली राज्यघटना व तिच्यांतील मालमत्तेच्या हक्कासंबधींचीं कलमे समाजवादी दिशेनें राष्ट्राची प्रगति करण्यास अडथळा करणारीं आहेत यावरूनहि राष्ट्रसभा पक्ष समाजवादाच्या संस्थापनेबद्दल उत्कंठा बाळगणारा पक्ष नाहीं, असा समाजवादी पक्षाचा युक्तिवाद असून तो खोडून काढणें कठिण आहे. यामुळें ज्यांना समाजवादाच्या संस्थापनेवांचून आपल्या राष्ट्राची आर्थिक घडी बसू शकणार नाही हे तत्त्व पटलेले आहे आणि म्हणून जे समाजवादी क्रांतीसंबधीं उत्कंठित झालेले आहेत त्यांना राष्ट्रसभेकडून आपल्या तत्त्वास व धोरणास मान्यता मिळवून घेणें किंवा त्यासाठीं राष्ट्रसभेच्या बाहेर जाऊन स्वतंत्र पक्षसंघटना करणे, यावाचून गत्यंतरच नव्हतें. जेव्हां त्यांची खात्री झाली, कीं राष्ट्रसभा आपले ध्येय व धोरण मान्य करण्याची आशा नाहीं, इतकेंच नाहीं, तर राष्ट्रसभेच्या पोटात राहून आपल्या पक्षाची वाढ करण्यास महात्मा गांधी जशी आपणांस संधि देत असत तशी संधि देण्यासहि राष्ट्रसभेचे नेते तयार नाहींत, तेव्हां समाजवाद्यांनीं आपल्या तत्त्वनिष्ठेचें संरक्षण व संवर्धन करण्यासाठीं राष्ट्रसभेचा त्याग केला आणि लोकशाही व अनत्याचारी क्रांति याचा महात्मा गांधींच्यापासून मिळालेला वारसा आत्मसात् करून त्या अधिष्ठानावर नवा अखिल भारतीय पक्ष उभा केला लोकशाहीच्या मार्गाने व अनत्याचारी धोरणाने आपल्या राष्ट्राची प्रगति समाजवादी दिशेने व्हावयाची असल्यास, आज ना उद्यां त्याला या पक्षाचें नेतृत्व स्वीकारल्यावांचून चालणार नाहीं तात्पर्य, पूर्वीच्या राष्ट्रसभेंतून निर्माण झालेले आजचे हे दोन पक्ष लोकशाहीच्या संरक्षणाच्या व समाजवादाच्या संस्थापनेच्या दृष्टीनें अपरिहार्य व आवश्यक असेच दिसतात

या दोन पक्षांहून भिन्न असा व अनत्याचारी क्रांतीवर निष्ठा नसणारा तिसरा पक्ष म्हणजे शास्त्रीय समाजवादाचा मक्ता सांगणारा कम्युनिस्ट पक्ष होय. इतर सर्व

राष्ट्रांप्रमाणे भरतखंडांतहि कम्युनिस्ट पक्ष स्थापन झालेला असला, तर त्यांत कांहींच आश्चर्य नाहीं पण या पक्षाला भारतीय राजकारणात आजपर्यंत आपला प्रभाव पाडितां आलेला नाहीं जर भारतीय स्वातंत्र्याचा प्रश्न महात्मा गांधींच्या हातून सुटू शकला नसता, तर या राष्ट्रांतील जनतेंत कम्युनिस्ट तत्त्वज्ञान व तो पक्ष यांचा प्रभाव अधिक पडू शकला असता तसेच यापुढेंहि आपल्या राष्ट्रांत लोकशाहीच्या व अनत्याचाराच्या मार्गानें समाजवादाची संस्थापना करू इच्छिणारे पक्ष व शक्ती वाढीस लागल्या नसत्या, तरीहि कम्युनिझमचे आकर्षण येथील क्रांतिकारकाना अधिक वाटले असते पण आता या पक्षाचा प्रभाव भारतीय राजकारणावर पडण्याचा संभव उरलेला नसून या राष्ट्रात निर्माण झालेल्या अनत्याचारी क्रांतिनिष्ठेचें रूपांतर सत्याग्रही समाजवादाच्या निष्ठेत होऊन त्याच निष्ठेच्या लोकांकडून भारतीय समाजवादाची संस्थापना होईल, असा विश्वास वाटतो.

## जमातवादी पक्ष व त्यांचें भवितव्य

राष्ट्रसभा पक्ष, प्रजा-समाजवादी पक्ष आणि कम्युनिस्ट पक्ष ह्या ज्या तीन पक्षाचें आतापर्यंत वर्णन केले, ते तीनहि पक्ष आजच्या सामाजिक व आर्थिक विषमतेतून व दुःस्थितींतून समतेकडे व सुस्थितीकडे प्रगति करण्याच्या उपायासंबधीं जे मतभेद आहेत, त्यांतून निर्माण झालेले आहेत भारत परतंत्र असताना स्वराज्य मिळविण्याच्या मार्गासंबधीं मतभेद होऊन प्रागतिकांचा सनदशीर पक्ष आणि राष्ट्रवाद्यांचा बहिष्कारवादी निःशस्त्र क्रांतिपक्ष आणि सशस्त्र क्रांतिवाद्यांचा भूमिगत कार्य करणारा पक्ष असे तीन राजकीय पक्ष होते त्यासारखेच काहीसे समाजवादाच्या ध्येयाकडे जाऊ इच्छिणारे असे हे तीन राजकीय पक्ष आहेत. पण हे तीनहि पक्ष सामाजिक व आर्थिक घटनेत क्रांति करण्यासंबधींच्या मतभेदातून व वृत्तिभेदांतून निर्माण झालेले आहेत. पण या तिहींहून वेगळे असे काहीं पक्ष आज भारतात नांदत आहेत या पक्षाचें मुख्य अधिष्ठान विशिष्ट जमातवाद हें असून या राष्ट्रात अनेक जातींच्या व धर्मांच्या रूपानें ज्या अनेक जमाती नांदत आहेत, त्याच्या हितसंबधाच्या आधारावर राजकीय पक्ष निर्माण करण्याचे हे प्रयत्न आहेत असे जमातवादी राजकीय पक्ष निर्माण करण्याची मूळ कल्पना ब्रिटिशांनी मुसलमान जमातीला विभक्त मतदारसंघ देऊन निर्माण केली यातून पाकिस्तानवादी मुस्लीम लीग पक्ष आणि त्याला जशास तसे या न्यायाने विरोध करू पाहणारा हिंदु महासभावादी पक्ष असे जे दोन पक्ष निर्माण झाले, त्यांचा इतिहास मागे दिलाच आहे पाकिस्तानची स्वतंत्र निर्मिती झाल्यामुळें आणि भारतात विभक्त मतदारीचा कायदा जाऊन एकत्र मतदानपद्धति स्थापन झाल्यामुळें मुसलमानांसारख्या अल्पसंख्य जमातींना जमातवादी राजकारण यशस्वी करणे आतां अशक्य झालें आहे यामुळे मुस्लीम लीग पक्ष आणि त्याच्या विरोधासाठीं निर्माण झालेला हिंदुमहासभा पक्ष यापैकी कोणालाहि आजच्या राजकारणांत महत्त्वाचे स्थान

अथवा कार्य उरलेलें नाहीं हिंदुसमाज हा या राष्ट्रांतील बहुसंख्य जनतेच्या धर्मावर अधिष्ठित झालेला असला, तरी तो अनेक जातींत व जमातींत विभागलेला आहे. यामुळे इतर सांप्रदायिक धर्मांच्या जमातींप्रमाणें हिंदुसमाज एकसंध बनू शकत नाहीं. तसेंच हिंदुधर्माच्या सर्व जमातींना साधारण असे कोणतेहि संकट आज वस्तुतः निर्माण झालेलें नाहीं, किंवा सर्व हिंदूंची एक संघटना करून त्या सर्वांना समान असणारे असे कांहीं हितसंबंधहि सुरक्षित करावयाचे आहेत असे नाहीं यामुळे हिंदुमहासभा पक्ष राजकारणांत केवळ पूर्वीचा एक अवशेष म्हणूनच उरलेला आहे मुस्लीम लीग पक्षाप्रमाणे या पक्षालाहि हिंदी राजकारणांत यापुढें महत्त्व उरणार नाहीं जमातवादी पक्षांतील अखिल भारतीय स्वरूपाचे असे हे दोनच पक्ष होत

या दोन पक्षांव्यतिरिक्त भारतांतील प्रत्येक प्रांतांत प्रांतिक स्वरूपाचे व महत्त्वाचे असे त्या त्या प्रांतांतील बहुसंख्य जमातीच्या अधिष्ठानावर कार्य करूं पाहणारे कांहीं प्रांतिक जमातवादी राजकीय पक्ष निरनिराळ्या प्रांतांत आहेत पण असल्या फुटकळ प्रांतिक महत्त्वाच्या राजकीय पक्षांनासुद्धां राजकारणात फारसे महत्त्व येण्याचा संभव नाहीं कारण ज्या जमाती अल्पसंख्य असतील, त्यांना जमातवादी पक्ष निर्माण करून आपला प्रभाव राजकारणांत मुळींच पाडतां येणार नाहीं कारण, असे पक्ष निवडणुकींत बहुसंख्य मते केव्हांहि मिळवू शकणार नाहींत. याच्या उलट, महाराष्ट्रांतील मराठा जमातीसारख्या ज्या जमाती विशिष्ट प्रांतांत प्रचंड बहुसंख्येनें नांदत असतील, त्या जमातींचेहि केवळ जमातवादाच्या भांडवलावर राजकीय पक्ष निर्माण करण्याचा प्रयोग फार काळ यशस्वी होऊं शकत नाहीं कारण अशा प्रचंड संख्येच्या जमातीतील सर्वांचे हितसंबंध सारखे असू शकत नाहींत त्यांत परस्पर-विरोध निर्माण होतात आणि अशा विरोधांमुळे सामाजिक व आर्थिक क्रांतीच्या कार्याकडे पाहण्याचे त्यांचे दृष्टिकोण, त्यांच्या वृत्ती, आणि त्यांचीं मते यांत एकवाक्यता टिकूं शकत नाहीं. यामुळे अखेरीस अशा प्रचंड बहुसंख्य जमातीचे लोक जसे जसे सुशिक्षित व डोळस बनत जातील, तसे तसे ते जमातवादी पक्ष सोडून राष्ट्रसभा पक्ष, प्रजा-समाजवादी पक्ष किंवा कम्युनिस्ट पक्ष यांपैकीं कोणत्या तरी एका पक्षांत सामील होऊं लागतात व त्या एकाच जमातींत तीन पक्ष निर्माण होऊन तो जमातवादी पक्ष विलय पावतो हा अनुभव गेल्या सार्वत्रिक निवडणुकांच्या वेळीं आलेला असून अशा सर्व जमातवादी पक्षांचा पाडाव राष्ट्रसभा पक्षानें केलेला आहे यावरून अ. भा. स्वरूपाचे असोत किंवा प्रांतिक महत्त्वाचे असोत, अल्पसंख्य जमातीचीं मते मिळवू पाहणारे असोत किंवा त्या प्रांतांत असणाऱ्या बहुसंख्य जमातीचीं मते मिळवू पाहणारे असोत, त्यांना आजच्या सार्वत्रिक मतदानाच्या व एकत्र मतदारसंघांच्या राज्यपद्धतींत आपलें राजकारण यशस्वी करतां येत नाहीं व आपला प्रभाव येथील राजकारणावर पाडतां येत नाहीं अशा प्रकारें हिंदुस्थानांत परंपरागत सामाजिक संस्कारांतून निर्माण झालेल्या जमाती व त्यांचीं मते मिळविण्याच्या आशेवर उभार-

लेले राजकीय पक्ष याना स्वतंत्र भारतात स्थान उरलेलें नाही सामाजिक व आर्थिक व्यवहारांतून जातिभेद, धर्मभेद व जमातवादी सकुचित दृष्टि या गेल्या पन्नास-साठ वर्षांत झपाट्यानें नष्ट होऊ लागल्या आहेत ब्रिटिशांनी या वृत्तींच्या आधारावर प्रतिगामी राजकीय पक्ष निर्माण करून आपले साम्राज्य टिकविण्याचे जे प्रयत्न केले, त्या प्रयत्नातून निर्माण झालेलें जमातवादी राजकारणहि आतां नष्ट होऊ लागले आहे यामुळे भारतीय राजकारणांत आता अ. भा स्वरूपाचे असे राष्ट्रसभा पक्ष, प्रजा-समाजवादी पक्ष आणि कम्युनिस्ट पक्ष असे तीनच खरे राजकीय पक्ष उरतील. ज्या मानानें येथील लोकशाही स्थिर व बद्धमूल होऊन तिची समाजवादात परिणति होत जाईल, त्या मानानें कम्युनिस्ट पक्षहि मागें पडून दोनच लोकशाहीनिष्ठ राजकीय पक्ष या खंडतुल्य राष्ट्रात प्रभावी बनतील व त्याची समाजवादी दिशेने प्रगति होत राहील.

## सत्याग्रहनिष्ठा आणि लोकशाही समाजवाद

लोकशाही राज्य सुव्यवस्थितपणें चालू राहण्यास राज्यात दोनच प्रबल व सघटित पक्ष असणे उपकारक व हितावह असते, असा अनुभव युरोप खंडातील लोक-शाही राज्यांच्या इतिहासावरून आलेला आहे पण लोकशाही राज्य चालविणारे जे दोन किंवा अधिक पक्ष असतील, त्या सर्वांची लोकशाहीवर निष्ठा मात्र असली पाहिजे तसेच ही लोकशाही समाजवादी व्हावयाची, तर संपत्तीचे सामाजिक स्वामित्व आणि वर्गहीन समाजरचना या ध्येयावरहि त्या सर्व पक्षाचा विश्वास असला पाहिजे. समाजात निर्माण होणाऱ्या संपत्तीचें स्वामित्व व्यक्तीचें असावे कीं समाजाचे असावे, अथवा ते किती प्रमाणात समाजाचें असावे व किती प्रमाणांत व्यक्तीचे असावें, या प्रश्नाचा निर्णय लोकशाही पद्धतीने लावून घेण्याची तयारी युरोपातील लोकशाही राज्याची अथवा त्यातील सर्व पक्षांची झाली नाहीं, म्हणूनच तेथील लोकशाही राज्यांना आपली परिणति शाततेच्या मार्गाने समाजवादात करता आली नाहीं माल-मत्तेच्या अमर्याद स्वामित्वाचा हक्क हा व्यक्तीचा मूलभूत हक्क असून त्याच्या सरक्षणा-साठींच राज्यसस्था निर्माण झालेली आहे आणि म्हणूनच तो हक्क केव्हाहि काढून घेणें हे कृत्य राज्यसस्थेच्या अधिकाराबाहेरचे आहे, अशी राज्यमीमासा युरोपातील प्रागतिक लोकशाहीवाद्यांनीं स्वीकारल्यामुळे प्रागतिक लोकशाहीचे समाजवादी लोक-शाहींत रूपातर घडणें अशक्य झाले. म्हणूनच कम्युनिझम् आणि फॅसिझम् ही दोन हुकूमशाही राजकीय तत्त्वज्ञानें पुढे आलीं आणि या दोघाच्या टक्करींत युरोपीय लोक-शाहीचा अत झाला

मालमत्तेच्या सामाजिक स्वामित्वाचें तत्त्व केवळ युक्तिवादाच्या बुद्धिबलाने सर्व समाजाला पटवून देऊन समाजवादी लोकशाही निर्माण करण्याचा मार्ग ब्रिटिश समाज-वाद्यांनीं चोखाळून आपल्या राष्ट्राचे समाजवादास अनुकूल असें मतपरिवर्तन घडवून आणण्याचे कार्य सुरू ठेविले आहे तथापि, त्या राष्ट्रांतहि अद्यापि हें तत्त्व सर्व पक्षाना

मान्य झालेले नाहीं. इतक्या मदगतीने समाजवादाकडे प्रगति करणें भारतास अशक्य आहे हे जाणूनच केवळ बुद्धिबल हे सामाजिक क्रांतिकार्यास अपुरें पडतें आणि शस्त्रबलानें क्राति करण्यास प्रारभ केला, तर हुकूमशाही वृत्ति वाढत जाऊन लोकशाही नष्ट होते, म्हणून भारताने आपल्या राजकारणास आत्मबलाचें अधिष्ठान निर्माण करण्याचे धोरण स्वीकारिलें महात्मा गांधींनीं सत्याग्रही क्रांतिशास्त्र भारताला दाखवून देऊन लोकशाही व समाजवाद या दोहोनाहि आधारभूत असणारीं तत्त्वे त्यांत समाविष्ट करून घेतलीं. राज्याचे प्रभुत्व प्रजेच्या अतःकरणातील न्यायबुद्धीकडे असले पाहिजे आणि समाजां-तील सपत्तीचें स्वामित्व कोणाहि व्यक्तीचे नसून परमेश्वराचे म्हणजेच सर्व समाजाचें असले पाहिजे, हीं दोन तत्त्वें अनुक्रमे लोकशाहीच्या व समाजवादाच्या ध्येयाना आधारभूत आहेत व तीं आध्यात्मिक समाजरचनेला आवश्यक आहेत. अशा रीतीने महात्मा गांधींनीं आपल्या सत्याग्रहनिष्ठेंत त्यांचा अंतर्भाव करून घेतलेला आहे यामुळें भारतीय राजकारणातील जे पक्ष सत्याग्रहनिष्ठेला मान्यता देतात, त्यांना लोकशाही व समाजवाद या दोहोंचा समन्वय साधून भांडवलदार लोकशाहीचे समाजवादात रूपांतर करण्याचा शाततेचा मार्ग सत्याग्रहाच्या रूपानें दिसूं लागतो भारतांत स्थापन झालेली लोकशाही ही अद्यापि समाजवादी बनलेली नसली आणि समाजवादी दिशेने प्रगति करण्यास अडथळा करणारीं काही कलमे आजच्या भारतीय राज्यघटनेंत अतर्भूत झालेलीं असलीं, तरी या राज्यघटनेची निर्मिती करण्याचें सामर्थ्य भारतीय जनतेंत सत्याग्रही मार्गानेंच निर्माण झालेले आहे, हे कोणीहि विसरू शकत नाहीं. यामुळें आधुनिक भारतांत सत्याग्रहाचें क्रांतिकारक तत्त्वज्ञान सुप्रतिष्ठित झालेले असून त्या तत्त्वज्ञानाने साधिलेला लोकशाही व समाजवाद यांचा समन्वय येथील सत्याग्रह मान्य करणाऱ्या कोणत्याहि राजकीय पक्षास नाकारतां येत नाहीं अशा रीतीनें आधुनिक युरोपांत लोकशाही व समाजवाद या दोन सामाजिक तत्त्वज्ञानांत जो विरोध निर्माण झाला, तसा विरोध भारतात निर्माण न होतां त्यांचा समन्वय साधणारे व त्या ध्येयांना मूर्त स्वरूप देण्याची क्रांति घडवून आणणारें एक नवें जीवन-दर्शन उदयास येत आहे या सत्याग्रही जीवन-दर्शनाच्या आधारें भारतीय सस्कृतीचें पुनरुज्जीवन होऊन त्याच्या अगी आधुनिक मानवसस्कृतीचे नेतृत्व करण्याचें सामर्थ्य येत आहे.

## शुद्ध सत्याग्रही निष्ठा

सत्याग्रहनिष्ठेच्या आणि अहिसक क्रांतिशास्त्राच्या आधारावर आधुनिक भारतांत लोकशाही समाजवाद निर्माण होत आहे हें खरे असलं, तरी सत्याग्रही निष्ठेचें अंतिम साध्य केवळ लोकशाही समाजवाद हे नसून वर्गहीन समाज व दडहीन राज्य या नावानीं सूचित होणारे परमेश्वरी साम्राज्य, रामराज्य, अथवा आत्मराज्य हे त्या निष्ठेचें अतिम ध्येय आहे ज्यांनीं अव्यभिचारी सत्यनिष्ठा आणि निरपवाद अहिसा-वृत्ति यांची दीक्षा घेतली असेल, अशा शुद्ध सत्याग्रही लोकसेवकांनीं अनासक्त लोक-

सेवेच्या मार्गानें आत्मोद्धार व समाजोन्नति यांच्या प्राप्तीसाठीं सत्याग्रहाची साधना अखंड करीत राहिले पाहिजे. असे लोकसेवक राजकीय, सामाजिक व आर्थिक क्षेत्रांत त्या त्या वेळीं अवश्य असणाऱ्या क्रांत्या घडवून आणण्यास साहाय्य करीत असले तरी त्यानीं कोणत्याहि राजकीय पक्षांत सामील होतां कामा नये आणि कोणत्याहि राज्यसंस्थेत सत्ताधारी बनतां कामा नये सत्ता आणि संपत्ति यांच्या त्यागांतून व अनासक्त लोकसेवेतून जे आत्मबल निर्माण करिता येईल, त्या आत्म-बलाच्या आधारे त्यांनीं समाजात सर्वांगीण क्रांति घडवून आणण्याचें अहिंसक शास्त्र निर्माण केलें पाहिजे म गांधींनीं ही जी क्रांतिकारक सत्याग्रहनिष्ठा आधुनिक भारतांत निर्माण केली आहे, तिचे अध्वर्यु आज आचार्य विनोबा भावे हे बनलेले आहेत

सामाजिक क्रांतीचें कार्य सशस्त्र क्रांतीच्या साधनानें प्रस्थापित राज्ययंत्र उलथून पाडून नवे राज्ययंत्र उभारण्याच्या मार्गाने करूं लागलें असतां एकपक्षीय हुकूमशाही आणि तिच्या हातीं सर्वंकष राज्यसत्ता याच्या खोड्यात समाज अडकून पडतो, म्हणून लोकशाही पद्धतींत एक सत्ताधारी राजकीय पक्ष आणि त्याला विरोधी असा एक किंवा अधिक सत्ताकांक्षी राजकीय पक्ष असे नांदत असले म्हणजे कोणत्याहि पक्षाला अन्याय व जुलूम करतां येणार नाहीं आणि लोकाना ज्या पक्षाचा कारभार न्याय्य वाटेल त्याच्याच हातीं सत्ता जाऊन न्यायाचे राज्य सुरू होईल, अशी अपेक्षा असते. यासाठीं क्रांतिकालांतहि ही पक्षविशिष्ट लोकशाही पद्धति कायम टिकवावी आणि एकदां बहुमतानें निवडून आलेल्या सभासदांत ज्या पक्षाला बहुमत मिळेल, त्याच्या हातीं राज्यकारभार सोंपवून प्रजाजनांनीं त्यानी केलेले कायदे व राज्यकारभार निमूटपणें चालू द्यावा, हेच न्यायसंस्थापनेला अधिकात अधिक पोषक आहे, हा विचार पुढें आला पण सामाजिक न्यायसंशोधन आणि न्यायसंस्थापन या कार्यास ही पक्ष-विशिष्ट लोकशाहीची पद्धतिसुद्धां अपुरी पडते, आणि विशेषतः ज्या वेळीं समाजाच्या अंतःकरणांत खोल रुजलेले न्याय-अन्यायासंबंधींचे विचार बदलून घेण्याचा क्रांतिकाल प्राप्त होतो, त्या वेळीं ही लोकशाही निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या सत्तास्पर्धेच्या संघर्षांत मोडून पडते अथवा समाजावरील अन्याय वाढत जाऊन राज्ययंत्र डळमळीत बनून कोसळू लागते हा अनुभव लक्षात घेऊन लोकशाही राज्यपद्धतींतील न्याय-संशोधन आणि न्यायसंस्थापन यासंबंधींचा मंदपणा नष्ट होऊन त्या कार्याची प्रगति अधिक तीव्रतेने घडून यावी आणि न्यायसंस्थापनेसंबंधींचे क्रांतिकारक विचार जनते-मध्यें प्रसार पावून तिच्या अंगीं अनत्याचारी वृत्तीनें अन्यायाचा प्रत्यक्ष प्रतिकार करण्याचे सामर्थ्य यावें, म्हणूनच सत्याग्रहाचे क्रांतिशास्त्र पुढें आलेले आहे. जनतेच्या अंतःकरणातील ही अन्यायनिवारणाची, अहिंसक प्रतिकाराची आणि अनत्याचारी असहकाराची वृत्ति जागृत व प्रभावी होईल, त्या मानानें पक्षविशिष्ट लोकशाहींतील दोष नाहींसे होऊन निरनिराळ्या पक्षाच्या सत्तास्पर्धेतून निर्माण होणारा संघर्ष शांत तेची मर्यादा उल्लंघून जाणार नाहीं अर्थात् अशा संघर्षातून निर्माण होणारे एकपक्षीय

हुकूमशाहीचें संकटहि समाजावर ओढवणार नाहीं यासाठीं कोणत्याहि राजकीय पक्षांत सामील न होतां जनतेच्या अंतःकरणातील न्यायबुद्धि आणि अहिंसावृत्ति जागृत करून त्यांच्या आधारें सामाजिक क्रांतीचें कार्य घडवून आणूं पाहणारे सत्याग्रही लोकसेवक जितके अधिक प्रमाणांत या सामाजिक क्रांतीच्या कार्यांत भाग घेऊं लागतील, तितक्या प्रमाणांत ही सामाजिक क्रांति अहिंसक राहून लोकशाही पद्धतीनें ती घडून येत राहील. अशा रीतीने लोकशाही राज्य अधिक निर्दोष व कार्यक्षम बनून त्याच्यामार्फत वर्गहीन समाज व त्याची दंडहीन अवस्था या दिशेने समाजाची प्रगति होत राहील. या दृष्टीने विचार केल्यास आधुनिक भारतात निर्माण झालेलें सत्याग्रही तत्त्वज्ञान व सत्याग्रही क्रांतिशास्त्र हीं लोकशाही व समाजवाद यांत अंतर्भूत होणाऱ्या ध्येयाना आत्मसात् करून समाजाला आत्मराज्याची दिशा दाखवून देणारीं आहेत, हे लक्षांत येईल.

## १५

# भारतीय संस्कृतीचें अमृत तत्त्व

"There were the virtuous, the wise, the courageous, there were the statesmen, kings and emperors of India, but whom amongst all these classes did she look up to and choose to be the representative of men? They were the Rishies * — *Rabindranath Tagore.*

"This separation between the Buddhists and the Brahmans is the cause of the downfall of India That is why India is populated by 300,000,000 of beggars, and that is why India has been the slave of conquerors for the last 1,000 years Let us then join the wonderful intellect of Brahman with the heart, the noble soul, the wonderful humanising power of the Great Master" § — *Swami Vivekanand*

भरतखंड हे एक नवीनच राष्ट्र जगाच्या रंगभूमीवर आज प्रवेश करीत आहे (ब्रिटिश साम्राज्यातील एक जित राष्ट्र एवढाच आजपर्यंत त्याचा दर्जा होता. हा त्याचा दर्जा त्यास असह्य झाला व जगात एक स्वतंत्र राष्ट्र म्हणून आपण नादावे अशी आकांक्षा त्याच्या अंतःकरणात उद्भूत झाली या आकांक्षेच्या सफलतेसाठीच त्याने पहिले युरोपीय महायुद्ध संपल्यापासून इ स. १९४७ पर्यंत ब्रिटिश साम्राज्याशीं सत्याग्रह-संग्राम चालू ठेविला होता. या संग्रामाची समाप्ति हिंदुस्थानाने ज्या वेळीं स्वयनिर्णीत स्वातंत्र्यघटना प्राप्त करून घेतली, त्या वेळीं होऊ शकली स्वातंत्र्य-संस्थापनेच्या कार्यात भारत आज विजयी झाले आहे यापुढें भारतीय संस्कृतीचें स्वरूप कशा प्रकारचें होईल आणि या सत्याग्रहसाधनेनें स्वतंत्र झालेलें भरतखंड जगाला

* Sadhana, P. 14. ( *Indian edition.*)

§ Speeches and Writings, P 491, 3rd edition by G A Natesan and Co

कोणता संदेश देत राहील, या प्रश्नांचीं उत्तरे या अखेरच्या प्रकरणांत देण्याचें आम्हीं योजिलें आहे.)

या प्रश्नांचा विचार करण्यास प्रारंभ करिताना इंग्लंडांतील एक सामाजिक तत्त्ववेत्ते बर्ट्रांड रसेल यांचे पुढील विचार मार्गदर्शक होण्यासारखे आहेत. १९२४ सालीं विल्फ्रेड वेलॉक यांनीं "The Spiritual Basis of Democracy" (लोकसत्तेचे आध्यात्मिक अधिष्ठान) या नांवाचें एक पुस्तक लिहिलें आहे त्यास बर्ट्रांड रसेल यांनीं प्रस्तावना लिहून पाश्चात्य व पौरस्त्य संस्कृतींची तुलना केली आहे. अशी तुलना करून ते म्हणतात :

"पाश्चात्य शस्त्रविद्येनें आपणांवर विजय संपादन करू नये म्हणून जपाननें पाश्चात्य तत्त्वज्ञानास आपणांवर विजय संपादन करू दिला इतर पौरस्त्य राष्ट्रांनींहि हाच कित्ता गिरविल्यास युरोप खंडातील दुर्गुण सर्व जगभर पसरतील आणि कांहीं काळ सर्व मानवसंस्कृति रानटी अवस्थेंतून गेल्याखेरीज तिच्या उद्धाराची आशा राहणार नाहीं परंतु हा प्रतिकार जर लष्करी स्वरूपाचा न होतां आध्यात्मिक स्वरूपाचा होईल, तर युरोप खंड आपसांतील यादवीनें निस्त्राण झालें असतां, युरोपीय संस्कृतींत जो टिकाऊ भाग आहे, त्याचा ठेवा आशिया खंडास मिळेल; आणि गोऱ्या राष्ट्रांचें भवितव्य ज्यांच्या हातीं आहे, त्याच्यापेक्षां अधिक शांतताप्रिय आणि कमी भौतिक वृत्तीच्या लोकांच्या हातीं तो ठेवा जाण्याचा संभव आहे. तथापि हें कार्य केवळ पुराणप्रिय वृत्तीनें होणार नाहीं. पुराणपरंपरा कितीहि पूज्य असली, तरी ती चिरंतन करण्याचा प्रयत्न करून भागणार नाहीं भौतिक विद्या आणि यंत्रकला याच्यामुळे जगाचें स्वरूप पालटलेलें आहे आणि त्यांना आत्मसात् करून व त्यांच्यावर प्रभुत्व संपादून त्यांना कल्याणकारक स्वरूप दिलें पाहिजे, त्यांच्याकडे दुर्लक्ष करतां कामा नये दूरदृष्टीनें विचार केल्यास त्या गोष्टी अहितकारक न ठरता हितकारकच ठरतील कारण, मनुष्याला भौतिक सुखाच्या काळजींतून मुक्त करण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें आहे ज्या लोकसत्तेचें आध्यात्मिक अधिष्ठान शोधण्याचा प्रयत्न मि वेलॉक हे करीत आहेत, ती लोकसत्ता पाश्चात्य जगांतच निर्माण झालेली आहे नामधारी लोकसत्ताक राष्ट्रांत आणि त्यांच्या बाहेरहि अद्यापि तिचे स्वरूप फारच मर्यादित व फारच अपूर्ण आहे परंतु तिच्या पूर्वीच्या राज्यपद्धतींहून ती श्रेष्ठ आहे आणि तिचा अवलंब करणाऱ्यांच्या दुर्गुणांप्रीत्यर्थ तिचा नाश होऊं देता कामा नये, याबद्दल कोणत्याहि न्यायदृष्टीच्या मनुष्यास शंका घेतां येणार नाहीं ज्याप्रमाणें पौरस्त्य जगाच्या दृष्टिकोणांत चांगलें व वाईट हीं दोनहि आहेत, त्याचप्रमाणें पाश्चात्य दृष्टिकोणातहि चांगलें व वाईट आहे पाश्चात्य जग वाजवीपेक्षां अधिक उतावीळ आहे, तर पौरस्त्य जग कदाचित् आजपर्यंत वाजवीपेक्षां अधिक सहनशील राहिलेलें आहे कित्येक वेळा पाश्चात्यांची शक्ति जगाचा अधःपात करीत असेल (आज असेच होत आहे), तर निर्भेळ पौरस्त्य तत्त्वज्ञान मोठमोठ्या सुधारणा

क्वचितच घडवून आणू शकेल. पाश्चात्य व पौरस्त्य याचा संयोग होईल, तरच नवीं ध्येयें जन्मास येतील कोणत्याहि एका संस्कृतीच्या आत्मस्तुतींतून त्यांचा जन्म होणार नाहीं. (पाश्चात्यांचें सामर्थ्य पौरस्त्यांच्या ध्येयासाठीं उपयोगी पडले पाहिजे. पौरस्त्यांची आध्यात्मिकता पाश्चात्यांच्या भौतिक साधनाच्या साहाय्यानें जीवनोपयोगी बनली पाहिजे. आजच्या जगाचें रक्षण कोणत्याहि जुन्या उपायानीं होणार नाहीं आजचीं संकटे नवीं आहेत, आणि त्याचें निवारण करणारे तत्त्वज्ञानहि नवे असलें पाहिजे") (P viii–x)

## भारतीय व युरोपीय संस्कृति

आता आपण भारतीय संस्कृति आणि युरोपीय सस्कृति या दोहोची तुलना करून युरोपीय संस्कृतींत भारतीयांना घेण्यासारखे काय आहे अथवा युरोपीय सस्कृतीचा विनाश झाला, तरी तिच्यामध्यें चिरतन होण्यासारखी कोणतीं तत्त्वे आहेत, त्याचा विचार करू युरोपीय सस्कृति आणि भारतीय सस्कृति याची तुलना करिताना प्रायः आधुनिक युरोपीय सस्कृतीची मध्ययुगीन भारतीय सस्कृतीशीं—म्हणजे ब्रिटिश साम्राज्यात हिंदुस्थान जाण्यापूर्वीच्या हिंदी सस्कृतीशी—तुलना करण्यात येत असते. बर्ट्रांड रसेल यांनीं वरील उताऱ्यांत भौतिक विद्या, यत्रकला, लोकसत्ता आणि कर्मशक्ति हीं युरोपीय सस्कृतीचीं लक्षणें म्हणून वर्णिलीं आहेत आणि युरोपीय सस्कृति आपल्या सामर्थ्याचा दुरुपयोग करून जगाला पीडा देत असली, किंबहुना आपल्या विनाशासहि प्रवृत्त होत असली, तर पौरस्त्य सस्कृति सामर्थ्यहीनच राहिली असून तिच्या अगीं आपल्या दास्याचें निवारण करण्याचीहि शक्ति उरलेली नाही, किंबहुना ती आपल्यावरील जुलूम शतकेंच्या शतकें निमूटपणे सहन करीत आहे, असे सुचविले आहे पौरस्त्य सस्कृतीची सहनशीलता, अकर्मण्यता, कोणासहि स्पृहणीय वाटणार नाहीं. त्याचप्रमाणे युरोपीय सस्कृतीच्या आक्रमणाचें निवारण करण्यासाठी जपानने तिचाच सर्वस्वीं अगीकार केला, भांडवलशाहीची स्थापना केली, सरजामशाहीचा अत करून स्थापन केलेल्या लोकशाहीला धनिकशाहीचे विकृत स्वरूप दिले आणि राष्ट्रवादास साम्राज्यशाहीची दीक्षा देऊन आशिया खडास पादाक्रांत करण्याची राक्षसी महत्त्वाकाक्षा धारण केली, हेहि स्पृहणीय आहे असें कोणास म्हणतां येणार नाहीं. आशियांतील पूर्वेकडील जपानपासून पश्चिमेकडील तुर्कस्थानपर्यंत सर्व राष्ट्रापुढे युरोपीय साम्राज्यशाहीचे व भाडवलशाहीचें आक्रमण कसे निवारण करावें, हाच एक अत्यत महत्त्वाचा प्रश्न आतापर्यंत उभा राहिला होता. हिंदुस्थान वगळिल्यास इतर बहुतेक देशांत या आक्रमणाचा प्रतिकार करण्यास युरोपीय संस्कृतीचा अवलब करणे हाच एक मार्ग आहे, अशी भावना रशियांतील राज्यक्राति होईपर्यंत पसरलेली होती. त्यानतरच्या काळांत आशियांतील देशात रशियन राज्यक्रातीचें अनुकरण करणारा एक कम्युनिस्ट पक्ष निर्माण झाला. थोड्याच काळांत तुर्कस्तानपासून चीनपर्यंत व

पक्षाचें जाळें पसरले आणि युरोपीय साम्राज्यशाहीच्या कचाटींतून मुक्त होण्यास बोल्शेविकांशीं सहकार्य करणे हाच एक परिणामकारक मार्ग आहे, असे आशियातील स्वतंत्र देशांतील राष्ट्रीय पुढाऱ्याना वाटू लागलें याच वेळीं चीनमधील राष्ट्रीय पुढारी डॉ सन्यत्सेन यांनीं बोल्शेविक पक्ष आणि चिनी राष्ट्रीय पक्ष याचे सहकार्य घडवून आणून चीनला युरोपीय साम्राज्यशाहीच्या कचाटीतून मुक्त करण्याचा प्रयत्न करण्याचें धोरण आपल्या राष्ट्रास लावून दिलें आशियांतील दुर्बल राष्ट्रवाद आणि बोल्शेविक क्रातिशास्त्र याचा हा सयोग काहीं काळ टिकला, पण थोड्याच वेळात त्यांची फारकत झाली आणि बोल्शेविक क्रांतिशास्त्राचाहि आपणास जशाचा तसा अवलब करितां येत नाहीं अथवा आपण तसें करू नये, ही वृत्ति आशियातील निरनिराळया देशातील राष्ट्रीय पक्षांत फैलावली तिकडे बोल्शेविकानीं जगत्क्राति करण्याचे आपलें ध्येय काही काळ बाजूस ठेवून, आपल्या राष्ट्राची सघटना करण्याचें धोरण स्वीकारिले. आज पुनः चीन आपल्या देशात कम्युनिस्ट राज्यक्राति यशस्वी करून बोल्शेविक रशियाचा दोस्त बनला आहे रशिया आपले बोल्शेविक क्रातीचें जाळे सर्व आशियात व युरोपांत पसरविण्याचा प्रयत्न करीत आहे

## भारताचा आत्मविश्वास

या काळात हिंदुस्थानातहि एक कम्युनिस्ट पक्ष निर्माण झालेला आहे तसेच महात्मा गांधीच्या नेतृत्वाखालीं एक निःशस्त्र क्रांतिशास्त्र व सत्याग्रही सस्कृतिशास्त्र जन्मास आले असून या सत्याग्रही तत्त्वज्ञानानेच आधुनिक भारताच्या अतःकरणात आपण भावी कालात मानवसस्कृतीच्या इतिहासात एक नवी भर घालणार आहोत, असा आत्मविश्वास निर्माण केलेला आहे हा आत्मविश्वास खरा आहे किंवा खोटा आहे, याचा निर्णय केवळ भविष्यकाळच करू शकेल तथापि, या सत्याग्रही तत्त्वज्ञानातून निर्माण होणारी मानवी सस्कृति म्हणजे काय, तिला युरोपीय सस्कृतीपासून घेण्याजोग्या कोणत्या गोष्टी आहेत, कम्युनिस्ट क्रांतिशास्त्र व समाजवादी सस्कृति यांपासून तिला काहीं बोध घेता येईल काय, आणि सत्याग्रही सग्रामांतून जन्मास येणाऱ्या नव्या भारतीय सस्कृतीचे स्वरूप कसे असेल, व स्वतंत्र भारतापुढे उभ्या असलेल्या प्रश्नांचीं उत्तरे तो कशा प्रकारची देईल, यांचा सक्षिप्त विचार या प्रकरणांत करावयाचा आहे. आपणापाशी मानवसस्कृतींत भर घालण्यासारखी अशी काही बहुमोल तत्त्वें आहेत व त्यामुळें आपणांकडे कांही काळ जगाचेंहि नेतृत्व येऊं शकेल, अशा प्रकारचा जो एक सास्कृतिक अभिमान आधुनिक भारतांत निर्माण झाला आहे, तो अपूर्व आहे ज्या एका महात्म्याच्या रूपानें तो आज जगाच्या दृष्टीस पडत आहे तो महात्माहि एक अलौकिक विभूति आहे. हा अपूर्व अभिमान आणि महात्मा गाधीचें अलौकिक विभूतिमत्त्व या दोन्हीहि गोष्टी केवळ भ्रामक आहेत अथवा ही एक भ्रातिरूप माया आहे, असे मानणारे लोक पुष्कळ आहेत. तथापि, ही

भ्रांतिरूप मायाहि जगांतील एक प्रचंड शक्ति आहे एवढी मान्यता तसे म्हणणारांसहि द्यावी लागते. महात्मा गांधींच्या सत्याग्रही तत्त्वज्ञानांतून अखेरीस हिटलरशाही किंवा फॅसिझम् यांहून दुसरे कांहींच जन्मास येणार नाहीं हें मत कसे खोटें आहे, ते मागील प्रकरणी सविस्तर दाखवून दिले या प्रकरणात त्यांतून निर्माण होणाऱ्या भावी संस्कृतीचें स्वरूप भावरूपाने दिग्दर्शित करावयाचे आहे.

आधुनिक युरोपीय संस्कृतीचें मूल्यमापन करितांना श्रेष्ठ मानवसंस्कृति म्हणजे काय, याचा विचार प्रथम केला पाहिजे भारतीय संस्कृतीप्रमाणे युरोपीय संस्कृतीचीहि परंपरा मोठी आहे. इतकेंच नाहीं, तर आधुनिक युरोपीय संस्कृतीनें हिंदुस्थानास परतंत्र केलें होते व त्याच्या सर्वस्वाचा अपहार केलेला होता अशा परिस्थितींतहि आपली संस्कृति श्रेष्ठ आहे हा अभिमान भरतखंडात निर्माण झालेला आहे. तेव्हां मानवसंस्कृतीच्या श्रेष्ठत्वासंबधीं भारतीयांचें मत अथवा भारतीयांचा आदर्श कोणता आहे, ते प्रथम विशद केले पाहिजे. या प्रकरणाच्या शिरोभागीं दोन इंग्रजी अवतरणें दिलेलीं आहेत. पहिले अवतरण कविश्रेष्ठ रवीन्द्रनाथ टागोर यांचें असून त्यांत भारतीयांनीं आपणांपुढे मानण्याचा कोणता आदर्श ठेविला होता, त्याचें त्यांनीं वर्णन केले आहे. त्यांत ते म्हणतात: 'प्राचीन भारतांत सद्गुणी, शहाणे, धीट असे पुरुष होऊन गेले. तसेंच मुत्सद्दी, राजे आणि सम्राटहि होऊन गेले परंतु या सर्वांपैकीं कोणत्या वर्गाकडे मानण्याचा आदर्श म्हणून लोक पहात होते? तो आदर्श म्हणजे येथील ऋषिवर्ग होय' हे ऋषित्व, ब्रह्मतेज, आत्मबल अथवा साधुत्व हा भारतीय संस्कृतीनें आपणांपुढे ठेविलेला मानण्याचा आदर्श आहे भारतीय संस्कृति जगाला जर काहीं शिकविणार असेल, तर हे साधुत्वच होय. भरतखंडांत फार प्राचीन काळापासून एक ऋषिवर्ग अस्तित्वात आलेला आहे आणि या ऋषिवर्गाच्या नेतृत्वाची आवश्यकता त्यास अद्यापीहि वाटत आहे महात्मा गांधींना आज भरतखंडांत जर कांहीं मान मिळत असेल, तर त्यांना भरतखंडाच्या अंतःकरणांत प्राचीन कालापासून रुजलेला ऋषिवर्गासंबंधींचा हा आदर पुनः जागृत केला आणि भरतखंडांतील प्राचीन ब्रह्मतेज अथवा आत्मबल पुनः संघटित करून त्यांतच सामान्य जनतेच्या सर्वांगीण स्वातंत्र्याचे अमोघ साधन आहे, असा विश्वास पुनः जागृत केला, यामुळेंच तो मिळत आहे हें साधुत्व म्हणजे काय आणि त्या दृष्टीने मानवसंस्कृतीचे मूल्यमापन कसे करावें, याचा विचार पुढील सुभाषिताच्या आधारे आपणास करितां येईल. ते सुभाषित असें:

**विद्या विवादाय धनं मदाय। शक्तिः परेषां परिपीडनाय।**
**खलस्य साधोर्विपरीतमेतद्। ज्ञानाय दानाय च रक्षणाय॥**

या सुभाषितांत खल आणि साधु, दुर्जन आणि सज्जन यांच्यांतील भेद फार उत्कृष्ट प्रकारें विशद केला असून त्याच्याच आधारे मानवसंस्कृतीचें हीन स्वरूप आणि श्रेष्ठ स्वरूप यांतील भेदहि आपणांस समजून येऊ शकेल विद्या, धन आणि

शक्ति यांची आवश्यकता मनुष्याला आहे व त्यांची वृद्धि करणें हें प्रत्येक मनुष्य-समाजाचें कर्तव्य आहे. पण या विद्येचा, धनाचा आणि शक्तीचा उपयोग कोणता मनुष्य कशा प्रकारें करितो, हें पाहूनच त्या मनुष्याची संस्कृति श्रेष्ठ आहे किंवा कनिष्ठ आहे, याचा निर्णय द्यावा लागतो. केवळ विद्येची, धनाची व शक्तीची वृद्धि केल्यानें मानवसंस्कृतीची प्रगति होऊ शकत नाहीं. तर या विद्येचा, धनाचा व शक्तीचा उपयोग कसा व कोणत्या कामीं होत आहे, हें पाहूनच एकाद्या समाजाची संस्कृति वाढत आहे किंवा ती विनाश पावत आहे, याचा निर्णय करावा लागतो एकादा मनुष्य विद्वान् असेल, सधन असेल, व सशक्तहि असेल, पण तो जर आपल्या विद्वत्तेचा उपयोग सत्यसंशोधनासाठीं न करितां केवळ विवादासाठीं करीत असेल, आपल्या धनाचा उपयोग दानासाठीं न करितां उन्मत्त होण्यासाठीं करीत असेल, आणि आपल्या शक्तीचा उपयोग रक्षणासाठीं न करिता परपीडेसाठीं करीत असेल, तर अशा मनुष्यास तो कितीहि विद्वान् असला, धनवान् असला, अथवा बलवान् असला, तरी साधूच्या कोटींत न घालतां खलाच्या कोटींत घालावें लागेल हाच न्याय मानव-समाजासहि लागू आहे आजची युरोपीय संस्कृति विद्या, धन आणि शक्ति या तीनहि गुणानीं मंडित झालेली आहे पण या गुणांचा ती दुरुपयोग करीत असल्या-मुळे त्या गुणाना दुर्गुणाचे स्वरूप प्राप्त झालेले आहे व या गुणांनीं ती संस्कृति मंडित आहे असे म्हणण्यापेक्षा ती वरील दुर्गुणानीं कलंकित झालेली आहे, असेच म्हणणें प्राप्त आहे याचे कारण त्याच्या विद्येला, धनाला, शक्तीला अध्यात्माचें अधिष्ठान नाहीं हेच होय, असे भारतीय संस्कृतीच्या अभिमान्याचे म्हणणे आहे आधुनिक युरोपीय संस्कृतीला हे हीन स्वरूप का, कसे, व केव्हा प्राप्त झालें, याचा विचार आता करू

## आधुनिक युरोपीय संस्कृति

पधराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास मुसलमान लोकांनीं कॉन्स्टँटिनोपल शहर घेतले, नंतर तेथील प्राचीन विद्येचे युरोपीय पंडित पश्चिम युरोपांत पसरले आणि इस्लामी संस्कृतीचा संघर्ष व प्राचीन ग्रीक विद्येचे पुनरुज्जीवन या दोहोंतून युरोपीय विद्येला व व्यापाराला जी चालना मिळाली, तींतून आधुनिक युरोपचा जन्म झाला. यापूर्वी कांहीं काळ युरोपीय संस्कृति मध्ययुगीन धर्माधिकाऱ्याच्या वर्चस्वाखाली होती. या धर्माधिकाऱ्यांची विद्या ही या वेळीं अगदीं मृतावस्थेस पोहोचूं लागली होती. विद्या ही ज्ञानप्राप्तीसाठीं आहे आणि ज्ञानप्राप्ति अनुभवातून होत असते, या सिद्धांताकडे दुर्लक्ष करून हे खिस्ती धर्मशास्त्री व पंडित केवळ ग्रंथ-प्रामाण्याच्या आधारावर विद्येचा उपयोग शुष्क वादविवादाच्या कामीं करू लागले होते. धर्मज्ञान, आत्मज्ञान व भौतिक ज्ञान यांपैकीं कोणालाहि अनुभवाचा आधार हवा व त्यांतील सिद्धांत नव्या अनुभवाच्या कसोटीस उतरत नसतील, तर त्यांत

सुधारणा झाली पाहिजे; आणि ही सुधारणा करण्याचा हक्क व अधिकार प्रत्येक पिढीतील लोकांना आहे हे मानवी प्रगतीस आधारभूत असलेलें तत्त्व मान्य करण्यास व तदनुसार समाजांतील बदलत्या व्यवहारांचा विचार करून नव्या परिस्थितीस अनुरूप अशीं नवीं समाजबंधनें निर्माण करून अथवा जुनीं समाजबधनें सुधारून नवी समाजधारणा करण्याचें कार्य करण्यास ते तयार नव्हते तसें करावयाचें, तर त्यांनीं ग्रथप्रामाण्यावरून बुद्धिप्रामाण्यावर व अनुभवप्रामाण्यावर यावयास हवे होतें. हे कार्य करण्यास तो वर्ग नालायक ठरल्यानतर व जुनीं धर्मबधने अथवा धर्मविचार नव्या परिस्थितींत टिकणें किंवा बुद्धीला पटणें अशक्य आहे, असें विचारी लोकाना वाटू लागल्यानतर ख्रिस्ती धर्माधिकारी आणि रोमन कॅथॉलिक धर्मसस्था यांच्या-विरुद्ध आधुनिक युरोपने बड पुकारिले. प्रथमतः या बंडाचा फायदा युरोपांतील राजे-लोकानीं आपल्यावरील पोपचीं धर्मबंधनें व सत्ता झुगारून देण्याच्या कामीं केला पोपची सत्ता झुगारून दिल्यानतर धर्मसस्थेचें आधिपत्य आपणाकडेच यावें, असा या राजेलोकांनीं प्रयत्न केला इग्लंडांत आठव्या हेन्रीने अशा प्रकारची धर्मक्राति केली या धर्मक्रांतीमुळें राजेलोक मध्ययुगीन काळापेक्षा अधिकच अनियंत्रित व बेबंद बनले. यापूर्वीच इग्लडातील सरदारवर्ग नामशेष झाला होता आणि आता धर्माधिकारीवर्ग राजेलोकाच्या दास्यांत आला. पोपचे बाह्य बंधनहि आतां नाहींसे झाले अशा प्रकारे आतरबाह्य अनिर्बंध व अनियत्रित बनलेल्या राजांना आपली आज्ञा हीच परमेश्वराची आज्ञा असे वाटू लागून ' ना विष्णुः पृथिवीपतिः ' या तत्त्वानुसार ते स्वतःस परमेश्वराचे ऐहिक प्रतिनिधीच समजू लागले अशा अनिर्बंध आणि अ-नियत्रित राजाना बधन व नियत्रण घालण्याचे कार्य युरोपांतील व्यापारीवर्गाने केले. याच व्यापारीवर्गात केल्व्हिनचा प्यूरिटनपथ निर्माण झाला आणि त्याच्याच नेतृत्वा-खालीं आधुनिक युरोपांत बुद्धिवाद, व्यक्तिवाद, लोकसत्ता आणि राष्ट्रवाद हीं सामा-जिक ध्येये निर्माण झालीं ज्या मध्यम व्यापारीवर्गात या ध्येयाचा उदय झाला, त्या व्यापारीवर्गाचा वर्गस्वार्थ या ध्येयांशीं समिश्र झाला, आणि जेव्हां या ध्येयांचें शुद्ध स्वरूप व धनिकवर्गाचा स्वार्थ यांच्यांत विरोध उत्पन्न झाला, तेव्हां त्या ध्येयांना विकृत स्वरूप प्राप्त झालें आजची युरोपीय सस्कृति म्हणजे वरील ध्येयांना धनिक-वर्गानें जें विकृत स्वरूप दिले, त्यातून निर्माण झालेली विकृतीच होय ही विकृति बुद्धिस्वातत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, लोकसत्ता व राष्ट्रवाद या ध्येयाना आज कसें विकृत स्वरूप देत आहे, तें पाहिलें असता युरोपीय सस्कृतीचा विनाश आज कां होत आहे, याचा बरोबर उलगडा होतो

## बुद्धिस्वातंत्र्य व सत्यनिष्ठ बुद्धि

प्रथमतः बुद्धिस्वातत्र्याचा विचार करू. प्रत्येक मनुष्याला बुद्धिस्वातत्र्य उप-भोगतां यावें आणि म्हणून त्यानें कोणत्याहि ग्रंथाचें अथवा धर्मगुरूचें दास्य

स्वीकारूं नये हें म्हणणें, आणि सत्याचें ज्ञान होणें, नवीन सत्याचा शोध लाविणें, या कामीं सर्वांच्याच बुद्धीला सारखेंच सामर्थ्य असतें असें मानणें, यात फार अतर आहे. कोणत्याहि मनुष्याची बुद्धि बाह्य दास्यातून मुक्त झाली म्हणजे ती पूर्णपणें स्वतंत्र होते अथवा तिच्या अंगीं सत्यसशोधनाची शक्ति येते, हें खरे नाहीं. ती शक्ति येण्यापूर्वी ती बुद्धि अंतःकरणातील व्यक्ताव्यक्त वासना व विकार याच्या दास्यातून मुक्त झाली पाहिजे. मनुष्याच्या बुद्धीवर ज्या प्रकारचे सस्कार झालेले असतील त्या सस्कारांवर आणि त्या संस्कारांच्या योगानें तिच्या अंगीं जें सामर्थ्य निर्माण होतें त्या सामर्थ्यावर, तिला अखेरीस त्या संस्कारांच्या बधनातूनहि मुक्त व्हावे लागतें. बुद्धीच्या साहाय्याने मनुष्य बाह्य जगाचें व आपल्या अंतरंगाचें ज्ञान करून घेऊ शकतो ; आणि तिच्याच साह्यानें तो बाह्य सृष्टीवर व अतःसृष्टीवर प्रभुत्वहि प्राप्त करून घेतो हें प्रभुत्व प्राप्त करून तें आतरबाह्य सृष्टीवर प्रस्थापित करण्यास त्याला बुद्धीची एकाग्रता, धृति, अनासक्ति, निर्विकारता वगैरे अनेक गुण सपादन करावे लागतात. विशेषतः बुद्धीच्या अंगीं नवीन सत्याचे आकलन करून नवी ध्येयसृष्टि निर्माण करण्याचे सामर्थ्य आल्याखेरीज, स्वतःची व आपल्या समाजाची प्रगति करण्याचे सामर्थ्य मनुष्यापाशीं येऊ शकत नाहीं अशी नवी ध्येयसृष्टि निर्माण करणारी बुद्धि हीच खरी स्वतत्र बुद्धि होय व तिलाच प्रतिभा असें म्हणतात सामान्य बुद्धि ही बाह्य परिस्थितीच्या अधीन असते, व ती या परिस्थितीचें ज्ञान करून घेऊन तिच्याखालीं जास्तींत जास्त सुखानें कसें नादावें, एवढेंच दाखवून देऊं शकते अशी सामान्य बुद्धि ही वैयक्तिक, वर्गीय, राष्ट्रीय वगैरे अनेक संकुचित स्वार्थांच्या आणि परपरागत विचारांच्या व सस्कारांच्या अधीन झालेली असते. या सस्कारांच्या, दुर्वासनांच्या व दुर्विकारांच्या चष्म्यांतून ती बाह्य सृष्टीकडे व सामाजिक व्यवहारांकडे पहात असते. किंबहुना, अशा सस्कारवश, वासनावश व विकारवश बुद्धीनें एक विकृत सृष्टीच निर्माण केलेली असते ही विकृत सृष्टि हीच एक मानवी बुद्धीला भ्रष्ट व बद्ध करणारी माया आहे या मायेंतून ती मुक्त झाल्याखेरीज तिला सत्य-सृष्टीचे ज्ञान होऊन नवीन ध्येये निर्माण करण्याचेहि सामर्थ्य तिच्या अंगीं येऊ शकत नाहीं. मात्र हें सामर्थ्य प्रत्येक मनुष्यास प्रयत्नाअतीं प्राप्त करून घेतां येईल असा अद्वैत वेदांताचा आध्यात्मिक सिद्धात आहे. मनुष्याचें मन, बुद्धि व आत्मा यांचें एक व्यक्त व एक अव्यक्त स्वरूप असून या अव्यक्त व व्यक्त स्वरूपांतील अशुद्ध अश नष्ट झाल्याखेरीज त्याची बुद्धि खरें आत्मस्वरूप व जगत्स्वरूप आकलन करण्यास पात्र होत नाहीं. मानवी उन्नतीस मनुष्याच्या बुद्धीनें बाह्य विश्वावर प्रभुत्व प्रस्थापित करावे हें जितके अवश्य आहे, तितकेंच तिनें आपल्या अतःसृष्टीवर, म्हण-जेच मनांतील व्यक्ताव्यक्त वासनांवर व विकारांवर प्रभुत्व प्रस्थापित करावें हें अवश्य आहे. भौतिक विद्येचें क्षेत्र पहिले असून दुसरें क्षेत्र आत्मिक विद्येचें आहे. भौतिक विद्या व तिचे सिद्धांत हे जसे अनुभवगम्य व अनुभवसिद्ध असावयास हवेत,

तसेच आत्मिक विद्येचे सिद्धांतहि अनुभवगम्य व अनुभवसिद्ध असावयास हवेत. भौतिक विद्या ही जशी वाढती व जिवत असली पाहिजे, तशीच आत्मिक विद्याहि वाढती व जिवत असली पाहिजे. या दोनहि विद्यांची वाढ करण्याचें सामर्थ्य मानवी बुद्धीत आहे; मात्र ते तिच्या शुद्ध व स्वतंत्र स्वरूपांत आहे, अशुद्ध व परतत्र स्वरूपांत नाहीं. तत्त्वतः पाहिल्यास प्रत्येक मनुष्यास हे बुद्धीचे शुद्ध व स्वतंत्र स्वरूप प्राप्त करून घेतां येईल आणि तो तिच्या साहाय्याने आंतरबाह्य विश्वावर स्वामित्व–अर्थात् विश्व-नियमानीं मर्यादित स्वामित्व–उपभोगू शकेल, असा अद्वैत वेदांताचा सिद्धांत आहे व्यवहारतः समाजांतील सामान्य लोकांची अशुद्ध व परतंत्र बुद्धि आणि त्याच्या असामान्य नेत्यांची शुद्ध व स्वतत्र बुद्धि असा भेद करावा लागतो याच व्यवहारदृष्टीने सामान्य बुद्धीला नुसती प्रज्ञा, आणि नवी सत्ये आकलन करून नवी ध्येयसृष्टि निर्माण करणाऱ्या शुद्ध व स्वतत्र बुद्धीला प्रतिभा असे म्हणतात. लुड्विग् फ्यूरबॅक (Ludwig Feurbach ) याच्यावरील आपल्या पुस्तकात एंजल्स याने असाच भेद मार्क्स् व आपल्यासारखे त्याचे अनुयायी, यांच्या बुद्धींत असल्याचे लिहिलें आहे: "एकाद्या उच्च भूमीवर उभा असलेला मनुष्य जसा अधिक दूरच्या व अधिक व्यापक क्षेत्रातील वस्तू चटकन् आकलन करूं शकतो, तशीच आमच्याशीं तुलना करता मार्क्स्ची स्थिति होती मार्क्स् हा प्रतिभावान् होता व आम्ही सर्व फार तर बुद्धिमान् होतो म्हणून मार्क्स्नें जें साध्य केले तें माझ्या हातून झालें नसते." प्रतिभासम्पन्न असामान्य नेत्याची शुद्ध व स्वतत्र बुद्धि आणि सामान्य मनुष्याची अशुद्ध व परतत्र बुद्धि, यातील तात्त्विक व व्यावहारिक भेद लक्षात न घेता समाजाची उभारणी करणे अथवा त्यात क्रांति घडवून आणून त्याचे आमूलाग्र परिवर्तन करणे, या गोष्टी अशक्य आहेत बुद्धिस्वातंत्र्याच्या सिद्धांताशी हा भेद विरोधी नाहीं अथवा सामाजिक व्यवहारात नेतृत्व व अनुयायित्व निर्माण करून विशिष्ट मर्यादेत स्वतंत्र बुद्धीच्या नेत्याची शिस्त पाळणे, यांतहि बुद्धि-स्वातत्र्याशी विसंगत असे काहीं नाहीं तसेच दुर्वासना आणि दुर्विकार याच्यापासून मुक्त झाल्याखेरीज मनुष्याची बुद्धि शुद्ध व स्वतत्र बनू शकत नाहीं आणि असे शुद्ध बुद्धीचे प्रतिभावान् नेते लाभल्याखेरीज मनुष्यसमाजाची उन्नति होत नाहीं, अथवा सर्वांगीण क्रातीसारख्या महत्कार्याची सिद्धि होत नाही, हें मान्य करणें यांतहि बुद्धिस्वातंत्र्याच्या विरुद्ध असें काहीं नाहीं त्याचप्रमाणे समाजाच्या उन्नतिप्रीत्यर्थ व त्यात अवश्य असणारीं परिवर्तनें कमीत कमी क्लेशाने घडवून आणण्यासाठीं सामान्य लोकांची बुद्धि शक्य तितकी शुद्ध व स्वतत्र ठेविण्याचा प्रयत्न करणे, हे लोकनायकाचे कर्तव्य असून सामान्य लोकानीहि शक्य तितकी अतःशुद्धि करण्याचा प्रयत्न करीत राहणे हे त्याचेंहि कर्तव्य आहे, असे यावरून सिद्ध होते बुद्धिस्वातत्र्याच्या सिद्धांताचें हे

* "What Marx accomplished I would not have achieved Marx stood higher, saw farther and took a wider and quicker view than all the rest of us Marx was genius, we others were at best talented" ( Ludwig Feurbach by Frederick Engels, P 52—53 foot noted Martin Lawrence Publication )

शुद्ध आणि श्रेष्ठ स्वरूप आधुनिक युरोपनें ओळखिलें नाहीं आणि आपलें नेतृत्व शुद्ध बुद्धीच्या अथवा प्रतिभावान् निःस्वार्थी लोकनायकांच्या हातीं न देतां वर्ग-स्वार्थानें ज्याची बुद्धि मलिन झाली आहे व ज्यानीं आपल्या बुद्धीचा विनियोग नित्य स्वार्थसंपादनासाठींच चालविलेला आहे अशा धनिकवर्गाकडे ते नेतृत्व दिलें, हें आधुनिक युरोपच्या आजच्या आपत्तीचें एक प्रमुख कारण आहे. तसेंच आधुनिक युरोपातील विद्या व कला या सर्वस्वी धनिकवर्गाच्या दासी बनलेल्या असून सामान्य जनतेची सांपत्तिक व सांस्कृतिक उन्नति करणें हेच सर्व विद्याचे, कलाचें खरें ध्येय आहे असें मानणारा, तदनुसार आचरण करणारा, आणि आपल्या आत्मबलानें लोकांतील आत्मबल जागृत व संघटित करून समाजांत अवश्य असणारी क्रांति समाजाच्या सद-सद्विवेकबुद्धीस पटवून आत्मबलानें ती घडवून आणणारा वर्गहि आज युरोप खंडांत दिसत नाहीं. आधुनिक युरोपची आज आत्मबलावर श्रद्धाच उरलेली नाहीं आणि आपणास अभिप्रेत असणारी सर्वांगीण समाजक्रांति शस्त्रबलानें घडवून आणण्याचेंहि सामर्थ्य युरोपांतील रशियाखेरीज कोणत्याहि देशानें अद्यापि तरी व्यक्त केलेलें नाहीं

## क्रांतिकारक ध्येयांचें दर्शन

समाजरचनेसंबंधींचीं नवीं तत्त्वें अथवा समाजांत न्यायप्रस्थापना करण्याचीं नवीं सत्यें मानवबुद्धीस कशीं व केव्हां आकलन होतात, आणि त्या सत्यांच्या प्रस्थापनेसाठीं अवश्य असणाऱ्या क्रांत्या कशा घडून येतात, यांसबंधींचें येथें थोडें अधिक विवेचन करणे अवश्य आहे जगत् ही एक नित्य पालटणारी वस्तु आहे जगांतील कोणतीहि वस्तु स्थिर अथवा अक्षर नाहीं, म्हणूनच जगत् म्हणजे गतिमान् हे नांव त्यास दिलेले आहे जगातील मानवी समाज आणि त्याच्या अवस्था यातहि कळत अगर नकळत एकसारखे अंतर पडत असते. त्यात चिरंतन अथवा सनातन असे कांहीं नाहीं. जगाचें अथवा समाजाचे स्वरूप जसे पालटणारें आहे, तसेंच त्या जगाचें व समाजाचे अवलोकन व निरीक्षण करून त्याचीं परिवर्तनें आपणास अनुकूल कशीं होतील अथवा आपणांस अनुकूल अशीं परिवर्तनें त्यांत कशीं घडून येतील, याचा शोध करणाऱ्या मानवी बुद्धीचें ज्ञानहि एकसारखें वाढणारें आहे. समाजाच्या एका अवस्थेंत न्यायप्रस्थापनेस जीं तत्त्वें उपयुक्त ठरलीं, तींच तत्त्वे समाजाच्या दुसऱ्या अवस्थेत अनुपयुक्त, किंबहुना विघातक ठरत असतात समाजाची जीवन-यात्रा ज्या तत्त्वानुसार चाललेली असते त्या तत्त्वानुसार ती यापुढें चालूं शकत नाहीं, असा अनुभव ज्या बुद्धीला येतो, तिला प्रस्थापित सामाजिक अवस्थेचे अपूर्णत्व व सदोषत्व पटूं लागते मानवी बुद्धींत तिला दिसणाऱ्या दृश्य विश्वाचें व दृश्य सामा-जिक परिस्थितीचें प्रतिबिंब पडत असतें. या प्रतिबिंबाकडे पाहून जेव्हां मनुष्याचें असमाधान होते, तेव्हां आपल्या समाजाच्या प्राचीन अवस्थेचें चित्र तो आपल्या बुद्धीनें पाहूं लागतो; अथवा त्यांतहि त्यास समाधान न वाटलें तर आपल्या सम-

कालीन अशा इतर समाजाच्या सद्यःस्थितीचीं चित्रें तो आपल्या बुद्धिनेत्रानें अवलोकन करू लागतो उदाहरणार्थ, विसाव्या किंवा एकोणिसाव्या शतकांतील परतंत्र भारतीय आपल्या राजकीय पारतंत्र्याचें आणि आर्थिक दारिद्र्याचे दृश्य पाहून असंतुष्ट झाला, म्हणजे त्याची बुद्धि आपल्या प्राचीन स्वराज्याकडे वळत असे. तो पुण्यांत असला तर त्याला पूर्वीचें मराठी साम्राज्य आठवत असे व दिल्लींत असला तर त्याच्या बुद्धीस मोगल बादशाहीचीं चित्रे दिसूं लागत. हीं दोनहि चित्रें पाहून तीं पुनः अवतीर्ण होणें अशक्य आहे अथवा तीहि अपूर्ण, सदोष अथवा त्याज्य आहेत असे त्याच्या बुद्धीला पटले, म्हणजे तो इतर स्वतंत्र राष्ट्रांतील स्वराज्यचित्रे आपल्या बुद्धीने निरीक्षण करू लागे कोणाला युरोपांतील लोकशाहीचे स्वराज्यचित्र प्रिय होई, तर कोणाला रशियांतील समाजसत्ताक हुकूमशाहीचें चित्र अधिक प्रिय होई पण गतकालीन व सद्यःकालीन सर्व स्वराज्यचित्राची प्रतिबिंबें आपल्या बुद्धींत पाहून त्यांचें निरीक्षण केल्यानंतरहि त्यांपैकीं कोणत्याहि एका चित्रानें ज्या बुद्धीचें पूर्ण समाधान होऊ शकत नाहीं आणि त्यांपैकीं प्रत्येकांत असलेले दोष, अपूर्णता अथवा अंधार हीं ज्या बुद्धीस बरोबर पटतात, त्या बुद्धींत अपूर्णत्वातून पूर्णत्वाकडे जाण्याची, सदोषत्वातून निर्दोषत्वाकडे जाण्याची अथवा अंधारांतून प्रकाशाकडे जाण्याची मानवी आत्म्याची नित्य प्रेरणा असेल, तर ती बुद्धि आपल्या राष्ट्राच्या व समाजाच्या भावी आदर्शाचे एक नवें चित्र निर्माण करिते आणि त्या चित्राकडे पाहून व ते प्रत्यक्ष सृष्टींत निर्माण करण्याचे प्रयत्न करून समाधान पावते तात्पर्य, मानवी बुद्धींत सद्यःकालीन व गतकालीन दृश्य सामाजिक अवस्थांचीं शुद्धाशुद्ध प्रतिबिंबे पाहून त्यातील अपूर्णत्व व पूर्णत्व, सदोषत्व व निर्दोषत्व अथवा अंधार व प्रकाश, यांचा निर्णय करण्याचे जसे सामर्थ्य आहे, तसेंच नवी ध्येयसृष्टि निर्माण करून तिचे अवलोकन करण्याचें व तिच्या संस्थापनेचे मार्ग शोधून काढण्याचेंहि सामर्थ्य तिच्यापाशीं आहे नवी ध्येयसृष्टि निर्माण करण्याचें हे जें तिचें सामर्थ्य त्यासच प्रतिभा हे नाव आहे प्रत्येक मनुष्याच्या बुद्धीत ही प्रतिभाशक्ति अव्यक्त स्वरूपात वास करीत असते, पण कांहींच्याच बुद्धींत ती व्यक्त स्वरूपानें प्रकट होते. मानवबुद्धीला अज्ञात अशा क्षेत्रात जाऊन नव्या सत्याचें आकलन व संशोधन करण्याचें हें जें सामर्थ्य आहे, तें तिला कोठून व कसें प्राप्त होते यासंबधीं दोनतीन उपपत्ती आज जगात रूढ आहेत त्या उपपत्तींचा आतां थोडा विचार करूं.

या उपपत्तींना आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक अशीं नावें देतां येतील. सामान्य बुद्धीला आकलन न होणारीं नवीं सत्यें प्रतिभावान् असामान्य विभूतींना कशीं आकलन होतात, यासंबधींची आधिदैविक उपपत्ति असें सांगते, कीं हीं सत्यें परमेश्वर अशा असामान्य बुद्धीच्या लोकांना दाखवितो व नंतर त्याना तीं दिसतात वैदिक मंत्रांचे ऋषी हे मंत्रद्रष्टे होते—ऋषयो मंत्रद्रष्टारः— असें जेव्हा सामान्य लोक म्हणतात, तेव्हां त्यांच्या मनांत हीच आधिदैविक उपपत्ति असते.

परमेश्वराच्या स्वरूपासबधीं द्वैती तत्त्वज्ञानावर ही आधिदैविक उपपत्ति अधिष्ठित झालेली आहे. जीवात्मा व परमात्मा हे दोन आहेत असे कल्पून परमात्मा जीवात्म्याच्या प्रज्ञाचक्षूस नवीन सत्याचें दर्शन घडवितो, अशी ही उपपत्ति आहे याच्या उलट, एक आधिभौतिक उपपत्ति आहे या उपपत्तीप्रमाणें जीव हा द्रष्टा असून जगत् हे त्याचें दृश्य आहे या दृश्य जगताचें दर्शन घेऊन त्याचें स्वरूप आकलन करणें व त्यात व्यवहार करणे, हे मानवी बुद्धीचे मुख्य कार्य आहे दृश्य विश्वातील अथवा समाजाच्या दृश्य परिस्थितींतील परिवर्तनें अवलोकन करणे व या परिवर्तनांचे नियम शोधून काढणें हा मानवी बुद्धीचा धर्म आहे बाह्य परिस्थितीतील परिवर्तनांतूनच मानवी बुद्धीला नव्या ध्येयाचें अथवा सत्याचे ज्ञान होत असतें अर्थात् या कामीं बाह्य दृश्य परिस्थिति व तिच्यातील परिवर्तनें हाच मानवबुद्धीचा गुरु आहे तो गुरु जें शिक्षण देईल, त्याप्रमाणें मानवी बुद्धीचें ज्ञान वाढत जातें व तिला जीं सत्यें तो गुरु दाखवील, त्या सत्याचें आकलन बुद्धि करीत असते मानवबुद्धीला होणाऱ्या नव्या सत्यांच्या दर्शनाची ही एक आधिभौतिक मीमासा आहे या मीमांसेंत सर्व कर्तृत्व दृश्य परिस्थिति व तिच्यांतील परिवर्तनें याच्याकडेच दिलेले असते एक प्रकारे मानवबुद्धि ही या उपपत्तीप्रमाणे दृश्य परिस्थितीची अथवा तिच्यातील परिवर्तनांची दासी बनते या उपपत्तीस यांत्रिक भौतिकवाद (Mechanical materialism) असे नाव आहे यात मनुष्याच्या बुद्धीला मुळींच स्वातंत्र्य व कर्तृत्व दिलेले नाहीं या यात्रिक भौतिकवादाचेच वर्णन करिताना लो टिळकानी

**विश्व सर्व हे तुरुंग मोठा प्राणिमात्र कैदी।**
**पदार्थधर्मांचिया शृंखला त्यांते कोणि न भेदी॥**

हे कै० शकर मोरो रानडे याचे कलहपुरी नाटकाच्या प्रारंभींचें पद गीतारहस्यात दिले आहे. या यात्रिक भौतिकवादात मनुष्यबुद्धीला स्वातंत्र्य नाहीं, मानवी कर्तृत्वाला अवसर नाहीं आणि त्यातून निर्माण होणाऱ्या नीतिशास्त्रात ध्येयवादाला अवकाश नाहीं आधिभौतिक सुखवाद हेंच यांतून निर्माण होणाऱ्या नीतिशास्त्राचे ध्येय असून स्वार्थत्यागी ध्येयवादी मनुष्य आणि सुखपरायण स्वार्थी मनुष्य यातील भेदहि या तत्त्वज्ञानांतील मानसशास्त्र अथवा नीतिशास्त्र जाणत नाहीं.

कार्ल मार्क्सप्रभृति कम्युनिस्ट तत्त्वज्ञाचा भौतिकवाद हा या यात्रिक भौतिकवादाहून भिन्न आहे मार्क्सप्रभृतींच्या भौतिकवादास ‘ विरोधविकासी भौतिकवाद ’ ( Dialectical materialism ) असे नांव आहे. जड अशा निर्जीव सृष्टीच्या परिवर्तनाचे यात्रिक नियमहि सजीव सृष्टीला लागू पडत नाहींत, आणि मानवेतर सजीव सृष्टीचे प्राणिशास्त्रांतील नियमहि ध्येयवादी मानवसृष्टीला जसेच्या तसे लागू करितां येत नाहींत, हे या विरोधविकासी भौतिकवादानें मान्य केलेलें आहे. मानवबुद्धि ही स्वतंत्र आहे, ती ध्येयसृष्टि निर्माण करू शकते आणि या ध्येयाच्या प्राप्तीसाठीं स्वार्थत्यागपूर्वक प्रयत्न करणें हीच मानवी मनाची उन्नतावस्था आहे,

वगैरे मानसशास्त्रांतील व नीतिशास्त्रांतील सिद्धांत या भौतिकवादास मान्य आहेत. मात्र मानवबुद्धीला नव्या समाजरचनेचीं जीं ध्येये सुचतात तीं, मनुष्यसमाजाच्या आधिभौतिक पायांत, म्हणजे त्यांत रूढ असलेल्या धनोत्पादनपद्धतींत व धनविभाजनपद्धतींत क्रांति घडून आल्यामुळे सुचतात; म्हणून दृश्य सामाजिक परिस्थितींतील परिवर्तन हे मानवी ध्येयसृष्टींतील परिवर्तनाचे कारण आहे व हे कारण लक्षांत घेतल्याखेरीज मानवी इतिहासात जी निरनिराळीं ध्येये निर्माण झालीं, तीं कां झालीं व जुनीं ध्येयें मागें पडून नवीं ध्येये प्रस्थापित करणाऱ्या क्रांत्या का घडून आल्या, याची बरोबर मीमांसा होऊ शकत नाहीं, असे या विरोधविकासी भौतिकवादाचे मत आहे पण यांत्रिक भौतिकवादाप्रमाणे मानवबुद्धीचे स्वातंत्र्य, तिनें निर्माण केलेल्या ध्येयसृष्टीचें महत्त्व आणि या ध्येयसृष्टीच्या प्राप्तीसाठीं मनुष्ययत्नांची व स्वार्थत्यागाची आवश्यकता यांचें महत्त्व, मार्क्सप्रभृतींच्या भौतिकवादात अमान्य केलेलीं नाहींत. परिस्थिति हा मानवबुद्धीचा गुरु आहे हे मान्य करूनहि या परिस्थितीला मार्गदर्शन करण्याचें सामर्थ्य ध्येये निर्माण करणाऱ्या मानवबुद्धीला आहे व या दृष्टीने परिस्थितिरूप गुरूला शिकविण्याचे कार्य मानवबुद्धि करीत असते, या सिद्धाताकडे यांत्रिक भौतिकवादाने दुर्लक्ष केलेलें आहे, असें कार्ल मार्क्सनें स्पष्टपणे म्हटले आहे. अर्थात् आतां परिस्थिति हा मानवी बुद्धीचा गुरु आहे या सिद्धाताच्या पलीकडे जाऊन या परिस्थितीचेंहि गुरुत्व अथवा प्रभुत्व मानवी बुद्धीकडे देणे ओघानेंच प्राप्त होतें. समाजांतील सर्वच व्यक्तींच्या बुद्धींत हें स्वातंत्र्य नसतें व म्हणून परिस्थितीला आपल्यापुढे नमवून तिच्यावर प्रभुत्वाचा हक्क बजाविणारे मानवी इतिहासांतील कर्ते पुरुष, आणि प्राप्त परिस्थितीच्या पुढे लोटांगणें घालणारे सामान्य लोक, यांच्या कर्तृत्वात व बुद्धींत साहजिकच भेद करावा लागतो, व तसा भेद जुन्या भौतिकवादानें केला आहे, असें कार्ल मार्क्स् याने म्हटले आहे.* पण त्यास हा द्वैतवाद मान्य नाहीं. सामाजिक परिस्थितींतील परिवर्तन आणि समाजाच्या अतःकरणांतील ध्येयसृष्टीचें परिवर्तन हीं दोन्ही परस्परावलंबी व परस्परसापेक्ष असतात. त्यातील कार्यकारणसंबधहि उभयपक्षीं प्रतियोगी असतात म्हणून ध्येयसृष्टीचा विकास सामाजिक परिस्थितीत होणाऱ्या परिवर्तनांचा विचार न करतां समजूं शकत नाहीं. तसेच सामाजिक परिवर्तनांची मीमांसा, मानवबुद्धीचीं ध्येयें निर्माण करण्याची शक्ति आणि मनुष्यकर्तृत्व यांच्याकडे दुर्लक्ष करून करितां येत नाहीं. कार्ल मार्क्सनें ऐतिहासिक

* "The materialist doctrine that men are products of circumstances and up-bringing forgets that circumstances are changed preciously by men and that the educator must himself be educated Hence this doctrine necessarily arrives at dividing society into two parts, of which one towers above society (in Robert Owen, for example) The coincidence of changing of circumstances and of human activity can only be conceived and rationally understood as revolutionising practice"

— *Marx's Theses on Feuerbach, No. III.*

तत्त्वमीमांसेत जी महत्त्वाची नवी भर घातली ती हीच होय. हेगेलप्रभृति आध्यात्मिक इतिहासमीमांसकांनीं केवळ सामाजिक ध्येयाच्या विकासावरच सर्व भर देऊन त्या ध्येयांचा विकास होण्यास कारण झालेल्या समाजाच्या भौतिक परिस्थितींतील परिवर्तनांकडे दुर्लक्ष केलें होतें ही उणीव भरून काढण्यासाठीं कार्ल मार्क्स्नें आपली 'इतिहासाची भौतिक मीमांसा' शोधून काढिली व तिच्या आधारे समाजसत्ताक क्रांतीचें भविष्य वर्तविलें पण तसें करितांना त्यानें यांत्रिक भौतिकवादाचा स्वीकार केला नाहीं व मानवबुद्धीची स्वतत्रता व मानवी कर्तृत्वाची आवश्यकता, याकडेहि दुर्लक्ष केले नाहीं

मनुष्य हा स्वतंत्र आहे व आपल्या बुद्धीच्या साहाय्यानें दृश्य विश्वाच्या व सामाजिक परिस्थितीच्या परिवर्तनाचे नियम शोधून काढून नवीं ध्येयें निर्माण करण्याचे व प्रस्थापित करण्याचे सामर्थ्य त्याच्यापाशी आहे हें खरें असलें, तरी त्याचें हे स्वातंत्र्य व सामर्थ्य आंतरबाह्य सृष्टीच्या नियमानीं मर्यादित आहे व ते नियम उल्लंघन करून नव्हे, तर ते पाळून व त्याचा उपयोग करूनच त्याला आपले स्वातंत्र्य उपभोगिता येतें, हें केव्हांहि विसरता कामा नये या बाबतींत अध्यात्मवादी हेगेल आणि विरोधविकासी भौतिकवादी मार्क्स् व एजल्स याचा मतभेद नाहीं. एजल्सने मानवी स्वातंत्र्याचा सिद्धांत आणि सृष्टींतील परिवर्तनांच्या नियमाची नियति यांचा समन्वय हेगेलच्या वरील मताच्या आधारेंच केलेला आहे * सृष्टीची नियति मनुष्याला उल्लंघन करिता येत नाहीं, पण तिचें ज्ञान करून घेऊन त्याला तिच्यावर, तिचे नियम पाळूनहि, आपलें प्रभुत्व प्रस्थापित करिता येते. इंद्रियगोचर बाह्य दृश्य सृष्टि आणि सेंद्रिय जीवाच्या अतःकरणातील बाह्येंद्रियांना अगोचर अशी सृष्टि या दोहोवरहि त्याच्या परिवर्तनांचे नियम शोधून काढून मनुष्याला आपल्या मर्यादित स्वातंत्र्याचा उपभोग घेता येतो व तो घेणें हेच त्याचें श्रेष्ठ कर्तव्य आहे.

आतांपर्यंत मानवबुद्धीची ध्येय निर्माण करण्याची शक्ति, ध्येयाच्या प्राप्तीसाठीं स्वार्थत्यागी मानवी प्रयत्नांची आवश्यकता आणि आंतरबाह्य सृष्टीचे नियम समजावून घेऊन त्यांचा उपयोग आपल्या हेतूंसाठीं करून घेण्याचें मनुष्याचे स्वातंत्र्य, या गोष्टींचें विवेचन विरोधविकासी भौतिकवादाच्या आधारें केलें. आतां अध्यात्मवाद्यांचे याहून अधिक असे जें म्हणणे आहे, ते सांगून या मुद्द्याचा समारोप करावयाचा आहे.

---

* एजल्सचें हें मत लेनिनने 'Materialism and Emperio-criticism' या ग्रंथाच्या १५४ व्या पानावर पुढीलप्रमाणे दिले आहे "Engels says 'Hegel was the first man to give proper explanation of the relation of freedom and necessity. Necessity is blind only in so far as it is not understood' Freedom does not consist in imaginary independence of natural law, but in a knowledge of these laws and in the possibility, hence derived, of applying them intelligently to given ends This is true both as regards nature and as regards those forces which control the spiritual and physical existence of man .. Freedom, therefore, consists in a mastery over ourselves and external nature founded upon the necessities of nature."

वर एंजल्सचा मानवी स्वातंत्र्याचा जो सिद्धांत सांगितला, त्यांत मनुष्यानें इंद्रिय-गोचर बाह्य सृष्टीवर प्रभुत्व (mastery over external nature) संपादन करणे जसें अवश्य आहे, तसेच मनोगोचर अंतःसृष्टीवरहि प्रभुत्व (mastery over ourselves) संपादन करणे अवश्य आहे असे म्हटलें आहे. पहिलें प्रभुत्व सपादन करण्यासाठीं त्याला भौतिक विद्येचा अभ्यास करावा लागतो, आणि दुसरें प्रभुत्व संपादन करण्यासाठीं त्यास अध्यात्मविद्येचा अभ्यास करावा लागतो इंद्रियगोचर दृश्य विश्व आणि सेंद्रिय द्रष्टे जीव या दोहोंच्या व्यवहारांचे व त्यांच्या परिवर्तनाचे नियम हे अव्यक्त असतात इंद्रियगोचर सृष्टीच्या परिवर्तनाचे हे अव्यक्त नियम शोधून काढणे, हे मानवी बुद्धीचें कार्य आहे सेंद्रिय जीवसृष्टीचेंहि असेच एक अव्यक्त स्वरूप आहे व तेंहि मनुष्यास शोधून काढावें लागते. दृश्य आणि द्रष्टा या दोहोंच्या व्यक्त स्वरूपांत परिवर्तनें घडवून आणणारे अव्यक्त नियम अथवा त्यांचीं अव्यक्त स्वरूपें हीं एकच आहेत व म्हणूनच द्रष्ट्याला दृश्य विश्वाचीं परिवर्तनें आपणांस अनुकूल अशीं घडवून आणतां येतात व आपल्या बुद्धीनें ध्येयसृष्टि निर्माण करून त्यांच्यावर प्रभुत्व प्राप्त करून घेतां येतें, असे अद्वैतवेदांताचे म्हणणें आहे. द्रष्टा व दृश्य या दोहोंच्या अव्यक्त स्वरूपाशीं तादात्म्य पावल्यावेरीज मनुष्याला अध्यात्म-विद्येतील अथवा भौतिक विद्येतील नवीं सत्यें शोधून काढतां येत नाहींत. किंबहुना, हे अव्यक्त स्वरूप ज्यास समजले नाहीं, त्यास जीवसृष्टि व दृश्य सृष्टि याचे स्वरूपहि बरोबर समजू शकत नाहीं आपले, जीवात्म्याचे शुद्ध अव्यक्त स्वरूप म्हणजेच परमात्मा होय परमात्मा किंवा परमेश्वर हा जीव आणि जगत् यांचेंच अव्यक्त व शुद्ध स्वरूप आहे, याहून दुसरी कोणतीहि वस्तु नाहीं परमेश्वर आपल्या प्रज्ञाचक्षूस नवीं सत्ये दाखवितो व मंत्रद्रष्टे ऋषी समाधि-अवस्थेंत तीं पाहतात या वाक्याचा अर्थहि आपला अव्यक्त अंतरात्मा जागृत होऊन आपल्या बुद्धींत तेज निर्माण झाले व ती दृश्य सशोधनविषयाशीं तद्रूप झाली, म्हणजे तिला ध्येयसृष्टि निर्माण करितां येते, व या भावी ध्येयसृष्टीचे दर्शन ती घेऊ शकते एवढाच आहे. या दृष्टीने सामान्य बुद्धि आणि प्रतिभा, अथवा जीवात्मा आणि परमात्मा, दृश्य जगत् व त्याचे अव्यक्त नियम अथवा परिवर्तनकारणें यात अद्वैतवेदांत भेद कल्पीत नाहीं. दृश्य जगाचें स्वरूप द्रष्ट्याच्या ज्ञानावर अवलंबून असतें अज्ञानी जीवाची सृष्टि आणि ज्ञानी जीवाची सृष्टि या भिन्न आहेत, व त्यापैकीं पहिली सृष्टि ही मोहमयी व दुसरी सत्य आहे. ज्ञानी जीवास सत्यसृष्टि प्रतीत होते व अज्ञानी जीवास अज्ञानी सृष्टि प्रतीत होते हें अज्ञान व ज्ञान भौतिक व आत्मिक असें द्विविध आहे. आत्मिक ज्ञानाने द्रष्ट्याचें अव्यक्त स्वरूप प्रतीत होते व भौतिक ज्ञानानें दृश्य जगताचें अव्यक्त स्वरूप प्रतीत होते. अव्यक्त परमात्म्याशीं तद्रूप झालेला मनुष्य कोणत्याहि देवास शरण जात नाहीं अथवा या आत्मस्वरूपाहून भिन्न असा कोणताहि परमेश्वर तो जाणत नाहीं. वाक्यवृत्तींतील १५३ व्या श्लोकांत श्रीशंकराचार्य म्हणतात :

**नाहं नमामि देवान् । देवानतीत्य न सेवते देवम् ॥**
**न तदनु करोति विधानं । तस्मै यतते नमो नमो मह्यम् ॥**

म्हणजे, मी कोणत्याहि देवांना नमस्कार करीत नाही, देवांच्या पलीकडे गेलेला मनुष्य कोणत्याहि देवाची सेवा करीत नाहीं व त्यानतर तो कोणतेहि पूजाविधान करीत नाहीं. ' यत्नशील असा जो मी, त्या मलाच पुनःपुनः नमस्कार असो ' ' यतते मह्यं नमो नम. ' हे श्रीशंकराचार्यांचे वाक्य आणि ' यत्न तो देव जाणावा ' हे समर्थ रामदास याचें वाक्य हीं दोन्ही समानार्थक व समान भूमिकेनेंच लिहिलेलीं आहेत. अद्वैत भूमिकेवर उभें राहून ' आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥ ' अशा शब्दांनीं ईश्वरवाद व निरीश्वरवाद याचा समन्वय श्रीतुकाराम-महाराज यांनीं केलेला आहे. परमेश्वर नाहीं असे म्हटल्यास जीव आणि जगत् याच्या अव्यक्त शुद्ध स्वरूपाकडे सामान्य लोक लक्ष देत नाहीत, म्हणून जीवास व जगतास अव्यक्त स्वरूप आहे हें लोकास शिकविण्यासाठीं ईश्वरवाद स्वीकारावा लागतो. पण हा ईश्वरवाद स्वीकारला की पुन. सामान्य लोक आपल्या उद्धाराची सर्व जबाबदारी उचलणारा परमेश्वर म्हणून जीव आणि जगत् याहून भिन्न असा तिसरा पदार्थ आहे, असें मानून निष्क्रिय बनतात, आणि तोच आपल्या बुद्धीत प्रकाश पाडील असे मानून आपली बुद्धीहि चालवीत नाहींत मोठ्या मनुष्याने आपल्या बुद्धीनें प्राप्त करून घेतलेले ज्ञान हे परमेश्वरनिर्मित ज्ञान समजतात आणि त्यानें लिहिलेले ग्रथ पवित्र मानून शब्दप्रामाण्याचा स्वीकार करितात बुद्धियोग आणि कर्मयोग यांचा असा लोप झाला, म्हणजे भौतिक विद्या व आत्म विद्या याची प्रगति खुंटते व धर्माच्या नावानें अधर्माचरण चालू होऊन विद्या ही ज्ञानासाठीं नसून विवादासाठींच आहे अशी अवस्था प्राप्त होते! यासाठी परमेश्वर म्हणजे जीवाचें व जगताचें अव्यक्त स्वरूपच होय. अपूर्णत्वांतून पूर्णत्वाकडे व अज्ञानांतून ज्ञानाकडे अथवा अधकारातून प्रकाशाकडे जाण्याची मनुष्याची जी यत्नरूप अव्यक्त शक्ति आणि जगातील अनत वस्तुजातात अखंड परिवर्तनें घडवून आणणारी अशी जी अव्यक्त शक्ति, तिचे व्यक्त स्वरूप म्हणजेच हे दृश्य विश्व होय ती म्हणजेच द्रष्ट्याचें व दृश्याचें अव्यक्त स्वरूप, म्हणजेच परमेश्वर होय, तूच परमेश्वर आहेस, परमेश्वरच जगत् आहे, त्यामुळेंच जगांतील परिवर्तनें व तुझा उद्धार होत असतो, तूंच आपला उद्धार करूं शकशील, यत्न हाच परमेश्वर होय, आणि परमेश्वर आहे असे तुझी वाणी बोलत असली तथापि तो निराळा नाहीं, असाच तू अनुभव घे व भौतिक विद्येच्या व अध्यात्मविद्येच्या साहाय्याने आपल्या प्रयत्नानें जगावर प्रभुत्व गाजविण्याचा आपला अधिकार तू प्राप्त करून घे, असें त्यास सागावे लागते. भारतीय तत्त्वज्ञानांतील आजपर्यंतच्या सर्व ज्ञानाचें हें सार अथवा अमृत आहे. आत्मज्ञानातील हा सिद्धांत भौतिक ज्ञानाच्या वृद्धीस अथवा उपासनेस प्रातिकूल नसून अनुकूलच आहे. तो मानवी प्रयत्न जीवाचें स्वातत्र्य आणि बुद्धीची

ध्येयनिर्मितीची शक्ति यांच्याशीं जसा विरोधी नाहीं, तसाच तो आत्मसृष्टीच्या व भौतिक सृष्टीच्या नियमांशीं, किंबहुना नियतीशींहि विरोधी नाहीं. सृष्टीचे नियम आणि जीवस्वातंत्र्य यांचा त्यांत समन्वय आहे, व जीवात्म्यास परावलंबी न बनवितां स्वावलंबी बनविणारा आत्मोद्धाराचा उपदेशच तो करीत असतो भौतिक फलांच्या प्राप्तीस जसे प्रयत्न हेच एक साधन आहे, त्याचप्रमाणें आत्मज्ञानाच्या व मोक्षाच्या प्राप्तीसहि तेच एक साधन आहे " नाहीं देवापाशीं मोक्षाचे गांठोडें। आणूनी निराळें द्यावें हाती ॥ इंद्रियांचा जय साधुनिया मन । निर्विषयकरण असे तेथें ॥ " हाच मोक्षप्राप्तीचा खरा मार्ग होय, असें या अद्वैतसिद्धांताचे मनुष्यास सांगणें आहे

## व्यापारीवर्ग व युरोपीय संस्कृति

आधुनिक युरोपची प्रगति करण्याचे श्रेय तेथील व्यापारीवर्गाला आहे आज त्याची प्रगति खुटविण्याचें श्रेयहि त्याच वर्गाला आहे या व्यापारीवर्गानें युरोप खंडाचे नेतृत्व आपल्या हातीं घेतल्यानतर तेथील संस्कृतीस भौतिक स्वरूप प्राप्त होणें साहजिकच होतें. भौतिक संपत्तीचें अर्जन हेच या वर्गाचें समाजातील कार्य असल्याने व तोच त्याचा नित्याचा व्यवसाय असल्यानें मानवी सुख म्हणजे भौतिक सुख, आणि भौतिक सुख म्हणजेच पैशाच्या मोलानें मिळणारे सुख, अशी मानवी सुखाची व्याख्या युरोपात लवकरच रूढ झाली व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे धनार्जनाचे स्वातंत्र्य, व्यक्तिसुख म्हणजे धनानें मिळणारे सुख, या वैयक्तिक सुखाचें व धनाचें सरक्षण करणे हेच राजसत्तेचे आद्य कर्तव्य आणि राजसत्ता ही वैयक्तिक मालमत्तेचे सरक्षण करणारी संस्था होय, अशा प्रकारचें आर्थिक, राजकीय व सामाजिक तत्त्वज्ञान लवकरच तेथें रूढ झालें व्यक्तीनें आपल्या संपत्तीची वाढ केली म्हणजे राष्ट्राची संपत्ति आपोआप वाढते, म्हणून व्यक्तीच्या आर्थिक उन्नतीच्या आड राजसत्तेने येऊ नये, ती आड न यावी म्हणून राजसत्ता लोकांनीं आपल्या हातीं घ्यावी, आणि प्रत्येक देशांतील लोकानीं आपल्या राष्ट्राची संपत्ति, सत्ता आणि वैभव वाढविण्याचा प्रयत्न करावा, यांतच व्यक्तीचे, राष्ट्राचें व सर्व मानवजातीचे कल्याण आहे, असा मायावी वेदान्त या व्यापारीवर्गाच्या सामाजिक तत्त्वज्ञानातून निर्माण झाला धनार्जन हेच सर्व विद्यांचे व शास्त्राचे ध्येय ठरून गेलें आपल्या राष्ट्राचें भौतिक सुख हाच सर्वश्रेष्ठ मानवधर्म बनला राजसत्तेला लोकसत्तेचे स्वरूप प्राप्त झालें , परतु ही लोकसत्ता लवकरच धनिकसत्ता बनली आणि धनिकवर्गाचें हित तेच राष्ट्राचें हित असें ठरून गेलें ।

ही व्यक्तिवादी सामाजिक विचारसरणी कांहीं काळ युरोपच्या प्रगतीस कारण झाली. जोपर्यंत व्यक्तीला कष्टाखेरीज धनार्जन करतां येत नव्हते, जोपर्यंत साहसानेच श्री प्राप्त होत होती आणि जोपर्यंत सयमावांचून सचय करतां येत नव्हता, तोंपर्यंत प्रत्येकाने मिळविलेला पैसा हें त्याच्या श्रमाचें फल आहे, प्रत्येक व्यापाऱ्यास

मिळणारा नफा हें त्याच्या साहसाचें फल आहे व प्रत्येक सावकारास मिळणारें व्याज हे त्याच्या सयमाचे फल आहे असे म्हणता येत होतें. परंतु धनोत्पादनाचीं साधनें बदलली, धंद्यांचे प्रमाण वाढलें आणि छोटे घरगुती धदे मोडून मोठे कारखाने निर्माण झाले, तेव्हापासून लहान प्रमाणावर चाललेल्या धंद्यांवर उपजीविका करणाऱ्या समाजास लागू पडणारे हे व्यक्तिवादी अर्थशास्त्र व समाजशास्त्र कारखानदारी व भांडवलशाही समाजास लागू पडेना भांडवलशाही समाजांत धनार्जन आणि कष्ट याचें प्रमाण व्यस्त असते, धनसंचय आणि सयम यांचा कांहीं संबंध नसतो आणि नफेबाज भांडवलवाल्याना साहस करावे लागले, तरी ते स्वतःच्या कष्टार्जित धनावर करावें न लागतां दुसऱ्याच्या धनावर करतां येणें शक्य असतें. समाजांतील धनोत्पादनाची सर्व साधनें अल्पसंख्य वर्गाच्या हाती गेल्यानतर व बहुसख्य निर्धनवर्गाला जीवितार्ची अवश्य साधने प्राप्त करून घेण्यासाठीं आपल्या श्रमशक्तीचा विक्रय करून या अल्पसंख्य धनिकांचे दास बनण्याचा प्रसग आल्यावर या दोन वर्गात होणारे करार हे स्वखुषीचे करार होऊ शकत नाहींत. अशा आर्थिक दृष्ट्या दास बनलेल्या, निर्धन, अज्ञानी व असंघटित व्यक्तीला राज्यकारभारात धनिक, विद्वान् व सघटित वर्गातील व्यक्तीच्या बरोबरीनें एकेक मत दिल्यानें खरी लोकसत्ता निर्माण होऊ शकत नाहीं अशा लोकसत्ताक राज्यांतील सर्व प्रातिनिधिक संस्था धनिकवर्गाच्या हातात जातात, त्यातील सर्व कायदे धनिकवर्गाच्या मालमत्तेचे रक्षण करण्यासाठींच करण्यात येतात आणि अशा प्रातिनिधिक सभांना जबाबदार असणारे मंत्रिमडळ म्हणजे धनिकवर्गाच्या मालमत्तेचे रक्षण करणारी एक दंडधारी सस्था बनते. लोकसत्ता म्हणजे लोकमतानुसार चालणारा राज्यकारभार होय पण हें लोकमतबनविणारीं वृत्तपत्रे आणि ग्रंथप्रकाशक मंडळया यांच्यावर, इतकेच नव्हे, तर राष्ट्रांतील ज्ञानदान करणारी विद्यापीठें व सार्वजनिक शिक्षणसंस्था यांच्यावरहि देशांतील धनिकवर्गाचें आक्रमण व प्रत्यक्ष नियंत्रण चालू लागते अशा लोकसत्तेखालीं व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे धनिकांचे स्वातंत्र्य व निर्धनाचे दास्य, आणि राष्ट्रहित म्हणजे धनिकाचे सुख व निर्धनाचे कष्ट असा अर्थ होतो यामुळे लोकसत्तेला धनिकसत्तेचें व राष्ट्रवादाला साम्राज्यवादाचें विकृत स्वरूप प्राप्त होते. ही विकृति नष्ट करण्यास समाजांतील धनोत्पादनाचीं साधनें धनिकवर्गाच्या खाजगी मालकींतून काढून घेऊन सार्वजनिक मालकीचीं बनविणें, म्हणजेच समाजसत्ताक लोकशाहीची प्रस्थापना करणें, याहून दुसरा कोणताहि मार्ग नाहीं, हे युरोपांतील सामाजिक तत्त्वज्ञांस आज पटलें आहे.

## कम्युनिझम् व फॅसिझम्

ही सामाजिक क्रांति घडवून कशी आणावी हाच एक प्रश्न आधुनिक युरोपापुढें आज उभा आहे या प्रश्नाला जें उत्तर कार्ल मार्क्सनें दिले त्यांतूनच आजचा शास्त्रीय समाजवाद ऊर्फ कम्युनिझम, आणि त्याचें वर्गयुद्धाचें क्रांतिशास्त्र यांचा जन्म झाला

आहे याच्या उलट, या क्रांतीला प्रतिबंध करण्यासाठीं व लोकसत्तेचें पाघरूण झुगारून देऊन नागरिकांचें मूलभूत स्वातंत्र्य हिरावून घेऊन केवळ भांडवलप्रधान समाजरचना चिरंतन करण्यासाठीं फॅसिझम्‌चा उदय झाला. मालक आणि मजूर हा वर्गभेद नष्ट करून एकवर्ग-समाजरचना करण्यासाठीं कम्युनिझमचें क्रांतिशास्त्र निर्माण झालें याच्या विरुद्ध प्रचलित वर्गभेद कायम ठेवून समाजसत्ताक क्रांतीचे प्रयत्न दडपून टाकण्यासाठीं फॅसिझम्‌चें क्रांतिप्रतिबंधक शास्त्र युरोपांत निर्माण झालें आहे या दोनहि शास्त्रांचा शस्त्रबलावरच विश्वास आहे. या शस्त्रबलांतील झगड्याच्या वातावरणांत आधुनिक युरोपांत आत्मबलावर अधिष्ठित झालेलें क्रांतिशास्त्र फैलावण्याचा अथवा त्याचा मोठ्या प्रमाणावर अवलंब होण्याचा संभव निदान आज तरी दिसत नाहीं आधुनिक भारतात निर्माण होत असलेले आत्मबलाचें निःशस्त्र क्रांतिशास्त्र हें लोकसत्तेतून समाजसत्तेत जाण्यास निदान भरतखंडास तरी उपयोगी पडेल, आणि आज त्याला केवळ राष्ट्रीय लोकसत्ताक क्रांतीचें जें स्वरूप प्राप्त झाले आहे, त्याचा विकास होऊन त्यातूनच स्वतंत्र भारतातील सर्वांगीण सामाजिक क्रांति घडून येईल, असें आमचें मत आहे

## मार्क्सचें क्रांतिशास्त्र

कार्ल मार्क्सच्या शास्त्रीय क्रांतिवादाचा येथे थोडा विचार करू युरोपातील त्याच्या पूर्वीच्या तीन शतकाच्या इतिहासाचें अवलोकन करून कार्ल मार्क्सनें आपल्या शास्त्रीय समाजसत्ताक क्रांतिवादाचें स्वरूप ठरविलें. मध्ययुगीन युरोपात सरंजामशाहीच्या पोटांतच व्यापारीवर्गाचा उदय झाला सरदार आणि राजे याच्या भौतिक व आर्थिक गरजा भागविण्याच्या व्यवसायातच त्याची वाढ झाली ही वाढ होतां होता त्याला सरदारवर्गाचा त्रास होऊ लागला त्याच्यातील आपापसातील यादवी देशांत शांतता नादूं देत नाहीं आणि व्यापाराची व पतीच्या व्यवहाराची वाढ होऊं देत नाहीं, हे पाहून त्यानें सरदारवर्गाला नामशेष करण्यासाठीं राजेलोकाना साहाय्य केले आणि सरजामशाही मोडून टाकण्यास मदत केली हा सरजामदारवर्ग आपल्या चातुर्वर्ण्यातील क्षत्रियवर्ण होय सरजामशाही पद्धतीत लोकाचें संरक्षण करणें हा एक जणुं काय खाजगी धंदाच होता. आपल्या भोंवतीं चार शिलेदार जमवावेत आणि वाटेल त्याने आपल्या बाहुबलानें छोटेंसे राज्य निर्माण करावें, असा हा अगदीं प्राथमिक अवस्थेंतील क्षात्रधर्म होता पुढे चार शिलेदाराचे चारशें किंवा चार हजार पायदळ व घोडदळ ठेवून मुलूखगिरी करण्याचे कार्य राजरोस सुरू झालें. तरीहि कांहीं काळ या सरदार-जहागिरदारवर्गानें लोकरक्षणाचें काम केलें. पण पुढें हाच वर्ग समाजांतील व्यापारी-सावकाराना लुटूं लागला व देशात बेबंदशाही माजवूं लागला मोठ्या प्रमाणावर राष्ट्रीय एकछत्री अंमल स्थापन करण्यास याचा अडथळा होऊ लागला आणि शांततेखालीं होणाऱ्या संपत्तीच्या व संस्कृतीच्या

वाढीस त्याचा विरोध होऊ लागला. याच्या उलट, व्यापारीवर्ग आपल्या देशांत व परदेशांत व्यापार करून देशाला सपन्न करू लागला. राष्ट्राच्या सांपत्तिक भरभराटीस विरोध करणाऱ्या या सरजामदारवर्गास नष्ट करून राजाने सरक्षणाचे सर्व कार्य आपल्या एकट्याच्या हातीं घेतलें आणि या धद्याचे राष्ट्रीकरण केलें या वेळीं सरजामदारवर्गाने या राष्ट्रीकरणास परंपरागत वैयक्तिक हक्करक्षणाच्या व स्वातंत्र्यरक्षणाच्या नावानें विरोध केला आपल्यासारख्या अभिजात श्रेष्ठ वर्गास उपटसुभ व्यापारीवर्गाच्या बरोबरीचा दर्जा प्राप्त करून देणें हे निसर्गनियमाच्या विरुद्ध आहे आणि असली सामाजिक विषमता कायद्याने निर्माण होऊ शकणार नाहीं व कांहीं काळ झाली तरी ती टिकणार नाहीं, अशी ओरड त्यानें केली. जहागिरी दिल्याखेरीज सेनापतित्व स्वीकारून राष्ट्रासाठीं आपल्या प्राणाच्या आहुति देण्यास कोणीहि पुढें येणार नाहीं व म्हणून जहागिरदारवर्ग नष्ट करण्यात अखेरीस राष्ट्राचेंच अनहित होईल, अशीहि भीति त्याने घातली तथापि युरोपातील वर्धिष्णु व्यापारीवर्गानें आपणास अभिप्रेत असणारी सामाजिक व राजकीय क्राति घडवून आणिली राजेलोक आपल्या लष्करी सत्तेचा व संपत्तीचा दुरुपयोग करू लागले व धनिकवर्गावर वाटेल तसे कर बसवूं लागले, तेव्हा शेतकरीवर्गाचे नेतृत्व स्वीकारून व्यापारीवर्गानें लोकशाहीची स्थापना केली, सामाजिक समतेची घोषणा केली आणि राष्ट्रीय बंधुभावनेची ग्वाही फिरविली. अशा प्रकारें जमीनदारवर्ग व व्यापारीवर्ग याच्या वर्गकलहातून युरोपीय लोकशाहीचा जन्म झाला पुढें हाच व्यापारी-सावकारवर्ग औद्योगिक क्रातीनंतर कारखानदारवर्ग बनला.

या औद्योगिक क्रातीने धनोत्पादनाचे प्रमाण वाढले, पण या प्रमाणभेदातून प्रकारभेद निर्माण झाला छोट्या प्रमाणावरच्या धद्यातील धनोत्पादन मालकाच्याच श्रमाने प्रायः होत असते मोठ्या प्रमाणावरचें धनोत्पादन मालकाच्या श्रमाने न होता मजुराच्या श्रमाने होतें अशा प्रकारे धनोत्पादनाचे प्रमाण वाढतांच त्याचा प्रकारहि बदलला प्रमाणभेदातून प्रकारभेद निर्माण झाला, म्हणजे पूर्वीच्या समाजरचनेचाहि प्रकार बदलावा लागतो छोट्या छोट्या धंदेवाल्यांना समाजात वावरू देण्यास जेवढीं बंधने पुरीं होतात, तेवढी व तसलीं बंधनें मोठ्या धदेवाल्याना वावरू देण्यास पुरीं होत नाहींत. गावातील माजरे, रानमाजरें व वाघ याच्या आकृतींत कदाचित् प्रमाणभेदच आहे, असे एकादा प्राणिशास्त्रज्ञ म्हणूं शकेल, परतु गांवांतील माजराप्रमाणे रानमाजरांना किंवा वाघाना समाजात अनिर्बंधपणें वावरू द्यावें, असें कोणताहि समाजशास्त्रज्ञ म्हणूं शकत नाहीं. बैलगाड्याच्या रहदारीचे नियत्रण करण्यास पुरे असणारे नियम मोटारींच्या रहदारीचे नियत्रण करण्यास पुरेसे पडत नाहींत आणि शेंपन्नास घरांच्या खेड्यांतील सार्वजनिक आरोग्याचे नियम पांचपन्नास हजार घरांच्या औद्योगिक शहरांतील आरोग्यरक्षणास पुरेसे होत नाहींत. या उदाहरणांवरून प्रमाणभेदांतून प्रकारभेद निर्माण होतो आणि समाजातील सामाजिक व्यवहारांचें प्रमाण व

प्रकार बदलले म्हणजे त्याच्या नियमनांचे प्रकारहि बदलावे लागतात; इतकेंच नाहीं, तर पूर्वीच्या समाजरचनेचें सर्वच स्वरूप पालटून त्यांत क्रांति घडवून आणावी लागते हें दिसून येईल. औद्योगिक क्रांतीमुळें अशाच एका सर्वांगीण सामाजिक क्रांतीची आवश्यकता, इतकेच नव्हे तर शक्यताहि उत्पन्न झाली आहे, असे कार्ल मार्क्सनें दाखवून दिले सरजामशाहींतून लोकशाहींत जाण्याची क्रांति जशी व्यापारी-वर्गाच्या नेतृत्वाने झाली, तशी लोकशाहींतून समाजसत्ताक अवस्थेंत जाण्याची क्रांति भांडवलशाहीखालीं निर्माण होणारा, तिच्याच कार्यासाठीं संघटित होणारा आणि तिच्या अमदानींतच धनोत्पादनाचें सर्व कार्य आपल्या सघटित प्रयत्नानें करीत असता हरघडीस लुबाडला जाणारा कामगारवर्ग घडवून आणील, असेंहि त्यानें दाखवून दिलें.

ही क्रांति एकवर्ग-समाजाची स्थापना करून मानवी समाजाची नैतिक व सांस्कृतिक उन्नति घडवून आणील असे त्याचें मत होतें. तथापि, ही क्राति घडण्यास केवळ हें एकच कारण पुरेसें पडणार नाहीं, असेंहि त्याचें मत होते. समाजांतील एक रचना मोडून त्या ठिकाणीं जेव्हां दुसऱ्या प्रकारची रचना अस्तित्वांत येते, तेव्हां ती केवळ नैतिक व सांस्कृतिक उन्नतीच्या आकांक्षेने घडून येऊं शकत नाहीं. कोणतीहि समाजरचना केवळ नैतिक व सांस्कृतिक दृष्टया अपूर्ण असली, तरी तेवढ्यामुळे ती बदलून टाकण्यास किंवा तिच्यांत क्राति करण्यास लोक तयार होत नाहींत. ती समाजरचना तिच्यातील अतर्गत विरोधांनीं जेव्हा मोडकळीस येते, सुरळीतपणे चालू शकत नाहीं अथवा मोडून पडते, आणि तिच्यापासून आपली जीवितयात्रा चालणेंहि शक्य नाहीं असे सर्व लोकाना दिसून येते, तेव्हांच त्या समाजरचनेंत क्रांति घडून येते. प्रत्येक समाजरचनेंत असे अतर्गत विरोध असतात, हे विरोध वृद्धिंगत होतात आणि ती समाजरचना मोडून पडते, तेव्हाच नवी समाजरचना स्थापन करणारी क्राति घडून यते. अशा प्रकारचे अतर्गत विरोध भाडवलशाही समाजरचनेंत आहेत व तिच्या वाढीबरोबरच त्याचीहि वाढ होत आहे. प्रत्येक समाजरचनेचीं विनाशबीजे तिच्यांतील या अंतर्विरोधांत रुजलेलीं असून त्या समाजरचनेच्या वाढीबरोबरच त्याचीहि वाढ होत असते भांडवलशाहीच्या वाढीबरोबर तिच्या विनाशबीजांची अशीच वाढ होत आहे व तिचा विनाश करणारा शत्रु म्हणजे कामगारवर्गहि तिच्या वाढीबरोबर वाढत व सघटित होत आहे.

भांडवलशाहींतील प्रमुख अंतर्विरोध पुढीलप्रमाणे सागता येतील: या समाज-यन्त्राची सर्व प्रेरकशक्ति वैयक्तिक नफेबाजी व स्पर्धा यातच आहे. या नफेबाजी-साठीं कामगारवर्गाचे वेतन कमी करणें आणि मालाच्या किंमती वाढविणें हीं दोन साधनें भांडवलवाला वर्ग उपयोगांत आणीत असतो व आपापसांतील परस्पर-स्पर्धेमुळें कामगारवर्गाची पिळणूक करण्याचें धोरण त्याला सोडतां येत नाहीं. वेतनाचे दर कमी करून कामगारवर्गाची पिळणूक करणें आणि आपल्या मालाचा खप वाढविणें

या दोन गोष्टी परस्परांशीं विसगत आहेत. सामान्य जनतेची पिळणूक झाल्यानें तिची क्रयशक्ति कमी होते व कारखानदाराच्या मालास गिऱ्हाईक न मिळाल्याने मालाचा खप होत नाहीं खप झाला नाहीं म्हणजे कारखाने बद करावे लागतात. कारखाने बंद झाले म्हणजे लोक बेकार होतात व ते बेकार झाले म्हणजे जनतेची क्रयशक्ति अधिकच कमी होते यातूनच औद्योगिक अरिष्टें निर्माण होतात. या अरिष्टांचें निवारण करण्यासाठी युरोपीय राष्ट्रांनीं साम्राज्यशाहीचा अवलंब केला. त्यामुळे कांहीं काळ या अरिष्टातून त्यांची मुक्तता होऊं शकली तथापि, आज युरोपातील साम्राज्यवादी राष्ट्रे या उपायानेहि भाडवलशाहीतून निर्माण होणाऱ्या अरिष्टांचें निवारण करू शकत नाहींत. भांडवलशाहींतून निर्माण होणाऱ्या औद्योगिक अरिष्टांचे निवारण करण्यासाठीं ज्या साम्राज्यशाहीचा त्यानीं अवलब केला, त्या साम्राज्यशाहींतून त्याच्यावर आज पहिल्याहूनहि फार भयकर अशी अरिष्टपरपरा महायुद्धांच्या रूपानें ओढवत आहे तसेच साम्राज्यातील जित राष्ट्रेहि आपली औद्योगिक उन्नति करून युरोपीय राष्ट्रांशी औद्योगिक स्पर्धा करीत असल्याने चीन-हिंदुस्थान यांसारख्या बाजारपेठा आज त्याच्या हातून जाऊ लागल्या आहेत. इतकेंच नव्हे, तर ज्या युरोपीय भाडवलवाल्यांनीं चीन व हिंदुस्थान या देशांत आपले भाडवल गुंतवून कारखाने निर्माण केले, त्यांचीच स्पर्धा आज युरोपीय कारखानदाराना भोवू लागली आहे हिंदुस्थानसारख्या देशाची सतत शंभर वर्षे पिळणूक झाल्यानें येथील निर्धन जनताहि युरोपीय कारखानदारांचा माल घेऊ शकत नाहीं अशा प्रकारें युरोपीय कारखानदारानीं साम्राज्यशाहीचा अवलब करून त्या समाजरचनेंतील अंतर्विरोधातून निर्माण होणारीं अरिष्टे काहीं काळ पुढे ढकललीं होती, तींच आज पूर्वीहूनहि अधिक भीपण स्वरूपांत त्यांच्यापुढें येऊन उभी राहिलीं आहेत प्रत्येक देशांत कामगार व कारखानदार याच्यांतील वर्गकलह जारीने सुरू आहे आणि क्रांतिकारक कामगारवर्ग युरोपीय महायुद्धाची संधि साधून समाजसत्ताक क्रांति घडवून आणण्याची तत्परतेने वाट पहात आहे. अशा प्रकारें भाडवलशाही समाजरचना व सस्कृति आपल्या अतर्विरोधाच्या पेटलेल्या होमकुंडात जळून भस्मसात् होणार, हे कार्ल मार्क्सचें भविष्य युरोप खडात बहुतांशीं खरें झालें आहे व होण्याच्या बेतांत आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाही. या होमकुडात आजच्या युरोपांतील भाडवलशाही सस्कृति नष्ट झाल्यानंतर त्यांतून समाजसत्ताक नवी संस्कृति निर्माण होईल, हे कार्ल मार्क्सचे भविष्य निदान युरोप खडात खात्रीनें खरे ठरेल असे निश्चितपणें कोणीहि सांगूं शकणार नाहीं. आम्हांस तर असा संभव फारच थोडा दिसतो तथापि, मानवसस्कृतीस यापुढे समाजसत्ताक स्वरूप येणार याबद्दल आम्हांस शंका वाटत नाहीं.

## अनियंत्रित कामगारशाही व वर्गविग्रह

कार्ल मार्क्सच्या क्रांतिशास्त्राचें स्वरूप विशद करण्यासाठीं त्याच्या आणखी

एक-दोन मतांचा येथें उल्लेख करणे अवश्य आहे समाजसत्ताक क्रांति ही सामान्यतः लोकसत्तेखालील सदनशीर मार्गांनी घडून येणारी नसून ती सशस्त्र क्रातीच्या मार्गानेंच यशस्वी होईल असा त्याचा सामान्य सिद्धात आहे ही समाजसत्ताक क्रांति सशस्त्र मार्गांनीं झाल्यानतर काहीं काळ अनियंत्रित कामगारशाही (Dictatorship of the proletariet) स्थापन होईल व एकदां भांडवलशाहीचा पुरा मोड झाला म्हणजे समाजांत कामगारवर्गाखेरीज कोणताहि वर्ग न उरल्यानें एकवर्ग-समाजरचना प्रस्थापित होईल या एकवर्ग-समाजरचनेंत धनोत्पादनाचीं सर्व साधनें सामाजिक मालकीचीं बनल्यामुळें सामुदायिक धनोत्पादनाचे सर्व फायदे सर्वांना सारखे लाभतील. सर्वांच्या सुखाची इयत्ता वाढून सर्वांच्या गरजा यांत्रिक उत्पादनाच्या साहाय्याने फारच कमी कष्टांत भागूं लागतील. समाजांतील कोणताहि वर्ग आपल्या कष्टाचें फल हिरावून घेत नाहीं व तें सर्वच्या सर्व, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष, आज ना उद्यां, आपल्या व आपल्यासारख्या कामगारवर्गाच्या आजच्या किंवा पुढील पिढीस मिळत राहील, अशी खात्री झाल्याने धनोत्पादनाचे कष्ट करण्यास लोक स्वेच्छेनें तयार होतील बाल, वृद्ध आणि रुग्ण या सर्वांची सोय व शुश्रूषा समाजामार्फत होत राहील आणि सर्व प्रौढ सुदृढ व्यक्तींना काम देऊन त्याच्या गरजा भागतील, इतकें वेतन देण्याची जबाबदारी समाज पार पाडील. अशी शाश्वती समाजातील सर्व व्यक्तींस वाटू लागल्यामुळें त्याची धनसचयाची लोभी वृत्ति नष्ट होईल समाजातील कोणाहि प्रौढ सुदृढ व्यक्तीस काम न करिता धनोपभोग घेणें शक्य नाहीं व तें योग्यहि नाहीं, असें लोकमत व प्रत्यक्ष व्यवहार समाजात अनेक वर्षें रूढ झाल्यानतर व समाजाच्या भौतिक गरजा भागविण्यासाठीं लागणारे श्रम कमी होऊन एकवर्ग-समाजांत अनेक वर्षे बंधुभावना रूढ झाली व कामगार-संस्कृतीची स्थापना झाली, म्हणजे समाजांत कोणत्याहि प्रकारचे दडधारी राज्ययत्र असण्याची गरज उरणार नाहीं सामाजिक विषमतेतून निर्माण होणारे गुन्हे, अत्याचार, अशांतता याचे निर्मूलन होऊन कामगारशाहीचे राज्ययत्र निरुपयोगी बनून आपोआप गळून पडेल. यानतर खऱ्या वर्गविग्रहरहित मानवसस्कृतीचा उदय होऊन मानवी इतिहासांतील वर्गविग्रहाचें रानटी युग नष्ट होईल

भांडवलशाहींतून निर्माण होणारा वर्गविग्रह आणि त्या वर्गविग्रहांतून अखेरीस स्थापन होणारी कामगारशाही, अशा प्रकारचे समाजसत्ताक क्रांतीचें जें स्वरूप वर सागितलें, तें कार्ल मार्क्सच्या शास्त्रीय समाजवादातील क्रातिशास्त्राचें केवळ स्थूल स्वरूप आहे समाजाची अगदीं प्राथमिक अवस्था वगळल्यास गुलाम व त्यांचे मालक, भूदास व जमीनदार, आणि कामगार व कारखानदार असे समाजाच्या प्रत्येक अवस्थेत दोन वर्ग असतात यांपैकीं पहिला वर्ग आपल्या कष्टाने समाजांतील धनोत्पादनाचा सर्व भार उचलीत असतो आणि दुसरा वर्ग पहिल्या वर्गाला जीवितयात्रेस अत्यावश्यक अशा किमान धनाचा उपभोग देऊन त्यानें निर्माण केलेल्या धनापैकीं सर्व

अवशिष्ट भाग स्वतः उपभोगीत असतो. समाजांतील गुलामांचा वर्ग नष्ट झाल्यानंतर मध्ययुगांत भूदासवर्ग निर्माण झाला आणि मध्ययुगीन संस्कृति लयास गेल्यानंतर अलीकडचा कामगारवर्ग निर्माण झाला. तथापि प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन या तीनहि काळांतील मानवसंस्कृति कोणत्या तरी स्वरूपातील गुलामगिरीवरच उभारलेली होती व आहे. आधुनिक युरोपात कामगारवर्ग हा स्वतत्र नागरिक बनला आहे, त्याला मतदानाचा हक्क आहे, आणि त्यापैकीं कोणासहि वाटेल तितके धनार्जन करून भांडवलवाला बनण्याचें स्वातंत्र्य कायद्यानें दिलेलें आहे, म्हणून भांडवलशाही समाजांत गुलामगिरी नाहीं, हे म्हणणे खोटे आहे आणि आजच्या समाजांतील निर्धन कामगारवर्गाला करारस्वातंत्र्य उपभोगितां येतें हा केवळ भ्रम आहे, असे कार्ल मार्क्स् यानें उत्कृष्टपणे सिद्ध केलेले आहे. भांडवलशाही समाजांत धनोत्पादनाचीं सर्व साधनें केवळ मूठभर धनिकवर्गाच्या हातीं गेलीं असल्याने बहुसंख्य निर्धनवर्गास आपल्या श्रमशक्तीचा विक्रय करून भांडवलवाला वर्ग जें देईल तें वेतन घेऊन स्वस्थ बसावे लागतें या श्रमशक्तीच्या क्रयविक्रयांत कामगाराच्या पदरीं त्यांच्या उपजीविकेचीं किमान साधनें फार तर पडू शकतात व त्याच्या शक्तीतून निर्माण झालेली सर्व अवशिष्ट संपत्ति भांडवलवाल्या वर्गास मिळते. ज्याप्रमाणें बैलाच्या कष्टातून निर्माण होणारे सर्व धान्य मालकाच्या मालकीचें बनतें, बैलाच्या पोषणास लागणाऱ्या खर्चाहून अधिक जितके धन निर्माण होईल ते सर्व मालकास मिळतें, त्याचप्रमाणें समाजातील कामगारवर्गास पोसून उरलेलें सर्व धन, जमिनीचा खंड, सावकारींतील व्याज अथवा कारखानदारींतील नफा, अशा अनेक रूपांनीं मालकवर्गास मिळत असतें. या भांडवलशाही समाजांत अशा प्रकारें कामगाराचा दर्जा बैलांच्या दर्जाहून किंवा गुलामांच्या दर्जाहून फारसा भिन्न नसतो. याकरितां मालकवर्गाच्या हातांत संकलित झालेलीं धनोत्पादनाचीं सर्व साधने, म्हणजेच एक प्रकारे समाजातील सर्व लोकांचीं जीवितसाधनें, सार्वजनिक मालकीचीं बनवून समाजसत्ताक लोकशाही स्थापन झाल्याखेरीज मनुष्य-समाजातील गुलामगिरीचा अंत होणार नाहीं व तोपर्यंत मानवसंस्कृतींतील वर्गकलहहि नष्ट होणार नाहीं, हा कार्ल मार्क्स्चा मुख्य सिद्धांत आहे. समाजाला समाजसत्ताक अवस्था प्राप्त होण्यास वर्गविग्रहातून निर्माण होणारी अनियंत्रित कामगारशाही हा एक सर्वसामान्य मार्ग होय, असेंहि त्याचें मत होते.

आजपर्यंत समाजात एक परोपजीवी व दुसरा श्रमोपजीवी असे दोन वर्ग नेहमीं होते व यांपैकीं परोपजीवी वर्गाच्या हातीं राजसत्ता असल्यानें समाजातील सर्व कायदे, रूढी, धर्माचार, धर्मविचार, सामाजिक ध्येये, नैतिक विचार आणि शास्त्रें व कला, या सर्वांवर सत्ताधारी व परोपजीवी वर्गाची छाप पडलेली आहे. यामुळें आजपर्यंतची मानवसंस्कृति ही समाजांतील आधारभूत वर्गभेदानें व वर्गविग्रहानें विकृत बनलेली आहे व समाजांतील रूढी, धर्माचार, धर्मविचार, सामाजिक ध्येयें, नैतिक विचार आणि शास्त्रें व कला, समाजांतील कायदे या सर्वांचा

उपयोग, वरिष्ठवर्गानें आपल्या स्वार्थासाठीं व कनिष्ठवर्गाचें दास्य समर्थनीय व चिरंतन करण्यासाठीं केलेला आहे राजकारण, समाजकारण, अर्थकारण या सर्वांत मानवसंस्कृतींतील हा मूलभूत वर्गविग्रह प्रतिबिंबित झालेला आहे, आणि राजे व राजाधिकारी, समाजनेते व त्यांचे अनुयायी, अर्थशास्त्रज्ञ व धर्मशास्त्रज्ञ, कवी आणि इतर कलावत, या सर्वांनीं समाजातील वर्गभेद व तज्जन्य विषमता याना मान्यता दिलेली आहे या दृष्टीनें आजपर्यंतचा मानवसंस्कृतीचा इतिहास हा वर्ग-विग्रहाचा इतिहास आहे आणि तिच्यांत आजपर्यंत घडून आलेल्या सर्वांगीण समाज-क्रांत्या या वर्गविग्रहांतून निर्माण झालेल्या क्रांत्या आहेत, असें कार्ल मार्क्स् मानतो. या त्याच्या सिद्धातास अनुसरून समाजसत्ताक क्रांति ही वर्गविग्रहांतूनच निर्माण होईल व ती प्रायः सशस्त्रच असेल, असेंहि त्याचे म्हणणे होते मानवसस्कृतीला भांडवलशाही युगानंतर कोणतें स्वरूप प्राप्त होईल व ते कसें होईल, याची सामान्य कल्पना वरील सिद्धांतावरून येऊं शकते. परतु कोणत्या देशांत कोणती क्रांति कशी व केव्हा होईल, आणि तेथे समाजवादाची प्रस्थापना कोणत्या मार्गांनीं व कोणत्या अनुक्रमांनीं होईल या व्यावहारिक राजकारणाच्या दृष्टीने अत्यत महत्त्वाच्या प्रश्नाची उत्तरे देण्यास कार्ल मार्क्स्च्या वरील उपपत्तीचें स्थूल सामान्य ज्ञान मुळीच पुरेसें पडत नाहीं. मार्क्स्-एंजल्स्नतर लेनिनने कम्युनिझमच्या व्यावहारिक क्रातिशास्त्रात बरीच भर घातलेली आहे. त्यानतर लेनिनचें क्रातिशास्त्रहि रशियाबाहेरच्या इतर जगाला जसेंच्या तसे लागू करता येत नाहीं असा अनुभव आल्यानतर लेनिनच्या-नतर झालेल्या कम्युनिस्ट पुढाऱ्यांनीहि या क्रांतिशास्त्रात बरीच फिरवाफिरव केलेली आहे. तरीहि जगांतील सर्व राष्ट्रांना लागू पडणारे असे क्रातिशास्त्र कम्युनिझमने आज निर्माण केलेलें आहे, असे समजणें हा केवळ भ्रम आहे आणि तशी अपेक्षा करणे हेहि आमच्या मते शास्त्रीय वृत्तीचें द्योतक नाहीं

## मार्क्स्वाद आणि हिंदी राजकारण

हिंदी राजकारणांत पहिल्या महायुद्धानंतर थोड्याच वर्षांत मार्क्स्वादी विचारानीं प्रवेश केला. महात्मा गांधींनीं १९२० सालीं जी अनत्याचारी असहकाराची पहिली मोहीम सुरू केली, तिची लाट ओसरू लागताच हिंदुस्थानांत १९२२ सालापासून कम्युनिस्ट पक्ष स्थापन होऊन १९२८ सालपर्यंत मोठमोठ्या औद्योगिक शहरांतील कामगारवर्गांत त्याचा बऱ्याच मोठ्या प्रमाणात प्रसार झाला पण यानतर थोड्याच दिवसांत सायमन-कमिशनच्या बहिष्काराच्या रूपानें सुरू झालेलें राष्ट्रीय आदोलन अधिकाधिक उग्र स्वरूप धारण करू लागलें आणि त्याचें रूपांतर १९३० सालीं भारतीय स्वातंत्र्याच्या सत्याग्रहसग्रामांत झालें. या वेळीं कम्युनिस्ट पक्षानें या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीशीं मुळींच सहकार्य केलें नाहीं. यामुळें १९३४ च्या सुमारास मार्क्स्वादाच्या आधारावरच, पण राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्याशीं आणि तो लढा चाल-

विणाऱ्या राष्ट्रसभेशीं अधिक समरस होणारा हिंदी समाजवादी पक्ष राष्ट्रसभेंतच निर्माण झाला यानंतर थोड्याच दिवसांत भाई मानवेंद्रनाथ रॉय यांनीं मार्क्सवादाच्याच आधारावर तिसरा एक पक्ष निर्माण केला हा रॉयवादी पक्ष आतां राजकारणांतून निवृत्त होऊन विलय पावला आहे. हिंदी समाजवादी पक्षानें प्रजा-समाजवादी पक्षांत आपलें रूपांतर करून घेतलें असून समाजवाद्यांनीं गांधीवादाचे क्रांतिकारक स्वरूप ओळखून व त्याच्यांतील क्रांतिकारक अहिंसातत्त्व आत्मसात् करून मार्क्सवादाची पुनर्घटना केली पाहिजे, अशी भूमिका स्वीकारली आहे कम्युनिस्ट पक्ष मात्र मार्क्सवादाला गांधीवादापासून अथवा भारतांत झालेल्या राजकीय क्रांतीपासून कांहींहि बोध घेण्याची गरज नाहीं, असे समजून आपला मार्ग आक्रमीत आहे! मात्र १९३० सालीं झालेल्या सत्याग्रहमोहिमेंत ज्याप्रमाणें त्यानें भाग घेतला नाहीं, त्याचप्रमाणें १९४२ सालीं भारतांत जें प्रचंड आंदोलन झाले त्यांतहि त्यानें भाग घेतला नाहीं इतकेंच नाहीं, तर या बेचाळीसच्या आंदोलनात त्या पक्षानें विरोधी भूमिका स्वीकारून हिंदी राजकारणांतील आपले स्थान सर्वस्वीं गमावलें यापुढेंहि या शुद्ध मार्क्सवादी सनातन वृत्तीच्या पक्षाला येथें फारसें महत्त्वाचे स्थान प्राप्त होईल, असा संभव दिसत नाहीं

दुसऱ्या महायुद्धानंतर एकंदर विचारी जगात मार्क्सवादाची पुनर्घटना किंवा मार्क्सवादी तत्त्वज्ञानातील गुणदोष विवेचन करून समाजवादी तत्त्वज्ञान नव्यानें मांडिले पाहिजे, ही विचारसरणी फार जोराने प्रसार पावू लागली आहे. पण त्याचबरोबर समाजवादी क्रांतीची निकडहि अधिक भासू लागली आहे. युरोप खंडांत मार्क्सवादाच्या आधारावर उभारलेल्या कम्युनिस्ट विचारसरणीहून भिन्न अशी दुसरी एक लोकशाही समाजवादी विचारसरणी ( Democratic Socialism ), किंवा सामाजिक लोकशाही ( Social Democracy ) या नावानें प्रसिद्धीस आलेले एक तत्त्वज्ञान, व त्याच्या आधारावर उभारलेले राजकीय पक्ष निरनिराळया देशात आहेत पण या राजकीय पक्षात क्रांतिकारक वृत्ति किंवा कार्यक्रम मुळींच दिसून येत नसून केवळ प्रातिनिधिक संस्थातील राजकारण एवढेच त्याचें समाजवादी परिवर्तन घडवून आणण्याचें साधन बनलेले आहे याशिवाय संपाचें एक प्रत्यक्ष प्रतिकाराचे साधन ते योजीत असतात, पण हा संपाचा हक्क बेकायदा ठरविला गेल्यास अथवा एकंदर मतप्रचाराचे व संघटनेचे स्वातंत्र्य हिरावून घेतले गेल्यास समाजवादी पक्षानें आपले कार्य कसे चालू ठेवावे याबद्दल त्यांच्यापाशीं निश्चित विचार अथवा कार्यक्रम नाहीं. अशा प्रसंगीं सविनय कायदेभंग आणि अनत्याचारी असहकार या रूपांनीं सत्याग्रहाचा अवलंब करून आपणांस समाजवादी क्रांतीचें कार्य स्वार्थत्यागाच्या व आत्मक्लेशाच्या मार्गानें तडीस नेता येईल, हा बोध भारतीय समाजवाद्यांनीं महात्मा गांधींच्या क्रांतिकारक नेतृत्वापासून घेतला असून त्या सत्याग्रही अधिष्ठानावर भारतीय समाजवादाची उभारणी करण्याचा प्रयत्न व प्रयोग ते करीत आहेत. असे करिताना महात्मा गांधींचें सत्याग्रही क्रांतिकारक तत्त्व आणि लोकशाही समाजवाद यांचा समन्वय

होऊन मार्क्सवादाहून श्रेष्ठ असे सामाजिक तत्त्वज्ञान व क्रांतिशास्त्र भारतांत निर्माण होईल असा प्रस्तुत लेखकाचा कयास आहे गेल्या पचवीस-तीस वर्षांत भारतांत ज्यांनीं मार्क्सवादाचा फैलाव करण्याचे निरनिराळे प्रयोग केले, त्यांनीं या राष्ट्रांत त्याच काळांत गांधीवादानें जें राजकारण केलें त्याचें सहानुभूतिपूर्वक निरीक्षण केलें असतें, तर त्याना हें स्पष्टपणें दिसून आलें असतें, कीं मार्क्सवादांत न आढळणारीं अशीं कांहीं तत्त्वें गांधीवादांत असून नेमक्या त्याच तत्त्वाची आवश्यकता हिंदी राजकारणाच्या लढ्यांत भासत होती· म्हणूनच हिंदी राजकारणावर गाधीवादाचा व गांधीनेतृत्वाचा प्रभाव वाढत गेला आणि येथील राजकारणावर गांधीजींची पकड बसली यावरून मार्क्सवादात कोणत्या तत्त्वांची उणीव आहे तें लक्षांत घेऊन समाजवादी तत्त्वज्ञानाची व क्रांतिशास्त्राची मार्क्सवादाहून अधिक निर्दोष व खोल तत्त्वावर उभारणी करण्याची गरज हिंदी समाजवाद्यास वाटावयास हवी होती त्याप्रमाणें ती गरज ओळखूनच प्रजा-समाजवादी पक्षाच्या नेत्यांनीं आजचे आपले धोरण स्वीकारलेलें आहे रॉयवादानें येथील राजकीय क्षेत्राचा आता त्यागच केलेला आहे राहतां राहिला कम्युनिस्ट पक्ष· त्याला मात्र मार्क्सवादांत कोणतीहि उणीव असल्याचे अद्यापि पटलेलें नाहीं तेव्हा मार्क्सवादांत ज्या तत्त्वाची उणीव असल्यामुळे त्याचा प्रभाव येथील राजकारणावर पडू शकला नाहीं असे दिसतें, त्याचें थोडक्यात दिग्दर्शन येथे करण्यांत येत आहे

या प्रश्नाचा विचार करीत असता पुढील तीन-चार मुद्द्यांवर आपले लक्ष विशेष केंद्रित केले पाहिजे : ( १ ) राष्ट्रीय भावना व वर्गविग्रह, ( २ ) रक्तपाती क्राति टाळण्याचें तंत्र, ( ३ ) सामाजिक विचारसृष्टि आणि बाह्य वस्तुसृष्टि, ( ४ ) धर्मभावना व क्रांतिवृत्ति या चार मुद्द्यांसंबधीं मार्क्सवादाची जी भूमिका आहे, त्या भूमिकेने विचार करणाऱ्याना आपल्या विचारांचा फेरविचार करण्यास लावील अशीच या राष्ट्रांतील एक्दर परिस्थिति ज्या वेळीं हिंदुस्थानात मार्क्सवाद आला त्या वेळेपासून आतापर्यंत राहिलेली आहे यामुळेंच मार्क्सवादी चष्मा बदलून निरहकार व निर्विकार मनानें येथील परिस्थितीचें निरीक्षण ज्यांनीं केलें नाहीं, त्यांना हिंदी राजकारणावर आपला प्रभाव पाडतां आला नाहीं व येणार नाहीं असें आम्हास वाटते याचें स्पष्टीकरण करण्यासाठीं वरील प्रत्येक मुद्दा थोडा अधिक विशद केला पाहिजे

## राष्ट्रीय भावना व वर्गविग्रह

हिंदुस्थानांत ज्या वेळीं मार्क्सवाद प्रथम आला त्या वेळीं म्हणजे पहिलें महायुद्ध संपून गेल्यानतर हिंदी राष्ट्रसभेनें सुमारें तीस-पस्तीस वर्षें प्रयत्न करून हिंदी जनतेच्या अंतःकरणांत जी आधुनिक राष्ट्रीय भावना निर्माण केली होती, ती युयुत्सु स्वरूप धारण करून परकीय साम्राज्यशाहीशीं संपूर्ण स्वराज्याचा लढा करण्यास प्रवृत्त झाली होती या भारतीय स्वातंत्र्याच्या लढ्यांतील आद्य प्रेरणा राष्ट्रीय भावना ही

